

# होमिओपाथिक औषधांचा निघंटु




डॉ. शं. र. फाटक

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# होमिओपाथिक औषधांचा निघंटु

लेखक :

**डॉ. शं. र. फाटक,** एम्. बी. बी. एस्.



**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई**

पहिली आवृत्ती : १९६३
सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ती : १९७४ (शके १८९५)
तृतीय आवृत्ती : डिसेंबर १९८७
चौथी आवृत्ती : ऑगस्ट २००५

प्रकाशक :
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
दादर, मुंबई ४०० ०१४.

**मुद्रक :—**
व्यवस्थापक,
शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय,
मुंबई ४०० ००४.

किंमत : रुपये २००/-

# निवेदन

होमिओपाथिक औषधांचा निघंटु हा ग्रंथ वाचकांच्या हाती सोपवितांना महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास आनंद होत आहे.

४२, यशोधन,
मुंबई–४०० ०३२
दिनांक, १ डिसेंबर १९८७

डॉ. सुरेंद्र बारलिंगे,
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य
साहित्य आणि संस्कृती मंडळ

# निवेदन

आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रांत त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृति, इतिहास, कला इत्यादि विषयांत मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य यावे हा मुख्य उद्देश लक्षात घेऊन साहित्य-संस्कृति मंडळाने वाङ्मय निर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे. मराठी विश्वकोश, मराठी भाषेचा महाकोश, वाङ्मयकोश, विज्ञानमाला, भाषांतरमाला, आंतरभारती–विश्वभारती, महाराष्ट्रेतिहास इत्यादि योजना या कार्यक्रमात अंतर्भूत केल्या आहेत.

२. मराठी भाषेला विद्यापीठीय भाषेचे प्रगल्भ स्वरूप व दर्जा येण्याकरिता मराठीत विज्ञान, तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे आणि तंत्रविज्ञान, या विषयांवरील संशोधनात्मक व अद्यावत माहितीने युक्त अशा ग्रंथांची रचना मोठ्या प्रमाणावर होण्याची आवश्यकता आहे. शिक्षणाच्या प्रसाराने मराठी भाषेचा विकास होईल; ही गोष्ट तर निर्विवादच आहे. पण मराठी भाषेचा विकास होण्यास आणखीही एक साधन आहे. आणि ते साधन म्हणजे मराठी भाषेत निर्माण होणारे उत्कृष्ट वाङ्मय हे होय. जीवनाच्या भाषेतच ज्ञान व संस्कृति यांचे अधिष्ठान तयार व्हावे लागते. जोपर्यंत माणसे परकीय भाषेच्याच आश्रयाने शिक्षण घेतात, कामे करतात व विचार व्यक्त करतात तोपर्यंत शिक्षण सकस बनत नाही, संशोधनाला परावलंबित्व रहाते व विचाराला अस्सलपणा येत नाही. एवढेच नव्हे तर वेगाने वाढणाऱ्या ज्ञानविज्ञानापासून सर्वसामान्य माणसे वंचित राहतात.

३. वरील विषयांवर केवळ परिभाषाकोश अथवा पाठ्यपुस्तके प्रकाशित करून विद्यापीठीय स्तरावर अशाप्रकारचे स्वरूप व दर्जा मराठी भाषेला प्राप्त होणार नाही. सर्वसामान्य सुशिक्षितांपासून तो प्रज्ञावंत पंडितापर्यंत मान्य होतील अशा ग्रंथांची रचना व्हावयास पाहिजे. मराठी भाषेत किंवा अन्य भारतीय भाषांमध्ये विज्ञान, सामाजिक शास्त्रे व तंत्रविज्ञान या विषयांचे प्रतिपादन करावयास उपयुक्त अशा परिभाषासूची किंवा परिभाषा कोष तयार होत आहेत. पश्चिमी भाषांना अशा प्रकारच्या कोशाची गरज नसते, याचे कारण उघड आहे. पश्चिमी भाषांत ज्या विद्यांचा संग्रह केलेला असतो, त्या विद्यांची परिभाषा सतत वापराने रूढ झालेली असते. त्या शब्दांचे अर्थ त्यांच्या

उच्चाराबरोबर वा वाचनाबरोबर वाचकांच्या लक्षात येतात, निदान त्या त्या विषयांतील जिज्ञासूंना तरी ते माहीत असतात. अशी स्थिती मराठी किंवा अन्य भारतीय भाषांची नाही. परिभाषा किंवा शब्द यांचा प्रतिपादनाच्या ओघात समर्पकपणे वारंवार प्रतिष्ठित लेखांत व ग्रंथात उपयोग केल्याने अर्थ व्यक्त करण्याची त्यांत शक्ती येते. अशातऱ्हेने उपयोगात न आलेले शब्द केवळ कोशात पडून राहिल्याने अर्थशून्य राहतात. म्हणून मराठीला आधुनिक ज्ञानविज्ञानांची भाषा बनविण्याकरिता शासन, विद्यापीठे, प्रकाशनसंस्था व त्या त्या विषयांचे कुशल लेखक यांनी मराठीत ग्रंथरचना करणे आवश्यक आहे.

४. वरील उद्देश ध्यानात ठेवून मंडळाने जो बहुविध वाङ्मयीन कार्यक्रम आखला आहे. त्यातील पहिली पायरी म्हणून सामान्य सुशिक्षित वाचकवर्गाकरिता, इंग्रजी न येणाऱ्या कुशल कामगाराकरिता व पदवी / पदविका घेतलेल्या अभियंत्यांकरिता सुबोध भाषेत लिहिलेली विज्ञान व तंत्रविषयक पुस्तके प्रकाशित करून स्वल्प किंमतीत देण्याची व्यवस्था केलेली आहे. मंडळाने आजवर आरोग्यशास्त्र, शरीरविज्ञान, जीवशास्त्र, आयुर्वेद, गणित, ज्योतिषशास्त्र, भौतिकी, रेडिओ, अणुविज्ञान, सांख्यिकी, स्थापत्यशास्त्र, वनस्पतीशास्त्र इत्यादी विषयांवर २८ दर्जेदार पुस्तके विज्ञानमालेत प्रकाशित केली आहेत. वस्त्रोद्योग, प्रकाशचित्रणकला, गणकयंत्रे, रंग, कृत्रिम धागे, चर्मोद्योग, पुस्तक– बांधणी, मोटार– दुरुस्ती, वैमानिक विद्या, अवकाशयान, साखर–निर्मिती इत्यादी इतर अनेक विषयांवरील पुस्तके तयार होत आहेत.

५. या विज्ञानमालेत डॉ. शं. र. फाटक, मुंबई यांनी लिहिलेल्या "होमिओपाथिक औषधांचा निघंटु" या ग्रंथाची पहिली आवृत्ती मंडळाने १९६३ मध्ये प्रकाशित केली होती. पहिल्या आवृत्तीच्या सर्व प्रती संपल्या आणि सदर ग्रंथाच्या उपयुक्ततेबाबत मराठी वाचकांकडून प्रशंसायुक्त व अधिक मागणी करणारी अशी अनेक पत्रे मंडळाकडे आली व येत आहेत. म्हणून या ग्रंथाच्या द्वितीयावृत्तीचे प्रकाशन आवश्यक झाले. ही सुधारून वाढवलेली द्वितीयावृत्ती मराठी वाचकांच्या हाती देतांना मला आनंद होत आहे.

६. आधुनिक वैद्यकशास्त्र, औषधीविज्ञान व चिकित्सापद्धती यांवर मराठी भाषेत उल्लेखनीय ग्रंथांचा अभाव आहे. पाश्चात्य औषधीविज्ञान व चिकित्सापद्धती आज बरीच प्रगत अवस्थेत आहे व या विषयांवरील ग्रंथ बहुतांश इंग्रजी भाषेतच भारतीय वाचकास उपलब्ध आहेत. भारतीय औषधीविज्ञान व वैद्यकशास्त्राला आयुर्वेदाचे पाठबळ असले तरी आधुनिक चिकित्सेत पाश्चात्य औषधीविज्ञानाचाच

प्रामुख्याने अवलंब केला जात आहे. तसेच, भारतीय विद्यापीठांमध्येही या विषयावर इंग्रजी माध्यमातूनच शिक्षण दिले जात आहे. आधुनिक ज्ञानविज्ञानाच्या सर्व क्षेत्रांत मराठी भाषेला समर्थपणे संचार करता यावा म्हणून तिच्या विकासाची जी योजना मंडळाने हाती घेतली आहे त्या योजनेमध्ये मराठी भाषेत आयुर्वेद, पाश्चात्य औषधी-विज्ञान व चिकित्सापद्धती आणि वैद्यकशास्त्र या विषयांवरील पुस्तकांचा प्रकाशनाचा समावेश आहे. या विषयांवर मंडळाने " होमिओपाथिक लक्षणांचा भावनाकोश " " मानवी आनुवंशिकता ", " आरोग्य आणि आहारशास्त्र ", " माणसाचा मेंदू आणि त्याचे कार्य ", " आयुर्वेदीय शब्दकोश, भाग १ व २ ", " मधुमेह ", " मानवी देह भाग १ व २ ", डॉ. बोमाँ यांचे " Medicine : Essentials for Practitioners & Students " या पुस्तकाचा मराठी अनुवाद " पाश्चात्य रोगचिकित्सा ", अशी ११ दर्जेदार पुस्तके आतापर्यंत प्रकाशित केली आहेत. " मानवी शरीरविज्ञान ", " स्त्री–रोग–चिकित्सा " ( डॉ. मसानी यांच्या " A Text Book of Gynaecology " चा अनुवाद ), " प्रसूतीशास्त्र (डॉ. मसानी यांच्या " A Text–Book of Obstetrics " चा अनुवाद), " प्राणिजन्य मानवी रोग " इत्यादी ग्रंथ क्रमाने प्रकाशित होत आहेत.

७. पहिल्या आवृत्तीप्रमाणेच " होमिओपाथिक औषधांचा निघंटु " या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीचेही वैद्यकशास्त्रासंबंधी जिज्ञासा असलेल्या लोकांकडून स्वागत होईल अशी आशा आहे. ग्रंथलेखक डॉ. फाटक यांनी मंडळाच्या सूचनेनुसार या ग्रंथाच्या सुधारून वाढविलेल्या द्वितीयावृत्तीची मुद्रणप्रत सत्वर मंडळास उपलब्ध करून दिली याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे. याच विषयावरील डॉ. फाटक यांनी लिहिलेल्या " होमिओपाथिक लक्षणांचा भावनाकोश " या ग्रंथाच्या सर्व प्रती संपल्याने त्याची द्वितीयावृत्तीही लवकरच प्रकाशित होत आहे.

वाई : **लक्ष्मणशास्त्री जोशी,**

महाशिवरात्री १ फाल्गुन १८९५. अध्यक्ष,

२० फेब्रुवारी, १९७४. महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृति मंडळ.

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

## निघंटुचा अभ्यास

निघंटूमधील औषधांचा योग्य अभ्यास कसा करावा ? असा प्रश्न पहिल्या आवृत्तीनंतर अनेक अभ्यासू वाचकांनी केला त्यास अनुसरून पुढील दिग्दर्शन केले आहे.

औषध पुनःपुन्हा वाचून त्यातील लक्षणे स्मरणात ठेवावयाची हा धोपट मार्ग. पण तेवढ्याने भागेल असे नाही. तीच लक्षणे दुसऱ्या औषधातही असतात. तेव्हा विशिष्ट औषधाची लक्षणे तारतम्याने- इतर औषधांच्या तुलनेने - डोक्यात पक्की बसविली पाहिजेत.

हे काम कष्टाचे, जिकिरीचे, दीर्घोद्योगाचे तर खरेच, पण औषधावर आपली चांगली पकड बसवावयाची म्हणजे सावधपणाचा दीर्घोद्योग हाच उपाय. दुसरा सुलभ जवळचा रस्ता नाही.

आपला एखादा मित्र असतो. त्याने कडी काढली, जवळच्या खोलीत तो बोलत असला, दारावरची घंटा वाजविली तरी पुष्कळ वेळा आपल्यास तो बिनचूक ओळखता येतो. ओळखण्यासाठी त्याला समोरूनच बघावयास हवा असे नाही. पाठमोरा, तिरपा, नुसती केसांची ठेवण- थोडक्यात म्हणजे अपूर्ण स्वरूपात- अशा एखाद्या वैशिष्ट्यामुळेही ओळखता येतो. ओझरते दर्शनहि समग्र दर्शनाचे काम करून जाते.

या निघंटुमधील औषधे तुमची अशी मित्र बनली पाहिजेत. तुम्हाला ती पूर्ण किंवा अपूर्ण कशीहि दिसली तरी ओळखता आली पाहिजेत. म्हणजे त्यांचा परिचय सर्व अंगांनी झाला पाहिजे.

यासाठी औषध एका विशिष्ट पद्धतीने वाचले तर सोपे जाते असा ग्रंथकर्त्याचा अनुभव आहे. औषध समजून घेण्याचा हाच एकमेव मार्ग आहे असा दावा नाही. ही पद्धत उपयुक्त वाटली म्हणून थोडक्यात तिचे दिग्दर्शन केले आहे.

## औषधाचे महत्त्वाचे रूप

कोणत्याही औषधाची ओळख करून घ्यावयाची म्हणजे त्या औषधाखाली दिलेली ( १ ) सर्वसाधारण ( २ ) लक्षणांचे वैशिष्ट्य जा. हो ( जास्त होते ) व. वा ( बरे वाटते ) नंतर ( ३ ) मानसिक ही तीन सदरे काळजीपूर्वक अभ्यासिली पाहिजेत.

या तीन सदरात औषधाचे **मर्म** येऊन जाते. बाकी सर्व सदरे तपशीलात जमा. उपयोगाची, परंतु ओळख पटण्यासाठी ( Identification ) ही तीन सदरे महत्त्वाची.

या प्रत्येक सदरातील जवळ जवळ सर्व गोष्टी भावनाकोशामधे बघावयाच्या. कोशात त्या औषधाबरोबर दुसरीहि औषधे दिलेली असतात. त्यात आपण वाचत असलेल्या औषधाचे स्थान "तारतम्याने" जाणून घ्यावयाचे.

निघंटुमध्ये दिलेले लक्षण भावनाकोशात बघताना क्वचित् त्या लक्षणाखाली, वाचत असलेले औषध नसेलहि. त्याचप्रमाणे भावनाकोषात दिलेले लक्षण निघंटूत सापडणार नाही. याचे कारण त्या लक्षणासाठी दुसरी औषधे अधिक महत्त्वाची असल्याने हे औषध गाळण्यात आले.

आणखी काही गोष्टी स्पष्ट करण्यासाठी एक औषधच थोडक्यात अभ्यासून दाखविले आहे.

पहिले औषध अकोनाइट ( Aconite ) घेतले आहे.

या औषधाचा परिणाम **मन, मेंदू, मज्जातंतू; हृदय** नाडीतील रक्ताभिसरण, छाती व उदर यांतील इंद्रियांवर व सांध्यावर होतो असे पहिलेच वाक्य आहे.

भावनाकोश पाहिला तर अकोनाइट ( अको ) बुद्धि: मन यामधे ठळकपणे दिले आहे. परंतु मेंदू या सदरात तिसरा दर्जा आहे. मेंदूच्या उपसदरात आग, ढिला ( सैल ) या दोन सदरात अको सापडते. इतरत्र नाही.

मानसिक विकारामधे **अंतर्ज्ञानी, आनंदी,** आरडाओरड यात अको आहे. परंतु निघंटुमधे **उतावीळपणाला** दुसरा दर्जा दिला असला तर कोशात उतावीळपणा या सदरात अको नाहीच. **उदास** मधे आहे. **काळजी** मधे नाही. ही काळजी सांसारिक नव्हे. भीतीमुळे उत्पन्न झालेली म्हणून काळजी या सदरात अको नाही. पण **भय, धास्ती, दचकणे** या सदरातून अको सापडते. **भयाची** पोटसदरे **गर्दी, तापात, भविष्याचे** ( मरणाचे ), **रस्ता ओलांडण्याचे** असे तपशीलहि सापडतील. या सदरातील दुसरी औषधे नजरेखालून घालणे जरूर आहे.

नंतर हृदय. कोशात बघितले तर हृदयः-- **सर्वसाधारण, काळजी,** चिंता वाटून, **गार, धडधड** भावनामुळे या सदरात अको आहे. **नाडी** अनियमित, अशक्त, कठिण, जलद, भरलेली व जोरदार, मोटी लहान, हाताला लागते न लागते या सर्व सदरात अको आहे. अर्थ एवढाच की अकोची नाडी जवळजवळ सर्व प्रकारची, उलटसुलटहि असू शकते.

अकोनाइटचा परिणाम छाती उदर यातील इंद्रियांवर व सांध्यांवर होतो. कोशामध्ये **छाती सर्वसाधारण** मध्ये अको आहे. सर्वसाधारणचे पोटसदर **आतल्या** आत, अदलाबदल यामध्ये अको आहे. नंतर **आग टोचते, न्युमोनिआ,** प्लुरिसि, **रक्ताधिक्य** इतक्या सदरात अको सापडते. छातीचा बाह्य भाग यात अको कोठेच नाही हे लक्षात घ्यावे

**रुधिराभिसरण** या सदरात **सर्वसाधारण; आग; काळजी; चिंता** वाटून; **गार, धडधड** पोटसदर भावनामुळे ( काळजीयुक्त ) इत्यादि ठिकाणी अको आहे.

**हृदय** व **रुधिराभिसरण** या सदरात **गार** मध्ये अको आहे. परंतु उदर **सर्वसाधारण** अको नाही, **गार** अको नाही. उदर **फुगलेले, वेदनायुक्त** मध्ये अको आहे. **बधिर; वात** ओटीपोटात; **शोध शौचः- रक्त** नुसते, **हिरवे** गवतासारखे शिवाय **हगवण** भीती, भावना मनःक्षोभामुळे; **हुळहुळे** इतक्या ठिकाणी अको सापडते.

सांधे या सदरात अको नसले तरी संधिवातात आहे.

धडधाकटच्या ऐवजी कोशात **धट्टाकट्टा** शब्द वापरला आहे तेथे अको आहे. **रक्ताधिक्य** मध्ये आहे. परंतु **लठ्ठपणा** मध्ये नाही याशब्दात फरक आहे. नीट ध्यानात घ्यावा.

**वेदना** मधे अको आहे. त्याची पोटसदरे **एकदम सुरू होऊन एकदम थांबतात; कापल्याप्रमाणे; टोचल्याप्रमाणे, ठुसठुस, नांगी मारल्याप्रमाणे, फाडल्याप्रमाणे** तीव्र इतक्या ठिकाणी अको कमी जास्त महत्वाने सापडेल.

नंतर **भावना** व **विकार उद्भवण्याचा क्रम** हे सर्वसाधारण मधील सदर पहावे. याच्या पोटसदरात **एकदम सुरू होतात, खालून वर, तीक्ष्ण स्वरूपाचे** इतक्या सदरात अको आहे.

**मुले** यात अको आहे.

**रक्तस्राव ; काळा, तीव्र स्वरूपाचा भडभडून लाल भडक** सर्व अको मध्ये येतो.

**बधिर** मध्ये अको आहे.

**मोठे झाले** आहे असे वाटणे यामध्ये अको तिसऱ्या दर्जाचे आहे. **ताणल्या-सारखे वाटणे** मधे अको नाही. **झिणझिण्या** यात अको आहे. **हुळहुळेपणा वेदनानंतर** अको आहे.

**थंडीमुळे** हे सदर, लक्षणांचे वैशिष्ट्य मधे सापडेल. तेथे **गारठल्याने** जा. हो. मधे अको आहे. पण तेथेच ब. वा. उघडे झाल्याने, गार पाण्याच्या आंघोळीने मधे अको आहे.

**जखमा, दुखापती** यात अको नसले तरी **आघातामुळे** शस्त्रक्रियेच्या यात अको आहे. ही तीनही सदरे **सर्वसाधारण भावना** येथे दिलेली आहेत.

**सूज** कोशात तीन प्रकारची दिली आहे. **सूज; सूज** जलयुक्त; **सूज** दाहयुक्त. यात अको पेक्षा वरच्या दर्जाची औषधे कितीतरी आहेत. जलयुक्त सुजेमधे अको नाही.

नंतर **लक्षणांची वैशिष्ट्ये.**

**मनःक्षोभ**– कोशामध्ये **भावनातिरेक** सदरात जोडीला मनःक्षोभ आहे. भीती धास्ती ही सदरे लक्षणांचे वैशिष्ट्य मधे आहेत. **सर्वसाधारण** यात **भय धास्ती दचकणे** या सदराखाली अको चा विचार पूर्वीच केला आहे तो पहावा. संताप हे **भावनातिरेकाचे** पोटसदर आहे.

**घाम येताना थंड वारे लागले तर** जा. हो. हे सदर लक्षणांचे वैशिष्ट्य यामधे आले आहे. तेथे अको पेक्षा व्हस-टा व सिलि या औषधांना अधिक वरचा दर्जा दिला आहे.

**आवाजामुळे** जा. हो. या सदरात 'अको' हा तिसरा दर्जा आहे. काफि, थेरि, **नक्स-व्हा, सिंको** वरच्या दर्जाची आहेत. पण **सहन न होणे** यामधे अको आहे.

**उजेडाने** जा. हो. मधे अको तिसऱ्या दर्जाचे आहे. त्यातच **उजेडाने** ब वा मधील औषधे विरुद्ध प्रकृतीची म्हणून पाहून सोडावीत.

**दात येताना** मधे पुष्कळच औषधे आहेत. परंतु **कामो, पल्स, मर्क्यु, स्टफि** यांच्या बरोबरीने अकोचा प्रथम दर्जा आहे. इतर लक्षणांचा तारतम्याने विचार करावयास हवा.

**निजल्याने** कुशीवर जा. हो. **डाव्या** जा. हो. पाठीवर **उताणे** जा. हो. इतक्या ठिकाणी अको आहे.

**अंग दुमडून** ब. वा. मधे अको पेक्षा दुसऱ्या औषधांना वरचा दर्जा आहे.

**खोलीत** घरात जा. हो. यापुढे **हवा** मोकळी ब. वा पहा असे दिले आहे. तेथे पाहिल्यास **हवा** थंडगार, कोरडी जा. हो. :– **अको.**

मोकळी गार जा. हो. :– अको.

ब. वा – अको नाही.

**अन्न** व **पये** यात उत्तेजक नाही. **दारु** व तत्सम पेये यामधे ब. वा. मधे अको आहे.

**विटाळसपणी** जा. हो. मधे अको नाही. परंतु **सर्वसाधारण** मधे **शरीरातील स्राव गेल्यामुळे झालेले विकार** यामधे अको सापडते.

**उन्हात** जा हो. मधे अको आहे. परंतु **उन्हाळ्यात** जा. हो मध्ये नाही. हा सूक्ष्म फरक ध्यानी घ्यावा.

**ब. वा** पाठीवर निजल्याने जा. हो. मधे अको आहे. म्हणून निघंटूत पाठीवर निजल्याने खोकला, छातीत टोंचणे कमी होते असा तपशील दिला आहे.

**नंतर मानसिक.**

यातील काही गोष्टींचा विचार सर्वसाधारण मध्ये येऊन गेला : हे.

**वेड** मधे अको नाही. **वात** मधे आहे. **कण्हणे, किंचाळण** मध्ये अको नाही. या गोष्टी चिंतेमुळे होतात. मुठी चावणे, नखे खाणे या क्रिया देहभान विसरणे या सदरात येतात. भविष्य वर्तविणे असे सदर नसले तरी भीति भविष्याची यात अको स्पष्ट आहे. भीती धास्तीमुळे उद्‌भवलेले काही विकार निघंटूत दिले आहेत. परंतु त्याशिवाय इतर काही विकार उदा. वाचा बसणे, स्त्रियांना रक्तस्राव सुरू होऊन तो चालू राहाणे हे विकार अकोने बरे होण्याचा संभव आहे. असे सर्वसाधारण सदरातील शेवटचे वाक्य सांगते. वरील उदाहरणावरून हेंही लक्षात येईल की कारण जरी तेच असले तरी प्रकृतिधर्मानुसार निरनिराळे विकार होण्याची शक्यता असते. पण कारणानुसार एकाच औषधाची निवड करावयाची. निघंटूचा अभ्यास करताना वरील बाब ध्यानात ठेवावी म्हणजे भावनाकोशात नसलेल्या लक्षणांचा उलगडा करिता येईल.

**अंतर्ज्ञानी** मानसिक लक्षणात दिले आहे तेथे अको आहे. **मरणाचे** विचार येतात मधे अको आहे. निघंटूमधे वातात बेशुद्धि नसते असे आवर्जून सांगितले आहे. **वात** व **बेशुद्धि** अशी दोनहि सदरे पाहून तुलना करावी.

गाणे ऐकल्याने उदासीनता येते. **उदास** मधे अको आहे. संगीत ( गाणे ) ऐकल्याने जा. हो. मधे अको नाही.

चिडखोरपणा व त्यानंतरची लक्षणे यांचा विचार **वेदना** व **भावना** व **विकार उद्भवण्याचा क्रम** या दोन सदरांखाली पूर्वी येऊन गेला आहे.

**डोके डोळे कान**

इत्यादि सदरे निघंटूत पाहात असताना **आग व कोरडेपणा** बऱ्याच अवयवांखाली सापडेल. **स्राव**; रक्ताळलेले, भडभडून, जोराने व वेदनायुक्त असतात. अशाहि गोष्टींचा विचार करावा.

प्रत्येक सदर वर दर्शविल्याप्रमाणे कोशात बघावे.

एवढे सर्व अवधानपूर्वक करण्यास बराच वेळ लागेल हे खरे. परंतु औषधाची ओळख जास्त पक्की होईल असा भरंवसा आहे.

एकच गोष्ट दोन तऱ्हेने ( काही वेळा जास्तहि ) पाहता येते. एखादा कप अर्धा भरला असे आपण म्हणतो तेव्हा तो अर्धा रिकामा आहे असेहि म्हणता येते. या विषयीचा ऊहापोह भावनाकोशाच्या प्रस्तावनेत आला असल्याने पुनरुक्ति नको.

**सारांश**

( १ ) औषध सर्व अंगांनी न्याहाळावे.

( २ ) तारतम्याने बघून त्याचे **मर्म** जाणावे.

( ३ ) निघंटु व भावनाकोश दोनहि परस्पर पूरक आहेत. स्वतंत्रपणे परिपूर्ण ( complete ) नाहीत असे ध्यानी घेऊन दोघांचाहि अभ्यास करावा.

( ४ ) शेवटी पाण्यात पडल्याशिवाय पोहता येणार नाही. त्याप्रमाणे औषधे दिल्याशिवाय त्यांची मैत्री होणार नाही. औषध वाचताना रोगी नजरे-समोर आले पाहिजेत. रोगी लक्षणे सांगत असता औषधे नजरेसमोर नाचली पाहिजेत. हे सर्व **डोळस अभ्यासाने** होऊ शकते.

( ५ ) औषधे वापरताना यशाबरोबर अपयश येणारच. अपयश का आले असेल याची कसून चौकशी केल्यास, अपयश पुष्कळच शिकवून जाईल. अपयशाचा असा उपयोग म्हणजे पुढच्या यशाची पायरीच समजावी.

एका तपानंतर, परमेश्वर कृपेने, ग्रंथकर्त्याच्या हयातीत या पुस्तकाची दुसरी आवृत्ति निघण्याचा योग आला; यावरून होमिओपाथिक चिकित्सेचा अभ्यास करणाराना या पुस्तकांची उपयुक्तता थोडीबहुत पटली असे दिसते, याबद्दल ग्रंथकर्त्याला समाधान होत आहे, म्हणून अशा अभ्यासकांचे आभार मानणे जरूर आहे.

**डॉ. शं. र. फाटक**

# होमिओपाथिक औषधांचा निघंटु

## १. अकोनाईट (बचनाग, अतिविष) Aconite

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मन*; *मेंदू*; *मज्जातंतू*; **हृदय**, नाडीतील रक्ताभिसरण, छाती व उदर यांतील इंद्रियांवर व सांध्यावर होतो. धडधाकट मुल व माणसे यांच्यावर याची क्रिया चांगली होते. विकार **एकदम** सुरू होतात व ते **तीव्र स्वरूपाचे** असून **वेदनायुक्त** असतात. **सूज (शोथ) येते**, ठिकठिकाणी **रक्ताधिक्य** होते. **रक्तस्राव लालभडक असतो.** शरीरातील भाग **बधिर** होतात; **आग होते**; किंवा ते **मोठे झाल्यासारखे वाटतात**. ताणल्यासारखे वाटतात. मुंग्या आल्यासारखे वाटते. झणझणल्यासारखे वाटते. वेदना टोचल्या, फाडल्याप्रमाणे असतात. वेदनानंतर भाग **बधिर** किंवा हुळहुळा होतो. अत्यंत थंडीने छातीचे व मेंदूचे विकार उद्भवतात. अत्यंत उष्णतेने जुलाब व्हावयास लागतात. एकदम शक्तिपात होतो. उठण्याचा प्रयत्न केला तर बेशुद्धि येते. भीति, धास्ती, अत्यत थंडी किंवा उष्णता, दुखापती, व शस्त्रक्रिया या कारणामुळे विकार उद्भवतात. या औषधाचा परिणाम तात्कालिक असला तरी वरील कारणामुळे झालेले जुने विकार या औषधाने बरे होतात. मुले विकार झालेल्या भागावर हात ठेवतात. किंचाळून स्वतःची जननेंद्रिये धरून ठेवतात.

**मानसिक** :– *धडकी भरते*, *काळजी*, *चिंता* वाटते. *मरणाची*, लोकांच्या जमावाची रस्ता ओलांडण्याची, घराबाहेर पडण्याची *भीति* वाटते. **अस्वस्थता, बेचैनपणा व घाबरटपणा** उत्पन्न होतो. **वेदनांच्या तीव्रतेमुळे** देहभान जाते. ***भीतीमुळे वेड लागले आहे*** की काय असे दिसते. त्यामुळे **किंचाळणे**; कण्हणे, **मुठी चावणे**, नखे खाणे वगैरे क्रिया करण्याची प्रवृत्ति होते. मरावेसे वाटते. **पुढे काय होईल याचे भविष्य वर्तविणे;** मरणाची वेळ सांगणे. वात होतो. वातांत दुःखाची, दुर्दैवाची, निराशेची

बडबड चालू असते पण बेशुद्धि नसते. गाणे ऐकल्याने उदासीनता येते. नुकत्याच घडलेल्या गोष्टी स्वप्नात घडल्यासारख्या वाटतात. चिडखोरपणा; वस्तूंची फेकाफेक करणे. मनोवृत्तीत एकदम बदल होतो. आनंदाने एकाक्षणी गाणे, हसणे तर दुसऱ्या क्षणी दुःखी, कष्टी, उदासीन होणे. नुकत्याच पाहिलेल्या गोष्टी जणुकाय स्वप्नात पाहिल्यासारख्या वाटतात. **उताविळपणा.**

**डोके** :– आग होते, जड होते, आवळल्यासारखे, फुटल्यासारखे किंवा पिळवटल्या-सारखे वाटते. आत तडतडल्यासारखा आवाज होतो. डोके दुखत असताना लघवीला फार होते. भीति, धास्तीने घेऱ्या येतात; उठताना डोके हलविल्याने जास्त येतात. डोके आपटणे. डोक्याभोवती कढत पट्टा बांधल्याप्रमाणे वाटते, किंवा मेंदूत उकळल्याप्रमाणे आग होते. केस ओढल्यासारखे वाटतात किंवा ते उभे राहिले आहेत असे वाटते.

**डोळे** :– एकाएकी सुजतात, लाल होतात पण आतून स्राव येत नाही. उजेड सहन होत नाही. किंवा हवासा वाटतो. सूर्यप्रकाशाचे बर्फावरून झालेले परावर्तन सहन होत नाही. **पापण्या सुजून टणक व लाल होतात, आग होते.** मातीचे, लोखंडाचे कण आत गेल्यास अकोनाइटने वेदना कमी होतात. कोरडे झाल्यासारखे वाटून, आग होऊन खुपतात. डोळे चकचकीत वटार-ल्याप्रमाणे, किंवा धुंद झाल्यासारखे दिसतात.

**कान** :– आवाज सहन होत नाही. कानात पाण्याचा थेंब अडकला आहे असे वाटते.

**नाक** :– बधिर होऊन रक्त येते. **वास सहन होत नाही.** सर्दी, नाकातून कढत पाणी येते. मोकळ्या हवेने बरे वाटते.

**चेहरा** :– *चिंता किंवा भीतिग्रस्त*: **गाल कढत व लाल.** उठताना फिकट होतो. एक गाल कढत व लाल, व दुसरा अगदी फिकट व गार. चेहरा जड वाटतो.

**तोंड** :– दात दुखताना दातात व डोक्यात ठुसठुसते. दात खाण्याची प्रवृत्ति. पाण्याशिवाय सर्व पदार्थ कडू लागतात, व ते चवीला वाईट लागते. आत कोरडी आग झाल्यासारखे वाटते. तात्पुरते तोतरे बोलणे. जीभ सुजल्याप्रमाणे वाटते. पाण्याशिवाय सर्व पदार्थ कडू लागतात. पाणी वाईट लागते. ओठ काळवंडलेले, कोरडे कातडी निघते.

**घसा** :– गिळताना गुदमरल्यासारखे वाटते. टॉन्सिल्स सुजलेल्या व कोरड पडते.

**उदर** :- हात लावलेला सहन होत नाही. नगाऱ्यासारखे फुगते. कळा सुरू झाल्यास कोणत्याहि अवस्थेत बरे वाटत नाही. शौचातून नुसते रक्त पडते; शौच गवतासारखे हिरवे होते किंवा पांढरे असते. आई भ्याल्यामुळे तान्ह्या मुलांना काविळ होते. गुदद्वारात टोचते किंवा कंड सुटते. गुदद्वारातून कढत पाणी बाहेर येत आहे असे वाटते. उन्हाळ्यात मुलांना पाण्यासारखे जुलाब होतात.

**जठर** :- *सारखी तहान लागते*. कितीही पाणी प्याल्याने समाधान होत नाही. आंबट पदार्थ खावेसे वाटतात. रक्ताच्या किंवा पित्ताच्या जोराने ओकाऱ्या होतात. तोटीतून पाणी पडल्याप्रमाणे ओकावयास होते. दूध सोसत नाही. श्वास लागला असताना पोटावर दडपण आल्यासारखे, ओकारी होताना भीति वाटते, अंग तापते खूप घाम येतो व लघवीला जास्त होते. आंबट, कडू, बीर ही पेये प्यावीशी वाटतात. जठरावर दाब पडल्यासारखे वाटून दम लागतो.

**मूत्रेंद्रिये** :- लघवी थोडी, कढत व लाल होते. लघवी होताना कळा येतात. मूत्राशयाचा शोथ-थंडीमुळे; धास्तीमुळे नुकत्याच उपजलेल्या मुलांचा मूत्राघात.

**पुरुषजननेंद्रिये** :- अंडांचा शोथ (सूज). अंड सुजून मोठे व टणक झाल्यासारखे वाटतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :- थंडीने किंवा धास्तीमुळे विटाळ एकदम बंद होतो. बाळंतपण कष्टाने व फार वेळाने झाल्यावर ज्या भयंकर वेदना होतात त्यावर अकोनाइटचा फार चांगला परिणाम होतो. दुग्धज्वर- दूध येत नाही. स्तन सुजून टणक होतात. विटाळ सुरू होताना वेड लागल्याप्रमाणे बेफामपणा. योनी कढत, कोरडी व स्पर्श सहन होत नाही.

**श्वसनेंद्रिये** :- **खोकला कोरडा, वेदनायुक्त; घसा बसतो. झोपेत श्वासोच्छ्वास** वरवर चालल्यासारखा वाटतो. खोकताना कंठ धरावासा वाटतो. धास्तीमुळे लागलेला दमा, खोकला, रात्री व पेय प्याल्याने जास्त होतो. उठून ताठ बसावे लागते. कफ रक्तमिश्रित. थुंकीतून तांबडे लाल रक्त पडते. थोड्याशा श्रमाने, गार वारे लागल्याने खोकला जास्त होतो; पाठीवर झोपल्याने बरे वाटते. छातीत टोचते, त्यामुळे श्वासोच्छ्वास करता येत नाही. न्युमोनिआ, प्ल्युरिसि, फुप्फुसात आग होते. हृदरोगात जलद चालताना किंवा जिना

चढताना छातीत कोंडल्यासारखे वाटते. खोकल्यानंतर छातीत गुदगुल्या झाल्यासारखे वाटते.

**हृदय :–** मोठे झाल्यासारखे वाटते. धडधडण्यामुळे काळजी वाटते व त्यावेळेस डाव्या हातापर्यंत वेदना होतात, बधिरता व मुंग्या येतात. नाडी जलद, जोरदार व बेफाम चालते. रक्तदाब वाढतो.

**मान–पाठ–हात–पाय :–** हात कढत, पाय गार. अंगठ्याखालील उंचवटे लाल होतात बोटांची टोके लाल होतात. सांध्यांतील बंधने सैल झाल्यासारखी वाटतात. हाता-पायातली शक्ती नाहीशी होते. मांडीवरून पाण्याचे थेंब खाली पडत आहेत असे वाटते. **तळहाताची आग होते.** डाव्या हातात व पायातील स्नायू उडतात.

**झोप :– घाबरटपणामुळे झोप येत नाही.** वृद्धपणाचा निद्रानाश. भयंकर स्वरूपाची किंवा काळजीयुक्त स्वप्ने पडतात.

**ज्वर :–** ***अतिज्वर, अंगाची कोरडी आग*** होते; ***थंडीच्या*** लाटावर लाटा येतात असे वाटते. थंडी व ताप आलटून पालटून. तापात तहान लागते, बेचैनपणा असतो व घाम येताना पांघरूण नकोसे वाटते. मानसिक लक्षणे किंवा कारण असल्याशिवाय हे औषध तापात देणे चांगले नाही. विकार झालेल्या किंवा आच्छादलेल्या भागावर घाम येतो.

**त्वचा :– कोरडी व कढत** किंवा वर बर्फ ठेवल्यासारखे वाटते. दररोज रात्री बारीक तांबडेलाल पुरळ येते, त्यामुळे बेचैनपणा येतो. उत्तेजक पेयाने कंड येते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– मनःक्षोभ;** ***भीति, धास्ती;*** संताप. घाम येत असताना **थंडगार वारे** लागले तर. **आवाज; उजेड;** दात येताना. **रात्री कुशीवर** निजल्याने, बंद खोलीत; उत्तेजक पेयाने. विटाळसेपणी. उन्हात निजल्याने. गाणे ऐकल्याने, तंबाखूच्या धुराने.

**ब वा :–** पाठीवर निजल्याने खोकला, छातीत टोचणे कमी होते. हातपाय पोटाशी घेतल्याने पोटदुखी कमी होते. मोकळ्या हवेने; आरामशीर पडल्याने.

**सहाय्यक औषधे :–** आर्नि; काफि; **फास्फ;** बेला; **ब्रायो;** मिलि; **सल्फ; स्पांजि.**

**संबंधी औषधे :–** कॅन्था; काफि; कामो; पल्स; बेला; मर्क्यु; ऱ्हस-टा; सेपि.

---

## २. अडोनिस व्हल्गॅरिस Adonis Vulgaris

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **हृदय; पाठीचा कणा**; पोटाची खळी, मूत्रपिंड, त्वचा यावर होतो. संधिवात किंवा इन्फ्लुएन्झा यामुळे उद्भवलेले हृदयाचे विकार. याने हृदयाची क्रिया सुधारते, नाडी नियमित होते, लघवीचे प्रमाण वाढते. हृद्रोगामुळे उत्पन्न झालेली जलयुक्त सूज. वेदना इकडून तिकडे फिरतात.

**डोके** :– चालताना घेरी येते व छातीत धडधडते. डोक्याची मागील बाजू दुखते. कातडे आवळल्यासारखे वाटते. उठताना, डोके एकदम वळविताना घेरी येते.

**तोंड** :– जीभ भाजल्यासारखी वाटते. तहान लागत नाही.

**उदर** :– पोटाच्या खळीत गळून गेल्याप्रमाणे वाटून घेरी येते, मोकळ्या हवेत बरे वाटते. वाकताना आंतडी तुटताहेत असे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला वारंवार लागते. लघवीतून अल्बुमीन जाते. लघवी **थोडी**, वर तेलकट तवंग.

**छाती** :– दमा हृद्रोगामुळे झालेला, पाठीला स्पर्श केल्यामुळे जास्त होतो. हृदयाच्या जागी दुखते, छातीत धडधडते व दम लागतो. घशात गुदगुल्या होऊन कोरडा खोकला येतो.

**मान–पाठ** :– ताठते, दमल्यासारखी दुखते.

**झोप** :– अनेक विचारांची गर्दी झाल्याने झोप येत नाही.

**त्वचा** :– भाजल्यासारखे फोड येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** :– **जा हो** :– थंडीमुळे, निजल्याने.

**ब वा** :– श्रम.

**संबंधी** :– बुफो. तुलना करा डिजि, क्रेटिगस, कान्व्हाले, स्ट्रोपान्थस.

**प्रमाण** :– टिंक्चरचे ५ ते १० थेंब.

---

## ३. अगारिकस Agaricus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***डोक्याचा मागील भाग*, *पाठीचा कणा***, कंबर; ***मज्जातंतू*** आंतड्यांचे चलनवलन; **रक्ताभिसरण; हृदय**, छाती व श्वासोच्छ्वास यावर होतो. विकार हळुहळू सुरू होतात. **अनेक तऱ्हेची**

लक्षणे उत्पन्न होतात. *हालचालीमध्ये अवास्तवता, अनिश्चितपणा* व *अनियमितपणा* दिसून येतो. जवळची वस्तु धरण्याकरता हात लांब करणे, चालताना अडखळणे किंवा पाय उंच करून चालणे. हातातील वस्तु पडतात. **कंप, आचके, धक्के, थरथर** निरनिराळ्या ठिकाणी दिसून येते. कापरे भरते, घाबरटपणा, व अस्वस्थता. कंपवात-झोपेत कमी होतो. गार सुया बोचल्यासारख्या वाटतात; गार पाण्याचे थेंब पडत आहेत असे वाटते. गार ओझे ठेवल्यासारखे वाटते. मेंदूच्या कमकुवतपणामुळे मुले उशिरा बोलावयास व चालावयास लागतात. विकार सुरू होण्याच्या अगोदर बहुधा जांभया येतात. विकार तिरकस रीतीने उद्‌भवतात-उजवा हात-डावा पाय. फेफरे, तोंडाला फेस येतो, पाठ मागे वाकते व चेहऱ्याचे स्नायू ओढल्यासारखे दिसतात. विवाहित घाबरट तरुणी संभोगानंतर मूर्च्छित होतात. संभोगानंतर, दूध बंद झाल्यामुळे, राग भरल्याने, शिक्षा केल्याने आचके येतात. आंचके किंवा फेफरे येत असताना शक्ती वाढते, जड ओझी सहज उचलता येतात.

**मानसिक** :- आनंदी, उल्हासी; गाणे म्हणणे, शिट्या वाजविणे, भविष्य वर्तविणे. शांत स्वभावाचे इसम, हट्टी व हेकेखोर होतात. बडबड; निर्भयपणा, वात; वेडगळाप्रमाणे वागणे. बुद्धिमांद्य; दारू पिऊन तारवटल्याप्रमाणे दिसतो. आलिंगन देऊन हाताची चुंबने घेणे. कोणाला ओळखित नाही. वस्तूची फेकाफेक करणे, कोणतीही नवीन गोष्ट आकलन होऊन करता येत नाही. नेहमीच्या गोष्टी करता येतात किंवा करावयाचे त्याच्या उलट करणे.

**डोके** :- **इकडून तिकडे फिरविणे.** डोके दुखणे, शौचास किंवा लघवीला झाल्याने कमी होते. उन्हात घेरी येते. डोके दुखत असताना नाकातून रक्त येते किंवा जाड शेंबुड येतो.

**डोळे**:- लंबकाप्रमाणे हालतात. ***पापण्या लवतात.*** कोपऱ्यात चिकट पू जमतो. डोळ्यांपुढे माशा तरंगत आहेत असे वाटते. वाचताना अक्षरे सरकत आहेत, नाचताहेत असे वाटते. वस्तू एकाच्या दोन दिसतात. तिरळेपणा. दोन्ही पापण्यामधील अंतर कमी होते.

**कान**:- पाळया थंडीने गारठल्याप्रमाणे खाजतात. आवाज होतात व पाळयाना कंप येतो.

**नाक**:- आत, बाहेर कंड सुटते. खोकल्यानंतर शिंका येतात. वृद्धपणी नाकातून रक्त येते. सर्दी नसताना वारंवार शिंका येतात, किंवा स्वच्छ पाणी गळते.

**चेहरा**:– आग होऊन खाजतो. स्नायू ताठतात, कंप येतो. गालात काटा टोचल्याप्रमाणे वेदना होतात. चेहरा वेडावाकडा करणे.

**जीभ**:– कांपते, चव गोड, जिभेला कंप.

**तोंड**:– ओठाचे कोपरे लुले पडतात. ओठावर मोत्यासारख्या पुटकुळ्या येतात. टाळयावर फोड येतात. लाळ गळते. अस्पष्ट तुटक तुटक बोलणे.

**घसा**:– खरवळल्यासारखा वाटतो, कोरड पडून गिळता येत नाही.

**जठर**:– सारखी तहान, सडक्या अंडयाप्रमाणे किंवा सफरचंदाच्या चवीच्या ढेकरा येतात. पोट बिघडल्याने यकृताच्या जागी वेदना होतात.

**उदर**:– **पोटाच्या खळीत गोळा** आहे असे वाटते. आंतडयात फदफदल्यासारखे वाटते, गुरगुरते. पांथरीच्या बाजूस टोचते. कढत वारा सरतो. हगवण, कुजट, लसणीसारखा वारा सरतो. लहान मुलाना हिरव्या किंवा पिवळया रंगाचे जुलाब होतात.

**मूत्रेंद्रियेः**– **लघवी हळूहळू किंवा थेंबथेंब होते. मूत्राशय दाबावा लागतो.** लघवी होताना गार लागते. लघवी पांढरी व त्यावर तेलकट तवंग येतो.

**पुरुषजननेंद्रिये**:– वीर्य कढत. संभोगानंतर कांपरे भरते, थकवा वाटतो, आग होऊन अंगाला कंड सुटते, खूप घाम येतो. अकाली वीर्यपात. संभोग करताना छातीत धडधडते व त्यानंतर उदासीनता येते.

**स्त्रीजननेंद्रिये**:– गर्भाशय खाली ओढल्यासारखा वाटतो, विशेषतः विटाळ थांबल्यानंतर स्तनाग्रे लाल होऊन खाजतात. धुपणी फार जाते, आसपासचा भाग करवडतो व त्यामुळे चालावयास त्रास होतो. संभोगानंतर मूर्च्छा येते. स्तनात दूध येण्याचे थांबल्यामुळे दुसरीकडे विकार उद्भवतात.

**श्वसनेंद्रियेः**– खोकला कण्यातून सुरू होतो असे वाटून मधून मधून दास लागते व नंतर शिंका येतात. क्षयाची प्रथमावस्था. कफ सहज बाहेर येतो, फेसाळ असतो. कफात गोळया पडतात.

**हृदय**:– संभोगाचे वेळी धडधडते, नंतर उदासीनता येते. एकदम झालेल्या आवाजाने ढेकरा येताना, खोकताना हृदयात धक्के बसल्यासारखे वाटतात व कित्येक वेळा ते शरीराच्या इतर भागात पसरतात. दाबल्यासारखे वाटते, आग होते हृदयापासून ते डाव्या त्रिकोणी हाडापर्यंत टोचल्यासारखे वाटते. हृद्रोग-वेदना जास्त असतात.

**पाठ**:– **कण्याला स्पर्श किंवा दाब सहन** होत नाही. कण्यात तीव्र कळा येतात, कण्यात मुंग्या येतात. आग होते, लहान झाल्यासारखा वाटतो. कंबरेला शेक सहन होत नाही. पाठ ताठल्यासारखी वाटते. वाकल्याने मोडेल असे वाटते. कुल्ले गार असतात. कमरेत उसण मोकळया हवेत जास्त. फेफरे येण्यापूर्वी पाठीत गार हवा पसरत आहे असे वाटते.

**हात पाय** :– हात अस्वस्थ, कंपयुक्त. पाय कापतात. पाय अशक्त व जड वाटतात. उजवा हात अस्थिर, लिहिताना. पुष्कळ लिहिल्यानंतर हात लुळे पडल्याप्रमाणे वाटते. एखादी वस्तु धरताना बोटाना पेटके येऊन ती उडतात. मांड्या अढी घातल्याने दुखतात. पायांची अढी घातल्याने पाय बधिर होतात. पंगुवातांत हाताना सौम्य आचके येतात. कमरेच्या सांध्याच्या भागांत निजल्याने वेदना होतात.

**झोप** :– **जांभया** येतात. वेदना–आचके सुरू होण्याच्या अगोदर जांभया सुरू होतात. जांभयानंतर आपोआप हंसू लोटते. झोप लागताना धक्के बसतात, कंप येतात त्यामुळे वारंवार जाग येते.

**ज्वर–घाम** :– थंडीने लवकर गारठणे व घाम पण लवकर येणे. रात्री घाम येतो. शरिराच्या एका बाजूस आलटुन पालटुन घाम येतो.

**त्वचा** :– *आग होते; कंड सुटते; बर्फाने गारठल्यासारखी वाटते.*

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा हो :– हवा *थंडगार–मोकळी*; *बर्फ पडताना.* मानसिक श्रम; संभोगाने; संभोगातिरेकाने. दारूने. दाबल्याने; स्पर्शाने; सकाळी, विटाळसेपणी. उन्ह. भीति, धास्ती. वीज-वादळ होण्याचे अगोदर.

**ब वा** :– हळुहळू चालणे–हालचाल.

**सहाय्यक औषधे** :– **कॅल्क–का.**

**संबंधी औषधे** :– ओपि; कुप्रम; ट्यूब; पल्स; मर्क्यु; ऱ्हस-टा; सिलि.

---

## ४. अनाकार्डिअम ( बिब्बा ) Anacardium.

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मन*; मज्जातंतू ; जठर; **त्वचा**; तळहात; स्नायू व सांधे यावर होतो. बाह्योपचाराने त्वचेचे रोग बरे केल्यानंतर, देवी येऊन गेल्यानंतर, अति अभ्यास, संभोगातिरेक, परीक्षा, थकवा या कारणांनी विकार उत्पन्न होतात. शारीरिक व मानसिक ***शक्तीचा अभाव.***

बसावेसे किंवा लोळावेसे वाटते. उत्साह वाटत नाही. थोड्या श्रमाने अंग **थरथर कापते.** विशेषतः गुडघे व हात. विकार पुनः पुनः किंवा नियमित वेळी उद्भवतात. ***दाबल्यासारखे***, **पट्टयाने आवळल्यासारखे, गुडघी, पाचर बसली आहे** असे वाटते. ज्ञानेंद्रिये **बधिर होतात**; स्पर्श कळत नाही, चांगले ऐकू येत नाही, दिसत नाही. विद्यार्थ्यांना परीक्षेची भीति वाटत असल्यास त्यांना या औषधानी आत्मविश्वास उत्पन्न होतो. मनावर चमत्कारिक कल्पना व समजुती यांचा पगडा बसतो. सर्व विकार खाण्यानंतर कमी होतात. स्नायुरज्जूच्या जखमा. सांधे आखडतात. वृद्ध इसमाचे विकार.

**मानसिक –** ***विसरभोळेपणा***, **एकदम स्मृती नाहीशी होते.** नावे आठवत नाहीत. मेंदूची क्षीणता, स्वप्नात असल्यासारखे वाटते. **भ्रामक कल्पना. काही कल्पनांचा मनावर कायमचा पगडा बसतो. स्वतः दोन आहोत.** दोन मने असून ती **एकमेकाविरुद्ध** गोष्टी करण्यास सांगत आहेत असे वाटते. कोणी तरी जवळ, किंवा **पाठीमागे** आहे असे वाटते. पाठलाग होत आहे असे वाटते. मूल किंवा नवरा स्वतःचा नसून दुसऱ्याचा आहे असे स्त्रियांना वाटते, विशेषतः बाळंतपणानंतर. गंभीर गोष्टींना हसणे, हास्यकारक गोष्टीच्या वेळी गंभीर होणे. चंचल, काय करावे याचा निश्चय होत नाही व बहुधा काहीच करू नये असे वाटते. दुष्टपणा; अधार्मिक– **देव धर्मांची निंदा करणे,** शिव्या–शाप देणे. वाटेल तसल्या शपथा घेणे. **घातकीपणा–** क्रूरपणा; संशयी, नैतिक बंधनाचा अभाव. लांबचे आवाज ऐकू येतात. मेलेल्या माणसाचे बोलणे ऐकू येते. वस्तु खऱ्या नाहीत किंवा काहीच खरे नाही, सर्व स्वप्नमय आहे असे वाटते. पिस्तुलाने आत्महत्या करण्याची प्रवृत्ति, संशयी, असंबद्ध बडबड, कोणालातरी हाका मारल्याप्रमाणे मोठ्याने ओरडणे. धार्मिक वेड. स्वतःशिवाय इतरांचे चेहेरे आरशात दिसतात.

**डोके:–** पट्टयाने आवळल्यासारखे वाटते. कानशिले दाबल्यासारखी वाटतात. चालताना घेरी येते व वस्तू फार लांब अंतरावर आहेत असे वाटते. कातड्यावर लहान गळवे येऊन खाज येते.

**डोळे :–** दृष्टिमांद्य दृष्टिभ्रम, धागे-दोरे-ठिपके दिसतात, वस्तु विचित्र भासतात, वस्तु लांब आहेत असे वाटते.

**कान:–** दट्टया बसल्यासारखे वाटते. चांगले ऐकू येत नाही. कानात कोणी पुट-पुटते आहे असे वाटेत.

**नाक**:– निरनिराळे वास येत आहेत असा भ्रम जुनाट सर्दी पण नाक कोरडे. एकसारख्या शिंका येऊन नाक गळावयास लागते व डोळयातून पाणी येते. खूप सर्दी झाल्याने छातीत धडधडते, विशेषतः वृद्धपणी

**चेहरा**:– फिकट, डोळयाभोवती काळी वर्तुळे. चेहऱ्याचा व मानेचा इसब; चेहरा भावनारहित, धुंद किंवा खुळ्या पोरासारखा.

**तोंड**:- तोंडाला घाण येते, हिरड्यातून रक्त येते. जीभ सुजल्याप्रमाणे किंवा ताठल्यासारखी वाटते, त्यामुळे बोलताना किंवा जिभेची हालचाल करताना त्रास होतो, व लाळ गळते. चव वाईट, नष्ट.

**उदर**:– बेंबीभोवती दट्टया– पाचर मारल्याप्रमाणे दुखते. वारंवार शौचास लागते पण गेले म्हणजे होत नाही. मलावरोध. शौच मऊ असूनसुद्धा होत नाही. गुदात दट्टया बसल्यासारखे वाटते. मूळव्याध, गुदद्वाराला कंड सुटते, भेगा पडतात–पाणी येते. वात धरून गुडगुड आवाज होतो, मुरडा व चिमटे घेतल्यासारखे वाटते.

**जठर** :– अग्निमांद्य. पोकळ किंवा गळून गेल्याप्रमाणे वाटते. सारखी भूक, खाल्ले म्हणजे बरे वाटते. भराभर खाणे किंवा गिळणे. वेदना खाण्याने थांबतात पण ३ तासाने सुरू होतात जठराचा व्रण, ओकाऱ्या खाण्याने थांबतात. खाताना किंवा पिताना श्वास घेता येत नाही.

**मूत्रेंद्रिये** :– वारंवार लघवीला जावे लागते, लघवी स्वच्छ पाण्यासारखी पण गढूळ पांढरा गाळ साठतो.

**पुरुषजननेंद्रिये** :– संभोगसुखाचा अभाव–विशेषतः पुरुषात. अंडकोषाला कंड सुटून इच्छा उत्तेजित होते. स्वप्न न पडता वीर्यपात होतो. शौचास होताना धातु जाते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– धुपणीने कंड सुटून भाग करवडतो. गरोदरपणची मळमळ खाण्याने थांबते. विटाळ थोडा थोडा वारवार जातो व त्या वेळेस वेदना होतात.

**श्वासोच्छ्वास** :– गिळताना किंवा खोकताना थांबतो असे वाटते. खोकताना डोक्याच्या मागील भागात दुखते नंतर जांभया येऊन झोप येते. खोकला बोलताना किंवा खाण्यानंतर येतो व ओकारी होते. दमा वात धरून (उदरात) होतो, नंतर डोळ्याना पाण्याची धार लागून थांबतो.

**हृदय** :– एकामागून एक अशा दोन कळा येतात; काहींवेळ थांबून पुन्हा येतात. धडधड वृद्धपणी. हृदयातील कळा कमरेपर्यंत जातात.

**पाठ** :– कण्यात दट्टया मारल्यासारखे वाटते, हालचालीने तो आत शिरत आहे असे वाटते. पाठ पट्टयाने आवळल्यासारखी वाटते.

**हात पाय** :– खांद्यावर ओझे ठेवल्यासारखे वाटते. गुडघे निःशक्त व आवळल्यासारखे वाटल्यामुळे चालवत नाही. हात ( पंजा ) कोरडे, तळहातावर मांसांकुर येतात. पोटऱ्यात चालताना पेटके येतात, किंवा उठताना येतात. वरच्या हाताला बुक्या मारल्याप्रमाणे वेदना होतात. पायाच्या बोटाना पेटके येतात. टाचेपासून पोटऱ्यापर्यंत पेटके येतात.

**झोप** :– कित्येक रात्रीच्या रात्री येत नाही. खोकताना किंवा दीर्घ श्वास घेताना झोप येते.

**ज्वर** :– संध्याकाळी ४ वाजता चेहरा तापतो–मळमळते, तळहाताला चिकट घाम येतो. थंडी वाजते. उन्हात बरे वाटते.

**त्वचा** :– बधिर. कंड खाजविण्याने जास्त होते. देवीच्या फोडासारखे फोड येतात. इसब, पित्ताच्या गांधी. पिवळे भाजल्यासारखे फोड.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा. हो** :– ***मानसिक श्रम***; भावना- **राग**; धास्ती; भीति काळजी; चिंता; **पाय आपटीत चालण्याने**. हालचाल. वारे लागल्याने, मोकळया हवेत. सकाळी. संध्याकाळपासून मध्यरात्रीपर्यंत ( संध्याकाळी ४ वाजता. **अंग गरम होते.**) चोळण्याने; खाजविल्याने; बोलण्याने. **ब. वा. खाण्याने.** कढत पाण्याची आंघोळ, शेकाने; चोळण्याने; उन्हात. कुशीवर निजल्याने.

**संबंधी औषधे** :– इग्ने, पल्स, प्लॅटि, लायको.

---

## ५. अनाकार्डिअम आक्सिडंटल ( काजू ) Anac oxidental

महारोग– स्पर्शज्ञान नष्ट. त्वचेवर मांसांकुर चामखीळ. विशेषतः तळहात व तळपाय.

---

## ६. अपोसायानम Apocyanum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मूत्रेंद्रिये, हृदय*; आतडी व गर्भाशय यावर होतो. शरीरातील स्राव कमी प्रमाणात जातात त्यामुळे ठिकाठिकाणी पाणी साचते. जलोदर, नाळगूद. घाम आला तर बरे, असे वाटते पण घाम येत नाही. अशक्तपणा, पाणी पिण्याच्या मानाने स्राव कमी जातात. कोयनेलमुळे उद्भवलेली जलयुक्त सूज. जलयुक्त सुजेत जठराचे विकार होतात.

**मानसिक :–** विचार करवत नाही. मूर्च्छा येते. निरुत्साही, घाबरट, गोंधळलेला.

**डोके :–** मेंदूत जलसंचय झाल्यामुळे, मुले बेशुद्ध होतात, एकच हात किंवा पाय आपोआप हलतो; एक बाजू लुळी पडते. एक डोळा स्तब्ध व दुसरा हलतो; कुशीवरून डोके वर उचलले तर मूर्च्छा येते.

**डोळे :–** कढत व लाल. आंत वाळूचे कण आहेत असे वाटते. एक डोळा स्तब्ध व दुसरा हलतो.

**नाक :–** जाड पिवळया शेंबडाने भरलेले. तान्ह्या मुलांना श्वास घेववत नाही. सहज सर्दी होते.

**चेहरा :–** निजल्यावर सूज येते, उठून बसले की जाते. फिकट व वर गार घाम येतो (हगवणात)

**जठर :–** तहान फार लागते. पातळ पदार्थ व अन्न पोटात टिकत नाहीत लगेच ओकून पडतात. लघवी बंद झाल्यामुळे होणाऱ्या ओकाऱ्या. मळमळताना गुंगी येते.

**उदर :–** **पोटाच्या खळीत गळून गेल्याप्रमाणे वाटते,** विशेषतः भरपूर लघवी झाल्यानंतर. वेदनारहित पिंवळे भडभडून जुलाब होतात व त्यावेळेस आवाज होतो. जलोदरात किंवा नाळगुद झाले असताना हगवण लागते.

**मूत्रेंद्रिये :–** लघवी कमी होते. मूत्रग्रंथी ( प्रास्टेट ) मोठी होते. लघवी बंद होते. वृद्धपणी अंथरुणात नकळत लघवी होते. पंगुवातात लघवी मूत्राशयात तुंबते.

**पुरुषजननेंद्रिये :-** शिश्न व अंडकोषाभोवती जलयुक्त सूज येते

**छाती:–** छाती भरल्यासारखी वाटते. श्वासोच्छ्वास वर वर होतो किंवा समाधानकारक होत नाही. फुप्फुसाभोवती पाणी साचते. कोरडा ठसका.

**स्त्रीजननेंद्रिये :–** रक्तप्रदर, त्यानंतर होणारा जलोदर किंवा नाळगूद (सिंको). तरुण मुलींचे विटाळ सुरू न झाल्यामुळे उदर मोठे होते. व पायाला सूज येते. रक्तप्रदरात काही वेळेस मोठाल्या गाठी पडतात किंवा नुसतेच पातळ रक्त जाते.

**नाडी :–** मंद, मधून मधून थांबते, फडफडल्यासारखी-अनियमित चालते.

**झोप :–** गुंगी येते. अस्वस्थ झोप

**त्वचा :–** खरखरीत, कोरडी, घाम येत नाही.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– थंड हवा किंवा पेये. उघडे राहिल्याने, निजण्याने झोपेनंतर.

**ब वा** :– उष्णता.

**संबंधी औषधे** :– किनि–आर्से; नक्स-व्हा.

**मात्रा** :– टिंक्चर १० थेंब दिवसातून ३।४ वेळा किंवा, ३×, किंवा ६×.

---

## ७. अब्रोटेनम Abrotanum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम मज्जातंतू; पोषण; व शिरा यावर होतो. **शरीर वाळते**, खालून वर–पाय जास्त. अंग लुळे पडल्यासारखा अशक्तपणा वाटतो. बधिरता; कंप. **एका रोगाचे दुसऱ्या रोगात रूपांतर** होते. **विकार आलटून पालटून** होतात. मळव्याध नंतर संधिवात, संधिवात नंतर हगवण. **पाणी साखळण्याची प्रवृत्ति**– प्लुरिसीनंतर फुप्फुसां-भोवती; सांध्यात, उदरात. छातीवर शस्त्रक्रिया केल्यानंतर त्याठिकाणी दाबल्यासारखे वाटते. मुलांची वृषणवृद्धि. इन्फ्लुएन्झा नंतर अतिशय अशक्तपणा येतो. सुडदुस.

**मानसिक** :– चिडखोर, संतापी मुले. अतिशय काळजी वाटून **निरुत्साहीपणा**, विचार करणे कठीण. उमज पडत नाही. अमानुष; **दुष्टपणा करावासा वाटतो**.

**डोके** :– **मानेच्या स्नायूंच्या अशक्तपणामुळे डोके सावरत नाही**. संभाषणानंतर किंवा मानसिक श्रमानंतर मेंदू थकतो. कपाळावरच्या शिरा फुगतात.

**चेहरा** :– **डोळे खोल फिकट**. चेहरा म्हाताऱ्यासारखा **सुरकुतलेला**. कपाळावरील शिरा फुगतात. डोळ्याभोवती काळी वर्तुळे.

**नाक** :– नाकातून रक्त येते-तरुणपणी.

**जठर** :– दुर्गंधी पातळ ओकारी होते. पाण्यात तरंगत आहे असे वाटते. व्रण. भूक चांगली असूनही कृशपणा. अन्न न पचता बाहेर पडते. दुधात शिजवलेला ब्रेड आवडतो. जठरात कापल्याप्रमाणे कुरतडल्याप्रमाणे वेदना.

**उदर** :– **फुगलेले**. बेंबीतून लस येते मूळव्याध बाहेर येतं. उदरात ठिकठिकाणी कठीण गोळ. आतड्यात गळून गेल्याप्रमाणे अशक्तपणा वाटतो. शौचास वारंवार जावेसे वाटत परंतु थोडेसे रक्त मात्र पडते.

**पुरुषजननेंद्रिये** :– लहान मुलांचा (हायड्रोसील) वृषणवृद्धि

**श्वसनेंद्रिये** :– हगवणीनंतर कोरडा खोकला येतो. प्लुरिसी झाल्यानंतर त्याजा दाबल्यासारखे वाटते, त्यामुळे श्वासोच्छ्वास नीट करता येत नाही.

**स्त्रीजननेंद्रिये** :– डाव्या रजःपिंडात वेदना. विटाळ बंद होतो.

**मान-पाठ** :– मान अशक्त, त्यामुळे डोकं सावरत नाही. पाठ रात्री दुखते, हालचालीने बरे वाटते. माकडहाडात मूळव्याधीमुळे दुखते.

**हातपाय** :– बोटे बधिर, गार, झिणझिणल्यासारखी वाटतात, खांदे, हात, मनगट व बोटे दुखतात. पाय अतिशय वळतात. संधिवातामुळे हालचाल करता येत नाही. उदरातील वेदनानंतर हात, पाय आखडतात किंवा पेटक्यानंतर आखडतात.

**त्वचा** :– विसविशित. त्वग्रोग बाह्योपचाराने नाहीसे केल्यानंतर त्वचा निळी होते. अतिशय थंडीमुळे कंड सुटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **गार हवा.** भिजल्याने, स्राव बंद झाल्याने किंवा केल्याने. रात्री. **धुके.**

**ब वा** :– हालचालीने. जुलाब झाल्याने. (नॅट्र-स; झिंक).

**सहाय्यक औषधे** :– कलि-बा; ब्रायो, लायको.

**संबंधी औषधे** :– अगारिकस, नक्स व्हॉ, लेडम, सिंको.

---

## ८. अमिल नायट्रोसम Amyl Nitrosum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **रुधिराभिसरण; डोके, हृदय** व श्वासोच्छ्वास यावर होतो. अंगात **उष्ण लाटा** आल्यासारख्या वाटून **त्यानंतर एकाच बाजूला घाम येतो.** मेंदूतील रक्तवाहिन्या रुंदावतात. **ठुसठुसते.** बेशुद्धीत गिळता येत नाही.

**मानसिक** :– काहीतरी होईल अशी चिंता. मोकळ्या हवेत जावेसे वाटते.

**डोके** :– **रक्त डोक्यात** जाते व तेथे ठुसठुसते. चेहरा लालबुंद होतो. अर्धशिशी, चेहरा फिकट.

**चेहरा** :– सहजासहजी लाल होतो (लाजल्याप्रमाणे). चावीत असल्याप्रमाणे खालचा जबडा हलतो. चव घेत असल्याप्रमाणे मिटक्या मारणे.

**घसा** :– आवळल्यासारखा वाटतो, त्यामुळे कालर घट्ट झाली आहे असे वाटते.

**जठर** :– उचकी येताना जांभया येतात व आळोखे पिळोखे घ्यावेसे वाटतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– रक्तस्राव होत असताना चेहरा लाल होतो. विटाळ थांबण्याच्या वयात, उष्ण लहरी येतात व डोके दुखते. बाळंतपणानंतर ल्गोल्ग आंचके येतात.

**छाती** :– उजव्या बाजूच्या शेवटच्या बरगड्यातून पुढून मागे वेदना येतात. हृदया-भोवती आवळल्यासारखे वाटून वेदना होतात. थोड्याही प्रक्षोभामुळे हृदयात फडफडते. भयंकर धडधड.

**झोप** :– बेशुद्धीप्रमाणे गाढ झोपेत एकसारख्या जांभया येतात व ओळोखे पिळोखे घ्यावेसे वाटतात.

**ताप** :– इन्फ्लुएन्झानंतर एकसारखा घाम येत राहतो.

**हृदय** :– आवळल्यासारखे वाटते हृदयाची क्रिया बेफाटपणे चालते. धडधड.

**हातपाय** :– जांभया येऊन हात पाय ताणावेसे वाटतात व उचकी लागते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***विटाळ थांबण्याच्या वयात***; **क्षुल्लक** ***कारणाने***; भावना; उष्णता; बंद खोलीत.

**ब. वा** :– मोकळ्या हवेत, विशेषत श्रम केल्याने.

**संबंधी औषधे** :– ग्लोनो; लॅके.

---

## ९. अमोनिअम कार्बोनिकम Ammonium Carbonicum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *हृदय*; **रुधिराभिसरण; रक्त;** *श्वासोच्छ्वास*; फुप्फुसे; उजवी बाजू यावर होतो. जीवनशक्ति क्षीण ***अशक्तपणा.*** थोडेहि श्रम करवत नाहीत; त्यामुळे दम लागतो, छातीत धडधडते. *फिकटपणा. गुंगी*. पडून रहावेसे वाटते. अवयव जड झाल्या-सारखे वाटतात. एकदम शक्तिपात होतो. **कढत–चिकट–करवडणारे स्राव. रक्तस्राव काळा पातळ.** रक्त गोठत नाही. लठ्ठ, *थकलेल्या*, कंटाळलेल्या स्त्रिया. म्हातारपण. **थंडी सोसत नाही**. मार लागल्याप्रमाणे वेदना. अंतर्गत तिखट आग. विकारांचा दुष्टपणा. हवेत फरक झाल्याने हाड दुखतात. कोळशाच्या वायूचे दुष्परिणाम. पाण्याचा अत्यंत तिटकारा; पाण्याला स्पर्श सुद्धा करावासा वाटत नाही. घाणेरडी वागणूक अस्वच्छपणा.

**मानसिक** :- उदास. काहीतरी करावेसे वाटते पण लवकरच थकवा वाटतो. चित्त जागेवर नसते. आठवण नाहीशी होते–त्रास–संतापाने. अस्वच्छ. स्वतः बोलणे किंवा दुसऱ्याचे बोलणे, ऐकणे नकोसे वाटते. आपण काही तरी अपराध केला असल्याप्रमाणे चिंता वाटते. रडण्याची प्रवृत्ति.

**डोके** :- मेंदू सैल झाल्यासारखा वाटतो. डोक्यात धक्के बसतात–चावताना. तीव्र डोकेदुखी, कपाळ भरल्यासारखे-फुटल्यासारखे वाटते.

**डोळ** :- पाण्याच्या धारा लागतात. कोरडे पडून आग होते. फार वेळ डोळ्यांच्या श्रमाने पांढऱ्या वस्तु पाहिल्याने त्यावर पिवळे ठिपके दिसतात.

**कान** :- नीट ऐकू येत नाही. कानाच्यावर कंड सुटून सर्वांगांत पसरते.

**नाक** :- रात्री चोंदते. सकाळी जागे झाल्यावर खाण्यानंतर किंवा हात, चेहरा धुतल्याने नाकातून रक्त येते. सारख्या शिंका येतील असे वाटते. सर्दी, नाकातून खूप पाणी वाहते.

**चेहरा** :- लहान गळवे किंवा पुवळलेले फोड येतात– विटाळशेपणी. गालात टणक सूज येते.

**तोंड** :- हिरड्या हुळहुळ्या–त्यातून रक्त येते. दांत सैल किंवा बधिर झाल्यासारखे वाटतात. ओठांना भेगा पडतात व आग होते. कोपरे हुळहुळे होऊन भेगा पडतात व आग होते. दांतावर दांत आवळल्याने, डोक्यात, कानात, डोळ्यांत व नाकात धक्के बसतात. जिभेवर फोड येतात, आग होते त्यामुळे खाताना बोलताना अडथळा येतो. दांत विटाळशेपणी दुखतात.

**घसा** :- टॉन्सिल मोठया होतात, मानेतील गाठी मोठया होतात. टान्सिल वर व्रण पडून ते कुजतात. घटसर्प–नाक बंद होते.

**जठर** :- छातीत जळजळ होऊन पोटाच्या खळीत दुखते, मळमळते, तोंडाला पाणी सुटते व अंगाला शहारे येतात. अजीर्ण खाण्यानंतर पोटात वात धरतो. भूक लागते पण लवकर समाधान होते.

**उदर** :- काळे करवडणारे जुलाब. रक्ती मूळव्याध, विटाळसेपणी जास्त होते. शौचास होण्याच्या अगोदर व नतर रक्त पडते. शौचानंतर मुळव्याध बाहेर येते. चालता येत नाही, निजल्याने बरे वाटते. मुरडा होत असताना पाठीत तिकोनी हाडामध्ये दुखते.

**मूत्रेंद्रिये** :- लघवीला वारंवार जाव लागते लघवी भरपूर होते, ती पांढरी, गढूळ रक्तमिश्रित किंवा दुर्गंधी असते. सकाळी नकळत लघवी होते.

**पुरुषजननेंद्रिये :–** वारंवार शिश्नाचे उत्थापन, पण संभोगाची इच्छा नसते, किंवा वैषयिक इच्छा तीव्र असूनसुद्धा शिश्नाचे उत्थापन होत नाही.

**स्त्रीजननेंद्रिये :–** विटाळ काळा गांठ्याळ–रात्री जास्त जातो त्यानंतर दम लागतो किंवा थकवा येतो. धुपणी खूप जाते. विटाळसेपणी कॉलऱ्यासारखे जुलाब होतात.

**श्वासोच्छ्वास :–** हळुहळू कष्टदायक होत जातो त्यामुळे जाग येते. मोकळ्या हवेत बरे वाटते.

**छाती :–** घुरघुरते पण कफ फारसा पडत नाही. घसा बसतो. बोलणे उमटत नाही खोकला पहाटे ३ वाजता सुरू होतो त्यावेळेस दम लागतो, धडधडते, आग होते, दमा श्रमाने चढण्याने, बंद खोलीत जास्त होतो

**हृदय :–** *अशक्त* होने त्यामुळे रक्त साबळते दम लागतो. धडधड होताना गार घाम येतो व डोळ्यातून पाणी येते. धडधड ऐकू यते त्यामुळे भीती वाटते, बोलवत नाही, हात कापतात.

**हातपाय :–** लोंबकळलेल्या स्थितीत हाताची बोटे सुजतात. नखुरडे. उजवे पाऊल बधिर. सांध्याजवळ पोकळ गुल्मे उद्भवतात. सांध्यांचा लचक. पोटऱ्यांत व तळपायात पेटके येतात. हवेत बदल झाला की हाडे दुखतात. उजवा हात जड व अशक्त होता.

**ज्वर :–** आग होते व तहान लागते.

**त्वचा :–** लाल किंवा चट्ट पडलेली. वृद्धपणीचे धावरे

**झोप :–** दिवसा झोप येते. रात्री लवकर झोपी जाण्याचा प्रयत्न केला तर झोप बरी लागते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** ***थंड–आभाळ असलेले दिवस; दमट हवा;*** **मोकळी झोंबणारी हवा.** झोप लागताना. पहाटे ३–४ वाजता. ***विटाळ-सेपणी.*** हालचालीने. चघळताना. दातावर दात आवळल्याने.

**ब वा :–** ***दाबल्याने.*** पोटावर निजल्याने. खाण्याने.

**संबंधी औषधे :–** ॲन्टि–टा; कार्बो–व्हेजि; ग्लोनो; म्युरि–ॲसि; लॅक.

---

## १०. अमोनिअम ब्रोमेटन Ammonium Bromatum

**घसा :–** आग किंवा गुदगुल्या होऊन खोकला येतो, विशेषतः रात्री. नखाखाली चमत्कारिक त्रासदायक भावना, नखं खाण्याने बरं वाटत. फेफरं येण्याचे अगोदर गुदमरल्यासारखे वाटते.

## ११. अमोनियम मूरिआटिकम ( नवसागर )

Ammonium Muriaticum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *छाती*– **पित्तवाहिनी नलिका;** *श्लेष्मल त्वचा*, **यकृत, रक्त,** स्त्रीजननेंद्रिये, बोटांची टोके यावर होतो. श्लेष्मल स्राव वाढतात पण ते आतच राहतात. **लठ्ठ**– फुगीर पण हातपाय बारीक असलेले इसम. **रुधिराभिसरण अनियमित;** त्यामुळे **ठिकठिकाणी ठुसठुसते व आग होते.** कोणत्याही विकारात खोकला येतो; किंवा **भरपूर शेंबडाप्रमाणे बुळबुळीत स्राव** असतो. **ताणल्यासारखे** वाटते. स्नायुबंध लहान झाल्यासारखे वाटतात. थकवा; हुळहुळेपणा. उकरल्यासारख्या वेदना. उकळते आहे असे वाटते.

**मानसिक** :– रडावेसे वाटते पण रडवत नाही. दुःख-शोकाचे परिणाम. एखाद्या विवक्षित इसमाचा कारण नसताना तिटकारा वाटतो. कांहीतरी आत दुःख असल्यामुळे उदासीन व भीतिग्रस्त.

**डोके** :– मेंदू लटका पडल्यासारखा वाटतो. कपाळ जड वाटते व नाकाच्या बुंध्या-पर्यंत दाबल्यासारखे वाटते. व त्यावेळेस आत मेंदू तुटत आहे असे वाटते. केस गळतात, कोंडा होऊन कंड सुटते.

**डोळे** :– प्रखर उजेडात धुरकट दिसते. ठिपके–पिवळे तरंगतात. मोर्त बिंदु.

**नाक** :– सर्दी–करवडणारे, कढत पाणी वाहते. नाकाच्या वरच्या भागात आत काहीतरी खरखरीत पदार्थ अडकला आहे असे वाटते. एक नाकपुडी चोंदते. वास कळत नाही. नाक चोंदल्यासारखे वाटून, सारखे शिंकरावेसे वाटते. नाकाला स्पर्श सहन होत नाही. शिंक आली तर मानेच्या खळीपासून खांद्यापर्यंत दुखते.

**चेहरा** :– फिकट. ओठाची भाजल्या प्रमाणे आग होते. ओठ कोरडे, सुरकुतलेले, भेगा पडतात व त्याना जिभेने ओले करावेसे वाटते.

**तोंड, घसा** :– **चिकट बुळबुळीत.** टॉन्सिल गाठीत ठुसठुसते. अन्ननलिका बारीक होते.

**उदर** :– शौचास टणक खडा होतो. त्याचा भुगा होतो. शौच्याचा रंग बदलत जातो. पांथरीच्या जागेत खाताना टोचते. त्यामुळे श्वासोच्छ्वास अडथळा येतो. यकृताच्या विकारात खोकला येतो. विटाळसेपणी गुदद्वारांतून रक्त येते किंवा जुलाब होतात. धुरणी बंद झाल्यामुळे मूळव्याध होते. शौचास होताना गुदात आग होऊन ती बराच काळ होत राहते.

**जठर** :– तहान लागते. लेमोनेड प्यावेसे वाटते. तोंडाला कडू पाणी सुटते. कॅन्सर. कुरतडल्याप्रमाणे आग होते किंवा टोचते, व त्या वेदना उजव्या खाकेत व वरच्या हातापर्यंत जातात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला भरपूर व वारंवार होते. लघवीला लागते पण थोडे थेंब पडतात व त्यानंतर शौचास झाल्यानंतर लघवी चांगली होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ रात्री जास्त जातो. धुपणी बुळबुळीत अंड्याच्या बल्का-प्रमाणे. विटाळसेपणी हगवण लागते किंवा गुदद्वारातून रक्त येते. धुपणी जाताना बेंबीजवळ दुखते. धुपणी लघवी केल्यानंतर जास्त जाते. गर्भाशय खाली उतरतो.

**श्वसनेंद्रिये** :– खोकताना लाळ गळते. घसा बसतो. श्वासनलिकेत आग होते. खोकताना श्वासोच्छ्वास करवत नाही. **छातीत चिकट कफ झाल्यामुळे मोठ्याने घुरघुर आवाज होतो.** छातीत लहानशा जागी ठुसठुसते व आग होते.

**मान, पाठ** :– मानेतील गाठी मोठ्या होतात. पाठीत **तिकोनी हाडांच्या मध्ये बर्फासारखा गारपणा किंवा हुळहुळेपणा वाटतो.** बसलेले असताना गुदास्थीत हुळहुळल्याप्रमाणे दुखते. मानेवर आरपार मेद गुल्म.

**हात, पाय** :– जांघात ताणल्या–लचकल्या सारखे वाटल्यामुळे वाकून चालावे लागते. **गृध्रसीवात** – मांडी आखडल्यासारखी वाटते– बसल्याने जास्त होते, निजल्याने बरे वाटते. टांचा दुखतात किंवा टाचांना व्रण पडतात. हातपाय कापल्यानंतर राहिलेल्या बुंध्यात वेदना होतात. विटाळसेपणी पावले दुखतात. बोटांच्या बेचकातून पापुद्रे जातात. बोटांची टोंके व्रण पडल्याप्रमाणे दुखतात.

**ज्वर** :– ज्या ज्या वेळेस जाग येते त्या त्या वेळेस थंडी वाजते. सध्याकाळी निजल्याने थंडी वाजते. अंग तापल्यासारखे वाटते. मोकळ्या हवेत बरे वाटते.

**त्वचा** :– फोड येऊन त्यातून रक्त येते. निरनिराळ्या ठिकाणी **कंड सुटते** संध्याकाळी.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **सकाळी– छातीचे व डोक्याचे विकार.** दुपारनंतर– उदरातील विकार संध्याकाळी. त्वचा– ज्वर व हातापायांचे विकार नियमित वेळी. दीर्घकाळ राहिलेला लचक. **ताठ चालण्याने.**

**ब था** :– **मोकळी हवा, जलद हालचाल. वेडेवाकडे चालल्याने.**

**संबंधी औषधे** :– **कास्टि. कॅल्क-का; सेनेगा.**

---

एन ४२४८–३

## १२. अरानिआ डायाडिमा कोळी Aranea Diadema

**सर्वसाधारण** :- या कोवळ्याच्या विषाचा परिणाम-मज्जातंतू: रक्त; हाडे व उजवी बाजू यावर होतो. शरीरातील भाग *खूप मोठे*; बधिर किंवा जड झाले आहेत असे वाटते; विशेषतः जागे झाल्यानंतर, किंवा त्यामुळे जाग येते. नदी, तलाव यांच्याजवळ राहणे किंवा थंड दमट जागेत सोसत नाही. शरीर नसानसातून गार झाल्यासारखे वाटते. कशानेही अंगात उष्णता येत नाही. रक्तस्राव. हाडावरील आवरणाची सूज. वेदना तीव्रस्वरूपाच्या असून त्या नियमितवेळी, एखाद्या ठराविक तासाला, दररोज, एकदिवसा आड, आठवड्याने किंवा दरमहिन्याला सुरू होतात. वेदना विजेचे धक्के प्रमाणे जाणवतात. भोसकून झालेल्या जखमा. सारखे लोळावेसे वाटते.

**मानसिक** :- उदास, घाबरट. मरणाची इच्छा.

**डोके** :- उजव्या बाजूस वेदना होतात. मोकळ्या हवेत; बिडी, सिगारेट ओढल्याने बरे वाटते. घरी यताना डोळ्यापुढे काजवे चमकतात.

**दात** :- वरच्या कवळीतून भयंकर कळा येतात-विशेषतः रात्री निजण्याचे वेळेस.

**उदर** :- पांथरी मोठी होते, विशेषतः कोयनेलने ताप थांबल्यानंतर.

**स्त्रीजननेंद्रिये** :- कंबरेपासून उदराभोवती वेदना होऊन, ओकाऱ्या व जांभया येतात. विटाळाची पाळी लवकर येते व विटाळ भरपूर जातो.

**श्वसनेंद्रिये** :- थुकीतून लालभडक रक्त जाते. बरगड्यामधून वेदना कण्यापर्यंत जातात.

**हातपायः**- हाडे दुखतात. टाचेचे हाड दुखते. हाडे बर्फासारखी गार झाली आहेत असे वाटते. हातपाय बधिर, बोटाच्या आंगठ्यापासून वरपर्यंत बधिरपणा.

**ज्वरः**- मलेरआ. थंडी वाजताना हाडे गार वाटतात, व पोटात दगड आहे असे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :- *ठराविक तासाला;* **थंड दमट हवा.** **आंघोळीने. पाऊस पडत असताना.**

**ब वा**:- तंबाखू ओढल्याने; मोकळ्या हवेत. दाबल्याने. उन्हाळ्यात.

**सहाय्यक औषधेः**- सडू.

---

## १३. अरेलिया रेसिमोसा Aralea Recemosa

**सर्वसाधारण:–** या औषधाचा परिणाम श्वासोच्छ्वास व श्लेष्मल त्वचेवर होतो. मळमळणे; अशक्तपणा; व गात्रे शिथिल झाल्यासारखी वाटतात. पित्तप्रकृति.

**नाकः–** जरा वारे लागले तर शिंका येतात. नाकातून खूप करवडणारे तिखट पाणी वाहते.

**तोंड:–** आलेले. घशात काहीतरी अडकले आहे असे वाटते.

**उदर:–** यकृतापासून पाठीच्या उजव्या तिकोनी हाडापर्यंत वेदना होतात.

**श्वसनेंद्रिये:–** पहिल्या झोंपेनंतर–मध्यरात्रीचे सुमारास कोरडी खोकल्याची ढास लागते. रात्री निजल्यानंतर दमा सुरू होऊन खोकला येतो. घशात काहीतरी अडकले आहे असे वाटते, दम्याचा जोर कमी झाल्यावर कफ सुटून बाहेर येतो व तो तोंडाला गरम लागतो. थोडा कफ पडला तर खोकल्याचा जोर कमी होतो.

**झोप:–** झोपेत खूप घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो:–** थोड्याशा झोपेनंतर. वारे लागल्याने. रात्री ११ वाजता.

**ब वाः–** डोके उंच करून निजल्याने. बसल्याने.

**सहाय्यक औषधे:–** लोबे.

---

## १४. अर्टिका युरेन्स Urtica Urens

**सर्वसाधारण:–** या औषधाचा परिणाम *स्तन, जननेंद्रिये व मूत्रेंद्रिये,* यकृत व पांथरी यावर होतो. नांगी मारल्याप्रमाणे आग. शरीराला लघवी-सारखा वास येतो. संधीवातात अंगावर पित्ताच्या गांधीसारख्या मोठाल्या गांधी येतात. किंवा हे उपद्रव आलटुन पालटून होतात. लघवीतून युरिक ॲसिड जाते. रक्तस्राव. भाजणे-पोळणे, मधमाशांचे डंख, मार लागणे; स्तनांतील दूध येण्याचे बंद झाल्याने होणारे विकार.

**डोके:–** दुखत असताना पांथरीच्या जागी टोचते.

**उदर:–** शौच पांढरे, सुतासारखे जंत पडतात. आंतड्याच्या जुन्या विकारात आम खूप पडतो. आमातिसार. गुदद्वाराला अतिशय कंड सुटते.

**मूत्रेंद्रियेः**– लघवी करवडणारी. त्यामुळे कंड येते. लघवीतून युरिक ॲसिड जाते. लघवी होण्याचे बंद होते.

**पुरुषजननेंद्रियेः**– वृषणाला कंड सुटून आग होते, त्यामुळे झोप येत नाही.

**स्त्रीजननेंद्रियेः**– स्तन सुजतात. दूध येण्याचे बंद होते. योनिद्वार नांगी मारल्याप्रमाणे आग होऊन खाजते व सुजते तान्ह्या मुलांना अंगावरचे दूध बंद केल्यानंतर दूध येत असेल तर या औषधानी ते बंद होते.

**हातपायः**– वरच्या हातात एकसारखे दुखते. हात वळविता येत नाहीत कोट घालता येत नाही. वातरक्त (गाउट).

**ज्वरः**– रात्री येतो, त्यावेळेस घेरी येते व सर्व अंगात ठुसठुसते.

**त्वचाः**– कंड, पित्ताच्या गांधी; उन्हामुळे आलेले पुरळ, भाजल्यासारखे फोड.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः**– थंड दमट हवा; थंड पाण्याची आंघोळ. दरवर्षी; भाजणे; बर्फ पडत असताना; स्पर्शाने, हातावर निजल्याने.

**संबंधी औषधेः**– आर्सि-कॅ; नेट्र-मू ; फार्मिका.

---

## १५. अलेट्रिस Aletris

**सर्वसाधारणः**– या औषधाचा परिणाम **स्त्रीजननेंद्रिये** ( उजवी बाजू ) व रक्त यावर होतो. थकवा, नेहमी दमल्यासारखे वाटते. भाग जड होतात; रक्तस्राव; पंडुरोग; मूर्च्छा व घेरी.

**मनः**– गोंधळल्याप्रमाणे; एकचित्त होता येत नाही.

**डोकेः**– मागील बाजूस वजन असल्याप्रमाणे; डोके जणू मागे खेचून घेईल असे वाटते. घेरी येताना मूर्च्छा येते, गुंगी येते किंवा ओकाऱ्या वा जुलाब होतात.

**कानः**– एका कानापासून दुसऱ्या कानापर्यंत उघडे आहेत असे वाटते.

**तोंडः**– फेसाळ लाळ येते. मळमळत असताना कपाळात दाबल्यासारखे वाटते, कॉफी घेतल्याने किंवा रात्री जेवणानंतर बरे वाटते.

**जठरः**– अन्नाचा तिटकारा. थोडे खाल्ले तरी त्रास होतो. गरोदरपणाच्या ओकाऱ्या. मळमळत असताना कपाळांत दाबल्या सारखे वाटते, काफी घेतल्याने किंवा रात्री जेवणानंतर बरे वाटते.

**उदरः**– वेदना होतात. शौचास होताना भयंकर वेदना होतात. मलावरोध– शौचास कष्टाने होते. वेदना होताना पाय दुखतात.

**मूत्रेंद्रियेः**– जलद चालताना किंवा शिंकताना लघवी नकळत होते.

**स्त्रीजननेंद्रियेः**– पाळी लवकर, विटाळ भरपूर जातो व त्यावेळेस बाळंतपणा-सारख्या वेदना होतात. गर्भाशय जड होतो, खाली येतो व त्यावेळेस उजव्या जांघेत दुखते; धुपणी चिकट, पांढरी. अशक्तपणामुळे किंवा पंडु-रोगामुळे; वंध्यात्व; किंवा वाखा होण्याची प्रवृत्ति. विटाळानंतर पाण्यासारखा स्राव वाहत राहतो. पाळीच्या अगोदर खोकला येतो.

**मान पाठ हातपायः**– कमरेच्या वर पाठ मोडेल असे वाटते. पाउदुखी. खुब्यामधे ओढल्याप्रमाणे वाटते त्याचबरोबर चिकट धुपणी. ( उजवी ) तंगडी गुडघ्याखाली लटकी पडल्याप्रमाणे; सुन्नपणा त्यावर दाब सहन होत नाही.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः**– शरीरातील स्राव गेल्याने.

**ब वाः**– वारा सरकल्याने, मागे वाकल्याने.

**संबंधी औषधेः**– ट्रिलि; सिको; हेलोनि.

— —

## १६. अल्युमिना Alumina

**सर्वसाधारणः**– या औषधाचा परिणाम *मज्जारज्जू* ( कंबरेचा ); *गुद*; पाय; श्लेष्मलत्वचा व त्वचा यावर होतो. **किडकिडीत, काम करण्याचा उत्साह नसलेले इसम. निजून रहावेसे वाटते**, पण त्याने बरे वाटत नाही, थकवा कमी होत नाही. **स्नायु लटके पडल्यासारखे** वाटतात. अकाली जीवनशक्ति क्षीण झालेले इसम. ***कोरडेपणा***– डोळे घसा, गुद वगैरे. **इंद्रियांची कार्यशक्ति क्षीण** किंवा मंद होते. त्यामुळे कार्य लवकर होत नाही. सुई टोचली तर तिची जाणीव ताबडतोब न होता कांही वेळाने होते. स्राव–थोडे–दाट व करवडणारे. कंप, आंचकें. आंचके येताना डोळ्यातून पाणी येते किंवा हसू येते किंवा हसणे व पाणी येणे आलटून पालटून. थकवा येतो. थोडेसे चालण्याने, विशेषतः बोलण्याने. टणकपणा. जीर्ण विकार. कृत्रिम अन्नावर वाढलेली किंवा मोठे पोट झालेली मुले नाजुक मुले. राग; आशाभंग यामुळे उद्भवलेले विकार. डोळे मिटून चालता येत नाही. निरनिराळ्या ठिकाणी ठुसठुसते. भावना किंवा वेदना खालून वर जातात.

बोलण्यानंतर व विटाळ गेल्यानंतर थकवा वाटतो. वयात येण्याच्या काळात कृश झालेल्या मुली. रोग्याला कांहीं दिवस चांगले बरे वाटते पण कांहीं कारण नसताना पुन्हा बिघडते.

**मानसिकः**– शरीर किंवा काही भाग मोठे; बधिर; गुळगुळीत किंवा जड झाले आहेत असा भ्रम. उतावीळ अधीर, परंतु कार्य होण्यात मंदता; त्यामुळे बोलण्यात लिहिण्यात चुका होतात. मनाचा गोंधळ. बोलणे-पाहणे या गोष्टी आपण स्वतः करीत नसून दुसरं कोणी तरी करीत आहे असे वाटते. उदासीन–जागे झाल्यावर. घाबरटपणा, चाकू, सुरी, रक्ताकडे पाहून भीती वाटते. स्वतःच्या हातून काहीतरी घडेल अशी भीती वाटते. विसरभोळेपणा. वेळ फार सावकास चालला आहे असे वाटते. आपला तोल जाऊन पुढे पडू असे वाटून त्याची फार भीती वाटते. वस्तु खऱ्या भासत नाहीत. चिडखोरपणा, कुरकुर करणे. मनोवृत्तीत अदलाबदल होते. प्रत्येक गोष्टीबद्दल तुच्छता दर्शविणे. आंचके येऊन गेल्यानंतर बोलत राहणे किंवा हसणे.

**डोकेः**– मेंदूत टोचल्यासारखे वाटते व मळमळते. बोलताना, डोळे उघडल्याने, घेरी येते. केस कोरडे, गळून पडतात. घेरी येताना डोळ्यापुढे पांढरे तारे चमकतात, डोळे पुसल्याने बरे वाटते. डोकेदुखी स्वस्थ निजल्याने कमी होते. कातडी खाजते व बधिर होते.

**डोळेः**– पापण्या अशक्त–खाली पडतात. तिरळेपणा–दांत येताना. आग होते–सुजतात. दिवसा पाणी येते, डोळे येतात, आग होते, चिकटतात.

**कानः**– कढत व लाल. खाताना किंवा गिळताना, कडकड किंवा भूंभूं आवाज होतात.

**नाकः**– टोकावर भेगा. नाकपुड्या लाल, हुळहुळ्या. जाड पिवळी मेकडे बसतात.

**चेहराः**– सुरकुतलेला, म्हाताऱ्यासारखा. अंड्याचा बलक वाळला आहे किंवा कोळिष्टके चिकटलेली आहेत असे वाटते. खालचा जबडा कापतो. जबडा उघडताना, चावताना, सांध्यात ताणल्यासारखे वाटते. पुटकुळ्या किंवा रक्तो गळवे येतात.

**तोंडः**– दांत लांब झाले आहेत असे वाटते. वेदना इतर भागात पसरतात कुबट घाण येते. लाळ वाहून सुद्धा तोंड कोरडे आहे असे वाटते.

**घसाः**– पडजीभ मोठी होऊन लांबते, घसा आवळल्या किंवा काटक्यानी भरल्यासारखा वाटतो. अन्न नलिका बारीक होते, त्यामुळे अन्न खाली उतरत

नाहीं; अगदी लहान घासच गिळता येतात. घशातून जठरापर्यंत आवळ-ल्यासारखे वाटते.

**उदरः–** मोठे पोट असलेली मुले. गुदापासून घोट्यापर्यंत वेदना होतात. **गुदांच्या स्नायूची शक्ति मंद** झाल्यामुळे-शौच मऊ असतानासुद्धा कुंथावे लागते. शौचास लहानमोठे टणक खडे होतात किंवा लाल रक्ताच्या गांठी पडतात. खडे पडताना कापल्यासारख्या वेदना होतात. मलावरोध– तान्ह्या मुलांचा. शौचास होण्याच्या अगोदर बराच वेळ मुरडा होईल असे वाटते, नंतर कुंथून शौचास होते. उभ्याने शौचास बरे होते.

**जठरः–** काही तरी कदान्न खावेसे वाटते खडू–कोळसे– स्वच्छ पांढऱ्या चिंध्या, काफीचा गाळ, कोरडे पदार्थ. बटाटे सोसत नाहीत. जेवणानंतर वेदना ३ तास राहतात. बटाट्यांचा तिटकारा. मांसाचा तिटकारा.

**मूत्रेंद्रियेः– मूत्राशयाच्या स्नायूची शक्ति मंद** झाल्यामुळे- लघवी करताना, शौचवेळी कुंथावे तसे कुंथावे लागते ( कुंथल्याशिवाय लघवीला होत नाही. ). लघवीची धार मंद, लघवी हळुहळू होते. वृद्धपणी वारंवार लघवीला जावे लागते. लघवी होताना चुणचुणते–आग होते. मूत्राशयात व जननेंद्रियात अशक्तपणा वाटतो. अंथरुणात न कळत लघवी होईल अशी भीती वाटते. मूत्राशयात लघवी तुंबून थेंब थेंब गळते.

**पुरुषजननेंद्रियेः–** गुदगुल्या होतात, संभोगाची इच्छा वाढते. संभोगातिरेकाने किंवा मुष्टिमैथुनाने आलेले नपुंसकत्व. संभोगेच्छा कमी किंवा नाहीशी होते. शौचास कुंथताना मूत्रग्रंथीतील धातु जातो. स्वप्नावस्था. रात्री शिश्नाचे उत्थापन वेदनायुक्त. परमा.

**स्त्रीजननेंद्रियेः–** धुपणी भरपूर जाते, करवडणारी, इतकी की पायापर्यंत ओघळ येतात. गार पाण्याने धुण्याने कमी होते. दिवसा ज्यास्त ( चालणे, उभे राहणे, वगैरे कारणाने ) पाळी लवकर येते. एखादे दिवस विटाळ जातो खाली ओढल्याप्रमाणे असह्य वेदना होतात. जननेंद्रियात गुदगुल्या व कंड सुटून संभोगाची इच्छा होते. स्तनाग्रे लाल होतात, आग होते व कंड सुटते ( गरोदरपणी ) विटाळ थोडा गेला तरी थकवा फार येतो. विटाळसेपणी स्त्रिया केविलवाण्या होतात. पाळीनंतर मानसिक व शारीरिक थकवा येतो. गरोदरपणी मलावरोध.

**श्वसनेंद्रियेः–** एक सारखी कोरडी खोकल्याची–ढांस सकाळी जास्त होते. खोकताना शिंका येतात. खोकताना श्वास घेता येत नाही. एकाएकी थंडीमुळे घसा

असून आवाज उमटत नाही पडजीभ लांब झाल्याने खोकला येतो. खोकला बोलताना गाताना चमचमीत पदार्थ खाल्याने जास्त होतो.

**छाती:**– दाटल्यासारखी वाटते– खाली बसल्याने किंवा वाकल्याने जास्त होते. वजन उचलताना किंवा बोलताना छाती हुळहुळी होते.

**हृदय:**– हृदयाच्या जागी धक्के बसतात व धडधडते. हृदयाजवळ काळजीसारखे वाटून पहाटे ४।'९ वाजता जाग येते.

**पाठ:**– कमरेच्या मणक्यातून तापलेले- लोखंड खुपसले आहे असे वाटते. दोरीने बांधल्यासारखी वाटते. पाठीत टोचते.

**हातपाय:**– जड, चालताना अडखळणे. तळपाय चालताना दुखतात, सुजून मऊ झाले आहेत असे वाटते. नखाखाली कुरतडल्यासारखे वाटते. हाडे पिरगळल्यासारखी वाटतात. **मान डोके छाती पुढे वाकवून, हात कोपरांपासून वर उचलून व शरीर ताठ करून चालणे. चालताना झोकांडे जातात.** पाऊले टेकताना टाचा बधिर झाल्या आहेत असे वाटते. हातात व बोटात, कढत सुया टोचल्याप्रमाणे वेदना होतात. हात जड होऊन लटके पडल्याप्रमाणे वाटतात. पायाची आढी घालून बसल्याने पाय बधिर होतात. डोळे बंद करून चालता येत नाही. बसल्यानंतर कुल्ले बधिर होतात.

**ज्वर:**– मोकळया हवेत थंडी वाजते. अंग तापून कंड सुटते. घाम येत नाही.

**त्वचा:**– कोरडी – भेगा पडतात. खरखरीत. दुखत असलेल्या जागी आग होऊन कंड सुटते, अंथरुणाच्या उबेने असह्य कंड सुटते. इसब. रक्त येईपर्यंत खाजवावे लागते

**झोप:**– अस्वस्थ, किंवा चिंतायुक्त, गुंतागुंतीची स्वप्ने पडतात, किंवा चोर दिसतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– उष्णतेने – *खोलीच्या*** किंवा अंथरुणाच्या. कृत्रिम अन्न. बटाटे, तवकील, मीठ. **बोलण्याने. कोरडी हवा. पहाटे जागे** झाल्यानंतर. बसण्याने; विटाळसेपणानंतर. संभोग. तंबाखूचा धूर, नियमित वेळी आल्टुन पाल्टुन. दमट हवा. गार पाण्याने धुतल्याने.

**क मा:– संध्याकाळी.** समशीतोष्ण हवा. अल्पश्रम.

**सहाय्यक औषधे:**– फेरम; ब्रायो.

**संबंधी औषधे:**– आर्जे-मे; प्लंबं.

——

## १७. अल्युमेन (तुरटी) Alumen

**सर्वसाधारणः**– या औषधाचे परिणाम साधारणः अल्युमिनाप्रमाणेच आहेत. स्नायू अशक्त–लटके पडल्यासारखे. कोरडेपणा; आवळल्यासारखे वाटणे. काठिण्य-टणकपणा जीभ, गुद, गर्भाशय वगैरे. कॅन्सर. गाठी सुजून टणक व मोठ्या होतात. व्रणाचे तळ टणक. नेहमी खोकला असलेले वृद्ध इसम. रक्तस्राव मोठ्याला गाठी पडतात. गुदाच्या किंवा गर्भाशयाच्या कॅन्सरमुळे झालेले बद्धकोष्ठ. दोरीने बांधल्यासारखे वाटणे–हातपाय वगैरे. डोळ्यावर किंवा दांतावर शस्त्रक्रिया केल्यानंतर उद्भवलेले उपद्रव. स्राव पिवळे.

**मानसिकः**– वाईट बातमी ऐकल्याने अंगाला कांपरे भरते. संशयात्मा. अंथरुणाची भीती वाटते.

**डोकेः**– टाळूवर ओझे ठेवल्याप्रमाणे वाटून आग होते गार हाताने दाबल्याने बरे वाटते. घरी येताना पोटाच्या खळीत पोकळ वाटते, डोळे उघडल्याने किंवा उजव्या कुशीवर वळल्याने बरे वाटते.

**डोळेः**– मेणबत्तीच्या उजेडात वस्तू दोन दिसतात. तिरळेपण।– उजवा डोळा नाकाकडे वळतो.

**घसाः**– टॉनसिल सुजून मोठ्या व टणक होतात. वारंवार सर्दी होऊन पातळ पदार्थ गिळताना त्रास होतो. पडजीभ लांब होते. खोकताना खवखवतो. आवाज अजिबात उमटत नाही.

**उदरः**- हट्टी मलावरोध- दिवसचे दिवस शौचास होत नाही. दगडासारखे पांढरे गोळे शौचास पडले तरी गुदात भरल्यासारखे वाटते. तान्ह्या मुलांप्रमाणे पिवळे शौचास होते. शौचास झाल्यानंतर बराच वेळ गुदात आग होऊन दुखते.

**पुरुषजननेंद्रियेः**– परमा जुनाट. पिवळा स्राव. मूत्रमार्गात गाठी लागतात.

**स्त्रीजननेंद्रियेः**– गर्भाशयाचे मुख टणक होते. स्तनात टणक गाठी होतात. विटाळ पाण्यासारखा. धुपणी पिवळी.

**श्वसनेंद्रियेः**– वृद्ध इसमांना सकाळी खोकला येऊन खूप पातळ कफ पडतो, कफ खोकून खोकून काढावा लागतो. थुंकीतून रक्त पडते.

**हृदयः**– उजव्या कुशीवर निजल्याने– धडधडते.

**त्वचाः**– व्रण तळाशी टणक. कॅन्सरचे व्रण. वृषणाच्या व शिश्नाच्या वरील भागाचा इसब. खरखरीत; भेगा पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :**– गारव्याने. झोपेत, उजव्या कुशीवर निजल्याने.

---

## १८. असाफिटिडा ( हिंग ) Asafoetida

**सर्वसाधारणः**– या औषधाचा परिणाम ***मज्जातंतू***, मन; **अन्ननलिका; पचनेंद्रिये**; हाडावरील आवरण व डावीबाजू यावर होतो. **धष्टपुष्ट** पण अत्यंत **घाबरट इसम. *काहीही सहन होत नाही*. एकाएकी जोरजोराने ठुसठुसावयास** लागते. एकदम दाबल्यासारख्या किंवा टोचल्यासारख्या वेदना होतात. **वेदना होताना बधिरपणा येतो.** स्पर्श केल्याने वेदनांच्या जागा बदलतात किंवा वेदना कमी होतात. **वेदना आतून बाहेर येत आहेत असे वाटते.** वेदना उकरल्यासारख्या, खिळा मारल्याप्रमाणे होतात. निळसरपणा. पातळ, दुर्गंधी करवडणारे स्राव. खोल चरत जाणारे व्रण. हाडांचे कुजणे. हिस्टेरिआ. मूर्च्छा, काही कारण नसताना. प्रक्षोभामुळे वेदना होतात, मूर्च्छा येते. विशेषतः बंद खोलीत. स्नायू उडतात किंवा त्याना कंप येतो. लाट आल्याप्रमाणे स्नायूत कंप होतो. लक्षणे डाव्या बाजूस उद्भवतात. नाडीव्रण. दुर्गंधी पू येतो, त्वग्रोग बाह्योपचाराने बरे केल्याने मानसिक विकार उत्पन्न होतात. दुर्गंधी. पाऱ्याचे दुष्परिणाम. आतड्याचे चलनवलन उलट दिशेने चालते.

**मानसिकः**– लक्षणे सांगताना अतिशयोक्ति करणे. स्वतःविषयी दुसऱ्याने सहानुभूति दाखवावी अशी इच्छा. चंचल, एकही काम धड करता येत नाही. एकदा एखादी वस्तू मागितली की दुसरी हवी असते. स्वतःच्या तक्रारी सारख्या सांगणे. हिस्टेरिआ– घसा धरल्यासारखा वाटून तो धरावासा वाटतो. स्वतःबद्दलच असंतुष्ट.

**डोकेः**– मागील बाजू दुखते, शौचास झाल्याने बरे वाटते.

**डोळेः**– पापण्या डोळ्याना चिकटतात. डोळ्याभोवती बधिरपणा. डोळ्यात व सभोवती ठुसठुसते, रात्री जास्त होते. डोळ्याभोवती होत असलेल्या वेदना दाबल्याने किंवा विश्रांतीने कमी होतात.

**नाकः**– पिनस, नाकातील हाडे कुजतात. हाडे ताणल्यासारखी वाटून बधिर होतात.

**चेहरा**:– फुगीर; निळसर; जणू काही भाजून काढला आहे असा दिसतो.

**तोंड**:– खालचा ओठ सुजतो. गालात लहान टणक पुटकुळ्या येतात. तेलकट, करपट, चव.

**घसा**:– खालून वर गोळा येत आहे असे वाटते.

**उदर**:– वात धरण्याची प्रवृत्ति. वात एकदम वर घशाकडे चढतो. वात धरल्यामुळे उदरात दुखते. वात खालून न सरता ढेकरावाटेच जाण्याची प्रवृत्ति. आतडी गोळा झाली आहेत असे दिसते. दुर्गंधी–पातळ काळसर जुलाब होतात. पोटाच्या खळात ठुसठुसते; उडते व ते दिसते किंवा हाताला लागते.

**जठर**:– अन्ननलिकेला व जठराला आचके बसतात. ढेकरांबरोबर पाणी बाहेर येते. **मोठ्या आवाजाच्या करपट किंवा लसणीच्या वासाच्या ढेकरा येतात.**

**मूत्रेंद्रिये**:– लघवी पिंगट रंगाची व तिखट अमोनिया श्वासाची होते. लघवी होताना व नंतर मूत्राशयात आंचके बसतात.

**पुरुषजननेंद्रिये**:– शिश्नात सुया टोचल्यासारखे वाटते. वीर्यपातानंतर मूर्च्छा येते.

**स्त्रीजननेंद्रिये**:– गरोदर नसताना स्तनात दूध येते. बाळंतपणानंतर दूध येण्याचे बंद होते. इंद्रियांना खाली ओढ लागते, गाडीने जाताना जास्त होते.

**छाती**:– घट्ट आवळल्यासारखी वाटते, त्यामुळे फुफ्फुसे पूर्ण विस्तारत नाहीत असे वाटते. दिवसात केव्हातरी एकदातरी दमा होतो, शारीरिक श्रमाने, संभोगानंतर, भरपूर जेवल्याने जास्त होतो.

**हृदय**:– भरल्यासारखे-ताणल्यासारखे वाटते. हृदयात कंप झाल्याप्रमाणे धडधडते.

**हातपाय**:– तंगडीचे मोठे हाड हुळहुळे होऊन दुखते, रात्री असह्य होते.

**त्वचा**:– लाल-काळसर सुजलेली. आत हवा असलेले फोड येतात. व्रण निळसर उंच कडा असलेले. दुर्गंधी-चरत जाणारा पू. कंड-खाजविल्याने बरे वाटते. जुने व्रण निळे पडून त्यात व्रण पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो**:– रात्री; खोलीत; विश्रांतीने; खाण्याने; बाह्योपचाराने त्वचेचे विकार किंवा स्राव थांबविल्याने; पारा; आवाज; **बसण्याने**; गरम पांघरुणाने.

**क म** :– मोकळ्या हवेत चालण्याने; दाबल्याने. स्पर्श. खाजविण्याने.

**सहाय्यक औषधे**:– कास्टि; पल्स.

**संबंधी औषधे**:– आरम-मे, पल्स; मर्क्यु; लॅके; व्हॅले; संबुल; सिंको.

---

## १९. असारम Asarum

**सर्वसाधारण:**– या औषधाचा परिणाम–*मज्जातंतु*, श्लेष्मल त्वचा व स्त्रीजननेंद्रिये यावर होतो. *अत्यंत हळुवारपणा*; रेशमी कापडांवर घासणे, कागदाचे चुरगळणे इत्यादि बारीक आवाजसुद्धा असह्य होतात, इतकेच नव्हे तर कोणीतरी बोटानी किंवा नखानी काहीतरी घासील या कल्पनेनें सुद्धा अंगात खळबळ होते. थंडी टाळणारे व थंडी सहन न होणारे बैठया सवयीचे विद्या व्यासंगी इसम. एके ठिकाणी दाबल्यासारखे वाटते. शरीर हलके होऊन हवेत तरंगत आहे असे वाटते. भावनांमुळे शहारे येऊन कांपरे भरते. दाबल्यासारखे वाटणे, ताणल्यासारखे वाटणे किंवा आखडल्यासारखे वाटणे.

**डोके:**– मेंदूत भ्रमल्यासारखे वाटते. कोरड्या ओकारीने बरे वाटते. दाबल्यासारखे डोके दुखते. आतडे ताणल्यासारखे वाटते. केस विंचरणे सहन होत नाही.

**कान:**– आवाजाने कान दुखतात. कानांत बूच बसल्यासारखे वाटते.

**चेहरा:**– गरम झाल्यासारखा वाटतो. गार पाण्यांत धुतल्याने बरे वाटते.

**तोंड:**– लाळ गार, तोंडात साचते व मळमळते. तंबाखु ओढताना कडू होते.

**उदर:**– बुळबुळीत–धागे असलेले, पिवळे शेंबडासारखे शौचास होते. खाण्यानंतर शौचास जावे लागते.

**जठर:**– जोराच्या ओकाऱ्या येऊन जुलाब होतात, व उदरात मुरडा होतो. दारू प्यावीशी वाटते.

**स्त्रीजननेंद्रिये:**– माकडहाडात त्रिटाळ सुरू होताना इतके दुखते की श्वासमुद्धा घेववत नाही. हालचालीने जास्त होते. चिकट पिवळी धुपणी. घाबरटपणामुळे वाखा होण्याचा संभव.

**श्वसनेंद्रिये:**– दमा वासाने किंवा गारव्याने जास्त होतो. घाबरटपणामुळे लागलेला ठसका.

**हातपाय:**– हलके झाल्यासारखे वाटतात. गुडघ्याच्या वाटीत गुडगुड आवाज होतो. अशक्तपणामुळे झोकांडे जातात.

**पाठ:**– अतिशय ठणकते, इतकी की श्वास घेववत नाही, हालचाल करवत नाही.

**ज्वर:**– अंग गार झाल्यासारखे वाटते, खाण्यापिण्यानंतर. उष्णतेने बरे वाटत नाही. घाम आंबूस, सहज येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः–** *भेदणारे आवाज*. थंडगार हवा. भावना. कोरडी हवा. कोरड्या ओकाऱ्या येताना.

**ब वाः– गार पाण्याने** धुतल्याने, चेहरा, डोळे वगैरे. दमट हवा.

**सहाय्यक औषधेः–** आर्जे-ना; कॅस्टो; थेरि; बिस्म; सल्फु-ॲसि.

**संबंधी औषधेः-** कास्टि; पल्स; सिलि.

---

## २०. असेटिक ॲसिड Acetic Acid

**सर्वसाधारणः–** वाळलेले, अत्यंत क्षीण इसम. रक्तक्षय पंडुरोग. कॅन्सर. मधुमेह. जलोदर; नाळगूद. वारंवार मूर्च्छा. श्वासोच्छ्वासाला त्रास. अशक्त हृदय. लघवीला खूप होते. उलटी व घाम खूप येतो. भूल देण्यासाठी वापरलेल्या औषधांचे दुष्परिणाम नाहीसे करते. फेफरे आले असता रोगी वेड्याप्रमाणे बिछान्यातून उडी मारतो व जमिनीवर रांगतो.

**मानसिकः–** स्वतःचा आजार व मुलांचे दुःख करतो. स्वतःच्या मुलांना ओळखत नाही. धंद्याविषयी काळजी. त्रास अंगावर ओढून घेतो.

**चेहराः-** **पांढरा फटक किंवा फिकट-सुकलेला;** गाल कढत व लाल. ओठांचा कॅन्सर.

**डोकेः–** दुखते; झोपेच्या औषधांच्या दुष्परिणामाने.

**घसाः–** तहान लागते परंतु मुलांना चमचाभर पाणी पिणेही कठीण जाते (घटसर्प). तापात तहान नसते. जलोदरात फार तहान लागते.

**जठरः–** लाळ वाढते. जठरांत फदफदल्यासारखे वाटते. अत्यंत तहान लागते पण गार पाणी सोसत नाही. **छाती व जठरांत भयंकर आग होते; नंतर त्वचा गार होऊन कपाळावर गार घाम येतो.** काही खाल्ले तरी ओकून पडते. कॅन्सर, व्रण. बटाट्याखेरीज इतर भाज्या मानवत नाहीत.

**उदरः–** फुगलले. जलोदर. आतड्यातून रक्तस्राव. कृश मुलांची हगवण.

**मूत्रेंद्रियेः–** लघवीला भरपूर होते, तहान लागते व अशक्तपणा येतो. मधुमेह.

**श्वसनेंद्रियेः–** श्वास आत घेताना खोकला. धाप लागते.

**स्त्रीजननेंद्रियेः–** रक्तप्रदरात तहान लागते. बाळंतपणानंतरचा रक्तप्रदर. स्तनात गळू होते. दूध निळसर, आंबुस बिघडलेले त्यामुळे तान्ही मुले वाळू लागतात.

**पाठः**– टणकते, **पोटावर निजल्याने बरे वाटते.** भरपूर लघवी झाल्याने बरे वाटते.

**ज्वरः**– क्षयी ज्वर; तापात तहान लागत नाही. रात्री खूप गार घाम येतो.

**त्वचाः**– पांढरी फटक; सुजलेली; जलयुक्त सूज. स्पर्शज्ञान कमी होते.

---

## २१. अस्टिलेगो Ustilego Maydis

**सर्वसाधारणः**– या औषधाचा परिणाम-त्वचा; नखे, केस व स्त्रीजननेंद्रिये यावर होतो. **रक्तस्राव काळा, हळुहळु पाझरतो. गाठ बसली आहे असे** वाटते–घसा, आतडे गर्भाशय वगैरे. **नखे व केस गळतात.** संभोगातिरेकाने आलेला थकवा. फिकट, कृश स्त्रिया, विटाळ थांबण्याच्या वयात.

**डोकेः**– चिकट स्रावाने केस काथ्यासारख एकमेकात गुंततात. घरी येताना डोळ्यापुढे पांढरे ठिपके दिसतात, विशेषतः विटाळ थांबण्याच्या वयात भरपूर विटाळ जात असताना.

**उदरः**– वेदना होताना आंतड्याला गाठ मारली आहे असे वाटते. वेदना घट्ट, टणक शौचास झाल्याने कमी होतात.

**पुरुषजननेंद्रियेः**– मुष्टिमैथुन करण्याची प्रवृत्ति. रेतःस्खलन दररोज रात्री किंवा स्त्रियांशी बोलताना होते.

**स्त्रीजननेंद्रियेः**– विटाळ अर्धवट पातळ व अर्धवट गाठ्या असलेल्या. चिकट. गर्भाशयातून विटाळ जाण्याऐवजी–आतड्यातून किंवा फुफ्फुसातून रक्त येते. गर्भाशयातून काळसर–गोठलेला हळुहळु रक्तस्राव होतो. उजव्या रजःपिंडात आग होते. गर्भाशय व डावा रजःपिंड हुळहुळा होतो. वेदना मांड्यापर्यंत जातात. दुर्गंधी–पिवळी, पिंगट धुपणी. डाव्या स्तनाखाली दुखते. स्तनाखाली (डाव्या) बरगडीच्या समांतर दोन पाळ्यामध्ये केव्हातरी किंवा एकसारखे दुखते. मूल अंगावर पिताना बाळंतपणासारख्या वेदना होतात. वाख्यानंतर किंवा विटाळ संपण्याच्या वयात होणारा रक्तप्रदर.

**पाठः**– उकळलेले पाणी वाहत आहे असे वाटते.

**त्वचाः**– कोरडी, कढत.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :**– विटाळ थांबण्याच्या वयात. स्पर्शाने; हालचालीने.

**संबंधी औषधे :**– असाफि; ब्रोमि; सिकेल.

---

## २२. ॲक्टिआ स्पायकटा Actea Spicata

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम सांधे, विशेषतः लहान सांधे यावर होतो. फाडल्याप्रमाणे वेदना होतात किंवा भिरभिरल्याप्रमाणे वाटते. सर्वांगात ठुसठुसते, विशेषतः यकृतात व मूत्रपिंडाच्या जागी जास्त. मनगटाचा संधिवात. खाण्यानंतर किंवा बोलण्यानंतर एकदम मरगळल्यासारखे वाटते थोडसे श्रम केले तरी सांधे सुजतात. छाती दाटल्यासारखी वाटते. गार वारे लागले तर दम लागतो. हालचालीने व स्पर्शाने वेदना जास्त होतात. अशक्तपणा. विकार झालेला भाग लटका पडल्यासारखा वाटतो.

**डोळे** :– वस्तु निळ्या दिसतात.

**कान** :– शिंकल्याने किंवा नाक शिंकरल्याने कान उडतात.

**जा हो** हवेचा बदल, थोडे श्रम थंडी. रात्री स्पर्शाने.

**संबंधी औषधे** :– कालो; लेडम; सिमिसि.

---

## २३. ॲग्नस कॅस्टस Agnus Castus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *जननेंद्रियें; मन*, मज्जातंतू व डोळे यावर होतो. *नपुंसकत्व व अकाली वृद्धत्व* संभोगा तरेकाने क्षीण झालेले इसम. लग्न न झालेल्या इसमाना भेदरटपणा व अशक्तपणा वाटतो मुष्टि-मैथुनामुळे स्वतःचाच तिरस्कार वाटतो. वारंवार परमा झाल्यामुळे झालेले दुष्परिणाम. कंड सुटून कुरतडल्यासारखे वाटते. शक्तीच्या बाहेर ओझे उचलण्याचे दुष्परिणाम; लम्पक संभोगेच्छा होत नसलेले इसम.

**मानसिक** :– मनाचा गोंधळ. *विसरभोळेपणा*. उदास व निराशा. काही झाले तरी आपण लवकरच मरणार व आता त्याला काही इलाज नाही असे वाटते. मन जागेवर नसते.

**डोके** :– दाट धूर असलेल्या खोलीत असल्याप्रमाणे वाटून डोके दुखते, एखाद्या बिंदूवर स्थिर पाहिल्याने बरे वाटते.

**डोळे** :– कंड सुटून कुरतडल्यासारखे वाटते. बाहुल्या विस्तारलेल्या.

**नाक** :– कस्तुरीचा किंवा इतर पदार्थांचा वास येत आहे असा भ्रम. कणा दुखतो दाबल्याने बरे वाटते.

**चेहरा** :– गालाना मुंग्या येतात. गालाना कंड सुटते व खाजविल्याने करवडतात.

**तोंड** :– तोंडात व हिरड्यावर व्रण पडतात. गरम अन्न-पेयांच्या स्पर्शाने दात दुखतात.

**उदर** :– मळमळते व आंतडी खाली दाबल्यासारखी वाटतात, त्यामुळे उदर धरून ठेवावे असे वाटते. अगदी साधे अन्न सोसते. वात धरून गुरगुर आवाज होतो, विशेषतः झोपेत. पांथरी हुळहुळी, मोठी होते. सरलेल्या वाताला लघवी-सारखा वास येतो व कपड्यावर दीर्घकाळ टिकतो. गुदद्वारात खोल भेगा पडतात. गुदद्वाराजवळ व्रण पडला आहे असे वाटते, चालताना जास्त होतो.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी फार होते; वारंवार जावे लागते.

**पुरुषजननेंद्रिये** :– गार, शिथिल. सहजासहजी वीर्यपात होतो. संभोगेच्छा नष्ट.

**स्त्रीजननेंद्रिये** :– स्तनात दूध येत नाही. त्यामुळे उदास वाटते धुपणी पिवळा डाग पडतो. वंध्यात्व. स्वच्छ धुपणी नकळत वाहते. संभोगाचा तिटकारा.

**संबंधी औषधे** :– आर्से; ओलिअं; इग्ने; कलाडि; पल्स; लायको; सल्फ; सेले.

---

## २४. ॲन्टिमोनिअम क्रूडम (सुरमा)

### Antimonium Crudum

**सर्वसाधारण** – या औषधाचा परिणाम *जठर; पचनेंद्रिय; मन व त्वचा;* नखे यावर होतो. विकार एकदा या बाजूस एकदा त्या बाजूस होतात. **आधाशी इसम. जठराचे विकार, मानसिक भावना व त्वचेचे विकार** यांचा एकमेकांशी संबंध असतो. कोणतेही विकार झाले म्हणजे पोट बिघडते किंवा पोट बिघडले म्हणजे इतर विकार उद्भवतात. **वृद्ध इसम; लठ्ठ इसम. गाठ्या; गाठ्याळ स्राव, शौच, धुपणी, त्वचा, नखे वगैरे.** वेदनांचा अभाव. ( ज्या विकारात होण्याची अपेक्षा असते अशा विकारात ). **भेगा पडतात** डोळ्यांच्या कोपऱ्यात, ओठांचे कोपऱ्यात, नाकपुड्यात. घाम येऊन गेला म्हणजे अंग तापते व तहान लागते. सारखे **झोपावेसे** व लोळावेसे वाटते. उष्ण हवेने थकवा वाटतो. उन्हाळ्यात विकार उद्भवतात. ऊन सोसत नाही. प्रेमभंगामुळे उद्भवलेले विकार. घंटेचा आवाज ऐकवत नाही. उद्भवलेले विकार जागा बदलतात, किंवा एका बाजूकडून दुसऱ्या बाजूस जातात. पाच, सहा किंवा बारा आठवड्यानी विकार उद्भवतात. अस्वस्थपणा व स्नायूंना

कंप. क्षुल्लक आवाजाने दचकणे. त्वग्रोग किंवा व्रण बाह्योपचाराने बरे केल्यानंतर उद्भवलेले जीर्ण विकार. पाण्यात पडल्यानंतर किंवा पोहण्यानंतर झालेले विकार. अंगावर जलयुक्त सूज. मुडदुस. स्वभाव हळवा विशेषतः चंद्रप्रकाशात, संधिप्रकाशात, किंवा हगवण लागली असताना किंवा विटाळशी होण्याचे अगोदर. वातरक्त ( Gout ) बरे झाल्यानंतर पोटाचे विकार होतात. संधिवात, सांधे वेडेवाकडे होतात. लहान मुले किंवा लठ्ठ होण्याकडे प्रवृत्ति असलेले मध्यम वयाचे इसम किंवा तरुण.

**मानसिक :–** **त्रासिक, चिडखोर, दुर्मुखलेला,** तुसडा. **पाहिल्याने–स्पर्श केल्याने** किंवा आंघोळ घालताना मूल किंचाळावयास लागते. **तिटकारा-वीट** आयुष्याचा, अन्नाचा, आंघोळीचा- **समाधी लागल्याप्रमाणे तंद्री. हळवा** स्वभाव; रंगीत काचेतून आलेल्या प्रकाशाकडे किंवा चंद्राचा प्रकाश पहाण्याने मन मोहित होते. ( विशेषतः स्त्रिया ). स्वतःच्या नशिबासंबंधी चिंता वाटते; पिस्तुलाने आत्महत्या करण्याचा प्रयत्न करणे. कोणाशी बोलावेसे वाटत नाही. **प्रेमासंबंधी उच्च भावना.** स्वतःच्या कामात इतकी व्यग्रता की लघवी, शौचास जाणे विसरणे, किंवा दिले तरच खाणे.

**डोके :–** गार पाण्याची आंघोळ केल्याने, गोड पदार्थ खाल्ल्याने डोके दुखावयास लागते. कपाळ दुखते नंतर नाकातून रक्त येते. कपाळ जड होऊन घेरी येते, मळमळते. कातडे खाजते व केस गळतात.

**डोळे :–** **पापण्या सुजून लाल होतात.** कोपरे भेगा पडून लाल होतात. फार दिवसाचे आलेले डोळे, विशेषतः मुलांचे. उजेड सहन होत नाही. विस्तवाकडे पाहिल्याने खोकला येतो. पापण्यांच्या कडावर फोड येतात.

**कान :–** भोवती ओलसर पुटकुळ्या येतात. कानाला फडके बांधले आहे किंवा पान चिकटले आहे असे वाटून कमी ऐकावयास येते.

**नाक :–** **खपल्या बसतात;** भेगा पडतात व हुळहुळे होते. श्वास घेताना आत गार झाले आहे असे वाटते. सर्दी थांबली की डोके दुखावयास लागते. इसब.

**चेहरा :–** **हनुवटीवर व गालावर उगवण येते, व ती फुटून पिवळसर** खपल्या बसतात. ओठांच्या कोपऱ्याना भेगा पडतात. खप्पड, उदास.

जीभ :– *जिभेवर दुधासारखा किंवा चुना फासल्यासारखा पांढरा जाड थर असतो.*

**तोंड** :– येते. जिभेने किंवा कोणत्याही प्रकारे दातांना स्पर्श झाला की त्यातून कळा येतात. हिरड्यातून रक्त येते. तोडाभोवती इसब. बसलेल्या स्थितीत झोपले असताना दात खाणे. पाळीच्या अगोदर दात दुखावयास लागतात.

**घसा** :– घशात काहीतरी अडकले आहे असे वाटून सारखे गिळावेसे वाटते. गार पाण्याच्या स्नानाने घसा बसतो. अति बोलण्याने आवाज कर्कश होतो.

**उदर** :– **भरल्यासारखे वाटते.** खिरीसारखे किंवा **पाण्यासारखे** किंवा गाठ्या असलेले शौचास होते. **जुलाब व मलावरोध आलटून पालटून**, विशेषतः वृद्धपणी. आतड्यात स्क्रू पिळल्याप्रमाणे वेदना होतात. मुळव्याध, झणझण होऊन आग होते. शौचात नुसतीच पांढरी आव पडते. गुदद्वारातून बुळबुळीत स्राव येतो, त्याने कपड्याला पिवळे डाग पडतात.

**जठर** :– ***अपचन, अजीर्ण*–** अन्नाचा तिटकारा. आंबट पदार्थ–लोणचे खावेसे वाटते. **ढेकरा येतात.** ढेकराना खाल्लेल्या अन्नाची चव लागते. ***ओकाऱ्या*** खाण्याने पिण्याने जास्त होतात, मळमळत नाही किंवा ओकारी झाल्याने बरे पण वाटत नाही. जठर दाबल्याने दुखते. संधिवात किंवा वातरक्त (गाउट) चे दुखणे कमी व्हावयास लागले की पोट बिघडते. ओकाऱ्या येताना आचके येतात. दूध प्याल्यानंतर मूल ओकते. ओकारीत दुधाच्या गाठी पडतात, नंतर मूल दूध पीत नाही व चिडते. तहान लागत नाही. एखाद्या रोगातून उठल्यानंतर भूक लागत नाही.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्रमार्गात लघवी होताना कापल्याप्रमाणे वाटते. लघवीला वारंवार जावे लागते व त्यावेळेस आग होते व पाठ दुखते. खोकताना नकळत लघवीला होते. लघवी दुर्गंधी.

**पुरुषजननेंद्रिये** :– भोवती पुटकुळ्या येतात. शिश्न व अंड वाळतात. वैषयिक वासनेमुळे शरीर अस्वस्थ होते. वृषणाला चावल्यासारखी कंड येते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– धुपणी पाण्यासारखी पण गाठी पडतात. विटाळ जाताना गर्भाशयात दाबल्यासारखे वाटून सर्व बाहेर येत आहे असे वाटते. विटाळशी होण्याचे अगोदर दात दुखावयास लागतात. रजःपिंड दाबल्याने दुखतात. प्रेमभंग झालेल्या तरुण मुलींच्या रजःपिंडात दुखावयास लागते. गरोदरपणी मळमळ, ओकाऱ्या व जुलाब होतात. थंडपाण्याच्या स्नानाने विटाळ बंद होतो. विटाळ एकदम बंद केल्यावर कामोन्माद होतो.

**श्वसनेंद्रिये** :– कोरडी खोकल्याची ढास लागते पण उत्तरोत्तर तिचा जोर कमी होत जातो. डांग्या खोकला. खोकला विस्तवाकडे पाहिल्याने किंवा उष्णतेने

जास्त होतो. छातीत आग होते, **कंड सुटते.** कफ खूप पडतो त्यामुळे थकवा येतो. आवाज बसतो पण त्याचा उपयोग केल्याने सुटत जातो. आवाज घोगरा, कर्णकटु, फुटलेला. अंग उष्णतेने तापल्याने आवाज बसतो. बाहेरून गरम खोलीत आल्याने खोकला येतो.

**मान, पाठ** :– उठताना माकडहाडात दुखते, चालताना बरे वाटते. मानेला व पाठीला कड येते.

**हातपाय** :– नखाखाली दुखते. नखे फुटतात. नखे वेडीवाकडी शिंगाप्रमाणे वाढतात त्यांचा रंग बदलतो, बोटांचे सांधे दुखतात; कोपर सुजते, दुखते तुकतुकीत दिसते. पावलांना घाम येतो त्यामुळे त्वचा सुरकुतते. तळपायाना घट्टे पडल्यामुळे चालता येत नाही. बारीक टोचल्यासारखे वाटते. गुडघी रोग. स्नायूना पेटके येतात; लिहिताना हात कापतात, निःशक्त वाटतात, त्यानंतर दुर्गंधी वात सरतो. टाचा दुखतात. कोपराचे स्नायुबंध सुजून दुखतात, भाग लाल होतो व सांधा आखडतो. कोपरे चकचकीत दिसतात. पाऊले वेडीवाकडी होतात.

**झोप** :– दिवसा फार येते, सकाळी उठवत नाही. **झोपाळूपणा व थकवा, विशेषतः वृद्धपणी.**

**ज्वर** :- घाम येऊन ताप कमी होत नाही. घामानंतर तहान लागते. विषम ज्वरात ताप नसला म्हणजे पचनेंद्रियाचे विकार उद्भवतात.

**त्वचा** :– भाजल्यासारखे फोड येतात. घामगळवे, इसब, पित्ताच्या गांधी, लाल कडा असलेल्या पांढऱ्या, अतिशय कंड सुटते. अंथरुणात निजल्यावर कंड सुटते. गार पाण्याचे स्नान सहन होत नाही. गोवर कांजिण्याप्रमाणे अंगावर पुरळ येते. घट्टे पडतात. टणक चामखिळी त्वचेवर येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***थंड*** दमट हवा; ***थंड*** *पाण्याचे स्नान*; *अंग तापल्याने*; आंबट पदार्थ, गोड पदार्थ खाण्याने; *उष्णता–उन्हाळयाची* उन्हाची, विस्तवाची. चंद्रप्रकाश. जिना चढताना. स्पर्श.

**ब वा** :– ओला शेक. मोकळ्या हवेत. विश्रांति

**सहाय्यक औषधे** :– सिल्ला.

**संबंधी औषधे** :– कॅल्क-का; पल्स; लॅके; सल्फ; सेपि.

## २९. ॲन्टिमोनिअम टार्टारिकम

Antimonium Tartaricum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा*; श्वासनलिका; **फुप्फुसे**; **हृदय**, *रुधिराभिसरण*; **श्वासोच्छ्वास**; जठर; आतडी; झोप; कंबर व त्वचा यावर होतो. ***जीवनशक्ति क्षीण*** झाल्यामुळे, ***अशक्तपणा वाढत जातो; गुंगी*** येऊ लागते; ***घाम*** सुटतो; ***इंद्रिये शिथिल*** होतात. **कफ** ***श्लेष्मा खूप होतो***. कंप – हात, डोके, अंतर्गत. मुलांना-सारखे घेऊन हिंडवावे असे वाटते. ती स्पर्श करू देत नाहीत. त्यांच्याकडे पाहिलेले त्याना खपत नाही. अस्वस्थता; आंचके; ताठपणा ; जडपणा, ओझे ठेवल्याप्रमाणे वाटते. वृद्ध इसम व मुले यांचे विकार. बरेच विकार पचनक्रिया बिघडल्याने उत्पन्न होतात. ठुसठुसते; हुळहुळेपणा. कापल्यासारख्या वेदना. तहान लागत नाही. कांजिण्या गोवर यांचा उगवण चांगली होत नाही. अनेक विकार होण्याच्या अगोदर जांभया येऊ लागतात, किंवा मुले केविलवाणी रडतात. तान्ही मुले अंगावर पिता पिता, गुदमरल्यासारखे वाटून पिणे सोडून रडावयास लागतात. राग व चिडखोरपणा यामुळे उद्भवलेले शारीरिक किंवा मानसिक विकार. देवी टोचण्याचे दुष्परिणाम, थूजा व सिलिसिआ यांचा उपयोग होत नसल्यास हे औषध द्यावे.

**मानसिक** :– कण्हणे, केविलवाणे रडणे. विकाराविषयी **बेफिकीर** किंवा संत्रस्त. दिवसा आनंदी. संध्याकाळी घाबरटपणा व चिंता वाटते. विकार बरे होण्यासंबंधी निराशा. एकटेच असावेसे वाटते. कोणी येऊन त्रास देऊ नये अशी इच्छा. डोळे मिटल्याने शुद्धि नाहीशी व्हावयास लागते. एकटे असण्याची भीति. वातात पुटपुटणे. जवळ असलेल्या माणसाला धरून ठेवणे. अनेक विकार होत आहेत अशी तक्रार करणे.

**डोके** :– पट्टयाने बांधल्याप्रमाणे वाटून दुखते. भणभणल्यामुळे निजणे भाग पडते. थंड हवा, गार पाण्याने धुतल्याने, हालचालीने बरे वाटते. उशीवरून डोके उचलले की घेरी येते. घेरी व गुंगी आलटून पालटून येते. कपाळात गोळा बसल्यासारखे वाटते. खोकताना डोके हालते.

**डोळे**:– फुप्फुसाच्या विकारात **पुढे आल्यासारखे** किंवा **वटारल्यासारखे दिसतात.** पापण्यांना चिकट पू येतो. डोळ्यात पाणी तरंगते. ते दाबावेसे वाटतात. डोळ्यापुढे काजवे चमकताहेत असे वाटते. एक **डोळा उघडा दुसरा मिटलेला.** डोळे अर्धवट उघडे.

**नाकः**– फुप्फुसाच्या विकारात पाळ्या आत बाहेर हलतात. सर्दी– खूप शिंका येतात नाक वाहते. नाकातून रक्त येते, व ते लौकर थांबत नाही. नाकपुड्या आत काळ्या दिसतात.

**चेहराः**– बसलेला, **फिकट**, गाल लाल, निळसर. चेहऱ्याचे **स्नायूंना आचके** बसतात. फुगीर. गार घाम. आजाऱ्यासारखा. हनुवटी व खालचा जबडा थरथरतो.

**तोंड**– जिभेवर **चिकट पांढरा थर जमतो**, कडा लाल असतात. जिभेवर मधुन मधुन तांबड्या पुटकुळया आलेल्या दिसतात. जीभ लिबलिबित. कोरडी; लाल विशेषतः मध्यभागी. पिंगट तांबड्या रेघा. लाळ गळते. जांभईनंतर तोंड उघडेच राहते.

**घसाः**– गिळताना त्रास होतो, दुखते. कफ सांचल्यामुळे श्वासोच्छ्वास करवत नाही.

**उदरः**– आंतडी दगडाने भरली आहेत असे वाटते. कापल्यासारख्या वेदना होतात, व गुंगी येते. वात धरून फुगते. जलोदर. शौचास आमयुक्त होते किंवा गवतासारखे हिरवे होते. विस्फोटक ज्वरात दुर्गंधी पाण्यासारखे जुलाब होतात. गुदद्वाराची आग होते. शौचास होताना छातीत धडधडते.

**जठरः**– **आंबट पदार्थ**, फळे विशेषतः सफरचंद ही खावीशी वाटतात. पण आंबट पदार्थ सोसत नाहीत. **थोडे पण वारंवार गार पाणी प्यावेसे वाटते.** कुजट अंड्यासारख्या ढेकरा येतात. ***मळमळते***, मळमळताना **थकवा येतो, गार घाम येतो, सर्व गोष्टींची किळस येते**, चिंता वाटते, **जोराने फेकल्यासारखी ओकारी होते.** नंतर थकवा वाटून झोप येते. ( इथू ) दूध मानवत नाही. ओकाऱ्या होताना हात पाय कापतात. जोरजोराने उमासे येऊन कोरड्या ओकाऱ्या येतात व पोटात गळून जाते. ओकारीत– हिरवे पाणी, फेस किंवा रक्तमिश्रित पुष्कळ बुळबुळीत चिकट कफ पडतो. अन्नाची कल्पनासुद्धा सहन होत नाही. इतका तिटकारा वाटतो, की थोडेसे खाल्ले तरी मरण येईल असे वाटते. फक्त उजव्या कुशीवर निजल्याने ओकारी थांबते.

**मूत्रेंद्रियेः**– लघवी होताना व नंतर मूत्रमार्गात आग होते. लघवी झाल्यानंतर रक्ताचे थेंब पडतात व मूत्राशयात कापल्यासारखे वाटते.

**पुरुषजननेंद्रियेः**– परमा बाह्योपचाराने बंद केल्यानंतर अंडांत वेदना होतात. शिश्नाच्या बोंडीवर चामखिळी येतात.

स्त्रीजननेंद्रिये – पातळ रक्तासारखी धुपणी, बसल्याने जास्त जाते. बाळंतपणानंतर लगेच आचके येतात.

श्वसनेंद्रिये:– श्वासोच्छ्वास अनियमित. **गुदमरल्यामुळे श्वास जलद चालतो. कफाने छाती भरली असली तरी कफ बाहेर येत नाही. खोकताना घुरघुरते. श्वासोच्छ्वास घेताना पोट उडते.** न्युमोनिया, ब्रांको न्युमोनिया दमा. खोकला वृद्धांचा, मुलांचा. डांग्या खोकला. मूल रागावले की खोकला येतो. दम्यात श्वास घेताना किंवा खोकताना ताठ बसून रहावे लागते. ढेकर आल्याने, उजव्या कुशीवर निजल्याने, कफ पडल्याने बरे वाटते. तान्हे मूल पिता पिता, श्वास न घेता आल्यामुळे स्तन सोडून रडू लागते. मुलं खांद्यावर टाकून हिंडविल्याने राहतात. वृद्ध इसमाच्या दम्यात या औषधाचा उपयोग न झाल्यास बॅरी-का द्यावे. फुप्फुसे पाण्याने भरतात, त्यांची श्वसनक्रिया नष्ट होते. खोकून खोकून श्वासनलिका रुंद होते. उपजलेल्या मुलांना श्वासोच्छ्वास करता येत नाही. खोकला व जांभया आलटून पालटून येतात. श्वासनलिकेत पान अडकल्यासारखे वाटते. कफ चिकट व दाट असल्यामुळे बाहेर पडावयास त्रास होतो.

हृदय:– भोंवती चिंता वाटून ओकारी होते, कफ व पित्त पडते. धडधड होतात अंग तापते व चैन पडत नाही. नाडी अशक्त, जलद. रक्तवाहिन्यात गारवा वाटतो.

पाठ:– **कंबरेत ठणका लागतो** व तो उचलताना जास्त होतो, हालचाल केल्याने उमासे येऊन घाम येतो. गुदामागील हाडावर ओझे ठेवल्यासारखे वाटून त्याला ओढ लागते. मणके एकमेकावर घासताहेत असे वाटते.

हातपाय – खांद्यापासून बोटापर्यंत डावा हात दुखतो. हात कापतात किंवा अस्वस्थ. पायावर जलयुक्त सूज येते ( नाळगूद ). बसल्यावर पाय बधिर होतात. झोपेत व जुलाब होताना हातपायाना आचके बसतात. बोटे गार, निर्जीव. चालताना पोटऱ्याना ओढ लागते.

झोप:– अनेक विकारात **जांभया** येतात; **गुंगी येते**; किंवा ***गाढ झोप लागते.*** झोपेत कंप सुटतो. झोप लागते आहे तोच विजेचे धक्के बसल्यासारखे वाटते हातपाय पोटाशी घेऊन निजणे, पाठीवर, डावा हात डोक्याखाली घेऊन निजणे, झोपेत डोळे सताड उघडे ठेवून किंचाळणे व त्यावेळेस अंगाला कंप सुटतो.

घाम:– *भरपूर गार व चिकट.* त्वचा गार. घाम आल्यानंतर अत्यंत अशक्तपणा वाटतो.

**ज्वर**:– अंग इतके तापते की अंथरुण नकोसे वाटते. सर्वांगाला शहारे येऊन कंप सुटतो. अंग कढत झाल्यासारखे वाटते. हृदयातून. उष्णता येते. पाळीच्या अगोदर गार मुंग्या आल्यासारखे वाटते.

**त्वचा**:– देवीसारखे अंगावर वेदनायुक्त फोड येतात. विस्फोटक ज्वरात उगवण चांगली न झाल्यास या औषधाने उगवण बाहेर येते. फोड बरे झाल्यानंतर निळसर लाल डाग पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो**:– उष्णता-खोलीची, पांघरुणाची, हवेची. रागामुळे. निजण्याने; सकाळी; अतिखाण्याने; गारवा; दमटपणा; दाबल्याने. बसले असता उठताना. खाली ताना, हालचाल. आंबट पदार्थ. दूध.

**क मी**:– कफ पडल्याने; उजव्या कुशीवर निजल्याने; हालचालीने. ढेकर आल्याने; ताठ बसल्याने; ओकारी झाल्याने.

**सहाय्यक औषधे**:– इपि; बॅरी–का; ओपि.

**संबंधी औषधे**:– अमो–का; ओपि; कार्बो–व्हेजि; पल्स; लॅके; सल्फ; सेपि.

---

## २६. ॲन्थ्रसिनम Anthracinum

**सर्वसाधारण**:– अत्यंत आग व अत्यंत क्षीणता, विकार दुष्ट ( सेप्टिक ); गळवे; काळीपुळी; निळे काळे भाजल्यासारखे फोड. चरत जाणारे धांवरे. फुगीरपणा. कुजणे; कुजत चरत जाणारे व्रण.

**संबंधी औषधे**:– आर्से; टॅरेन्टु–कु.

---

## २७. ॲम्ब्रा ग्रिजिया Ambra Grisea

**सर्वसाधारण**:– या औषधाचा परिणाम *मज्जातंतू ; मन*; स्त्रीजननेंद्रिये; **एक बाजू** व छाती यावर होतो. **सुकलेले, घाबरट हडकुळे** इसम किंवा मुले. अकाली वृद्धत्व. **शारीरिक कंटाळा** व **क्षीणत्व** पण क्षुल्लक गोष्टी सहन होत नाहीत. **लक्षणे होत असलेल्या जागेत एकदम अदलाबदल** होते. लहान लहान जागी बधिरपणा येतो, किंवा गारवा वाटतो. थरथरणे, हात, बोटे वगैरे. शरीराच्या वरच्या भागात किंवा अवयवात अशक्तपणा वाटून खालच्या भागात किंवा अवयवात कंप उत्पन्न होतो. सर्व शरीर बधिर

किंवा निर्जीव झाले आहे असे वाटते. विशेषतः सकाळी. अंग गार होऊन स्नायू थरथरतात. विकार एका बाजूस उद्भवतात. कंप; लाटा आल्यासारखे वाटणे व सर्व शरीरात ठुसठुस. अतिश्रमाने, कौटुंबिक किंवा धंद्याच्या काळजीने, कुटुंबांतील माणसे एकामागून एक मेल्याने मनाला धक्का बसून झालेले दुष्परिणाम. वृद्धत्व.

**मानसिकः**- आकलनशक्ति मंद. बडबड करणे. उत्तरे मिळण्याच्या अगोदरच अनेक प्रश्न एकामागून एक विचारणे. **लाजाळू**. दुःखकारक गोष्टींची वारंवार आठवण होते. अनेक कल्पना येतात व जातात. वेळ हळु हळु चालला आहे असे वाटते. दुसऱ्यांच्या देखत कोणतीही गोष्ट करता येत नाही. उदासीन, खिन्न. गाणे ऐकल्याने रडू येते. विसरभोळेपणा. वाचलेले समजत नाही. स्वतः बोलण्याने, किंवा दुसऱ्यांचे बोलणे ऐकणे नको वाटते. एकदम विषयांतर करणे. नाचऱ्या, बडबड करणाऱ्या धांदरट मुली. दिवसाचे दिवस बसून रडणे.

**डोकेः**– **घेरी** येते. त्यावेळेस डोके व पोट हलके–अशक्त झाल्यासारखे वाटते. विशेषतः वृद्धपणी. डोक्याच्या मागील भागात लचकल्यासारखे वाटते, व आत कलकलते. नाक शिंकरताना डोके दुखते. मेंदू सैल झाल्यासारखा वाटून ज्याबाजूस निजले असेल त्या बाजूस पडतो आहे असे वाटते.

**डोळेः**– पापण्या जड होतात, जागे असून सुद्धा उघडता येत नाहीत. शिवणकाम करताना डोळ्यापुढे टिपके तरंगतात.

**कानः**- एका कानाने चांगले ऐकू येत नाही, दुसऱ्या कानात आवाज होतात.

**नाकः**– नाकातून रक्त येते; विटाळशेपणी, सकाळी, तोंड धुताना. नाक बंद होते, रात्री, तोंडाने श्वास घ्यावा लागतो जीर्ण सर्दी.

**चेहेराः**– स्नायूना कंप, ओठाना पेटके येतात, ओढ कढत. लाली येते. लांबल्याप्रमाणे. पिवळसर.

**तोंडः**– हिरड्यातून खूप रक्त येते, घाण येते. दूध प्यालानंतर आंबट होते. जिभेखाली गुल्म.

**उदरः**- आत गार झाले असे वाटते. **वात धरतो. दुसऱ्यांच्या देखत लघवीला किंवा शौचास होत नाही**, विशेषतः गरोदरपणी. उदरावर व मांड्याना घाम येतो. गरोदरपणी किंवा बाळंतपणानंतरचा मलावरोध. यकृताच्या जागेत एखाद्या लहान जागी दुखते, दाबल्याने जास्त होते. शौचाबरोबर खूप रक्त जाते.

**जठरः**– खाल्यानंतर अन्न जठरापर्यंत पोचले नाही असे वाटते किंवा खोकला किंवा जांभया येतात. ढेकरा येताना जोराने आंचके आल्याप्रमाणे खोकला येतो. दूध पिल्यानंतर छातीत जळजळते. तहान लागत नाही. मध्य रात्रीनंतर पोट फुगते.

**मूत्रेंद्रियेः**– लघवी गढूळ असते. लघवी होताना लघवीचे काही थोडे थेंब मूत्र-मार्गातून बाहेर येत आहेत असे वाटते. गुदात व मूत्राशयात एकाच वेळी दुखते. डांग्या खोकल्यात लघवीला आंबुस वास येतो.

**पुरुषजननेंद्रियेः**– इंद्रिये प्रक्षोभित होऊन कंड सुटते. अवयव बाहेरून बधिर पण आतून आग होते. वैषयिक इच्छेशिवाय शिश्न ताठते.

**स्त्रीजननेंद्रियेः**– योनिद्वाराला कंड सुटते, ते सुजून हुळहुळे होते. दोन पाळयांच्या मध्ये विटाळ जातो. किंवा क्षुल्लक कारणाने शौचाच्या वेळेस कुंथल्याने, धक्का लागल्याने विटाळ जातो. गर्भाशयाचे विकार निजल्याने जास्त होतात. धुपणीत निळसर श्लेष्मा पडतो, रात्री भरपूर जाते. संभोगाची इच्छा बळावते.

**श्वसनेंद्रियेः**– भावनामुळे खोकला येतो. दुसऱ्यांच्या देखत किंवा गाणे ऐकल्याने, बोलण्याने, मोठ्याने वाचताना जास्त होतो. खोकल्यानंतर ढेकरा येतात. खोकला भुंकल्यासारखा छातीतून खोल येतो. कफ निळसर पांढरा. छातीत गोळा बसल्यासारखे वाटते. दमा चालू असताना ढेकरा येतात. क्षुल्लक कारणाने दमा वाढतो. वृद्ध इसमांना धाप लागते, संभोगानंतर जास्त होते.

**हृदयः**– मोकळ्या हवेत धडधडते. चेहरा फिकट होतो. नाडी चालल्याची जाणीव.

**झोपः**– काळजीमुळे झोप येत नाही उठून बसावे लागते. झोप येईल असे वाटते, पण अंथरुणावर निजल्याबरोबर झोप नाहीशी होते.

**हातपायः**– हाताला–बोटांना पेटके येतात. वस्तू धरताना जास्त होतात. पाय बधिर होतात, चालताना कापतात. नखे ठिसूळ. पाय ( डावा ) विटाळसेपणी निळा होतो; झोपेत हाता-पायांच्या स्नायूंना धक्के बसतात व शरीर गार होते.

**ज्वरः**– थोड्या थोड्या वेळाने उष्ण लहरी येतात. जरा श्रम केले तर घाम येतो, विशेषत उदरावर व मांड्याना.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :**– क्षुद्र कारणांनी. दुसऱ्याच्या देखत, संगीत गाणे; मनःक्षोभ, चिंता. भावनांचा विचार केल्याने. संभाषणाने. अनपेक्षित गोष्टीमुळे. सकाळी. दूध.

**ब वाः**– मोकळ्या हवेत, हळुहळु चालण्याने. दाबल्याने. गार पेयाने.

**संबंधी औषधेः**– इग्ने; पल्स; बॅरी-का; सल्फ; सेपि.

## २८. आयरिस Iris Versicolor

**सर्वसाधारण**:– या औषधाचा परिणाम *गांठी* विशेषतः– **यकृत**; पॅन्क्रीआ लाळेचा, *तोंड ते गुदद्वारापर्यंत* पचनेंद्रिये, उजवी बाजू व मज्जातंतू यावर होतो. कोणत्याही विकारांत स्राव जलद बाहेर येतात. **स्राव आंबट, करवडणारे व** *आग करणारे* असतात. **तेलकट-नाक-चव-शौच** वगैरे. पित्तप्रकृति.

**मानसिक** :– खिन्नता. लवकरच काहीतरी दुखणे येणार अशी भीति.

**डोके** :– दुखत असताना जुलाब होतात. डोकेदुखी सुरू होण्याच्या अगोदर दृष्टि अंधुक होते नंतर ओकाऱ्या येतात व मग डोके दुखावयास लागते. **दृष्टीचे उपद्रव. अर्धशिशी** सुरू होण्याचे अगोदर अंधारी येणे, वस्तूचा अर्धा भाग दिसणे वगैरे. थकल्यासारखे वाटून डोके दुखते, खोकताना, गार वाऱ्याने जास्त होते, हळुहळु चालण्याने बरे वाटते.

**जीभ** :– गार झाली आहे असे वाटते. **चव गोड**. जीभ भाजल्यासारखी वाटते.

**तोंड**:– भाजल्यासारखे वाटते. तेलकट आहे असे वाटते. **भरपूर चिकट लाळ येते.**

**घसा**:– आग होऊन चुणचुणते. घशापासून जठरापर्यंत आग होते. गार पाणी पाल्याने किंवा गार वोर आंत घेतल्याने बरे वाटते.

**जठर**:– आंबट कडवट ढेकरा. सारखी **मळमळ, कडू-करवडणारी ओकारी**. ओकारी होताना शौचास जावेसे वाटते व भरपूर लघवीला होते. ही लक्षणे डोके दुखावयास लागण्याचे अगोदर बरेच वेळा सुरू होतात. ***पित्ताच्या-पाण्यासारख्या आंबट*** किंवा ***करवडणाऱ्या ओकाऱ्या होतात*** **व** त्यामुळे घशाची ***आग*** होते. असे मधून मधून एक महिन्याने किंवा ६ आठवड्यानी होते व ते २।३ दिवस टिकते. आग तोंडापासून गुदद्वारापर्यंत होते. गार पाणी पिण्याने बरे वाटत नाही. यकृत हुळहुळे होते ***पिवळे करवडणारे, पाण्यासारखे जुलाब होतात. गुदद्वाराची विस्तवा-प्रमाणे आग होते*** **वेदनारहित जुलाब होतात**. डोक्यात, चेहऱ्यात, दातात वेदना होताना शौचाला होईल होईल असे वाटते.

**मूत्रेंद्रिये**:– मधुमेह. लघवी स्वच्छ व भरपूर होते. व त्यावेळेस डोके दुखते. लघवी होताना मूत्रमार्गात आग होते.

**गळा**:– गलगंड.

**पायः**– कंबरेच्या सांध्याचा भाग पिरगळल्यासारखा वाटतो. एकदम पायाला कळा लागून लंगडत चालावे लागते. गृध्रसीवात ( सायाटिका ) डावापाय.

**त्वचाः**– वेदनायुक्त पुटकुळया ( नागीण ) व त्यावेळेस जठर बिघडते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :**– **नियमित वेळी;** दर आठवड्या... पहाटे २–३ वाजता; मध्यरात्रीनंतर. वसंत ऋतूत. **मानसिक शीण. उष्ण हवा.**

**ब वा :**– हळु हळु चालण्याने.

**संबंधी औषधेः**– आर्से; फास्फ; मर्क्यु.

---

## २९. आयोडिअम Iodium

**सर्वसाधारणः**– या औषधाचा परिणाम *गांठी*– गळयाच्या *गलगंड*, अंड, आंतडयावरील गांठी; स्तन; *श्लेष्मल त्वचा–श्वासनालिकेची* फुफ्फुसांची *हृदय*; रक्तवाहिन्या; त्वचा, मज्जातंतू यावर होतो. **विकाराचे स्वरूप तीव्र असून त्यांची वाढ जलद होते.** अंग कढत झाले आहे असे वाटून *उष्णता सहन होत नाही*. **कढत–करवडणारे पाण्यासारखे स्राव.** स्राव सारखे वाहतात किंवा खारट असतात. ***गांठी सुजून मोठ्या, टणक*** व जड होतात, किंवा त्यानंतर वाळावयास लागतात. चांगली भूक असूनसुद्धा अन्न अंगी न लागल्यामुळे **शरीर वाळते व अशक्तपणा येतो.** बोलवत नाही. थोड्या श्रमाने घाम येतो. जुने विकारांचे स्वरूप कधी काळी एकदम तीव्र होते. ठिकठिकाणी स्राव साखळतात किंवा ठुसठुसते. सर्व शरिरात ठुसठुसते. कंड, अंतर्गत-रक्तस्राव, कंप, सांधे वेडेवाकडे होतात. अवयवांची अवास्तव वाढ किंवा झीज. पू थोडा. मानसिक धक्का; प्रेमभंग यामुळे उद्भवलेले विकार. गाठी मोठ्या होतात पण शरीर वाळते; कोणत्याही विकारात खाल्यानंतर बरे वाटते.

**मानसिकः**– **खिन्न** किंवा **अत्यंत** *चिडखोर, तिरसट* आणि *अस्वस्थ*. **मन क्षुब्ध.** एकदम धावण्याची प्रवृत्ति किंवा काहीतरी अघोर गोष्टी करण्याची प्रेरणा होते. मन गुंतविल्याने बरे असत परतु हालचाल केल्याने थकवा येतो. आपण चांगले बरे आहोत अशी समजूत लोकांची किंवा वैद्य डॉक्टराचा, भीता वाटते व त्यांना टाळण्याची प्रवृत्ति. कोणालातरी ठार मारावेसे वाटते किंवा स्वतः मरावेसे वाटते. कारणाशिवाय काहीतरी विचित्र गोष्टी

करण्याची प्रेरणा. अमूक एखादी गोष्ट का केली याचा स्वतःलाच उमज पडत नाही. विसरभोळेपणा. काय बोलावयाचे किंवा करावयाचे आहे याचा विसर पडतो.

**डोके**:– घट्ट बांधल्यासारखे वाटते. ठुसठुसते. घेरी– वाकल्याने जास्त होते. डोक्यात आवाज होतात, मेंदू चमच्याने ढवळल्यासारखा वाटतो.

**डोळे**:– बटबटीत, पुढे आलेले. आंचके आल्याप्रमाणे हालतात किंवा थरथरतात.

**नाक**:– सर्दी– नाकातून कढत भरपूर पाणी येते व अंग तापते. नाकाच्या बुंध्याशी व बाजूच्या हाडातील पोकळयात दुखते. मोकळया हवेत जास्त होते. नाक सुजते व लाल होते. खूप शिंका येतात.

**चेहरा**:– केविलवाणा, सुकलेला, **पिंगटसर**; मळकट धुरकट. गार विशेषतः लठ्ठ मुलांचा.

**तोंड**:– घाण येते. लाळ दुर्गंधी साबणाच्या फेसाप्रमाणे.

**जीभ**.– चव तांब्याच्या धातु प्रमाणे, जीभ, कोरडी, पिंगट, वर जाड थर.

**उदर**:– फेंसाळ; ताकाच्या निवळीप्रमाणे; तेलकट दह्यासारखे पांढरे शौचास होते. मलावरोध. गार दूध पिण्याने बरे वाटते. खाण्यानंतर शौचास जावे लागते. यकृत व पांथरी मोठी होऊन दुखते. लहान मुलांची जीर्ण, सकाळची हगवण.

**जठर**:– **खाखा–पण अंगी लागत नाही. भूक छांदिष्टपणाची**. तहान लागते. खाल्ले नाहीतर काळजी वाटते, बेचैनपणा येतो. गार दूध पिण्याने शौचास साफ होते. अन्नाला कडु चव लागते, पण पेयाना लागत नाही.

**मूत्रेंद्रिये**:- लघवीला भरपूर होते. लघवी काळी, पिवळसर हिरवट, वर तवंग येतो. खाली मिरच्याच्या भुकटीप्रमाणे गाळ साचतो.

**पुरुषजननेंद्रिये**:– अंडाचे गुल्म, अंड वाळते. संभोगेच्छा कमी होते. अंडाभोवती पाणी साचते. हैड्रोसील; वृषणवृद्धि. नपुंसकत्व. वीर्यवाहिनी नलिकेत पिरगळल्यासारख्या वेदना होतात.

**स्त्रीजननेंद्रिये**:– विटाळ पिंगट, विटाळसेपणी अत्यंत थकवा येतो. रजःपिंड ते गर्भाशयापर्यंत पाचर मारल्याप्रमाणे दुखते. रजःपिंडाची सूज, गुल्म. विटाळ शौचास होताना जातो. धुपणी करवडणारी त्यामुळे मांड्या करवडतात व वस्त्र फाटते. स्तन वाळतात, जड होतात. शौचानंतर विटाळ जातो. स्तनांत गांठी होऊन त्यावर काळे ठिपके पडतात. स्तन जड होतात व खाली गळून पडतील की काय असे वाटते. स्तनात गाठी होऊन त्यावर काळे ठिपके पडतात.

**श्वसनेंद्रिये :– आवाज बसतो, बोलताना कंठ दुखतो, गुदमरल्यासारखे वाटते.** कंठ धरावासा वाटतो विशेषतः खोकताना. घटसर्प. श्वासनलिकेच्या आकाराचा कफ पडतो. आवाज कर्कश. न्युमोनिआ, सूज जलद वाढत जाते. क्षय–कृश व झपाट्याने वाढ होणाऱ्या तरुणांचा. छातीत गुदगुल्या होऊन कोरडा खोकला येतो व त्यावेळेस गुदमरल्यासारखे होते.

**हृदय :–** मुठीत धरून आवळल्यासारखे वाटते व त्यानंतर थकवा वाटतो किंवा मूर्च्छा येते. थोड्या श्रमाने धडधडते; नाडी अतिशय जलद चालते, भोवती गुदमरल्यासारखे किंवा फडफडल्यासारखे वाटते.

**गळा :– गलगंड टणक**, व ते आवळल्यासारखे वाटते.

**मान :–** जाड होते, बोलताना सुजल्यासारखी दिसते.

**पाय :–** पावलाच्या वरच्या भागावर घाम येतो. सांध्याचे जीर्ण विकार, ते ताठतात व सुजून मोठे होतात. पाऊले व पंजे गार. पाउलावर सूज येते.

**झोप :–** रक्तात खळबळ चालली आहे असे वाटून झोप येत नाही.

**ज्वर :– अतिज्वर,** किंवा बाह्यांग गार होऊन काळजी वाटते, व **गुंगी येते.** उष्ण लाटा डोक्यापर्यंत जातात. क्षयी ज्वर. घाम लवकर येतो. पहाटे घाम आल्याने बरे वाटते.

**त्वचा :–** कोरडी, खरखरीत, मळकट. **पिंगट** डाग पडतात. जुन्या व्रणावर कंड सुटते व पुटकुळ्या येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** *उष्णता–खोलीची*; **हवेची**; पांघरुणाची. श्रम–चढण्याचे, बोलण्याचे. उपाशी राहिल्याने; रात्री; विश्रांतीने. स्पर्श, दाबल्याने.

**ब वा :– थंड– पाण्याची आंघोळ– *हवा*.** हालचालीने, खाण्याने, बसल्याने.

**सहाय्यक औषधे :–** लायको; सिलि.

**संबंधी औषधे :–** आर्से; फास्फ; **फ्लुओ–असि; स्पांजि.**

---

## ३०. आरम मेटॅलिकम ( सोने ) Aurum Metallicum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *मन*; मज्जातंतू; *रुधिराभिसरण* ( अशुद्ध रक्तवाहिन्याचे ) **हृदय; हाडे–*नाकाची*–** कवटीची, गुडघ्याची वाटी. सांधे; **गांठी**; यकृत; मूत्रपिंड यावर होतो. ठिकठिकाणी शिरांत

**रक्त साखळते; खळबळ चालल्यासारखी वाटते.** डोके व छातीत रक्त चढल्यासारखे वाटते. सर्व शरीरात रक्तवाहिन्यांची ठुसठुस चालू असल्या-मुळे अंग तापते व क्षुब्धता येते. **अशक्तपणा** पण वेदना सहन होत नाहीत. **वेदना इतस्ततः भटकतात** त्यामुळे हालचाल करणे भाग पडते, वेदना शेवटी हृदयांत स्थिर होतात. टणकपणा-गाठीचा, हृदयाला रक्त पुरविणाऱ्या नाड्यांचा. हाडे कुजतात. हाडावर हाड वाढते. हाडात उकरल्या-कापल्याप्रमाणे वेदना होतात. जीर्ण विकार. गरमी व त्यावर पाऱ्यासारखी औषधे घेऊन झालेले दुष्परिणाम. झुरणारी मुले; व वयात येणाऱ्या मुलींचे विकार. वृद्ध इसम. दुःख, शोक, प्रेमभंग, भीती, राग, विरोध, असंतोषाची कुचंबणा, दीर्घ काळ राहिलेली चिंता. मालमत्तेचा नाश, न झेपणारी जबाबदारी या कारणाने उद्भवलेले विकार. कोठेतरी वारे लागत आहे असे वाटते. रक्तदाब वाढतो. कॅन्सरचे व्रण.

**मानसिक :-** **अत्यंत निराशामय खिन्नता. खिन्नतेने विचार करीत बसणे,** नंतर चिडखोरपणा. स्वतःला दोष देऊन प्रार्थना करणे. **आत्महत्येच्या विचाराने मानसिक यातना होतात,** जगण्याचा कंटाळा येतो. मरणाची इच्छा आपण निरुपयोगी असून जगात राहण्यास अयोग्य आहोत असे वाटते. भविष्यकाळ भयाण वाटतो. काहीतरी भयंकर घडेल अशी भीती वाटते. माणसांची भीती वाटते. विरोध बिलकुल सहन होत नाही बडबड, उत्तराची वाट न पहाता एकामागून एक प्रश्न विचारणे. आलटून पालटून रडणे व हसणे. स्मरणशक्ती मंद. आवाजाची भीती वाटते. हृदयविकारात निराश, फुप्फुसाचे विकारात आशावादी. हिस्टेरिआत आततायी कृत्य करण्याची प्रवृत्ती. आपण करतो ती प्रत्येक कृती चुकीची आहे असे वाटते.

**डोके :** भणभणून भयंकर वेदना होतात. डोक्याला वारे लागत आहे असे वाटते. डोके तापले असले तरी गुंडाळून घ्यावेसे वाटते. कवटीवर हाड वाढते, गरमीमुळे पडलेले टक्कल स्पर्श सहन होत नाही विद्यार्थ्यांची डोकेदुखी त्यावेळेस हृदयाजवळ चिंता वाटून, डोके भरल्यासारखे वाटून तापते. कानडवर गळवे येतात. कवटीचे हाड वाढून त्यात उकरल्या-सारख्या वेदना होतात. कानडाखाली गोळे येतात. पिवळ्या, चंद्रकोरीप्रमाणे वस्तु डोळ्यापुढे तिरकस तरगत आहेत असे वाटते

**डोळे :-** ठिणग्या-ज्वाळा दिसतात. डोळे बाहेर येत आहेत असे वाटते. वस्तू एकाच्या दोन दिसतात. वस्तूंचा वरचा अर्धा भाग दिसतो. खुपतात. पुढे येतात.

बाहुल्या वेड्यावाकड्या रुंद होतात. चांदण्यात बरे वाटते. काचबिंदु, डोळ्याभोवतालचे हाडाचे वर्तुळ दुखते.

**कान** :– मागील हाडाचा उंचवटा कुजतो. दीर्घकाळ कानातून दुर्गंधी पू येतो. आवाज सहन होत नाही पण संगीताने बरे वाटते.

**नाक** :– चोंदते–सुजते–आत व्रण पडून दुखते. दुर्गंधी स्राव येतो. पिनस, गरमीमुळे झालेला. शेंबूड दाट–अंड्यातील बलकाप्रमाणे. बोंडा लाल व बटणाप्रमाणे किंवा खरखरीत. नाक बसके.

**तोंड** :– वयात येणाऱ्या मुलींच्या तोंडाला घाण येते. टाळूत व्रण पडतात. दात कुजतात. कुथासारखी, गोडसर चव. जिभेवर चामखिळी.

**चेहरा** :– फुगीर लाल–निळसर, ओठ निळे, नाकाभोवती निळा. चालताना हाडातून उकरल्यासारख्या वेदना होतात. गालाचे हाडाचे उंचवटे दुखतात. कपाळावर, ओठावर बारीक दाणेदार पुरळ येते.

**उदर** :– यकृताचा भाग हुळहुळा. यकृताची सूज ( शोथ ). गरोदरपणी कावीळ होते. यकृताच्या विकाराबरोबर हृदयाचे विकार होतात. जलोदर. जुलाब फक्त रात्रीच होतात. गुदद्वारात आग होते. गुदद्वाराभोवती मांसांकुर उगवतात. यकृत मोठे व टणक होते. मलावरोध, शौचास गांठयाळ, टणक व मोठ्या प्रमाणात होते, बिटाळसेपणी कमी होतो. लहान मुलांचा अंतर्गळ.

**जठर** :– तहान लागते, खा खा सुटते. पोटात आग होऊन कढत ढेकरा येतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी ताकासारखी. मूत्राघात. मूत्राशयात लघवी तुंबते व दुखते.

**पुरुषजननेंद्रिये** :– अंड सुजतात व दुखतात. मुलांचे बाळावयास लागतात. अंडाभोवती पाणी साचते. गरमीमुळे पडलेले व्रण. अंड, मोठे, टणक.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळी उशीरा विटाळ अगदी थोडा किंवा बंद. गर्भाशय टणक होऊन बाहेर येतो. बारंवार बाळंत झाल्यामुळे गर्भाशय सुजून त्यात व्रण पडतात व तो टणक होतो. वंध्यात्व, गरमीमुळे उद्भवलेले. संभोगाचे वेळी योनिसंकोच. आपल्याला मूल होणार नाही, म्हणून खिन्न असलेल्या स्त्रियांचे स्तनात गाठी येतात. पोकळ गुल्मे. योनिद्वारातून सारखा स्राव वाहतो. गर्भाशयाचे विकार हात उंच व लांब केल्याने जास्त होतात.

**श्वसनेंद्रिये** :– दमा (हृदयाचा) हंसताना, चढताना जास्त होतो. छातीच्या मध्यभागी ओझ्यानी दाबल्यासारखे वाटते. सारखा दीर्घ श्वास घ्यावासा वाटतो पण तो पुरेसा वाटत नाही.

**हृदय** :– कोंडल्यासारखे वाटते. थांबत आहे असे वाटून नंतर जोराने धक्का बसतो. **भयंकर धडधड.** वयात येणाऱ्या मुलामुलींची नाडी अशक्त, जलद-अनियमित होते. रक्तदाब वाढतो. हृद्रोग. चालताना हृदय सैल झाले आहे असे वाटते.

**पाठ** :– कण्याच्या खालच्या भागाची मागे कमान झाली आहे असे वाटते. मणके कुजतात. टी. बी. मानेतील गाठी मोठ्या होतात. कमरेचे स्नायू ताठून दुखतात, मांडी वर करता येत नाही.

**हातपाय** :– सांधे आलटून पालटून दुखतात, सूज येते, वेदना रात्री जास्त होतात. छातीत धडधड होताना डावा हात धरून ठेवावा लागतो.

**झोप** :– झोपेत मोठ्याने हुंदके देणे. झोप अस्वस्थ, चिंतायुक्त भयप्रद स्वप्ने पडतात.

**ज्वर** :– गारवा सहन होत नाही. अंग दमट व गार, जननेंद्रियाना घाम येतो. अंथरुणात हुडहुडी भरते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– भावनामुळे;** खिन्नता, **मानसिक श्रम. थंडी. रात्री-**सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत. हिवाळा. आभाळ आलेली हवा. दारू.

**ब वा** :– मोकळी हवा, **गार पाण्याचे स्नान.** चालताना. ऊब आल्याने. चांदण्यात. गाणे.

**संबंधी औषधे** :– अको; कॅल्क-का; नाय-ॲसि; पल्स; र्‍हस-टा; लायको; सल्फ; सिफि; सिंको; सेपि.

---

## ३१. आरम मूरिआटिकम Aurum Muriaticum

**सर्वसाधारण** :– बहुतेक लक्षणे आरम-मे प्रमाणे. जीभ व जननेंद्रियावरती चामखिळी सारखी उगवण. जीभ कातड्याप्रमाणे. कॅन्सर. कंटाळवाणे वाटते, कामाचा कंटाळा, हृदयाचे विकार. गाठीचे विकार. धुपणी–करवडणारी–आग करणारी. विटाळ थांबण्याच्या वयात होणारा रक्तस्राव. एकटेच असले म्हणजे स्वतःच्या विकारासंबंधीच विचार केल्यामुळे चिडखोरपणा येतो. म्हणून कोणीतरी जवळ असावे असे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– जिने चढताना,** उष्णता.

**ब वा** :– गार हवा, गार पाण्यानी धुतल्याने.

---

## ३२. आरम ट्रायफायलम Aurum Triphyllum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम तोंड, घसा, कंठ, मूत्रपिंड, मेंदू, रक्त व त्वचा यावर होतो. *स्पर्श सहन न होण्याइतका हुळहुळेपणा. आग. चुणचुण. करवडणारे स्राव. गाठी सुजतात.* मुलांची भूक नाहीशी होते, त्याना खेळावेसे वाटत नाही, वाळू लागतात, व डोके दुखते.

**मानसिक** :– अत्यंत चिडखोर व हट्टी. *घाबरटपणा.* मूल **रक्त येईतोपर्यंत किंवा हुळहुळे होईतोपर्यंत** *नाकात बोटे घालते* किंवा ओठ, बोटांची टोके किंवा एखादी जागा कुरतडते.

**डोके** :– उशीत खुपसावेसे वाटते ( मेंदूच्या विकारात). कढत कॉफी पिण्याने किंवा गरम कपडे घातल्याने डोके दुखावयास लागते.

**डोळे** :- (डावी) वरची पापणी लवलवते.

**नाक** :– चोंदते. तोंडाने श्वासोच्छ्वास घ्यावा लागतो. चोंदत असले तरी नाकातून पाणी येते. **सर्दी**-नाकातून **भरपूर, करवडणारे** पाणी येते त्यामुळे ओठ वगैरे लाल व हुळहुळे होतात.

**तोंड** :– येते, हुळहुळे व सोलवटल्यासारखे; ओठ कोरडे, ओठाचे कोपरे भेगा पडून सोलवटतात. टाळा हुळहुळा.

**घसा** :– हुळहुळा व सोलवटलेला. **खाकरताना** किंवा खोकताना **वेदना होतात,** तरी पण खाजवावासा व **दाबावासा** वाटतो.

**उदर** :– पिठल्यासारखे पातळ शौचास होते (टायफाईड सारख्या तापात). पातळ शौचास होऊन गुदद्वाराची आग होते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थोडी होते किंवा अजिबात बंद होते.

**श्वसनेंद्रिय** :– **आवाज; घोगरा,** बसतो, चिरचिरा किंवा फुटतो.

**हातपाय** :– बोटे (हातापायांची) खाजतात.

**त्वचा** :– उगवणीनंतर लालभडक डाग पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– आवाजाचा दुरुपयोग-*बोलणे*; गाणे, थंडी; दमट वारे. उष्णता.

**सहाय्यक औषधे** :– नाय–ॲसि.

**संबंधी औषधे** :– आर्से; मर्क्यु–कॉ.

---

## ३३. आर्जेन्टम नायट्रिकम Argentum Nitricum

**सर्वसाधारण** :- या औषधाचा परिणाम ***मनः मज्जातंतू; मेंदू व मज्जारज्जु श्लेष्मल त्वचा*-जठराची-आतड्याची-डोळयाची-**घसा, मूत्रमार्ग; हाडा वरील आवरण; त्वचा व **डावी बाजू** यावर होतो **म्हाताऱ्यासारखे, सुकलेले;** अशक्त इसम. **कंप.** शरीर उत्तरोत्तर वाळत जाते. **लुले लटके पडणे** खालून वर. शरीराचे **भाग किंवा अवयव *मोठे झाले आहेत* किंवा बांधले आहेत असे वाटणे. *वेदना तीव्र- काटा, काचेचा तुकडा आत खोल रुतून बसल्याप्रमाणे* किंवा विजेचे धक्के बसल्याप्रमाण होतात. वेदना एकदम सुरू** होऊन एकदम नाहीशा होतात; विशेषतः पाठीच्या खालच्या भागात व पायात. वेदनामुळे दचकावयास होते. वेदना **उकरल्याप्रमाणे** होतात किंवा पसरत जातात. व्रण-पुष्कळ पिवळा रक्तमिश्रित पू येतो. जलोदर; नाळगुद घास्ती-भीती, खाण्या-पिण्यात-वागण्यात अनियमितपणा, काळजी, मानसिक ताण, मुष्टिमैथुन किंवा संभोगातिरेक, बर्फ घातलेले पदार्थ या कारणामुळे उद्भवलेले विकार. बधिरपणा. फेफरे विटाळसेपणी किंवा घास्ती भीतीमुळे किंवा रात्री. फेफरे येण्याचे अगोदर एक दोन दिवस बाहुल्या विस्तारतात, नंतर अस्वस्थपणा वाटून पंजाना कंप सुटतो. मधुन मधुन शरीराला कंप सुटतो. हालचाल करता येत नाही. पंगुवात. डोक्यापासून खालपर्यंत गळून गेल्यासारखे वाटते. मानसिक व पचनेंद्रियाचे विकार बरोबरच सुरू होतात. एकदम चिमटा घेतल्यासारखे वाटते. डोळे मिटून चालता येत नाही. डावीकडे लक्षणे उद्भवतात. धंदेवाईक व्यापारी, विद्यार्थी यांचा मेंदूचा शीण, परीक्षेची भीति वाटते. **कचरणे ( आडखळणे )-बोलताना**-चालताना; शिश्नाचे संभोग करताना.

**मानसिकः**- विलक्षण कल्पना किंवा भावना मनात उद्भवतात, त्यामुळे मन त्रस्त होते. **घाबरटपणा. मनात येईल ते करण्याची प्रवृत्ति. उतावळा.** स्वतःला वाटणाऱ्या **कठीण प्रसंगाची**, एखादी विशिष्ट जागा ओलांडण्याची, अंधाराची, काहीतरी वाईट घडून येईल अशी भीती वाटते. उंच इमारतीकडे बघवत नाही. स्मरणशक्ती मंद. वेळ सावकाश चालला आहे असे वाटते. आपल्या कुटुंबीय माणसाकडून स्वतःचा तिरस्कार होत आहे असे वाटते. महत्वाकांक्षेचा अभाव. हाती घेतलेल्या कामात यश मिळणार नाही अशी भावना. खिडकीतून किंवा पूल ओलांडताना खाली उडी मारावीशी वाटते. असंबद्ध, मूर्खपणाची कृत्ये करण्याची प्रवृत्ति. वेळ थोडा उरला आहे असे वाटून सर्व गोष्टी उतावीळपणाने करणे.

**डोके**:– आत खोल दुखते–दाबल्यासारखे वाटते. **घेरी**–उंच इमारतीकडे किंवा उंचावरून खाली बघण्याने, फेफरे येण्याच्या अगोदर किंवा रात्री येते. कपाळात डाव्या बाजूस उकरल्यासारखे दुखते, ११-१२ वाजता सकाळी जास्त. अर्धशिशी डोके दुखत असताना अंग गार होते व कापते. घट्ट बांधल्याने, दाबल्याने बरे वाटते. डोके दुखण्याचा शेवट ओकारीत होतो. कवटीची हाडे वेगळी झाली आहेत असे वाटते.

**डोळे**:– आतील कोपरे सुजतात व लाल होतात. डोळे लाल होतात–येतात, खूप पू येतो. उजेड सहन होत नाही. बाहुल्या रुंद होतात. शिवताना डोळ्यांना ताण पडतो. खुपऱ्या, सारा, फूल पडते. डोळ्याच्या लक्षणाबरोबर उदराची लक्षणे होतात.

**कान** :– घेरी येताना कानात गुणगुण आवाज होतात. घंटानादासारखे आवाज होऊन बहिरेपणा.

**नाक** :– वास कळत नाही, अतिशय खाजते. सर्दी झाली की डोळ्यातून पाणी येते अंगावर शहारे येतात व डोके दुखते.

**चेहरा** :– आजाऱ्यासारखा–मातट, फिकट. डोळ्याखालच्या भागात भयंकर दुखते व त्या वेळेस तोंड आंबट होते. बोलताना ओठ कापतात-ओठ निळे.

**तोंड** :– जिभेचे टोक लाल होऊन दुखते. कडा लाल–होतात. तुरट आंबट, किंवा कडू चव. चावताना, गार पदार्थाने आंबट पदार्थाने दात दुखतात.

**घसा** :– अन्न घशात अडकते. दाट कफ साचतो. घसा वारंवार खाकरावा लागतो. हुळहुळा. गिळताना, श्वास घेताना किंवा मान हलविताना काटे टोचल्या-प्रमाणे वाटते–गार पेये प्याल्याने बरे वाटते. तंबाखू ओढणाऱ्याच्या घशात केस अडकला आहे असे वाटते.

**उदर** :– *वात धरतो* त्याने उदर **फुटेल** असे वाटते. **मोठमोठ्या जोराच्या ढेकरा येतात.** वात खालीवर सरकत राहतो. **जुलाब होताना वारा सरून आवाज होतो. भावना किंवा भीतीमुळे हगवण** लागते. शौचात आमाचे **( कफाचे ) चिंध्याप्रमाणे तुकडे पडतात.** शौच झाल्यानंतर हिरवे होते. खाण्यापिण्यानंतर तावडतोब शौचास जावे लागते. शौच हिरवे गवतासारखे. अंगावर तोडल्यानंतर मुलाना हगवण लागते. पेये पितापिताच शौचास होते साखर खाऊन झालेली हगवण.

**जठर** :– **गोड पदार्थ, साखर खाण्याची वासना** पण ती मानवत नाही. तुरट आंबट किंवा कडु–आंबट चव व ओकाऱ्या. ढेकरांबरोबर अन्न बाहेर येते. पोटाची खळी फुगून दुखते. आत कुरतडल्यासारख्या वेदना होतात. जठरातील व्रण–वेदना दूरवर पसरतात. खाण्यानंतर मळमळते. ओकारी पिंगट काफीच्या बुकटीप्रमाणे होते. ढेकर वर येऊन दाबल्यासारखे वाटून अन्ननलिका बंद झाल्यासारखी वाटते. जठरात ठुसठुसते, कंप उत्पन्न होतो.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्रपिंड ते मूत्राशयापर्यंत भयंकर कळा येतात. स्पर्शाने, हालचालीने, दीर्घ श्वसनाने जास्त होतात. अंड वर उचललेले. मूत्रमार्गात कापल्यासारखे वाटते. शिश्न दुखून ताठते. लघवी होताना कळत नाही. परमा–पिवळा रक्तमिश्रित स्राव. लघवीची धार दुभंगलेली.

**पुरुषजननेंद्रिये** :– नपुंसकत्व. संभोगाचे वेळी शिश्न ताठले असले तरी त्याचा उपयोग होत नाही– मूत्रमार्ग ताणल्यासारखा वाटून दुखते,

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळशी होण्याच्या अगोदर जठरात दुखावयास लागते, छातीच्या स्नायूंना आंचके बसतात. विटाळ थोडा व त्या वेळेस दमा होतो. गर्भाशयात व्रण पडतात. धुपणी पुष्कळ पिंवळी व करवडणारी व त्यातून आतील व्रणामुळे वारंवार रक्त येते. संभोगाचे वेळी दुखते, नंतर रक्त येते. रक्तप्रदर–विटाळ थांबण्याच्या वयात, तरुण विधवांचा किंवा ज्या स्त्रियांना मुले झाली नाहीत अशा स्त्रियांचा. रजःपिंडात दुखते, ते मोठे झाल्यासारखे वाटतात. बाळंतपणानंतर लवकर मुले मरतात.

**श्वसनेंद्रिये** :– हसताना किंवा आवाज चढविल्याने खोकला येतो. घशात केस अडकला आहे असे वाटून खोकला येतो. भावनामुळे उत्पन्न झालेला दमा, खोलीत गर्दी झाल्याने जास्त होतो. छातीच्या स्नायूंना आंचके बसतात. दमा वात धरल्यामुळे होतो व त्या वेळेस जठरात दुखते. गवयांच्या श्वासनलिकेचा जीर्ण शोथ, व त्यामुळे घसा बसणे. खोकला खाली वाकल्याने, तंबाखु ओढल्याने, जिना चढताना जास्त होतो. छातीमधील हाडावर जड दगड ठेवल्यासारखे वाटते.

**हृदय** :– उजव्या कुशीवर निजल्याने धडधडावयास लागते, व मळमळते. हृद्रोग भयंकर कळा येतात, रात्री जास्त. **मोकळ्या हवेत** बरे वाटते. हृदयात भरल्यासारखे वाटून बेचैन वाटते. धडधड होताना काळजी वाटते व सर्व शरीरात ठुसठुसते.

**पाठ :–** कणा अशक्त व त्यात ठुसठुसते. कंबर बसल्याजागेवरून उठताना दुखते, उभे राहिल्याने किंवा चालण्याने बरे वाटते. मानेतील गाठी टणक होतात.

**हातपाय :–** कांपतात– दुखतात. पोटऱ्या शिणल्या, **ताठल्यासारख्या** वाटतात. किंवा त्या पिरगळल्या सारख्या वाटतात. डोळे मिटून चालता येत नाही किंवा स्वस्थ उभे राहता येत नाही. चालताना अडखळणे, विशेषतः कोणी बघत नसताना. लिहिताना पंजे कापतात, हाताच्या बोटांची टोके, करंगळ्या व त्या शेजारची बोटे बधिर होतात. हाताची बोटे अर्धवट मिटलेली, दूर करता येत नाहीत. गुदास्थीत वजन लोंबकळत आहे असे वाटते. आंचके बसताना पाय वर उचलले जातात व हात वर व बाजूला फेकले जातात. पायावर सूज.

**ज्वर :–** आतड्यात थंडी वाजून शहारे येतात व ते पाठीत जातात. उघडे असल्याने थंडी वाजते, पण पांघरूण घेतल्याने गुदमरल्यासारखे वाटते. थंडी वाजताना मळमळते.

**झोपः–** संभोगाची, मेलेल्या मित्रांची किंवा सापांची स्वप्ने पडतात.

**त्वचाः–** व्रण–लाल खोल कळा टणक. पुरळ. चिकट खपल्या.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः–** *भावनामुळे-काळजी* किंवा संदेह. **खोलीत.** बंद जागेत. **साखरेने. उजव्या कुशीवर निजल्याने.** दारू. गर्दीत. विटाळ-सेपणी. उष्णता ( कोणत्याही स्वरूपाची ) गार अन्न किंवा रात्री. मलावरोध. आईसक्रीम, खाली पाहताना.

**ब वाः–** ***थंड हवा,*** आंघोळ. मोकळी हवा. जोराने दाबल्याने. हालचालीने.

**सहाय्यक औषधेः–** कॅल्क–का; नेट्र–मू; पल्स; सेपि.

**संबंधी औषधेः–** कलि–का; ब्रायो; मर्क्यु; व्हेरा–आ; सिलि; सेपि; स्पांजि; स्पायजे.

---

## ३४. आर्जेंटम मेटॅलिकम ( चांदी ) Argentum Metallicum

**सर्वसाधारणः–** या औषधाचा परिणाम *मज्जातंतू* : श्लेष्मल त्वचा; *श्वास-नलिका;* कंठ, हाडे; हाडांचे उंचवटे; सांधे; मूत्रेंद्रिये व जननेंद्रिये; डावे रजःपिंड व उजवे अंड यावर होतो. खोल–मुरलेले हळुहळु वाढणारे विकार. नाकाच्या कानाच्या पाळया, पापण्याच्या कडा, सांध्याचे स्नायुबंध, हाडे वगैरे जाड होतात. स्राव **दाट** असतात. **श्लेष्मल स्राव** ( कफ ) **चिकट**

पांडुरके. ( राखेच्या रंगाचे ) धंदेवाईक-बौद्धिक श्रम करणारे-विद्यार्थी याना आलेला मानसिक शीण. शक्तिपात-मानसिक-हाता-पायांचा. अवयव मोठे झाले आहेत असे वाटते. पेटके; ताठपणा; बधिरपणा. विजेचे धक्के बसल्याप्रमाणे धक्के बसतात. स्नायूंचा कंप. वेदना हळुहळु सुरू होतात व त्यानी उच्च बिंदु गाठला की एकदम थांबतात. वेदना होताना लवबीला जावे लागते, वेदना स्पर्श केल्याने जास्त होतात. अशक्तपणा व थकवा इतका येतो की निजणे भाग पडते. फेफरे येऊन गेल्यानंतर मन क्षुब्ध होऊन उड्या मारणे किंवा आसपासच्या लोकांना मारण्याचा प्रयत्न करणे. **हुळहुळेपणा. शरिरावर व *मनावर*** ताबा राहत नाही. मुष्टिमैथुन व सूर्याघात याचे दुष्परिणाम.

**मानसिकः**- स्वतःच्या प्रकृतिविषयी चिंता. विषयांतर करून काहीतरी बडबड. **विसरभोळेपणा.** काय बोलतो ते लक्षात रहात नाही. मंडळीत बसले असता बोलण्याची भीती वाटते किंवा बोलावेसे वाटत नाही. उतावीळ. फसविणे. चिंता वाटून बेचैनपणा येतो त्यामुळे एकेजागी चैन पडत नाही. अनेक प्रकारच्या मनात लहरी येतात, त्यामुळे काहीतरी चमत्कारिक गोष्टी करण्याची प्रवृत्ति. मित्राबद्दल सहानुभूती वाटत नाही.

**डोकेः**- आत पोकळ आहे असे वाटते. मुंग्या आल्यासारखे वाटते. घेरी-गरगर फिरल्यासारखे वाटते. वाहत्या पाण्याकडे पाहिल्याने किंवा बाहेरून खोलीत शिरल्याने घेरी येते. कातडीला स्पर्श सहन होत नाही.

**डोळेः**- पापण्याच्या कोपऱ्यांना कंड सुटते. पापण्या व त्यांच्या कडा जाड होतात.

**कानः**- पाळ्या जाड होतात. कंड सुटते.

**नाकः**- सर्दी; भरपूर पाणी वाहते व त्यामुळे थकवा वाटतो. खूप शिंका येतात.

**तोंडः**- कोरडे. घाण येते. दांत चिकट.

**चेहराः- फिकट-अशक्त- मातट.** चिंताक्रांत.

**घसाः**- श्वास बाहेर येताना किंवा गिळताना घसा हुळहुळा झाल्यासारखा वाटतो. चिकट, शेंबडासारखा कफ, सकाळी जरा खाकरले की बाहेर येतो.

**जठरः**- आत आग होऊन छातीपर्यंत जाते. पोटाच्या खळीत दाबल्यासारखे वाटून काळजी वाटते.

**उदरः**- बेडूक ओरडल्याप्रमाणे आवाज होतो. हुळहुळेपणा वाटतो, गाडीत बसल्याने जास्त होतो.

**मूत्रेंद्रियेः–** लघवीला भरपूर होते किंवा ताकाच्या निवळीसारखी होते. वास गोड. मधुमेह.

**पुरुषजननेंद्रियेः–** संभोगाच्या इच्छेशिवाय वीर्यपात होतो. स्वप्नावस्था. जुनाट परमा, स्राव पिवळा दाट. अंडात ठेचल्यासारख्या वेदना होतात, चालताना वस्त्रांच्या स्पर्शाने जास्त होतात.

**स्त्रीजननेंद्रियेः–** गर्भाशयाच्या मुखात व्रण पडून ते स्पंजासारखे होते. रजःपिंड मोठा झाल्यासारखा वाटतो. रजःपिंडांची गुल्मे. कॅन्सर–गर्भाशयाचा. धुपणी दुर्गंधी–करवडणारी. विटाळ थांबण्याच्या वयात होणारा रक्तप्रदर. गर्भाशयाच्या विकारात हातपाय व सांधे दुखतात. गर्भाशय खाली येते त्यावेळेस डाव्या रजःपिंडात व माकडहाडात दुखते.

**श्वसनेंद्रियेः– बुळबुळीत, पांढुरका–तवकीराच्या लापशीप्रमाणे कफ सहज** बाहेर येतो, विशेषतः सकाळी. छातीत अत्यंत अशक्तपणा वाटतो. आवाज पुरता बसतो–गवयांचा. आत हुळहुळे झाल्यासारखे वाटते. हसताना खोकला येतो. मोठ्याने वाचताना किंवा बोलताना सारखे खाकरावे लागते. छातीत टोचते, श्वास घेण्यास अडथळा येतो. खालच्या बरगड्या (डाव्या) च्या कडेनी वेदना होतात.

**हृदयः–** थांबल्यासारखे वाटते–नंतर कापावयास लागते आणि ठुसठुसते, आत श्वास घेतल्याने बरे वाटते. हृदयात बेचैनपणा वाटून धडधडते, डाव्या कुशीवर निजल्याने बरे वाटते.

**पाठः–** अतिशय दुखते. वाकून चालण्याने बरे वाटते. माकडहाडावर बर्फासारखे गार वाटते.

**हातपायः–** पाय अशक्त, कापतात–जिना उतरताना जास्त. हाताच्या बोटांना पेटके येतात. घोटे सुजतात. काहीही कारणाशिवाय सांधे दुखतात. घोट्याभोवती सूज येते, मधुमेहात. उतरताना पोटऱ्यांत पेटके येतात. बोटे आखडतात व पुढील हात शक्तिहीन झाल्यासारखा वाटतो. लिहिताना बोटाना पेटके येतात.

**झोपः–** लागताना अंगाला धक्के बसतात. स्वप्नात मळमळते.

**त्वचाः–** भावनामुळे कंड सुटते, मुंग्या येतात, गुदगुल्या होतात.

**ज्वरः–** दुपारी १२ वाजता येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा हो:– *आवाजाचा उपयोग केल्याने.* मानसिक शीण. दुपारी १२ वाजता; दमट गार हवा. स्पर्शाने, दाबल्याने, गाडीत बसल्याने. बसण्याने, वाकल्याने. पाठीवर निजल्याने, उन्ह. गरम खोलीत गेल्याने.

ब वा:– मोकळ्या हवेत; चालण्याने, काफी घेतल्याने. निजल्याने–खोकला. अंग गुंडाळून घेतल्याने.

**संबंधी औषधे:**– कॅल्क–का, झिंक, पल्स, सेपि, सेले, स्टॅनम्.

---

## ३५. आर्टेमीसिआ व्हल्गॅरिस

Artemmisia Vulgaris

**सर्वसाधारण** :– आचके–फेफरे, मुलींना वयात येण्याच्या काळात येते. रात्री उठून काहीतरी करण्याची प्रवृत्ति– परंतु सकाळी काय केले ते आठवत नाही झोपेत चालणे. एकामागून एक आचक्यांचे झटके येतात. नंतर बराच वेळ येत नाहीत. भीतीमुळे किंवा शोकामुळे, डोक्याला मार लागल्यामुळे किंवा विटाळाच्या विकारात येणारे फेफरे. **रंगीत प्रकाशाकडे पाहिल्याने घेरी येते.** घामाला लसणीसारखा वास येतो. फेफरे येण्याचे अगोदर चिडखोरपणा किंवा मनःक्षोभ होतो. आचके येताना किंवा नंतर दुर्गंधी घाम येतो. रस्त्यात चालता चालता एकदम थांबणे, कोठेतरी टवकारून बघणे. ओठातल्या ओठात पुटपुटणे, लगेच नेहमीप्रमाणे वागणे पण नुकतेच काय झाले ते आठवत नाही.

---

## ३६. अर्निका मॉन्टेना Arnica Montena

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम रक्त, रक्त*वाहिन्या*; मज्जातंतू. स्नायू व पचनेंद्रिये यावर होतो. *विकार अत्यंत वेदनायुक्त*; दोन्ही बाजूत सारख्याच तऱ्हेचे व हळुहळु उद्भवतात. *मार लागल्याप्रमाणे हुळहुळे- पणा*– **सर्वांगात**, वेदनानंतर, किंवा रक्त वाहत असलेल्या जागी किंवा अवयवांचा. वेदना ठेचल्याप्रमाणे एका सांध्यातल्या थांबून एकदम दुसऱ्या सांध्यात उद्भवतात. गोळा बसल्यासारखे वाटते-जठराच्या मागे वगैरे.

*अथरुण टणक लागते* किंवा आत गाठी आहेत असे वाटते. *दुर्गंधी*–**तोंडाला**–चव, शौच, वात. **रक्तस्राव**–नाकातून वगैरे. **स्राव नकळत होतात** शौच लघवी वगैरे. वेदनामुळे लटके पडल्यासारखे वाटते. ठिकठिकाणी रक्त साखळते, अंगावर काळेनिळे चट्टे पडतात. न पिकणारी गळवे. रक्तवाहिन्यात रक्त गोठते. मार लागून–दुखापती होऊन किंवा त्यामुळे झालेले विकार. कोणत्याही अवयवाचा दुरुपयोग, भीती, धास्ती, राग, संभोगातिरेक; दुःख, पश्चात्ताप, पैसे बुडाल्याने बसलेला मानसिक धक्का, या कारणाने उद्भवलेले विकार. लठ्ठ व गाडी, बोट लागते असे इसम. तंबाखूचा तिटकारा. त्वचा खरचटली असल्यास किंवा फाटली असल्यास हे औषध वरून लावू नये. विकारांचा उद्भव दुखापतीनंतर झाला असल्यास (मग ती कितीही जुनी असो) आर्निका सुरवातीस देणे चांगले. इन्फ्लुएंझा-शस्त्रक्रियेचे दुष्परिणाम; डास वगैरे कीटकांचे चावल्याचे दुष्परिणाम. टायफाईड सारखे ज्वर.

**मानसिकः** *भीती वाटते*-कोणीतरी येऊन मारील, धक्का लावील, आजारीपणाची, गर्दीची, तात्काळ मरू अशी. बेफिकीर, बेदर्वा. अत्यंत आजारी असूनसुद्धा स्वतःला **काही होत नाही असे म्हणणे.** खिन्न. मन शिणलेले पण शारीरिक **अस्वस्थता.** उत्तरे देण्याचे नाकारणे किंवा प्रयत्नपूर्वक हळुहळु देणे. बेशुद्ध-गुंगलेला. बळेच उठवून काही विचारले तर उत्तर देणे व लगेच झोपी जाणे. मोकळ्या प्रशस्त जागेची भीती वाटते. खरडावेसे वाटते-डोके-भिंत अंथरुण वगैरे विसरणे. नुकतेच वाचलेले लक्षात राहत नाही. निराश. राग ओसरल्यानंतर अश्रू ढाळणे, व तक्रारीचे बोलणे-एखादा अपघात झाल्यानंतर रात्री एकदम भीती वाटून जाग येते. दारुड्याचा वात.

**डोकेः– कढत, अंग गार.** घेरी-वस्तु आपल्याभोवती गरगर फिरत आहेत असे वाटते. घेरी चालताना, ताठ-बसल्याने-डोळे मिटल्याने-वृद्धपणी जास्त होते. डोक्याला मार लागून झालेला मेनिन्जायटिस. डोके मागे वाकवून चालावे लागते. मेंदू शिणल्यासारखा वाटतो. घेरी येताना, मळमळते, ओकाऱ्या होतात व जुलाब होतात. डोके खिळा मारल्याप्रमाणे दुखते. टाळूवर कढत ठिपके व कपाळात गार ठिपके.

**डोळेः– लालबुंद.** अतिशय बारीक काम केल्याने; देखावे-सिनेमा वगैरे पाहिल्याने डोळे थकल्यासारखे वाटतात. बाहुल्या बारीक होतात.

**कानः–** मेंदूला आघात होऊन आलेला बहिरेपणा. कर्कश आवाज सहन होत नाही. कानातून रक्त येते.

**नाकः**– डांग्या खोकल्यात; टायफाईड सारख्या तापात; नाक शिंकरताना, चेहरा धुताना नाकातून रक्त येते. रक्त काळसर, रक्त येताना गुदगुल्या होतात. फार ओझे उचलल्याने फटाफट शिंका येतात. नाक हुळेहुळे; गार.

**चेहराः**– लाल फुगीर दिसतो, सूनबहिरीत किंवा तापात-खाताना ओठ कापतो. गालांच्या हाडाच्या पोकळीत पू होतो. यौवनपीटिका अतिशय दुखतात.

**तोंडः**– **घाण येते.** चव कडू-तापानंतर. जिभेवर मध्यभागी उभा तांबडा पट्टा. जीभ काळी-कोरडी-टायफाइडसारख्या तापात. कुजलेल्या अंड्यासारखी चव-तोंड वासलेले.

**घसाः**– लालबुंद फुगीर. पेये गिळताना आवाज होतो. नाकाच्या मागील भागातून घशात थेंब पडतात.

**उदरः**– यकृताची-आतड्याची-सूज, अपेन्डीसायटिस. उदर फुगते. जुलाब होताना कुंथावे लागते. शौचास दुर्गंधी-काळे-रक्तमिश्रित-पुंवळलेले-आममिश्रित होते. वारंवार जावेसे वाटून मुरडा होतो. आंव-मुलांची, कॉलऱ्यासारखी हगवण-क्षयरोगात होणारे जुलाब, डाव्या कुशीवर निजल्याने, **जास्त होतात.** शौचास नकळत होते झोपेत किंवा तापात. गुदद्वार बाहेर येते, सर्व शरीर धुतल्याने बरे वाटते. आव झाली असताना लघवीला कष्टाने होते. शौचानंतर निजणे भाग पडते.

**जठरः**– **कुजलेल्या अंड्याप्रमाणे** दुर्गंधी ढेकरा. दुधाचा-मांसाचा तिटकारा. ओकारी-शाईप्रमाणे काळी-किंवा गोटलेले रक्त पडते. जठर कण्यावरून जात आहे किंवा त्यावर घासत आहे असे वाटते पोटाच्या खळीत-पिळवटल्याप्रमाणे कळा येऊन त्या खाली आतड्यात पसरतात व दुर्गंधी शौचास होते. दिवसा भूक लागत नाही, पण मध्यरात्रीपूर्वी अतिशय लागते. जठराच्या मागील बाजूस गोळा आहे असे वाटते.

**मूत्रेंद्रियेः**– मूत्रघात-अतिश्रमामुळे-आघातामुळे-मूत्रपिंडात चाकू खुपसल्याप्रमाणे वेदना होतात. लघवीतून रक्त जाते. लघवीचे विशिष्ट गुरुत्व व आम्लत्व वाढते. बाळंतपणानंतर लघवीला न कळत थेंब थेंब होते किंवा मूत्राशय तुंबतो. लघवीला बसल्यानंतर काही वेळाने लघवी सुरू होते.

**पुरुषजननेंद्रियेः**– नपुंसकत्व-संभोगातिरेकाने किंवा आघातामुळे.

**स्त्रीजननेंद्रियेः**– पाळी लवकर-विटाळ कढत- व फार जातो. अपघात-आघातामुळे विटाळ जावयास लागतो. संभोगानंतर रक्त येते. आघातामुळे गर्भाशय सरकते.

रजःपिंडात ताणल्याप्रमाणे वेदना होतात त्यामुळे ताठ चालता येत नाही. गरोदरपणी सर्वांग हुळहुळे होते, ओटीपोट व उदर जास्त, गर्भाची हालचाल सहन होत नाही. पोट दुखते–रात्रभर झोप येत नाही. गर्भ आडवा आहे असे वाटते. अपघात– अपघातामुळे गर्भपात. कष्टदायक बाळंतपण वायु-गोळा– मूल अंगावर पिताना जास्त होतो. दुखापतीमुळे उत्पन्न झालेली स्तनाची करटे. स्तनाग्रे हुळहुळी. बाळंतज्वर

**श्वसनेंद्रियेः–** **घसा बसतो**– अतिश्रमाने; सर्दी झाल्यास किंवा भिजल्यामुळे. खोकला– रात्री झोपेत येतो पण जाग येत नाही. हृदयाच्या विकारामुळे खोकला येतो. डांग्या खोकला, मूल अगोदर रडावयास लागते-डोळे लाल होतात-नाकातून रक्त पडते–कफात रक्ताचे ठिपके दिसतात. जांभई आल्याने–रडण्याने–रागामुळे खोकला जास्त होतो. मधून मधून उगाच येणारी खोक-ल्याची ढास. खोकताना छातीत टोचते. श्वासोच्छ्वास धापा टाकल्याप्रमाणे–जलद. उभे असताना बरकड्याखाली टोचते–श्वास घेववत नाही. दाबल्याने बरे वाटते. खोकताना कित्येक वेळा चेहऱ्यावर पुटकुळ्या येतात व त्या दुखतात, छातीचा खालचा भाग जड वाटतो. श्वासोच्छ्वास कष्टाने होताना थुंकीतून रक्त जाते. छातीची हाडे, श्वास घेताना, खोकताना हालचालीने दुखतात.

**हृदयः–** एकाएकी पिळवटल्याप्रमाणे वेदना होतात त्यावेळेस डाव्या कोपऱ्याच्या सांध्यात दुखते, हृदयाच्या ठोक्यामुळे सर्वांग हादरते. हृदयाचे स्नायू अशक्त होतात. हृद्रोग– ॲन्जायना फार-जोराने धावण्यामुळे हृदयाला पड-लेला ताण–हृदय विकारामुळे आलेली जलयुक्त सूज. तात्काळ मरण येईल अशी धडकी भरलेली असते, विशेषतः रात्री.

**मानपाठः–** मानेचे स्नायू अशक्त झाल्यामुळे डोके मागे पडते. पाठ हुळहुळी. मानेचे मणके दाबल्याने दुखतात.

**हातपायः–** हात दुखतात लोंबकळत ठेवल्यास बरे वाटते. अर्धांगवात. हातात वस्तू धरताना शक्ती नाही असे वाटते. हातपाय मार लागल्याप्रमाणे दुखतात. लिहिताना बोटाना पेटके येतात. ओटीपोटातील वेदनामुळे ताठ चालता येत नाही.

**झोप :–** गुंगी–उत्तरे देतादेताच झोप येते. त्रासदायक भयंकर, मरणाची, मेलेल्या माणसाची स्वप्ने पडतात. रात्र भयप्रद वाटते. एकदम भीतीमुळे जाग येते व त्यानंतर झोप येत नाही. अतिशय थकल्यामुळे अस्वस्थता व निद्रानाश.

**ज्वरः**– इन्फ्लुएन्झा, टायफाईड–विषम–दोषी (सेप्टिक) बाळंत वगैरे. थंडी वाजताना चेहरा व डोके तापते. ताप शिडीप्रमाणे दिवसानुदिवस वरवर चढत जातो. अतिशय घाम येतो. थंडी वाजताना तहान लागते. निजलेली बाजू गार होते. डोके कढत अंग गार. पांघरून काढावेसे वाटत नाही.

**त्वचाः**– थोड्याशा दुखापतीमुळे त्वचा काळीनिळी होते. काळे–निळे–पिवळट–हिरकट ठिपके. दोन्ही बाजूस सारख्याच ठिकाणी त्वग्रोगाची उगवण. **लहान पण ठणकणारी गळवे,** त्वचेखाली रक्त साकळते. पाठीला क्षते पडतात. एका ठिकाणी खाजविले की तशाच ठिकाणी दुसऱ्या बाजूस कंड येते. यौवनपीटिका दुखतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः**– *दुखापती*–मार लागणे–लचक–मुरगळणे–अपघात–आघात. **अतिश्रम-बाळंतपण. *स्पर्श*, धक्का लागल्याने.** धास्तीमुळे. झोपेनंतर. हालचालीने. वृद्धपणी. डाव्याकुशीवर निजल्याने. दमट थंड हवा कोळशाचा वायू.

**ब वाः**– सपाट हातपाय ताणून निजल्याने. शेक. गरम अन्न–पेय.

**सहाय्यक औषधे :**– अको; इपि; कॅल्के–का; नेट्र–स; व्हस–टा; व्हेरा–आ; सल्फु–अॅसि; सोरि; हेपरि.

**संबंधी औषधे :**– आर्से; एकिने; कॅक्ट; कॅलंडू; कोमो; कोनि; नक्स–व्हा; पल्स; फास्फ; बर्बे; बॅरि–मू; बेला; ब्रायो; रूटा; लेडम; सल्फ; सिंको; हेपार.

---

## ३७. आर्सेनिकम आल्बम (सोमल)

Arsenicum Album.

**सर्वसाधारण :**– या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा, मन, श्वासोच्छ्वास,* फुप्फुसे; **रक्त; हृदय; मज्जातंतु;** *पांथरी,* स्नायु, *त्वचा* यावर होतो. एकदम अत्यंत तीव्र स्वरूपाचे परिणाम. **वेड लावणाऱ्या वेदना.** ***विस्तवाने भाजल्याप्रमाणे आग.*** तापलेल्या **सुया** किंवा तारा भोसकल्याप्रमाणे वाटते– **उष्णतेने बरे वाटते.** वेदना होत असताना **श्वासोच्छ्वास जलद चालतो** किंवा थंडी वाजते. हट्टी वेदना. **उत्तरोत्तर सहनशक्ती कमी होत जाते** किंवा अगदी क्षुल्लक कारणामुळे ***एकदम अशक्तपणा येतो.*** **शरीराची झीज जलद** होते. दुखण्याच्या मानाने अशक्तपणा लवकर येतो.

वेदना डोके. जठर किंवा शरीराचे इतर अवयवात आलटून पालटून येतात. वारंवार मूर्च्छा येते. *करवडणारे-थोडे-पातळ स्राव*-लाळ घाम वगैरे. *दुर्गंधी -प्रेताप्रमाणे*. विकाराचा दुष्टपणा, सडणे. विषारीपणा ( सेप्टिक ) *अत्यंत अस्वस्थता*. ( बेचैनपणा ). समुद्रकाठची हवा-कुजलेले-अन्न-विषारी जखमा-तंबाखू बर्फ घातलेले पदार्थ, कोयनेल, समुद्रस्नान, प्रवास, डोंगराची चढण, काळजी दुःख भीति, यामुळे झालेले विकार. नाजुकपणा-स्पर्श-आवाज-वास सहन होत नाही. व्रण. **फिकट-फुगीर पाण्याने भरलेल्या पिशवीप्रमाणे-सूज.** नाळगूद-जलोदर. रक्तक्षय-पंडुरोग. विकार नियमित वेळी-दिवशी उद्भवतात. फेफरे-एकदम बेशुद्धि येऊन आंचके येतात-तळमळ सुरू होते-नंतर गुंगी येते तरीपण मधुन मधुन अस्वस्थता असते. फेफरे येण्याचे अगोदर घेरी येते-डोक्याचा मागील भाग दुखावयास लागतो. कंपवात. बाळंतपणानंतर आलेले वेड. हिस्टेरिआ-एकदम छातीत कोंडल्यासारखे वाटून श्वासोच्छ्वास घेता येत नाही ( प्लॅटि; कॅल्क-का; मोस्क ).

**मानसिक** :- अप्रसन्न. **काहीही सहन होत नाही. चोखंदळ.** अव्यवस्थितपणा खपत नाही. नीटनेटकेपणाची आवड. **हट्टाने करून घेणे. दुसऱ्यांचे दोष दाखविणे,** *मानसिक यातना*. **बरे होण्यासंबंधी निराशा.** *मरणाची चिंतायुक्त भीति*-तरीपण जगावेसे वाटत नाही. भीती रात्री जास्त वाटते. *बेफाट वागणूक*- स्वतःचे हाल करून घेणे- केस ओढणे, नखे खाणे, चावणे वगैरे. **आत्महत्या करून घ्यावी अशी मनाची प्रेरणा.** अस्वस्थता एके ठिकाणी चैन पडत नाही- जागा वारंवार बदलाव्याशा वाटतात. मूल - आईकडून दाईकडे नंतर बापाकडे जाण्याकरता धडपडते. एकटेच असले म्हणजे मरणाचे विचार मनात येतात त्यामुळे जवळ कोणीतरी असावे असे वाटते. ओळखीच्या इसमांना भेटावेसे वाटत नाही. त्यांचा अपराध केला आहे असे वाटते. कोणाचा तरी खून केला आहे असे वाटून धास्ती वाटते. चंचल चिडखोर- भित्रा विचित्र स्वभाव. किडे दिसतात व ते मूठ भरभरून फेकणे. संशयी. कंजूषपणा, दारुड्यांचा वात. घरभर चोर आहेत असे वाटून उड्या मारून लपून बसणे; रात्रंदिवस भुतेखेते दिसतात. जरूरीपेक्षा जवळ जास्त असावे किंवा घ्यावे अशी इच्छा.

**डोके** :- सुन्न होणे- भणभणणे गारव्याने कमी होते. वेदना उष्णतेने कमी होतात. डोके- ठणकते, आग होते. **डोक्यात अस्वस्थता**; सारखे हलते किंवा हलवा-

वेसे वाटते, मळमळते व शेवटी ओकावयास होते. प्रकाश– आवाज सहन होत नाही. अंधारात डोके उंच करून निजल्याने बरे वाटते. डोकेदुखी व पोटदुखी किंवा शरीरात इतर ठिकाणी वेदना आलटून पालटून सुरू असतात. अर्धशिशी– कोयनेलमुळे उद्‌भवलेली. डोळ्यावर ( डाव्या ) कापल्याप्रमाणे भयंकर वेदना होतात. केस विंचरणे सहन होत नाही. आगपेण– लसयुक्त– पूंयुक्त पुटकुळ्या. केस गळून पडतात अकाली पांढरे होतात. कोंडा होतो. खोकताना घेरी येते. घेरी येताना बेशुद्धि येते. दमेकऱ्यांची घेरी.

**डोळे** :– वारंवार येतात. पापण्या लाल होतात– व्रण पडतात– खुपऱ्या होतात. आग होते– करवडणारे पाणी येते. सर्व वस्तु हिरव्या दिसतात. जाळीतून बघतो आहोत असे वाटते. डोळे खोल गेलेले किंवा पुढे आलेले. गार पाण्याने किंवा कोरड्या शेकाने बरे वाटते. डोळ्याभोवती सूज आल्यामुळे डोळे उघडता येत नाहीत. आंतील कोपरापासून बुबुळापर्यंत पिवळा पापुद्रा येतो. प्रकाश सहन होत नाही. अन्नाकडे बघवत नाही.

**कान** :– पातळ, दुर्गंधि, करवडणारा स्राव येतो. वेदना होताना, गर्जनेप्रमाणे आवाज होतो.

**नाक** :– हिवाळ्यात होणारी सर्दी. **शिंका येऊन चुरचुरणारे पाणी वाहते**– पण नाक चोंदलेले असते. सर्दी– घशात– कंठात– व छातीत उतरून घसा खवखवतो, कोरडा खोकला येतो. धुपणीसारखे– किंवा इतर स्राव बाह्योपचाराने बंद केल्यास सर्दी होते. सर्दी वारंवार होण्याची प्रवृत्ति. शिंकाने समाधान होत नाही मोकळे वाटत नाही. कॅन्सर. तृणज्वर. वास सहन होत नाहीत. नाकात फोड येतात. अन्नाचा वास सहन होत नाही. ओकारीनंतर, किंवा प्रक्षोभाचा भर ओसरल्यानंतर नाकातून रक्त येते.

**चेहरा** :– *फिकट*; **चिंताग्रस्त; बसलेला, खप्पड व विद्रुप.** चेहऱ्याला गार घाम येतो. ओठ काळे. गालावर लाली. तापलेल्या सुया बोचल्याप्रमाणे वेदना. ओठाचा कॅन्सर.

**तोंड** :– हिरड्या सुजून रक्त येते. तोंडात निळसर–काळसर व्रण पडतात व ते चरतात. रक्तमिश्रित लाळ. रात्री दात दुखतात. ते लांब झाल्यासारखे वाटतात. तोंडातून जळजळीत पाणी येते. जीभ कोरडी, स्वच्छ किंवा लाल; **निळसर**, पांढरी. कडा लाल दाताचे ठसे उमटतात. जिभेची आग होते; बुंध्याशी सूज येते. चव कडू-पाण्याला, किंवा खाण्यापिण्यानंतर; खारट. झोपेत दात खाणे. पाणी पिताना भांडे चावणे. तोंडाला घाण येते.

**घसा** :– सुजतो. टॉनसिल सुजते. घसा पांढुरका. गिळताना आग होते.

**उदरः- ओकाऱ्या व जुलाब** तांदुळाच्या धुणी प्रमाणे, दुर्गंधी; **कालरा. आग होऊन** थोडा थोडा काळा आम शौचात पडतो. खाण्यानंतर किंवा गार पेये घेतल्याने शौचास होते. आतड्याचा व त्यावरील आवरणाचा शोथ. उदर फुगते त्याला स्पर्श सहन होत नाही. मुलांची कालऱ्यासारखी हगवण मूल मलूल होते, अंग गार पडते, गार घाम येतो व अंगाला घाण येते. जलोदर. मूळव्याध, मोड बाहेर येतात आग होते, शेकण्याने बरे वाटते. गुदद्वारा-भोवती कंड सुटून इसबासारखी उगवण येते. यकृत व पांथरी टणक होऊन मोठी होते. उदरात भयंकर कळा येतात. कोणत्याही अवस्थेत बरे वाटते. त्यामुळे जमिनीवर गडबडा लोळणे, व जीविताविषयी निराश होणे. गुद बाहेर येते ( हगवणीमुळे ).

**जठरः– अन्न पाहण्याचा, अन्नाच्या कल्पनेचा किंवा अन्नाच्या वासाचा,** तिटकारा येतो. *अत्यंत तहान लागते.* ***पाणी पिण्याने समाधान होत नाही. बर्फाचे गार पाणी प्यावेसे वाटते–पण ते मानवत नाही. तावडतोब ओकून पडते.*** भूक लागत नाही. थोडे खाल्ले तरी पोट भरल्यासारखे वाटते. थोडेसुद्धा पाणी किंवा अन्न पोटात ठरत नाही. पोटात गळून गेल्यासारखे वाटते. रक्ताच्या व पित्ताच्या ओकाऱ्या. खाणा-नंतर किंवा गार पाणी प्याल्याने उचक्या लागतात. हिंवतापात– ताप येण्याच्या वेळेस तापाऐवजी उचक्या लागतात. पांथरी मोठी होते. यकृताचा शोथ. ***थोडे थोडे पण वारंवार पाणी पिणे***; क्वचितच पण खूप खाणे. कळमळल्यासारखे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थोडी थोडी व कुंथून होते. किंवा नकळत होते मूत्राघात. मूत्रावरोध बाळंतपणानंतर. लघवीतून रक्त येते, लघवी काळी शेण कालविल्या-प्रमाणे दिसते. लघवीतून आल्बुमिन जाते. लघवी झाल्यानंतर पोटात गळून गेल्याप्रमाणे वाटते; नाळगूद. मधुमेह.

**पुरुषजननेंद्रिये** :– शिश्न पाण्याने भरलेल्या पिशवीप्रमाणे फुगते. धावऱ्यासारखी सूज. गरमीचे व्रण– आग होते– टोचते. जुलाब होताना वीर्यपात होतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– योनिद्वार व भोवती फुगल्यासारखी सूज येते. आग होते. व टोचल्यासारख्या वेदना होतात व त्या योनीतून वर जातात. योनी कोरडी-कंड येते. विटाळात धुपणी जाते. धुपणी भरपूर करवडणारी पांढरी-पातळ-दाट पिवळी. अशक्त-थकलेल्या, काळजीने खंगलेल्या स्त्रियांचा विटाळ बंद होतो.

विटाळ जाताना गुदात टोचते. गर्भाशयाचा-स्तनाचा कॅन्सर. रक्तप्रदर-रक्त काळे. विटाळ जाताना संभोगाची इच्छा होते. रजःपिंडात (उजव्या) तापल्या-प्रमाणे वेदना होऊन आग होते-अस्वस्थता येते-सारखी पावले हलविली म्हणजे बरे वाटते. कष्टार्तव-शेकाने बरे वाटते. स्तनात आग होते. हालचालीने बरे वाटते.

**श्वसनेंद्रियेः**– आवाज बसतो. कंठात वाफ आहे असे वाटते कंठाची सूज ***श्वासोच्छ्वास कष्टाने होतो.*** दमा-मध्यरात्री नंतर-पाठीवर निजल्याने जास्त होतो. खोकला कोरडा. खोकला आला म्हणजे अंथरुणात उठून बसावे लागते– छाती दाबून धरावीशी वाटते– गळून गेल्यासारखे वाटते. जलद चालताना– चढताना दम लागतो. फुप्फुसे कुजतात– दुर्गंधी हिरवा कफ पडतो. उजव्या फुप्फुसाच्या वरच्या भागात एके ठिकाणी सारखे भोसकल्या-प्रमाणे दुखते. फुप्फुसात पाणी साचते. प्लुरिसीनंतर पाणी सांचते. **अंगावर आलेली उगवण मावळताना** दमा लागतो. वासाने दमा लागतो. श्वासोच्छ्वास करताना शिटीसारखा आवाज होतो. खोकला कोरडा– रात्री व पेये पिण्याने, तंबाखू ओढल्याने जास्त होतो. खोकला कधी कोरडा कधी ओला. कंठात गंधकाची वाफ असल्यासारखे वाटते. छातीत गारवा वाटतो किंवा आग होते. खोकताना कफातून रक्त जाते. कफ थोडा, फेसाळ. थुंकीतून रक्त जाताना सर्वांगात आग होते, किंवा पाठीच्या तिकोनी हाडामध्ये दुखते. दारुडे किंवा विटाळ बंद झाल्याने थुंकीतून रक्त जाते.

**हृदयः**– अशक्त, थरथरते. क्षुल्लक कारणाने– मनःक्षोभाने; श्रमाने; चढताना, **धडधडावयास लागते**, पाठीवर निजल्याने जास्त होते. ठोक्याचा आवाज ऐकू येतो. ठोके पडलेले दिसतात. सर्वांगात ठुसठुस. हृद्रोग, वेदना सुरू झाल्या म्हणजे त्या मानेत व डोक्याच्या मागील भागात, छातीत व डाव्या हातात पसरतात– पोटात गुदगुदल्या सारखे वाटते– श्वासोच्छ्वास घ्यावासा वाटत नाही. नाडी– जलद, हलु किंवा कंपयुक्त. हृदयाच्या भोवती पाणी साचते. शौचानंतर धडधडते, शरीर अशक्त वाटून कंप सुटतो.

**पाठः**– कमरेत अशक्तपणा वाटतो. पाठीत ताठल्यासारखे वाटते, गुदास्थीतून माने-पर्यंत जाणवतो. माकडहाडात मार लागल्यासारखे वाटते.

**हातपायः**– अशक्त– थकल्यासारखे. कंप. रात्री स्वस्थ पडवत नाही. पावले हल-वावीशी वाटतात. गृध्रसीवात– चालण्याने, शेकाने बरे वाटते. पायाच्या बोटाचे तळवे दुखतात, व्रण पडतात. वृद्धपणी बोटे– कोरडी– काळी होऊन

कुजावयास लागतात ( गॅन्ग्रीन ) शेकाने बरे वाटते. सूज. नाळगूद. झोपेत जोराचे धक्के बसतात. पायात अस्वस्थपणा वाटून, चालावे लागते. किंवा ते हलवावे लागतात. पायाच्या बोटाखालील उंचवटे चालताना दुखतात. पोटऱ्यात पेटके येतात. पावलाना सूज येते.

**झोपः**– अस्वस्थ वादळ– वीज– आग– मरणाच्या विषयी स्वप्ने पडतात. झोप लागता लागता अंगाला धक्के बसतात. दचकून जाग येते. डोक्यावर हात घेऊन निजणे. जांभया येताना हातपाय ताणावेसे वाटतात.

**ज्वरः**– हिवताप– पाळीचे ताप. खूप थंडी वाजते किंवा मुळीच वाजत नाही, अंगाचा दाह होतो. गरम पाणी प्यावेसे वाटते. थोडे थोडे पण वारंवार पाणी प्यावेसे वाटते. घाम थोडा. हाडे दुखतात व अत्यंत थकवा येतो. टायफाईडच्या शेवटल्या अवस्थेत–वातात बडबड– गार घाम येतो, अशक्त-पणा, अस्वस्थता वाटते. शौचास– पातळ पिवळे दुर्गंधी व कित्येक वेळा नकळत होते. क्षयी ज्वर. शिरातून कढत पाणी वाहत आहे असे वाटते किंवा त्यांच्या कढत रेघा मारल्या आहेत असे वाटते. बाहेरून अंग गार पण आतून आग होते. घाम येताना खूप तहान लागते, दम लागतो किंवा थकवा येतो.

**त्वचाः**– त्वचेचे विकार व आतील अवयवांचे विकार आलटून पालटून होतात. त्वचा कोरडी– खरखरीत व *वाळून सुकल्यासारखी* दिसते. मळकट व वळ्या पडलेली. त्वचा जाड होऊन पापुद्रे जातात. पुटकुळया पुंवळून त्यावर खपल्या बसतात, दुर्गंधी पूं येतो. काळसर निळसर भाजल्यासारखे फोड येतात व त्यात आग होते. व्रण उथळ पण त्यात कापल्याप्रमाणे वेदना होऊन त्यातून काळसर रक्तमिश्रित स्राव येतो. केसतुडे, गळवे. काळीपुळी– चाळणीसारखी भोके पडतात खोल जातात– भयंकर आग होते. निसुळत्या टोकाच्या पुटकुळ्या. इसब; धांवरे; कॅन्सर. पित्ताच्या गांधी येऊन आग होते, कंड येते. मासे खाल्ल्यानंतर पित्ताच्या गांधी येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः**– *थंडी--बर्फाने*; *गार पेये व अन्न*; थंड हवा *नियमितवेळी-मध्यरात्री*; मध्यरात्रीनंतर; *दुपारी २ नंतर*; १४ दिव-सानी; दरवर्षी. *भाजीपाला खाण्याने*. *दारूचे दुष्परिणाम*. सांसर्गिक विकार, वाईट मास. उगवण आलेली मावळल्यास किंवा बाह्योपचाराने बरी केल्यानंतर. कोयनेल. उजवी बाजू, समुद्राकाठी. दमट हवा. *श्रम*. तंबाखु. विकार झालेल्या भागावर दाब पडल्याने, निजल्याने.

**ब** वा:– *उष्णतेने. शेक दिल्याने* (कोरडा). *कढत अन्न*–पेये. गरम पांघरुणाने. हालचाल. चालण्याने. ***डोके उंचावर ठेवल्याने***. ताठ बसल्याने. मंडळीत.

**सहाय्यक औषधे:**– कार्बो–व्हेजि; **नेट्र–स; थूजा; पल्स;** पायरो; फास्फ; **लॅके; सल्फ;**

**संबंधी औषधे:**– अरानि; आर्नि; आयो; इपि; कॅल्क-फा; कामो; नक्स-व्हा; मर्क्यु; स्नन-स्क्वी; लॅके; लायको; व्हेरा-आ; फ्लुओ-ॲसि; सल्फ; सल्फु-ॲसि; सिकु; सिंको; हेपार.

---

## ३८. आर्सेनिकम आयोडेटम Arsenicum Iodatum

**सर्वसाधारण:**– या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा*-**नाकाची-पचनेंद्रियांची;** फुफ्फुसाची; **हृदय;** गांठी; त्वचा; डावीबाजू व मज्जातंतु यावर होतो. *आग* होते. **भरपूर करवडणारे** पातळ **स्राव**–नवीन विकारात जातात. दाट मधासारखे जीर्ण विकारात जातात. हुळहुळेपणा. क्षयी अवस्था. **जडपणा.** अशक्तपणा. क्षयाची प्रथमावस्था, दुपारनंतर ताप वाढतो-अत्यंत थकवा-नाडी जलद, चंचल व जुलाब होण्याकडे प्रवृत्ति. घसा बसणे. वारंवार कोरडी खोकल्याची ढास लागते व पुंवळलेला भरपूर कफ पडतो. न्युमोनिआ. फुप्फुसात गळू होण्याची प्रवृत्ति.

**मानसिक:**– अभ्यास करवत नाही.

**डोके:**– डोक्याचा मागील भाग किंवा कपाळात जड होऊन दुखतो. घेरी येताना अंग थरथरते आहे असे वाटते. विशेषतः वृद्धपणी. डोक्याची त्वचा गार झाल्यासारखी वाटते. नाकाच्या बुंध्याशी दुखून आपण वेडसर होऊ की काय असे वाटते.

**डोळे:**– जड झाल्यासारखे वाटतात.

**कान:**– कानातून दुर्गंधी पू वाहतो. कर्णनलिका जड होऊन बहिरेपणा येतो. पडदा जाड होतो.

**नाक:**– वारंवार शिंका येतात पण त्यानी मोकळेपणा वाटत नाही. नाकातून पाण्याचे थेंब पडतात व ते **कढत–हिरवे–करवडणारे** असतात, त्यामुळे **वरचा ओठ लाल होतो. सर्दी**- झाली असताना दमा लागल्यासारखा वाटतो. नाकाच्या मागील भागांतून घशात कफ उतरतो. नाकात गुदगुल्या होऊन शिंका येतील असे वाटते. सर्दी झाली म्हणजे भूक लागते.

**चेहरा** :– गालाचे उंचवटे ठणकतात. ओठाचा कॅन्सर.

**घसा** :– हुळहुळा सोलवटल्यासारखा; बसतो.

**उदर** :– आंतड्याभोवतालच्या गांठी मोठ्या होतात व हगवण लागते. कॉलऱ्या-सारखे मुलाना जुलाब होतात. आव.

**जठर** :– त्रासदायक मळमळ. खाण्यानंतर एका तासाने ओकून पडते. फार तहान लागते, गार पाणी प्यावेसे वाटते पण लगेच ओकून पडते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– धुपणी करवडणारी–रक्तमिश्रित–पिवळी. योनिद्वार सुजून टणक होते, नंतर खाकेतील गांठी टणक होतात. स्तनाचा कॅन्सर स्तनाग्रे आंत जातात. स्तन हुळहुळे.

**श्वसनेंद्रिये** :– दमा–धाप लागते. मोकळी हवा घ्यावीशी वाटते. कोरडी खोक-ल्याची ढांस पिवळट हिरवा दुर्गंधी कफ पडतो. छातीत आग होते. प्लुरिसी; क्षय. आवाज बसतो. न्युमोनिआनंतर फुप्फुसे पूर्व स्थितीत येत नाहीत.

**हृदय** :– अशक्त. नाडी जलद व चंचल. फुप्फुसाच्या जीर्ण विकारामुळे अशक्त.

**गळा** :– गलगंड.

**मानपाठ** :– कमरेत आग होते, कपडे पेटले आहेत असे वाटते.

**हातपाय** :– खाकेत गुल्म होते त्यातून पिंवळा दाट स्राव येऊन त्याच्या पिंगट खपल्या बसतात.

**ज्वर** :– थंडी वाजते. रात्री घाम येतो.

**त्वचा** :– कोरडी खरखरीत. सांध्यावरचे त्वग्रोग. त्वचेचे मोठमोठे पोपुद्रे जातात, खाली ओलसर भाग राहतो. यौवनपीटिका टणक. हनुवटीवर इसब होतो, धुण्याने जास्त होतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– हवा कोरडी–गार वाऱ्याची. श्रम खोलीत. सफरचंद. तंबाखूचा धूर.

**ब वा** :– मोकळी हवा.

**सहाय्यक औषधे** :– कलि–आ.

**संबंधी औषधे** :– कलि–ब्रा.

---

## ३९. आर्सेनिकम सल्फुरेटम फ्लेवम

Arsenicum Sulphuratum Flavum

**सर्वसाधारण** :– आंतून बाहेर सुया टोचल्याप्रमाणे वाटते. श्वेतकुष्ट. वाफेने किंवा कढत पाण्याने बरे वाटते.

---

## ४०. आस्टेरिआस रुबेन्स Asteras Rubens

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम. रुधिराभिसरण; मज्जातंतु स्त्रीजननेंद्रिये; गुद व डावी बाजू यावर होतो. ठुसठुस–डोक्यात–छातीत-गर्भाशयात वगैरे. आत ओढल्यासारखे वाटणे, डोळे–स्तनाग्रे. कंपवात–खिशात हात ठेवल्याने कंप थांबतो. हाता–पायाना कंप सुटून चालणे भाग पडते. कॅन्सर. शिथिलपणा. फेफरे–येण्याचे अगोदर सर्वांगात कंप आल्यासारखे वाटते.

**मानसिक** :– भावनामुळे प्रक्षोभ होतो विशेषतः विरोधामुळे. क्षुल्लक गोष्टीने रडू येते. पुढे काही तरी घडेल किंवा वाईट बातमीची भीती वाटते. विरोध सहन होत नाही.

**डोके** :– डोके कढत होते. कढत वारे डोक्याभोवती वाहत आहे असे वाटते. मेंदूत धक्के बसतात.

**चेहरा** :– लाल. यौवनपीटिका. तोंडाभोवती पुटकुळ्या.

**उदर** :– पाण्यासारखे भडभडून पिंगट जुलाब होतात. हट्टी बद्धकोष्ठ.

**स्त्रीजननेंद्रिये** :– संभोगेच्छा वाढते–त्यामुळे मन बेचैन होते. स्तनांत टणक गांठी उत्पन्न होतात. डावे स्तनात आत ओढल्यासारखे वाटते–व त्यांत तीव्र चमका येतात. खाकेतल्या गाठी टणक होतात. स्तनाचा कॅन्सर वेदना डाव्या हाताच्या बोटापर्यंत येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– उष्णतेने; विटाळसेपणी; दमट हवा; विरोध. रात्री, काफी.

**संबंधी औषधे** :– म्युरे; सेपि.

---

## ४१. ऑसिमम कॅनम Ocimum Canum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम मूत्रनलिका ( उजःया ); मूत्रपिंड व मूत्राशय यावर होतो. मूत्रपिंडात खडा झाल्यामुळे वेदना होऊन ओकाऱ्या होतात. वेदनामुळे हात पिळवटावेसे वाटतात, रडू येते. **मूत्रनलिका वेदनामुळे हुळहुळया होतात.** लघवीतून रक्त जाते किंवा दाट पुवळलेली असते. लघवीखाली विटकराच्या बुकटीप्रमाणे **लाल** किंवा पिवळा गाळ साचतो. लघवी केशराप्रमाणे पिवळी असते किंवा तिला कस्तुरीसारखा वास येतो.

**स्त्रीजननेंद्रिये :–** स्तन व जांघातील गांठी सुजून मोठ्या होतात. स्तनाग्राना बिलकुल स्पर्श सहन होत नाही.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** लघवीला कमी झाल्याने.

**संबंधी औषधे :–** अर्टि; कॅन्था; **लायको.**

---

## ४२. आस्मियम Osmium

**सर्वसाधारणः–** या औषधाचा परिणाम **श्वसनेंद्रिये व श्वासनलिका** यावर होतो. दुर्गंधी स्राव. वेदना वरखाली होतात. मुंग्या येतात. लघवीला फुलासारखा वास येतो, मुळा खाल्ल्याप्रमाणे ढेकरा येतात व खाकेतील घामाला लसणी-सारखा वास येतो. नखे वाढत असताना त्वचा नखावर दुमडली जाते.

**डोळेः–** काचबिंदू. प्रकाशाभोवती-हिरवी किंवा इंद्रधनुष्याप्रमाणे वर्तुळे दिसतात. डोळ्याभोवती वेदना होऊन त्यातून पाणी येते.

**नाकः–** चोंदते; सर्दी होऊन खूप पाणी गळते पण त्यावेळेससुद्धा चोंदले आहे असे वाटते.

**जठरः–** दगडाच्या कपऱ्या आत आहेत असे वाटते किंवा गोळे बसले आहेत असे वाटते.

**श्वसनेंद्रियेः–** खोकल्याची ढास, पोकळ नळीत खोकल्याप्रमाणे आवाज होतो. त्यावेळेस आत काही तरी सुटून सैल झाले आहे असे वाटते-कफ चिकट लवकर सुटत नाही. खोकताना बोटात कंप येतो. **श्वासनलिका हुळहुळी.** बोलताना कंठात दुखते.

**मान पाठः**– खांद्यावर व पाठीत मुंग्या येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः**– खोकताना, बोलताना.

**संबंधी औषधेः**– आर्से; आयो; फास्फ.

---

## ४३. ऑक्झलिक असिड Oxalic Acid

**सर्वसाधारणः**– या औषधाचा परिणाम **पचनेंद्रिये**; बेंबी; **मज्जारज्जू**; हृदय; डावी बाजू; फुफ्फुस (डावे) यावर होतो. अशक्तपणा; निळसरपणा; बधिरपणा-सर्वांगात विशेषतः पायाना जास्त; व अंग गार असणे. **वेदना तीव्र स्वरूपाच्या**-रेघा मारल्याप्रमाणे; एकदम सुरू होतात, एकदम थांबतात किंवा एखाद्या **लहानशा जागी** उद्भवतात, आग होते. आंचके. कंप. कोणत्याही विकारासंबंधी विचार केल्यास ते विकार किंवा भावना जास्त होतात, इतकेच नाही तर एखाद्या भावनेसंबंधी विचार केल्यास ती भावना नसली तरी उत्पन्न होते. लुळे पडणे-हातपाय.

**डोकेः**– घेरी-निजले असताना पोहत आहोत असे वाटते. डोक्याभोवती पट्टा बांधला आहे असे वाटते. डोक्याच्या मागील भागात व पाठीत झिणझिण्या व बधिरपणा येतो. कानाच्या मागे स्क्रू पिळल्याप्रमाणे वाटते. डोक्याच्या मागील भागात, चुणचुण होऊन बधिरपणा.

**डोळेः**– बारीक उभ्या वस्तू मोठ्या आहेत व लांब आहेत असे वाटते. नाकातून रक्त जाताना दिसेनासे होते.

**जीभः**– **चव आंबट.**

**उदरः**– बेंबीजवळ मुरडा होऊन शौचास जावेसे वाटते. शौचास **नकळत होते;** गढूळ पाण्यासारखे पिंगट जुलाब होतात, **निजल्याने शौचास लागते.** काफी पिण्याने जुलाब होतात. साखर खाण्याने वेदना होतात. यकृतात टोचते -दीर्घश्वास घेतल्याने बरे वाटते. आव. शौचानंतर मळमळते व पोटऱ्या दुखतात.

**जठरः**– जठरात दुखते. पोटाच्या खळीत गार झाल्यासारखे वाटते. जठर पोकळ वाटुन कुरतडल्यासारखे वाटते. वारा सरल्याने बरे वाटते, खाण्याने बरे वाटते.

**पुरुषजननेंद्रियेः**– वीर्यवाहिनी-नलिकेत भयंकर कळा येतात, चालताना जास्त होतात. अंडात ठुसठुसते किंवा ठेचल्यासारखे वाटते.

**मूत्रेंद्रिये:**– लघवीतून आक्झॅलेट क्षार जातात. लघवी करताना शिश्नाच्या बोंडीत दुखते. लघवीसंबंधी कल्पना मनात आली की लघवी होते.

**श्वसनेंद्रिये:**– दचके देऊन श्वास आत घ्यावा लागतो. श्वासोच्छ्वास कष्टाने होतो. विशेषतः रात्री. डाव्या फुप्फुसात दुखते. हृदयविकारात आवाज बसतो. छातीच्या (डाव्या) खालचा भाग ते पोटाच्या खळीपर्यंत दुखते. श्वासोच्छ्वास करताना छाती हालत नाही.

**हृदय:**– हृद्रोग (अॅन्जायना) व इतर विकार आलटून पालटून होतात. धडधड व दमा लागतो. धडधडणे व आवाज बसणे आलटून पालटून– डाव्या फुप्फुसात एकदम तीव्र कळा येतात तेव्हा श्वासोच्छ्वास घेववत नाही. धडधडणे निजल्याने जास्त होते. फडफडल्यासारखे वाटते. नाडी थांबत आहे असे मनात आले तर नाडी थांबते.

**पाठ:**– **इतकी अशक्त वाटते की ती शरीर सावरून धरील असे वाटत नाही.** कण्यात खालून वर गार मुंग्या येत आहेत असे वाटते. चुणचुण व बधीरपणा.

**हातपाय:**– **कापतात व अशक्त.** खांद्यापासून बोटाच्या टोकापर्यंत बधिर होतात. पंजे प्रेताप्रमाणे गार. पाय गार, निळे व लुळे पडल्यासारखे वाटतात. मनगट लचकल्याप्रमाणे दुखते.

**त्वचा:**– ठिकठिकाणी पांढरी. हुळहुळी–वस्तऱ्याने केस काढल्याने जास्त होते. घाम लवकर येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो:**– **भावनांचा विचार केल्याने. थंडी. स्पर्श. दाढी–हजामत केल्याने**-मानसिक श्रम. आंबट फळे–स्ट्रॉबेरी–टोमॅटो–द्राक्षे वगैरे खाण्याने.

**ब वा:**– शौचानंतर

**संबंधी औषधे:**– आर्से; पिक-ॲसि.

---

## ४४. इक्विसेटम Equisetum

**सर्वसाधारण :**– या औषधाचा परिणाम *मूत्रेंद्रिये व जननेंद्रियावर* होतो. मूत्राशयात दुखते–भरल्यासारखा वाटतो–हुळहुळा झाल्यामुळे त्याला स्पर्श सहन होत नाही. मूत्रमार्गात झिणझिणल्यासारखे वाटते, आग होते व कापल्यासारख्या वेदना होतात. कष्टाने थोडी थोडी लघवीला होते किंवा

भरपूर होते. मूत्राशयाचा शोथ. लघवी थेंब थेंब गळते. लघवीतून श्लेष्मा जातो. *रात्री अंथरुणात नकळत लघवीला होते* व याला संवयी-शिवाय दुसरे काही कारण नसते. गरोदरपणी किंवा बाळंतपणानंतर लघवी तुंबते किंवा कष्टाने होते. वृद्ध स्त्रियांना लघवी थेंब थेंब नकळत होते व त्याच वेळेस शौचास नकळत होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** लघवी संपता संपता. दाबल्याने. हालचालीने.

**ब वा :–** दुपारानंतर, निजल्याने.

**सहाय्यक औषधे :–** सिलि.

**संबंधी औषधे :–** कॅन्था.

---

## ४५. इग्नेशिआ Ignatia Amara

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *मन* व *मेंदू* यावर होतो. *अनपेक्षित* किंवा *एकमेकाला विरोधी परिणाम. आचके*–कित्येकवेळा बेफाट–अंग ताठ होते–थरथरते व कंप. सर्वांगात धक्के बसल्यासारखे वाटते. *गोळा बसल्यासारखे वाटते* घशात वगैरे. आत काही तरी बाह्य पदार्थ आहे असे वाटते. दाबून टोचल्यासारखे वाटते. वेदना खिळा मारल्या-प्रमाणे किंवा एखाद्या लहानशा जागी होतात व तिकडे लक्ष वेधल्याने जास्त होतात. भरपूर लघवी झाल्याने बरे वाटते. दुःख–शोक; प्रेमभंग; धास्ती; मत्सर; काळजी व कण्याला झालेल्या जुन्या दुखापती किंवा आघात यामुळे उद्भवलेले विकार. हिस्टेरिआ. प्लेग. शांत स्वभावाच्या पण भावनाप्रधान व संवेदनाक्षम स्त्रिया. रागे भरल्याने, शिक्षा केल्याने किंवा दात येताना, भीतीमुळे मुलाना आचके येतात. अंग ताठून किंवा एखादा अवयव ताठून तोंडाला फेस येतो. वेदना जागा बदलतात, हळु-हळु सुरु होतात व एकदम थांबतात. भावनातिरेकाने, रात्रीच्या जागरणामुळे ( विशेषतः आजारी माणसाची शुश्रूषा केल्याने ) अवयव लटके पडतात. मोहनिद्रा–अंग धनुर्वाताप्रमाणे वाकडे. कंपवात, दुःख व भीतीमुळे झालेला. विकार जीर्ण झाले तर नेट्र-मूर घ्यावे.

**मानसिक :–** *चलाखपणा*; *भित्रेपणा* व *अत्यंत संवेदनाक्षम*; अत्यंत भावनाप्रधान. विक्षिप्तपणा; विचाराधीन; भावना व विकार यांची

अदलाबदल; सहज मूर्च्छा येते. *उसासे टाकणे*; हंसणे व रडणे आलटून पालटून, दुःख करण्यातच आनंद वाटतो. *शोक* पण तो आतल्याआत. कोणतीही गोष्ट चटकन ध्यानात येऊन पटकन करणे. विरोध व धमकावणे सहन होत नाही. स्वतःवर रागावणे. कसल्याही गोष्टीने त्रास होणे. उतावीळपणा, विशेषतः विटाळसेपणी, यावेळी कोणतीही गोष्ट कोणी लवकर करीत नाही असे वाटते. स्वतःला काही तरी होते आहे असे भासवून दाखवावा किंवा भिवविण्याची प्रवृत्ति. स्वतःच्या कर्तव्याकडे दुर्लक्ष झाले आहे असे वाटणे, तरुण मुली प्रौढ विवाहित पुरुषाच्या प्रेमात पडतात.

**डोके** :– व पाठ आलटून पालटून दुखते. डोकेदुखीनंतर जांभया येऊन ओकावयास होते. कानशिलात खिळा खुपसल्याप्रमाणे वाटते. डोकेदुखी खाली वाकल्याने जास्त होते किंवा बरे वाटते. डोक्याचा मागील भाग जड झाल्यामुळे डोके मागे वाकविणे, घेरी येताना डोळ्यापुढे ठिणग्या दिसतात.

**डोळे** :– पापण्या कोरड्या. खोकताना डोळ्यापुढे प्रकाश चमकल्यासारखा दिसतो. डोळ्यापुढे वेड्यावाकड्या चमचमणाऱ्या रेघा दिसतात.

**नाक** :– आत श्वास घेताना हुळहुळे होते. बुंध्याशी दुखते. वारंवार शिंका येतात. नाक गार, गुडघे कढत.

**कान** :– गर्जनाप्रमाणे आवाज, संगीत ऐकल्याने बरे वाटते. मनुष्याच्या आवाजाशिवाय इतर आवाज चांगले ऐकू येत नाहीत. एक लाल व कढत.

**चेहरा** :– रंग बदलतो. विशेषतः विश्रांति घेत असताना. स्नायूना कंप. **एक गाल लाल** व कढत. जबड्याचे स्नायु ताठ व टणक होतात. जबडा खटकन मिटतो. गाल लाल व फिकट आलटुन पालटुन.

**तोंड** :– आंबट चव. चावताना व बोलताना जीभ किंवा गाल चावला जातो.

**घसा** :– **गोळा बसला आहे असे वाटते,** गिळताना आंवढा किंवा घट्ट पदार्थ खाल्ल्याने बरे वाटते घशात टोचते– गिळण्याची क्रिया करीत नसताना जास्त. टानसिल टणक होतात व त्यावर लहान व्रण पडतात.

**उदर** :– शौचास होताना दुखते. शौच मऊ असूनसुद्धा कष्टाने बाहेर येते. शौचानंतर गुदात आवळल्यासारखे वाटते. मलावरोध–मनाने शिणलेल्या इसमांचा. **गुदातून एकदम वेदना** वर जातात. मूळव्याध–बसल्याने बरे वाटते, खोकताना जास्त होते. **गुदद्वार बाहेर येते.** थोडेसे कुंथले तरी **गुद बाहेर येते,** गुदद्वाराचे वेदनारहित आकुंचन.

**जठर** :– भूक लागलेली असताना मळमळते. अपक्व, जाडेभरडे अन्न खावेसे वाटते. ओकाऱ्या. चांगले अन्न ओकून पडते पण शिळी भाकरी किंवा दुसरे जाडेभरडे अन्न खाल्ले तर ते ओकून पडत नाही. **उचक्या लागतात**; उचकी लागली असताना कडू किंवा कोरड्या ढेकरा येतात. **जठर गळून गेल्याप्रमाणे वाटते** पण खाण्याने बरे वाटत नाही. **जठरात आचके येऊन दुखते.** खाल्ले प्याले की उचकी लागते. निरनिराळे पदार्थ खावेसे वाटतात पण ते दिले की भूक नाहीशी होते.

**मूत्रेंद्रिये** :– पाण्यासारखे लघवीला खूप होते ( फास्फ- ॲसि ).

**पुरुषजननेंद्रिये** :– वृषणाला घाम येतो. प्रत्येकवेळी शौचास होताना शिश्न ताठते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळ्या अनियमित. विटाळ काळा. विटाळसेपणी अत्यंत थकवा येतो व जठरात व उदरात आचके बसून दुखते. पाळी लवकर येते, विटाळ भरपूर किंवा थोडा जातो. दुःखामुळे विटाळ बंद होतो. संभोगाची अनिच्छा.

**श्वसनेंद्रिये** :– बरे वाटण्याकरता वारंवार ***उसासे टाकावेसे वाटतात.*** गुदमरल्यासारखे वाटते. घसा आवळल्यासारखा वाटतो. भयंकर खोकल्याची ढास–श्वास घेववत नाही. धूळ, पीस किंवा गंधकाचा धूर गेला आहे असे वाटून कोरडा खोकला येतो. चालताना खोकला थांबतो पण चालण्याचे बंद केले की खोकला सुरू होतो. खोकल्याने खोकला वाढतो. छाती आवळल्या-सारखी वाटते. मोठ्याने बोलता येत नाही, ओठातल्या ओठात बोलणे.

**मानपाठ** :– मानेत ताणल्यासारखे वाटते. पाठीची, आचक्यात मागे किंवा पुढे कमान होते.

**गळा**:– गलगंड.

**हात-पाय**:– झोप लागता लागता हातापायाला झटके बसतात. तळहाताला व बोटाना कढत घाम येतो. रात्री टाचात आग होते त्या जवळजवळ ठेवल्या तर जास्त होते पण एकमेकाना चिकटविल्या तर गार लागतात. पावले जड. पोटऱ्यात पेटके येतात. सांधे लचकल्याप्रमाणे किंवा मार लागल्याप्रमाणे वाटतात. चालताना गुडघे एकदम आपोआप वर उचलले जातात. गृध्रसी वात हिंवाळ्यात जास्त होतो, उन्हाळ्यात बरे वाटते.

**झोप**:– **जोरजोराने जांभया येतात.** झोप हलकी, कोणत्याही आवाजाने जाग येते. अस्वस्थ. झोप लागता लागता हातापायाना धक्के बसतात. मूल झोपेतून जागे होऊन किंचाळून ओरडते व सर्वांग कापावयास लागते. एकाच तऱ्हेची भयप्रद स्वप्ने वारंवार पडतात.

**ज्वरः–** थंडीमुळे हुडहुडी भरते. कापरे भरते. थंडी वाजताना तहान लागते. तापात तहान लागत नाही. थंडी वाजताना चेहरा लाल होतो. तापात पांघरूण नकोसे वाटते. मलेरिया हिवताप. वेदना होताना थंडी वाजल्यासारखी वाटते. खाण्यानंतर घाम येतो, चेहेऱ्यावर एखाद्या लहान जागी. घाम येईल असे वाटते.

**त्वचाः–** तापात पित्ताच्या गांधी अंगावर येतात व भयंकर कंड सुटते. त्वचा दुखते. दाबल्याने बरे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः–** ***भावना–दुःख–शोक*** आपल्या प्रिय असलेल्या वस्तूची किंवा व्यक्तीची हानी झाल्यामुळे. **आशाभंग. रुसवा;** ***काळजी*** धास्ती; थंडगार-मोकळी हवा; वास; **स्पर्श. काफी.** तंबाखू. वाकल्याने; चालण्याने; उभे राहिल्याने; जांभई आल्याने

**ब वाः–** असलेली (शरीराची) **स्थिती बदलल्याने, वेदना होत असलेल्या, बाजूवर निजल्याने.** दाबल्याने. एकटे असताना. **लघवी झाल्यानंतर** गिळताना. खाण्याने. दीर्घश्वास घेतल्याने.

**सहाय्यक औषधेः–** नेट्र–मू; पल्स; फास्फ–ॲसि; **सेपि.**

**संबंधी औषधे-** आर्से; कल्क–का; कोक्यु; बेला; ऱ्हस–टा; लायको; सल्फ; सिमि; सिलि; सिंको.

---

## ४६. इथूसा Aethusa Cynapium

**सर्वसाधारणः–** या औषधाचा परिणाम **मेंदू; मज्जातंतू पचनक्रिया;** मान; गाठी व यकृत याबर होतो. विकार एकदम उद्भवतात व ते तीव्र असतात, जोरजोराने ओकाऱ्या होतात, आचके येतात, वेदना होतात, वात होतो, अत्यंत **थकवा व जीवनशक्ती क्षीण** इतकी की बोलवतसुद्धा नाही. तान्ह्या मुलांचे कालऱ्यासारखे जुलाब. आचके. डोके सावरत नाही किंवा उभे राहून शरीर सावरता येत नाही. शरिराचे भाग स्क्रू पिळून एकमेकाशी जखडले आहेत असे वाटते. वेदना भोसकल्याप्रमाणे होतात. वेळी अवेळी अंगावर पिणारी तान्ही मुले. दात येताना व उन्हाळ्यात होणारे विकार- कोणत्याही विकारात मुले बेचैन होतात, कुरकुरतात, रडतात, व असंतुष्ट असतात. फेंफरे–आंगठे आंत वळतात–डोळे खाली वळतात, तोंडाला

फेस येतो, चेहरा लाल होतो. पचनक्रिया उन्हाळयात बिघडते. काहीही विकार किंवा कारण नसताना मुलाना डोके सावरता येत नाही, काही वेळेस त्याना हातापायावर स्वतःचे वजन पेलता येत नाही. अयोग्य रीतीने खाणे खाणारी मुले.

**मानसिक**:– **रडावेसे वाटते**– जसजसा विकार बळावत जाईल तसतसे जास्त. विचार करवत नाही किंवा अभ्यासाकडे वगैरे लक्ष लागत नाही. बात–उंदीर, कुत्री, मांजरे दिसतात. परीक्षेचा घबराट, जमणार नाही असे वाटून. घांद्रट मुले. वेडसरपणा, व भयंकर वागणूक आल्टुन पाल्टुन.

**डोके**:– घेरी येताना गुंगी येते, छातीत धडधडते. घेरी थांबल्यानंतर डोके कढत होते. केस ओढल्यासारखे वाटतात. डोके स्क्रू पिळल्याप्रमाणे दुखते, वात सरल्याने व शौचास झाल्याने बरे वाटते. डोक्याच्या मागील भागातून मान व कण्यापर्यंत दुखते निजल्याने दाबल्याने बरे वाटते.

**डोळे**:– खाली वळतात. उजेड सहन होत नाही. बाहुल्या विस्तारलेल्या.

**कान**:– कांहीतरी गरम बाहेर येतेसे वाटते, दडा बसल्याप्रमाणे, कानात बोटे घालून भोक रुंदावल्यामुळे बरे वाटते.

**नाक**:– नाकाच्या शेंड्यावर वेदनायुक्त पुटकुळ्या येतात. नाकाच्या पाळ्या आत जातात. वारंवार शिंका येतील असे वाटते पण येत नाहीत.

**चेहरा**:– मृतवत. ओठाभोवती निळसर फिकट. **नाकाभोवती पांढऱ्या रेषा पड-लेल्या** दिसतात. खोल गेलेला, फिकट, फुगलेला, किंवा ठिकठिकाणी लाल.

**जीभ**:– लांब झाली आहे असे वाटते. बोलणे मंद, गोंधळल्याप्रमाणे– चव कडू, कांद्याप्रमाणे, चीज सारखी.

**जठर**:– वारंवार थोडे खावेसे वाटते. खाण्यानंतर बराच वेळाने ( एका तासाने ) ढेकराबरोबर अन्न बाहेर येते. ***मळमळ इतकी की मरण येईल की काय असे वाटते, ओकारीत मोठाले टणक दह्यासारखे गोळे पडतात– नंतर अंग गळून जाते व झोप येते*** व अंगाला घाम येतो. ओकारीनंतर पुन्हा भूक लागते. ओकारीत फेसाळ दुधासारखे पांढरे द्रव्य पडते किंवा पिवळे पाणी पडते. कोरड्या ओकाऱ्या, मेंदूला शीण आल्याने अपचन. जठर उलट झाले आहे असे वाटते. **दूध सोसत नाही व पचत नाही.**

**उदर**:– बेंबीभोवती बुडबुडे आल्यासारखे वाटतात. पिवळे हिरवट चिकट जुलाब होतात. खाल्लेले तोंडावाटे तरी बाहेर येते. किंवा गुदावाटे तरी बाहेर येते.

शौचानंतर थकवा येऊन गुंगी येते. नंतर कोष्ट– आतड्यांचे चलन वलन बंद झाले आहे असे वाटते. उदर आतून गार वाटते व बाहेरून हाताला लागते. व त्याच वेळेला पाय गार होतात.

**मूत्रेंद्रिये**:– मूत्राशयात कापल्याप्रमाणे वेदना होतात. वारंवार लघवीला जावेसे वाटते.

**पुरुषजननेंद्रिये**:– उजवे अंड वर उचलले जाऊन मूत्रपिंडात दुखते,

**स्त्रीजननेंद्रिये**:– विटाळ पाऱ्यासारखा. स्तन सुजतात व कापल्याप्रमाणे वेदना.

**श्वसनेंद्रिये**:– धाप लागली असताना मधूनच उचक्या येतात. या त्रासामुळे रोगी निःशब्द होतो. छातीत डाव्या बाजूला टोचल्याप्रमाणे दुखते. खोकताना डोके दुखते.

**हृदय**:– जोराने धडधड होऊन चक्कर येते, डोके दुखते व अस्वस्थपणा. नाडी जलद, टणक, अनियमित.

**मान, पाठ**:– अशक्तपणामुळे उभे रहावत नाही, मान सावरत नाही. गंडमाळा, माकडहाडाचा भाग सापळ्यात आवळल्यासारखा वाटतो. मागे ताठ वाकल्याने बरे वाटेल अशा तऱ्हेने पाठ दुखत आहे असे वाटते.

**हातपाय**:– बोटे आणि अंगठे आत वळल्याप्रमाणे किंवा मुठी घट्ट– बाहू आखूड झाल्याप्रमाणे वाटतो. हातपाय सुन्न, जड, अशक्त. बोटे आखडलेली. चालताना मांड्या सोलवटतात.

**झोप**:– दचके बसल्याप्रमाणे झोप येत नाही. ओकारी व शौचानंतर गुंगी येते. झोप लागता लागता डोळे फिरतात किंवा आचके बसतात.

**ज्वर**:– तापात तहान लागत नाही. गार घाम येतो. पांघरूण घ्यावेसे वाटते. थोड्याशा श्रमाने घाम येतो.

**त्वचा**:– गाठी मोठ्या होतात; माळेप्रमाणे दिसतात, त्वचेची उगवण उष्णतेने खाजते. त्वचा– गार चिकट. काळेनिळे ठिपके पडतात; चालताना मांड्या करवडतात. सांध्याभोवती उगवण, कंड सुटते, उष्णतेने जास्त होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा हो:– दूध. उन्हाळा. दात येताना. वारंवार खाण्याने. पहाटे ३–४ वाजता अतिश्रम.

ब वा– मोकळ्या हवेत, चालण्याने. मंडळीत बसल्याने. संभाषणाने.

**सहाय्यक औषधे**:– कॅल्क–का.

**संबंधी औषधे**:– ॲन्टी-क्रू; सिकु.

---

## ४७. इनान्थ क्रोकेटा Oenanthe Crocata

**सर्वसाधारणः–** या औषधाचा परिणाम *मेंदू व मज्जारज्जु* व हृदय यावर होतो. वेड. आचके. **फेफरे–** आचके येताना शिश्न ताठते, चेहेऱ्याच्या स्नायूना आंचके बसतात, दातखिळी बसते, तोंडाला फेस येतो. पडण्याचे अगोदर मोठ्याने किंचाळणे. फेफऱ्यानंतर बेशुद्धि येते व ती दीर्घकाळ टिकते. कंत्रेभोवती किंवा त्वचेखाली ढेकूण चालला आहे असे वाटते– वस्त्राच्या स्पर्शाने जास्त होते. आचके विटाळसेपणी, पाळी ऐवजी किंवा गरोदरपणी येतात. डोक्याची व घशात आग होते. चेहऱ्याच्या स्नायूना आचके बसतात. तो सुजतो. चेहऱ्यावर व छातीवर लाल चट्टे पडतात. क्षुल्लक गोष्टीने रडावयास येते.

---

## ४८. इन्डिगो (नीळ) Indigo

**सर्वसाधारणः–** भीतीमुळे किंवा जंतामुळे उद्भवलेले आंचके. फेफरे येण्याचे अगोदर उदरातून उष्ण लाटा डोक्यापर्यंत जातात, डोक्यात लाटा आल्यासारखे वाटून दिसेनासे होते, किंवा प्रक्षुब्ध वागणूक, नंतर उदासीनता, भित्रेपणा व सौम्य वागणे. हातापायात प्रत्येक वेळी खाण्यानंतर दुखते. गृध्रसीवात–मांडीच्या मध्यापासून ते गुडघ्यापर्यंत वेदना होतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः–** बसल्याने. विश्रांतीने.

**ब वा :–** दाबल्याने; चोळल्याने; चालण्याने.

---

## ४९. इपिकॅकुआन्हा Ipecacuanha

**सर्वसाधारणः–** या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा– पचनेंद्रियाची,* जठराची, *श्वसनेंद्रियाची;* फुप्फुस; बेंबी व मज्जातंतू यावर होतो. **स्राव भरपूर व फेसाळ–** शौच, कफ वगैरे. **जठराचे उपद्रव किंवा इतर विकारात *एकसारखी मळमळ. रक्तस्राव–लालभडक व जोराने बाहेर येतो,*** लवकर गोठतो व त्यावेळेस **दम लागतो.** तान्ह्या मुलांचे आचके. थंडी उष्णता दोन्ही सहन होत नाहीत. बाह्यांग कढत पण आत गारपणा.

संताप; असंतोषाची कुचंबणा; दुखापती; कोयनेल; मार्फिआ या कारणापासून उद्भवलेले विकार. मुलांचे आकडीत हात पाय ताठतात किंवा आलटून पालटून सैल होतात व ताठतात. हातांना आचके बसून ते एकमेकाकडे येतात. दात येताना, अति खाण्याने किंवा थंडीमुळे आकडी येते. तंबाखू खाण्याने आलेले आचके. धांदरट. कशालातरी अडखळणे.

**मानसिक**:– ओरडणे– किंचाळणे. काही केले तरी समजूत पडत नाही. प्रत्येक गोष्ट तुच्छ लेखणे, व दुसऱ्याने पण तसेच करावे ही इच्छा. सर्वकाही हवेसे वाटते पण काय पाहिजे ते कळत नाही. चिडखोर. उदासीन. एकदम मूर्च्छा येते.

**डोके**:– खाली चेचल्याप्रमाणे दुखते. वेदना जिभेच्या बुडापर्यंत जातात. डोक्याचा मागील भाग– थंडी वाजताना–तापात किंवा ओकारी होत असताना दुखतो. मेनिन्जायटिस– डोके मागे वाकते, खाल्ले, प्यालेले ओकून पडते. जीभ लाल करवडलेली. अर्धशिशीत मळमळते व ओकावयास होते.

**डोळे**:– येतात, लाल होतात, डोळ्यातून पाणी जोराने वाहते, व मळमळते. फिरत्या वस्तूकडे पाहिल्याने मळमळते. डोळ्यात चमका मारतात.

**कान**:– गार ( उजवा ), तापात. आवाज सहन होत नाही.

**नाक**:– नाकातून रक्त येते. शिंका येतात. सर्दी– छातीत उतरते. नाक चोंदते.

**चेहरा**:– **फिकट**; डोळ्या किंवा ओठाभोवती निळसर. नाकाभोवती पांढऱ्या रेघा. डोळ्याभोवती ठराविक अंतराने वेदना होतात, डोळ्यातून पाणी वाहते. उजेड सहन होत नाही व पापण्या चुणचुणतात.

**जीभ**:– **स्वच्छ किंवा तांबडी, निमुळती.**

**तोंड**:– लाळ फार. मूल तोंडात मूठ घालून किंचाळते. दांत दुखत असताना कानसिलापर्यंत धक्के बसतात, खाताना बरे वाटते.

**उदर**:– **बेंबीभोवती**– कुरतडल्या– मुरडल्या किंवा **कापल्याप्रमाणे** वेदना होतात व त्या गर्भाशयापर्यंत जातात. कळा डावीकडून उजवीकडे जातात. पाठ टेकून बसल्याने बरे वाटते, हालचालीने जास्त होते. शौचास हिरवे होते. आव– **रक्तमिश्रित** आम किंवा **नुसते रक्त** पडते, वारंवार शौचास जावेसे वाटते, आग होते, डोके कढत व पाय गार होतात. मुलांची हगवण–जीभ स्वच्छ किंवा तांबडी, लघवी थोडी. शौचास पिंगट–काकवीप्रमाणे– हिरवे– पिवळे होते. आमाचे गोळे पडतात.

**जठरः**– *तहान लागत नाही. भयंकर मळमळते*, **मळमळ ओकारीने कमी होत नाही.** ओकाऱ्या होतात– ओकारीत पित्त–रक्त–आम–अन्न पडते. खाली वाकल्याने ओकावयास होते. अन्नाचा तिटकारा येतो. जठर गळून गेल्याप्रमाणे वाटते किंवा **सैल होऊन लोंबकळत आहे** असे वाटते. गोड पदार्थ खावेसे वाटतात.

**मूत्रेंद्रियेः**– **लघवीला वारंवार लागते.** लघवी थोडी व लाल. लघवीतून रक्त जाते– त्यावेळेस मळमळते– उदरात व मूत्रनलिकेत कापल्यासारख्या वेदना होतात, छाती दाटते व धाप लागते. मूत्रपिंडापासून मांड्यापर्यंत कळा येतात.

**स्त्रीजननेंद्रियेः**– गर्भाशयात कापल्यासारख्या वेदना होतात (डावी ते उजवीकडे). विटाळ जोराने बाहेर येतो. प्रत्येक वेळी विटाळ बाहेर येताना धाप लागते. विटाळ लाल भडक. विटाळ थोडा गेला तरी अत्यंत थकवा येतो. गरोदरपणाचे आचके व ओकाऱ्या. विटाळसेपणी गर्भाशय खाली येते.

**श्वसनेंद्रियेः**– आवाज बसतो. कंठ व छाती दाटल्यासारखी वाटते, हालचाल करवत नाही. **श्वास घेण्याकरता धापा टाकाव्या लागतात.** दमा. **वारंवार खोकल्याची ढास लागते. खोकताना कोरड्या ओकाऱ्या येतात किंवा** *गुदमरल्यासारखे वाटते.* प्रत्येकवेळी श्वास घेताना अंग ताठते. चेहरा लाल–निळा होतो, कोरड्या ओकाऱ्या येतात. किंवा ओकावयास होते. आरामशीर निजल्याने व पांघरुणाने बरे वाटते, मोकळ्या हवेत जास्त होते. डांग्या खोकला–नाका–तोंडातून रक्त पडते. आचके येतात. न्युमोनिआ; ब्रांको न्युमोनिआ, दमा. *छातीत कफ पातळ सांचल्यामुळे घुरघुर आवाज होतो पण कफ बाहेर येत नाही.* थुंकीतून रक्त पडते.

**मानपाठ** :– आचके येऊन पोटाची मागे किंवा पुढे कमान होते.

**हातपाय** :– एक पंजा गार, दुसरा कढत, बसले असताना मांडीचे हाड निखळले आहे असे वाटते.

**झोप** :– झोपेत डोळे अर्धवट उघडे राहतात, व विव्हळणे कण्हणे चालू असते, झोप लागता लागता अंगाला धक्के बसतात.

**ज्वर** :– हिंवताप–पाळ्या अनियमित. कोयनेलचे दुष्परिणाम. थंडी थोडा वेळ वाजते, ताप पुष्कळ वेळ टिकतो. तापात तहान लागत नाही. थंडी व ताप आलटून पालटून. एक हात गार दुसरा कढत. हाताना व पावलाना गार घाम सुटतो. हिंवतापात–**थंडी वाजताना, तापात व घाम येताना मळमळते.** अपचनामुळे ताप येतो.

**त्वचा** :– बाह्योपचाराने त्वचेचे विकार बरे केल्यानंतर जठराचे व आतड्याचे विकार उद्भवतात. धांवरे–ओकाऱ्या येतात-थंडी वाजते, दुखते, भयंकर मळमळते पण तहान लागत नाही. कंड सुटून मळमळते, ओकारी होईतो खाजवावे लागते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **उष्णता**; **दमट हवा**; खोलीत; **अति खाण्याने** –बर्फाचे पदार्थ–मांस–मिश्र किंवा **पौष्टिक अन्न**; **नियमित वेळी**; कोयनेल; उष्णता व थंडी; स्पर्श; ओकताना; हालचाल केल्याने; निजण्याने.

**ब वा** :– मोकळी हवा; विश्रांति; दाबण्याने; डोळे मिटल्याने; गार पाणी पिण्याने खोकला थांबतो.

**सहाय्यक औषधे** :– ॲन्टी-टा; आर्नि; **आर्स**; **कुप्रम**.

**संबंधी औषधे** :– ॲन्टी-क्रू; इग्ने; कॅक्ट; कॅडमि-स; कॅल्क-का; कामो; टॅबॅक; नक्स-व्हा, पल्स; पोडो; फास्फ; व्हिभम; व्हेरा-आ; सल्फ; सिंको; सेपि.

---

## ५०. इपिफेगस Epiphagus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **मज्जातंतू**; जठर व यकृत यावर होतो. स्त्रियांची डोकेदुखी–नित्यापेक्षा काही वेगळे काम केल्याने डोके दुखावयास लागते. कानशिलात बोटाने दाबल्यासारखे वाटते. संध्याकाळी ४ वाजेतोपर्यंत डोके दुखते, नंतर बरे वाटते. डोके दुखत असताना मळमळते व सारखी **चिकट थुंकी** थुंकावी लागते. डोके दुखण्याचे अगोदर भूक लागते. दर आठवड्याची डोकेदुखी. दातावर कीट येते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो**–थकवा–मानसिक श्रम–बाजारहाट केल्याने. डोळ्याचे श्रम.

**ब वा** :– झोपेने.

**संबंधी औषधे** :– आयरि; इग्ने.

---

## ५१. इरिजिरान Erigeron

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम जननेंद्रिये व मूत्रेंद्रिये, सांधे यावर होतो. **रक्तस्राव-लालभडक व जोराने बाहेर येतो**. ओकारीत व शौचात नुसते रक्त पडते. आग होऊन **चुणचुणते**. **रक्ताधिक्य**-ठिकठिकाणी. ठणका.

**उदर** :– फुगते. उदरात व जठरात आग होते. गुदद्वार फाटले आहे असे वाटते. **लघवीला व शौचाला एकदमच लागून कुंथावे लागते.** आव. मूत्राशयात आग होते व दुखते.

**मूत्रेंद्रिये** :- **लघवीला थोडे कष्टाने होते.** मूत्राशयात दुखते. लघवी तुंबते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– रक्तप्रदर. बाळंतपणानंतरचा विटाळ थोडयाशा हालचालीने पुन्हा सुरू होतो. धुपणी जाताना लघवीला वारंवार लागते. गरोदरपणी थोडया श्रमाने विटाळ जावयास लागतो विटाळाऐवजी नाकातून रक्त येते. श्रमाने होणारा वाखा.

**श्वसनेंद्रिये** :– खोकताना रक्तमिश्रित कफ पडतो. क्षयाची सुरवात.

**हातपाय** :– ठणका लागतो.

**त्वचा** :– जननेंद्रियाना चिकट घाम येतो. काळे निळे ठिपके पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– श्रमाने. पावसाळयात.

**संबंधी औषधे** :– कॅन्था; टॅरॅब्रि.

---

## ५२. इलाप्स कोरालिनस Elaps Corralinus

**सर्वसाधारण** :– या सर्पविषाचा परिणाम **रक्त**; नाक; कान; घसा; उजवी बाजूल यावर होतो. **स्राव काळे**–रक्त-शौच–वगैरे. शरिरांतर्गत **गारपणा** वाटतो–पोट-छाती वगैरे, पेये पिण्याने जास्त वाटतो. शरीराला किंवा अवयवांना हेल्कावे बसतात. पिळवटल्याप्रमाणे आचके बसतात नंतर लुलेपणा येतो. अर्धांगवात (उजवी बाजू). लोखंडाचे जड ओझे ठेवल्यासारखे वाटते. उजवी बाजू निर्जीव किंवा बधिर झाल्यासारखी वाटते. श्लेष्मल त्वचा सुरकुतते. गुदगुल्या होताहेत असे वाटते.

**मानसिक** :– पावसाची भीती वाटते. बोलता येते पण दुसऱ्याचे बोलणे समजत नाही. दुसरे कोणीतरी बोलत आहे असा भास होतो. भीतीमुळे अंग कापते व दातखिळी वाजते. एकटे राहण्याची भीति वाटते.

**डोके** :- घरी येताना पुढे पडल्यासारखे वाटते. डोक्यात रक्त चढते. कपाळात ओझे ठेवल्यासारखे वाटून दुखते.

**डोळे** :– डोळ्यापुढे काळी वर्तुळे दिसतात किंवा विस्तवाप्रमाणे लालबुंद मोठाले ठिपके दिसतात.

**कान** :– रात्री एकाएकी ऐकू येईनासे होते व गर्जना, तडतड आवाज होतात. मळ काळा, खड्यासारखा.

**नाक** :– जुनाट सर्दी, पिनस, दुर्गंधी–हिरव्या खपल्या बसतात–हिरवट–पिवळा शेंबूड येतो. नाकातून शाईसारखे रक्त पडते. नाकाच्या मागील भागात चोंदल्यासारखे वाटते. गिळताना नाकापासून कानापर्यंत दुखते.

**चेहरा** :– लाल ठिपके पडतात. फुगलेला.

**घसा** :– घशात व अन्ननलिकेत आचके येऊन आवळल्यासारखे वाटते, त्यामुळे अन्न किंवा पेय घशात अडकून राहतात, नंतर काही वेळाने ते पोटात धपदिशी पडतात. गिळताना नाकापासून कानापर्यंत दुखते. अन्न गिळताना ते स्क्रू प्रमाणे फिरत जात आहे असे वाटते. घशात स्पंज आहे असे वाटते.

**उदर** :– शौचातून काळे फेसाळ रक्त पडते. आतडी पिळून त्याची गाठ बसली आहे असे वाटते.

**जठर** :– पेये, फळे आत बर्फासारखी गार लागतात विशेषतः गार पेये. गोड ताक प्यावेसे वाटते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– कष्टार्तव, काळे रक्त जाते. गर्भाशयात काही तरी फुटले आहे असे वाटून, एकसारखे काळे रक्त वाहते. दोन पाळ्यामध्ये मधुन मधुन काळे रक्त जाते.

**श्वसनेंद्रिये** :– सारखे वारे हवेसे वाटते. पेये छातीत गार वाटतात. फुप्फुसे एकमेकापासून जोराने दूर केली आहेत असे वाटते. शाईसारखे पातळ काळे रक्त पडते. खोकताना छातीत कळा येतात.

**हात–पाय** :– हात अशक्त, तळहाताचे व बोटाचे पापुद्रे जातात. पावले बर्फासारखी गार. गुडघे लचकल्यासारखे वाटतात. हात व पंजे सुजतात व निळे होतात. नखाखाली टोचते.

**ज्वर** :– डोक्याकडे रक्त जोराने जात आहे असे वाटते. अंगाला गार घाम येतो. टायफाईडसारख्या तापात काळे रक्त शौचावाटे पडते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य ज्या हो** :– थंडी; थंड पेय किंवा अन्न; रात्री; दमट हवा; खोलीत. स्पर्श. फळे खाल्ल्याने. वादळ होण्याचे अगोदर.

**ब था** :– विश्रांति. चालण्याने नाकातील रक्तस्राव थांबतो व पोटातील व छातीतील कळा थांबतात.

**संबंधी औषधे** :– क्रोटे–हा; हेलोड.

---

## ५३. इस्कूलस Aesculus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **शिरा; यकृत; उदर** ( उजवी बाजू ); **गुद**; नाकाचा मागील भाग; श्लेष्मल त्वचा; डोक्याचा मागील भाग; कंबर यावर होतो. शिरात रक्त साखळते, त्यामुळे निळेपणा व फुगीरपणा येतो. ***कढतपणा- कोरडेपणा-ताठपणा- खरखरीतपणा*** किंवा **भरल्यासारखे** वाटते–घसा–**गुदात** वगैरे. वेदना टोचल्याप्रमाणे किंवा चमका व त्या इतस्ततः फिरतात. चमका कढत वाटतात. इंद्रियांची कार्ये मंद होतात-जठर हृदय–यकृत. गुदातील विकारामुळे इतर ठिकाणी विकार उद्भवतात.

**मानसिक** :– **चिडखोर** खिन्न, उदास. बरोबर लक्ष देता येत नाही. गोंधळलेल्या मनस्थितीत उठतो. बावरलेला, विशेषतः मुले.

**डोके** :– डोक्याच्या मागील भागात ठेचल्यासारखे वाटते, व त्यावेळेस डोक्याच्या मागील भागात, मानेत व खांद्यावर उष्ण लहरी येतात.

**डोळे** :– कढत, जड, हुळहुळे, पाणी येते. पांढऱ्या बुबुळावर रक्तवाहिन्या फुगलेल्या दिसतात.

**नाक** :– नाक आतून हुळहुळे, श्वासोच्छ्वास करताना आग होते. पडसे पण नाक चोंदलेले. यकृताच्या बिघाडामुळे.

**तोंड** :– जीभ व तोंड भाजल्यासारखे वाटते. जिभेवर दाट थर. लाळ गळते. जिभेवर ताबा नसल्यामुळे शब्द वाजवी रीतीने म्हणता येत नाहीत. चव कडू, गोड. दात तेलाने माखले आहेत असे वाटते.

**घसा** :– कढत, कोरडा, हुळहुळा. गिळताना कानापर्यंत टोचते. घशातील शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात. घसा सोलवटल्या व आवळल्यासारखा वाटतो. गिळताना विस्तवाप्रमाणे आग होते. खाकरताना चिकट गोड कफ येतो.

**उदर** :– आत खोल ठुसठुसते. **शौचास कोरडे व टणक** होते. शौच निरनिराळ्या रंगाचे असते. ***गुदांत*** काड्या भरल्या आहेत असे वाटते. हुळहुळे होते. शौचानंतर बराच वेळ वेदना आत राहतात. गुदद्वारातून किडा वळवळत आहे असे वाटते. **मूळव्याध, निळी–ठणका लागतो, बाहेर** येते व त्यामुळे ***पाठीत दुखते*** किंवा छातीत दुखते गुदद्वारात आग होते व त्यावेळेस पाठीत वरखाली शहारे येतात.

**जठर** :– खाल्ल्यानंतर सुमारे ३ तासांनी दगडाने दाबल्यासारखे वाटते, ठणका लागतो व कुरतडल्यासारखे वाटते. खाण्यानंतर छातीत जळजळ होऊन अन्न बाहेर येते,

**पुरुषजननेंद्रिये** :– शौचाचे वेळी पांढरी धातु जाते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– ओटीपोटात सारखे ठुसठुसते. धुपणी जाताना कमरेच्या सांध्याचा भाग मोडकळल्यासारखा वाटतो, व गुडघ्यात ठणका लागतो. धुपणी काळसर पिवळी चिकट करवडणारी विटाळसेपणानंतर जा. हो.

**छाती** :– आवळल्यासारखी वाटते, आत उष्ण आहे असे वाटते. यकृताच्या विकारात खोकला येतो. मूळव्याध झाली असताना हृदयाभोवती दुखते. हृदयाची धडधड ऐकू येते. व हातापायांच्या नाड्या ठुसठुसतात.

**मानपाठ** :– कंबर दुखते, मोडल्यासारखे वाटते, अनेक वेळा प्रयत्न केल्यानंतर उठता येते; चालताना व खाली वाकताना जास्त दुखते.

**हातपाय** :– सुजतात, लाल होतात. धुण्यानंतर, भरल्यासारखे वाटतात.

**झोप** :– हातपाय ताणण्याची व जांभई देण्याची प्रवृत्ति

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **सकाळी**–जागे झाल्यानंतर, शौचानंतर; लघवी करताना. चालताना. खाली वाकल्याने.

**ब वा** :– ***गार*** – मोकळी हवा, गार पाण्याची आंघोळ. रक्त गेल्याने ( मूळव्याध ). गुडघे टेकून बसल्याने. सतत श्रमाने.

**सहाय्यक औषधे** :– कार्बो-व्हेजि; म्युरि-ॲसि; लॅके.

**संबंधी औषधे** :- एलो; कालिंसो; पल्स.

---

## ५४. एकीनेसिआ Echinacea

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **रक्त**; रुधिराभिसरण; हिरड्या; रक्तवाहिन्या व डावी बाजू यावर होतो. याने रक्तशुद्धि होते. **अशक्तपणा थकवा व अंग दुखते. मंदता** बोलण्यात–चालण्यात–उत्तरे देण्यात वगैरे. जठरात–आतड्यात **हृदयात गुडघ्यात अशक्तपणा** वाटतो व त्यावेळेस घेरी येते. दुष्ट व दोषी ( सेप्टिक ) विकार. स्राव. दुर्गंधी. विषारी जनावरे (साप वगैरे) चावून झालेले विकार. सडणे. चावल्या-मिरमिरल्याप्रमाणे वाटते जीभ-ओठ-घसा. संधिवात रक्तवाहिन्याचा शोथ. जखमा वगैरे धुण्याकरता जंतुघ्न म्हणून उपयोग होतो. कॅन्सरच्या वेदना.

**मानसिक** :– उदासीन, किंवा चिडखोर, काहीच पसंत पडत नाही. मानसिक काम करता येत नाही. विरोध सहन होत नाही. चूक दाखविली की रागावणे.

**डोके** :– मेंदूत खाल एकदम चमक मारते. मेंदू मोठा झाल्यासारखा वाटतो. कानशिले टुसटुसतात, कपाळ कढत व आग होते. घेरी येताना अशक्तपणा वाटतो. डोळे मिटल्यानंतर ते कढत झाले आहेत असे वाटते.

**नाक** :– कोंबून भरल्यासारखे वाटते. स्राव दुर्गंधी. उजव्या नाकपुडीतून रक्त जाते.

**चेहरा** :– भुवया कापतात. चेहरा निळा.

**तोंड** :– व्रण पडतात. हिरड्यातून रक्त येते. त्या दातापासून सरकतात. दातांना वारं सहन होत नाही. फेसाळ लाळ. जीभ बधिर. चव तिखट. जीभ येते. जीभ ओठ व घशात गुदगुल्या होऊन हृदयाभोवती भीतीची भावना होते.

**जठर** :– **मळमळते व थंडी वाजते.** ओकारी आंबट, रक्ताची, कॉफीच्या बुकटीप्रमाणे.

**उदर** :– यकृताच्या मागील भागात ओझे ठेवल्याप्रमाणे वाटते. शौचानंतर रक्त पडते.

**पुरुषजननेंद्रिये** :– स्वप्नावस्था होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– बाळंतज्वर.

**श्वसनेंद्रिये** :– छातीच्या मध्यभागी गोळा बसल्यासारखे वाटते.

**पाठ** :– डाव्या तिकोनी हाडाखाली आग होते.

**हात** :– आलटुन पालटून बधिर होतात किंवा अस्वस्थ असतात, विशेषतः सकाळी जागे झाल्यानंतर. हात पाय ठणकतात.

**झोप** :– स्वप्नात कष्टाची कामे करीत आहोत किंवा भांडतो आहोत असे दिसते.

**ज्वर** :– **वेळीअवेळी थंडी वाजते-ताप येतो. व घाम येतो.** डोक्याच्या मागील भागात डावीकडे थंडी वाजते. घाम शरीराच्या वरच्या भागात किंवा कपाळावर येतो. नाडी जलद व चंचल.

**त्वचा** :– पुनः पुनः येणारी गळवे. काळी पुळी.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– खाण्याने. दुखापती. शस्त्रक्रिया. गार हवा.

**ब वा** :– विश्रांति निजल्याने.

**संबंधी औषधे** :– आर्नि; पायरो; न्हस-टा.

---

## ५८. एपिस Apis Mellifica

**सर्वसाधारण**:– मधमाशीच्या विषाचा परिणाम *डोळे*; *चेहरा: घसा*; *रज:पिंड*; *त्वचा*; *मूत्राशय*; **मज्जातंतू**; **श्वासोच्छ्वास**; हृदय; रक्त; उजवी बाजू (उजवीकडून डावीकडे) यांवर होतो. विकारांची सुरवात जल्द होते. ***एकदम कर्कश किंचाळणे*** किंवा बेदनामुळे. **किंचाळणे, वेदना *सहन होत नाहीत***. वेदना **एकदम *नांगी मारल्याप्रमाणे*** किंवा **मार लागून *हुळहुळे झाल्याप्रमाणे*** होतात, किंवा आग होते– वेदना विशेषतः मेंदूत, ***उदरात***–रज:पिंडात–मूत्राशयात वगैरे जाणवतात. ***फुगीरपणा***. **तुकतुकीत लाली**. जलयुक्त सूज. ( जलोदर नाळगुद) **शोथ**. ताठपणा. बधिरपणा सांसर्गिक विकार. दुःख शोक; धास्ती; राग–संताप; मत्सर मानसिक धक्का; दुःखकारक बातम्या ऐकणे व बाह्योपचाराने त्वचेचे बरे केलेले विकार या कारणानी उद्भवलेले विकार. **कंड *सुटून आग होते***. अंगावर गांधी येतात. पाण्यानी भरलेल्या पिशवीप्रमाणे सूज येते. जणुकाय फार काम केल्याप्रमाणे अतिशय थकल्यासारखे वाटून पडून राहणे भाग पडते. अतिशय अस्वस्थपणा व चुळबूळ– कंप, धक्के बसल्यासारखे वाटणे. थरथर; अर्धांगात थरथर, दुसरे अर्धांग विकल, लुले पडल्याप्रमाणे. लक्षणे उजवीकडून डावीकडे जातात. शरीराचे आतील भागात काहीतरी सुटून मोकळे झाल्यासारखे वाटते.

**मानसिक** :– चिडखोर संतापी. हातानी **काहीतरी चाळा किंवा उपद्व्याप करावासा वाटतो** किंवा काहीच करू नयेसे वाटते. घाबरट, चित्त जागेवर नसते. हालचालीत असंबद्धता– हातातील वस्तु पडतात. व त्यानंतर हसणे. ***एकदम कर्कश किंचाळणे*** ( मेंदूच्या विकारात ) किंवा झोपेत. संशयी; मत्सर. रडणे. कण्हणे. बेशुद्धि. बालिश. मुले एकसारखी कुरकुरतात. कामोन्माद व बेशुद्धी आलटून पालटून ( स्त्रिया ). काही कारण नसताना रात्रंदिवस रडणे. कोणत्याही गोष्टीने समाधान होत नाही. सर्व काही चुकीचे किंवा अयोग्य आहे; असे वाटते. खुळचट वेडगळ बालिश वागणूक (स्त्रियांची) बाळंतपणानंतर, न्हाण येण्याचे वयात मुलींची खुळचट वागणूक; विकृत श्राद्ध घेऊन मनस्ताप करून घेण्याची प्रवृत्ती.

**डोके** :– भोकसल्याप्रमाणे किंवा **मारल्याप्रमाणे** वेदना होतात, विशेषतः डोक्याच्या **मागील भागात. *डोके इकडून तिकडे फिरविणे***. बधिर होऊन शिणल्यासारखे डोके दुखते–दाबल्याने बरे वाटते. **केस दुखतात**.

डोक्याला कुबट घाम येतो. मेनिन्जायटिस– मूल एकदम किंचाळते– डोक्याकडे हात नेते, एका बाजूच्या स्नायूंना कंप येतो. उष्णता सहन होत नाही. बेशुद्ध. घेरी येताना शिंका येतात, निजल्याने किंवा डोळे मिटल्याने जास्त होते. डोके ताठ धरवत नाही. टाळू दबलेली.

**डोळे** :– *फुगीर*. पापण्या पाण्यानी भरलेल्या पिशवीप्रमाणे दिसतात. लाल होऊन रक्तवाहिन्या दिसतात. फूल पडते. डोळ्यातून खूप कढत पाणी येते. उजेड सहन होत नाही पण डोक्यावर पांघरूण घेववत नाही. तिरळेपणा. दृष्टि-मांद्य शौचानंतर कमी होते. रांजणवाडी. एकाच वस्तूकडे एकसारखे बघवत नाही, कृत्रिम उजेडात बघता येत नाही. डोळ्याखाली फुगीरपणा.

**चेहरा** :– फुगीर किंवा लाल विशेषतः डोळ्याभोवती. **पांढरा फटफटीत.** ओठ ( वरचा ) सुजलेला. गाल लोंबल्यासारखे दिसतात. चेहरा आनंदी, भीति-ग्रस्त, किंवा निश्चल. उजवा डोळा मिटतो (उजवीकडील अर्धांगवातात.)

**कान**:– विस्फोटक ज्वरानंतर कान फुटतो. लाल सुजलेले.

**नाक**:– शेंडा गार. नाक गार. लाल सुजलेले, आत गळू होते, गारव्याने बरे वाटते.

**तोंड**:– व जीभ लाल. **दात खाणे, जिभेच्या कडावर भाजल्यासारखे फोड येतात,** ती सुजते, भाजल्यासारखी वाटते किंवा हुळहुळी होते. गार पेयाने बरे वाटते. जीभ तोंडाबाहेर लोंबते, किंवा बाहेर काढता येत नाही.

**घसा**:– खरखरीत, **तुकतुकीत.** आत बाहेर सूज. पडजीभ पाण्याने भरल्याप्रमाणे फुगते. टानशिल– लालबुंद होऊन वर व्रण पडतात. घसा पांढरा, कडा लाल. घटसर्प, सुरुवातीपासूनच शक्तिपात होतो. गार पेयाने बरे वाटते. घसा निळसर.

**जठर**:– *तहान लागत नाही*– पण थंडी वाजताना लागते, दूध प्यावेसे वाटते. व त्याने बरे वाटते. मूल दिवसा फक्त पिते, रात्री पीत नाही. दाबल्याने पोटाच्या खळीत दुखते.

**उदर**:- जलोदर, तहान लागत नाही. नारिंगी रंगाचे किंवा टोमॅटोच्या रसाप्रमाणे शौचास होते. हालचाल केल्याने शौचास होते किंवा लागते. उदर अत्यंत हुळहुळे इतके की शिंकताना दुखते. गुदद्वार; हुळहुळे सुजलेले-त्यातून रक्त वाहते किंवा उघडे ( वासलेले ) राहते. शौचास झाल्याशिवाय लघवीला होत नाही. उदर ताणल्यासारखे वाटते इतके की, शौचाचे वेळी कुंथताना ते फुटेल की काय असे वाटते.

**मूत्रेंद्रिये**:– लघवी होताना आग होते. कष्टाने थोडी थोडी लघवीला होते. लघवी थोडी दुर्गंधी, कॉफीच्या भुकटीप्रमाणे गाळ सांचतो. मूत्रपिंडाचा शोथ. शेवटचे थेंब पडताना आग होते व चुरचुरते. लघवीला भरपूर होते पण त्या मानाने पाणी कमी प्यावे लागते. नुकत्याच उपजलेल्या मुलांची लघवी तुंबते. लघवी दुधासारखी पांढरी, मेंदूत पाणी सांचले असताना.

**पुरुषजननेंद्रिये** :– वृषणाची जलयुक्त सूज. वृषणवृद्धि.

**स्त्रीजननेंद्रिये** :– रजःपिंड बधिर. उजव्या रजःपिंडाचे गुल्म. वयात येण्याचे काळात विटाळ सुरू न झाल्यामुळे मुलीना मेंदूचे व डोक्याचे विकार उद्भवतात. कष्टार्तव, बुळबुळीत रक्ताचा विटाळ थोडा जातो, व रजःपिंडात दुखते. स्तनात आग व नांगी मारल्याप्रमाणे वेदना, स्तनातील करटे, किंवा उघडे झालेले कॅन्सर. २–३ ऱ्या महिन्यात बाखा होतो. संभोगातिरेकामुळे किंवा विटाळ बंद झाल्यामुळे वेड लागते. गरोदरपणी शेवटच्या महिन्यात जलयुक्त सूज येते व आंचके येतात– बाळंतपणात.

**श्वसनेंद्रियेः**– **श्वासोच्छ्वास धापा टाकल्याप्रमाणे होतो. घेतलेला श्वास शेवटलाच असे वाटते.** मोकळी हवा हवीशी वाटते. कंठ आत गेल्यासारखा वाटतो. प्युरिसी नंतर फुफ्फुसाभोवती पाणी साचते, खोकताना प्रत्येक वेळी छातीत व डोक्यात वेदनायुक्त हादरा बसतो. पित्ताच्या गांधी आल्या की दमा होतो, थोडा कफ पडला तर बरे वाटते. छाती मार लागल्याप्रमाणे हुळहुळी.

**हृदयः**– हृदयाच्या शेंड्यातून मागे चमका येतात. हृदयाच्या ठोक्यामुळे सर्व शरीर हादरते. नाडी अशक्त पण जलद. लघवी कमी होऊ लागली म्हणजे धडधडते.

**मानपाठः**– मान ताठते, गुदास्थीत आग होऊन दाबल्यासारखे वाटते.. खाली बसताना जास्त होते.

**हातपायः**– हात व पावले बधिर. तळहात कढत. नखे सैल झाल्यासारखी वाटतात. नखुरडे नाळगूद. अर्धांगवात ( उजवे ), मानसिक धक्क्याने झालेला. डोळे मिटून चालताना झोकांडे जातात.

**झोपः**– *झोप येते किंवा गुंगी येते*. झोपेत *किंचाळणे*, एकदम दचकून उठणे. झोप येते पण घाबरटपणामुळे लागत नाही. पांघरूण फेकून देणे. तापानंतर झोप येते.

**ज्वर** :– वेळा बदलून प्रत्येकवेळी अगोदर थंडी वाजते, त्यावेळेस श्वासोच्छ्वास जड होतो, अंगावर पित्ताच्या गांधी येतात, पांघरूण नकोसे वाटते. थंडी व ताप आलटून पालटून. *अंग कढत होते किंवा अंगाची आग होते* पण जरा हालचाल केली की थंडी वाजते. तहान लागत नाही. एक भाग कढत, दुसरा भाग गार. घामाच्या धारा लागतात–एखाद्या भागाला. अंग तापले म्हणजे घाबरटपणा येतो. घाम आला तर आपल्याला बरे वाटेल असे वाटते.

**त्वचा** :– लाल गुलाबी. स्पर्श सहन होत नाही. नांगी मारल्याप्रमाणे ठिपके पडतात. खरखरीत पुरळ येते. फिकट. मोठ्याल्या पित्ताच्या गांधी अंगावर येतात. धांवरे. कढत कोरडी किंवा घामाच्या धारा आलटून पालटून. काळी पुळी.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *उष्णता–खोलीत*–हवेची; बिस्तवाची; अंथरुणाची. कढत पेय. स्पर्श, केसाना केला तर. झोपेनंतर. संध्याकाळी ४ वाजता. दाबल्याने. बाह्योपचाराने त्वग्रोग बरे केल्याने. कढत पाण्याचे स्नान.

**ब या** :– *थंड–हवा,* थंड पाण्याची आंघोळ. उघडे राहिल्याने. थोडा कफ पडल्याने. हालचालीने. ताठ बसल्याने.

**सहाय्यक औषधे** :– आर्नि; आर्से; नेट्र-मू; पल्स; बॅरि-का; मर्क्यु-साया; हेलेबो.

**संबंधी औषधे** :– अर्टि; आयो; कॅन्था; ग्रफाय; लायको; सल्फ; स्ट्रमो.

---

## ५६. एबिस कॅनॅडेन्सिस Abies Canadensis

**सर्वसाधारण**:– या औषधाचा परिणाम जठराच्या श्लेष्मल त्वचेवर होतो. सर्व काळ पडून रहावेसे वाटते. उजवे फुप्फुस व यकृत लहान व टणक झाले आहे असे वाटते. गर्भाशयाचा भ्रंश झालेल्या स्त्रिया.

**मन**:– मन शांत किंवा निष्काळजी.

**डोके**– हलके असल्याप्रमाणे वाटते. किंवा डोक्यात पोहल्यासारखे वाटते.

**जठर**:– पोटाच्या खळीत कुरतडल्यासारखे वाटते किंवा गळून गेल्यासारखे वाटते. भूक लागते. पचन होईल त्यापेक्षा जास्त खाण्याची इच्छा. पोट व उदर फुगते व त्यामुळे हृदय धडधडते. वात धरल्यामुळे हृदयात चलबिचल होते. लोणची, मुळे, सलगम किंवा कदान्न खाण्याची वासना.

**स्त्रीजननेंद्रियेः**– गर्भाशय हुळहुळे झाले आहे असे वाटते. दाबल्याने बरे वाटते. गर्भाशय मऊ झाल्यासारखे वाटते. थकवा, सारखे लोळावेसे वाटते.

**पाठः**– उजव्या तिकोनी हाडात दुखते.

**ज्वरः**– थंडी वाजताना रक्त गोठल्यासारखे वाटते. खांद्यामध्ये गार पाणी टाकल्यासारखे वाटते.

**त्वचाः**– चिकट व दमट

---

## ९७. एलोज ( काळाबोळ ) Aloes

**सर्वसाधारणः**– या औषधाचा परिणाम *शिरा–उदराच्या* ( आतड्याच्या ) ***गुदाच्या–यकृताच्या***; कंबर; डोके; ओटीपोट; स्त्रीजननेंद्रिये यावर होतो. रोग व त्यावर घेतलेल्या निरनिराळ्या औषधांचे दुष्परिणाम. व्यायाम न घेणारे, थकलेले वृद्ध इसम. **शिथिलपणा.** ***शिरांत रक्त तुंबते*** विशेषतः उदराचा; त्यामुळे उदरात **भरल्यासारखे वाटते** किंवा **जड ओझे ठेवल्याप्रमाणे** ***ओढ लागते.*** **ओढल्यासारखे** वाटते. स्राव बुळबुळीत–नाकाच्या मागील भागातून–शौच वगैरे. आतबाहेर उष्णता.

**मानसिकः**– मलावरोधाने किंवा आभाळ आलेली हवा असताना मानसिक लक्षणे बळावतात. एका आठवड्यात मरू असे वाटते. आयुष्य हे ओझे आहे असे वाटते. हालचाल करण्याचा तिटकारा. लोकांचा तिटकारा, ते जवळ नकोसे वाटतात. स्वतःविषयी राग व असंतुष्ट.

**डोकेः**– डोक्याचे विकार, कंबरेचे विकार व उदरातील विकार आलटून पालटून होतात. डोके दुखत असताना डोळे जड होतात त्यामुळे ते अर्धवट मिटल्याने बरे वाटते.

**डोळेः**– आत खोलपर्यंत दुखतात. डोळ्यापुढे काजवे चमकल्याप्रमाणे. कपाळदुखीमुळे डोळे अर्धवट मिटणे.

**कानः**– चावताना कानात फुटल्याप्रमाणे आवाज होतात.

**नाकः**– शेंडा गार

**चेहरा तोंडः**– ओठ अति लाल, कोरडे, भेगा गेलेले. ओठातून रक्तस्राव– चव आंबट कडू– जीभ तोंड कोरडे.

**घसाः**– कफाचे बुडबुडीत गठ्ठे खांकरून काढणे. आतून भुजल्यासारखा. हुळहुळे वाटते.

**जठरः**– रसाळ पदार्थ, फळे, सफरचंद, खाण्याची इच्छा. चालताना पाय वेडावाकडा पडला तर पोटाच्या खळीत दुखते. मांसाचा तिटकारा. ढेकर येताना जठरात दाटल्यासारखे वाटते.

**उदरः**– बेंबी व गुदापर्यंत वेदना होतात. ओटीपोट-गुद जड होते. ओटीपोटात पाचर मारल्यासारखी वाटते. गुद बाहेर येते. **आतड्यात गुरगुरते, गडगडल्यासारखा आवाज होतो नंतर एकदम शौचास लागते–*आवरत नाही*** (नकळत होईल असे वाटते) **नंतर भडभडून पाण्यासारखे** जुलाब होतात जुलाब होताना गुदात दुखते. शौचास लागली म्हणजे वारा सरेल की शौचास होईल हे उमजत नाही. वात सरताना किंवा लघवी करताना शौचास लागली आहे असे वाटून फक्त वाराच सरतो. कित्येक वेळा शौच घट्ट असताना सुद्धा नकळत होते. शौचानंतर खूप बुळबुळीत आम पडतो व गुदात दुखते. शौचात **गांठी** पडतात. मूळव्याध बाहेर येते-द्राक्षाच्या घडासारखी दिसते-गार पाण्याने बरे वाटते. ***गुद्द्वार शिथिल***–आतून बुळबुळीत स्राव येतो. गुदात. गुदद्वारात, मूळव्याधीत आग होते. शौचास कढत होते, वात सरताना कढत असतो. वात सरताना शौचास होते. खाण्यानंतर गुदात ठुसठुसते. लहान मुले घरात हिंडताना थोडे थोडे गोटीप्रमाणे शौच टाकीत जातात.

**मूत्रेंद्रियेः**– वृद्धपणी मूत्रग्रंथी वाढल्यामुळे लघवीला नकळत होते. लघवी होताना खाली ओढ लागते. लघवी करताना शौचास होते किंवा होईल असे वाटते. लघवी कढत.

**पुरुषजननेंद्रियेः**– वैषयिक प्रक्षोभ, खाण्यानंतर, जागे झाल्यानंतर (मुलांचा)

**स्त्रीजननेंद्रिये :**– गर्भाशय जड झाल्यामुळे चालताना उभे राहिल्याने व विटाळसेपणी त्रास होतो. विटाळ थांबण्याच्या वयात होणारा रक्तप्रदर–धुपणी, शेंबडाप्रमाणे, रक्तमिश्रित.

**श्वसनेंद्रियेः**– हिवाळ्यातील खोकला–त्यावेळेस अंगाला कंड येते. श्वासोच्छ्वास घेताना यकृतापासून ते छातीपर्यंत टोचते.

**झोपः**– स्वतःला मळवितो आहोत अशी स्वप्ने पडतात.

**पाठः**– कंबर दुखणे, मूळव्याध व डोके दुखणे आलटून पालटून. माकड हाडात दुखते. बसल्याने जास्त, हालचालीने बरे वाटते.

**हातपायः**– सांध्यात ओढल्यासारख्या वेदना होतात. निःशक्त. फरसबंदीवरून चालताना पायाचे तळवे दुखतात.

**ज्वरः– अंतर्गत उष्णता.**

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः**– *उष्णता*–दमट; उन्हाळा. पहाटे ( अंथरुणात ) आव झाल्यानंतर. संध्याकाळी. पावले दाबून चालण्याने. खाण्यापिण्यानंतर. जांभई आल्याने चर्वण केल्याने.

**ब वाः**– गार मोकळी हवा. गार पाण्याने, वारा सरल्याने.

**सहाय्यक औषधेः**– सल्फ.

**संबंधी औषधेः**– कलि-ब्रा; **पोडो**; लिलि-टि; सल्फु-ॲसि; सेपि.

---

## ५८. ऐलान्थस Ailanthus

**सर्वसाधारणः**– या औषधाचा परिणाम **मन; रक्त; *घसा* व त्वचा** यावर होतो. ठणका लागतो. जलद शक्तिपात होतो. **विकारांचा दुष्ट*पणा* व *गुंगी* उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणात. दुर्गंधी; *निळसरपणा*;** स्राव करवडणारे पातळ. हगवण बरेच वेळा दरवर्षी येते.

**मानसिकः**– डोके वर केल्याने किंवा उभे राहताना मूर्च्छा येते. निजल्यानंतर घेरी येते. उसासे टाकणे. पूर्वी घडलेल्या गोष्टींची आठवण राहत नाही. मंदपणा. एकादा विषय पुनः पुन्हा वाचला पाहिजे किंवा घोळविला पाहिजे. सतत पुटपुट. झोप येत नाही, अस्वस्थपणा, वात वेड लागल्याप्रमाणे, त्यावेळेस डोळे चमकदार दिसतात.

**डोळेः**– रक्ताळलेले. जागे केल्यानंतर भांबावलेला. बाहुल्या मोठ्या. उजेड सहन होत नाही.

**तोंडः**– दातावर कीटण. जीभ कोरडी भेगा पडलेली, पिंगट.

**नाकः**– नाकातून रक्तमिश्रित स्राव येतो. कोरडे. भोवती कंड सुटते व अस्वस्थ वाटते.

**चेहराः**– **काळसर** सुजलेला, चट्टे पडले ग. ओठ सुजलेले. भेगा पडलेले.

**कानः**– गिळताना कानात दुखते. गालगुंड सुजतात. त्याना स्पर्श सहन होत नाही.

**घसा**:– **काळसर** सुजलेला. घसा आत बाहेरून सुजतो. कोरडा–खरखरीत. दुर्गंधी. मान दुखते. तिला स्पर्श–दाब सहन होत नाही. घटसर्प. टानसिलवर खोल **व्रण पडतात** ( डाग्या ) व त्यातून लगद्यासारखा मऊ स्राव येतो. कानाच्या मागील भागात खवखवून कंड सुटते.

**जठर**:– उठून बसल्याने एकाएकी जोराने उलटी होते. विचित्र पोकळपणाची भावना.

**उदर**:– आव, हगवण त्यानंतर फार अशक्तपणा. जुलाब पातळ पाण्यासारखे, दुर्गंधी, लघवीबरोबर नकळत होतात.

**मूत्रेंद्रिये**:– लघवी थोडी; नकळत होते किंवा होण्याची बंद होते.

**श्वसनेंद्रिये**:– श्वासोच्छ्वास जलद, अनियमित. फुफ्फुसे हुळहुळी व थकल्यासारखी. कोरडा खोकला.

**हृदय**:– नाडी जलद, अशक्त.

**मानपाठ**:– मानेचा भाग सुजतो, स्पर्श सहन होत नाही.

**ज्वर**:– दोषी ताप. हृदय अशक्त होते. गार घाम येतो.

**त्वचा**:– त्वचेवर **लांब लांब अंतरावर काळे चट्टे पडतात**. ते दाबल्यानंतर नाहीसे होऊन हळुहळू पुन्हा येतात. आलेली **उगवण नाहीशी होते**. काळे निळे ठिपके, रंगी बेरंगी चट्टे पडतात. मुंग्या आल्यासारखे वाटते. काळ्या लसीनी भरलेले मोठाले भाजल्यासारखे फोड येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो**:– आलेली उगवण नाहीशी होण्याने. वर करताना ( डोके शरीर वगैरे ) अन्नाकडे पाहिल्याने. हालचालीने.

**ब वा**:– कढत पेये. उजव्या कुशीवर निजल्याने.

**संबंधी औषधे**:– आरम–ट्रा; बॅप्टि; लॅक–कॅ.

---

## ८९. ओनास्माडिअम Onosmodium

**सर्वसाधारण**:- या औषधाचा परिणाम ***स्नायू व मज्जातंत–डोळ्यांचे;*** डोक्याच्या मागील भाग; ***स्त्रीजननेंद्रिये*** ( ओटीपोटातील ) कणा यावर होतो. थकवा इतका की जन्मतःच थकला आहे अशा तऱ्हेने वागणे. शीण. **ठणका; हुळहुळेपणा व ताठपणा** विशेषतः वेदनानंतर. लांब, उंच, जवळ यांचा संबंध उमजत नाही. थंड पेयाने व खाण्याने बरे वाटते.

**मानसिक**:– मनाचा गोंधळ धरसोड; **अनिश्चितपणा.** विसराळू. विचारशक्ति मंद. बोलता येत नाही. मानसिक शीण.

**डोके** :– डोके दुखत असताना घेरी येते, डाव्या कुशीवर निजल्याने किंवा हात डोक्यावर उंच केल्याने जास्त होते. डोक्याच्या **मागील भागात दुखते– स्क्रू पिळल्याप्रमाणे** वाटते, पाठीवर निजल्याने. डोळ्यांच्या श्रमाने जास्त होते. अर्धशिशी. डोक्याच्या मागील भागाची डावी बाजू ते खांद्यापर्यंत वर खाली वेदना होतात–श्रम केल्याने जास्त होतात.

**डोळे** :– **ठणकतात–जड झाल्यासारखे वाटतात. थकल्यासारखे वाटतात व** ताठतात. डोळयांच्या विकारांबरोबर रजःपिंडांचे विकार उद्भवतात. **लांब–उंच–कळत नाही.** लाल व हिरवा रंग ओळखता येत नाही. अंतर समजण्यात चूक होते.

**उदर** :– बर्फाचे पाणी, गार पेये पिण्याची वासना. शौचास पिवळे, खिरीसारखे होते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी सुवासिक. वारंवार होते; थोडी होते.

**पुरुषजननेंद्रिये** :– संभोगेच्छा एकसारखी उत्तेजित होते. **मानसिक नपुंसकत्व.** संभोगेच्छा होत नाही. संभोगातिरेकामुळे आलेली मानसिक क्षीणता. शिश्नाचे उत्थापन चांगले होत नाही. वीर्यपात जलद होतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– **संभोगेच्छा नष्ट.** दोन्ही रजःपिंडात आलटून पालटून दुखते. **रजःपिंड व गुद एकेवेळी हुळहुळे होते.** स्तन सुजून हुळहुळे होतात. स्तनाग्रांना कंड सुटते. **धुपणी करवडणारी,** पिवळी व भरपूर जाते. गर्भाशयातील वेदना कपडे सैल केल्याने व पाठीवर निजल्याने कमी होतात. विटाळ सुरू होईल होईल असे वाटते.

**श्वसनेंद्रिये** :– खोकल्याचा ठसका, पांढरा चिकट कफ, गार पेयाने कमी होतो.

**पाठ** :– खालच्या भागात थकल्यासारखे वाटते.

**हातपाय** :– पाय दमल्यासारखे व बधिर. गुडघ्याच्या पोकळीत बधिरपणा. कापसावरून चालतो आहोत असे वाटते. झोकांडे देत चालणे.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***डोळयाच्या श्रमाने.*** संभोगातिरेक. अंधारात. घट्ट कपडे. दमट उष्ण हवा. धक्के बसण्याने.

**ब वा** :– विश्रांति. झोप. खाण्याने. गार पेये. कपडे काढल्याने.

**संबंधी औषधे** :– व्हस-टा; लिलि-टि; सिमि; हेपरि.

---

## ६०. ओपिअम (अफू) Opium

**सर्वसाधारण :-** या औषधाचा परिणाम ***मन***; ***ज्ञानेंद्रिये***; **मेंदू; फुप्फुसे; श्वासोच्छ्वास व पचनेंद्रिये** यावर होतो. **इंद्रियांची निष्क्रियता. वेदनांचा** अभाव. स्राव ( घाम लघवी वगैरे ) **कमी होतात. जीवनशक्ती क्षीण होते. लटके पडणे**, वेदनारहित–मेंदूचे–जिभेचे–**आंतड्याचे**–फुप्फुसाचे वगैरे. कंप; आचके; प्रकाशाने, गरम पाण्याच्या स्नानाने, खोलीच्या उबेने, जास्त होतात. **थरथरणे** विशेषतः झोपेत. फेफरे–झोपेत. **अंतर्गत कोरडेपणा. कढत** वाटते, **डोके–घाम–अंथरुण** वगैरे. भीती; धास्ती; लज्जा; एकदम झालेला आनंद; राग या कारणामुळे उद्भवलेले विकार. ज्या गोष्टीमुळे भीती वाटली असेल त्या गोष्टीची धास्ती सारखी राहते व धास्तीच्या कल्पनेनेच अनेक वेळा विकार उद्भवतात. ज्ञानेंद्रियाची बधिरता. बहुतेक सर्व विकारात बेशुद्धी प्रमाणे गुंगी येते. वेदनारहित व्रण. सर्वांगाला जलयुक्त सूज येते. परका इसम जवळ आल्याने मुलाना आचके येतात. आपण फार सुखी आहोत व शरिराचे पूर्ण स्वास्थ्य असे वाटते. २।३ आठवड्याची म्हाताऱ्यासारख्या चेहऱ्याची तान्ही मुले.

**मानसिक :-** ***शांतपणा.*** अतिशय आजारी असूनसुद्धा स्वतःला काही होत नाही असे म्हणणे. इच्छाशक्तीचा अभाव. बुद्धिमांद्य. खुळचटपणा. खोटे बोलणे. वात–घरी जावेसे वाटते–हातानी काल्पनिक वस्तु उचलणे. दारुड्यांचा वात. मन उल्हसित होते, अनेक स्पष्ट कल्पना सुचतात. आनंदी, खेळकरपणा धाडसी, बेधडक कृत्ये करण्याची प्रवृत्ती. भयंकर देखावे दिसतात, उंदीर, विंचु वगैरे जनावरे दिसतात.

**डोके :-** मेंदूतील रक्तवाहिन्यात रक्त तुंबते. सुनबहिरी. डोक्याचा मागील भाग ओझे ठेवल्यासारखा जड वाटतो त्यामुळे डोके उचलता येत नाही. डोक्यामध्ये हलकेपणा वाटतो विशेषतः वृद्धपणी. धास्तीमुळे, डोक्याला मार लागल्यामुळ घेरी येते.

**डोळे :-** अर्धवट उघडे. बाहुल्या अगदी बारीक होतात किंवा उजेडामुळे बारीक मोठ्या होत नाहीत. डोळे लाल. वटारल्याप्रमाणे. निस्तेज. दृष्टिभ्रम.

**कान :-** तीक्ष्ण, दूर अंतरावर असलेल्या घड्याळाचे टोके ऐकू येऊन झोप येत नाही.

**चेहरा :-** काळसर–फुगीर-सुजलेला व घामाने डबडबलेला, किंवा कढत वा लाल. किंवा आलटुन पालटून लाल व फिकट. धुंद तारवटल्यासारखा

किंवा म्हाताऱ्यासारखा सुरकुतलेला. मुलांचा कालऱ्यासारख्या हगवणीत चेहरा वाळतो. चेहऱ्याच्या स्नायूंचा कंप. तोंडाचे कोपरे उडतात. तोंड वासलेले. दातखिळी बसते. ओठ सुजलेले, पुढे आलेले.

**तोंड** :– जीभ काळसर, लुळी पडते. रक्तासारखा फेस येतो. ओठ थरथरतात किंवा तोंड उघडे राहते. तोंड वासलेले.

**घसा** :– कोरडा. गिळता येत नाही. गिळताना अन्न कंठात उतरते किंवा नाकावाटे बाहेर येते.

**जठर** :– भूक असते पण काहीही खावेसे वाटत नाही. अतिशय तहान लागते ओकाऱ्या होतात. जठरात दुखते व आचके येतात. मळाची किंवा लघवीची ओकारी. उदरातील आवरण्याच्या दाहामुळे होणाऱ्या ओकाऱ्या.

**उदर** :– आत जड ओझे ठेवल्यासारखे वाटते. **आतड्यांचे चलन–वलन बंद होते.** उदरावर शस्त्रक्रिया केल्यानंतर किंवा इतर कारणामुळे. उदर फुगून टणक होते. **शौचास काळे, टणक खडे होतात.** हट्टी मलावरोध–शौचास मुळीच लागत नाही. शौच पुढे येऊन मागे जाते. गुदात फाडल्यासारख्या वेदना होतात. उघड्या गुदद्वारातून रक्तमिश्रित आम वाहतो. शौचास नकळत होते.

**मूत्रेंद्रियेः**– लघवी मूत्राशयात तुंबते, शस्त्रक्रिया केल्यानंतर लघवी सुटावयास वेळ लागतो, धार मंद, भीती धास्तीमुळे लघवी न कळत होते संतापलेल्या आईचे दूध प्याल्यानंतर किंवा धास्तीमुळे वगैरे.

**स्त्रीजननेंद्रियेः**– धास्तीमुळे पाळया बंद होतात. बाळंतपणात वेणा थांबून आचके येतात व गुंगी येते. कष्टार्तवात गर्भाशयात बाळंतपणासारख्या वेदना होतात व त्यावेळेस शौचास लागली आहे असे वाटते, व ओणवे होणे भाग पडते. धास्तीमुळे होणारा वाखा. गर्भाचे फिरणे जोराचे असते किंवा सुखकारक वाटते. बाळंतपणानंतरचा विटाळ भीतीमुळे एकदम बंद होतो. गरोदरपणाच्या वेदना थांबल्यानंतर आचके येऊ लागतात.

**श्वसनेंद्रियेः**– झोप लागता लागता श्वासोच्छ्वास थांबतो व तो रोग्याला हलविल्या-शिवाय पुन्हा सुरू होत नाही छातीत घुरघुरते व श्वासोच्छ्वास **असमान असतो.** उसासे टाकणे. **खोल घोरल्यासारखा मोठ्याने श्वासोच्छ्वास होतो.** छाती कढत वाटते. खोकताना गुदमरल्यासारखे वाटून चेहरा निळा होतो, किंवा खूप घाम येतो. कफात रक्त पडते. छाती कढत वाटते.

**हृदयः**– अशक्त **नाडी भरलेली पण मंद.** भोवती आग होते.

**पाठः**– मागे वाकते. धनुर्वात. मानेच्या शिरा फुगतात.

**हातपायः**– गार. स्नायूंना कंप येतो, भीतीमुळे लुळे पडतात. पंजाच्या शिरा फुगतात. आपले पाय कापले आहेत, ते स्वतःचे नसून दुसऱ्या कोणाचे तरी आहेत असे वाटते. बधिर.

**झोपः**– गाढ. *अत्यंत गुंगी*. दमल्यासारखे वाटून झोप येत नाही. दूरदूरचे आवाज ऐकू येत आहेत असे वाटून झोप येत नाही. अंथरूण कढत आहे असे वाटते व त्यावर निजावेसे वाटत नाही. दारुड्यांचा निद्रानाश, झोप येत आहेसे वाटते पण लागत नाही. स्वप्नात कुत्री, मांजरे, काळ्या आकृत्या दिसतात. बेशुद्धीत डोळे उघडे असतात.

**ज्वरः**– हुडहुडी भरून ताप येतो. अंग तप्त **होते, कढत घाम येतो व गुंगी येते.** हातपाय गार असतात. पांघरूण नकोसे वाटते. पायाशिवाय सर्व शरीराला कढत घाम येतो. ताप थोडा पण गुंगी जास्त.

**त्वचाः**– इकडे तिकडे मुंग्या आल्यासारखे वाटते. **सर्वांगाला कंड सुटते.** व्रण वेदना रहित.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा होः– *भावना*– भीती; **धास्ती;** लज्जा; आनंद. *दारू पिण्यामुळे*. झोपेत. सुरू **असलेला स्राव बंद झाल्याने किंवा केल्याने. आलेली** उगवण नाहीशी **झाल्याने. अंग तापल्याने.** कोळशाचा धूर. **उब.**
**ब** वाः– गारव्याने. सारखे चालण्याने. पांघरूण काढल्याने.

**सहाय्यक औषधेः– अल्युमि; प्लंबं; फास्फ; बॅरि–का; ब्रायो.**

**संबंधी औषधेः**– अको; ॲन्टी–टा; नक्स–मो; नक्स–व्हा; सॅम्बुक; हायासा.

---

## ६१. ओरिगॅनम Origanum

**सर्वसाधारणः**– या औषधाचा परिणाम स्त्रीजननेंद्रियावर होतो. संभोगाची तीव्र इच्छा होते इतकी की मुष्टिमैथुनाने तृप्ति करावी लागते. कामोन्माद. स्तनाग्रे सुजून त्यांना कंड सुटते स्तन दुखतात वैषयिक स्वप्ने पडतात, मनात कल्पना येतात व चाळे करण्याची प्रवृत्ती. श्रम करावे असे वाटते व त्यामुळे धावावे लागते. उदासीन पण लग्नाचे विचार आल्याने उदासीनता नाहीशी होते.

**संबंधी औषधे :**– कॅन्था; प्लॅटि; व्हॅले; हायासा.

---

## ६२. ओलिअम अॅनिमॅलिस Oleum Animalis

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम ***मज्जातंतू*** ; पचनेंद्रिये; एखाद्या जागी किंवा लहानशा जागी व शरीरातील स्राव यावर होतो. अशक्तपणा व कंप–हात, गुडघे–पावले वगैरेत दिसतो. हुळहुळेपणा. खालून वर उचलल्याप्रमाणे किंवा ओढल्याप्रमाणे वाटते. मागून पुढे येणाऱ्या वेदना. **लघवीसारखा वास–**ढेकरा धुपणी वगैरे. **बर्फासारखा गारपणा–**दाताच्या टोकापासून घशात, जठरात वगैरे. पाय घाशीत चालणे. तळपायाला येत असलेला घाम बंद झाल्याने उद्‌भवलेले विकार– विशेषतः दमा.

**मानसिक :–** खिन्न, उदास. अंतर्मुख. विचार आलेले नाहीसे होतात. फुसफुसल्याप्रमाणे बोलणे. आळस; बसावेसेच वाटते.

**डोके :–** मूर्च्छा किंवा घेरी येते, जठराच्या विकारामुळे, डोके मागे वाकविल्याने बरे वाटते. अर्धशिशीत वारंवार लघवीला जावे लागते व होते.

**डोळे:–** खाताना डोळयातून पाणी येते. डोळयापुढे चकाकणाऱ्या वस्तु दिसतात. डोळयावर कातडे लोंबत आहे असे वाटते. पापण्या लवतात.

**चेहरा:–** गालाची हाडे वर ओढल्यासारखी वाटून दुखतात. ओठ कापतात. ओठावर अंड्याचा बलक वाळला आहे असे वाटते. जबड्याखाली सूज येते ( उजव्या).

**तोंड:–** तेलकट झाल्यासारखे वाटते. फेसाळ कापसाच्या तुकड्याप्रमाणे लाळ येते. खाताना गाल चावला जातो. दातावर दात दाबल्याने दात दुखणे कमी होते. जीभ भाजल्याप्रमाणे हुळहुळी.

**घसा:–** घशात तिखट वाफ आहे किंवा हुळहुळी. रेघ मारली आहे असे वाटते –खोकताना जास्त होते. खाकरताना पिंगट बुळबुळीत कफ बाहेर येतो. घसा कोरडा, हुळहुळा, आवळल्यासारखा वाटतो; अन्न पेये गिळता येतात पण आवंढा गिळता येत नाही. गार हवा शिरत आहे असे वाटते.

**जठर:– तोंडाला पाणी सुटते–** तंबाखू खाल्याने किंवा ओढल्याने बरे वाटते. जठरात ठुसठुसते किंवा आत पाणी आहे असे वाटते. आत गार वाटते, कढत वाटते किंवा आवळल्यासारखे वाटते, ढेकर आल्याने बरे वाटते.

**उदर:–** वात धरून फुगते. गुरगुर आवाज होतो.

**मूत्रेंद्रिये:– भरपूर– फिकट रंगाची– मासासारख्या वासाची–** लघवीला होते, विशेषतः हिस्टेरियात किंवा अर्धशिशी दुखत असताना. लघवीला थोडे थोडे व वारंवार होऊन नंतर डोके दुखावयास लागते. लघवी हिरवी.

**पुरुषजननेंद्रियेः–** शौचाच्या वेळी कुंथल्याने वीर्यपात होतो. **अंड आलटून पालटून सुजतात; वर उचलल्यासारखे वाटून दुखतात.** संभोगेच्छा वाढते. वीर्यपात लवकर होतो. गुदद्वार व जननेंद्रिये यामधील भागात दाबल्यासारखे वाटते वीर्यवाहिनी नलिकेत वेदना होतात.

**स्त्रीजननेंद्रियेः–** पाळी लवकर, विटाळ थोडा, काळा. विटाळशी होण्याचे अगोदर स्तन हुळहुळे होतात. स्तनात व स्तनाग्रातून आतून बाहेर चमका येतात.

**श्वसनेंद्रियेः–** छाती आवळल्यासारखी वाटते. तळपायाचा घाम बंद झाल्यामुळे उत्पन्न झालेला दमा.

**हृदयः–** धडधडताना काळजी वाटते. नाडी मंद.

**पाठः–** कंबरेत लचकल्यासारखे वाटते. डोके वर करताना मणक्यात कटकट आवाज होतो. उजवे तिकोनी हाड ठणकते–दाबल्याने बरे वाटते.

**ज्वरः–** थंडी व ताप आलटून पालटून. तळपायाला दुर्गंधी गार घाम येतो. टाचांना खारट वासाचा घाम येतो.

**त्वचाः–** सांध्यांच्या बेचका करवडलेल्या. हाडापासून सुटून मोकळी झाल्यासारखी वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः–** थंडीने, खाण्याने. स्राव वगैरे बंद झाल्याने. आवाज. गरम पेये. दुपारी २ ते ९ पर्यंत.

**ब वाः–** चोळण्याने. दाबल्याने. मोकळी हवा. ताणल्याने.

**संबंधी औषधेः–** टेल्यु: सल्फ.

---

## ६३. ओलिअंडर ( कण्हेर ) Oleander

**सर्वसाधारणः–** या औषधाचा परिणाम– **पचनेंद्रिये**; त्वचा, हृदय व मज्जातंतू यावर होतो. **बधिरपणा व स्नायूंचा लुलेपणा.** पेटके आल्याप्रमाणे हात वाकडे होतात. कंप व **अशक्तपणा**, झोपाळू. छाती व जठर पोकळ आहे असे वाटते, खाण्यानंतर–पण ब्रॅन्डी घेतल्याने बरे वाटते. अर्धांगवात. बोलता येत नाही किंवा कष्टाने येते. स्राव नकळत होतात. थरथरल्यासारखे वाटते. गुंगी.

**मानसिकः–** स्मरणशक्ति मंद. कोणत्याही गोष्टीचे आकलन लवकर होत नाही. उदास, खिन्न, स्वतःविषयी अविश्वास.

**डोके**:– घेरी– अंथरुणातून उठताना– खाली किंवा एखाद्या वस्तूकडे एकसारखे पाहिल्याने. डोक्याच्या कातडीवर–कानाच्या मागे पुटकुळ्या येतात. कपाळाला केसांच्या कडेला कंड येते, उष्णतेने जास्त होते तिरळे किंवा तिरकस पाहण्याने डोके दुखणे थांबते. अंग लुले पडण्याच्या अगोदर बरेच दिवस घेरी येत राहते. ओल सर खवडे, डोक्याच्या मागील भागात.

**डोळे**:– आग डोक्यात ओढल्यासारखे वाटतात. वस्तूकडे तिरकस पाहिल्यानेच त्या चांगल्या दिसतात. वाचताना डोक्यातून पाणी येते. वस्तू एकाच्या दोन दिसतात, विशेषतः घेरी येताना.

**चेहरा**:– फिकट, बसलेला. वरचा ओठ बधिर.

**तोंड**:– जीभ बधिर. अन्न चावतानाच दात दुखतात. बोलता येत नाही.

**जठर**:– खा खा सुटते भराभर खावेसे वाटते. ओकारीत हिरवे पाणी पडते. खाण्यानंतरसुद्धा जठर पोकळ वाटते. ब्रॅन्डी प्याल्याने बरे वाटते. गार पाणी प्यावेसे वाटते.

**उदर**:– शौचात अपक्व अन्न पडते. आदल्या दिवशी खाल्लेले अन्न जसेच्या तसेच शौचावाटे पडते. वात सरताना पातळ शौचास होते. खाण्यानंतर किंवा नकळत शौचास होते. पोटाच्या खळीत उडते.

**मूत्रेंद्रिये**:– नकळत लघवीला होते.

**हृदय**:– धडधडते. थकवा वाटतो व छातीत पोकळ वाटते.

**स्त्रीजननेंद्रिये**:– अंगावर पाजल्यानंतर अशक्तपणा वाटतो, अंग कापू लागते. खोलीत सुद्धा चालवत नाही.

**गळा**:– गार वारे लागत आहे असे वाटते. ( डावी बाजू )

**पाय**:– लुले पडल्यासारखे वाटतात. पावले सारखी गार राहतात.

**त्वचा**:– अत्यंत नाजुक, थोड्याशा चोळण्याने हुळहुळे होऊन फाटते व त्यातून रक्त येते. किंवा **लस वाहते**. पुटकुळ्या येतात व त्याना उवा चावल्याप्रमाणे कंड सुटते. डोक्याच्या मागील भागाची कंड व खवडे.

**ज्वर**: **मानसिक श्रम केल्याने अंग तापते.**

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– अंगावर पाजल्याने. चोळण्याने, उघडे झाल्याने, कपड्याच्या घर्षणाने.

**ब वा**:– तिरळे किंवा तिरकस पाहण्याने. ब्रँडी पिण्याने.

**संबंधी औषधे**:– अनाका; कोनि; नेट्र–मू; पल्स; ऱ्हस-टा; सिंको; सेपि; स्पायजे.

---

## ६४. ओलिअम जेकोरिस ( काडलिव्हर तेल )
Oleum Jecoris

**सर्वसाधारणः**– या औषधाचा परिणाम छाती, यकृत व स्नायुबंध यावर होतो. शरीर वाळते; शीण येतो. पोषण नीट होत नाही. **वाळलेली तान्ही मुले** त्यांचे डोके व हात कढत असतात रात्री ताप आल्यासारखा वाटून अस्वस्थपणा वाटतो. क्षयाची प्रथमावस्था. स्नायुबंध ताठलेले. वेदनारहित गळू. मुलाना दूध सोसत नाही. पिवळेपणा-जीभ-कफ-धुपणी-त्वचा वगैरे. स्त्रियांच्या वरच्या ओठावर व हनुवटीवर दाट केस येतात.

**तोंडः**– जीभ पिवळी. घाण येते.

**उदरः**– जड व हुळहुळे– यकृताच्या जागेत, श्रमाने जास्त होते.

**स्त्रीजननेंद्रियेः**– मुलीना योग्य वेळी विटाळ सुरू होत नाहीं. धुपणी पिवळी, कंबर अशक्त.

**पाठः**– शहारे येतात, फडफडल्यासारखे वाटते. खालून वर.

**श्वसनेंद्रियेः**– घसा बसतो. वारंवार खोकल्याची ढास लागते. **छाती हुळहुळी होते.** खोकताना छातीत धडधडते. **छातीत टोचते–** कोठेतरी लहानशा जागी आग होते. वारंवार सर्दी होते. कफ पिवळा. थुंकीतून रक्त जाते.

**हातपायः**– संधिवात; स्नायु व स्नायुबंध ताठतात.

**ज्वरः**– तळहाताची आग होते– संध्याकाळी ताप येतो. ताप आला म्हणजे खोकला कमी होतो. रात्री घाम येतो. क्षय.

**त्वचाः**– खवडे. गजकर्ण. ( वरून लावावे ). पिवळी.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः**– थंड दमट हवा किंवा जागा. दूध. हालचाल.

**संबंधी औषधेः**– फास्फ.

---

## ६५. कलि आयोडेटम Kali Iodatum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **गाठी**; नाक; डोळे; फुप्फुसे ( वरचा भाग ) व हाडावरील आवरण यावर होतो. **विकार हट्टी व जीर्ण**. संधिवात व वात रक्त होण्याची प्रवृत्ति. गरमीचे दुष्परिणाम. लक्षणांचा, विकारांचा व त्यांच्या वैशिष्ट्याची गुंतागुंत होऊन कोणत्या औषधाची निवड करावी असा

प्रश्न पडतो. रक्तवाहिन्यांचा लवचिकपणा कमी झाल्यामुळे रक्ताचा दाब वाढतो. **अशक्तपणा.** स्राव-**भरपूर-पाण्यासारखे-करवडणारे**-खारट-दाट-**हिरवे** व दुर्गंधी. वेदना ठेचल्याप्रमाणे किंवा एकदम टोचल्याप्रमाणे होतात. दुखापत झाल्यानंतर दीर्घकाळाने त्या जागी वेदना सुरू होतात. दोन्ही बाजूस सारख्याच तऱ्हेचे उपद्रव. हुळहुळेपणा. जलयुक्त सूज, रक्तस्राव होण्याची प्रवृत्ति. त्वचेखाली रक्ताचे ठिपके पडतात. गार दूध सोसत नाही. झिजणे. **मोकळया हवेत चालण्याची आवड.** शरीरात काही अर्थ उरला नाही सर्व संपले आहे असे वाटते. विकार झालेल्या भागात किंवा हाडात गारपणा.

**मानसिक** :– उदासीन. संतापी. कठोर. निर्दय. स्वतः कुटुंबातील माणसे, मुले यांचा संताप, चीड. आयुष्यातील क्षुल्लक गोष्टी असह्य होतात. शिव्या देणे. चाळणे भाग पडते– घाबरटपणामुळे.

**डोके** :– दोन्ही बाजूस सारख्याच तऱ्हेने दुखते, उष्णतेस दाबल्याने जास्त होते. डोक्याचे कातडे हुळहुळे. भेगा पडतात. अंधारात किंवा आगगाडीतून प्रवास करताना घेरी येते. कवटीवर टणक गुठळ्या येतात व दुखतात. डोके खाजविल्याने व्रणाप्रमाणे कातडी दुखते. डोके मोठे, जबडे लहान–मुडदूस. केसांचा रंग बदलतो, नंतर गळतात.

**डोळे** :– आग होते–पाणी येते व फुगतात. डोळ्यातील रक्तवाहिन्या फुगतात. डोळे एकसारखे हालतात. पापण्या मिचकाविताना दुखतात.

**कान** :– कानात आवाज होतात. उकरल्याप्रमाणे वेदना होतात.

**नाक** :– लाल. सुजलेले. **नाकाच्या बुंध्याशी-गालाच्या हाडात व जिभेत घट्ट बांधल्यासारखे दुखते.** सर्दी–खूप शिंका येतात. नाकातून करवडणारे कढत पाणी वाहते. मोकळ्या हवेत बरे वाटते. पिनस–नाकाच्या मधील पडद्याला भोक पडल्यामुळे झालेले. हवा दमट झाली की सर्दी होते. गार हिरवे पाणी येते.

**चेहरा** :– सकाळी ओठावर बुळबुळीत थर जमतो.

**तोंड** :– चव खारट पण सकाळी जागे झाल्यावर कडू. त्रासदायक दातदुखी, आत किडा उकरत आहे असे वाटते. लाळ येते. रक्तमिश्रित गोड लाळ.

**घसा** :– घसेदुखी फार बोलण्यामुळे झालेली.

**जठर** :– गार अन्न व पेये विशेषतः दूध सोसत नाही. फार तहान लागते. ठुसठुस, आग होते.

**उदर :–** वात धरतो–किंचाळण्याप्रमाण आवाज होतो. क्षयरोगात सकाळी हगवण लागते. वात धरल्यामुळे **मोकळी हवा हवीशी वाटते.** व गुदमरल्यासारखे वाटून सकाळी जाग येते. हगवणीत कंबर मोडल्यासारखी दुखते, किंवा विटाळ सुरू होईल असे वाटते. तान्ह्या मुलांच्या गुदद्वारात भेगा पडतात.

**मूत्रेंद्रिये :–** लघवीला भरपूर व वारंवार होते विशेषतः रात्री.

**स्त्रीजननेंद्रिये :–** धुपणी करवडणारी तांबड्या पाण्यासारखी. विटाळसेपणी गर्भाशय पिळल्यासारखे वाटते. गुल्मे- गर्भाशयाची. स्तन वाळतात.

**पुरुषजननेंद्रिये :–** परमा जुनाट. स्राव दाट हिरवा. अंड वाळतात.

**श्वसनेंद्रिये :–** दमा–सुंसूं आवाज होतो. **श्वासनलिका हुळहुळी.** आवाज बसतो. कोरडा खोकला–सकाळी जास्त. कफ–हिरवा, साबूच्या फेसाप्रमाणे. छातीत पुढून मागे टोचते. प्लुरिसीत पाणी साचते. सर्दी छातीत उतरते. न्युमोनिआ. छातीच्या मधल्या हाडापासून पाठीपर्यंत मागे दुखते.

**हृदय :–** धडधडते व चमका मारतात, चालताना जास्त होते.

**मानपाठ :–** गलगंड, स्पर्श सहन होत नाही. माकडहाडात सापळ्यात धरल्याप्रमाणे दुखते. कमरेत मार लागल्याप्रमाणे दुखते, वाकून बसल्याने जास्त. गुदास्थीवर पडल्याप्रमाणे दुखते.

**ज्वर :–** हाडात थंडी वाजते. विकार झालेल्या भागात थंडी वाजते. ताप संध्याकाळी येतो, उघडे रहावेसे वाटते पण त्यामुळे शहारे येतात. रात्री भरपूर घाम येतो पण त्याने बरे वाटते.

**त्वचा :–** त्वचेवर वेदनायुक्त गाठी येतात. पित्ताच्या मोठमोठाल्या गांधी. लहान गळवे येतात त्यांचे व्रण पडतात.

**हातपाय :–** गृध्रसी वात. रात्री जास्त दुखते, दाबल्याने जास्त होते. अंथरुणात राहवत नाही. कमरेच्या सांध्याच्या भागात दुखते. त्यामुळे लंगडत चालावे लागते. गृध्रसीवात दुखत असलेल्या कुशीवर निजल्याने, बसल्याने, उभे राहिल्याने दुखते. त्यामुळे रात्री जाग येते. गुडघ्यात पाणी साचते, आंगठ्याचे टोकाला व्रण पडून ते पिवळे होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– उष्णता. रात्री.** स्पर्श. दाबल्याने. दमट हवा. पाऱ्याचे दुष्परिणाम, हवेतील बदल. धक्का–हिसका. गार अन्न–पेये. सूर्यास्त ते सकाळ.

**ब वा :– चालण्याने. मोकळी गार हवा.**

**संबंधी औषधे :–** आयो; सल्फ; सिफि.

---

## ६६. कलि आर्सेनिकम् Kali Arsenicum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम त्वचा व रुधिराभिसरण यावर होतो. रात्री विकार जास्त त्रासदायक होतात. मूत्रपिंडाचा शोथ. हृदयाची धडधड. मोकळ्या हवेचा तिटकारा. त्वचेचा कॅन्सर. एकदम आवाज ऐकल्याने किंवा एकदम स्पर्श कोणी केल्यास सर्व शरीरात कंप येतो.

**डोके** :– मोठे झाल्यासारखे वाटते.

**डोळे** :– बटबटित. पुढे आल्यासारखे दिसतात.

**जीभ** :– आग होते; बधिर झाल्यासारखी वाटते.

**उदर** :– पोटाच्या खळीतून गोळा वर कंठात आल्यासारखे वाटून गुदमरते, मोठ्याने ढेकरा आल्याने बरे वाटते. गुदद्वारात तापलेले लोखंड ठेवल्यासारखे वाटते. अगोदर पुष्कळ वात सरतो नंतर जुलाब व्हावयास लागतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– कोबीच्या फुलासारखी गर्भाशयाच्या मुखाशी उगवण, दुर्गंध स्राव जातो.

**ज्वर** :– थंडी सहन होत नाही. शहारे येतात. उन्हाळ्यात सुद्धा अंगात पुरेशी ऊब येत नाही.

**त्वचा** :– कोरडी–खपल्या बसतात व सुरकुतते. यौवनपीटिका, विटाळसेपणी जास्त होतात. अंगाला भयंकर कंड सुटते–उष्णतेने, चालण्याने, उघडे झाल्याने जास्त होते. इसब. कोपराच्या व गुडघ्याच्या खळीत भेगा पडतात. पायावर काळे व्रण पडतात त्यातून रक्तासारखे दुर्गंधी पाणी वाहते–कापल्याप्रमाणे वेदना होतात. आग होते, कंड सुटते व श्वासोच्छ्वास करण्यास त्रास होतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– स्पर्शाने. आवाजाने. पावले गार झाल्याने. पहाटे १ ते ३ वाजेपर्यंत.

**संबंधी औषधे** :– रॅडि.

---

## ६७. कलिकार्बोनिकम ( जवखार ) Kali Carbonicum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम स्नायु; स्नायुबंध; *हृदय*; **गर्भाशय; कंबर**; सांधे; **श्लेष्मल त्वचा**; *छाती* (उजवी, खालचा भाग); **डोळे; रक्त** व डावी बाजू यावर होतो. **बुद्धिमांद्य. स्नायू; हृदय**; पाठ व हात पाय याचा *अशक्तपणा*. **घाम पाठ दुखणे व अशक्तपणा** ही लक्षणे

बहुतेक विकारात दिसून येतात. **कंबर मोडल्यासारखी वाटते** त्यामुळे टेकून उभे रहावे लागते किंवा **निजावे लागते. नाजुकपणा रक्त. पातळ; अंग गार,** उबेकरता गरम कपडे घालावेसे वाटतात. लक्षणे संदिग्ध, सांगता येत नाहीत किंवा गुंतागुंतीची. घष्टपुष्ट दिसणारे पण निःशक्त वृद्ध इसम. **अंगावर जलयुक्त सूज येते.** वाखा किंवा बाळंतपणानंतर उद्भवलेले विकार. हवेतील बदल सहन होत नाही. **थंडी** सहन होत नाही. ***एकदम टोचल्यासारखे वाटते*** – सांध्यात – स्नायूत छातीत; डोक्यात– पोटाच्या खळीत–पाठीत वगैरे. **ठुसठुस** सर्वांगात किंवा एखाद्या भागात. **बधिरपणा व गारपणा एखाद्या भागात** – उदरात बोटांना वगैरे. त्वग्रोग किंवा व्रण, नाडी व्रण बाह्योपचाराने बरे केल्यावर उद्भवलेले विकार. स्राव करवडणारे. ज्या बाजूवर झोपले असेल ती बाजू दुखते किंवा बधिर होते. आचके देकर आल्याने कमी होतात. एकाएकी बेशुद्धि येते. अंथरुण खाली खाली जात आहे असे वाटते. सर्व शरीर पोकळ झाले आहे असे वाटते. जरा स्पर्श केला की दचकणे–विशेषतः तळपायाला. भाजल्यासारखी आग होते. गार हवा कढत आहे असे वाटते. न्युमोनिया झाल्यानंतर सुरू झालेले विकार.

**मानसिक** :– चिडखोर. **एकांताचा भीतियुक्त तिटकारा.** सहजासहजी दचकणे – झोप लागत असताना किंवा स्पर्शाने. भविष्याची – भुतांची, मरणाची भीती वाटते. स्वतःला झालेल्या रोगाविषयी काळजी वाटते. हट्टी. वेदना –आवाज स्पर्श सहन होत नाही. अंथरूण खाली जात आहे असे वाटते. स्वतःच्या जीवनावश्यक गोष्टी व कुटुंबाविषयी असंतुष्ट किंवा भांडण करणे.

**डोके** :– गार वारे लागल्याने डोके दुखावयास लागते. डोकेदुखी डोळ्यापर्यंत जाणवते; गाडीत बसल्याने, खोकताना, शिंकताना, जांभई येताना जास्त होते, डोके वर करून कपाळावर दाबल्याने बरे वाटते. डोके दुखण्यामुळे जाग येते. डोक्यात सैल झाल्यासारखे वाटते. केस कोरडे, गळून पडतात, दाढी, कानशिल, भुवया. कातडीवर वेदनायुक्त गुल्मे येतात.

**डोळे** :– शिणलेले. दृष्टिपुढे थेंब– ठिपके तरंगत आहेत असे वाटते. आतील कोपऱ्याना **फुगीरपणा** येतो. वरच्या पापण्या पाण्याने भरलेल्या पिशवीप्रमाणे फुगीर होतात. दृष्टिमांद्य संभोगानंतर, गोवरानंतर किंवा वाखा झाल्यानंतर, पापण्या गार. डोळे मिटल्यानंतर प्रकाश मेंदूपर्यंत घुसतो आहे असे वाटते.

**कान** :– आतून बाहेर टोचल्यासारखे वाटते. करकर आवाज होतात. उजवा कढत डावा फिकट व गार.

**नाक** :- हवेत बदल झाला की सर्दी होते. नाक चोंदते मोकळया हवेत बरे वाटते. जीर्ण सर्दी- नाक चोंदते, तोंडाने श्वासोच्छ्वास करावा लागतो; दाट पिंवळा खुप शेंबूड पडतो- दुर्गंधी हिरवा शेंबूड पडतो. नाक सुजते. खपल्या बसतात. सकाळी चेहरा धुताना नाकातून रक्त येते. सर्दी खाली घशात उतरते. नाक लाल होऊन वर पुटकुळया येतात.

**चेहरा** :- फुगीर. फिक्ट; आजाऱ्यासारखा; डोळे खोल गेलेले.

**तोंड** :- चिकट बुळबुळीत. जीभ पांढुरकी. गरम थंड काही खाताना दात दुखतात. हिरड्याना कंड येते. त्या दातापासून वेगळया होतात व आतून पू येतो. पायोरिया. दातदुखी व डाव्या स्तनात टोचणे आलटुन पालटुन, खाताना जास्त होते. तोंड येते; पुष्कळ लाळ गळते.

**घसा** :- ***गिळताना त्रास होतो.*** अन्न हलुहलु खाली उतरते. सकाळी चिकट कफ खाकरून काढावा लागतो. अन्न अन्ननल्किेत मध्यापर्यंत उतरते नंतर गुदमरल्यासारखे वाटून ओकाऱ्या होतात, अन्ननल्कि बारीक होते. अन्नाचे कण सहज कंठात शिरतात. काटा खुपल्याप्रमाणे टोचते.

**जठर** :- ढेकराबरोबर खारट अन्न बाहेर येते. ओकारीत आंबट कफ पडतो. **जठर व उदर** फुगते - दाब सहन होत नाही. थोडे खाल्ले प्याले तरी **भरल्यासारखे** वाटते. **जठर पाण्याने भरले आहे असे वाटते.** जठराच्या मागील बाजूस व बेंबीजवळ **ठुसठुसते.** जठरातील वेदना छातीत-पाठीत-हातापायापर्यंत जातात. आंबट ढेकरा. मळमळ, निजल्याने बरे वाटते. रात्री ओकावयास होते.

**उदर** :- पोटाच्या खळीत भीतीचा गोळा येतो. वात धरून उदर **फुगून टणक** होते. पोटदुखी-कापल्यासारख्या वेदना होतात, दोन्ही हातानी दाबून वाकून बसल्याने बरे वाटते. वेदना होताना अंग आतबाहेर गार होते. उष्ण पेये प्यावीशी वाटतात - गरम पांघरावसे वाटते. **शौचास कष्टाने होते. मोठे टणक गोळे** - पडतात त्यामुळे गुदात फाटल्यासारखे वाटून, आग होते. मलावरोध विटाळसेपणी. हगवण व मलावरोध आलटुन पालटून. यकृताच्या भागात टोचते-यकृत हुळहुळे होते. जलोदर. कावीळ. मूळव्याध-स्पर्श सहन होत नाही- आग होते-रक्त येते-सुजतात-खोकताना-लघवी, करताना मोड बाहेर येतात, घोड्यावर (सायकल) बसल्याने बरे वाटते. गुदात सुया टोचल्याप्रमाणे वेदना होतात, किंवा आत तप्त लोखंडी सळई आहे असे वाटते, गार पाणी लावल्याने बरे वाटते. आतड्यांतून गार पाणी वाहात आहे असे वाटते-विटाळसेपणी. गुद सहज बाहेर येते. जुनाट हगवण,

अन्नपचन न होणाऱ्या इसमांची; दिवसाच फक्त शौचास जावे लागते. पाळीनंतर मलावरोध. उदराच्या डाव्या बाजूने गोळा घशापर्यंत वरखाली होत आहे असे खोकताना वाटते.

**मूत्रेंद्रिये :–** रात्री लघवीला वारंवार जावे लागते. लघवीला बसल्यानंतर बऱ्याच वेळाने लघवी सुरू होते. लघवी हळुहळु होते व होताना मूत्रमार्गात जळजळते. **लघवी फेसाळ.** खाली चिकट-दाट-लाल गाळ सांचतो. डाव्या मूत्रपिंडात आग होते मूत्रपिंडाच्या जागेत टोचल्याप्रमाणे वेदना होतात व त्या कुल्यातून मांड्यापर्यंत येतात. थंडीमुळे किंवा मार लागल्यामुळे मूत्रपिंडाचा शोथ. खोकताना, शिंकताना लघवी होते. लघवी होण्याचे अगोदर बराच वेळ मूत्राशयावर दाबल्यासारखे वाटते, जितके जास्त कुंथावे तितकी थोडी लघवी होते.

**पुरुषजननेंद्रिये :–** स्वप्नावस्था फार होते, त्यामुळे अशक्तपणा येतो, नंतर शिश्न वेदनायुक्त ताठते. संभोगानंतर अत्यंत थकवा येतो; कित्येकवेळा कांपरे भरते. झोप येत नाही व दोन तीन दिवस बेचैनपणा येतो. संभोगातिरेकाचे दुष्परिणाम. संभोगाचा तिटकारा. जुनाट परमा-लघवी होताना व नंतर जळजळते. स्राव थोडा वेदनायुक्त. जननेंद्रियात चमत्कारिक भावना होत राहिल्यामुळे तिकडे सारखे लक्ष लागते.

**स्त्रीजननेंद्रिये :–** पहिला विटाळ लवकर सुरू होत नाही, त्यामुळे छातीचे विकार उद्भवतात किंवा जलोदर होते. विटाळ बंद होतो. **वेदना होऊन नंतर करवडणारा विटाळ सुरू होतो.** पाळी अगोदर आली तर विटाळ फार जातो– उशीरा आल्यास विटाळ थोडा व फिकट असतो. रक्तप्रदर स्राव सारखा सुरू असतो, त्यामुळे शरीर थकते व फिकट पडते. गर्भपाता-नंतरचा रक्तप्रदर. वाळ्यानंतर किंवा बाळंतपणानंतर कंबर दुखते–मोडल्या-सारखी वाटते. गर्भाशयातील गुल्मे. बाळंतज्वर– ओटीपोटात कापल्यासारख्या वेदना होतात, पोट फुगते, लघवी काळी व थोडी होते, नाडी जलद चालते. बाळंतपणात येणारे आचके–रोगी सावध असतो, ढेकर आल्याने आचके कमी होतात. वेणा-मंद पाटीत सुरू होऊन त्या कुल्यातून पायाकडे येतात. विटाळसेपणी जननेंद्रिये हुळहुळी होतात, अंगावर पित्ताच्या गांधी येतात. स्तनात फाडल्याप्रमाणे चमका येतात. आंघोळ केल्याने विटाळ कमी होतो.

**श्वसनेंद्रिये :–** जरा हालचाल केल्याने किंवा चालताना धाप लागते. **दमा** व हगवण आलटुन पालटून. एकसारखी कोरडी खोकल्याची ढांस लागते.

त्यामुळे कोरड्या ओकाऱ्या येतात किंवा **गुदमरल्यासारखे वाटते** नंतर ओकावयास होते. डांग्या खोकला. गोवरानंतरचा खोकला. कफ-दुर्गंधी-चिकट-गांठ्याळ-दाट-रक्तमिश्रित पिवळा-पिवळसर हिरवा-पुवळलेला व भरपूर पडतो. किंवा लहान वाटोळ्या गोळ्या सहज बाहेर फेकल्या जातात. कंठात कफ साचल्यामुळे शब्द उमटत नाहीत जोराने शिंका येतात. क्षयरोग, न्युमोनिआ. कफाची चव आंबूस किंवा तिखट असते. पहाटे ३ ते ५ खोकला जास्त असतो, किंवा खाण्यापिण्यानंतर जास्त होतो. छाती हुळहुळी होते. आत चमका मारतात-गार झाल्यासारखे वाटते. श्वास कष्टाने होतो. कफाने छाती भरली असली तरी कफ बाहेर येत नाही, मुलांना त्यामुळे पिता येत नाही; व झोप येत नाही. दम्यात गुडघ्यावर हात ठेवून पुढे वाकून बसल्याने बरे वाटते. पावसाळी गार हवेत दमा जास्त होतो. फुप्फुसे बरगड्याना चिकटली आहेत असे वाटते.

**हृदय :-** दोऱ्याला लोंबकळत आहे असे वाटते. हृदयाच्या जागेत आग होते. धडधडते, नंतर थकवा येतो. टोचल्याप्रमाणे वेदना होतात. हृद्रोगामुळे उत्पन्न झालेला दमा. श्वासोच्छ्वास जलद व वरवर होतो. खाताना, पिताना दम धरवत नाही धडधड सुरू होते. व सर्व शरीर हादरते, हातापायाच्या बोटांच्या टोकापर्यंत ठुसठुसते. नाडी-**अशक्त-अनियमित-मधुन मधून थांबते.**

**पाठ :-** कोणत्याही विकारात कंबर धरते किंवा वेदना पाठीतून सुरू होतात. **पाठ व पाय मोडल्यासारखे वाटतात**-जड वाटतात. कण्याच्या उजव्या बाजूस आग होते. खाताना कण्यात दुखते. पाठ व मान सकाळी ताठते. पाठदुखी निजल्याने कमी होते. कमरेत एकदम चमका येतात व त्या वर पाठीत व खाली मांड्यात पसरतात.

**हातपाय :-** हात निःशक्त-बधिर. डाव्या हाताला चिमटे घेतल्यासारखे वाटते. बोटांची टोके दुखतात. गृध्रसी वात-मांड्यात फोडल्यासारख्या वेदना होतात, स्नायूना आचके बसतात. **तळपाय हुळहुळे** हाता-पायाना सूज येते. डाव्या-पावलाची जलयुक्त सूज. पाय **निर्जीव**, जड वाटतात. जिना चढता-उतरताना गुडघे दुखतात.

**झोप :-** अस्वस्थ, प्रत्येक गोष्टीच्या विवंचनेमुळे २।३ तास झोप लागत नाही नंतर गाढ झोप लागते. जेवता जेवता झोप येते किंवा जेवल्यानंतर येते. पहाटे २ वाजता जाग येते, नंतर झोप येत नाही. झोपेत बोलणे.

**ज्वर** :– मोकळ्या हवेत थंडी वाजते. थंडी वाजताना हात कढत होतात व झोप येते. अंतर्गत आग होते. घाम थोडा येतो व पावलाना दुर्गंधी येते. थोड्याशा श्रमाने घाम येतो. विकार झालेल्या भागावर किंवा वेदना होत असलेल्या जागी घाम येतो.

**त्वचा** :– सर्वांगाला कंड सुटते किंवा पित्ताच्या गांधी येतात–विटाळसेपणी. कोरडी. स्पर्श सहन होत नाही. मोहरीचा लेप लावल्याप्रमाणे आग होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **गार–हवा**–पाणी–वारे. हवेचा बदल. श्रम. अंग तापल्याने. **पहाटे** २–३ वाजता. **हिवाळयात** विटाळशी होण्याचे अगोदर **वेदना होत असलेल्या कुशीवर** किंवा डाव्या कुशीवर निजल्याने. बाळंतपणानंतर. वीर्यपातानंतर. स्पर्श. वाख्यानंतर.

**ब वा** :– उष्णता. गुडघ्यावर कोपरे ठेवून बसल्याने. दिवसा. मोकळ्या हवेत. व हलुहलु चालण्याने.

**सहाय्यक औषधे** :– आर्से–आयो; **कार्बो–व्हेजि**; नक्स–व्हा; नाय–ॲसि; **फास्फ.**

**संबंधी औषधे** :– आर्से; कॅल्क–हैपो; पल्स; फास्फ; फ्लुओ–ॲसि; लायको; सल्फ; सेपि.

---

## ६८ कलि क्लोरिकम Kali Chloricum.

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम रक्त; तोंड; गुद व मूत्रपिंड यावर होतो. अत्यंत थकवा. गारपणा सहजासहजी **रक्तस्राव होणे. दुर्गंधी**– तोंडाला; विटाळाला वगैरे. रात्री रंगाचे चिकट स्राव.

**नाक** :– नाकातून रक्त येते, रात्री, उजव्या नाकपुडीतून.

**चेहरा** :– सकाळी सुजतो, घोटे संध्याकाळी सुजतात. वेदना खाताना बोलताना स्पर्श केला तर जास्त होतात नंतर बधिरपणा येतो.

**तोंड** :– येते. व्रण पडतात व ते कुजत जातात. पाऱ्यामुळे आलेले तोंड. गाल. सडतात. घाण येते. जीभ सुजलेली, गार.

**घसा** :– गार.

**जठर** :– एकदम ओकावयास होते, एकसारखी होत राहते, काही खाल्ले तरी ओकून पडते. ओकारी काळी–हिरवट, दुर्गंधी.

**उदर** :– वात धरल्यामुळे वेदना होतात. गुदात एकसारखे दुखते किंवा हगवणीत आव झाली असताना गुदात कापल्यासारख्या भयंकर वेदना झाल्यामुळे रडण्याची पाळी येते. शौचात नुसते रक्त पडते. पुष्कळ हिरवी आव पडते.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्रपिंडाचा शोथ. लघवीतून अल्बुमिन द्रव्य जाते; रक्त जाते. लघवी होण्याचे बंद होते, थोडी होते.

**श्वसनेंद्रिये** :– गंधकाचा धूर आत गेला आहे असे वाटून छाती आवळल्यासारखी वाटते.

**हृदयः**– उजव्या हाताची नाडी भरलेली–डाव्या हाताची लहान. भोवती गारपणा.

**ज्वरः**– गारपणा–रक्तात–जिभेचा–घशाच्या–हृदयाभोवती–हात–पाय.

**त्वचाः**– ओठ व हनुवटी या दरम्यान पुटकुळ्या येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः**– थंडी. पाऱ्यामुळे. धक्का व शिंकताना. खोकताना.
**ब वाः**– नाकातून रक्त गेल्याने ( मानसिक लक्षणे )

---

## ६९. कलि नायट्रिकम् ( सोरा ) Kali Nitricum

**सर्वसाधारणः**– या औषधाचा परिणाम; **रक्तवाहिन्या**; हृदय; **मूत्रपिंड व श्वसनेंद्रिये** यावर होतो. अत्यंत अशक्तपणा. **रक्तस्राव**. एकाएकी सर्वांगाला जलयुक्त सूज येते. ठुसठुस, **टोचल्यासारखे वाटणे. बधिरपणा** लाकडाप्रमाणे. मूर्च्छा. क्षय पुन्हा उलटतो.

**मानसिकः**– शीण–काही व्यवसाय नसल्यामुळे किंवा कोणत्याही गोष्टीविषयी जिज्ञासा वाटत नसल्यामुळे.

**डोकेः**– सकाळी घेरी येऊन मूर्च्छा येते, उभे राहिल्याने जास्त होते. डोक्याच्या मागील भागात दुखते, केस मोकळे सोडल्याने बरे वाटते.

**डोळेः**– उजव्या डोळ्याचा बाहेरचा कोपरा खाताना लवलवतो.

**कानः**– बहिरेपणा. घेरी व कानात आवाज होतात.

**नाकः**– उजव्या नाकपुडीत सुजल्यासारखे वाटते. मोड. शेंडा लाल, कंड सुटते.

**तोंडः**– जीभ लाल, पुटकुळ्या येऊन आग होते.

**जठरः**– वेदना पोटाच्या खळीतून खाकेपर्यंत जातात. मळमळ. शौचास काळे, रक्तमिश्रित, पातळ होते. वासराचे मांस खाल्याने हगवण लागते ओकारी होईल की काय असे मळमळते, विशेषतः रात्री.

**मूत्रेंद्रिये**:– मूत्रपिंडात टोचते. **भरपूर लघवीला होते.**

**स्त्रीजननेंद्रिये**:– विटाळ शाईप्रमाणे काळा व भरपूर जातो.

**श्वसनेंद्रिये**:– श्वासोच्छ्वास जलद धापा टाकल्याप्रमाणे. त्यामुळे ताठ बसणे भाग पडते. *श्वासोच्छ्वास अत्यंत कष्टाने होतो.* त्यावेळेस छातीत आग होते, टोचते, व मळमळते. तहान लागते पण पाणी पिताना दम धरवत नाही, त्यामुळे **घोट घोट पाणी प्यावे लागते.** दमा–आंब्रट कफ पुष्कळ पडल्याने बरे वाटते.

**हृदय**:– निजल्याने धडधडावयास लागते.

**मानपाठ**:– वेदना पाठीतून छातीत येतात.

**हात**:– हात व बोटे सुजल्यासारखी वाटतात.

**ज्वर**:– **बाह्यांग** गार विशेषतः हनुवटी. अंतर्गत आग.

लक्षणांचे वैशिष्ट्य जा होः– **चालताना**, दमट थंड हवा. सर्दी झाल्याने. वासराचे मास खाल्याने. उसे न घेता निजल्याने.

ब वाः– हळुहळू हालचाल केल्याने. घोट घोट पाणी प्याल्याने.

---

## ७०. कलि फास्फोरिकम् Kali Phosphoricum

**सर्वसाधारण**:– या औषधाचा परिणाम मेंदू; मज्जारज्जू ; स्राव व एक बाजू यावर होतो. *घाबरटपणा व अशक्तपणा. सहजासहजी थकवा येतो–* क्षुल्लक कारणामुळे, **वेदना**, काळजी वगैरे-मानसिक क्षीणता. लटके पडणे, लटके पडल्याप्रमाणे अशक्तपणा किंवा वेदना होत असताना लटके पडल्यासारखे वाटणे. शरीर वाळते किंवा शरीर वाळविणारे रोग. **आंगाला घाण येते.** नाजुक प्रकृति. *दुर्गंधी* किंवा पिवळे धमक स्राव-शौच-जिभेचा रंग वगैरे. **अनियमितपणा, विटाळ**, नाडी वगैरे. टोचल्याप्रमाणे वेदना. शोक, संताप, मानसिक ताण, संभोगेच्छा उत्तेजित झाल्यामुळे, संभोगातिरेक, संभोगेच्छा दाबल्यामुळे, दुखापती, यामुळे थकलेले इसम. दुष्ट करटे-गुल्मे.

**मानसिक**:– उगीचच भीती वाटून दचकणे. शीण व उदासीनता. थोडेसे श्रमसुद्धा कष्टदायक आहेत असे वाटते. नवऱ्याचा व मुलांचा तिटकारा. संतापाने बोलतासुद्धा येत नाही. कोणाला भेटावेसे वाटत नाही, त्यांच्याशी बोलावेसे वाटत **नाही. चिडखोर. गर्दीची, पुढे काय होईल याची, मरणाची भीती** वाटते. लाजाळु. विसरभोळा.

**डोके**:– विद्यार्थ्यांची डोकेदुखी. डोके दुखत असताना पोटात गळून गेल्यासारखे वाटून थकवा येतो. उन्हाकडे पाहिल्याने घेरी येते. वर पाहिल्याने जास्त होते. पाळीत व पाळीच्या अगोदर डोके दुखते, हळुहळु चालल्याने बरे वाटते.

**डोळे**:– आग होते, चुणचुणते. पाणी तरंगते. पांढरा पिवळसर स्राव येतो. **डाव्या डोळ्याची पापणी लुली होते.** दृष्टिमांद्य. मेंदूच्या विकारात नंतरचा तिरळेपणा.

**कान**:– गुणगुणल्यासारखा आवाज होतो व दुर्गंधी पू येतो.

**नाक**:– **मागील भागात कंड येते. शिंका येतात**–पहाटे २ वाजता. दुर्गंधी स्राव.

**चेहरा**:– उदास, **काळजीने ग्रस्त झालेला.** कपाळावर केसांच्या कडेला पिंगट पट्टा. उजवी बाजू दुखते–गार पाणी लावल्याने बरे वाटते.

**तोंड**:– घाण येते. टाळा तेलकट झाला आहे असे वाटते. जीभ पिवळसर–मोहरी वाटून चोपडल्यासारखी. तोंड येते. जीभ सकाळी अतिशय कोरडी होते. तोंड इतके कोरडे होते की जीभ टाळूला चिकटते आहे असे वाटते. हिरड्यातून रक्त येते. विसविशित, दातापासून सरकतात. बोलणे हळुहळु नंतर बोलता येत नाही. हळुहळु जीभ लुळी पडावयास लागते.

**जठर**:– **खाण्यानंतर लवकरच भूक लागते व काहीतरी खावेसे वाटते.** आगबोट लागण्याची जाणीव पोटात होते पण मळमळत नाही. पोटात कुरतडल्या-सारखे वाटते, खाण्याने बरे वाटते. बर्फाचे पाणी, गोड पदार्थ, व्हिनिगर यांची वासना. अन्न, पाव, मासाचा तिटकारा. खोकताना मळमळते, ढेकर आल्याने बरे वाटते. शस्त्रक्रियेने मूळव्याध कापून काढल्यानंतर गुदात निर्जीव-पणा येतो. उदर गार होते. पांघरुणाने बरे वाटते.

**उदर**:– कापल्याप्रमाणे वेदना होतात. हगवण–दुर्गंधी, पाण्यासारखे जुलाब होतात. आव–नुसते रक्त पडते-पिवळे धमक–दुर्गंधी कढत शौचास होते. कॉलरा–तांदुळाच्या धुणीप्रमाणे पांढरे जुलाब, शौचानंतर अत्यंत थकवा येतो.

**मूत्रेंद्रिये**:– लघवी दुधासारखी पांढरी किंवा पिवळी धमक. रात्री वारंवार लघवीला जावे लागते. लघवी नकळत झोपेत होते, वृद्धपणी-मूत्रमार्गातून रक्त येते.

**पुरुषजननेंद्रिये**:– स्वप्नावस्था होण्याची प्रवृत्ती. संभोगानंतर अत्यंत थकवा येतो. दृष्टिमांद्य येते.

**स्त्रीजननेंद्रियेः–** अत्यंत दुर्गंधी धुपणी. वेणा असाऱ्यात तशा कार्यक्षम नसतात. वेणा मंद. बाळंत होण्याचे अगोदर २।३ महिने हे औषध दिल्याने प्रसूती त्रासदायक होत नाही. विटाळशी झाल्यानंतर संभोगेच्छा तीव्र होते. **पाळचा अनियमित, उशिरा,** व विटाळ थोडा जाणे. गुदातून व योनीतून मधुन मधुन नारिंगी रंगाचे भरपूर पाणी जाते-

**श्वसनेंद्रियेः–** आवाज उमटत नाही. दमा–थोडे खाल्ले तरी त्रास व्हावयास लागतो, जिना चढताना दम लागतो. खोकला–पिवळा कफ पडतो.

**मानपाठ :–** पाठ निःशक्त झाल्यासारखी वाटते, त्यामुळे खुर्चीवर टेकून बसावे लागते. कण्यात मुंग्या आल्यासारखे वाटून वेदना होऊ लागल्या म्हणजे डोकेदुखी थांबते

**हातपाय :–** खाकेतील घामाला कांद्यासारखा वास येतो. हाताना व पावलाना झिणझिण्या आल्यासारखे वाटते. बोटाची टोके बधिर होतात. पाऊल बर्फाने गारठले आहे असे वाटते. तळपाय दुखतात. पाऊले सारखी हालविणे

**झोप :–** गुंगी येते. **जांभया** येतात. मुलाना भयंकर स्वप्ने पडून ती घाबरून उठतात. झोपेत चालणे, काळजी, धंद्याची जबाबदारी वगैरेंनी झोप येत नाही. वैषयिक शृंगारिक स्वप्ने पडतात. झोपेत अंग कढत होते.

**त्वचा :–** निष्क्रिय. निळे डाग, गार, पिवळसर.

**ज्वर :–** शरीरातील उष्णता वाजवीपेक्षा जास्त कमी होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** थोडासा मनःक्षोभ. काळजी. मानसिक शारीरिक थकवा. स्पर्श. वेदना. थंड कोरडी हवा. वयात येण्याचा काळ. खाण्याने. संभोगाने.

**ब वा :–** झोपेने. खाण्याने. हळुहळु हालचाल केल्याने. कशावर तरी टेकल्याने.

**संबंधी औषधे :–** कास्टि; कोक्यु; झिंक; पिक्रि–ॲसि.

---

## ७१. कलि बायक्रोमिकम Kali Bichromicum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा*–श्वसनेंद्रियांची–*नाकाची*, **घशाची, जठराची**, स्नायुबंध; *सांधे*; त्वचा; **रुधिराभिसरण;** मूत्रपिंड बुंधा–जिभेचा; नाकाचा; शिश्नाचा वगैरे, यावर होतो. *चिकटपणा*–

चर्वेला–कफाचा; धुपणीचा, घामाचा वगैरे. **स्राव–चिकट–घट्ट तारा येणारे** किंवा दाट व गाळचाळ. **पिवळेपणा**–डोळ्याचा–दृष्टीचा, जिभेचा वगैरे. **वेदना एखाद्या लहानशा जागी** उत्पन्न होतात. किंवा **इकडून तिकडे फिरतात** व शेवटी जठरात स्थिर होतात. एकदम टोचल्यासारखे वाटते. भावना खालून वर जातात–वेदना. थंडी वाजणे–आग वगैरे. पांढरा थर जमतो. **व्रण**; खोल–चरत जाणारे, आंत काळे ठिपके, वाटोळे, कडा लोंबकळतात किंवा वर जाड खपल्या असतात, जिभेवर किंवा नाकात केस चिकटला आहे असे वाटते. कंड अंतर्गत–योनीत–फुप्फुसात वगैरे. **सांध्यात कटकट आवाज. अत्यंत अशक्तपणा.** रक्तक्षय पण तापाचा अभाव. **आजारी** असल्याप्रमाणे वाटते, थंडी सोसत नाही व शरीर झिजते. लट्ठ इसम संधीवाताची लक्षणे व जठराची लक्षणे आलटून पालटून होतात. वेदना एकदम सुरू होऊन एकदम नाहीशा होतात. वेदनानंतर थकवा व शीण. फेफरे आंचके येताना, तोंडातून चिकट दाट लाळ गळते. ढेकूण चावताहेत असे वाटते. नाडीव्रणातून येणारा हट्टी पू. अगदी ठराविक तासाला वेदना सुरू होतात. टिकटिकाणी जडपणा वाटतो.

**मानसिक** :– सुस्त–मंद–आळशी. बेपर्वा. मानसिक शारीरिक काम करण्याचा कंटाळा.

**डोके** :– दोन्ही भुवयांच्या मध्ये भरल्यासारखे वाटून ठणका लागतो. भुवयात वेदना होतात. **डोळ्यापुढे अंधारी येऊन डोळ्यावर भुवयाभोवती दुखावयास लागते.** नाकाचा बुंधा दाबल्याने बरे वाटते. गारव्याने जास्त होते. अर्धशिशी. बसलेल्या जागेवरून उठताना घेरी येऊन मळमळते, कपाळावर जाड टोकळा ठेवला आहे असे वाटते. कवटी हुळहुळी. टोचते.

**डोळे** :–बघताना डोळे एकमेकावर आडवे झाले आहेत असे वाटते. एका डोळ्याने पाहिल्यास चांगले दिसते. पापण्या लाल–कंड सुटते–सुजतात व खपल्या होतात. फूल पडते पण वेदना होत नाहीत किंवा दृष्टि दिपत नाही. चिकट, दाट स्राव.

**नाक** :– कणा व बुंधा दुखतो. **बुंध्याशी दाबल्यासारखे किंवा चोंदल्यासारखे वाटते.** दुर्गंधी शेंबूड आतच राहतो. गळू. पिनस. **स्राव करवडणारे** भरपूर. हिरव्या खपल्या. सर्दीत नाक चोंदते व खूप शिंका येतात. लठ्ठ व गुटगुटीत लहान मुलांचे नाक चोंदते; तोंडाने श्वासोच्छ्वास घ्यावा लागतो. वास कळत नाही. केस चिकटले आहेत असे वाटून गुदगुल्या होतात. सकाळी खूप शिंका

येतात. नाक शिंकरताना दोन मोकळी हाडे एकमेकास घासत आहेत असे वाटते. जड वाटते. मधल्या पडद्यावर गळू येते, व्रण पडतात. **नाकाचा घटसर्प.**

**कान** :– कानातून दुर्गंधी चिकट पिवळा पू येतो. आत टोचते. गालगुंड सुजून मोठे होते. कंड सुटते व टिकटिक आवाज होतात.

**चेहरा** :– फिकट, पिवळसर. चट्टे पडलेला; लाल फुगीर.

**जीभ** :– भेगा पडतात. लाल–चकचकीत–गुळगुळीत–जड झाली आहे असे वाटते. चव-गोड, तांब्याच्या धातूप्रमाणे. लिंबाप्रमाणे पिवळी; **बाहेर काढताना दुखते** बुंध्याशी जिभेवर दाट थर, जीभ रुंद, सपाट दाताचे ठसे उमटलेली, बुंध्याशी केस चिकटला आहे असे वाटते.

**तोंड** :– कोरडे, चिकट लाळ. दात दुखतात व कळा इतर ठिकाणी पसरतात व गळ्याखालील गाठी सुजतात.

**घसा** :– **चिकट कफ खाकरावा लागतो–कफ हाताने पुसून काढावा लागतो.** कोरडा खरखरीत भेगा पडलेला. आग होते व आंत काहीतरी टोचते आहे असे वाटून त्या वेदना मान व खांद्यापर्यंत जातात. पडजीभ फुगून पाण्यानी भरलेल्या पिशवीसारखी दिसते. जीभ बाहेर काढताना दुखतो.

**जठर** :– आत कोठेतरी जागा हुळहुळी झाली आहे असे वाटते. खाण्यानंतर पोटात जडपणा वाटतो. ढेकरांबरोबर पातळ पदार्थ बाहेर येतात. ओकारीत पिवळे पाणी पडते. जठराचे विकार खाण्यानंतर कमी होतात. व्रण. पेये पिण्याच्या मानाने ओकारीत जास्त पातळ द्रव्य पडते. बीर, आंबट पेये प्यावीशी वाटतात. मांस, पाण्याचा तिटकारा.

**उदर** :– यकृतात व पांथरीत टोचते व ते टोचणे कण्यापर्यंत जाणवते. यकृत ते खांद्यापर्यंत आवळल्यासारखे वाटते. शौचात बुळबुळीत आव पडते किंवा **पिंगट–फेसाळलेल्या पाण्याचे भडभडून जुलाब होतात**, नंतर आग होते व गुदात वेदना होतात, विशेषतः सकाळी उठल्यानंतर. आंव. आतड्यांत व्रण पडल्यामुळे मधुन मधुन ओकाऱ्या होतात व शरीर वाळते·आव–उन्हाळ्यात होणारी. संधिवात बरा झाल्यानंतर आव किंवा हगवण लागते. गुदद्वारात बूच बसल्यासारखे वाटते. आतड्यांत कुरतडल्यासारखे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्रपिंड जड वाटतात. लघवी झाल्यानंतर आत थेंब राहिला आहे असे वाटते. लघवीतून पू जातो–अल्बुमिन जाते, रक्तमिश्रित लघवी होताना पाठीत दुखते.

**पुरुषजननेंद्रिये** :– शिश्नाच्या बुंध्याशी आवळल्यासारखे वाटते–रात्री जागे झाल्यानंतर. गरमीचे व्रण–दाट चिकट पांढरा स्त्राव येतो, त्याने मूत्रमार्ग बंद होतो. लठ्ठ इसमांची वैषयिक वासना नाहीशी होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– धुपणी **करवडणारी** पिवळी दाट, जाताना माकडहाडावर दुखते व ओटीपोट जड होते. योनिद्वाराना कंड सुटून आग होते व वैषयिक क्षोभ होतो, गर्भाशय बाहेर येतो, विशेषतः उन्हाळ्यात. आंगावरचे दूध पाण्या-प्रमाणे पातळ, तारा तारा येणारे. पाळीत लघवी होण्याचे बंद होते, किंवा लाल होते.

**श्वसनेंद्रिये** :– आवाज बसतो. कंठ सुजतो. खाण्यानंतर गुदगुल्या होऊन खोकला येतो व ढेकरा येतात नंतर घेरी येते. खोकला कोरडा–भांडे वाजविल्याप्रमाणे आवाज. कफ–भरपूर–पिवळा-चिकट व बुळबुळीत–बाहेर येताना तारा येतात किंवा घट्ट गोळा बाहेर येतो. खोकताना छातीच्या मध्यभागापासून खांद्यापर्यंत दुखते. कपडे काढल्यानंतर खोकला जास्त येतो. छातीच्या मध्यभागी हुळहुळे होते व **वेदना-पाठीपर्यंत जातात**. छातीवर आडवा दांडा ठेवला आहे असे वाटते. दमा–कफ पडल्यानंतर बरे वाटते, संभोगानंतर जास्त होतो.

**हृदय** :– अशक्त–गार झाल्यासारखे वाटते. मूत्रपिंडाच्या विकारांत रुंद होते.

**पाठ** :– कंबरेत कापल्यासारख्या वेदना होतात – जांघापर्यंत जातात – चालता येत नाही. पाठ ताटते पुढे वाकता येत नाही. गुदास्थि – चालताना बसल्याने व त्याला स्पर्श केल्याने दुखते. वेदना वरखाली होतात. गुदास्थीत लघवी होण्याचे अगोदर दुखते, नंतर बरे वाटते, खाली वाकताना माकड-हाडात फुटल्यासारखे वाटते.

**हातपाय** :– हात लुळे पडल्याप्रमाणे वाटतात. गृध्रसी वात–पाय जवळ घेतल्याने व चालताना बरे वाटते. टाचा दुखतात, चालतांना पावलाच्या कडा दुखतात. हाडांत निरनिराळ्या ठिकाणी वेदना होतात, खाण्यानंतर संधिवाताचे दुखणे जास्त होते. टाचेचा स्नायुबंध, सुजतो, दुखतो.

**ज्वर** :– अंग कढत झाल्यासारखे वाटते नंतर चिकट घाम येतो नंतर थंडी वाजते.

**त्वचा** :– लवकर बरी होत नाही. सारखी पुवळलेली. तोंडे काळी असलेले फोड. त्वचेच्या विकारांना मोकळ्या हवेत बरे वाटते. पिंगट टिपके. तळपायाना भाजल्यासारखे फोड येतात. उगवण किंवा व्रण बरे झाल्यानंतर वाटोळे वण राहतात. त्वचा कढत, कोरडी, लाल, गार हवेने बरे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** *थंडी*. दमट हवा, जागा. मोकळी हवा. वसंत ऋतूत. उन्हाळयात. कपडे काढल्याने. *सकाळी* – झोपेनंतर – पहाटे २–३ वाजता. दारू बीर प्याल्याने. जीभ बाहेर काढताना. खाली वाकल्याने. स्राव बंद केल्याने किंवा झाल्याने.

**ब वा :–** उष्णतेने. चालताना. दाबल्याने.

**सहाय्यक औषधे :–** आर्से; फास्फ; सोरि.

**संबंधी औषधे :–** ॲन्टी-टा; कलि का; पल्स; फायटो; बेर्बे; मर्क्यु.

---

## ७२. कलि ब्रोमेटम Kali Bromatum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *मन*; **मेंदू**; **कणा**; जननेंद्रिये; कंठ व त्वचा यावर होतो. विकार हळुहळु सुरू होतात. **वेदनांचा अभाव.** बधिरपणा विशेषतः डोक्याच्या मागील भागात; डोळे; घसा, त्वचा. वैषयिक वृत्ति, शृंगारिक विचार, कल्पना मनात येतात. स्त्रीपुरुषांचा कामोन्माद. फेफरे-बहुधा संभोगातिरेकामुळे येते. विटाळशेपणी, अमावास्येच्या सुमारास फेफरे येते, आचक्यानंतर डोके दुखावयास लागते. काळजी, धंद्यातील नुकसान, यामुळे उत्पन्न झालेले विकार.

**मानसिक :–** **अत्यंत उदासीन. भ्रामक कल्पना.** लोक आपल्या विरुद्ध काहीतरी कट करीत असावेत असे वाटते– कोणीतरी मागे लागले आहे, विष घातले आहे असे वाटते. संशयी. लोकांची भीती वाटते परंतु अंधारात एकटे रहावेसे वाटत नाही. सर्व बाजूस एकसारखे पाहणे. काहीतरी करावेसे वाटते; हिंडावेसे वाटते. हात बेफाम हलविणे. **हातांचा चाळा**–चाचपणे, बोटे हलविणे वगैरे. खेद-पश्चात्ताप होतो. **हातात हात घालून पिळवटणे** नंतर रडावयास लागणे. करावे की करू नये याचा निश्चय होत नाही. बोलताना लिहिताना शब्दांची गुंतागुंत होणे किंवा शब्द विसरणे, गाळणे. **स्मरणशक्ती मंद.** बोलता येत नाही पण सांगितलेला शब्द उच्चारता येतो. मुले रात्रीची भितात व जागी होऊन रडावयास लागतात; बेशुद्ध होतात; कोणास ओळखत नाहीत, त्यानंतर तिरळेपणा येतो, खिन्न बेपर्वा. वेड. कचरणे. हालचाल मंद, वारंवार अश्रू गाळणे.

**डोके :–** मेंदूचा शीण आंत बधिर झाले आहे असे वाटते. घेरी आली असताना पायाखालून जमीन सरकत आहे असे वाटते, खाली वाकल्याने जास्त

होते. चालताना झोकांडे जातात. मेंदूला मार लागल्यामुळे, डोक्याचा मागील भाग बधिर होतो किंवा अतिशय ठणकतो.

**डोळे** :– खोल गेलेले. सर्व बाजूला फिरतात. तिरळेपणा– मुलांचा, रात्री झोपेत घाबरल्यामुळे आलेला.

**कान** :– चांगले ऐकू येत नाही. आवाजाचा कानात प्रतिध्वनी ऐकू येतो. कानातले आवाज व नाडीचे ठोके एकाच वेळीं होतात.

**नाक** :– सर्दी घशात उतरते. वास कळत नाही,

**चेहरा** :– लालसर; पिवळसर;

**तोंड** :– कष्टाने बोलणे, तोतरे बोलणे. बधिर. घाण येते.

**घसा** :– बधिर. मुलांना पेये गिळता येत नाहीत घट्ट पदार्थ गिळता येतात.

**जठर** :– ओकाऱ्या होताना अतिशय तहान लागते. जेवण झाल्यानंतर ओकावयास होते. हिस्टेरिया. एकसारखी उचकी. मनःक्षोभामुळे ओकावयास होते.

**उदर** :– मुलांचे कॉलऱ्यासारखे जुलाब, त्यावेळेस स्नायूना धक्के–आचके येतात. उदरात कापल्यासारख्या वेदना होतात. हिरवे पातळ शौचास होते व शक्तिपात होतो. उदर आतून गार झाल्यासारखे वाटते. खपाटीं जाते. गुदात मोड होतात; एकसारखे जुलाब होतात व बरेच रक्त पडते.

**मूत्रेंद्रिये** :– तहान लागते व लघवीला भरपूर होते. मधुमेह. शौचास होण्याच्या अगोदर लघवी थेंब थेंब गळते. मूत्रमार्ग बधिर.

**पुरुषजननेंद्रिये** :– संभोगातिरेक किंवा मुष्टिमैथुन याने उद्भवलेले नपुंसकत्व. अतिशय संभोगेच्छा होऊन, शिश्न एकसारखे ताठ राहते. विशेषतः रात्रीं.

**स्त्रीजननेंद्रिये** :– तरुण स्त्रियांचा रक्तप्रदर. संभोगेच्छा वाढते. कंड सुटते. वंध्यात्व–संभोगातिरेकामुळे. अतृप्त संभोगेच्छेमुळे रजःपिंडात वेदना होतात. रजःपिंडाची गुल्मे. तरुण स्त्रियांचा रक्तप्रदर– स्राव अतिशय होतो व संभोगेच्छा होते. गरोदरपणचा खोकला.

**श्वसनेंद्रिये** :– गरोदरपणचा खोकला. रात्री कोरडा खोकला येतो व त्याने थकवा येतो.

**हातपाय** :– पंज्याचा व बोटांचा सारखा चाळा. हाताची बोटे उडतात. पंजे स्वतः होऊन हालचालीचा प्रयत्न केला तर कापू लागतात. चालणे अस्थिर. ताठ उभे राहवत नाही. पायावर ओला इसब.

**झोप** :– अस्वस्थ-काळजीमुळे, संभोगातिरेकामुळे किंवा दुःखामुळे. झोपेत दात खाणे. अतिशय गुंगी पण मधुन मधुन दचकणे.

**त्वचा** :– गार. यौवनपीटिका. बधिर-उगवण बरी झाल्यानंतर राहिलेले वण.

**ज्वर** :– विटाळ थांबण्याच्या वयात चेहरा लाल होऊन दुखतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **मानसिक श्रम**; भावना; राग, भीती, काळजी. नियमित वेळीं-रात्री-उन्हाळ्यात-अमावास्येला. संभोगातिरेक. तारुण्य.

**ब वा** :– काहीतरी शारीरिक किंवा मानसिक काम करीत असल्याने.

**संबंधी औषधे** :– ओपि; कॅल्क-का; कोनि; स्ट्रमो.

---

## ७३. कलि मूरिआटिकम Kali Muriaticum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **घसा**; **कर्णनलिका**; **श्लेष्मल त्वचेचा ग्रंथि**, **डोक्याचा मागील भाग**; स्नायू ; सांधे; खांदा ( उजवा ); एक बाजू ( डावी ) यावर होतो. ***पांढरेपणा***. स्राव ***दुधासारखे पांढरे***-चिकट **वाट** बुळबुळीत किंवा गाठ्याळ असतात. **घट्टपणा**; घट्ट स्राव. **गाठी** सुजून मोठ्या होतात. **टणकपणा-हुळहुळेपणा. वेदना कापल्याप्रमाणे-टोचल्या-प्रमाणे–इकडून तिकडे फिरतात.** मुंग्या येणे. बधिरपणा. हाडात कापल्या-प्रमाणे वेदना होतात. देवी टोचण्यानंतर, भाजणे, मार लागणे, कापणे, लचक यांचे दुष्परिणाम. लक्षणे आरपार होतात.

**मानसिक** :– **चिडखोर, रागीट**, क्षुल्लक कारणाने असंतुष्ट. निरुत्साह. काहीतरी वाईट घडते आहे अशी भीती वाटते. न बोलता स्तब्ध बसून राहणे. उपाशी रहावे असे वाटते.

**डोके** :– डोक्याचा मागील भाग शिशाप्रमाणे जड झाल्यासारखा किंवा जोराचा रट्टा मारल्यासारखा वाटतो त्यामुळे डोके वर उचलता येत नाही. केस मोकळे सोडल्याने किंवा डोके गुंडाळण्याने बरे वाटते. मेंदू सैल झाल्यासारखा वाटतो. डोक्यातून खूप पांढरा कोंडा जातो. **डोक्याला घाम येतो.**

**डोळे** :– काळ्या बुबुळांवर फोड येतात. फूल–सारा. खोकताना डोळ्यापुढे काजवे चमकतात.

**कान** :– कानात बूच बसल्याप्रमाणे वाटते. कंड सुटते. करकर आवाज होतो. **बहिरेपणा. कर्णनलिका कफाने बंद होते** किंवा हुळहुळी होते. खोकताना, गिळताना कंड सुटते. कानाभोवतालच्या गाठी मोठ्या होतात.

**नाक** :– चोंदते, शेंबुड दाट, पांढरा.

**चेहरा** :– निळसर; बसलेला. गाल सुजून दुखतात. तोंडाभोवती पुटकुळ्या. चेहऱ्यातील वेदनानंतर चेहरा लुळा पडतो व चेहऱ्याचे स्नायू चावताना, बोलताना, खोकताना उडतात किंवा कंप उत्पन्न होतो.

**जभि** :– नकाशाप्रमाणे दिसते. पांढुरकी, **बुंध्याशी पांढरी**. चव खारट. जिभेवर पांढरे व्रण पडतात. जिभेवर कवट तयार होत आहे असे वाटते.

**तोंड** :– येते. पांढरे व्रण पडतात. गळ्याच्या व जबड्याच्या गाठी सुजतात.

**घसा** :– पांढुरका. व्रण पडलेला. जीर्ण घसेदुखी. टानसिल सुजून मोठ्या होतात इतक्या की श्वासोच्छ्वास करता येत नाही व गिळताना अतिशय दुखते. **घशातून पांढरा दाट कफ खाकरून काढावा लागतो.**

**जठर** :– तेलकट व पौष्टिक अन्नाचा तिटकारा. मळमळताना शहारे येतात. जठर जड झाल्यासारखे वाटते विशेषतः रात्री. अन्न ओकून पडते. खा खा सुटते पण पाणी प्याल्याने भूक नाहीशी होते.

**उदर** :– **खाण्यानंतर उदर भरल्यासारखे वाटते. शौचास फिकट**, टणक किंवा कापसाचे धागे असल्याप्रमाणे होते. **गुदद्वार हुळहुळे**–चालताना किंवा शौचानंतर जास्त होते. शौचानंतर कंड सुटते किंवा मुंग्या येतात. मूळव्याध, काळे दाट रक्त येते.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्रपिंडाचा शोथ. लघवी थेंब थेंब गळते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ – दाट काळा डांबरासारखा. धुपणी दुधासारखी पांढरी, दाट. विटाळसेपणी किंवा अगोदर–स्तनात मऊ गाठी होतात व त्या दुखतात.

**श्वसनेंद्रिये** :– **श्वासोच्छ्वास कोंडल्याप्रमाणे कष्टदायक.** खोकल्याची ढास लागते. कफ चिकट किंवा खोकताना तोंडातून बाहेर उडतो. छातीत उष्ण लाटा येतात, हुळहुळी होते. घुरघुर आवाज होतो.

**हृदय** :– गार झाल्यासारखे वाटते.

**पाठ** :– उजव्या खांद्याखाली जडपणा वाटतो. डाव्या तिकोनी हाडाखाली फडफडल्यासारखे वाटते. पाठ दुखणे निजल्याने कमी होते. कमरेपासून पावलापर्यंत चमका मारतात.

**हातपाय** :– संधिवात–ताप येतो, सांध्याभोवती सूज येते. सांधे हालचाल करतानाच दुखतात. **हात व पावले गार.** हाता–पायाना पेटके येतात. लिहिताना हात ताठतो. मांड्याच्या स्नायूंना आंचके बसतात. हातपाय आळीपाळीने ताणल्यासारखे वाटतात. तळपायाला गार घाम येतो.

**त्वचा** :– यौवनपीटिका; फोडात किंवा पुटकुळ्यात दाट पांढरी लस जमते. इसब, पांढरा कोंडा जातो.

**झोप** :– चिंतायुक्त स्वप्ने पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **मोकळी हवा**; गार–पेये–वारे. अंथरुणाची ऊब. निजल्याने. रात्री. दमट हवा किंवा जागा. **तेल–तूप किंवा पौष्टिक अन्न.** विटाळसेपणी.

**ब वा** :– गार पेये. चोळण्याने. केस मोकळे सोडल्याने.

**सहाय्यक औषधे** :– कॅल्क–स.

**संबंधी औषधे** :– पल्स; फेरम–फा; ब्रायो.

---

## ७४. कलि सल्फुरिकम् *Kali sulphuricum*

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम श्वसनेंद्रिये; **त्वचा** व गाठी यावर होतो. विकारांचा सुस्तपणा. ***स्राव भरपूर गडद पिवळे***–सुरवातीस पातळ नंतर दाट व चिकट. **पू होण्याची प्रवृत्ति. वेदना–टोचल्या**–फाडल्या –कुरतडल्याप्रमाणे–**इकडून** तिकडे फिरतात. **त्वचेचे पापुद्रे जातात.** व्रण–त्यातून पातळ **पिवळे पाणी** वाहते. कॅन्सर.

**मानसिक** :– उतावीळ, चिडखोर. निजावेसे वाटते, पण निजल्याने बरे वाटत नसल्यामुळे उठून चालणे भाग पडते. क्षुल्लक गोष्टीने घाबरणे, एखाद्या वस्तूची इच्छा होते पण लगेच तिचा तिटकारा.

**डोके** :– कोंडा पिवळा, ओलसर चिकट.

**डोळे** :– नुकत्याच उपजलेल्या मुलांचे डोळे येतात. पिवळा पू येतो.

**कान** :– आत मोड येतात; पातळ, चिकट, पिवळा दुर्गंधी स्राव, बहिरेपणा.

**नाक** :– चोंदते–तोंडानी श्वास घ्यावा लागतो. घोरणे विशेषतः टानसिल् काढल्या-नंतर.

**चेहरा** :– खोलीच्या उष्णतेने दुखावयास लागतो.

**जीभ** :– **पिवळी बुळबुळीत.**

**जठर** :– जड झाल्यासारखे वाटते. गरम पेयें नकोशी वाटतात. गोड प[illegible]र्थांची वासना.

**उदर** :– फुगून ताणल्याप्रमाणे दिसते व हाताला गार लागते. ओटीपोटात पोकळ झाल्यासारखे वाटते. वात सरल्याने बरे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीतून आक्झॅलिक ॲसिड जाते. पू जातो.

**पुरुषजननेंद्रिये** :– जीर्ण परमा. स्राव हिरवट–पिवळा बुळबुळीत.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ जाताना उदरात जडपणा वाटतो. धुपणी पातळ, पिवळी.

**श्वसनेंद्रिये** :– आवाज बसतो व घोगरा होतो. **छातीत जोराने घुरघुरते.** दमा बुळबुळीत पिवळा कफ सहज पडतो.

**हातपाय** :– वेदना एका सांध्यातील बंद होऊन दुसऱ्या सांध्यात सुरू होतात; सांध्यामोवती गाठी येतात. संधिवात उष्णतेने जास्त होतो.

**घाम** :– **सहज व खूप येतो.**

**त्वचा** :– कोरडी. **पापुद्रे जातात.** व्रण त्यातून **पिवळे पाणी येते.** पित्ताच्या गांधी.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **उष्णतेने**– खोलीच्या, हवेच्या. आवाजाने. समजूत केल्याने. संध्याकाळी

**ब वा** :– **गार हवा.** चालण्याने. उपाशी राहिल्याने.

**संबंधी औषधे** :– ट्यूब; पल्स.

---

## ७५. कलि सायानेटम Kali Cyanatum

**सर्वसाधारण** :– एकदम शक्तिपात होतो. अत्यंत यातना देणाऱ्या वेदना. फेफरे. जिभेचा कॅन्सर.

**तोंड** :– जिभेवर व्रण पडतो, त्याच्या कडा टणक असतात. बोलण्यास त्रास होतो. बोलण्याची क्रिया नष्ट पण बुद्धि शाबूत असते.

**चेहरा** :– कानशिलात व डोळ्यांभोवती भयंकर वेदना होतात–रडण्याची पाळी येते व शुद्धि जाते. दररोज ठराविक वेळी वेदना सुरू होतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– पहाटे ४ ते दुपारी ४ पर्यंत.

**ब वा** :– मोकळ्या हवेत चालण्याने.

---

## ७६. कलाडियम Caladium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***जननेंद्रिये मज्जातंतू***; त्वचा व श्लेष्मल त्वचा यावर होतो. ***कोरडेपणा***–खाताना अन्न कोरडे आहे असे वाटते. पाण्याच्या घोटाशिवाय गिळता येत नाही. गारपणा–एखाद्या जागी किंवा भागात. निजावेसे वाटते. **हालचाल करण्याचा तिटकारा**. पण हाल-चाल करण्याचा प्रयत्न केला तर अंगात शक्ति असते. **जिभेवर टोकाशी रुंद होत जाणारा मध्यभागी लाल पट्टा.** या औषधाने तंबाखूच्या व्यसनाला आळा पडतो. त्वचेचे विकार व दमा आलटून पालटून होतात. अतिशय तंबाखू सेवनाने झालेले मानसिक दुष्परिणाम. डांस चावल्यानंतर अतिशय कंड सुटून आग होते.

**मानसिक** :– **घाबरटपणामुळे मनःक्षोभ.** नसलेला विकार होईल अशी भीती वाटते. स्वतःच्या पडच्छायेची भीती वाटते. अस्वस्थपणा, तंबाखू ओढल्या-नंतर स्वतःवर ताबा राहत नाही. मूर्ख धाडस.

**डोके** :– घेरी– झोपाळावर झोके घेतल्यासारखे वाटते; डोळे मिटल्याने व निजल्याने जास्त होते. एक बाजू बधिर

**डोळे** :– उघड्या हवेत चालताना देखील मिटतात.

**कान** :– आवाज सहन होत नाही. अगदी बारीक आवाजाने झोपेतून दचकून जाग येते.

**चेहरा** :– कोळिष्टके चिकटली आहेत किंवा मुंग्या येत आहेत असे वाटते.

**तोंड** :– खाताना अन्न कोरडे वाटते. पाण्याच्या घोटाशिवाय गिळता येत नाही. जिभेच्या मध्यभागी लाल कोरडा पट्टा टोकाजवळ रुंद. लाळ बुळबुळीत, अंड्याच्या बलकाप्रमाणे.

**जठर** :– कोरड्या अन्नाने भरले आहे असे वाटते. आत फडफडल्यासारखे वाटते. ओकारी होते. गरम पेये मानवतात. भूक नसताना खाणे, तहान नसताना पाणी पिणे.

**पुरुषजननेंद्रिये** :– कंड सुटते. शिथिल व विसविशित. शिश्नाची बोंडी विसविशित चिंध्यासारखी लागते. घाम येतो. स्वप्नावस्था होते व त्यामुळे थकवा येतो. परम्यानंतर आलेले नपूंसकत्व. मुष्टिमैथुनाचे दुष्परिणाम. वैषयिक प्रक्षोभ पण शारीरिक दुर्बलता, रस्त्यावर स्त्रियांकडे आशाळभूतपणे पाहणे, जननेंद्रिये गार.

**स्त्रीजननेंद्रिये :–** ***योनिद्वाराची*** **कंड,** गरोदरपणी; स्वाजविल्यानंतर आग होते. कृमीमुळे कंड सुटते. संभोगाची इच्छा तीव्र होते किंवा ती अतृप्त राहिल्यास मानसिक दुर्बलता येते.

**श्वसनेंद्रिये :–** दमा व त्वचेचे विकार आलटून पालटून. दम्यात कोरडी दाह लागते. कफ पडल्याने बरे वाटते. उसासे टाकणे.

**हातपाय :–** हात बधिर व पाय गार. अशक्त, अंथरुणातून बाहेर पडता येत नाही. डोळे मिटून उभे राहता येत नाही व चालता येत नाही.

**ज्वर :–** झोपेत ताप येतो किंवा वाढतो. झोपेनंतर कमी होतो. घाम गोड, त्यामुळे माशा अंगावर घोंगावतात.

**झोप :–** हलकी. अगदी बारीक आवाजाने सुद्धा दचकून जागे होणे. झोपेत मोठ्याने विवळणे व कण्हणे.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– संभोगातिरेक** किंवा मुष्टिमैथुन. **हालचालीने.** एकदम झालेल्या आवाजाने. झोप लागता लागता. तंबाखू.

**ब वा :–** गार हवा. थोडीशी झोप. घाम आल्यानंतर.

**संबंधी औषधे :–** कॅप्सि.

---

## ७१. कॅक्टस् Cactus

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम **हृदय;** ***रुधिराभिसरण;*** डोके (उजवी बाजू); **छाती** व **स्नायू** यावर होतो. ***आवळल्यासारखे वाटणे*–हृदयात,** छातीत; मानेत; अन्ननलिकेत, मूत्राशयात, गुदात, गर्भाशयात वगैरे. शरीर घट्ट झाल्यासारखे किंवा आवळल्यासारखे वाटते. **अनियमित रुधिराभिसरण** त्यामुळे ठिकठिकाणी **रक्ताधिक्य होते व ठुसठुसते.** ***रक्तस्राव.*** अनेक लक्षणे हृदयविकाराबरोबर सुरू होतात. गलगंड हृदयासंबंधी लक्षणे होऊन. उन्हाने, दमट, जागा, हवा, प्रेमभंग यामुळे उद्भवलेले विकार. वेदनांमुळे रडण्याची पाळी येते. **नियमित वेळी उत्पन्न होणाऱ्या वेदना.** या औषधाने रक्त जलद गोठण्याला मदत होते. धापा टाकणे. अत्यंत थकवा व नाडी हाताला लागेत न लागते अशी अवस्था. धमन्यांतील रक्ताचा दाब हृदय अशक्त झाल्यामुळे कमी होतो.

**मानसिक** :– अबोल. रडू येते, पण कारण सांगता येत नाही, समाधान केल्याने जास्त होते. आपला आजार बरा होणार नाही असा विश्वास.

**डोके** :– जेवणाची वेळ होऊन उशीर झाला तर डोके दुखावयास लागते. टाळूवर जड ओझे ठेवल्यासारखे वाटते. नाटक पाहिल्याने, उजेडाने, बोलण्याने जास्त होते. घेरी दीर्घ श्वास घेतल्याने जास्त होते.

**डोळे** :– दृष्टिमांद्य

**चेहरा** :– लाल, उजवे बाजूस दुखते जेवणाची वेळ टळली तर.

**कान** :– आत ठुसठुसते..

**नाक** :– रक्त खूप जाते पण लवकरच थांबते.

**घसा** :– आवळल्यासारखा वाटून गुदमरते. मानेतील धमन्या थाड थाड उडतात विशेषतः हृदयविकारात.

**जठर** :– मागील बाजूस ठुसठुसते. ओकारीत रक्त पडते. सकाळी मळमळ सुरू होते व सर्व दिवस राहते.

**उदर** :- मूळव्याध. गुदद्वारात जड ओझे ठेवल्यासारखे वाटते. शौचास रक्त पडते. विशेषतः हृदयविकारात किंवा हिंवतापात. आत अतिशय आग होते. गुदात टाचणी टोचते आहे असे वाटते. जरा बोटाने चोळले की कमी होते. यकृत हृदयविकारात मोठे होते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीतून रक्त जाते. रक्त मूत्रभागात गोठल्यामुळे लघवीला बाहेर येताना अडथळा येतो. तापात लघवीला होत नाही.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गर्भाशयात व रजःपिंडात आवळल्यासारख्या वेदना होतात. विटाळसेपणी अत्यंत वेदना होतात. विटाळ गाठ्याळ काळा निजल्याने थांबतो. योनिसंकोच– संभोगात अडथळा येतो. हृदयविकारात पाळीचे उपद्रव उद्भवतात. योनीत रक्ताच्या गाठ्या झाल्यामुळे लघवी करताना त्रास होतो.

**श्वसनेंद्रिये** :– छातीवर ओझे ठेवल्यासारखे वाटते– आवळल्यासारखी वाटते; त्यामुळे श्वासोच्छ्वास करताना अडथळा येतो. आचके आल्याप्रमाणे खोकला येतो– कफात रक्त पडते. हृदयविकारामुळे झालेला खोकला. छातीभोवती लोखंडी पट्टयाने आवळल्यासारखे वाटते. मधुन मधुन गुदमरल्यासारखे वाटून मूर्च्छा येते., चेहऱ्यावर घाम येतो व नाडी हाताला लागत नाही.

**हृदय** :– रुंद होऊन बारीक होत आहे असे वाटते किंवा ***लोखंडी पंजात धरून आवळल्यासारखे नंतर सोडल्यासारखे वाटते***. उलटे-पालटे

झाल्यासारखे वाटते. आत टोंचते. चंचल होते– ठोके अनियमित पडतात. भयंकर धडधडते. डाव्या कुशीवर निजल्याने किंवा विटाळशी होण्याचे अगोदर जास्त. हृद्रोग ( अन्जायना ) वेदना डाव्या हातापर्यंत पसरतात. व पंजा सुजतो, डावा हात बधिर होतो, व बोटे मिरमिरतात. दिवसा चढताना धडधडते.

**हातपाय** :– हात व पावले सुजून फुगतात. पंजे मऊ लागतात व पावले मोठी दिसतात, बर्फासारखी गार पडतात. डावा हात बधिर. हाताच्या बोटांना गुदगुल्या होतात.

**झोप** :– ठिकठिकाणी ठुसठुसल्यामुळे झोप येत नाही. खाली पडल्याची स्वप्ने पडतात.

**ज्वर** :– दररोज नियमित वेळी येतो. पाठ व पंजे गार होतात. हिंवताप– पांघरूण घेतल्यानेसुद्धा थंडी राहत नाही.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– निजल्याने**– डाव्या कुशीवर व पाठीवर. नियमित वेळी; सकाळी १०–११ वाजता किंवा रात्री ११ वाजता. श्रमाने चालताना वर चढताना. उजेड. उन्ह. आवाज.

**क था** :– मोकळ्या हवेत. टाळू वर दाबल्याने.

**संबंधी औषधे** :– अको; कोक–कॅ; डिजि; नक्स–व्हा; युपे पर; लॅके; सल्फ.

---

## ७८. कॅडमिअम सल्फुरेटम Cadmium Sulphuratum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **जठर** व श्वासोच्छ्वास यावर होतो. शीण, ओकाऱ्या व अत्यंत अशक्तपणा. थंडी वाजते अंग गार होते; शेकानेसुद्धा कमी होत नाही. **अंथरुणावरून उठताना मूर्च्छा येते.** अर्धांगवातानंतर हातापायात राहिलेला अशक्तपणा. स्नायू व त्वचा यांच्यामध्ये मुंग्या आल्यासारखे वाटते. बधिरपणा, नाक, पंजे वगैरे. लुल्या पडलेल्या भागात दुखते किंवा मुंग्या येतात.

**मानसिक** :– एकांताची व काम करण्याची धास्ती.

**डोके** :– **उठताना मूर्च्छा येते.** घेरी येते, अंथरूण व खोली गरगर फिरत आहे असे वाटते.

**नाक** :– पिनस. नाकाची हाडे कुजतात. मोड.

**डोळे** :– सारा येतो. रातांधळेपणा.

**चेहरा** :– तोंड वेडेवाकडे होते. खालचा जबडा हालतो. लुलेपणा ( डावी बाजू ) थंडीमुळे आलेला, डोळे बंद करता येत नाहीत.

**जठर** :– थोडेथोडे, गार पाणी प्यावेसे वाटते. पण ते ताबडतोब ओकून पडते. मळमळते, जरा हालचाल केली तर ओकावयास होईल या धास्तीने स्वस्थ राहणे भाग पडते. ओकारी काळी, काफीच्या भुकटीप्रमाणे. कॅन्सर. आग होऊन कापल्याप्रमाणे वेदना होतात. कोरड्या ओकाऱ्या होऊन गुदमरते. कोणत्याही पदार्थाचा थोडा स्पर्श जरी ओठाला झाला तर मळमळते व ओकावयास होते.

**उदरः**– फुगते, हुळहुळे. स्पर्श सहन होत नाही. गार, दुर्गंधि रक्तमिश्रित शौचास होते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीतून पू व रक्त जाते.

**श्वसनेंद्रिये** :– छाती आवळल्यासारखी वाटते. दमा. छातीची लक्षणे उकिडवे बसल्याने जास्त होतात.

झोप :– झोप लागताच गुदमरल्यासारखे वाटते नंतर झोप येण्याची भीति वाटते.

त्वचा :– निळी, पिवळी, खपल्या बसलेली. पेये पिण्यानंतर केस उभे राहतात व पंजे कढत होतात. उन्हामुळे पिवळसर डाग पडतात.

ज्वर :– अंग बर्फासारखे गार. पीतज्वर ( यलो फिव्हर )

लक्षणांचे **वैशिष्ट्य जा होः**– उभे होताना. जरा हालचाल केली तर. थंडीने. ओझी वाहिल्याने-झोपेनंतर. उन्हात. मोकळ्या हवेत.

**व वा** खाण्याने, विश्रांतीने

**संबंधी औषधे** :– कार्बो–व्हेजि; झिंक; बेला; लोबे.

---

## ७९. कॅनॅबिस ( भांग )

Cannabis Indica & Canabis Sative

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***भावना; मन***; **जननेंद्रिये व मूत्रेंद्रिये** यावर होतो. **अतिशय स्वच्छंद व तरल मनोवृत्ति.** ***मन प्रक्षुब्ध होते व मनात भव्य–अचाट कल्पना येतात व आभास होतात.*** **कल्पना-तरंग व विलक्षण विचित्र भ्रामक कल्पना.** अत्यंत उल्हासी व सुखी. मिनिटे तासाप्रमाणे वाटतात व लहानशी जागा प्रशस्त जागेसारखी वाटते किंवा दिक्कालाचे ज्ञान नष्ट होते. स्वर्गात विहार करतो आहोत असे वाटते. किंवा धास्तीमुळे किंवा वेदनामुळे मानसिक यातना होऊन आकलनशक्ति नाहीशी होते. क्षुब्ध होणे, बडबडणे; खेळकरपणा; हवेत तरंगत आहोत असे वाटणे. अशक्तपणा वाटून शरीरात काही अर्थ नाही असे वाटणे. वेड-वात.

अंगावर कढत पाणी ओतले आहे किंवा **गार पाण्याचे थेंबथेंब पडत आहेत असे वाटणे** विशेषतः **हृदयावर,** गुदद्वारातून. बाहेर येत आहे असे वाटते उजेडाची आवड. लुल्यापडलेल्या भागांत गुदगुल्या होतात. हंसणे व रडणे. गंभीर गोष्टीविषयी हसणे किंवा उगीचच हसणे. अंथरुणाची भीती वाटते. घंटा, गाणे वगैरेचे आवाज ऐकू येतात. पुढील गोष्टीचे भविष्य वर्तविणे. सर्व वस्तु मिथ्या आहेत असे वाटते. बोलताना आपण बोलत नसून दुसरे व कोणीतरी बोलते आहे असा भास होतो. मूत्रेंद्रियांची लक्षणे स्पष्ट असल्यास कॅनॅबि, सॅटिव्हा वापरावे.

**डोके** :– दुखत असताना अनेक भ्रामक कल्पना मनात येतात. **टाळु उघडते आहे व मिटते आहे असे वाटते** डोक्याची कवटी वर उचलल्यासारखी वाटते, डोके धडापासून वेगळे झाले आहे असे वाटते. डोके आपोआप हालत राहते.

**डोळे** :– दृष्टीच्या क्षेत्रातील बाजूच्या वस्तू दिसतात. दृष्टि मंद. सारा.

**कान** :– पाणी उकळत असल्याप्रमाणे आवाज.

**चेहरा** :– त्वचा ताणल्यासारखी किंवा घट्ट झाल्यासारखी वाटते.

**तोंड** :– ओठ चिकटून बसतात. झोपेत दात खाणे. तोतरे बोलणे. **लाळ, पांढरी,** दाट फेसाळ.

**उदर** :– आत काही तरी जिवंत फिरत आहे असे वाटते किंवा इकडे तिकडे उडते आहे असे वाटते. चेंडूवर बसल्याप्रमाणे गुदद्वारात त्रास होतो.

**मूत्रेंद्रिये**.– ***लघवीला आग होऊन थेंब थेंब होते;*** वेदना होतात व त्या मागे जातात. परमा–तीव्रावस्था. मूत्रमार्ग इतका हुळहुळा होतो की; मांड्या दूर करून चालावे लागते. मूत्रपिंडात वेदना, हसताना जास्त होतात.

**पुरुषजननेंद्रिये** :– शिश्न वेदना होऊन ताठते. बोंडीवरची कातडी मुजते. वैषयिक वासना वाढते. लघवी कष्टाने होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ खूप जातो, गर्भाशयात व पाठीत खूप वेदना होतात, वेदना होताना संभोगाची इच्छा होते. वंध्या स्त्रियांची वासना वाढते. वारंवार संभोग केल्यामुळे वाखा होण्याचा संभव.

**श्वसनेंद्रिये** :– वारंवार गुदमरल्यासारखे वाटते. छाती भरल्यासारखी वाटून श्वासोच्छ्वास करण्यास त्रास होतो. उभे राहिल्याने बरे वाटते. आवाजावर ताबा रहात नाही.

**हृदय :–** दम्यात धडधडल्यामुळे जाग येते. पाण्याचे थेंब गळत आहेत असे वाटते ( कॅनॅबि-सॅटि )

**पाठ :–** दोन्ही खांद्यावर आडवे व कण्यात दुखते त्यामुळे ताठ चालता येत नाही. वाकून चालावे लागते. हनुवटी छातीला चिकटते (कॅ नॅ–सॅटि.)

**हातपाय :–** हातपाय दुखतात, दीर्घ श्वास घेतल्याने जास्त. पायातील शक्ती अजिबात नाहीशी होते. थोडेसे चालले तरी खूप थकवा येतो. लचकल्या-प्रमाणे बोटे आखडतात.

**झोप :–** मोहनिद्रा, वैषयिक किंवा प्रेतांची स्वप्ने पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा हो :– *लघवी करताना. अंधारात* श्रम–बोलणे–चालणे. परमा. काफी. दारु. तंबाखु. निजल्याने, जिना चढताना (कॅनॅ–सॅटि)

**संबंधी औषधे :–** ओपि; नक्स–मॉ; नक्स–व्हा; पल्स; बेला; ऱ्हस–टा; लायको; व्हेरा–भा; हायासा.

**उतार :–** एपि.

---

## ८०. कॅन्थारिस् Cantharis

**सर्वसाधारण:–** या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा; मूत्रेंद्रियांची–मूत्राशयाची;* घशाची व आतड्याच्या खालच्या भागाची; आवरण–मेंदूवरील फुफ्फुसावरील; त्वचा व उजवी बाजू यावर होतो. *वेदना–चुणचुण होऊन कापल्याप्रमाणे* किंवा *आग होऊन भाजल्याप्रमाणे* होतात. हुळहुळे झाल्याप्रमाणे वाटते. *अत्यंत तीव्र स्वरूपाची सूज (शोथ)* त्यामुळे सूज आलेला भाग कुजावयास किंवा सडावयास लागतो. एकाएकी इतका अशक्तपणा वाटतो की बोलवतसुद्धा नाही. भाजणे पोळणे–भाजलेली जागा हुळहुळी होऊन चुणचुणते; गार पाण्याने बरे वाटते. भाजल्याच्या मानाने अवास्तव सूज येते. धावरे–भाजल्यासारखे फोड येतात व अतिशय अस्वस्थता येते. कोठेही सूज (शोथ) आली तरी मूत्राशयाचे उपद्रव बहुधा असतात. आचके–बाळंतपणात. रक्तस्राव.

**मानसिक :–** वैषयिक उन्माद. राग. बेफाम वात. कंठाला स्पर्श केल्यास किंवा पाणी पिताना रडणे–भुंकल्यासारखे ओरडणे. चेहरा लाल होऊन एकाएकी बेशुद्ध होणे. काहीतरी करण्याचा प्रयत्न करणे पण हातून काहीच होत

नाही. शृंगारिक, स्त्रीविषयी गाणे म्हणणे; जननेंद्रिये, लघवी, शौच या संबंधी बडबड.

**डोके** :– मेंदूची आग होते. मेंदूत पाणी उकळत आहे असे वाटते.

**डोळे** :– लाल, चकाकणारे व वटारल्यासारखे. दृष्टी पिवळी.

**कान** :– आतून कढत वारे येत आहे असे वाटते.

**चेहरा** :– फिकट, केविलवाणा, मृतवत. कढत व लाल. खाजणारे भाजल्यासारखे फोड येतात.

**जीभ** :– सुजलेली व कंपयुक्त. कडा लाल व गुळगुळीत.

**तोंड** :– तोंडात व घशात **आग होते.** पातळ पदार्थ गिळताना अतिशय त्रास होतो. **सारखी तहान लागते.** पण पाणी पिण्याचा तिटकारा. लाळ चिळस येण्याइतकी गोड. दातखिळी बसली असताना दांत खाणे.

**जठर** :– जोरजोराने कोरड्या ओकाऱ्या येऊन ओकावयास होते. **जठराच्या जागी स्पर्श** सहन होत नाही. स्पर्श केला तर आंचके येतात.

**उदर** :– **शौचास होताना लघवीला पण होईल असे वाटते व कुंथावे लागते.** शौचास होताना आग होते–आवेचे खिळ्याप्रमाणे तुकडे तुकडे पडतात. शौचानंतर कापरे भरते. आव. गुदात कापल्याप्रमाणे वेदना होतात. वात सरल्याने थोडे पण शौचास झाल्याने चांगले बरे वाटते. बद्धकोष्ठात लघवी तुंबते. आव व हगवणीत कष्टाने लघवीला होते.

**मूत्रेंद्रिये** :– *लघवी होताना भाजल्यासारखी आग होते; कापल्यासारखे वाटते, लघवीला होईल होईलसे वाटून असह्य थुंकावे लागते. लघवी थेंब थेंब होते.* लघवीतून रक्त जाते. मूत्राशयाचा शोथ; मूत्रपिंडाचा शोथ. नाळगुद. मूत्रपिंडात खड्यामुळे होणाऱ्या वेदना शिश्नाची बोंडी दाबल्याने थोड्या कमी होतात

**पुरुषजननेंद्रिये** :– सुजून दुखतात. शिश्न ताठताना वेदना होतात, तरीपण संभोगाची इच्छा होते. शिश्न सारखे ओढावेसे वाटते. ( मुलाना–मुतखडा झाला असल्यास ). **सारखा संभोग करावासा वाटतो,** संभोगाने समाधान होत नाही. वीर्यपात होतो. परमा. वीर्य रक्तमिश्रित.

**स्त्रीजननेंद्रिये** :– वार आत राहते व त्यावेळेस लघवीला वारंवार कष्टाने होते. मूढगर्भ, मृतगर्भ बाहेर काढण्यास या औषधाने मदत होते. कामोन्माद. विटाळ सारखा वाहतो– वेडेवाकडे पाऊल पडले तर जास्त जातो. योनिद्वार सुजून

काळे पडते. पाळी लवकर येते. विटाळ काळा, थोडा. या औषधाने गर्भधारणा होण्यास मदत होते. योनिद्वाराला कंड सुटून वैषयिक वासना उत्तेजित होते.

**श्वसनेंद्रियें** :– मधुन मधुन अनेक वेळा कोरडा खोकल्याचा ठसका लागतो. छातीतील वेदना ढेकर आल्याने कमी होतात. प्लुरिसी– पाणी साचते. आवाज मंद व अशक्तपणा वाटतो.

**हृदय** :– हृदयाभोवती पाणी साचते. मूर्च्छा येण्याची प्रवृत्ति. नाडी मंद, अनियमित.

**पाठ** :– कंबरेत दुखते व वारंवार लघवीला लागते. पाठ मागे–पुढे वाकते.

**हातपाय** :– तळपाय हुळहुळे होतात. चालता येत नाही. हात व पावले गार. जिना चढताना गुडघे थरथरतात.

**ज्वर** :– शौचास होताना कांपरे भरते. जननेंद्रियाला घाम येतो. घामाला लघवीसारखा वास येतो. अंगावर पाणी ओतल्याप्रमाणे थंडी वाजते.

**त्वचा** :– भाजल्यासारखे फोड येतात व ते काळे पडतात, आग होऊन कंड सुटते. धावरे–भाजल्यासारखे फोड येतात. भाजणे, पोळणे गार पाण्यानी बरे वाटते. फोडाना स्पर्श केला तर आग होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *लघवी करताना.* पेये पिताना. थंडी. **चकाकणाऱ्या वस्तूकडे पाहिल्यास. पाण्याच्या आवाजाने.** कंटाळा स्पर्श केल्याने. काफी.

**ब वा** :- उष्णतेने. विश्रांतीने. चोळण्याने.

**सहाय्यक औषधे** :– एपि; कॅम्फ.

**संबंधी औषधे** :– आर्से; कलि आयो; पल्स; फास्फ; बेला; मर्क्यु; मर्क्यु–को; सल्फ; सेपि.

---

## ८१. कॅप्सिकम ( मिरची ) Capsicum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा*; *घसा*; **मूत्रपिंड**; हाडे व कानाच्या मागील हाडाचा उंचवटा यावर होतो. लठ्ठ, शिथिल, **चेहरा लाल असलेले अमंगळ, सुस्त, व बेशिस्त अडाणी इसम. थंडी सोसत नाही व दिलेल्या औषधाची योग्य क्रिया होत नाही.** वृद्धपणा. शारीरिक श्रमाचा कंटाळा. घराची ओढ लागते. **आवळल्यासारखे वाटते–**

घशात व त्यामुळे सारखे गिळावे लागते. ***आग व चुणचूण***; घशात, **जिभेचा शेंडा**; जठरात; शौचास होताना गुदात; मूळव्याधीच्या मोडात; मूत्रग्रंथीत. ***हुळहुळेपणा.*** श्लेष्मल त्वचा; काळसर लाल-स्पंजासारखी व त्यातून रक्तमिश्रित आम वाहतो. सूज. ( शोथ ) पुवळण्याची प्रवृत्ति. खोल गळू. **रेघा मारल्याप्रमाणे वेदना. वेदना होताना किंवा पेये पिताना शहारे येतात.** दुर्गंधि स्राव. मानसिक श्रमाने क्षीण झालेले वृद्ध इसम, किंवा अपुऱ्या अन्नाने खंगलेले इसम. एखाद्या भागाला चिमटा घेतला तर चिमटयात आलेला उंचवटा तसाच बराच वेळ राहतो.

**मानसिक** :- मनोवृत्ति लहरी, छांदिष्ट. **घरी जाण्याची ओढ**- त्यामुळे झोप येत नाही, चेहरा लाल होतो. व आत्महत्त्या करावीशी वाटते. दारुडयांचा वात. गांवढळ, भडाण्यासारखे वागणे, कुठे तरी धडपडणे, अडखळणे. न ऐकणारी मुले. चेष्टेखोर, गाणे म्हणणे, परंतु क्षुल्लक कारणाने रागावणे. आपला कोणी अपमान करतो की काय इकडे सारखे लक्ष असणे. एखादी वस्तु हवी असेल तर तीच वस्तु दुसऱ्यानी देण्याची सूचना केली तर त्याला विरोध करणे.

**डोके** :- फुटल्यासारखे दुखते-खोकताना जास्त होते, शेकल्याने, डोके उंच करून निजल्याने बरे वाटते.

**डोळे** :- वस्तु काळ्या दिसतात.

**कान** :- दोन्ही कानाचे विकार आलटुन पालटून होतात. कानाच्या हाडांचा उंचवटा सुजतो व दुखतो, दाब सहन होत नाही. कान कढत, कान दुखून नंतर ऐकू कमी येते. गरोदरपणी होणारे कानाचे विकार.

**नाक** :- *लाल पण गार*, शेंडा अतिशय कढत. सकाळी अंथरुणात नाकातून रक्त येते.

**चेहरा** :- चेहरा *लाल पण गार*, किंवा फिकट व लाल आलटुन पालटून. रेघ मारल्याप्रमाणे वेदना. ओठ सुजलेले.

**तोंड** :- तोंडात भाजल्यासारखे फोड येतात किंवा सपाट व्रण पडतात व ते दुखतात. **जीभ बुंध्याशी हिरवट. पडजीभ सुजलेली.** लाळ वाढते. तोंडाला घाण येते. **जिभेच्या टोकाची आग व चुणचुण.** हिरडया स्पंजा-प्रमाणे, दातापासून सरकतात. लाळ वाढते.

**घसा** :- आंत आग, **चुणचुण.** घसा आवळल्यासारखा वाटून सारखे गिळावे लागते. तंबाखू ओढणार व दारुडे यांची घसेदुखी. वेदना व कोरडेपणा

कानांपर्यंत. **पडजीभ सुजते.** लांब होते; ती टणक जागेवर दाब देते आहे असे वाटते. खोकताना कढत व तिखट हवा वर येते व तिला दुर्गंधी चव असते.

**जठर** :– चमचमीत तिखट पदार्थ खावेसे वाटतात. कांहीतरी उत्तेजक हवेसे वाटते. तोंडाला पाणी सुटते. तहान लागते पण पाणी पिताना कापरे भरते. आम्ल-पित्त. आत आग होते किंवा कापरे भरते; बर्फासारखे थंडगार वाटते.

**उदर** :– शौचास थोडी थोडी होऊन त्यात पांढरी, कढत आव पडते व त्यावेळेस लघवीला होईल होईल असे वाटते. तहान लागते व कंबर दुखते. आव. आंतील धमन्या जोराने उडतात. **मूळव्याध आग होते.** रक्त येते व गुदद्वार हुळहुळे होते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला होईल होईलसे वाटते पण होत नाही. लघवी कष्टाने होते. लघवी प्रथम थेंबथेंब पडते नंतर चिळकांड्या उडतात. मूत्रमार्गाच्या तोंडाशी आग होते. पेये पिताना लघवीला व शौचास लागते.

**पुरुषजननेंद्रिये** :– वृषण गार होते. अंड झिजते व बधिर होते. परमा–दाट पांढरा सायीप्रमाणे स्राव. वीर्यवाहिनी नलिका वाळते. मूत्रग्रंथित अतिशय आग होते, परम्यामुळे. शृंगारिक गोंजारतांना सर्वांग कापते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ थांबण्याच्या वयात होणारे उपद्रव व त्यावेळेस जिभेच्या शेंड्याची आग होते. रक्तप्रदर व त्यावेळेस मळमळते.

**श्वसनेंद्रिये** :– छाती आवळल्यासारखी वाटून श्वासोच्छ्वास करता येत नाही. **खोकताना दूरच्या भागात दुखते**–डोक्यात–कानात–मूत्राशयात–गुडघ्यात पायात वगैरे, किंवा तोंडाला दुर्गंधी वास येतो. अशक्तपणामुळे खोकून कफ बाहेर काढता येत नाही. फुप्फुसांचे कुजणे. बरगड्या निखळल्यासारख्या वाटतात. दम्यात चेहरा लाल होतो. दीर्घ श्वास घ्यावासा वाटतो व त्याने आपल्या सर्व तक्रारी दूर होतील असे वाटते. गाणाऱ्यांचा व वक्त्यांचा बसलेला आवाज.

**पाठ** :– पाणी पिताना पाठीत तीव्र वेदना होतात. शौचानंतर कमरेत दुखते. माकडहाडात मूळव्याध व आव झाली असताना दुखते.

**हातपाय** :– गृध्रसी वात, मागे वाकल्याने किंवा खोकताना जास्त दुखते. मांड्याना गार घाम येतो. सांध्यात कटकट आवाज होतो; ताठतात, सुरवातीस चालताना दुखतात. कमरेच्या सांध्यापासून पाऊलापर्यंत खोकताना दुखते. हातापायाना छळे पडल्याप्रमाणे वेदना होतात.

**ज्वर :–** पाठीत थंडी सुरू होते–शेकल्याने बरे वाटते. प्रत्येक **वेळी पाणी प्याल्यानंतर थंडी वाजते.** शहारे डोक्यापर्यंत जातात; **थंडी वाजणे** व उष्णता आलटून पालटून नंतर घाम येतो. सहजासहजी घाम येतो. विकार झालेला भाग गार होतो.

**झोप :–** खाण्यानंतर गुंगी येते. भावनातिरेकाने झोप येत नाही किंवा घराच्या ओढीमुळे झोप लागत नाही. स्वप्नात वरून खाली पडत आहोत असे वाटते. दिवसा जांभया येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** ***वाऱ्याची झुळुक लागल्याने;*** गरम असली तरी. ***थंड–हवा***–पाणी. उघडे झाल्याने. दमट हवा. आंघोळीने. आवंढा गिळताना. खाताना. दारुडे.

**क** **वा :–** उष्णतेने. एकसारखी हालचाल केल्याने.

**सहाय्यक औषधे :–** नेट्र–मू.

**संबंधी औषधे :–** कॅन्था; पल्स; बेला; लायको; सिना; सिलि.

---

## ८२. कॅम्फर (कापूर) Camphor

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *पचनेंद्रिये*; मूत्रेंद्रिये; व नाक यावर होतो. ***अंग बर्फासारखे गार पण पांघरुण नकोसे वाटते*** किंवा एकदा पांघरुण घ्यावेसे वाटते नंतर नकोसे वाटते. **अंतर्गत आग. एकदम शक्तिपात**–आघातामुळे–शस्त्रक्रियेनंतर, उन्हामुळे–कॉलरा वगैरे. कॉलऱ्यात एखादी ओकारी किंवा जुलाब झाला तर शक्तिपात होतो. निळसर–सुरकुतलेला म्हाताऱ्यासारखा चेहरा. **स्राव** येण्याचे **बंद** होते. किंवा **कमी प्रमाणात जातात. आचके**– तोंडाला फेस येतो, ओठ निळे होतात व दातखिळी बसते. जोराने अंग ताठते–दात उघडे पडतात; नंतर गुंगी येते व अंग गार पडते. **थंड वारे सहन होत नाही,** सर्दी झालेली **सोसत नाही.** वेदना होताना उष्ण लाटा आल्यासारखे वाटते व बेचैनपणा येतो. वेदनांचा विचार केल्यास वेदना बंद होतात. विकारांची किंवा लक्षणांची गुंतागुंत झाली असल्यास या औषधाने त्याचा उलगडा होण्याला मदत होते. हे औषध बहुतेक सर्व– विशेषतः वनस्पतिजन्य औषधांना उतार म्हणून उपयोगी पडते.

**मानसिक :– मानसिक बधिरता किंवा भीतियुक्त काळजी.** कोणीही जवळपास असलेले आवडत नाही व कोणतीही गोष्ट मनास येत नाही. वात-वेड.

अंथरुणाबाहेर किंवा खिडकीतून बाहेर उडी मारण्याचा प्रयत्न करणे. आपण मरणार आहोत असे वाटते, पण आपण जिवंत आहोत असे पाहून बरे वाटते. रात्री एकाएकी काळजी वाटू लागते; व वेड लागल्यासारखे होते. कोणीतरी मदतीला यावे म्हणून ओरडणे. प्रश्न विचारला तर डोळे मिटणे व प्रश्नाचे उत्तर न देणे.

**डोके** :– डोक्यात गाठी मारल्याप्रमाणे वाटते. डोक्याच्या मागील भागात नाडीचे ठोके पडल्याप्रमाणे ठुसठुसते किंवा हातोड्याचे ठोके मारल्याप्रमाणे वाटते. कानशिलात व डोळ्याभोवती मधून मधून चमका मारतात. आचक्यात डोके एका बाजूला वाकते.

**डोळे** :– वस्तु जास्त चकचकीत व तेजस्वी आहेत असा भास होतो. बटारल्यासारखे वर वळलेले किंवा कानशिलाकडे वळलेले. बाहुल्या रुंदावतात.

**कान** :– पाळ्या कढत व लाल.

**नाक** :– हवेत बदल झाला की सर्दी होते; विशेषतः वृद्धपणी. नाक गार व चिमटल्याप्रमाणे. नाकातून एकसारखे रक्त येते व त्यावेळेस अंगावरचे केस उभे राहतात. श्वास घेताना हवा गार लागते.

**चेहरा** :– निळसर, सुरकुतलेला, म्हाताऱ्यासारखा. ओठ विलग होतात त्यामुळे दात दिसतात. गार घाम, दातखिळी बसते. तोंडाला फेस येतो.

**जीभ** :– गार, निळी, कंपयुक्त. बोलणे अडखळत.

**जठर** :– तहान लागते. पाणी कितीही प्याले तरी समाधान होत नाही. आग होते.

**उदर** :– कॉलरा– ओकाऱ्या किंवा जुलाब फार न होता एकदम शक्तिपात होतो. अंग गार पडते. अंगावर पांघरूण नको वाटते. स्नायूंना पेटके येतात. तांदुळाच्या धुणीप्रमाणे पांढरे जुलाब होतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला कष्टाने थोडे थोडे होते. लघवी होताना आग होते. लघवीतून रक्त जाते. मूत्राशयात लघवी तुंबून राहते व कितीही कुंथले तरी होत नाही.

**पुरुषजननेंद्रिये** :– संभोगाची इच्छा तीव्र होते. शिश्न ताठ होताना दुखते. कामोन्माद.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ थांबण्याच्या वयात– अंगात कढत लाट्या आल्यासारखे वाटते, उदर हातपाय गार पडतात. पांघरूण घेतल्याने घाम येतो व उघडे राहिल्यास अंग गार पडते.

**श्वसनेंद्रिये** :– श्वासोच्छ्वास गार. आवाज घोगरा चिरचिरा. श्वासोच्छ्वास कोंडून गुदमरल्यासारखे वाटते. भयंकर कोरड्या खोकल्याची ढास. उपजलेल्या मुलाना श्वासोच्छ्वास करता येत नाही.

**हातपाय** :– बधिर, मिरमिरल्यासारखे वाटते व गार पडतात. आंगठे मागल्या बाजूने वाकतात. पोटऱ्याना पेटके येतात. पावले गार, लचकल्याप्रमाणे दुखतात. सांध्यात कटकट आवाज.

**ज्वर** :– हुडहुडी भरते व अंग गार पडते. ताप असताना अंगावर पांघरूण घ्यावेसे वाटते. शोथ ( सूज ) आल्यामुळे एकदम ताप येतो. अंग आळीपाळीने कढत व गार होते व जलद थकवा येतो. सर्दी होण्याचे अगोदर तिकोनी हाडाखाली शहारे येतात.

**त्वचा** :– **कोरडी; धांवरे.** निळसर, **गार**, पांघरूण नको वाटते.

**झोप** :– अस्वस्थ. हातपाय गार झाल्यामुळे झोप येत नाही.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– थंडी अर्धवट झोपेत असताना.** मानसिक श्रम. आघात. ***स्राव येण्याचे बंद झाल्याने.*** हालचाल.

**ब वा :– स्राव सुरू झाल्याने.** घाम आल्याने. **विकाराचा विचार केल्याने.**

**सहाय्यक औषधे :– कॅन्था.**

**संबंधी औषधे** :– आर्से; ओपि; ॲन्टी–टा; कार्बो–व्हेजि; कोक्यु; कुप्रम; नक्स–व्हा; बेला; ऱ्हस–टा; व्हेरा–आ; सिकेल.

---

## ८३. कॅलंडुला Calendua

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***स्नायू;*** **कणा** व यकृतावर होतो. दुखापतीच्या मानाने **वेदना जास्त तीव्र असतात.** ***जखमा***–उघड्या–फाडल्या **–ओरबडल्याप्रमाणे, वेडावाकड्या अगर पुवळलेल्या.** रक्तस्राव–डोक्याच्या जखमातून होणारा किंवा दात काढल्यानंतर येणारा. या औषधाने जखमांचे स्वरूप निरोगी होऊन त्या जलद भरून येण्यास मदत होते. **पू होण्याचे थांबते.** दमट व मोकळी हवा सोसत नाही– सर्दी होते. कावीळ. कॅन्सरमध्ये इतर औषधाबरोबर देता येते. **सुनबहिरीनंतर आलेला लुळेपणा कॅलंडुलाचे टिंक्चर कढत पाण्यात मिसळून त्याच्या घड्या ठेवल्या तर बाळंतपणानंतर चांगला आराम मिळतो.**

**मानसिक** :– अतिशय घाबरटपणा. उगीचच भीती वाटते.

**डोके** :– मेंदूवर ओझे आहे असे वाटते.

**डोळे** :– वस्तु पिवळ्या दिसतात. लासरू.

**नाक** :– एकाच बाजूने स्राव येतो; स्राव हिरवा

**कान** :– बहिरेपणा. गाडीत किंवा गोंगाटात बरे ऐकू येते. दूरचे आवाज चांगले ऐकू येतात. आवाजाने दचकणे.

**जठर** :– छातीत जळजळते व त्यावेळी अंगावर केस उभे राहतात. छातीत मळमळल्यासारखे वाटते. तंबाखू ओढताना उचकी लागते.

**उदर** :– दह्यासारखे पांढरे शौचास होते. पोटाची खळी फुगते. काविळ.

**पुरुषजननेंद्रिये** :– संभोगानंतर बोंडीची कातडी करवडते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गर्भाशयाची अवास्तव वाढ, गर्भाशयाच्या तोंडाशी मांसांकुराप्रमाणे उगवण. गर्भाशयाचे मुख वाजवीपेक्षा जास्त योनीत आलेले असते रक्तप्रदर.

**पाठ** :– तिकोनी हाडाच्या टोकाशी मारल्यासारखे दुखते. पंजे गार.

**त्वचा** :– पिवळी. अंगावर केस उभे राहतात.

**ज्वर** :– मोकळी हवा सहन होत नाही.; अंग गार होते. पाठीत शहारे येताना त्वचा गरम होते. संध्याकाळी अंग तापते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– दमट–आभाळ आलेली हवा. थंडी वाजताना.

**संबंधी औषधे** :– आर्नि; आर्से; नाय–ॲसि; बेलिस; ब्रायो; फास्फ; र्‍हस–टा.

**सहाय्यक औषधे** :– हेपार.

---

## ८४. कॅल्करिआ आयोडेटा Calcarea Iodata

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम गाठीवर होतो. वारंवार सर्दी होणारी फोपशी मुले. स्राव भरपूर व पिवळे. गर्भाशयाची गुल्मे. गलकंठ विटाळसेपणी मोठे होते.

**डोके** :– गाडीत गार वारे लागल्याने डोके दुखावयास लागते.

**घसा** :– टानसिल मोठ्या होतात व त्यावर लहान लहान खळग्या पडतात.

**त्वचा** :– शिरा फुगून वेड्यावाकड्या झालेल्या असताना त्यात व्रण पडतात व ते लवकर बरे होत नाहीत. घाम खूप येतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– स्तनात गाठी होतात. व त्या इकडे तिकडे सरकविल्याने सरकतात– दाबल्याने दुखतात– किंवा हात हालविल्याने दुखतात.

---

## ८५. कॅल्करिआ आर्सेनिका Calcarea Arsenica

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम हृदय व मूत्रपिंड यावर होतो. शरीर हलके होऊन जमिनीवर पाय ठरत नाही असे वाटते. जीर्ण हिवताप. यकृत व पांथरी वाढलेली तान्ही मुले. विटाळ थांबण्याच्या वयात लठ्ठ स्त्रियांना होणारे उपद्रव. दर ४ थ्या ठोक्याला नाडी नियमितपणे थांबते. जलोदर, नाळगूद. कॅन्सर. फेफरे येण्याचे अगोदर डोक्याकडे रक्त जाते– व हृदयाजवळ फेफरे येण्याची जाणीव होते.

**मानसिक** :– काळजी उदासीनता सोबतीची आवड.

**डोके** :– घेरी येताच डोक्यात रक्त चढते. दर आठवड्यानी डोके दुखते. वेदना होत असलेल्या बाजूस निजल्याने बरे वाटते.

**उदर** :– रताळी खाण्याने हगवण लागते. पॅन्क्रिआ ग्रंथीचे विकार; कॅन्सरची आग.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्रपिंडाच्या जागेवर दाब सहन होत नाही. लघवीतून आल्ब्युमिन जाते. दर तासा-तासाला लघवीला जावे लागते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गर्भाशयाचा कॅन्सर– रक्तमिश्रित दुर्गंधी धुपणी– गर्भाशयात व योनीत आग होते.

**हृदय** :– हृदयाच्या जागेत आवळल्यासारखे वाटून गुदमरल्यासारखे वाटते व हृदय धडधडावयास लागते. फेफरे येण्याचे अगोदर धडधडावयास लागते व दुखते. प्रत्येक ४ थ्या ठोक्याला नाडी थांबते.

**श्वसनेंद्रिये** :– कंठ दोरा बांधून मागे ओढल्यासारखा वाटतो. छातीत आग होते.

**मानपाठ** :– मानेच्या पोकळीत ताठते व दुखते. पाठीत जोराजोराने ठुसठुसावयास लागते, त्यामुळे आंथरुणाबाहेर पडावे लागते.

**हातपाय** :– पाय थकल्यासारखे किंवा लुळे पडल्यासारखे वाटतात.

ज्वर :– हिवताप.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– थोड्याशा श्रमाने. थंडीने. खाण्यात बदल केल्याने.

---

## ८६. कॅल्करिआ कार्बोनिका ( खडू ) Calcarca Carbonica

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *पोषण*; *हाडे*; *गाठी*; *त्वचा*; *रक्त*; *छाती*; ( उजवे फुप्फुस ); *हृदय* व *मुले* यावर होतो. लठ्ठ, *फोपशी मुले याना सहजासहजी घाम येतो, विशेषतः डोक्याला, छातीला व झोपेत जास्त येतो. स्राव भरपूर, बहुधा आंबट वासाचे*, शौच, घाम, शरीराचा वास, लाळ वगैरे. शरीर थलथलीत व सुस्त. आळशी स्वभाव. भार पडलेली जागा बधिर होते. सहज लचक भरते किंवा सांधे निखळतात. **थंड दमट हवेने नसानसातून थंडी वाजते. वारंवार सर्दी होते** व ती छातीत उतरते. संवर्धन नीट होत नाही. **हाडांची अयोग्य वाढ**. हाडावर हाड वाढते किंवा ती मऊ होऊन वाकडी होतात. *मुलांची टाळू योग्य वेळी भरून येत नाही*, **दात उशीरा येतात व मुले उशीरा चालावयास लागतात**. मुडदूस. खडे होण्याची प्रवृत्ति. क्षयाची प्रथमावस्था–कोरडा खोकला येतो, छातीत इतस्ततः दुखते–मळ-मळते– व सहज दम लागतो. शारीरिक व मानसिक श्रमाने आलेला थकवा. स्नायूत खोल असलेली गळवे, मोड होण्याची प्रवृत्ति–नाकात, कानात, गर्भाशयात वगैरे. पोकळ गुल्मे. वाळलेली मोठ्या पोटाची व डोक्याची मुले. पाण्यात काम करून उद्भवलेले विकार. मुष्टिमैथून, संभोगातिरेक, भीती, ओझे उचलणे, विटाळ बंद होणे या कारणानी उद्भवलेले विकार. *गाठी मोठ्या होतात* मानेच्या वगैरे. फेफरे येण्याचे अगोदर बेंबीतून भावना वर जातात किंवा उंदीर हातावरून वर किंवा खाली पोटाच्या खळीतून गर्भाशयापर्यंत किंवा खाली पायावरून चालत आहे असे वाटते. स्नायूत उडणे, कंप, लुळे पडणे, वेदना. मुलाना उभे केले तर ती जमिनीवर पाय टेकत नाहीत. मंद, आळशी, मुले, ती खेळत नाहीत. दगड घडविणाऱ्यांचे विकार.

**मानसिक** :– उदासीन खिन्न, रडावेसे वाटते. लोक आपणाकडे **संशयित दृष्टीने पाहत आहेत असे वाटते** व स्वतः साशंक असणे. कोणतीही गोष्ट मन

लावून करता येत नाही. बोलताना, लिहिताना गोंधळ होतो, किंवा शब्दाची उलटापालट होते. सावधपणा. भीती वाटते–वेड लागेल–काहीतरी दुखणे होईल–काहीतरी दुःखदायक किंवा भयंकर घडेल अशी. उद्योगी इसम एकदम आळशी होतात. क्षुल्लक गोष्टींचा विचार करावासा वाटतो. निराश, निरुत्साही. कुरकुऱ्या स्वभाव. मुले चिडखोर, भित्री व एकेठिकाणी स्वस्थ बसून राहतात. काही करू अशी शक्यता वाटत नाही. लहानसहान महत्त्व नसलेल्या गोष्टींचा विचार करीत बसणे. सर्वदिवस काड्या, काटक्यांचे तुकडे करीत बसणे. आपल्याला कुणी कोणीतरी चालत आहे असा भास. खालीवर पळत जाऊन ओरडावेसे वाटते. आपण बरे होणार नाही अशी निराशा वाटते. आग, खून, उंदीर यांचे स्वप्ने दिसतात.

**डोके** :– घेरी–अनेक विकारात किंवा लक्षणांबरोबर उद्भवते. भीति–चिंता वाटली की घेरी येते. जिना चढताना किंवा उंच जागी गेल्यास घेरी येते. डोक्यात आत खोल हातोड्याचे ठोके मारल्याप्रमाणे किंवा फुटल्याप्रमाणे दुखते. डोके दुखताना हात व पावले गार होतात. डोके आतून बाहेरून बर्फासारखे गार वाटते. मानसिक श्रमाने डोके तापते. वाऱ्याने डोके जास्त दुखते, अंधारात बरे वाटते. डोके दुखताना ढेकरा येतात. अर्धशिशी. जागे झाल्यानंतर **डोके खाजते. दुर्गंधी खाड खवडे** त्यामुळे गळ्यातील गाठी मोठ्या होतात. **डोक्याला घाम येतो** व त्याने उशी भिजते. ***डोके मोठे व उदर मोठे व टणक.*** जास्त ओझे उचलल्यामुळे किंवा स्नायूंना कोणत्याही प्रकारचा ताण पडल्यामुळे डोके दुखते. सकाळी जागे झाल्यानंतर **डोके खाजविणे,** टाळूत आग होते. ठिकठिकाणी गार वाटते. मेंदूत पाणी साचते ( जीर्ण )

**डोळे** :– ***बाहुल्या विस्तारलेल्या.*** डोळे मिटल्यानंतर वस्तु दिसत आहेत असे वाटते. दृष्टिक्षेत्रातील बाजूच्या वस्तू दिसतात. डोळे वारंवार येतात. उजेड सहन होत नाही. मोतिबिंदू, सारा; फूल. सारविल्या किंवा धुरकटल्यासारखे दिसते. एकसारखे लिहिण्याने, पाहण्याने किंवा वाचण्याने दृष्टि मंद होते. लांबचे चांगले दिसते. लासरू. कंड सुटते. गॅसच्या उजेडात वाचता येत नाही.

**कान** :– कानात ठुसठुसल्यासारख्या वेदना होऊन काहीतरी बाहेर येत आहे असे वाटते. कानातून दाट पिवळा पू येतो. कोयनेल खाऊन किंवा पाण्यात काम करून आलेला बहिरेपणा. आत आवाज होतात. मांड, त्यातून रक्त येते. कानात आवाज होतात, गिळताना, चावताना जास्त होतात.

**नाक** :– सर्दी झाली की लघवीस वारंवार जावे लागते, वृद्धपणाची सर्दी. शेंबूड दाट दुर्गंधि, पिवळा–काळसर रक्तमिश्रित. सकाळी रक्त येते. नाक सुजते; व

वरचा ओठ सुजतो; हवेत बदल झाला की मुलांना सर्दी होते. नाकपुड्या हुळहुळ्या होऊन त्यांत व्रण पडतात. मोड. सर्दी व पोटदुखी आलटून पालटून. नाकात घाण येते. सर्दी न होता वारंवार शिंका येतात. लठ्ठ होण्याऱ्या मुलांच्या नाकांतून रक्त येते.

**चेहरा** :– फिकट–पांढरा फटफटीत, फुगीर. **वरचा ओठ सुजतो** व त्यांत भेगा पडून रक्त येते, सकाळी. जबड्याखालील गाठी मोठया होतात. हनुवटीवर पुटकुळ्या येऊन त्या खाजतात. मुले झोपेत चपळतात व गिळतात.

**तोंड** :– एकसारखी आंबट चव. तोंडाला आंबट पाणी येते. हिरड्यातून रक्त येते. जीभ रात्री कोरडी पडते; शेंडा भाजल्यासारखा वाटतो–गरम पदार्थ खाताना जास्त. हवा लागल्याने किंवा कढत पदार्थ तोंडात घेतल्यास दात दुखतात. दात लवकर येत नाहीत व येताना त्रास होतो. गालगुंड होऊन झालेला नाडीव्रण.

**घसा** :– टानसील सुजून मोठया होतात. गिळताना टोचते. घशात बारीक व्रण पडून ते टाळूपर्यंत येतात. पडजीभ फुगते–सुजते.

**जठर** :– अतिश्रम केल्याने भूक नाहीशी होते. खाल्ल्यानंतर पोट फुगते. सकाळी भूक लागते. दूध सोसत नाही. शिजविलेले पदार्थ किंवा मांस यांचा तिटकारा. खडू, माती, कोळसे, अंडी यासारखे रुक्ष पदार्थ खावेसे वाटतात, तहान लागते व थंड पेयें प्यावीशी वाटतात, विशेषतः रात्रीं. आंबट ढेकरा येतात व आंबट ओकावयास होते. ओकारीत दुधाच्या गाठी पडतात. ***पोटाची खळी फुगते व ती उपडया बशीसारखी दिसते.*** थोडे पाणी प्याले तरी मळमळावयास लागते पण बर्फ घालून घेतले तर मळमळत नाही. आम्ल वाढते.

**उदर** :– बेंबीजवळ पेटके येतात. यकृताची जागा वाकल्याने दुखते. पित्ताच्या खड्यामुळे होत असलेल्या वेदना. उदराभोवती वस्त्राचा दाब सहन होत नाही. मलावरोध–पण त्याने बरे वाटते. खडूसारखे, राखी रंगाचे किंवा हिरवे पाण्यासारखे शौचास होते. उदर फुगते व टणक लागते. हगवण, अपक्व अन्न पडते. जंत होतात. मुलांची हगवण, सारखी खाखा सुटते. उदरात वेदना होताना मांड्या गार होतात. शौचास प्रथम घट्ट, नंतर चिकट, नंतर पातळ होते. गुदद्वार बाहेर येते, आत वळवळत आहे असे वाटते. मूळव्याध चालताना जास्त होते, बसल्याने बरे वाटते. खाण्यापिण्यानंतर शौचास लागते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी दुर्गंधी किंवा उग्र वासाची. पांढरा गाळ खाली साचतो. लघवी काळसर पिंगट रक्तमिश्रित. मूत्राशयात मोड होतात. मूत्रपिंडात खडे होऊन वेदना होतात.

**पुरुषजननेंद्रिये** :– इंद्रिये शिथिल व निःशक्त. संभोगानंतर पाठ व गुडघे गळून गेल्यासारखे वाटतात, घेरी येते डोके दुखावयास लागते, घाम येतो व चिड-खोरपणा येतो. संभोगाची इच्छा होते (शारीरिकपेक्षा मानसिक). शिश्न चांगले ताठ होत नाही. वीर्यस्खलन अपुरे व अवेळी, अतिशय मैथुनामुळे किंवा मुष्टिमैथुनामुळे इंद्रियाना आलेली अशक्तता–नपुसकत्व. वृषण वृद्धि स्वप्नावस्था वारंवार होते. जननेंद्रियाना कंड येते व आग होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळी लवकर सुरू होते, योग्यवेळी विटाळ फार जातो व फार दिवस राहतो, विटाळ जाताना घेरी येते, दात दुखतात, पाऊले दमट व गार होतात. लठ्ठ पण शरीराने शिथिल मुलीना रजोदर्शन होत नाही, छातीत धडधडते, दम लागतो, डोके दुखावयास लागते (चढताना). श्रमा-मुळें किंवा भीती, दुःख वगैरे मानसिक भावनामुळे विटाळ जावयास लागतो. विटाळशी होण्याचे पूर्वी स्तन दुखावयास लागतात. अतिशय विटाळ जात असल्यामुळे किंवा अशक्तपणामुळे आलेले वंध्यात्व. धुपणी दाट दुधासारखी, पिवळी भडभडून वाहते, लघवी करताना जास्त. एका पाळीपासून दुसरीपर्यंत स्राव वाहतो. धुपणीमुळे कंड सुटते आग होते. गरोदरपणी अशक्तपणा व थकवा वाटतो. पायांच्या बोटाना व तळपायात पेटके येतात. गर्भपात होईल असे वाटते. दूध अतिशय येते किंवा मुळीच येत नाही. मुलाना ते रुचत नाही. संभोगानंतर घाम येतो व गळून गेल्यासारखे वाटते. गर्भाशयातील मोड. स्तनाग्रांना भेगा पडतात, व्रण पडतात. अत्यंत हुळहुळी. मनःक्षोभाने बंद झालेला विटाळ पुन्हा सुरू होतो किंवा गर्भाशयात वेदना होऊन होतो.

**श्वसनेंद्रिये** :– आवाज बसतो, सकाळी. क्षयामुळे कंठाला आलेली सूज. श्वासो-च्छ्वास करताना घुरघुर आवाज होतो. श्रम केले तर किंवा चढताना दम लागतो. काही केले तरी धाप लागते. छातीत व हृदयात अशक्तपणा वाटतो. श्वासोच्छ्वास करण्याची सुद्धा शक्ती वाटत नाही. क्षयाची प्रथमावस्था. घशात धूळ गेल्याप्रमाणे वाटून खोकला येतो. रात्री खोकला कोरडा असतो सकाळी ओला होतो. खोकला, आंत श्वास घेताना, पेटीसारखी वाद्ये वाज-विताना, खाताना जास्त होतो. कफ दिवसाच पडतो. कफ–दाट–पिवळा–पांढरा –पुवळलेला–गोड. छातीत चमका मारतात, दाबलेले. किंवा स्पर्श केलेला

सहन होत नाही. फुप्फुसातील व्रण किंवा गळू. क्षयाची शेवटली अवस्था. एकाएकी श्वासोच्छ्वास थांबल्यासारखा वाटतो.

**हृदय** :– **अशक्त,** धडधडते–रात्री जेवण झाल्यानंतर. हृदयाच्या जागी गार झाल्यासारखे वाटते.

**मानपाठ** :– उचलताना मान दुखते. लचकल्याप्रमाणे पाठ दुखते, उठता येत नाही. पाठ इतकी अशक्त वाटते की ताठ बसता येत नाही. मणके ढिले झाल्यासारखे वाटतात–दाबल्याने दुखतात. कुबड. पाठीच्या तिकोनी हाडांमध्ये दुखते त्यामुळे श्वासोच्छ्वास घ्यावयास अडथळा वाटतो. मान ताठते.

**हातपाय** :– हाताला भेगा पडतात. हातपाय अशक्त झाल्यासारखे वाटतात, कापतात. घोटे (मुलांचे) शिथिल झाल्यामुळे पावले चालताना आतल्या बाजूस दुमडतात. संधिवात, सांध्यावर गांठी येतात, हालचाल करताना ताठल्यासारखे वाटतात. तळहाताला घाम येतो. ***पावले गार व ओलसर*** पण रात्री तळपायांची आग होते, ओले पायमोजे घातले आहेत असे वाटते. अतिशय थंडीत बोटे लाल होऊन खाजतात. सांधे वेडेवाकडे होतात. गुडघी रोग. कमरेच्या सांध्याचा क्षयरोग. हातापायावरून उंदीर वर पळत आहे असे वाटते–विशेषतः फेफरे येण्याचे अगोदर. अंथरुणात पाय ताठ केल्याने पोटऱ्यात पेटके येतात.

**झोप** :– डोळे मिटल्यावर **भयंकर देखावे** दिसू लागतात. मनात कल्पनामागे कल्पना येत राहिल्यामुळे झोप येत नाही. झोपेतून दचकून जागे होऊन इकडे तिकडे पाहणे. मुले झोपेत; मध्यरात्रीनंतर घाबरून किंचाळू लागतात व त्यांचे काही केल्या समाधान होत नाही. एकच एक वेडीवाकडी कल्पना मनांत येऊन झोपेतून वारंवार जागे होणे.. भयंकर मृत्यूची, विचित्र स्वप्ने पडतात.

**ज्वर** :– **बर्फासारखा गारपणा–डोक्याच्या टाळूचा** किंवा इतर ठिकाणी–हातांचा, पावलांचा–गुडघ्यांचा–किंवा विकार झालेल्या भागांचा. थंडी वाजतांना तहान लागते. अंतर्गत आग पण बाहेरून अंग गार लागते व घाम येतो. डोके, छाती, हात, पाय याना घाम येतो. विटाळसेपणी रात्री अंग तापते, बेचैन, होऊन झोप येत नाही.

**त्वचा** :– सापाप्रमाणे गार. इसब डोक्यावर सुरू होऊन चेहऱ्यापर्यंत पसरतो. मुलांचे खवडे. पित्ताच्या गांधी थंडीने कमी होतात. गजकर्ण, मांसांकुर, चामखिळी. लहान सहान जखमा पुवळून लवकर बऱ्या होत नाहीत. पायावर.

लाल ठिपके पडतात व ते चोळले म्हणजे कंड सुटून आग होते. डोक्या-पासून पायापर्यंत त्वचा थरथरलेली दिसते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा हो :– ***थंडी; थंडगार झोंबणारी हवा; गार पाण्याचे स्नान.*** दमट हवा. जागा; हवेचा बदल. अंग निवल्याने. ***श्रम***– मानसिक शारीरिक. **चढताना,** डोळयाचे श्रम. ***दात येताना.*** वयात येण्याच्या काळात. ***वस्त्राचा दाब. दुधाने.*** जागे झाल्यानंतर. काळजीमुळे. पौर्णिमा, उभे राहिल्याने. डोके वळविल्याने. वर पाहिल्याने.

**ब वा** :– कोरडी हवा. वेदना होत असलेल्या बाजूवर निजल्याने. शिंकल्याने (डोके दुखणे). चोळण्याने पुसण्याने. हात फिरविण्याने.

सहाय्यक औषधे:– बॅरि-का; बेला; ऱ्हस-टा; **लायको; सिली.**

संबंधी औषधे :– अगारि; अरानि; इपि; कलि-बा; ग्रफाय; ट्यूब; डल्का; थेरि; नक्स-व्हा; नाय-ॲसि; नेट्र-का; पल्स; पोडो; प्लॅटि; फास्फ; बिस्म; बोरा; सार्सा; **सेपि.**

---

## ८७. कॅल्करिआ फास्फोरिका Calcarea Phosphorica.

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***पोषण***; **हाडे; उदर;** डोक्याची टाळू व छाती यावर होतो. नाजुक, चिडखोर, **उंच किडकिडित,** मळकट किंवा पिंकट रंगाची त्वचा असलेली मुले. **हाडे–मऊ–पातळ, व ठिसूळ** होतात; मोडलेली लवकर जुळून येत नाहीत. हाडे कुजतात. मणक्याची वगैरे. पोषण चांगले होत नाही. मुडदुस. **लहानसहान जागी गारवा, किंवा हुळहुळेपणा वाटतो, डोक्याची टाळू–डोळे–नाकाचा शेंडा–बोटे वगैरे. बधिरपणा, मुंग्या येणे व गारपणा** विशेषतः हातापायांचा. वेदना इकडून तिकडे फिरतात. स्राव बुळबुळीत अंड्याच्या बल्काप्रमाणे–धुपणी वगैरे. पंडुरोग. संधिवात. गाठी मोठ्या होतात. टाळू लवकर भरून येत नाही. विकाराचा विचार केल्याने विकारांचा जोर जास्त होतो. मुलांचे पोषण नीट होत नाही. ती चिडखोर, शरीराने विसविशीत होतात, उताणे निजले असता आचके आल्याप्रमाणे दचकतात. कुशीवर केल्याने बरे वाटते. दुःख शोक वाईट बातम्या, प्रेमभंग, संभोगातिरेक, वयात येण्याच्या काळात, एकदम उंच झाल्यामुळे, वजन उचलल्यामुळे, नाडीव्रणाचे ऑपरेशन केल्यामुळे,

भिजल्यामुळे झालेले दुष्परिणाम. मुलीना वेळेवर न्हाण येत नाही. किंवा त्यांची व्हावी तशी वाढ होत नाही.

**मानसिक :–** **चिडखोर–संतापी व अस्वस्थ.** कोठेतरी जावेसे वाटते. विसरभोळेपणा. घरी असले तर दूर जावेसे वाटते, दूर असले की घरी यावेसे वाटते. खुळचट, वेडगळ मुले.

**डोके :–** डोक्याच्या मागील भागापासून कण्यापर्यंत दुखते. **शिंकल्याने** किंवा गार पाण्याने बरे वाटते. **शाळेत जाणाऱ्या मुलामुलींची** डोकेदुखी व त्याचबरोबर हगवण. डोक्याच्या मागील भागी बर्फ ठेवल्यासारखे वाटते. डोक्याची हाडे पातळ होतात. मेंदूत पाणी साचते. डोके दुखत असताना उदर फुगते. डोके तापून केसाच्या बुंध्याशी चुणचुण होते. टाळू वेळेवर भरत नाही किंवा भरलेली पुन्हा उघडते. **टाळू गार, हुळहुळी.** डोके सावरत नाही, डुगुडुगु हलते.

**डोळे :–** मागील भागात गार झाल्यासारखे वाटते. सारा येतो, गॅसच्या उजेडात डोळ्याचा उपयोग करता येत नाही.

**कान :–** पाळ्या एकाएकी सुजतात. आत गार वाटते. शौचानंतर कानात आवाज होतात.

**नाक :–** शेंडा बर्फासारखा गार. मोठे देठ असलेले मोड येतात.

**चेहरा :–** फिकट, पिवळसर, मळकट, पुटकुळयानी भरलेला. गार घाम येतो. वरचा ओठ सुजतो.

**तोंड :–** **दात उशीरा येतात,** मऊ होतात व लवकर कुजतात. दांत येताना होणारे विकार. चावताना दात हुळहुळे. सकाळी जागे झाल्यानंतर किळसवाणी चव, डोके दुखताना कडू.

**घसा :–** दुखतो व पोकळ झाल्यासारखा वाटतो. टानशिल सुजून मोठ्या होतात व त्या तोंड उघडताना दुखतात.

**जठर :–** चमचमीत किंवा खारट पदार्थ खावेसे वाटतात. तान्ही मुले वारंवार पितात व ओकतात. पचनक्रिया मंद. थोडे खाल्ले तरी पोट बिघडते, दुखते. अंगावरचे किंवा वरचे दूध एकसारखे ओकणे.

**उदर :–** ***विसविशित व खपाटी गेलेले.*** उदरात वेदना होऊन धुपणी जाते व आग होते. **बेंबी चिडलेली,** बेंब्रीतून रक्त मिश्रित पाणी झिरपते. हगवण–शौचास दुर्गंधी–कढत–आवाज होऊन–हिरवे चिकट–पाण्यासारखे होते. –फळे खाऊन किंवा दात येताना. **भगंद्र** व छातीचे विकार आळीपाळीने

होतात. आईस्क्रीम, फळे, गारपाणी किंवा थोडे खाल्ले तरी उदरात कळा येतात. किडकिडित उंच मुलांच्या गुदद्वाराद भेगा पडतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला फार होते व त्यामुळे थकवा वाटतो. नाक शिंकरताना किंवा उचलताना मूत्रपिंडाच्या जागी दुखते. मूत्राशय रिकामे झाल्यानंतर दुखते.

**पुरुषजननेंद्रिये** :– शिवणीपासून शिश्नापर्यंत टोचते गाडीत बसून जाताना शिश्न ताठते, पण इच्छा होत नाही.

**स्त्रीजननेंद्रिये** :– मुंग्या येतात, व वासना बळावते. पाळी लवकर–दर दोन आठवड्यांनी. विटाळ थोडा जातो. गर्भाशय जड झाल्यासारखा वाटतो व दुखतो–अशक्त वाटतो. अंगावर पाजताना विटाळ जातो व वैषयिक वृत्ति बळावते. अशक्त स्त्रियांचा गर्भाशय खाली उतरतो, लघवी व शौचास होताना जास्त. अंगावरचे दूध खारट लागल्यामुळे मूल दूध पीत नाही. गरोदरपणी काहीतरी न सोसणारे पदार्थ खावेसे वाटतात. पाळी उशिरा आली म्हणजे पाठीत अतिशय दुखते. मुलींना तांबडा लाल विटाळ फार जातो. स्तनात ( डाव्या ) गुल्मे येतात. स्तन हुळहुळे; मोठे झाल्यासारखे वाटतात धुपणी, बुळबुळीत; अंड्याच्या बलकाप्रमाणे, जाताना आग होते व अगोदर उदरांत दुखते.

**श्वसनेंद्रिये** :– खालून वर उचलल्यास मूल गुदमरते. खोकताना गुदमरते. निजल्याने खोकला कमी होतो. क्षय–फुप्फुसात पोकळ्या उत्पन्न होतात–रात्री घाम येतो. छाती वारे लागल्याने दुखते. आपोआप सुस्कारे टाकणे, बोलण्याच्या किंवा गाणे गाण्याच्या अगोदर खाकरावे लागते.

**मान पाठ** :– मान वारे लागल्याने दुखते. मान बारीक व अशक्त त्यामुळे डोके डुगुडुगु हलते. कुबड, डावीकडे कणे कलतात.

**हातपाय** :– बोटाची टोके हुळहुळी, नखाखाली काटा गेल्याप्रमाणे टोचते. नखांच्या कडा दुखतात. जिना चढताना पाय थकल्यासारखे वाटतात. कमरेचे सांधे अशक्त झाल्यासारखे वाटतात. कुल्ले बधिर. काखेत निळसर टणक गोळे येतात. थंडीत सांधे धरतात. पचन बिघडले म्हणजे हातपाय गार होतात.

**ज्वर** :– वेदना होताना अंगावर शहारे येतात. उगीचच थंडी वाजते. डोक्याला व गळ्याला घाम येतो–विशेषतः रात्री. शहारे खालून वर जातात, व उष्णता वरून खाली येते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– हवेत बदल झाल्याने. वारे लागल्याने. दमट थंड हवा. बर्फ पडत असताना. *दात येताना*. मानसिक श्रमाने. शरिरातील

**स्राव गेल्याने.** फळे खाल्ल्याने. वयात येण्याचा काळी. हालचाल. विकारांचा विचार केल्याने.

**ब था** :– उन्हाळ्यात. निजल्याने. गरम कोरडी हवा..

**सहाय्यक औषधे** :– झिंक; रुटा; सल्फ.

**संबंधी औषधे** :– आयो; कार्बो-ॲनि; नेट्र-मू; ऱ्हस-टा; सल्फ; सनिकु; सोरि.

---

## ८८. कॅल्करिआ फ्लुओरिका Calcarea Fluorica

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **रक्तवाहिन्या व गाठी यांचा लवचिकपणा व डावी बाजू** यावर होतो. विकारांची गति मंद. बधिरपणा. ताठल्यासारखे वाटणे. सकाळी अशक्तपणा. *टणकपणा-दगडाप्रमाणे-गाठीचा*, टानसिल, मान, मूळव्याध, गुल्मे, व्रणांच्या कडा, दुखापती नंतरचा, नाडीव्रण. **रक्तवाहिन्या फुगतात, शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात.** धमन्यातील लवचिकपणा कमी झाल्यामुळे रक्तदाब वाढतो. **हाडावर हाड वाढते.** हाडे कुजतात. तान्ह्या मुलाचे आनुवंशिक गरमीमुळे उद्भवलेले तोंडाचे व घशाचे विकार. भाग टणक होऊन पू होण्याची प्रवृत्ति. पू दुर्गंधी. क्षकिरणाने भाजणे शस्त्रक्रियेनंतर अवयवांचे चिकटणे या औषधाने नाहीसे होते.

**मानसिक** :– अतिशय खिन्नता. पैसे बुडतील अशी निष्कारण भीती वाटते. आळशी. दारिद्र्याची भीती वाटते. अनिश्चितपणा.

**डोके** :– नुकत्याच उपजलेल्या मुलांच्या डोक्यावर आलेली रक्ताची गळवे. डोक्याच्या त्वचेवर आलेल्या टणक गाठी. आत कटकट आवाज.

**डोळे** :– मोतिबिंदु. डोळे ठणकतात, डोळे मिटल्याने, किंवा दाबल्याने बरे वाटते. डोळ्यापुढे ठिणग्यांची चमचम.

**कान** :– आतील पडद्यावर खडे जमतात. कान दीर्घकाळ वाहतो–आतून पू येतो.

**नाक** :– पिनस–नाकातून पुष्कळ दाट दुर्गंधी पिवळा हिरवा गाळ्याळ शेंबूड पडतो.

**चेहरा** :– गाल सुजून टणक होतात व दुखतात किंवा दात दुखतात. जबड्याच्या हाडावर टणक सूज येते.

**तोंड** :– जिभेवर भेगा पडतात. जीभ टणक होते. दात सैल होतात. अन्नाचा स्पर्श झाल्याने दात दुखतात. हिरड्यात गळू होऊन जबडा टणक होऊन सुजतो.

**घसा** :– टानसिल खरखरित होऊन वेडयावाकडया सुजून टणक होतात. घशात दुखते व आग होते. गरम पेयाने बरे वाटते.

**जठर** :– मुलांच्या ओकाऱ्या. ओकारीत अपक्व अन्न पडते. खाकरताना उचकी लागते. अतिशय दमल्यामुळे मानसिक, शारीरिक उद्भवलेले अजीर्ण. घसा खाकरताना उचकी लागते.

**उदर** :– वात धरतो. पाण्यासारखे अत्यंत दुर्गंधी भडभडून जुलाब होतात. गरोदरपणी वात धरण्याची प्रवृत्ति. गुदद्वाराला भेगा पडतात. मूळव्याध झाली असताना कंबर दुखते.

**पुरुषजननेंद्रिये** :– वृषणवृद्धि. अंड टणक होतात.

**श्वसनेंद्रिये** :– खोकल्यानंतर–कफात बारीक चिवट पिवळ्या गोळ्या पडतात. मोठ्याने हंसल्याने किंवा वाचल्याने आवाज बसतो.

**पाठ** :– जीर्ण कटिशूळ–सुरवातीस चालताना दुखते पण तसेच चालत राहण्याने बरे वाटते. गाडीत फार वेळ बसल्याने पाठ दुखते.

**हातपाय** :– मनगट व बोटे गार. मनगटाजवळ पोकळ गुल्मे येतात. बोटांच्या हाडावर हाड वाढते. स्नायुबंधात टणक–तांदुळाप्रमाणे बारीक गाठी उद्भवतात. नखे ओबडधोबड वाढतात.

**त्वचा** :– कोरडी होते– टणक होते किंवा वर भेगा पडतात. संगमरवरी दगडाप्रमाणे पांढरी. जन्मखुणा. क्ष किरणाने भाजणे.

**झोप** :– स्वप्ने स्पष्ट पडून रड्डू येते. स्वप्नांत अंथरुणाखाली उडी मारणे.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** .- हालचाल करताना सुरवातीस (नंतर बरे वाटते). दमट थंड हवा. वारे लागल्याने. हवेतील बदल. लचकणे.

**ब वा** :– उष्णतेने. शेकाने. चोळण्याने.

**सहाय्यक औषधे** :– र्‍हस-टा.

**संबंधी औषधे** :– कॅल्क–फा; अफाय; नेट्र–मू ; फास्फ–ॲसि; सिलि.

---

## ८९. कॅल्करिआ सल्फुरिकम Calcarea Sulphuricum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम गाठी, श्लेष्मल त्वचा; हाडे व त्वचा यावर होतो. पू होण्याची प्रवृत्ति–पू दाट; पिवळा–गाठ्याळ व रक्तमिश्रित.

गळवे वाहणारी किंवा पुनः पुनः उद्भवणारी. व्रण-दुष्ट-खोल चरत जाणारे. वेदना कापल्याप्रमाणे ( उजव्या रजःपिंडात ). गुल्मे-पोकळ गुल्मे. श्लेष्मल स्राव दाट पिवळे-गाळ्याळ. नाडीव्रण. दिलेल्या औषधाची क्रिया योग्य होत नसेल तर हे औषध दिल्याने होऊ लागते. भाजणे, पोळण्यानंतर पू होण्याची प्रवृत्ति. व्रण पडलेली दुष्ट गुल्मे, करटे.

**मानसिक** :- उतावीळ. स्वतःशी सहमत नसलेल्या इसमांचा तिरस्कार करणे. स्वतःची किंमत लोकाना कळून येत नाही म्हणून कुरकुरणे. स्वस्थ बसून काल्पनिक संकटाविषयी विचार करणे.

**डोके** :- मुलांचे खवडे-पिवळा पू येतो. घरी, मोकळ्या हवेत बरे वाटते पण जलद चालण्याने जास्त होते.

**डोळे** :- येतात-दाट पिवळा पू येतो. पापण्याच्या कडा लाल होऊन खाजतात.

**कान** :- कानातून काळा मळ वाहतो. कानाभोवती पुटकुळ्या येतात.

**नाक** :- सर्दी झाली म्हणजे नाकातून रक्त येते ( तान्ही मुले ).

**चेहरा** :- चेहऱ्यावर पुटकुळ्या व फोड येतात.

**जीभ** :- विसविशित. साबणासारखी चव.

**घसा** :- टानसिल सुजून पू होतो व तो वाहतो.

**उदर** :- शौचातून रक्तमिश्रित पू पडतो. तान्ह्या मुलांची रक्ती हगवण. भगेंद्र झाल्यावर गुदद्वाराभोवती गळवे उत्पन्न होतात. शौचाभोवती पांढरे आवरण.

**मूत्रेंद्रिये** :- लघवीतून पू जातो.

**स्त्रीजननेंद्रिये** :- दाट पांढरी धुपणी. योनीत आत खोल कंड सुटते.

**श्वसनेंद्रिये** :- गुदमरल्यासारखे वाटते. दमा-चढताना किंवा चालताना जास्त होतो. खोकला पुबळलेला रक्तमिश्रित कफ पडतो. फुप्फुसात किंवा फुप्फुसाभोवती पू होतो.

**हातपाय** :- तळपायाला गार दुर्गंधी घाम येतो. तळपायाची आग होऊन कंड सुटते.

**ज्वर** :- अंग गार होते पण पांघरूण नकोसे वाटते. कोठेही पू तयार होत असताना ताप येतो. रात्री अंगाची कोरडी आग होते. खोकताना सहज घाम येतो.

**झोप** :- खोलीत हवा नाही असे वाटून झोपेतून दचकून जागे होणे.

**त्वचा** :– जखमा लवकर भरून येत नाहीत त्यातून पू सारखा वाहतो. त्वचा-रोगात पिवळ्या खपल्या बसतात. तान्ह्या मुलांचा कोरडा इसब.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– वारे लागल्याने. स्पर्श केल्याने. थंड दमट हवा, जागा. खोलीतील उष्णता.

**ब वा** :– आंघोळ केल्याने. मोकळ्या हवेत. खाताना. उघडे झाल्याने. शेकल्याने.

**संबंधी औषधे** :– हेपार.

---

## ९०. कॅल्करिआ हैपोफास्फोरिकम

### Calcarea Hypophosphoricum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम शरीराच्या **पोषणावर** होतो. अशक्त-पणा– फिकटपणा व खूप घाम येणे. जलद व अतिशय थकवा येतो व शरीर वाळते. अनेक वाहणारी गळवे विशेषतः सांध्याभोवती. शिरा चाब-काच्या दोरीप्रमाणे दिसतात. वाळलेली मुले.

**मानसिक** :– घाबरटपणा-क्षुब्धता व झोप न येणे. जलद बोलणे, लवकर राग येतो.

**कान** :– तळताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे कानात चुरचुर आवाज होतो.

**जठर** :– जेवण झाल्यानंतर २ तासांनी खूप भूक लागते. दूध प्याल्याने किंवा थोडे खाल्ल्याने बरे वाटते. भूक नष्ट.

**उदर** :– पांथरीत दुखते व ठुसठुसते. क्षयात हगवण सुरू होते.

**श्वसनेंद्रिये** :– छातीत कळा येतात. खोकला; क्षयरोगात थुंकीतून रक्त येते. दमा.

**हातपाय** :– नेहमी गार असतात.

**झोप** :– झोपेत दचकणे.

**ज्वर** :– रात्रीचा खूप घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– शरीरांतील स्राव गेल्याने.

**संबंधी औषधे** :– सिंको.

---

## ९१. कॅस्टोरिअम Castoreum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम ***मज्जातंतू*** व **स्त्रीजननेंद्रिये** यावर होतो. **अशक्त व जीवनशक्ति क्षीण.** गर्भाशयाच्या विकारामुळे आलेला **घाबरटपणा** किंवा आचक्यासारखे विकार. हिस्टेरिआ. स्नायू कंपित होतात. सर्व शरीर जड झाल्यासारखे वाटते. एकसारख्या जांभया येतात. तीव्र स्वरुपाच्या दुखण्यातून उठल्यानंतर स्त्रियांना, पेटके, वेदना, अशक्तपणा जाणवतो, व त्या पूर्ण बऱ्या झाल्या नसल्यामुळे, त्या एकसारखा चिडखोरपणा करतात. सारखा घाम येऊन अशक्तपणा वाटतो. बहुतेक विकारांना एकसारख्या जांभया येतात.

**मानसिक :–** **चिडखोरपणा** सहजासहजी डोळयातून अश्रू येणे.

**डोळे :–** दिवसा दिसत नाही. उजेड सहन होत नाही.

**जीभ :–** थरथरते. मध्यभागी डाळीएवढी पुटकुळी येऊन भोवतालचा भाग लाल होतो व जीभ खाली दोऱ्याने ओढल्यासारखी वाटते, स्पर्श, अन्नाचा वास सहन होत नाही. जीभ सुजलेली.

**उदर :–** उदरातील विकाराबरोबर जांभया येतात. **वेदना होताना एकदम शक्तिपात होतो**, दाबल्याने बरे वाटते. उन्हाळयातील हगवण. शौचास हिरवी आव पडते.

**स्त्रीजननेंद्रिये :–** कष्टार्तव. वेदना होताना कुंथून थेंब थेंब विटाळ जातो नंतर **गार घाम येतो.** वेदना मांड्यातून सुरू होतात. विटाळ बंद असताना ( नष्टार्तव ) उदर फुगते, व वेदना होतात.

**झोप :–** झोपेत जांभया येतात. अस्वस्थ. भयंकर स्वप्नामुळे दचकून जागे होणे.

**ज्वर :–** ताप येऊन गेल्यानंतर खूप घाम येत राहतो. थंडी वाजताना पाठ गार होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** भावना. थंडी. विटाळसेपणी. रोगामुळे आलेली क्षीणता.

**ब वा :–** दाबल्याने.

**संबंधी औषधे :–** मोस्क; व्हॅले.

---

## ९२. काफिआ Coffea cruda. ( काफी )

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *मज्जातंतू; रुधिराभिसरण;* जननेंद्रिये व स्त्रिया यावर होतो. *मनाची क्षुब्धता; ज्ञानेंद्रिये अत्यंत तीक्ष्ण; काहीही सहन होत नाही*–**वेदना** आवाज वास वगैरे. **आनंद-दायक भावनामुळे** भीतिदायक विकार होतात. आवाजामुळे कोठेतरी दुखावयास लागते. उंच किडकिडित रागीट चिडखोर पोक आलेले इसम. भीती, लांबचा प्रवास, शारीरिक थकवा यामुळे उद्भवलेले विकार. अंग उष्ण झाले आहे असे वाटते. काफी घेतल्यामुळे होमिओपाथिक औषधांचा परिणाम नाहीसा होतो असा समज आहे, पण अनुभवता टिकणारा नाही.

**मानसिक :– रडणे, विवळणे व तडफडणे** क्षुल्लक गोष्टीकरता. मनात अनेक विचारांची गर्दी होते, कधी आनंदी कधी उदास, खिन्न. उगीचच्या उगीच मूर्च्छा येते. रडणे हसणे आलटुन पालटून. रडता रडता एकदम मनापासून हसणे, नंतर काही वेळाने रडणे, समजूत करून घेण्याचा तिटकारा.

**डोके :–** मेंदूचे तुकडे तुकडे झाले आहेत असे वाटते किंवा ठेचल्यासारखे वाटते. डोक्यात खिळे मारल्याप्रमाणे वेदना होतात. घट्ट झाल्यासारखे वाटते.

**डोळे :–** अगदी बारीक अक्षरे चांगली वाचता येतात. बाहुल्या रुंदावलेल्या, डोळे चमकदार.

**कान :– अत्यंत तीक्ष्ण,** लांबचे आवाज ऐकू येतात.

**नाक :–** वास सहन होत नाही. नाकातून रक्त येताना डोके जड होते, व चिडखोर-पणा येतो. शौचास कुंथताना नाकातून रक्त जाते.

**चेहरा :–** तापतो, गाल लाल होतात. उजव्या बाजूस वेदना होतात.

**तोंड :– दात दुखतात,** तोंडात बर्फाचे पाणी ठेवल्याने बरे वाटते पण ते गरम व्हावयास लागले म्हणजे पुन्हा दुखावयास लागतात. विटाळसेपणी दात दुखतात. दातातील कळा बोटाच्या टोकापर्यंत जाणवतात. **चव नाजुक.**

**जठर :–** जणू काय फार खाल्ले आहे अशा तऱ्हेने पोट भरल्यासारखे वाटते, विशेषतः दुखत असताना. अतिशय भूक लागते त्यामुळे जलद खाणेपिणे.

**उदर :–** वस्त्रांचा दाब सहन होत नाही. वेदना होताना निराशा वाटते ( स्त्रिया) सांसारिक काळजीमुळे गृहिणींना जुलाब व्हावयास लागतात. दात येताना होणारी हगवण.

**स्त्रीजननेंद्रिये** :– तापतात व कंड सुटते. वैषयिक कंड. वायगोळ्याच्या वेदना असह्य होतात. कष्टार्तव–रक्ताचे काळे गोळे पडतात.

**श्वसनेंद्रिये** :– एकसारखा खोकल्याचा कोरडा ठसका विशेषतः–गोवरानंतर लागतो किंवा नाजुक घाबरट मुलाना कोरडा खोकला येतो.

**हृदय** :– भावनामुळे धडधडावयास लागते–उन्हाने जास्त होते. एकदम रक्तदाब वाढतो व लघवी होण्याचे बंद होते. अत्यानंदाने किंवा अचानक आश्चर्याचा धक्का बसल्यामुळे हृदय धडधडावयास लागते.

**हात** :– हात कापतात, हातात टाक धरता येत नाही. हातापायांच्या स्नायूना धक्के बसतात. गृध्रसीवात ( सायाटिका ) दाबल्याने बरे वाटते, हालचालीने जास्त होते.

**झोप** :– *भावनातिरेकामुळे झोप येत नाही.*–किंवा मनात अनेक विचार आल्यामुळे झोप येत नाही. जरा आवाज झाला की, जाग येते. किंवा प्रत्येक आवाज ऐकू येतो.

**त्वचा** :– अतिशय हुळहुळी, रक्त येईतो खाजविणे.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *आवाज*. स्पर्श. वास, उग्रवास. हवा-मोकळी-गार वाऱ्याची. **आनंददायक भावना. मानसिक श्रम.** अति खाण्याने. दारू. रात्री.

**क** **बा** :– निजण्याने. झोप. उष्णता.

**सहाय्यक औषधे** :– अको.

**संबंधी औषधे** :– आरम–मे; ओपि; नक्स–व्हा; फ्लुओ-ॲसि; बेला; लायको; सल्फ.

---

## ९३. कामिआ Kalmia Latifolia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मज्जातंतू*; डोळे; चेहरा ( उजवी बाजू ) **हृदय**; रुधिराभिसरण; सांधे; त्वचा; डोके व खांदा ( उजवी बाजू ); छाती व पुढला हात ( डावी बाजू ) यावर होतो. **ठणका, मार लागल्याप्रमाणे लागतो. ताठल्यासारखे वाटणे. कंप. बधिरपणा. शरीर लटके पडल्याप्रमाणे वाटणे. अशक्तपणा व गुदगुदल्या, मिरमिरल्याप्रमाणे वाटणे.**

वेदना इतस्ततः फिरतात. वरून खाली येतात किंवा मज्जातंतूच्या रोखाने पसरतात, फाडल्याप्रमाणे ठेचल्याप्रमाणे वाटतात. वेदना शेवटी हृदयात स्थिर होतात. हृदयाचे विकार व इतर विकार आळीपाळीने किंवा हाताच्या व पायाच्या वेदना आळीपाळीने सुरू होतात. संधिवात. ( उपदंशामुळे झालेला ) दीर्घ मुदतीचे ज्वर–उदर फुगते, मळमळ व नाडी मंद. नागिणीची उगवण नाहीशी झाल्यानंतर राहिलेल्या वेदना हालचाल केल्याने विकार उद्भवतात पण हालचाल चालू ठेविली तर ते कमी होतात.

**मानसिक** :– आरामखुर्चीवर पडल्याने स्मरणशक्ति व इतर मानसिक भावना बऱ्या असतात.

**डोके** :– घेरी खाली पाहिल्याने, वाकल्याने जास्त होते. डोक्यात कटकट आवाज होतात. ते कानापर्यंत जाऊन बिगुल वाजविल्याप्रमाणे आवाज होतो. मानेपासून ते टाळूपर्यंत व चेहऱ्यापर्यंत डोके दुखते. उजव्या भुवयीवर भयंकर ठणका लागतो. घेरी येताना डोके दुखते, अंधारी येते, हातापायात वेदना होऊन शीण येतो. डोके सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत दुखते.

**डोळे** :– हालविताना ओढल्यासारखे किंवा ताठल्यासारखे वाटतात. खाली पाहताना अंधारी येते. पापण्या ताठतात.

**कान** :– बिगुल वाजविल्याप्रमाणे आवाज.

**चेहरा** :– घेरी येताना चेहरा लाल होतो. उजव्या बाजूस वेदना होतात. जबड्यात टोचते, फाडल्यासारखे वाटणे.

**तोंड** :– ओठ ताठल्यासारखे वाटतात. जिभेत टोचते.

**उदर** :– पोटाच्या खळीत दुखते; ताठ बसल्याने बरे वाटते. खळीत काहीतरी दाबून कोंबल्यासारखे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीतून अल्बुमिन जाते, त्यावेळेस पाय दुखतात. वारंवार पिवळी भरपूर लघवी झाल्याने डोकेदुखी कमी होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– सर्वांगात वेदना होऊन विटाळबंद होतो. धुपणी पाळीनंतर एका आठवड्यानी जाऊ लागते. लक्षणे धुपणी जाताना जास्त होतात.

**हृदय** :– चंचल. **तीक्ष्ण वेदना होतात** व त्यावेळेस आग होते, मुंग्या येतात व बधिरपणा येतो. वेदना डाव्या हातापर्यंत किंवा डाव्या त्रिकोणी हाडापर्यंत जातात. व त्यावेळेस **श्वासोच्छ्वास करवत नाही**. फडफडल्यासारखे वाटणे. धडधडणे पाठीवर निजल्याने किंवा ताठ बसल्याने बरे वाटते. हृदयाचे ठोके

इतके जोराने पडतात की ते दिसतात. हृदय **अशक्त, नाडी अतिशय मंद.** तंबाखूमुळे हृदयाची झालेली चलबिचल नाडी कंपयुक्त.

**मानपाठ** :– मानेपासून खाली पंज्यापर्यंत वेदना होतात. पाठ वरून खाली मोडल्याप्रमाणे दुखते. कमरेत आग होऊन दुखते.

**हातपाय** :– दंड (उजवा) दुखतो. अशक्तपणा, बधिरपणा, चुणचुण व गार झाल्यासारखे वाटतात. सांधे लाल, कढत सुजलेले.

**झोप** :– येत नाही, सकाळी लवकर जाग येते.

**त्वचा** :– ताठल्यासारखी वाटते. कोरडी.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***हालचालीने.*** डाव्या कुशीवर निजल्याने. पुढे वाकल्याने. खाली पाहताना. उष्णतेने. अंग गारठल्याने. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत, वाकल्याने.

**ब धा** :– **खाण्याने.** आभाळ आलेली हवा. एकसारखी हालचाल.

**सहाय्यक औषधे** :– बेन्झा-ॲसि; स्पायजे.

**संबंधी औषधे** :– कॅल्क-का; डिजि; नेट्र-मू ; पल्स; ऱ्हस-टा; लायको; लिथि-का.

---

## ९४. कामोमिल्ला Chamomlila

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***मन***; ***मज्जातंतू***; ***भावना***; ***पचनेंद्रियांची*** श्लेष्मल त्वचा; **यकृत, स्त्रिया व मुले**; उजवी बाजू यावर होतो. ***अत्यंत हळुवारपणा–काहीही सहन होत नाही***–तडफडणे-आरडाओरड करणे किंवा सारखे चालणे–एकदम बरे वाटले पाहिजे अशी मागणी करणे. **वेदनामुळे देहभान विसरणे– किंवा थकवा येणे.** वेदना होत असताना **अंग तापते, तहान लागते व एकदम घाम येतो;** ती जागा बधिर होते किंवा नंतर बधिरपणा येतो. मधुन मधुन ***उदरात कळा*** येतात. कोरड्या खोकल्याची मधुन मधुन दास लागते. **अस्वस्थपणा व चिडखोरपणा याच्या लहरी येतात.** स्नायूना **पेटके** येतात. पेटके आल्याने पित्ताची ओकारी होते. जागे झाल्यानंतर **बधिर** झाल्यासारखे वाटते. हातात काही वेळ वस्तू धरल्याने हात बधिर होतात. वेदनामुळे–रागामुळे किंवा दात येताना आचके येतात तेव्हा–शरीर ताठते–पाठीची कमान होते–डोळे गरगरा फिरतात–चेहरा

वेडावाकडा होतो, आंगठे आत वळतात व हातपाय झाडणे. वेदना होत असलेला भाग लुला पडल्यासारखा वाटतो. संधिवात. रागामुळे वेदना होतात, जुलाब होतात, कावीळ होते. वारंवार आचके येतात, चेहरा व हातापायाना. गरोदर *स्त्रिया*, *लहान मुले* व शुश्रूषा करण्याऱ्या स्त्रिया याना या औषधाचा उपयोग चांगला होतो.

**मानसिक** :– *अत्यंत*, *चिडखोरपणा*, *भांडखोरपणा* व *अशिष्टपणा*. भीडमुर्वत नसते. टाकून बोलणे. **प्रत्येक बारीक सारीक गोष्टीने पित्त खवळते. बोललेले किंवा स्पर्श खपत नाही.** अधीर, उतावीळ. मुले अंगाला हात लावू देत नाहीत. सारखे *घेऊन हिंडविले* किंवा थोपटले म्हणजे जरा बरी असतात. **दिलेली वस्तु नाकारणे**, नवीन वस्तु खेळणे दिले तर फेकून देणे. लिहिण्यात बोलण्यात चुका करणे. विटाळशी होण्याचे अगोदर स्त्रिया एकाएकी लहरी बनतात–भांडतात, हटवादीपणा करतात–एकही चांगला शब्द बोलत नाहीत. आपल्याला पाहिजे असलेली वस्तु मिळत नाही असे वाटून केविलवाणे विवळणे.

**डोके** :– अर्धा भाग दुखतो.– ठुसठुसते. नाजुक किंवा अतिश्रमामुळे थकलेल्या स्त्रियाची डोकेदुखी, मन गुंतविल्याने बरे वाटते. सकाळी किंवा रात्री ९ वाजता डोके जास्त दुखते. डोक्याला कढत घाम येतो–त्यामुळे केस ओले होतात. डोके दुखत असताना डोके मागे वाकवावे असे वाटते.

**डोळे** :– सुजून रक्त येते. नुकत्याच उपजलेल्या मुलाच्या डोळ्यातून रक्तासारखे पाणी येते. डोळे पिवळे. पापण्याना आचके बसून त्या मिटतात.

**कान** :– कानात टोचल्याप्रमाणे दुखते. मूल वारंवार कानाला हात लावते. शेकल्याने बरे वाटते. गार वारे सहन होत नाही. कान तापतो व सुजतो–त्यामुळे वेड लागण्याची पाळी येते. पाणी घुसल्याप्रमाणे आवाज होतो. कानात दडा बसतो. रात्री, गैरहजर असलेल्या माणसांचे आवाज ऐकू येतात.

**नाक** :– वास सहन होत नाही. शिंका येतात. नाकातून सारखे कढत पाणी वाहते त्यामुळे झोप येत नाही. नाक चोंदते.

**चेहरा** :– **एक *गाल लाल होतो***, किंवा **सुजतो**. एक कढत असतो, दुसरा फिकट व गार लागतो. उजवी बाजू कानापर्यंत दुखते. जबडा दमल्यासारखा वाटतो. वेदना होताना कढत घाम येतो. स्नायूना धक्के बसतात.

**तोंड** :– वाईट–आंबुस घाण येते. जिभेवर दाट पिवळट पांढरा थर जमतो. चव कडू. तोंडात गरम पाणी घेतल्याने–गरोदरपणी–काफी प्याल्याने दात दुख-

तात. तोंडात गार पाणी धरल्याने बरे वाटते. दात येताना मुलाना होणारे उपद्रव. रात्री लाळ गळते. दात लांब झाल्यासारखे वाटतात. जिभेला आचके बसतात.

**घसा** :– गालगुंड व टानसिल सुजतात. निजलेले असताना अन्न गिळता येत नाही. घशात आवळल्यासारखे किंवा दख्या बसल्यासारखे वाटते.

**जठर** :– कुजलेल्या अंड्याप्रमाणे दुर्गंधी ढेकरा येतात. गार पाणी–आंबट पेये प्यावीशी वाटतात. काफीचा तिटकारा येतो. ओकारी होण्याचे अगोदर जोरजोराने उमासे येतात. मार्फीआमुळे होत असलेल्या ओकाऱ्या. मुरडा होऊन पित्ताच्या ओकाऱ्या होतात.

**उदर** :– नगाऱ्याप्रमाणे फुगते. **आंतड्यात वात धरून कापल्याप्रमाणे वेदना** होतात त्यावेळेस मूल हातपाय पोटाशी घेते–किंचाळते, लाथा झाडते, त्याला सारखे घेऊन हिंडवावे लागते, रात्री जास्त होते. लघवीला होताना कळा येतात. कळा येत असताना गाल लाल होऊन गरम घाम येतो. ***शौचास कढत आंबुस, गवतासारखे हिरवे होते***. शौचात ***बुळबुळीत आंव*** पडते किंवा पिवळट हिरवे-**कुजलेल्या अंड्याप्रमाणे दुर्गंधी** होते. ***खाण्यानंतर शौचास होते***. दाताची हगवण. गुदद्वार सुजून चंबूसारखे पुढे येते. मूळव्याध-भेगा पडून दुखते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी होताना आग होते. मूत्रमार्गात टोचते. लघवी पिवळसर.

**स्त्रीजननेंद्रियेः**– विटाळ काळा-गाठ्याळ दुर्गंधी. कष्टार्तव-आवळल्या, मुरडल्या-सारख्या कळा येतात, त्या वर किंवा खाली मांड्याच्या आतील बाजूस पसरतात. विटाळसेपणी, रागामुळे किंवा मनःक्षोभामुळे ज्या स्त्रियाना विटाळ-सेपणी गर्भाशयात दुखत नाही त्यानासुद्धा तीव्र वेदना व्हावयास लागतात व मैथुनाची इच्छा होते. ज्या मुलीना सुरुवातीपासूनच विटाळ कष्टाने होऊन विटाळात पांढरे पापुद्रे जातात त्याना या औषधाने तात्पुरते बरे वाटते. रक्त-प्रदर-विटाळ-काळा-गाठ्याळ व खूप जातो-हातपाय गार पडतात फार तहान लागते. कधी कधी काळसर दुर्गंधी रक्त सारखे पाझरते व मधूनच एखादा तांबडा रक्ताचा स्राव जोराने जातो. वेणा थांबून थांबून येतात त्यामुळे बाळंतपण लांबते. वेणा वर जातात किंवा मांड्यात येतात, गर्भाश-याचे मुख ताठते; वेणामुळे स्त्री इतकी प्रक्षुब्ध होते की जवळ असलेल्या इसमाना-डॉक्टर नर्सना हाकून देते नंतर पुन्हा बोलावते. बाळंत होताना आचके येतात. बाळंतपणानंतरचा विटाळ काळा व गाठ्याळ असतो.

धुपणी-पिवळसर चुरचुरणारी. स्तनाना सूज येते, स्तनाग्रे हुळहुळी होतात. अंगावर मूल प्यावयास घेतले की गर्भाशयात किंवा पाठीत पेटके येतात. तान्ह्या मुलांचे स्तन हुळहुळे होतात. काळी, पिवळी गाठ्याळ करवडणारी धुपणी. अंगावरचे दूध नासल्यामुळे मुले दूध पीत नाहीत.

**श्वसनेंद्रिये :–** कोरडी खोकल्याची ढास. मूल झोपेतच खोकते पण जागे होत नाही– विशेषतः रात्री. राग आला तर खोकला येतो. खोकला रात्री ९ ते १२ पर्यंत जास्त असतो. डांग्या खोकला, खोकून मूल घुसमटते व ओकते. दमा- कोरड्या हवेत जास्त होतो. तान्हा मुलांच्या छातीत घुरघुरते.

**पाठ :–** पाठीत उसण भरते.

**हातपाय :–** सांध्यात इतक्या कळा येतात की अंथरुणावरून उठून चालणे भाग पडते. पोटऱ्यात व पायात पेटके येतात. तळपायाची रात्री आग होते - गारव्यावर ठेवावेसे वाटतात. हातापायात कळा येऊन नंतर ते बधिर होतात. हातात काही वेळ वस्तू धरून ठेवल्याने हात बधिर व ताठ होतो. तळहात कोरडे. पायाच्या हाडावरच चालतो आहोत असे वाटते. रात्री पावलांची शक्ती नाहीशी झाल्यासारखी वाटते, त्यावर उभे राहवत नाही. दुपारनंतर घोटे लुले पडल्यासारखे वाटतात.

**झोप :–** गुंगल्यासारखे वाटते पण झोप येत नाही मूल झोपेतून दचकून उठते, किंचाळते, अस्वस्थ होते व आचके येतात. गुंगीत कण्हणे विवळणे रडणे वेदनामुळे झोपेत व्यत्यय येतो. मांड्या एकमेकापासून दूर सारून झोपणे.

**ज्वर:–** एक भाग गार दुसरा कढत. थंडी व ताप आळीपाळीने. वाहत असलेले स्राव जर एकदम थांबले तर ताप आल्यासारखे वाटते. तापात तहान लागते. डोक्याला घाम येतो.

**त्वचा :–** कावीळ. तान्ह्या मुलांच्या गालावर किंवा सर्वांगावर तांबडी उगबण येते. व्रणात रात्री चुरचुरते व आग होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** *राग. रात्री. दात येताना*. गार हवा. दमटपणा. वारे लागल्याने. **अंग गारठल्याने. *काफी* झोपेची औषधे** घेतल्याने अफू. ढेकरा येण्याने. **उष्णता**. गरम अन्न. पांघरूण घेतल्याने. स्पर्श, रोग्याकडे पाहण्याने. गाणे. अंथरुणावर निजल्याने.

**ब वा :–** ***हातावर घेऊन हिंडवल्याने***. गरम दमट हवा. **घाम आल्याने**. गार पाणी लावल्याने.

**सहाय्यक औषधे** :– कॅल्क-का; बेला; मॅग-का; सॅनिकु.

**संबंधी औषधे** :– अको; आर्नि; कॅक्ट; कोक्यु; नक्स-व्हा; पल्स; फार्मि; ब्रायो; मर्क्यु; व्हस–टा; सिलि; सेपि.

---

## ९५. कार्डुअस मेरिआनास Carduus Marianus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम यकृत, पांथरी व **शिरा यावर** होतो. यकृताच्या विकारामुळे उद्भवलेला रक्तस्राव. जलोदर-यकृताच्या विकारामुळे झालेले थकवा. आंबटपणा. खाणीत काम करणाऱ्या इसमाचे विकार–दमा. शिरा फुगून वेड्यावाकड्या होऊन त्यात व्रण पडतात. वेदना–टोचणे, आग, ओढ लागल्याप्रमाणे वाटणे.

**मानसिक** :– उदासीन. खिन्न. विसरभोळा, काय करावयाची इच्छा असेल ती लगेच विसरणे.

**डोके** :– भुवयावर आवळल्यासारखे वाटते. कपाळ दुखते. घेरी येऊन तोंडावर पडू असे वाटते, नाकातून रक्त गेल्याने बरे वाटते.

**डोळे** :– आग होते व दाबल्यासारखे वाटतात.

**नाक** :– तरुण इसमाच्या नाकातून वारंवार रक्त वाहण्याची सवय.

**चेहरा** :– मळकट, पिवळसर.

**तोंड** :– वरचा ओठ अशक्त झाल्यासारखा वाटतो. जीभ अशक्त, जीभ मध्यभागी पांढरी, कडा लाल व दाताचे ठसे पडलेली. चव कडू.

**जठर** :– मळमळ, उमासे; व **हिरवे आंबट ओकावयास होते**. रक्ताची ओकारी.

**उदर** :– **यकृत मोठे होते**, दुखते पित्ताशय सुजतो तेथे दाबलेले सहन होत नाही. पित्ताचे खडे होण्याची प्रवृत्ति. वात धरून गुरगुरते. मलावरोध–शौचास टणक खडे–गाठी–पडतात. रक्ती मूळव्याध–गुद बाहेर येते. गुदात आग होते. गुदाच्या कॅन्सरमुळे उद्भवलेली हगवण. पांथरीच्या जागी टोचते, आत श्वास घेतल्याने जास्त.

**मूत्रेंद्रिये** :– **लघवी पिवळी धमक, गढूळ.**

**स्त्रीजननेंद्रिये** :– यकृताच्या विकारामुळे होणारा रक्तप्रदर.

**श्वसनेंद्रिये** :– दमा. छातीतील वेदना खांदे, पाठ, उदर व कमरेपर्यंत जातात व त्यावेळेस लघवीला लागते.

**हातपाय** :– कमरेच्या सांध्यांत वेदना होऊन त्या कुल्ल्यातून मांड्यात जातात, खाली वाकल्याने जास्त होतात. उठताना कष्ट होतात. पाऊले अशक्त– बसल्याने.

**त्वचा** :– शिरातील रक्त गोठून त्या टणक होतात किंवा फुटतात.

**ज्वर** :– काविळीत थंडी वाजते व ताप येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– डाव्या कुशीवर निजल्याने. बीर पिण्याने. खाण्याने, स्पर्श. हालचालीने. तळघरात–भुयारात

**ब वा** :– रक्त गेल्याने.

**संबंधी औषधे** :– कॅल्क–का; सॅग्विने.

## ९६. कार्नस Cornus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम रक्त; यकृत; पांथरी व पचनेंद्रिये यावर होतो. जीर्ण हिंवताप. कावीळ. अशक्तपणा विशेषतः सकाळी.

**मानसिक** :– खिन्नता.

**उदर** :– यकृताच्या विकारात डोळे दुखतात. शौचास दुर्गंधी–काळे होते. गुदद्वारात आग होते. हगवण.

**झोप** :– थंडी वाजण्याचे अगोदर झोप यावयास लागते. तापात गुंगी येते किंवा जेवणानंतर येते.

**त्वचा** :– फिकट. जीर्ण यकृताच्या विकारात त्वचेवर भाजल्यासारखे फोड येतात. तान्ह्या मुलांचे तोंड येते व भाजल्यासारखे फोड येऊन झालेला इसब.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– रात्री, गारठल्याने.

---

## ९७. कार्बो ॲनिमॅलिस Carbo Animalis

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *पोषण*; गाठी व *शिरा* यावर होतो. विकार हळुहळु सुरू होऊन उत्तरोत्तर वाढत जातात व शेवटी त्यांचे स्वरूप हट्टी किंवा दुष्ट होते. अशक्तपणा येतो व जीवनशक्ति क्षीण होते. **वृद्धत्व.**

वारंवार सर्दी होण्याची प्रवृत्ती. सहजासहजी लचक भरणे. थोडासा स्राव गेला तरी अशक्तपणा वाटून अत्यंत त्रास होतो. शिरात रक्ताधिक्य होते. सूज येऊन भाग हळुहळु टणक होऊन दुखतात. भाजल्यासारखी आग होते. सैल झाल्यासारखे वाटते. अंगावरून ढेकूण चालले आहेत असे वाटते दुर्गंधी करवडणारे स्राव. रक्तस्राव. प्लूरिसी झाल्यानंतर त्या बाजूस टोचणे कायम राहते. अंगावर पाजणाऱ्या स्त्रियांचा अशक्तपणा त्या जेवताना रडतात, खोलीतसुद्धा हिंडवत नाही. गाठी सुजून टणक होतात. निळसरपणा. व्रण कुजणे. कॅन्सर. तांब्यासारखा रंग. कढत लाटा आल्यासारख्या वाटतात.

**मानसिक** :– खिन्न. विचारमग्न बोलावेसे वाटत नाही. एकटे असावेसे वाटते. विवळणे.

**डोके** :– मेंदू सैल झाल्यासारखा वाटतो हालचालीने, खोकताना जास्त. कवटी फुटते आहे असे वाटते. खाण्याने बरे वाटते. घेरीनंतर नाकातून रक्त जाते. दाढी केल्यानंतर घेरी येते. डोके उजव्या डोळयापर्यंत दुखते.

**डोळे** :– डोळयावर काहीतरी आहे असे वाटून वरती बघता येत नाही. डोळे सैल झाल्यासारखे वाटतात. वस्तू वाजवीपेक्षा जास्त दूर दिसतात. वाचताना दृष्टी मंद होते, डोळे चोळण्याने बरे वाटते.

**कान** :– आवाज कोणत्या दिशेने येत आहे ते समजत नाही. नाक. शिंकरताना कानात आवाज होतात. गालगुंड सुजून त्यात चमका मारतात. कानामागील हाडांचा उंचवटा सुजून कानातून स्राव जातो.

**नाक** :– टणक, सुजलेले लाल, कढत; नाकावर पिंगट पट्टा येतो व त्यावर पुटकुळ्या येऊन कंड सुटते व पापुद्रे जातात. शेंड्यावर टणक निळसर गुल्म येते. सर्दी झाली म्हणजे नाकातून खूप पाणी गळते, वास येत नाही. शिंका व जांभया येतात.

**चेहरा** :– गाल व ओठ निळसर. तांब्याच्या रंगांची उगवण. यौवनपीटिका.

**तोंड** :– जिभेत टणक गाठी येतात. खाताना गाल चावला जातो.

**घसा** :– जळजळते खाण्याने बरे वाटते.

**उदर** :– कोणत्याही अन्नाने त्रास होतो. ते सोसत नाही. पोट गळून गेल्यासारखे किंवा पोकळ झाल्यासारखे वाटते. पचनशक्ती मंद. वात धरतो. मळमळ– रात्री जास्त. स्त्रियाना, अंगावर पाजताना पोट गळून गेल्यासारखे वाटते.

जठराभोवती गारवा वाटतो, दाबल्याने किंवा चोळण्याने बरे वाटते. खाण्याने थकवा येतो. तोंडातून खारट पाणी येते. उमासे, ओकाऱ्या, उचकी. कॅन्सर. तंबाखु ओढल्याने मळमळते त्यामुळे तंबाखुचा तिटकारा येतो.

उदर :– शस्त्रक्रियेनंतर खूप फुगते वात सरत नाही. जांघेत ( डाव्या ) काहीतरी कठीण पदार्थ आहे असे वाटते बसल्याने जास्त; वात सरल्याने, दाबल्याने बरे वाटते. गुदद्वार हुळहुळे व ओलसर.

स्त्रीजननेंद्रिये :– विटाळ गेल्यामुळे अत्यंत थकवा वाटतो, बोलवतसुद्धा नाही. काळसर विटाळ सकाळीच फक्त जातो. उजवा रजःपिंड जड चेंडूसारखा वाटतो. योनीत आग होते. गर्भाशयाचा कॅन्सर– मांड्यापर्यंत आग पसरते. गर्भाशयाचे मुख टणक होते. स्तनात टणक गाठी येतात व आत चमका मारतात. धुपणी, पाण्यासारखी, पिवळे डाग पडतात आग व चुणचुण होते बसल्याने व उभे राहिल्याने जास्त जाते. कटीची हाडे बसल्याने दुखतात. मूल पाजताना स्तनात चमका मारतात. स्तनात टणक दुखणाऱ्या गाठी येतात.

श्वसनेंद्रिये :– डोळे मिटल्याबरोबर गुदमरल्यासारखे वाटते. घाबरटपणामुळे श्वासोच्छ्वास कष्टाने व्हावयास लागतो. छातीत गार झाल्यासारखे वाटते. फुप्फुसात व्रण पडतात. खोकला–हिरवा कफ पडतो.

हृदय :– समाजात किंवा बेबळात्त गाणे ऐकल्याने धडधडावयास लागते.

पाठ :– गुदाच्या हाडात दुखते, स्पर्श केल्याने आग होते; बसल्याने किंवा निज-ल्याने ज्यास्त होते. घोटे चालताना आत बाहेर वळतात विशेषतः मुलांचे. सांधे शिथिल, अशक्त, सहज निखळतात. छातीच्या विकारात पंजे बधिर होतात.

त्वचा :– निळसर. ओठ–गाल–विकार झालेल्या जागी निळसरपणा येतो. कपाळा-वर तांब्याच्या रंगाची बारीक उगवण येते. ढेकूण चावल्यासारखे वाटते. जांघेत टणक बद होऊन ते फुटतात. उगवणीनंतर वण राहतात.

ज्वर :– कढत लाटा आल्यासारखे वाटते. दुर्गंधी घाम येऊन थकवा वाटतो. रात्री घाम जास्त येतो. व त्यामुळे **पिवळे डाग पडतात.**

**लक्षणांचे वैशिष्ट्य वा हो :– क्षुल्लक कारणे**–थोडासा स्राव जाणे–लचकणे, उचलणे, सर्दी होणे; ***खाताना***; **गार कोरडी हवा**; हजामतीनंतर; वृद्धपणी; विटाळाच्या पाळीनंतर.

**बवा** :– विकार झालेल्या जागीं हात ठेवल्याने.

**सहाय्यक औषधे** :– कॅल्क–फा.

**संबंधी औषधे** :– आर्से; कॅल्क–फ्लु; ग्रफाय; नाय–ॲसि; पल्स; फास्फ; बेला; व्रायो; व्हेरा-आ; सल्फ; सिली; सेपि.

---

## ९८. कार्बोलिक ॲसिड Carbolic Acid

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा–घशाची–जठराची* आतड्याची व फुप्फुसाची; *हृदय*; **रक्त**; श्वासोच्छ्वास यावर होतो. **वेदनांचा अभाव**; मानसिक व शारीरिक सुस्ती; आणि *थकवा दुर्गंधी*. स्राव आग करणारे, कफ वगैरे. विकारांचा दुष्टपणा–**सेप्टिक विकार**. जीर्ण ज्वर. वेदना सुरू होऊन एकदम नाहीशा होतात किंवा आग होऊन झिणझिण्या येतात. शारीरिक श्रमाने कोठेतरी गळवे उत्पन्न होतात. घ्राणें-द्रिय अत्यंत तीक्ष्ण. **नाडी सूक्ष्म**.

**डोके** :– मानसिक श्रम करावेसे वाटत नाहीत. डोके रबराच्या पट्टयाने आवळल्या-सारखे वाटते. कपाळात कढत चेंडू असल्यासारखे वाटते. डोकेदुखी तंबाखू ओढल्याने कमी होते, डोक्याचे कातडे हुळहुळे झाल्यासारखे वाटते.

**डोळे** :– भुवयाभोवती अतिशय दुखते.

**नाक** :– सूक्ष्म वाससुद्धा ओळखता येतो. *नाका व तोंडाभोवती पांढरेपणा*. पिनस, नाकात व्रण पडतात, अतिशय दुर्गंधि स्राव.

**चेहरा** :– धुरकटल्याप्रमाणे

**तोंड** :– घाण येते. तोंडापासून जठरापर्यंत आग होते.

**घसा** :– चकचकीत. घटसर्प, पेय पदार्थ गिळताना बाहेर येतात पण घसा दुखत नाही. शक्ती जलद क्षीण व्हावयास लागते. घटसर्पात पडजीभ पांढरी, सुरकुतलेली.

**जठर** :– उत्तेजक पदार्थ खावेसे वाटतात किंवा तंबाकू ओढावीशी वाटते. जठर हुळहुळे होते. हिरवी ओकारी होते. छातीत जळजळ, वात भरतो.

**उदर** :– **श्लेष्मल त्वचेचे चिंध्याप्रमाणे शौचास तुकडे पडतात.** हगवण–जुलाब पातळ काळे दुर्गंधी. कॉलरा. ( व्हेरा-आ. नंतर घ्यावे ). लघवी करताना गुदद्वारावाटे आव पडते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थोडी, हिरवी किंवा काळी होते. वृद्धपणी रात्री लघवीला वारंवार जावे लागते. मधुमेह. लघवीतून अल्बुमिन जाते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– धुपणी दाट. योनीत कंड येऊन आग होते. गर्भाशयाचे स्खलन होते. कमरेत आरपार अतिशय दुखते व मांड्यापर्यंत ओढ लागते. गर्भाशयाचे मुख करवडते. स्राव दुर्गंधी, करवडणारा.

**पाठ** :– तिकोनी हाडांच्या मध्ये दुखते. कमरेच्या सांध्याभोवती तीव्र कळा येऊन मांड्या ओढल्यासारख्या वाटतात.

**पाय** :– तंगडीत हाडाजवळ पेटके येतात. हाडात कुरतडल्यासारखे वाटते..

**झोप** :– गुंगी येते.

**ज्वर** :– खूप गार घाम येतो.

**त्वचा** :– भाजल्यासारखे किंवा पुवळलेले फोड येतात. रक्त झिरपते. धावरे. भाजलेल्या भागात व्रण पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा स्त्री** :– धक्का लागल्याने. वाचताना. गरोदरपणी. केस विंचरताना.

**संबंधी औषधे** :– क्रियासो.

---

## ९९. कार्बोव्हेजिटॅबिलिस (कोळसा) Carbo Vegetabilis

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा-पचनेंद्रियांची*; **हृदय; रक्त;** ***शिरातील रुधिराभिसरण*** **व डोक्याचा मागील भाग यावर होतो. रोगाशी व औषधाशी झगडून शरीर थकते. जीवनशक्ति क्षीण.** रोगामुळे उद्भवलेले हट्टी उपद्रव. अमुक एक गोष्ट झाल्यापासून प्रकृतीत बिघाड होतो. अनेक तऱ्हेची औषधे घेऊन लक्षणांची झालेली गुंतागुंत. ***उदरात वात धरणे, अशक्तपणा, दुर्गंधी*** **व** ***वाऱ्याची आवड*** ही लक्षणे बहुतेक विकारात आढळून येतात. **कंप** ***अशक्तपणा, आजारीपणामुळे आलेली क्षीणता*** किंवा एकदम शक्तिपात होतो व नाडी हाताला लागत नाही. मूर्च्छा येते. गार वाऱ्याने अंगावर शहारे येतात. **अंग गार असते तरीपण पंख्याने वारे घ्यावेसे वाटते किंवा मोकळ्या हवेत असावेसे वाटते** किंवा गार पाणी प्यावेसे वाटते. ***निळसरपणा*** **व कुजणे.** सेप्टिक विकार. **व्रण. रक्तस्राव** – काळा

व हळुहळु पाझरतो. **शिरात रक्ताधिक्य होते. स्राव दाट करवडणारे.** मार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा वाटतो; **जडपणा. आग** होते, हाडात, व्रणात वगैरे. मार पडलेल्या जागी बधिरपणा येतो. सदोदित लोळण्याची व झोपेची इच्छा. उत्तेजक पेयानी किंवा अन्नाने तोंडावर लाली येते. ***बर्फा-सारखा गारपणा***—जीभ—पाय वगैरे. शस्त्रक्रियेनंतर, मानसिक आघात यानी एकदम शक्तिपात होतो. शाळेत जाणाऱ्या मुले, मुली, आळशी, बुद्धीने मंद, रात्री झोपेत भयानक स्वप्ने पडून घाबरून उठतात, अंधारात किंवा एकट्याने झोप येत नाही.

**मानसिक** :— बुद्धिमांद्य, चिंतायुक्त व **चिडखोर.** असुखी. आल्हादकारक किंवा दु:खकारक गोष्टींचा मनावर काहीही परिणाम होत नाही. बेपर्वा. सकाळी उठताना किंवा झोपताना काळजी वाटते. निष्कारण भीती वाटते—भुता-खेतांची—काळोखाची वगैरे. आळसी, वेडगळ.

**डोके** :— दाबल्याप्रमाणे किंवा शिशाप्रमाणे जड झाल्यासारखे डोके दुखते. विशेषत: मागील भाग. उशीवरून डोके उचलता येणार नाही असे वाटते. खोकताना डोक्यात चमका मारतात. डोके गरम होऊन आग होते. टोपीचे वजन सहन होत नाही. सर्दी होऊन डोके दुखावयास लागते किंवा बंद झाल्या-नंतर दुखावयास लागते. केस झुपक्याने किंवा आजारानंतर गळून पडतात. कपाळावर गार घाम येतो. घेरी येते त्या वेळेस कानात आवाज होऊन मळमळते. उन्हाने वगैरे तापल्याने डोके दुखावयास लागते. डोके गरम हातपाय गार. अंथरुणाच्या उबेने डोक्याला कंड येते.

**डोळे** :— आग होते. खोल जातात. बाहुलीवर प्रकाशाचा परिणाम होत नाही. रक्त येते. कंड सुटते. ओढल्यासारखे वाटतात. डोळ्यावर जड वजन ठेवल्या-सारखे वाटते. डांग्या खोकल्यात डोळ्यातून रक्त येते. डोळ्यापुढे काळे ठिपके तरंगतात. वर बघताना डोळ्याचे स्नायू दुखतात.

**कान** :— पातळ रक्तमिश्रित स्राव येतो त्यामुळे आसपासची जागा करवडते. घण घण आवाज होतात. हिवताप, विस्फोटक ज्वर यानंतर सुरू झालेला स्राव. कानात काहीतरी जड पदार्थाने दडा बसल्यासारखे वाटते. मळाला घाण येते.

**नाक** :— कंठात खवखवून शिंका येतात, नाक शिंकरताना जास्त शिंका येऊन नाक वारंवार शिंकरावे लागते. दररोज नाकातून रक्त जाते; चेहरा

फिकट होतो. सर्दी घशात उतरते. सर्दी झाली म्हणजे ताप आल्यासारखे वाटते. शिंका येतात असे वाटते पण येत नाहीत.

चेहरा :- *धुरकटल्यासारखा, खोल गेलेला व कानशिले बसलेली*–मृत-वत. **वरचा ओठ कापतो.** गालगुंड. गालगुंड बरे झाल्यानंतर दुसऱ्या विकारांचा उद्भव होतो. ओठ पिंगट, काळसर होऊन भेगा पडतात. चेहऱ्यावर गार घाम येतो.

**तोंड** :- हिरड्या विसविशित होतात–दातापासून सरकतात, त्यातुन रक्त येते. पू येतो ( पायोरिआ ). चावताना हिरड्या दुखतात. दात सैल होतात, तोंडात खुळखुळ वाजताहेत असे वाटते. गरम किंवा थंड अन्न ( पेय ) खाताना दातातून कळा येतात. जीभ काळी होते, सुजते. तोंडाला घाण येते. हिरड्या काळया पडतात. तोंड येते–निळसर काळसर व्रण पडून त्यात आग होते. तोंडातून रक्त येते. दात घासताना दातातून रक्त येते. जीभ गार. दात गार.

घसा :- खवखवतो. आग होते. रक्तमिश्रित चिकट कफ पडतो. घशात व्रण पड-तात. अन्न गिळताना घसा दुखतो. बंद झाला आहे असे वाटते.

जठर :- अन्नाच्या कल्पनेचासुद्धा तिटकारा वाटतो. *ढेकरा येतात* त्या **करपट** असतात किंवा **मोठ्याने** आवाज होतो पण त्यानी बरे वाटत नाही. खोकताना ढेकरा येतात. पोट–भरल्यासारखे–जड झाल्यासारखे वाटून झोप येते. काही खाल्ले तरी वात धरतो. अग्निमांद्य–अन्न पचन होण्यापूर्वीच कुजावयास लागते. पोटाच्या खळीत दाब सहन होत नाही. रक्ताच्या ओकाऱ्या. छातीत जळजळ. पोटात आग होते व ती पाठीत कण्यापर्यंत जाणवते. काफी प्यावीशी वाटते; आंबट, गोड, खारट पदार्थ खावेसे वाटतात. दूध व तेलकट पदार्थांचा तिटकारा. अतिखाण्याचे दुष्परिणाम. व्रण. कॅन्सर. चांगले व सहज पचणाऱ्या अन्नाचा तिटकारा.

उदर :- *अतिशय वात धरून फुगते*–**विशेषत: वरच्या भागात**; निजल्याने जास्त होते, वात सरल्याने बरे वाटते. यकृत मोठे होते–ओढल्यासारख्या वेदना होतात-स्पर्श सहन होत नाही. आतड्यात वात कोंडून कळा येतात. दुर्गंधी वात सरतो. हगवण–आव–कालरा–रक्तमिश्रित पातळ शौचास होते. दुर्गंधी आव. गुदात आग होते. गुदद्वाराशी जळजळते, कंड सुटते व भोवतालचा भाग लाल होतो. ( लहान मुलांचा ). लालसर पातळ शौचास आपोआप होते. मूळव्याध मोड निळसर व बाहेर येतात.

शौचानंतर गुदद्वारात दुखते. उदर लोंबकळत आहे असे वाटून वाकून चालावे लागते. वात कढत, ओलसर. गाडीतून गेल्याने उदरात् दुखावयास लागते, वात सरल्याने बरे वाटते. वृद्धपणीची हगवण.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्राशयाची जीर्ण सूज. लघवीतून श्लेष्मा जातो–अल्बुमिन जाते. लघवी बंद होते, काल्र्यात. गार जमिनीवर फार वेळ उभे राहिल्याने लघवी तुंबते. अंथरुणात लघवी होते. मधुमेह. पिवळसर किंवा दाटसर पांढुरकी भरपूर लघवीला होते.

**पुरुषजननेंद्रिये** :– शिथिल, अशक्त, गार घाम येतो. वीर्यपात संभोगाचे वेळी अकाली होतो व डोक्यात आवाज होऊ लागतात. शौचास होताना पांढरी धातू जाते. वृषणाजवळ मांड्याना कंड सुटते व त्या ओल्या होतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– योनिद्वार–हुळहुळे होते, कढत होते, कंड सुटते व सुजते. ओटीपोटात–गर्भाशयात ओढल्यासारखे वाटते त्यामुळे उभे राहता येत नाही. गर्भाशयात व उजव्या रजःपिंडात जडपणा वाटतो. एका पाळीपासून दुसरीपर्यंत विटाळ जातो. विटाळ काळसर-दुर्गंधी–गाळ्याळ. विटाळ चालू असताना छातीत आग होते व दम लागतो, हातापायाची आग होते. धुपणी–पातळ-हिरवट, दुधासारखी, करवडणारी त्यामुळे आग होते व कंड सुटते, पाळीचे अगोदर जास्त होते. बाळंतपणानंतर गर्भाशय पूर्वस्थितीवर येत नाही, अशक्त व शिथिल होतो. योनिद्वारावरील शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात व त्यांत निळसर व्रण पडून आग होते. दूध येण्याचे बंद होते. दूध पाजल्या-नंतर अतिशय थकवा वाटतो. स्तन सुजून टणक होतात व आत गळू होऊन आग होते, पिकण्याचा संभव असतो, फुटल्यानंतर त्यातून पातळ स्राव वाहतो. स्तनात गाठी येतात त्यामुळे खाकेतील गाठी मोठ्या व टणक होतात.

**श्वसनेंद्रिये** :– श्वासोच्छ्वास गार. कंठात खरवडल्यासारखे वाटते. आवाज बसतो-संध्याकाळी किंवा दमट हवेत जास्त. डांग्याखोकल्याची सुरवात-खोकताना घसा बंद झाल्यासारखा वाटतो, चेहरा लाल होतो व वांती होते. डांग्या खोकल्याचे दुष्परिणाम. मधुन मधुन अतिशय त्रासदायक खोकल्याची उबळ येते–गुदमरल्यासारखे वाटते, डोके दुखते व ओकावयास होते–गार पाणी प्याल्याने किंवा अंथरुणात निजल्याने जास्त होते. कफ बाहेर काढताना उमासे येतात. छाती अशक्त-जड किंवा हुळहुळी झाल्यासारखी वाटते विशेषत. जागे झाल्यानंतर. वृद्ध इसमांच्या पोटात वात धरून सुरू

झालेला दमा. ओला खोकला, घशात घुरघुरते. कफ–दाट-चिकट पिवळसर व खूप पडतो. खोकून थकवा येतो, घाम येतो व जीव गुदमरतो. छातीत विस्तवासारखी आग होते. फुप्फुसातून रक्त पडते. क्षय; फुप्फुसाचा कॅन्सर; विद्रधि वगैरे रोगात बरगड्या हुळहुळ्या होतात.

**हृदय** :– हृदयविकारात लागणारा दमा. एकसारखी धडधड व त्यावेळेस चिंता वाटते, खाण्यानंतर जास्त होते. सर्व शरीरात नाडीचे ठोके पडत आहेत असे वाटते. नाडी–अनियमित मधुन मधुन थांबते–बारिक–जलद. हृदयाचे जागी आग होते.

**पाठ** :– पाठीत गुडदी बसली आहे असे वाटून पाठ दुखते त्यामुळे खाली बसता येत नाही. उजव्या खांद्याचे मागील बाजूस आग होते. पाठीचे मणके कुजतात. पाठीखाली उशी घेऊन निजावे लागते.

**हातपाय** :– बधिर झाल्यासारखे वाटतात. ज्या भागावर दाब पडला असेल तो भाग बधिर होतो. गुडघ्यापर्यंत पाय गार होतात. गार घाम येतो. पाया-वरच्या शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात–त्यात व्रण पडून त्यातून पातळ किंवा दाट करवडणारा लालसर स्राव वाहतो. हातापायाची आग होते– सुजतात. हाताची बोटे अशक्त, वस्तु धरता येत नाही. वृद्धपणी बोटे काळी पडतात–त्यावर भाजल्यासारखे फोड येऊन त्यातून रक्तमिश्रित पाणी येते, विस्तवासारखी आग होते. कंबरेच्या सांध्यात पू होतो. ( टि. बि. ) पावलाना दुर्गंधी घाम येतो जड, ताठतात, मुंग्या(?) पडल्यासारखे वाटतात. लिहिताना हात थकतात.

**झोप** :– भयंकर स्वरूपाची स्वप्ने पडतात. झोपेनंतर हुशारी वाटत नाही. हातपाय पोटाशी घेऊन निजावेसे वाटते. चमत्कारिक मेल्यासारखी झोप लागते. घशात घुरघुरते, हातपाय गार ( विशेषतः गुडघे ) पडून जाग येते.

**ज्वर** :– हिवताप–थंडी वाजताना तहान लागते–गार पाणी प्यावेसे वाटते. तापात तहान लागत नाही. शरीराच्या एकाच भागाला थंडी वाजते. थंडी व ताप आलटुन पालटून. पाय, पाऊल, गुडघे ***बर्फाप्रमाणे गार***–होतात विशेषतः रात्री किंवा एकबाजू गार होते. **अंतर्गत विस्तवाप्रमाण आग** होते, हृदयाचे जागी–छातीत वगैरे, पण बाहेरचे अंग गार असते. सहजासहजी घाम येऊन सर्दी होते. रात्री व सकाळी खूप घाम येतो त्यामुळे जीव गळून जातो. घामाला आंबुस वास येतो. पीतज्वर, न्युमोनिआ, टायफाईड, क्षय.

**त्वचा** :– काळी पुळी, व्रण–पसरट वरवर पसरतात–करवडणारा दुर्गंधी स्राव वाहतो आग होते–रात्री जास्त. इसब. कॅन्सर. गरोदरपणी शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *उष्णतेने.* अंग गार झाल्याने. *क्षीणता आणणारे रोग.* वृद्धपणा. *अति खाण्याने.* पौष्टिक पदार्थ खाण्याने. वस्त्रांचा दाब. जास्त वजन उचलण्याने. अत्यंत थंडी किंवा उष्णता. गार हवा-रात्रीची. उष्ण दमट हवा. डोक्याला वारे लागल्याने. स्राव बंद झाल्याने. शिळे कुजलेले अन्न, कोंबडी, वगैरे पक्ष्यांचे मांस खाल्याने, गाण्याने, मोठ्याने वाचताना.

**ब वा** :– *ढेकरा आल्याने*; गार हवा पंख्याचे वारे; पावले उंचावर ठेवल्याने.

**सहाय्यक औषधे** :– आर्से; कलि-का; फास्फ; लॅके; सिको.

**संबंधी औषधे** :– अको; ड्रोसे; नक्स-व्हा; फास्फ–ॲसि; लायको; व्हेरा–आ; सल्फ; सेपि.

---

## १००. कार्बोनिअम सल्फुरेटम Carboneum Sulphuratum

**सर्वसाधारण** :– वेदना होऊन स्नायू आखडल्यासारखे वाटतात. स्नायू वाळतात. त्वचेला व श्लेष्मल त्वचेला स्पर्श केलेला कळत नाही. पाठीवर ओझे ठेवले आहे असे वाटून वाकून चालावे लागते. हगवण ४ ते ६ आठवड्यानी. कोळशाच्या वायूपासून उद्भवलेले विकार. हिरवा व लाल रंग ओळखता येत नाहीत, पांढरा ओळखता येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– दमट उष्ण हवा. सकाळी खाण्यानंतर.

**ब वा** :– मोकळ्या हवेत.

---

## १०१. कालिंसोनिआ Collinsonia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम गुद; गुदद्वार; गर्भाशय व ओटीपोटातील आंतडी; हृदय; घसा व यकृत यावर होतो. हृदयविकारामुळे आलेली जलयुक्त सूज ( नाळगूद-जलोदर ). हृदयाचे विकार व रक्ती मूळव्याध

आलटून पालटून. रक्ताधिक्य-ओटीपोटातील इंद्रियात. **मूळव्याध**. आवळल्यासारखे वाटणे. **फुगल्यासारखे वाटणे** हातपाय–योनिद्वार वगैरे. **अवयव** बाहेर येतात, गुदद्वार गर्भाशय वगैरे.

**मानसिक** :– खिन्न.

**डोके** :– शौचास झाले नाही म्हणजे कपाळ दुखते किंवा मूळव्याधीतून रक्त येण्याचे थांबले म्हणजे दुखावयास लागते.

**तोंड** :– जीभ पिवळी, चव कडू.

**घसा** :– शिक्षक, वक्ते वगैरेंची घसेदुखी किंवा खोकला.

**उदर** :– वात धरतो. अत्यंत हट्टी मलावरोध ३।३–४।४ दिवस शौचास होत नाही. तान्ह्या मुलांचा मलावरोध, किंवा हगवण. गरोदरपणी मलावरोध व मूळव्याध होते. करवडणारे जुलाब–आसपासचे केस नाहीसे होतात. पांढुरके गाळ्याळ शौचास होते. गुदात दुखते, आग होते, कोरडे आहे असे वाटते. आत काड्या किंवा वाळू आहे असे वाटते व त्यावेळेस **हृदयात दुखते**. **रक्ती मूळव्याध**. रक्त पडत असेल तोपर्यंत हृदयाचे विकार बरे असतात. रक्त पडण्याचे थांबले की हृदयाचे विकार जास्त होतात. छातीचे विकार, मूळव्याध किंवा संधिवात आलटून पालटून. **गुदद्वाराला कंड सुटते**. बद्धकोष्ट व जुलाब आलटुन पालटुन.

**स्त्रीजननेंद्रिये** :– योनिद्वाराला व गुदद्वाराला कंड सुटते. कष्टार्तव–विटाळात पांढरे पापुद्रे जातात व त्यावेळेस मूळव्याधीचा उपद्रव होतो. विटाळशी झाल्यानंतर मांड्या गार झाल्यासारख्या वाटतात.

**पुरुषजननेंद्रिये** :– गुदातील लक्षणासहित, वृषणातील शिरा फुगून वेडयावाकड्या होतात.

**हृदय** :– धडधडते. हृदयाची लक्षणे थांबली की मूळव्याधीचा त्रास सुरू होतो किंवा विटाळ जावयास लागतो.

**श्वसनेंद्रिये** :– आवाजाचा दुरुपयोग केल्यामुळे खोकला येतो किंवा घसा दुखतो. श्वास कोंडल्यासारखा वाटून **अंगात कढत लाटा येतात** व मूळव्याधीचा त्रास होतो. मूळव्याध कमी झाली की थुंकीतून रक्त पडते.

**हातपाय** :– संधिवात व मुळव्याध आलटून पालटून. मोठे झाल्यासारखे वाटतात. पाय आपले स्वतःचे नाहीत असे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *मूळव्याधीचे* रक्त येण्याचे थांबले म्हणजे. रात्री. गरोदरपणी. गारठा. मनःक्षोभ किंवा भावनामुळे. मूळव्याधीचे मोड काढल्यानंतर

**ब वा** :– उष्णतेने. सकाळी.

**संबंधी औषधे** :– इस्कु; एलो; कोनि; नक्स-व्हा; लायकोप; सल्फ.

---

## १०२. कालोफायलम Caulophylum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *स्त्रीजननेंद्रिये*; *मज्जातंतू*; स्नायू; मान; पाय व लहान सांधे यावर होतो. **लकवा**. *वेदना अस्थिर* असून ओढ **लागल्याप्रमाणे** वाटते किंवा पेटके येतात किंवा एकदम सुरू होऊन एकदम थांबतात. थांबुन थांबुन येतात–मिनिटा-मिनिटाला जागा बदलतात व कित्येक वेळा वेदना मानेत स्थिर होऊन ती ताठते. लहान सांध्याचा **संधिवात**. अंतर्गत कंप. गर्भाशयाच्या विकारामुळे इतर अवयवात सुरू झालेले उपद्रव. कंपवात-योग्य वयात विटाळ सुरू न झाल्यामुळे उद्भवलेला. आंचके, फेफरे, वयात येण्याचे काळी सुरु झालेले. बाळंत झाल्यानंतर उत्पन्न झालेला पंगूवात.

**मानसिक** :– **घाबरटपणा**; क्षुब्धता. सहज गोष्टीमुळे असंतोष.

**डोके** :– गर्भाशयाच्या विकारामुळे डोके दुखते, डोळ्याच्या मागील बाजूस दाबल्यासारखे वाटते, खाली वाकल्याने, उजेडाने, दुपारी ते रात्रीपर्यंत जास्त होते.

**चेहरा** :– धुपणीमुळे चेहऱ्यावर फुलपाखराप्रमाणे पिवळसर डाग पडतात.

**तोंड** :– येते.

**जठर** :– गर्भाशयाच्या विकारामुळे ओकाऱ्या. घेरी येताना, आंबट, कडू पाणी सारखे गिळावे लागते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीतून अल्बुमिन जाते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळी उशीरा. विटाळ थोडा जाऊन थांबून थांबून कळा येतात. कष्टार्तव. *बाळंतवेदना* योग्य दिशेने न जाता *इतस्ततः पसरतात*– स्तनात येतात *किंवा मंद वा अनियमित असतात*. या औषधाने बाळंतपण सोपे होते. शेवटच्या महिन्यात खोट्या वेणा येतात. गर्भाशय निष्क्रिय व त्यामुळे **वारंवार होणारे वाळे**. खूप करवडणाऱ्या धुपणीचा

स्राव. लहान मुलींची धुपणी. आचके येऊन योनिसंकोच होतो. बाळंतपणानंतर विटाळ फार जातो व फार दिवस राहतो. बाळंतपणाला वेळ लागल्यामुळे होणाऱ्या वायगोळ्याच्या वेदना. गर्भाशयाचे मुख ताठते, व त्यात सुया टोचल्यासारखे वाटते. बाळंतपण लवकर झाल्यामुळे होणारा रक्तस्राव.

**हातपाय :– हाताच्या बोटाच्या सांध्यावर बारीक गाठी येऊन त्या दुखतात. लहान सांध्यांचा संधिवात.** विटाळशी होण्याच्या अगोदर पाय ठणकतात व हुळहुळे होतात. बाळंतपणानंतर उद्भवलेला पंगुवात. बोटे मिटताना बोटाच्या सांध्यात कापल्यासारख्या वेदना होतात.

**ज्वर** :– अतिज्वर. शरीर रक्तामुळे भरले आहे असे वाटते.

**त्वचा** :– गर्भाशयाच्या किंवा विटाळसेपणच्या उपद्रवामुळे **तपकिरी रंगाचे चट्टे** पडतात–विशेषतः मानेवर.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **गरोदरपणी.** विटाळ बंद झाल्याने. मोकळ्या हवेत. संध्याकाळी. काफी.

**संबंधी औषधे** :– **पल्स**; सिमि; सेपि.

---

## १०३. काल्चिकम Colchicum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***पचनेंद्रिये***; ***हृदय***; रुधिराभिसरण; **मूत्रपिंड**; **स्नायू**; **स्नायुबंध**; **सांधे** व लहान सांधे यावर होतो. ***अशक्तपणा***; ***गारपणा***; ***अस्वस्थता*** व काहीही **सहन न होणे. जलद शक्तिपात** होतो, रोग्याचे डोके उशीवरून उचलताना ते मागेपुढे पडते, व हात निर्जीव झाल्याप्रमाणे खाली पडतात. शरीरातील स्राव गेल्याने झालेला शक्तिपात. मुंग्या येणे. वेदना होणाऱ्या लहान लहान जागा त्वरित बदलतात. हृदय व सांध्यांचे विकार आलटून पालटुन होतात. रात्रीच्या जागरणाचे दुष्परिणाम. अति अभ्यास, दुसऱ्यानी केलेल्या दुष्कृत्यानी, घाम थांबल्याने, भिजल्याने झालेले दुष्परिणाम. शरीराच्या अर्ध्याच भागात विजेचे धक्के बसल्यासारखे वाटते. जलोदर नाळगूद. क्षुल्लक दुखापतसुद्धा अतिशय दुखते.

**मानसिक :– चिडखोर व काही सहन होत नाही.** क्षुल्लक जखमेनेसुद्धा असह्य वेदना होतात. दुसऱ्याने केलेली दुष्कृत्ये केलेली पाहून किंवा ऐकून वेड्या-

सारखे होते. उश्रवास, उजेड, साधा स्पर्श सहन होत नाही. वाचता येते पण एखादे लहानसे वाक्य समजत नाही. खिन्न.

**डोके** :- कपाळात मुंग्या आल्यासारखे वाटते.

**डोळे** :- बाहुली एक मोठी दुसरी लहान. करवडणारे अश्रु येतात. वाचल्यानंतर दृष्टि मंद होते. अर्धवट उघडे. डोळ्याभोवतालच्या वेदना डोक्याच्या मागील भागात येतात.

**कान** :- तीक्ष्ण. कानात कंड येते.

**नाक** :- नाकपुड्या कोरड्या व काळसर. ***कोणताही वास सहन होत नाही* व त्यानी मळमळते,** मूर्च्छासुद्धा येते.

**चेहरा** :- मुंग्या येतात व सुजतो. गाल लाल. कढत घाम येतो. उजव्या जबड्याखाली दुखते. चेहरा खोल गेलेला किंवा बसलेला दिसतो.

**तोंड** :- वासलेले. लाळ गळते पण तोंड कोरडे आहे असे वाटते. जीभ सुजते, लालभडक, जड, ताठलेली, बधिर. तोंड कढत होऊन तहान लागते.

**घसा** :- हिरवट पातळ कफ साचतो व तो आपोआप तोंडात येतो.

**जठर** :- ***अन्नाच्या वासामुळे मळमळावयास लागते*** व कित्येकदा मूर्च्छा पण येते. **अन्न दृष्टिपुढेसुद्धा नकोसे वाटते.** स्वस्थ पडून राहिल्याने बरे वाटते. ***मळमळ*– कोरड्या ओकाऱ्या.** पोटात आग होते किंवा **बर्फासारखे गार वाटते.** वेदना होताना तहान लागते. सोडा, लेमनसारखी फसफसणारी पेये प्यावीशी वाटतात. अनेक पदार्थ खावेसे वाटतात पण त्यांचा वास आला की नकोसे वाटतात. लाळ गिळताना मळमळते व ओकारी होईल असे वाटते.

**उदर** :- वात धरून उदर फुगते त्यामुळे पाय लांब करता येत नाहीत. जलोदर. हगवण– नंतर सांधे धरतात किंवा वातरक्त होते. कळा येऊन शौचातून खूप बुळबुळीत– चकचकित पांढरी आव पडते, शौचानंतर कुंथावेसे वाटते किंवा गुदद्वारात आचके बसतात. काल्यासारखे जुलाब. आवेनंतर झालेला आमातिसार. जलोदर झालेले असताना ओटीपोटाखाली वळ्या पडतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :- विटाळशी झाल्यानंतर मांड्या गार झाल्यासारख्या वाटतात.

**मूत्रेंद्रिये** :- लघवीत खाली गाळ साठतो. लघवी काळी–पिंगट रक्तमिश्रित. मूत्रपिंडाचा शोथ. लघवीला वारंवार जावेसे वाटते, व भरपूर होते. लघवी पाण्यासारखी, फिकट. मधुमेह. बहुमूत्रता. लघवीतून अल्बुमिन जाते.

**श्वसनेंद्रिये** :– छाती पट्टयाने आवळल्यासारखी वाटते. रात्री खोकला येतो व लघवी नकळत होते.

**हृदय** :– अशक्त, त्या जागी कापल्याप्रमाणे किंवा नांगी मारल्याप्रमाणे वेदना होतात. संधिवातानंतर झालेला हृदयविकार. हृदयाच्या जागी दाबल्यासारखे वाटते, चालण्याने बरे वाटते. नाडी हाताला लागते न लागते.

**पाठ** :– दुखते, दाबल्याने, विश्रांतीने बरे वाटते.

**हातपाय** :– गार. पंज्यात व मनगटात सुया टोचल्यासारखे वाटते. बोटाची टोके बधिर, सांधे सुजतात, कढत व लाल होतात, ताठतात, रात्री जास्त होतात. पायाचा आंगठा सुजतो, स्पर्श सहन होत नाही. हाताच्या बोटांच्या नखात गुद्गुल्या होतात. चालताना गुडघ्यावर गुडघे आपटतात. पाय व पाऊले गार होतात, त्वचेखाली सुजतात कुल्ले कढत.

**त्वचा** :– गुलाबी ठिपके पाठीवर, उदरावर व छातीवर पडतात, पित्ताच्या गांधी.

**झोप** :– वाचताना झोप लागते. पाठीवर झोपणे.

**ज्वर** :– कुल्ले तापतात. चेहऱ्यावर गार घाम येतो. रात्रीचा आंबुस घाम येतो. अंग कढत, हातपाय गार. आंबुस घाम भरपूर एकदम येतो व जातो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा स्त** :– ***हालचालीने***. स्पर्श. रात्री. आंगठ्याला किंवा पायाच्या बोटाला धक्का लागल्याने. **गार हवा–दमट हवा; हवा बदलल्याने. शरद ऋतूत.** थोडेसे श्रम. **घाम येण्याचे बंद झाल्याने.** अंग ताठ केल्याने. सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत.

**क मी** :– उष्णतेने. विश्रांती. अंग दुमडल्याने. बसल्याने. शौचास झाल्यानंतर; खाली वाकल्याने.

**सहाय्यक औषधे** :– आर्से; स्पायजे.

**संबंधी औषधे** :– कार्बो–व्हेजि; नक्स–व्हा; पल्स; ऱ्हस–टा; सेपि.

---

## १०४. कास्टिकम Causticum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम स्नायू–मूत्राशयाचे–कंठाचे; व हातापायाचे; मज्जातंतू ; त्वचा; श्वसनक्रिया व चेहऱ्याची उजवी बाजू यावर होतो. **अशक्तपणा** उत्तरोत्तर वाढत जाऊन शरीरावरचा ताबा अनिश्चित होत जातो. ( चालताना अडखळणे वगैरे ) व शेवटी ***शरीर लुले पडते***

किंवा एखादा भाग किंवा अवयव लुला पडतो. स्पर्शज्ञान होत नाही. सांधे व स्नायुबंध आखडतात व सांधे किंवा अवयव वेडेवाकडे होतात. स्नायूत धक्के बसतात. फेफरे-वयात येण्याच्या सुमारास येते किंवा भीतीमुळे येते. गारठल्यामुळे शरिराचा भाग लुला पडतो. कंप. आंचके. कंपवात घाबरट मुलींचा बिटाळशेपणी जास्त होतो. आग होते. हुळहुळेपणा. चावल्यासारखे वाटते-- गुदद्वारात, कंठात वगैरे. भाजण्यापासून झालेले दुष्परिणाम. भीती, शोक. रात्रीचे जागरण, बाह्योपचाराने त्वचेचे विकार किंवा स्राव बंद केल्यामुळे उद्भवलेले दुष्परिणाम. लहान मुलाना योग्य वेळी चालता बोलता येत नाही. त्वचेवर चामखिळीसारखी उगवण. कंपवात. रोगामुळे, भीतीमुळे, काळजीमुळे, शोकामुळे शरीर वाळावयास लागते. बोलण्यात, चालण्यात, खाताना वेंधळेपणा. त्वग्रोग बाह्योपचाराने बरे केल्यानंतर उद्भवलेले मानसिक विकार, किंवा आंचके. क्षुल्लक कारणाने शरीरावर भेगा पडतात, नाकपुड्याभोवती, डोळ्याच्या कोपरात, ओठाना वगैरे. लुला पडलेला भाग गार पडण्याने धुतल्याने थोडा सुधारतो.

**मानसिक** :– **मन शिणलेले. काही तरी भयंकर घडेल अशी भीती वाटून काळजी वाटते**, संध्याप्रकाशात जास्त. मूल एकटे काळोखात निजावयास भिते. कोणाशी बोलावेसे वाटत नाही. सर्वांशी अत्यंत सहानुभूतीने वागावेसे वाटते. स्वतःच्या तक्रारीविषयी विचार केल्यास त्या जास्तच त्रासदायक होतात, विशेषतः मूळव्याध. निराश, उदास, मरावेसे वाटते. महत्त्वाकांक्षेचा अभाव. आपण काहीतरी अपराध केला आहे असे वाटून मनाला टोचणी लागते. संशयी, अविश्वास. मन जागेवर नसणे. मुले क्षुल्लक कारणाने रडतात. बोलताना अक्षरांची, शब्दांची उलटापालट करणे.

**डोके** :– मानसिक श्रमाने ( लिहिणे, वाचणे ) कानशिलात टोचावयास लागते. डोक्याचे कातडे ताणल्यासारखे वाटते. कराळ व मेंदू यामध्ये पोकळी आहे असे वाटते-- शेकल्याने बरे वाटते. डोके दुखत असताना मळमळून ओकावयास होते किंवा डोळ्यानी दिसेनासे होऊन मागाहून शरीर लुळे पडते. रात्री झोपेत घेऱ्या येतात. सकाळी उठल्यानंतर किंवा निजल्याने घेऱ्या येतात डोके पुढे मागे किंवा इकडे तिकडे हलते. डोक्यांत वेदनारहित खळबळ होते.

**डोळे** :– पापण्या जड होऊन खाली पडतात. डोळा एकसारखा दुखतो, डोळ्याला स्पर्श करून चोळण्याने बरे वाटते. एकाच्या दोन वस्तु दिसतात, उजवीकडे पाहिल्याने बरे वाटते. डोळ्याना गळ लागते--अश्रु कढत व करकरणारे

असतात. डोळ्याचे स्नायू लुले होतात. डोळ्यापुढे तारे चमकतात– काळे किडे तरंगत आहेत असे वाटते किंवा हिरवे ठिपके दिसतात. डोळ्यांच्या कोपऱ्यात भेगा पडतात. पापण्या लवलवतात. भुवयावर चामखिळी येतात. मोतिबिंदू. वस्तु मोठ्या दिसतात.

**कान** :– कानाने दुर्गंधी मळ जमतो. गुंगुं–घोघो असे आवाज होतात, स्वतःच्या बोलण्याचे व चालताना पावलांचे प्रतिध्वनि ऐकू येतात. बहिरेपणा. ढिंकासारखा दाट पू येतो.

**नाक** :– नाकाच्या खालच्या भागावर पुरळ येतो. नाकावर चामखिळीसारखी उगवण. जीर्ण सर्दी– नाकात व्रण पडतात– दाट पिवळा किंवा हिरवट पिवळा शेंबूड वाहतो. सकाळी शिंका येतात. पाळ्याना भेगा पडतात. सर्दी झाली की घसा बसतो.

**चेहरा** :– आजाऱ्यासारखा; पिवळसर. चेहऱ्यातील वेदना गार पाणी लावल्याने कमी होतात. **चेहऱ्याची एक बाजू लुली पडते**– त्यामुळे तोंड उघडता येत नाही. जबड्यात दुखते, त्यामुळे तोंड उघडता येत नाही.

**तोंड** :– ओठाच्या भोवती भेगा पडतात. हिरड्या मऊ व बिसबिशित होतात, दातापासून सरकतात. हिरड्याना वारंवार गळू होते. हिरड्यातून पू येतो. दात लांब किंवा सैल झाल्यासारखे वाटतात. जिभेचा बुंधा सुजतो. जीभ–पडजीभ किंवा टाळू सुजून लाल होते– विस्तवासारखी आग होते. जीभ–ओठ लुले पडतात. तोतरेपणा. बोलताना जीभ अडखळते. चावताना ( अन्न) जीभ चावली जाते. बोलताना शब्द फेकल्यासारखे बाहेर पडतात. दात दुखतात, थंड व गरम पाण्याने बरे वाटते. चव तेलकट. ओठाना पेटके येतात.

**घसा** :– अन्न गिळताना कंठात उतरते. किंवा नाकातून येते. घशाच्या तक्रारी ओणवे झाल्याने जास्त होतात. गिळताना मणक्यात दुखते. काहीतरी अडकले आहे असे वाटून वारंवार गिळावे लागते. घसा खवखवतो, खरवडल्यासारखा वाटतो. घशाचे स्नायू लुले पडल्यामुळे गिळता येत नाही. घशातील कफ खाकरून बाहेर काढता येत नाही, गिळावा लागतो.

**जठर** :– तेलकट ढेकरा येतात. भूक लागून जेवावेसे वाटते पण अन्नाकडे पाहिल्याने भूक नाहीशी होते. नुसत्या अन्नाच्या कल्पनेने किंवा वासाने भूक नाहीशी होते ( गरोदरपणी ). जेवणानंतर गार पाणी प्यावेसे वाटते पण पिण्याचा तिटकारा येतो. गोड आवडत नाही. पोटात चुना उकळतो आहे असे वाटते. कंप सुटतो, आग होते. पोट जड झाल्यासारखे वाटते. गार पाणी प्याल्याने बरे वाटते.

**उदर** :– आतड्यात मुरडा होऊन कापल्यासारख्या वेदना होतात. वेदना निजल्याने किंवा अंग दुमडल्याने कमी होतात. खाली वाकल्याने गुदात पेटके येतात. खोकताना गुदद्वार बाहेर येते. गुदातील शक्ती कमी झाल्यामुळे शौचाच्या वेळेस कुंथावे लागते त्यामुळे चेहरा लाल होतो. मलावरोध–उभ्याने शौचास बरे होते. शौच चकचकीत दिसते. गुदद्वाराभोवती टणक लहान पुटकुळ्या येतात. शौचास टणक खडे होतात, व कित्येक वेळा शौच होत आहे हे कळत नाही. गुदद्वारात भेगा पडतात–कंड सुटते–टोचते. मुळव्याधीचा चालताना उभे राहिल्याने किंवा त्या संबंधाने विचार केला तर त्रास होतो. मूळव्याध मोठी झाल्यामुळे शौचास अडथळा येतो. गुदात मधुन मधुन एकदम टोचल्याप्रमाणे कळा येतात. जननेंद्रिये व गुदद्वाराच्या मधील भागात ठुसठुसते. थंडीमुळे हगवण लागते.

**मूत्रेंद्रिये** :– *खोकताना*, नाक शिंकरताना शिंका आल्याने, चालताना *लघवीला होते*. लघवी थेंब थेंब गळते किंवा हळुहळु होते. झोपेत लघवी झालेली समजत नाही. किंवा जागेपणी लघवी होताना होत आहे असे वाटत नाही. लघवी फार वेळ तुंबून धरल्यास लघवी होईनाशी होते. बाळंतपणानंतर स्त्रियांची लघवी तुंबते. शस्त्रक्रिया केल्यानंतर लघवी तुंबते. मुलाना पहिल्या झोपेत लघवी नकळत होते. लघवी–काळी–गढूळ–पांढरी. लघवी आपोआप होते पण हा त्रास बसले असताना कमी होतो.

**पुरुषजननेंद्रिये** :– अंडात ठेचल्या–चिरडल्याप्रमाणे वेदना होतात. संभोगाचे वेळी वीर्याबरोबर रक्त पडते. शिश्नावर लाल ठिपके पडतात. बोंडीवरचा पांढरा स्राव वाढतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– संभोगाचा तिटकारा. पाळी उशिरा येते. व विटाळ फार जातो, विटाळ दिवसा जातो व रात्री धुपणी जाते. कष्टार्तव–पाठीत व मांड्यातून फाटल्यासारख्या वेदना होतात. विटाळसेपणी काळजी वाटते–स्वप्ने पडतात–उदासीनता व अशक्तपणा येतो. शारीरिक श्रमाने, थकल्यामुळे, काळजीने किंवा रात्रीच्या जागरणामुळे अंगावरचे दूध कमी होते. स्तनाग्रे हुळहुळी होऊन भेगा पडतात. बाळंतपणात कळा याव्या तशा येत नाहीत. धुपणीला विटाळाप्रमाणे वास येतो.

**श्वसनेंद्रिये** :– घशात किंवा कंठात गुदगुल्या होऊन खोकला येतो. खोकला कोरडा, रात्री किंवा सकाळी–एकसारखा–व इतका जोराचा असतो की शरीर फुटल्यासारखे वाटते. खोकला अंथरुणाच्या उबेने, खाली वाकल्याने किंवा

गार वारे लागल्याने जास्त होतो, थोडे थोडे गार पाणी प्याल्याने बरे वाटते. कफ सुटत नाही. खोकून खोकून कफ वर आला की लगेच परत जातो. कफ बाहेर काढण्याइतके खोल खोकता येत नाही. कफ तेलकट व चिकट बुळबुळीत साबणाच्या फेसाप्रमाणे असतो. कंठातील स्नायू लुले होतात त्यामुळे मोठ्यांने बोलवत नाही. आवाज बसतो, सकाळी जास्त. नाक शिंकरताना कंठात दुखते. बोलताना बसलेला आवाज हळूहळू मोकळा होतो. कंठात रेघ मारल्याप्रमाणे हुळहुळे होते. छातीत आवळल्यासारखे किंवा खरवडल्यासारखे वाटते. छातीत मांजर गुरगुरल्यासारखा आवाज होतो. चालताना किंवा बोलताना दम कोंडल्यासारखा वाटतो. क्षय; डांग्या खोकला. छातीत इतस्ततः वेदना होतात, दाबल्याने बरे वाटते. छाती हुळहुळी होते, कपडे घट्ट वाटतात.

**हृदय** :– वेदना होऊन छातीत धडधडते.

**मान, पाठ** :– मान आखडते–मन्यास्तंभ. मान ताठल्यासारखी, ओढल्यासारखी वाटते. पाठ ताटते त्यामुळे निजल्या किंवा बसल्या स्थितीतून उठताना त्रास होतो. पाठीतून वेदना पुढे येतात किंवा मांड्यात जातात. गिळताना कण्यात दुखते. खोकताना कमरेच्या सांध्याभोवती दुखते.

**हातपाय** :– अर्धांग वात. उजव्या बाजूचा कंपवात. सांध्यात वेदना होऊन सांधा सुजतो व काही दिवसानी सांधा वाळावयास लागतो किंवा कायमचा आखडतो. हातापायात फोडल्या तोडल्याप्रमाणे वेदना होतात; बधिरपणा येतो किंवा लुले पडतात. विजेचे चमके मारल्याप्रमाणे पायात वेदना होतात. हाताची बोटाची टोके फुटल्यासारखी वाटतात. पोटऱ्यात–पावलात किंवा पायाच्या बोटाना पेटके येतात. झोपेत हातापायाना आचके बसतात किंवा ते हालतात. सांध्यातून क्षाराचे खडे जमतात. उजव्या खांद्याच्या पुढील स्नायूत वेदना होतात. टाचेवर उभे राहवत नाही. उजवा पंजा लुला पडल्यासारखा वाटून जीभ लुली पडते. लहान मुले चालताना अस्थिर चालतात व सहज पडतात. सांध्यात आग होते गुडघ्याचा मागील भाग ताठतो, लिहिताना बोटांना पेटके येतात.

**झोप** :– डोळे मिटल्याबरोबर भयंकर आकृति डोळ्यासमोर दिसतात. थोड्याशा आवाजाने जाग येते. रात्री मन अस्वस्थ होऊन काळजी वाटते. अतिशय गुंगी येते, जागे राहणे कठीण जाते.

**ज्वर** :– इन्फ्लुएन्झा सर्वांग ठणकते. अंग गार पडते. थंडी वाजून लगेच घाम येतो. पहाटे ४ च्या सुमारास घाम येतो. घाम खूप येतो–थोड्या श्रमाने येतो

किंवा मोकळ्या हवेत येतो. घामाला आंबुस घाण येणे. संध्याकाळी ६ ते ८ अंग तापते.

**त्वचा** :– चामखिळीसारखी उगवण - चेहऱ्यावर–नाकाच्या शेंड्यावर वगैरे; बोटाच्या टोकावर शिंगासारखे टणक मोड येतात. मुलांना दात येताना अंगावर पुरळ येतो. बरे झालेले व्रण पुन्हा दुखावयास लागतात. त्वचेवर भेगा पडतात. नाडीव्रण. बारीक रक्त वाहिन्यांची जाळ्याप्रमाणे वाढ होते. पित्ताच्या गांधी. वारंवार अंगावर गांधी येण्याची प्रवृत्ति.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***संध्याकाळी*** किंवा पहाटे ३।४ वाजता. ***थंडगार कोरडी हवा***; झोंबणारे ***वारे***; **वाऱ्याची झुळुक**. अत्यंत थंडी किंवा उष्णता; **वाकल्याने**; कॉफी; श्रमाने; स्राव बंद झाल्याने; विटाळसेपणी. शौचानंतर, गाडीची गती, संध्या-प्रकाशात, कशाला तरी धरल्याने.

**ब वा** :– ***गार पाणी प्याल्याने***. **उष्णतेने अंथरुणाच्या उबेने**; दमट ओलसर हवेत. हळुहळु हालचाल केल्याने. स्नान केल्याने.

**सहाय्यक औषधे** :– कार्बो-व्हेजि. कोलो; ग्रफाय; पेट्रोसे; लॅके; स्टॅनम; स्टॅफि.

**संबंधी औषधे** :– अन्टी-टा; आरम-ट्रा; कलि-आयो; कॅल्क-का; ग्वाई; नक्स-व्हा; पल्स; रुटा; व्हस-टा; सल्फ; सिलि.

---

## १०५. किनिमम आर्सेनिकोसम

### Chinimum Arsenicosum

**सर्वसाधारण** :– **थकवा**; **क्षीणता**; अशक्तपणा. जीर्ण हिवताप, त्वचा बर्फासारखी गार. नियमित वेळी उद्भवणारा दमा व अत्यंत थकवा. पोटाच्या खळीत दाबल्यासारखे वाटते व त्याच्याच मागील कण्याच्या भागात दाबलेले सहन होत नाही. जठरातील आम्लत्व आळीपाळीने वाढते व कमी होते. तहान लागते पण पाणी सोसत नाही. अंडी खाण्याने हगवण लागते. हृदयाची धडधड. हृदय थांबले आहे असे वाटते, चढताना दम लागतो. हृदय-विकारामुळे झालेला दमा. भावनातिरेकामुळे झोप लागत नाही. हातपाय अशक्त व गार होतात. नियमित वेळी सुरू होणाऱ्या वेदना. तंबाखूचे दुष्परि-णाम. या औषधाचा आजारीपणातून उठल्यानंतर शक्तिवर्धक म्हणून चांगला उपयोग होतो. एकसारखा अतिज्वर, ताप सारखा वरखाली होत असतो.

---

## १०६. क्विनिमम सल्फुरिकम (कोयनेल)

Chininum Sulphuricum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम ***मज्जातंतू; रुधिराभिसरण* व** कणा यावर होतो. बहुतेक विकार नियमितवेळी सुरू होतात. वेदना. रस्त्यात पडणे, उभे राहता येत नाही.

**मानसिक :– काहीही सहन होत नाही.** घाबरटपणा. वस्तूंचे नाव सांगता येत नाही.

**डोके :–** हिवताप मुरल्यामुळे उद्भवलेली डोकेदुखी. डोके दुखत असताना घेरी येते व डोक्यात ठुसठुसते. तापाच्या पाळीच्या ऐवजी भुवयांच्या जागी वेदना होतात. घेरी येताना कानात आवाज होतात व पापण्या लवलवतात.

**डोळे :–** डोळ्यापुढे जाळे किंवा धुके पसरल्यासारखे वाटते किंवा काळे ठिपके दिसतात. तिरकस पाहिल्याने बरे दिसते. एकदिवसाआड तिरळेपणा (मुलांचा)

**कान :–** बहिरेपणा. कानात आवाज होतात.

**चेहरा :–** वेदना अगदी नियमित वेळी सुरु होतात, दाबल्याने बरे वाटते.

**मूत्रेंद्रिये :–** लघवीतून रक्त जाते. अल्बुमिन जाते. लघवी फार प्रमाणात होते. लघवीखाली तांबूस बारीक खड्यांचा गाळ जमतो.

**पाठ :– मानेपासून कंबरेपर्यंतचा कणा दुखतो, त्याला दाबलेले सहन होत नाही,** व त्यावेळेस श्वास कोंडल्यासारखा होतो.

**ज्वर :–** ताप उत्तरोत्तर वाढत जातो. अशक्तपणा येतो. तापात वात होतो. घाम खूप येतो त्याने बरे वाटते पण थकवा येतो. रात्री खूप घाम येतो. हिवताप; -थंडी वाजताना, ताप असताना व घाम येताना तहान लागते.

**त्वचा :–** कंड सुटते. तांबडे ठिपके पडतात. पित्ताच्या गांधी अंगावर येतात. त्वचा हुळहुळी व विसविशित.

**लक्षणांचे वैशिष्ट्य ज्या हो :–** *ठराविक वेळी*; सकाळी १०–११ वाजता; दुपारी ३ वाजता. थंडीमुळे. स्पर्श.

**ब वा :–** जांभई आल्याने. पुढे वाकल्याने, दाबल्याने.

-----

## १०७. किनोपोडिअम Chenopodium

**सर्वसाधारण** :– मुनबहिरी– अर्धांगवात व बोलण्याची क्रिया नष्ट होणे. घोरल्याप्रमाणे श्वासोच्छ्वास. श्वासोच्छ्वास करताना गाल हालतात. एकदम घेरी येते. चांगले ऐकू येत नाही विशेषतः बोलणे परंतु रस्त्यातून जाणाऱ्या गाड्यांचा व इतर आवाज अत्यंत तीव्रतेने ऐकू येतो. कानात गुणगुणल्यासारखे आवाज होतात. टानसिल मोठ्या होतात. उजव्या खांद्याच्या तिकोनी हाडांच्या कोपऱ्यात कण्याजवळ खूप दुखते. भरपूर पिवळी फेसाळलेली लघवीला होते. लघवी होताना आग होते. तीच तीच गोष्ट पुन्हा करण्याची प्रवृत्ति. या औषधापासून काढलेल्या तेलाचा उपयोग आतड्यातील जंत मारण्याकडे चांगला होतो विशेषतः हुकवर्म. मात्रा १० थेंब दर दोन तासानी तीन वेळा.

---

## १०८. कुप्रम मेटलिकम (तांबे) Cuprum Metallicum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मज्जातंतू*; पचनेंद्रिय; पोटाची खळी; उदर; स्नायू व रक्त यावर होते. **विकाराचे स्वरुप तीक्ष्ण** असते. ठराविक लक्षणसमूहांचा वारंवार उद्भव होतो. **पेटके व आचके** एखाद्या भागात किंवा एखाद्या ठिकाणी सुरू होऊन दुसरीकडे पसरत जातात. **आचके येताना रोगी ओरडतो**, अंग ताठ होते–**स्नायूना पेटके येऊन त्याच्या गाठी होतात**– मान आखडून वाकडी होते, **दातखिळी बसते**–उचकी लागते नंतर मेल्याप्रमाणे थकवा येतो–अंगावर शहारे येतात किंवा हसू लोटते. आचके (फेफरे) **रात्री** व बिटाळसेपणी येतात. झोपेत **धक्के बसतात**. वेदना–**चावल्याप्रमाणे** होतात व त्या स्पर्शाने जास्त होतात. मार लागल्याप्रमाणे किंवा फुटल्याप्रमाणे वेदना होतात. सर्वांग ताणल्यासारखे वाटून त्यात टोचल्यासारखे वाटते. एकसारखा अशक्तपणा वाटतो. जीवनशक्ति क्षीण त्यामुळे औषधाची क्रिया योग्य तऱ्हेने होत नाही व **तेच तेच विकार पुनः उलटतात. निळेपणा**. छातीत–छातीच्या मधल्या हाडाच्या मागे व बोटाना पेटके येतात. **पोटऱ्यात पेटके येतात**, पाय लांब केल्याने किंवा तळपाय ताणल्याने बरे वाटते. स्राव बंद झाल्यामुळे किंवा अंगावर आलेली उगवण नाहीशी झाल्याने उद्भवलेले विकार. दात येताना मुलाना आचके येतात; मुले पोटावर निजून कुल्ले वर उडवतात. भीतीमुळे उत्पन्न झालेला कंपवात.

**मानसिक** :– अस्वस्थता–घाबरटपणा. बेशुद्ध होऊ की काय असे वाटणे. मनात येईल ते करण्याची प्रवृत्ति. कर्कश किंचाळणे. वात–बडबड नंतर घाम येतो. मनाचा गोंधळ. खिन्नता–मरण येईल की काय अशी भीती वाटते. हिरमुष्टी; कपटी. आळीपाळीने माथेफिरूपणा व समजूतदारपणा. वातात जो जवळ येईल त्याची भीती वाटते. नको त्या शब्दांचा उपयोग करणे.

**डोके** :– घेरी येताना अंतर्गत कंप आल्यासारखे वाटते–शौचास झाल्याने, निजल्याने बरे वाटते. डोके ताठ ठेवता येत नाही–उशीत खुपसावेसे वाटते. टाळूला मुंग्या आल्यासारखे वाटते, (विटाळ बंद झाल्यामुळे). स्वतःचे केस ओढणे. मेंदूवरील आवरणांचा दाह ( मेनिंजायटिस ). डोक्यावर पाणी ओतल्यासारखे वाटते. डोके दुखत असताना ते पोकळ वाटते. फेफरे येऊन गेल्यानंतर डोके दुखते.

**डोळे** :– पापण्या मिटल्या की आत डोळे हालतात. बुबुळे वर जातात. पापण्या घट्ट मिटलेल्या, डोळे ताठ; खोल गेलेले किंवा चकाकणारे.

**चेहरा** :– फिकट–निळा; वेडावाकडा. ओठ निळे होतात. चेहरा बर्फासारखा गार. दातखिळी बसते. खालचा जबडा चघळीत असल्याप्रमाणे हालतो.

**तोंड** :– घट्ट मिटलेले. किंवा उघडे. तोंडाला फेस येतो. तांब्यासारखी चव. जीभ सापाच्या जिभेप्रमाणे आत बाहेर येते. लाळ गळते. बोलता येत नाही. तोतरे बोलणे. दात खाणे. जीभ लुली पडते.

**घसा** :– पेये गिळताना आवाज होतो. अन्ननलिकेच्या स्नायूंना आचके आल्यामुळे गिळता येत नाही.

**जठर** :– मळमळ. जोरजोराने अत्यंत त्रासदायक ओकाऱ्या येतात, गार पाणी प्याल्याने कमी होतात. ओकाऱ्या होताना आतड्यात वेदना होऊन यातना होतात, जुलाब होतात किंवा आचके येतात. आचके, दमा किंवा ओकारी होण्याचे अगोदर उचकी लागते. दूध प्याल्यानंतर तोंडाला पाणी सुटते. सकाळी उठल्यानंतर किंवा जरा हालचाल की ओकारी होते.

**उदर** :– पोटाच्या खळीत जोराने दाबल्यासारखे वाटते. आतड्यात चाकू भोसकून ठेवल्याप्रमाणे वाटून कळा येतात. पोटावर निजून कुल्ले वर उडवावेसे वाटतात. उदराला तडस लागते–फुगत होते व त्याला स्पर्श सहन होत नाही. भयंकर मुरडा होतो–दाबल्याने बरे वाटते, हात वर केल्याने जास्त होतो. हिरव्या पाण्याचे पिचकारी मारल्याप्रमाणे जुलाब होतात. कॉलरा– उदरात व पोटऱ्यात पेटके येतात. लघवी बंद होते. उन्हाळ्यातील हगवण. जंत.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी होण्याचे बंद होते, कालव्यात.

**पुरुषजननेंद्रिये** :– संभोग करताना पेटके येतात ( पोटऱ्यात ), त्यामुळे संभोग करता येत नाही.

**स्त्रीजननेंद्रिये** :– वायगोळ्याच्या वेदना. विटाळशी होण्याचे अगोदर किंवा विटाळसेपणी गर्भाशयात पेटके येऊन ते छातीपर्यंत जातात. विटाळ बंद झाल्यामुळे येणारे पेटके. विटाळसेपणी फेफरे येत. अनेक मुले झालेल्या स्त्रियांना होणाऱ्या वायगोळ्याच्या त्रासदायक वेदना. बाळंतपणात येणाऱ्या फेफऱ्यात तोंड उघडे राहते व पाठीची कमान होते.

**श्वसनेंद्रिये** :– कंठात आचके येऊन आवळला जातो श्वासोच्छ्वास कष्टाने होतो. खोकला–हसताना जास्त होतो. तोंडाजवळ कोणतीही वस्तु सोसत नाही. खोकला–डांग्या खोकला – खोकल्याची जोराने ढास लागते. खोकून खोकून श्वासोच्छ्वास बंद होतो – **गार पाणी प्याल्याने बरे वाटते**– मागे वाकल्याने किंवा दीर्घ श्वास घेतल्याने खोकला जास्त होतो. खोकताना पेटके येतात, आचके येतात किंवा डोळ्यातून पाणी येते. **छातीत घुरघुर आवाज होतो.** छातीचा खालचा भाग आवळल्यासारखा वाटतो. दमा व ओकाऱ्या आलटून पालटून. विटाळशी होण्याचे अगोदर दमा लागतो. बरगड्याखाली गोळ्या फिरत आहेत असे वाटते; कपडे घट्ट केल्याने. स्वस्थ पडण्याने बरे वाटते.

**हृदय** :– नाडी मंद, टणक भरलेली आणि जलद. हृद्रोगात दमा व पेटके येतात. विटाळशी होण्याचे अगोदर छातीत धडधडते.

**पाठ** :– मानेपर्यंत सर्व स्नायू दुखे पडतात.

**हातपाय** :– हात व पावले उडतात. आंगठे आत जाऊन मुठी मिटतात. तळहात तळपाय–पोटऱ्या यात पेटके येतात. अत्यंत थकल्यासारखे वाटतात. घोटे जड होतात. गुडघ्यात फेफऱ्याची संवेदना होते. गुडघे मोडल्यासारखे वाटतात.

**झोप** :– गाढ. शरीराला धक्के बसतात. झोपेत एकसारखा उदरात गुडगुडल्यासारखा आवाज होतो.

**ज्वर** :– अंग बर्फासारखे गार. अंगावर शहारे येतात. गार चिकट घाम येतो – विशेषतः रात्रीचा.

**त्वचा** : उगवण चांगली येत नाही किंवा आलेली नाहीशी होते. पिवळी खपल्या बसल्याप्रमाणे उगवण येते ( कोपराच्या बेचकेत ) महारोग. सांध्याच्या बेचक्यांत व्रण पडतात, कंड येते, पुरळ येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– भावना; राग, भीती. **स्राव बंद झाल्याने किंवा उगवण नाहीशी झाल्याने.** थकवा. हालचाल. उन्हाळा; ओकारी झाल्याने. जागरण. स्पर्शाने. हात वर केल्याने. पाळीच्या अगोदर. अमावास्या.

**घ वा** :– **गार पेये पिण्याने.** हृदयाच्या जागेवर दाबून धरल्याने.

**सहाय्यक औषधे** :– आयो; आर्से; कॅल्क-का.

**संबंधी औषधे** – एपि; कलि-ना; कास्टि; झिंक; पल्स; वेला; व्हेरा–आ; सिकु. स्ट्रमो हायासा.

---

## १०९. कुप्रम आर्सेनिकम Cuprum Arsenicum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *पचनेंद्रिये*; स्नायू व मज्जातंतू यावर होतो. **जोराचे पेटके**–छातीत, हातापायांच्या बोटाना. पोटऱ्याना- वगैरे. आतड्याला सूज आल्यामुळे **आतड्यात मुरडा** येतो. लघवी बंद झाल्यामुळे आचके येतात. वेदना होताना उचकी लागते किंवा अंग बर्फासारखे गार होते. आचके येण्याचे अगोदर ओकाऱ्या किंवा जुलाब सुरू होतात. दमा. ओकाऱ्या व जुलाब होताना **लघवी होण्याचे बंद होते.** कालरा. तांदुळाच्या धुवणाप्रमाणे जुलाब होतात. हृदय अशक्त होते. लघवीला लसणीसारखा वास येतो. मधुमेह. पोटऱ्यातील पेटके मध्य रात्रीनंतर जास्त होतात–अंथरुणातून बाहेर येऊन उभे राहिल्याने बरे वाटते. मधुन मधुन गार चिकट घाम येतो. लघवी होण्याचे बंद झाल्यामुळे येणारे आंचके किंवा हगवण, ओकारी झाल्यानंतर आचके येतात. पायात बधिरपणा येऊन मुंग्या पडल्यासारखे वाटतात. भीतीनंतर उत्पन्न झालेला कंपवात. चालण्याचा प्रयत्न केला तर सर्व शरीर कापते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– स्पर्शाने. दाबल्याने. दमट हवा, जागा.

**संबंधी औषधे** :- कुप्रम.

---

## ११०. कुबेबा (कंकोळ) Cubeba

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **श्लेष्मल त्वचा** *मूत्रमार्गाची*–मूत्राशयाची व **योनीची** यावर होतो. **आग होऊन** चुणचुणते. शोथ–नंतर

पिवळा किंवा हिरवा दुर्गंधी स्राव वाहतो–नाकातून घशातून–कफ येतो, योनीतून मूत्रमार्गातून पांढरा स्राव जातो. कपाळावरच्या शिरा फुगतात. बुळबुळीत पांढरी आव पडते. गार शौचास होते व आत तांदुळासारखे दाणे पडतात. लघवीनंतर कापल्याप्रमाणे किंवा पेटके आल्याप्रमाणे वाटते. परमा–स्राव चिकट तारा येणारा.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– रात्री अंथरुणात.

**क मी** :– इकडे तिकडे फिरल्याने.

**संबंधी औषधे** :– कोपे; सिस्ट.

---

## ११११. कुलेक्ष Culex Musca

**सर्वसाधारण** :– जलयुक्त सूज–नाळगुद. नाक शिंकरताना घेरी येते. विटाळाचा न धुऊन जाणारा डाग पडतो. कमरेच्या खालच्या भागात पेटके येऊन नंतर गर्भाशयात वेदना होतात. कपड्याना भोक पडून त्यातून अंगाला वारे लागत आहे असे वाटते–छातीला पाठीला वगैरे.

---

## ११२. केलिडोनिअम Chelidonium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **उजवी बाजू– उदराची**; फुफ्फुसाची; श्लेष्मल त्वचा; डोक्याचा मागील भाग; मूत्रपिंड; गुडघे यावर होतो. *पिवळेपणा*; **पित्ताचे विकार–ओकाऱ्या, कावीळ** वगैरे. वेदना **घुसून** मागे जातात किंवा सर्वत्र पसरतात. **टोचल्यासारखे वाटते. जडपणा**, ताठणे. हुळहुळेपणा. हातपाय लुले पडल्यासारखे वाटतात. **सांधे निखळल्यासारखे वाटतात** किंवा मोडल्यासारखे वाटते. बधिरपणा. **आळस**. हालचाल करण्याचा तिटकारा. थोड्याशा श्रमाने थकवा येतो. बरे वाटत नाही व काय प्रत्यक्ष होत आहे हे कळत नाही. या औषधाचे लायकोपोडिअम या औषधाशी साम्य असल्यामुळे त्या औषधाची निवड योग्य असून सुद्धा त्याचा उपयोग नसल्यास हे औषध घ्यावे. गरोदरपणी होणारे पित्ताचे उपद्रव.

**मानसिक** :– मानसिक श्रम [illegible] किंवा बोलण्याचा कंटाळा. खिन्नता, कारण नसता रडावेसे वाटणे. अस्वस्थता व त्यामुळे इकडे तिकडे फिरावेसे वाटते. आपण काहीतरी अपराध केला आहे, अशा प्रकारची काळजी वाटते.

**डोके** :– घेरी टाळूत जाणवते, डोळे मिटल्याने बरे वाटते. डोक्याचा मागील भाग जड होतो किंवा मानेसकट बर्फासारखा गार होतो. भुवयावर दुखते (उजव्या). डोके दुखणे डोळे मिटल्याने व खाण्यानंतर कमी होते. उजवा डोळा, गालाचा उंचवटा व कान या जागी वेदना होऊन डोळ्यातून अतिशय पाणी येते. डोक्याची कवटी लहान झाल्यासारखी वाटते.

**डोळे** :– पांढरा स्राव साचतो. डोळ्यातून खूप पाणी गळते. डोळे मळकट पिवळे. डोळे वर बघितल्याने दुखतात. डोळ्यापुढे दिपविणारा ठिपका दिसतो, त्याकडे पाहिल्याने डोळ्यातून पाणी येते.

**कान** :– कानातून बाहेर मुंग्या येत आहेत किंवा वारे येत आहे असे वाटते.

**नाक** :– लाल. **नाकपुड्या आत बाहेर हालतात.** नाकाची बोंडी सुजलेली यकृताच्या विकारात नाक चोंदते.

**चेहरा** :– लाल–काळसर, **पिवळसर बसलेला.** कपाळ, नाक, गाल पिवळे. उजवा गालाचा उंचवटा सुजल्यासारखा वाटतो.

**जीभ** :– **पिवळी.** तिचेवर दातांचे ठसे पडतात. विसविशीत. तोंडाला घाण येते. चव कडू.

**घसा** :– मोठा घास किंवा जलद गिळतो आहोत असे वाटून गुदमरल्यासारखे वाटते.

**जठर** :– दूध, चमचमीत किंवा कढत पदार्थ खाण्याची वासना. मळमळ–ओकाऱ्या येतात, कढत पाणी प्याल्याने बरे वाटते. जठरात कुरतडल्याप्रमाणे किंवा खरचटल्याप्रमाणे वेदना होतात, **खाण्याने बरे वाटते.** जठरात बूच बसल्यासारखे वाटते. पित्ताच्या ओकाऱ्या होऊन यकृतात दुखते.

**उदर** :– पोटाच्या खळीत दाबलेले सहन होत नाही. ***यकृतात वेदना होतात, त्या मागे पाठीत जातात. उजव्या खांद्याच्या तिकोनी हाडाच्या खालच्या कोपराजवळ एकसारखे दुखते.*** पित्ताचे खडे. उदराभोवती दोरी बांधून आवळल्यासारखे वाटते. मलावरोध व हगवण आलटून पालटून. शौचास **फिकट, पांढरे किंवा पिवळे धमक,** चिकट किंवा शेळीच्या लेंड्याप्रमाणे ( खडे ) होते. पोटाच्या खळीत वळवळल्यासारखे वाटते. गुदात कंड सुटते; मुंग्या येतात.

**मूत्रेंद्रिय** :– लघवी भरपूर, फेसाळ व पिवळी. कपड्याला काळसर पिवळे डाग पडतात.

**श्वसनेंद्रिये** :- दमा–लघवी करताना जास्त होतो. **घशात धूळ गेल्यासारखे वाटून** खोकला येतो. अतिशय घुरघुर आवाज होतो **पण कफ सुटून बाहेर येत** नाही **किंवा खोकताना कफाच्या बारीक गोळ्या बाहेर उडतात.** यकृताचे विकाराबरोबर छातीचे सुरू झालेले विकार. छातीत **उजव्या बाजूस खोल खिळा खुपसल्यासारखे वाटते.** न्युमोनिआत उत्पन्न झालेली कावीळ. दीर्घश्वास घेतल्याने छातीत दुखते. दम्यात छाती आवळल्यासारखी वाटते. व कपडे घट्ट झाल्यासारखे वाटतात, दीर्घ श्वास घेतल्याने बरे वाटते.

**हृदय** :- धडधडताना छाती घट्ट झाल्यासारखी वाटते.

**गळा** :- डावीकडले गलगंड.

**मान पाठ** :- मानेपासून उजव्या कानशिलापर्यंत दुखते. पाठीचा कणा पुढे मागे वाकल्याने दुखतो. डोक्याचा मागील भाग जड होऊन पाठीची उजवी बाजू दुखते. पाठीच्या उजव्या तिकोनी हाडाच्या खालच्या कोपऱ्यात एकसारखे दुखते व त्या वेदना पुढे छातीत व जठरापर्यंत येण्याचा संभव असतो, व त्यामुळे मळमळते किंवा ओकारी होते.

**हातपाय** :- **हाताच्या बोटांची टोके गार.** एक पाऊल गार दुसरे कढत. हातपाय हुळेहुळे होतात त्याना स्पर्श सहन होत नाही. टाचा चिमटल्याप्रमाणे दुखतात. गुडघ्यात (उजवा) आग होऊन ताठपणा येतो, हालचालीने जास्त होतो. हात पाय लुले पडल्याप्रमाणे वाटतात, पाय लुले पडून त्यांचे स्नायू ताठतात. एक पाऊल गार.

**झोप** :- *अत्यंत गुंगी;* **थंडी सहन होत नाही, लोळावेसे वाटते.** प्रेताची स्वप्ने पडतात.

**ज्वर** :- आग होते व ती हातात सुरू होऊन सर्व शरीरात पसरते. घाम येतो, पण त्याने बरे वाटत नाही व अंगावरचे पांघरून पण काढावेसे वाटत नाही. मध्यरात्रीनंतर घाम येतो. **थंडी वाजते** व गुंगी येते. ताप वरखाली होत असतो.

**त्वचा** :- कंड सुटते खाण्यानंतर बरे वाटते. त्वचा पिवळी. लाल पुटकुळ्या व फोड येऊन ते दुखतात. त्वचा सुरकुतलेली.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :- हालचाल केल्याने. खोकताना. स्पर्शाने. **हवेत फरक** पडल्याने. संध्याकाळी व पहाटे ४ वाजता. वर पाहिल्याने.

**व वा** :– **कढत अन्न किंवा पेये**. खाण्याने. रात्रीच्या जेवणानंतर. दुधाने. दाबल्याने. कढत पाण्याच्या आंघोळीने. मागे वाकल्याने, पोटावर निजल्याने.

**सहाय्यक औषधे** :– मर्क्यु–ड; **लायको**.

**संबंधी औषधे** :– आर्से; ओपि; कलि–बा; इपि; नक्स-व्हा; लेडम; मर्क्यु; ब्रायो; सल्फ; सेपि; स्रायजे.

---

## ११३. कोका Coca

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **मेंदू**; **श्वासोच्छ्वास**; हृदय व स्नायू यावर होतो. डोंगर चढणाऱ्या इसमाना या औषधाचा चांगला उपयोग होतो. **घेरी येणे, दम लागणे**; हृदयाची धडधड व **थकवा**. अतिश्रमाने आलेली शारीरिक व मानसिक क्षीणता. विमान लागते.

**मानसिक** :– मनाची खिन्नता व उल्हास आलटून पालटून. भित्रेपणा–एकांताची आवड. लवकरच मरण येईल असे वाटते. बडबडणे. आनंददायक कल्पना मनात येतात. विटाळशी होण्याचे अगोदर मन उल्हसित होते. खऱ्या खोट्याची जाणीव रहात नाही.

**डोके** :– अर्धशिशी. डोके दुखताना घेरी येते व डोळ्यापुढे चमका मारतात. डोकेदुखी खोकताना जास्त होते, खाण्याने व सूर्यास्तानंतर बरे वाटते.

**डोळे** :– डोळ्यापुढे चमका मारतात. एकाच्या दोन वस्तू दिसतात. पांढरे, काळसर ठिपके, ज्वाला दिसतात. बाहुल्या रुंदावलेल्या.

**कान** :– आवाज होतात.

**नाक** :– वास कळत नाही.

**तोंड** :– तिखट खाल्ल्यासारखे वाटते. दात कुजतात. जिभेवर पूट.

**जठर** :– भूक लागत नाही. पण गोड खावेसे वाटते. ढेकरा इतक्या जोराने व आवाज होऊन येतात की घशाची नळी फुटेल की काय असे वाटते. दारू व तंबाखूची आवड. उंच डोंगरावर गेल्यानंतर होणारी आव. भुकेशिवाय बराच काळ जातो.

**श्वसनेंद्रिये** :– आवाज बसतो ( टिंक्चरचे ५–६ थेंब दर अर्ध्या तासानी आवाजाचा उपयोग करावयाच्या अगोदर २ तास घ्यावे). वृद्धपणाचा दमा.

**मूत्रेंद्रिये** :– रात्री लघवी न कळत होते. मधुमेह व नपुंसकत्व.

पुरुषजननेंद्रिये :- शिश्न नाहीच असे वाटते. नपूंसकत्व.

स्त्रीजननेंद्रिये :- विटाळ एकदम जोराने बाहू लागतो, त्यामुळे झोपेतून जाग येते.

हृदय :- धडधडते. नाडी अतिशय जलद चालते व खूप घाम येतो.

श्वसनेंद्रिये :- आवाज बसतो ( ५–६ थेंब अर्ध्या अर्ध्या तासाने आवाजाचा उपयोग करण्याऱ्या अगोदर घ्यावे). वृद्धपणीचा दमा. वृद्धपणी पेहेलवान लोकाना झालेला दमा.

हातपाय :- हात मुंग्या आल्यासारखे वाटून बधिर होतो. चालताना आपोआप जलद पावले पडतात.

झोप :- येत नाही. मेंदूत धक्का बसल्यासारखे वाटून जाग येते. झोप असून सुद्धा कोणत्याही स्थितीत झोप लागत नाही.

त्वचा :- त्वचेखाली अळ्या वळवळत आहेत असे वाटते. स्पर्श केल्याने नाहीशा होतात.

लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :- चढताना. अतिशय उंच ठिकाणी गेल्याने. थंडी. मानसिक श्रमाने. चालताना, बसल्याने.

व था :- मोकळ्या हवेत जलद चालल्याने. सूर्यास्तानंतर.

संबंधी औषधे :- कॅनबि.

---

## ११४. कोकेना (कोकेन) Cocaina

सर्वसाधारण :- त्वचेखाली अळ्या वळवळत आहेत असे वाटते. शक्तीची कामे किंवा काहीतरी मोठे कार्य करावे अशी इच्छा होते. किडे जंतु दिसतात. नीति-अनीतीच्या कल्पना बधिर होतात. निष्कारण मत्सर. बुबुळातील बाहुल्या विस्तारलेल्या. कंपवात; कलायखंजवात. किडे दिसतात किंवा स्वतःच्या शरीरावर किंवा कपड्यावर किडे चालत आहेत असा भास होतो. शरीराचा एखादा अवयव नाहीच असे वाटते. स्वतः देहाविषयी निष्काळजी. स्वतःविषयी कोणीतरी वाईट बोलत आहे असे वाटते. आपला भयंकर छळ चालला आहे असा भ्रम.

---

## ११५. कोक्युलस (काकफळ) Cocculus Indicus

**सर्वसाधारण** :- या औषधाचा परिणाम **मेंदू** (डोक्याचा मागील भाग); **मज्जारज्जु** (कंबरेतील भाग): स्नायु; स्त्रीजननेंद्रिये व **एक बाजू** यावर होतो. ज्ञानेंद्रिये तीक्ष्ण पण स्नायू शिथिल, लुले झाल्याप्रमाणे किंवा जड. **अत्यंत अशक्तपणा – डोके सावरत नाही, उभे राहवत नाही किंवा बोलवत पण नाही.** लटके पडणे, चेहरा, जीभ, घसा वगैरे. **कंप**– डोक्याचा, खालच्या जबड्याचा किंवा काही करावयास लागले तर. **पेटके**– जबड्याच्या स्नायूना-उदरात–गर्भाशयात–हृदयात वगैरे. **बधिरपणा**; आचके. विकार आलटून पालटून होतात किंवा बाजू बदलतात. ***पोकळ झाल्यासारखे वाटते***, डोके; छाती उदरात. अशक्त, भित्र्या किंवा अविवाहित किंवा मुलं न झालेल्या स्त्रिया. राग, भीती, रात्रीचे जागरण, चिंता, राग, भीती, दुःख, प्रवास, चहाचा अतिरेक व शारीरिक व मानसिक अतिश्रम यानी झालेले दुष्परिणाम. हिस्टेरिआ. शरीर हलके झाले आहे असे वाटते. अद्‌भुत गोष्टीत मग्न असलेल्या तरूण मुली. **थंडी सहन होत नाही.** गाडी, आगबोट लागते. मंदपणा, हालचालीत, उत्तरे देण्यात, एखादी गोष्ट करावयास खूप वेळ लागतो.

**मानसिक** :- स्वतःच्याच तंद्रीत असल्यामुळे आसपास काय चालले आहे याचे भान नसणे. भ्रमिष्टपणा. वस्तु अवास्तव दिसतात किंवा भासतात. आकलन-शक्ति मंद. अत्यंत खिन्नता व अबोल. सहजासहजी रागावणे चिडखोर, विरोध सहन होत नाही. वेळ भरभर जात आहे असे वाटते. इतरांच्या प्रकृतिविषयी फार काळजी वाटते. बडबड, थट्टा करणे, विनोदी. जमिनीवर, खुर्चीवर, भिंतीवर कांही तरी जिवंत चालत आहे असे दिसते.

**डोके** :- **घेरी** – कपाळात जाणवते–विशेषतः सकाळी. घेरी येताना मळमळते-छातीत धडधडते-डोके वर केल्याने घेरी जास्त येते. डोके जड होते. **डोक्याचा मागील भाग** दुखतो-त्यावर निजवत नाही-डोके मागे वाकविल्याने बरे वाटते. ***डोके उघडते आहे व मिटते आहे असे वाटते.*** डोक्याचा मागील भागाचा कंप, मानेचे स्नायू अशक्त झाल्यामुळे.

**डोळे** :- डोके दुखत असताना डोळे बाहेर ओढून काढल्यासारखे वाटतात. मिटलेल्या पापण्याखाली डोळे हालतात. डोळे पुढे येतात. बाहुल्या अरुंद.

**कान** :- तीक्ष्ण.

**नाक** :- घ्राणेंद्रिय तीक्ष्ण.

**चेहरा** :- जबड्याच्या स्नायूंना पेटके येऊन दुखतात. तोंड उघडताना त्रास होतो. खालचा जबडा हालतो.

**तोंड** :- घशात गुदगुल्या होऊन डोळ्यातून पाणी येते. बोलताना गिळताना कष्ट होतात, जिभेच्या व अन्ननलिकेच्या स्नायूंच्या लुलेपणामुळे. जीभ लुली पडल्याप्रमाणे वाटून बोलण्यास कष्ट होतात, बाहेर काढताना बुंध्याशी दुखते. मीठ कमी घातल्याप्रमाणे (अन्नात) वाटते. दात दुखतात, मोकळ्या तोंडाने चावले म्हणजे बरे वाटते. तंबाखू कडू लागते.

**जठर** :- भूक असते पण अन्नाचा तिटकारा, अन्नाचा वास किंवा कल्पना सुद्धा सहन होत नाहीं. मळमळ – डोक्यापर्यंत आणवते. कोरड्या ओकाऱ्या. *ओकावयास होते*, डोके दुखीत, पोटदुखीत, सर्दी झाली असताना. **आगगाडी–मोटर–बोट लागते.** जठरात किडा वळवळत आहे असे वाटते ओकताना लाळ गळते. कडू आंबट दुर्गंधी ओकावयास होते. उचकी लागून जांभया येतात. मोठ्याने बोलण्याने, मेंदूतील गुल्मामुळे ओकावयास होते. अन्नाशिवाय फार दिवस राहिले असे वाटून भुकेची जाणीवच नाहीशी झाली आहे असे वाटते.

**उदर** :- फुगलेले. **तीक्ष्ण दगडाच्या तुकड्यानी भरले आहे असे वाटते,** हालचाल केल्याने त्रास होतो-कुशीवर निजल्याने ( कोणत्याही ) बरे वाटते. आतड्यात मुरडा होऊन वेदना होतात, वात धरल्यामुळे किंवा हिस्टेरिआत, त्यावेळेस–मूर्च्छा येते किंवा लाळ गळते. उदराचे स्नायू अशक्त झाल्यामुळे अंतर्गळ होईलसे वाटते. पोटाच्या खळीत मुरडा येऊन श्वासोच्छ्वास घेता येत नाही. रागामुळे यकृतात दुखावयास लागते, जरा धक्का लागलेला सहन होत नाही.

**मूत्रेंद्रिये** :- वारंवार लघवीला थोडे थोडे होते. लघवी पाण्यासारखी.

**पुरुषजननेंद्रिय** :- अंडात ओढ लागल्याप्रमाणे वेदना होतात, स्पर्श सहन होत नाही

**स्त्री जननेंद्रिये** :- कष्टार्तव. गर्भाशय मुठीत आवळल्यासारखा वाटतो. विटाळ भरपूर जातो व त्यामुळे थकवा वाटतो. पायांच्या बोटावर उभे राहिल्याने विटाळ जातो. खाली वाकताना किंवा उकिडवे बसल्याने धुपणीचा स्राव भडभडून बाहेर येतो. दोन पाळयामध्ये पुवळलेली धुपणी जाते-त्यामुळे अतिशय थकवा येतो, बोलवत नाही, उभे राहवत नाही. स्तनाना शहारे येतात.

**श्वसनेंद्रिये** :– छातीत पोकळ झाल्यासारखे वाटून मुरडा येतो. दमा, हिस्टेरिआचा.

**हृदय** :– एकदम हालचाल केली तर धडधडते, तेव्हा घेरी येते व मूर्च्छा येते. मानसिक क्षोभाने धडधडते.

**मान पाठ** :– मान अशक्त–डोके सावरत नाही. ***पाटीच्या कण्याचा अशक्तपणा*** विशेषतः **कंबरेत**, चालताना जास्त वाटतो. डोके हालविताना मानेच्या मणक्यात कटकट आवाज होतो. कंबर दुखून लुली पडली आहे असे वाटते.

**हातपाय** :– खांदे व हात मार लागल्याप्रमाणे दुखतात. हात कापतात विशेषतः काही करावयाचे झाल्यास जास्त कापतात. हातात काही वेळ वस्तू धरून ठेवल्यास हात बधिर होतात. पंजे बधिर होतात व एकदा एक नंतर दुसरा असे आलटून पालटून कढत व गार होतात. अर्धांगवात. पंगुवात, विरविरते व बधिरपणा येतो, पावलाना सूज येते. गुडघे अशक्त––चालताना कटकट आवाज होतो. हात पाय एकदा लांब केल्यानंतर पुन्हा जवळ करताना दुखतात किंवा दुसऱ्याच्या मदतीने जवळ लांब करावे लागतात. बेडौल चालणे. वरच्या हाताचे हाड मोडल्यासारखे वाटते. बसलेल्या स्थितीत तळपाय बधिर होतात. कशीतरी वस्तू हातात धरल्याने ती खाली पडते.

**झोप** :– शारीरिक व मानसिक थकव्यामुळे झोप येत नाही. एकसारखी गुंगी येते. जोरजोराने जांभया येतात व उचकी लागते. रात्रीच्या जाग्रगामुळे किंवा शुश्रूषा केल्यानंतर एकसारखी गुंगी येते.

**ज्वर** :– थंडी वाजताना उदरात वात धरून दुखते. घेरी येते, मळमळते. पाय गार होतात व डोके कढत होते. सर्वांगाला घाम येतो. भावनातिरेकामुळे येत असलेला ताप.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **हालचाल–बोट मोटार–गाडी** वगैरे **क्षुल्लक कारणे. निद्रा नाश** ( रात्रीचे जागरण ), श्रम, वेदना, आवाज, स्पर्श, भावना. पोहताना. विटाळसेपणी **काळजीने. थंडी**. मोकळी हवा. **खाण्याने**. वाकल्याने; गुडघे टेकल्याने.

**ब वा** :– बसल्याने. **खोलीत.**

**सहाय्यक औषधे** :– पेट्रो.

**संबंधी औषधे** :– आर्स; इग्ने; गेल्से; नक्स–व्हा; पल्स; बेला; ऱ्हस-टा; लायको; मस्क; हेपार.

---

## ११६. कोकस कॅक्टाय Coccus Cacti

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा–घशाची*; कंठाची; छातीची; मूत्रेंद्रिये व जननेंद्रियाची, डावी बाजू यावर होतो. आंचके. **रक्त-स्राव–काळसर. लघवीतून युरिक ॲसिड जाते.** संधिवात. *स्राव चिकट तारा येणारे–कफ* तोंडातून बाहेर लोंबतो. **हुळहुळेपणा–घशाच्या–योनीचा–त्वचेचा वगैरे. असह्य अंतर्गत गुदगुल्या.** निरनिराळ्या जागी ठुसठुस. लघवी बंद होते. जलोदर. नाळगुद. मुतखडा. वेदना होताना द्रव पदार्थ ( पाणी ) जोराने वाहत आहे असे वाटते. तिखट लागल्याप्रमाणे आग होते.

**मानसिक** :– खिन्नता वाटते–सकाळी उठल्यानंतर किंवा पहाटे २–३ वाजता.

**डोके** :– दुखताना ठुसठुसते व त्यावेळेस द्रव पदार्थ जोराने वाहत आहे असे वाटते.

**डोळे** :– वरची पापणी व डोळा यामध्ये काहीतरी खुपते आहे असे वाटते.

**कान** :– गिळताना कानात कटकट आवाज होतो.

**चेहरा** :– मुंग्या आल्यासारखे वाटते. खोकताना निळसर किंवा लाल होतो.

**तोंड** :– दात घासताना किंवा **खाकरताना खोकला येतो– कोरडचा ओकाऱ्या येतात** किंवा ओकावयास होते. जिभेच्या टोकाची आग होते. घसा आवळल्यासारखा वाटतो. घशाच्या मागील भागात दोरा लोंबकळत आहे असे वाटते.

**नाक** :– नाकपुड्यात तिखट गेल्याप्रमाणे आग होते. नाकाच्या मागील भागातून खूप स्राव होतो.

**उदर** :– ओटी पोटात डाव्या बाजूस तीव्र वेदना सुरू होऊन त्या जांघेतून मांडीत येतात व त्यावेळेस पातळ द्रव्य जोराने वाहत आहे असे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला वारंवार लागते. मूत्रपिंड ते मूत्राशयांपर्यंत भयंकर कळा येतात. लघवीला कष्टाने होते. मूत्रनलिकेत टोचते. **लघवीला लागते** पण मूत्रमार्गातून किंवा योनीतून रक्ताच्या गाठी पडल्याशिवाय लघवीला होत नाही. लघवी थोडी–दाट–जड व आंबुस. लघवीखाली बारीक वाळूप्रमाणे, लाल काळसर–पिंगट किंवा पांढरा–रक्तमिश्रित कफाचा **गाळ** साचतो. लघवीतून रक्त जाते. मूत्रपिंडाचा शोथ. शिश्नाच्या बोंडीत ठुसठुसते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ–काळा–दाट व भरपूर जातो व इतक्या लवकर गोठतो की रक्ताच्या गाठांने योनी भरून जाते. या गाठी काढल्याशिवाय लघवीला

होत नाही. योनिद्वार सुजते. विटाळ रात्री किंवा संध्याकाळी जातो. योनी लघवी होताना हुळहुळी होते.

**श्वसनेंद्रिये :–** *नियमितपणे गुदगुल्या होऊन जोराची खोकल्याची उबळ येते, त्याने सर्व शरीर हादरते–शेवटी ओकावयास तरी होते किंवा पुष्कळ चिकट बुळबुळीत स्वच्छ* कफ बाहेर येतो. खोकताना **चेहरा निळा–लाल होऊन** अंतर्गत आग होते व लघवीची लक्षणे होतात. ढास हळुहळु वाढत जाते व हळुहळु कमी होते. गार **मोकळया हवेत** किंवा गार पेयाने बरे वाटते. डांग्या खोकला. गळ्याखालील खळीत टोचते किंवा हुळहुळेपणा येतो. क्षय.

**हातपाय :–** बोटांच्या नखाखाली काटा खुपल्याप्रमाणे वाटते.

**ज्वर :–** पाठ गार होते. **अंगाची आग होते.**

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** *खाकरताना–घसा*; **नियमित वेळी. उष्णतेने. निजल्याने.** जागे झाल्यानंतर. **गारठल्याने.** स्पर्श. वस्त्रांचा दाब. दात घासताना, तोंडात पाणी खळबळताना. थोडेसे श्रम.

**ब वा :–** गार पाण्याच्या आंघोळीने किंवा धुण्याने. चालताना. गार पेये.

---

## ११७. कोनिअम Conium Maculatum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *मज्जातंतू; स्नायु; गाठी–स्तन*–रजःपिंड; **जननेंद्रिये** व श्वासोच्छ्वास यावर होतो. **जीर्ण विकार** त्यामुळे शरीराची झीज होते. अकाली वृद्धत्व. **म्हाताऱ्यासारखे दिसणे. परिणाम अनियमित. उत्तरोत्तर** *अशक्तपणा* वाढत जातो. कपडे सहन होत नाहीत. शौचाचे वेळी मूर्च्छा येते. चालण्यात अनिश्चितपणा. बोलताना अडखळणे. **कंप.** लटके पडणे. **एकदम** अशक्तपणा वाटतो किंवा आजारी झालो आहोत असे वाटणे. **बधिरता येते.** *दगडासारखा टणकपणा.* **गोळा आल्यासारखे वाटते मेंदूत–** पोटाच्या खळीत वगैरे. रक्तवाहिन्यांचा लवचिकपणा कमी होऊन रक्तदाब वाढतो. फाडल्याप्रमाणे किंवा भोकसल्याप्रमाणे वेदना होतात. सर्वांग ठेचल्यासारखे वाटते. करटे गुल्मे यांची वाढ. कॅन्सर. स्वस्थ बसले असताना हातापायात व सांध्यात दमून गेल्यासारखे वाटते. धक्के आचके बसल्यासारखे वाटते. सहजासहजी

लचक भरते. भावना किंवा लक्षणे खालून वर जातात. अंगाभोवती पट्टा किंवा काहीतरी घट्ट पदार्थ गुंडाळल्यासारखा वाटतो. दुखापती, मार लागणे, शोक; संभोगातिरेक; मुष्टिमैथून; ब्रह्मचर्य; मनःक्षोभ; अतिश्रम; अतृप्त संभोग या कारणाने उद्भवलेले विकार. *गाठी सुजून टणक होतात व दुखतात*, दारू लवकर चढते. शरीराने खंगलेला स्त्रिया, निराश होतात, आयुष्याचा कंटाळा येतो, रडावेसे वाटते; घशात गोळा अडकला आहे असे वाटून सारखे गिळावेसे वाटते किंवा गुदमरल्यासारखे वाटते. हिस्टेरिआ, प्रौढ कुमारिकांचा.

**मानसिक** :– कोणतेही मानसिक श्रम करण्याची अपात्रता, कोठेही लक्ष लावता येत नाही. उदासीन. मंडळीत बसण्याचा तिटकारा पण एकटे राहण्याची भीती वाटते. माणसांची भीती. हळुहळू बुद्धिमांद्य येऊन वेड लागते. ठरा-विक वेळी उद्भवणारे वेड. मनामध्ये विचित्र कल्पना येऊन त्या हळुहळू दृढ होत जातात. बेपर्वा. कोणत्याही गोष्टीत मन रमत नाहीं. रस्त्याने जाताजाता कोणाला तरी धरून त्याला शिव्या द्याव्याशा वाटतात. दुःखी–कष्टी–अकारण, समजूत केल्याने जास्त कष्टी होणे. विसराळू–प्रयत्न केला तरी आठवण होत नाही. क्षुल्लक गोष्टी महत्त्वाच्या वाटतात. अंथरुणावर प्राणी नाचताहेत असे वाटते. काहीतरी वस्तू विकत घ्यावयाच्या पण त्यांचा उपयोग करावयाचा नाही किंवा त्यांचा नाश करावयाचा. चांगले कपडे असतील ते घालावेसे वाटतात. वाचलेल्या गोष्टीचा बोध होत नाही. धर्मभोळेपणा

**डोके** :– **घेरी**, **गरगर फिरल्यासारखे वाटते. निजण्याने, कुशीवर वळताना,** डोळे हलविल्याने, डोळे फिरविल्याने, आवाजाने; बोलणे ऐकल्याने जास्त होते. वृद्धपणाची घेरी. **मेंदूच्या उजव्या बाजूस गोळा आहे** असे वाटते. दोन्ही कानशिले आवळल्यासारखी वाटतात, जेवणानंतर जास्त. डोके दुखत असताना मेंदू भरला असून तो फुटणार असे वाटते. कपाळापासून मागील भागापर्यंत दुखते, वाकल्याने जास्त.

**डोळे** :– डोळ्याचे विकार नसताना किंवा सौम्य असतानासुद्धा **उजेड सहन होत नाही**. डोळे **एकमेकावर आडवे झाले आहेत** असे वाटते. डोळ्यातून खूप पाणी वाहते. **पापण्या जड होऊन खाली पडतात,** विशेषतः बाहेरच्या अंगाला. दृष्टीसमोर निरनिराळे रंग दिसतात विशेषतः लालरंग. कृत्रिम उजेडात चांगले दिसत नाही. वस्तू एकाच्या दोन दिसतात. दुखापतीमुळे उद्भवलेला मोतिबिंदू.

**कान** :– चांगले ऐकू येत नाही. रक्तासारखे पाणी येते. कागदाच्या चोथ्याप्रमाणे मळ. गालगुंड मोठे व टणक होते. मळ टणक व रक्तासारखा लाल.

**नाक** :– शिंकरताना रक्त येते. वारंवार शिंका येतात. नाक चोंदते. मोड.

**चेहरा** :– चिलीम ( पाईप ) ओढल्यामुळे ओठावर कॅन्सरचा व्रण पडतो. गालाची काळी पुळी. जबड्याखालच्या गांठी मोठ्या व टणक होतात.

**तोंड** :– जिभेचा बुंधा हुळहुळा होतो. लाळ आंबट किंवा दुर्गंधी. दात गार अन्नाने दुखतात पण गार पेयाने दुखत नाहीत. जीभ लुळी पडल्यामुळे बोलण्यास कठीण जाते.

**घसा** :– गिळताना त्रास होतो. कांहीं अंतरापर्यंत अन्न जाऊन थांबल्यासारखे वाटते. घशात गोळा अडकला असे वाटून वारंवार गिळावे लागते विशेषत. वाऱ्यात चालल्याने. टान्सिल मोठी होते. जठरातून वर गोळा येत आहे असे वाटते.

**जठर** :– मळमळ. तिखटाप्रमाणे छातीत जळजळते. आंबट ढेकरा येतात विशेषतः रात्री व निजण्याचे अगोदर. कॉफीच्या गाळाप्रमाणे ओकावयास होते–चॉकलेट रंगाचे गोळे पडतात किंवा स्वच्छ आंबट पाणी पडते. पोटात भोसकल्याप्रमाणे वेदना होतात– आग होते– खाण्याने बरे वाटते– २।३ तासांनी पुनः सुरू होतात, पोटावर व गुडघ्यावर झोपल्याने बरे वाटते. पोटातील व्रण किंवा कॅन्सर.

**उदर** :– यकृताभोवती व आत अतिशय टणकते. जीर्ण कावीळ. मलावरोध एक दिवसा आड. शौचास जावेसे वाटते पण होत नाही. कुंथण्याला शक्ती नसते. स्त्रिया शौचाचे वेळी इतक्या कुंथतात की गर्भाशय योनीतून खाली येतो. शौचास होताना आग होते किंवा गार वाटते. गार वात सरतो. झोपेत न कळत शौचास होते. शौचानंतर अंग कापते, छातीत धडधडते. दूध प्याल्यानंतर उदर फुगते. वात सरण्याच्या अगोदर गुदात कापल्यासारखे वाटते. ओटीपोटातील वेदना मांड्यात येतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थांबून थांबून होते पण उभे राहिल्याने बरी होते. प्रथम लघवी व्हावी म्हणून दमण्याइतके कुंथले तरी लघवी होत नाही पण नंतर आपोआप व्हावयास लागते. वृद्धपणी लघवी थेंब थेंब गळते. लघवी झाल्यानंतर मूत्राशयात कापल्यासारखे वाटून आग होते.

**पुरुषजननेंद्रिये** :– नपुंसकत्व. संभोगाची इच्छा पण शारीरिक अपात्रता. संभोगाचे-वेळी घाबरटपणामुळे शिश्नाचे उत्थापन होत नाही, किंवा ते अर्धवट व थोडा

वेळ होते. स्त्रियांच्या सांनिध्याने, स्पर्शाने किंवा नुसत्या कल्पनेने वीर्यपात होतो. अतृप्त संभोगेच्छेमुळे उद्भवलेले दुष्परिणाम. मुष्टिमैथुनामुळे झालेले दुष्परिणाम. वीर्यपात होताना **कापल्यासारख्या** वेदना होतात. शौचास होताना किंवा भावनांमुळे धातुस्राव होतो. बोंडीची कातडी खाजते. अंड मोठे होतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळ्या अनियमित– लवकर किंवा उशीरा सुरू होतात. विटाळ थोडा जातो व त्या वेळेस गर्भाशयात **कापल्याप्रमाणे कळा** येतात. योनीत खोल कंड सुटते. **धुपणी करवडणारी**– दाट– दुधासारखी, धुपणी जाण्याच्या अगोदर कंबर अशक्त लुळी पडल्यासारखी वाटून कळा येतात व आग होते. लघवीनंतर धुपणी जाते. गर्भाशय व रजःपिंड याचा कॅन्सर–टोचल्या–फाडल्या-प्रमाणे वेदना होऊन आग होते. रजःपिंड मोठे होऊन टणक होतात. **स्तनात गाठी होतात. स्तन विटाळशी होण्याचे अगोदर मोठे होऊन दुखतात,** प्रत्येक पावलाला त्रास होतो. स्तन विसविशीत व लहान, होतात व संभोगेच्छा वाढते. स्तन जोराने हाताने दाबावेसे वाटतात. स्तनांची फरटे कॅन्सर– मोसकल्याप्रमाणे वेदना होतात. स्तनात वाजवीपेक्षा जास्त दूध येते, विटाळशी होण्याचे अगोदर गरोदरपणी पहिल्या एक दोन महिन्यात उदर हुळहुळे होते–गर्भाच्या हालचालीने दुखते. अतृप्त संभोगेच्छा, विटाळ बंद होणे किंवा संभोगातिरेक यांचे दुष्परिणाम. स्तनाग्रात टोचते.

**श्वसनेंद्रिये** :– घशात गुदगुल्या होऊन किंवा कंठात एखाद्या लहानशा जागी कोरडे-पणा वाटून अतिशय त्रासदायक खोकल्याची ढास लागते. निजल्याने जास्त होते, उठून बसल्याने बरे वाटते. दिवसा मुळीच खोकला नसतो किंवा थोडा येतो–खोकून कफ बाहेर निघत नाही तो गिळावा लागतो–क्षयरोग. दीर्घश्वास घेतल्याने खोकला येतो. दीर्घश्वास घेताना किंवा चालताना स्तनाग्राजवळ भयंकर टोचते ( उजवी बाजू ) हाताने जोराने दाबले म्हणजे बरे वाटते. खोकला बोलण्याने, दीर्घ श्वासाने, हसण्याने किंवा गरोदरपणी जास्त येतो. छातीचे मधले चपट हाड कुजते. जरा श्रम केले की दम लागतो. छातीवर व खांद्यावर कपड्याचे ओझे पडल्याप्रमाणे वाटते.

**हृदय** :– धडधडते–पाणी पिताना, श्रमाने, शौचाचे वेळी.

**मानपाठ** :– मान गार होते. कण्याला धक्का किंवा दुखापत झाल्यामुळे झालेले दुष्परिणाम. पाठीत दुखते, अशक्तपणा वाटतो. **कमरेच्या मणक्यात** उभे राहिल्याने दुखते. गुदास्थि दुखते.

**हातपाय :–** हात जड अशक्त- लुले पडल्यासारखे. कंप. हात अस्थिर. हातापायांची बोटे बधिर. पायांचे स्नायू अशक्त. खुर्चीवर पाय ठेवून उभे राहिल्याने पायातील वेदना कमी होतात. हातपाय लोंबकळत ठेवल्याने बरे वाटते. टाचेतून हाड बाहेर येत आहे की काय अशा कळा येतात. खाकेतील गाठी सुजतात व हात बधिर होतो. बोटाची नखे पिवळी. गुडघ्यात कटकट आवाज होतात. डोळे मिटून सरळ व संथ चालता येते. डोळे उघडे ठेवून चालताना झोकांडे जातात, मळमळते व घेरी येते.

**ज्वर :–** थंडी वाजताना उन्हात बसावेसे वाटते. झोप लागता लागता अंगात **कढत लाटा आल्यासारख्या वाटतात किंवा घाम येतो.** झोपेकरता डोळे मिटले की घाम येतो. डोळ्याखाली, हनुवटीवर, गुडघ्याच्या खळीत घाम येतो. मानेवर व तळहाताला गार घाम येतो. घामाला घाण येते व त्वचेखाली चुरचुरते.

**त्वचा :– हिरवट;** मार लागल्याप्रमाणे काळे निळे चट्टे पडतात. दुर्गंधी इसब. चरत जाणारे व्रण– स्राव दुर्गंधी. लाल ठिपके, पिवळे किंवा हिरवे होतात. शारीरिक श्रमानंतर पित्ताच्या गांधी येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** *हलत्या फिरत्या वस्तु पाहिल्याने. दारू;* **हात वर केल्याने.** मानसिक, शारीरिक **श्रमानंतर; वृक्षापत;** रात्री; संभोगातिरेक; **ब्रह्मचर्य; थंडी; गारठल्याने; वृद्धपणी;** निजल्याने– डोके उंच न ठेवता. अंथरुणात वळताना. स्पर्श दाबल्याने. घट्ट वस्त्रे. विटाळ सुरू होण्याचे अगोदर व सुरू असताना.

**ब था :–** अंधारात. उन्हात. विकार झालेला भाग लोंबकळत ठेवल्याने; हालचाल; उष्ण कोरडी हवा. वाकून चालल्याने. उपाशी राहिल्याने, खाली बसल्याने.

**सहाय्यक औषधे :–** फास्फ; बॅरि-मू ; सिली.

**संबंधी औषधे :–** आर्नि; आर्से; कॅल्क–आर्से; कॅल्क-का; ड्रोसे; नक्स–व्हा; पल्स; बेला; ऱ्हस-टा; सल्फ; सिकु; सोरि; स्ट्रमो.

---

## ११८. कोबाल्टम Kobaltum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम कणा ( कंबरेचा भाग ) जननेंद्रिये; मूत्रपिंड व हाडे यावर होतो. **स्राव फेसाळलेले;** हुळहुळेपणा; हाडे ठणकतात **आंबटपणा–चवीला–** जठरात–पावलाचा घाम.

**मानसिक** :– काहीतरी अपराध केला आहे असे वाटते. मनःक्षोभाने शारीरिक विकार जास्त होतात. स्वतःविषयी क्षुद्रपणाचे विचार येतात.

**डोके** :– घेरी येते किंवा डोके मोठे झाले आहे असे वाटते– शौचास झाल्याने बरे वाटते. डोके दुखते, पुढे वाकविल्याने जास्त दुखते.

**डोळे** :– वसंत ऋतूत उजेड सहन होत नाही.

**तोंड** :– जिभेवर दाट पांढरा थर जमतो. किंवा **आडव्या भेगा पडतात.** दात लांब झाल्यासारखे वाटतात. घट्ट बंद करावेसे वाटते.

**उदर** :– यकृतात तीव्र कळा मांड्यात येतात. पांथरी दुखते. बेंबीजवळ पोकळ झाले आहे असे वाटते. गुदद्वारातून रक्ताचे थेंब गळतात पण शौचास रक्त पडत नाही. उदरावर पिवळे ठिपके पडतात. वेदना होताना तोंडात आंबट, कडु पाणी खालून वर येते. यकृताच्या जागी कळा येतात व त्याच वेळेस पांथरीत दुखते, दीर्घश्वास घेतल्याने जास्त होते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीतून अल्बुमिन जाते. लघवी झाल्यानंतर मूत्रमार्गाच्या मुखाशी चुणचुणते.

**पुरुषजननेंद्रिये** :– उजव्या अंडात दुखते, लघवी झाल्यावर बरे वाटते. नपुंसकत्व. शिश्नाचे उत्थापन झाल्याशिवाय वीर्यपात होतो.

**श्वसनेंद्रिये** :– गोड फेसाळ गाठ्याळ कफ पडतो.

**पाठ** :– सर्व कणा दुखतो–वेदना पायापर्यंत येतात. **कंबरेचा कणा** संभोगानंतर किंवा बसण्याने दुखावयास लागतो, चालताना किंवा निजल्याने बरे वाटते

**हातपाय** :– मनगटे दुखतात. यकृतापासून खाली मांड्यापर्यंत कळा येतात. पाय अशक्त होतात विशेषतः संभोगानंतर. गुडघे अशक्त झाल्यासारखे वाटतात लांब करवत नाहीत. डाव्या कमरेच्या सांध्यात एकदम अशक्तपणा वाटतो चालताना जास्त. पावलात चुणचुण, गुदगुल्या होतात. पायाच्या बोटांच्य बेचकयात आंबुस घाम येतो.

**झोप** :– अस्वस्थ. वैषयिक स्वप्ने पडतात. झोपेनंतर हुशारी वाटत नाही, किंव थोडी झोपसुद्धा पुरेशी होते.

**त्वचा** :– कोरडी. डोक्यात, हनुवटीवर, कुल्ल्यावर पुटकुळ्या उगवतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **वीर्यपात**; बसण्याने; अंथरुणाची ऊब; उन्ह.

**ब वा** :– खाकरताना; एकसारखी हालचाल.

---

## ११९. कोमोक्लाडिआ Comocladia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम त्वचा; डोळे; नाक; व उजवी बाजू यावर होतो. त्वचा लाल होऊन सुजते. ठुसठुसणाऱ्या वेदना–उष्णतेने जास्त होतात. महारोग. डोळ्यात व नाकात आग होऊन कंड सुटते व जोरजोराने शिंका येतात. डोळे हुळहुळे होतात किंवा फुगून मोठे झाल्यासारखे वाटतात. खोकताना डाव्या स्तनाखाली दुखून त्या वेदना मागे डाव्या तिकोनी हाडापर्यंत जातात. उजव्या बाजूला छातीत दुखून त्या वेदना हात ते बोटापर्यंत जातात. संधिवात, वेदना एका सांध्यातल्या थांबून दुसऱ्या सांध्यात जातात. वारंवार होणारा इसब. धांवरे, खोल चरत जाणारे व्रण. त्वचेवर लाल पट्टे.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– स्पर्श; उष्णता; विश्रांति; रात्री.

**व वा** :– हालचाल; मोकळी हवा; खाजविण्याने.

---

## १२०. कोरालिअम रुब्रम (पोवळे) Corallium Rubrum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *श्वसनेंद्रिये; मज्जातंतु; व श्लेष्मल त्वचा* यावर होतो. **जवळ जवळ एकसारखी अतिशय खोकल्याची ढास** लागते. ढास लागण्याच्या अगोदर **गुदमरल्यासारखे** वाटते, चेहरा निळा होतो. ढासेनंतर **थकवा येतो** व ओकारी होऊन चिकट कफ पडतो. खोकल्याचा आवाज दुमदुमतो. खाताना खोकला येतो. मधुन मधुन ठराविक वेळी सर्व दिवस खोकल्याचा एकच ठसका लागतो. डांग्या खोकला. नाकात व्रण पडतात. नाकाच्या मागील भागातून घशात खूप कफ उतरतो. श्वास घेताना हवा गार लागते. शिश्नाच्या बोंडी व कातडीच्या आतील बाजूस व्रण पडतात (उपदंश) व त्यातून पिवळी लस वाहते. त्वचेवर पोवळ्याच्या रंगाचे तांबूस व्रण पडतात. तळहात व तळपाय यावर त्वग्रोग होऊन त्यातून पांढरे पापुद्रे जातात. डोक्यावरून पांघरुण घेऊन निजावेसे वाटते. पांघरुण घेतल्याने उकडते व काढल्याने थंडी वाजते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– हवेतील फरक. **हवा नाकाने आत घेताना.** खाताना. सकाळच्या सुमारास.

**सहाय्यक औषधे** :– सल्फ.

**संबंधी औषधे** :– कोक-कॅ.

---

## १२१. कोलेस्टेरिनम Cholesterinum

**सर्वसाधारण** :– यकृताचा कॅन्सर. यकृत मोठे होते. कुशीत आग होते. चालताना कुशी धरून चालावे लागते. पित्ताचे खडे. कावीळ.

**जा हो** :– स्पर्श, किंवा धक्का. कुशीवर निजल्याने, वाकल्याने, झटकन झालेल्या हालचालीने.

---

## १२२. कोलोसिंथ ( घोडे इंद्रायण ) Colocynth

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***पचनेंद्रिये– आतडी; मज्जातंतू;*** **रज:पिंड; मूत्रपिंड;** डावी बाजू यावर होतो. ***एकाएकी पेटके*** किंवा **मुरडा होऊन असह्य यातना** होतात. वेदनामुळे शरीराला ***आळेपिळे*** घ्यावे लागतात–**रडू येते – मळमळते** किंवा वारंवार लघवीला जावे लागते. वेदना होताना आचके बसल्याप्रमाणे धक्के बसतात किंवा आवळल्यासारखे वाटते. तीव्र कळा येतात. ***कापल्याप्रमाणे;*** **चिमटल्याप्रमाणे; मुठीत धरून आवळल्याप्रमाणे; कुरतडल्याप्रमाणे; उकरल्याप्रमाणे** वेदना होऊन नंतर बधिरपणा येतो. शरीराचे भाग आखूड झाले आहेत असे वाटते. **आवळल्यासारखे वाटणे; स्क्रू** पिळल्याप्रमाणे वाटणे. तापट, रागीट किंवा फळे खाल्यानंतर किंवा संभोगानंतर ज्याना पेटके येण्याची सवय आहे असे इसम. लठ्ठ–बैठ्या सवयीचा–खूप विटाळ जाणाऱ्या स्त्रिया. सर्वांगात ठुसठुसल्यासारखे वाटते. आग होते. शरीराच्या द्वारांचे आपरेशन केल्यानंतर झालेले दुष्परिणाम.

**मानसिक** :– **संतापी उगीचच्या उगीच चिडणे**–विशेषत: वेदना होताना. बोलावेसे वाटत नाही. मित्राना भेटावेसे वाटत नाही. उतावीळ. धार्मिक श्रद्धेचा अभाव. दुसऱ्यांचे दुर्दैव पाहून फार वाईट वाटते. वेदना होताना किंचाळणे, इकडे तिकडे चालावेसे वाटते.

**डोके** :– फाटल्याप्रमाणे डोके दुखते, पापण्या हलविल्याने, पाठीवर निजल्याने, खाली वाकल्याने जास्त. डावीकडे एकदम डोके फिरविले तर घेरी येते. डोक्याचे कातडे हुळहुळे होते.

**डोळे** :– डोळ्यातील वेदना दाबल्याने कमी होतात. खाली वाकले म्हणजे डोळा गळून पडेल की काय असे वाटते. डोळे दगडासारखे टणक होतात ( काचबिंदू ). पापण्या स्फुरतात व दुखतात.

**चेहरा** :– कोठेही वेदना झाल्या तरी त्यांचे प्रतिबिंब चेहऱ्यावर पडते, तो वेडावाकडा होतो. चेहऱ्यात वेदना होताना थंडी वाजते, डोळ्याची लक्षणे होतात किंवा त्या वेदना व अपेंडिक्सच्या वेदना आलटुन पालटुन होतात.

**कान** :– कानात आवाजाचा प्रतिध्वनि उमटतो. कानात वळवळते, खाजते, टोचते, ठणका लागतो, कानात बोट घातल्याने बरे वाटते.

**घसा** :– अन्ननलिकेस पेटके येतात, व कोरड्या ढेकरा येऊ लागतात व छातीत धडधडते.

**तोंड** :– एकसारखी कडू चव. जिभेच्या शेंड्याची आग होते. जीभ जणू काय पोळली आहे असे वाटते–खरखरीत लागते. दात लांब झाले आहेत असे वाटते.

**उदर** :– ***एकामागून एक–कापल्याप्रमाणे–मुठीत धरून आवळल्याप्रमाणे सर्व बाजूस पसरणाऱ्या कळा येतात; त्यामुळे हातपाय पोटाशी घ्यावे लागतात व खूप जोराने दाबल्याने बरे वाटते.*** जरा थोडे खाल्ले प्याले तर जास्त होते. बेंबीजवळ कापल्यासारखे वाटते. **आतडी दोन दगडामध्ये चिरडल्याप्रमाणे वाटतात.** कळांच्या तीव्रतेमुळे ओकावयास होते. मळमळते. कडवट पाण्याच्या ओकाऱ्या होतात. पोटाच्या खळीत दाबलेले सहन होत नाही. खूप तहान लागते. बटाटे–भात यासारखे पिष्टमय पदार्थ सोसत नाहीत. **शौचास पिवळे फेसाळ–पाण्यासारखे–धागे असलेले,** आंबुस–किंवा बुळबुळीत शेंबडाप्रमाणे होते. तान्ह्या मुलांची पोटदुखी. मूल पोटावर निजते, जरा वळविण्याचा प्रयत्न केला की ओरडावयास लागते. **वात धरून कळा येतात.** गुदातून रक्त पडते. पाठीत व गुदद्वारात नांगी मारल्याप्रमाणे वेदना होऊन आग होते. गुदद्वारातून बुळबुळीत बुडबुडे बाहेर येतात. आव–थोडे खाल्ले प्याले तरी शौचास जावे लागते. जुनी हगवण, सकाळी पाण्यासारखे जुलाब होतात. वेदनामुळे वारंवार शौचास जावे लागते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी डिंकासारखी चिकट. शौचास होताना मूत्रमार्गात आग होते. लघवीतून अंड्यातील पांढऱ्या बलकाप्रमाणे स्राव जातो. लघवीला वारंवार जावे लागते, थोडी थोडी होते व मूत्राशयात कळा येतात. लघवी होताना सर्व उदरात कळा येतात.

**पुरुषजननेंद्रिये** :– उदराच्या दोन्ही बाजूतून जननेंद्रियाकडे सर्व काही वाहत चालले आहे असे वाटून वीर्यपात होतो. बोंडीचे कातडे मागे सरकते – पुढे येत नाही.

**स्त्रीजननेंद्रिये** :– रजःपिंडात आलटून पालटून दुखते. रजःपिंडात उकरल्याप्रमाणे वेदना होतात त्यामुळे हातपाय पोटाशी घ्यावे लागतात व अतिशय अस्वस्थता वाटते. रजःपिंडाची पोकळ गुल्मे, वेदना उदरावर, मांडी दुमडल्याने बरे वाटते. उदराला खालून आधार द्यावासा वाटतो. कष्टार्तव, खाण्या-पिण्याने जास्त वेदना होतात. बैठ्या सवयीच्या स्त्रियांना खूप विटाळ जातो. स्तनात वेदनायुक्त गाठी येतात. विटाळ किंवा बाळंतपणाचा विटाळ, मानभंग किंवा संताप आल्यामुळे बंद होतो.

**श्वसनेंद्रिये** :– तंबाखू ओढताना लहान ठसका लागतो.

**हृदय** :– उदर फुगल्यामुळे वर ढकलल्यासारखे वाटते.

**पाठ** :– उजव्या त्रिकोनी हाडाखाली दुखते–दाबल्याने बरे वाटते. कंबर दुखते दाबल्याने बरे वाटते. **कमरेच्या सांध्याच्या भागात पेटके येतात.** गृध्रसीवात स्क्रू पिळल्याप्रमाणे–पट्टयाने आवळल्याप्रमाणे किंवा तीव्रकळा लागतात; जरा पाय हलविला किंवा वळविला तरी त्रास होतो व रात्रीचा जास्त त्रास होतो. दुखत असलेल्या बाजूवर निजल्याने, शेकाने, बरे वाटते. हातपाय पोटाशी वेऊन निजणे. स्नायूत संभोगाच्या वेळी पेटके येतात.

**ज्वर** :– घामाला लघवीसारखा वास येतो. वेदना होताना थंडी वाजते, शहारे येतात. पंजे व तळपाय गार, बाकीचे शरीर गरम.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *भावना*: राग, अपेक्षाभंग; *मनस्ताप*. रात्री अंथरुणात. **वेदना होत नसलेल्या बाजूवर निजल्याने.** खाण्याने पिण्याने. स्पर्श. संध्याकाळी ४ वाजता. लघवी होण्याचे अगोदर व नंतर.

ब वा :– *जोराने दाबल्याने.* हातपाय पोटाशी घेतल्याने. **उष्णतेने.** विश्रांती, **मंद हालचालीने.** काफी घेतल्याने. शौचास झाल्यानंतर किंवा वात सरल्यानंतर.

**सहाय्यक औषधे** :– कास्टि; मर्क्यु; स्टॅफि.

**संबंधी औषधे** :– कामो; नक्स-व्हा; पल्स; बेला; ब्रायो; स्पायजे.

---

## १२३. क्रटिगस Crataegus

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम ***हृदयावर*** होतो. **अशक्त झालेल्या *हृदयाची शक्ती वाढते.*** जीर्ण हृदयाच्या विकारामुळे आलेली अशक्तता व थकवा. चिडखोर; निराश; अतिशय घाबरट, डोक्यात व मानेत दुखते. टायफाईड तापातील शक्तिपात–आतड्यातून रक्तस्राव होऊन झालेला. हातपाय गार पडतात–श्वासोच्छ्वास व नाडी अनियमित चालते. रक्त-वाहिन्यांचा कमी झालेला लवचिकपणा पूर्वस्थितीवर आल्यामुळे रक्तदाब कमी होतो. हृदयविकारामुळे सूज येते. श्वासोच्छ्वास कष्टाने होतो. थोडेही श्रम करवत नाहीत. खोकला–बुळबुळीत अंड्याच्या पांढऱ्या बलकाप्रमाणे कफ पडतो. हृदय रुंद होते. ॲन्जायना. नाडी अशक्त–अनियमित– मधुन मधुन थांबते. अतिशय घाम येतो. हृदयविकारामुळे झोप येत नाही. लहान मुलांचा मधुमेह. गळ्याच्या हाडाखाली ( डाव्या ) व डाव्या तिकोनि हाडाखाली दुखते. मानेवर, खाकेत, हनुवटीवर चुरचुरणारे, आग करणारे पुरळ येते उष्णतेने, घाम आल्याने जास्त होते, धुतल्याने बरे वाटते. तळहाताला घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** खोलीची उष्णता.

**ब वा :–** ताजी हवा. स्वस्थ विश्रांति घेतल्याने.

**संबंधी औषधे :–** अपोसा; स्ट्रोफॅन्थ.

**डोज :–** टिंक्चरचे १ ते १५ थेंब दिवसातून ३।४ वेळा. काही दिवस डोज दिल्या तर याचा इष्ट परिणाम दिसू लागतो.

---

## १२४. क्रिआसोट Kreasote

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा–पचनेंद्रियांची;* **जठरांची, स्त्रीजननेंद्रियांची; हिरड्या; दात** व रक्त यावर होते. केविलवाणे वाटणे व अशक्तपणा. **स्राव–भरपूर, *दुर्गंधी–कढत व करवडणारे*** ज्या भागावरून **वाहतात तो भाग लाल होतो व** हुळहुळा होतो; **विस्तवा-सारखी आग** होते. ठुसठुस सर्वांगात. **रक्तस्राव**–हळुहळु पाझरतो व लहान सहान जखमातून थांबत नाही; रक्तस्राव–तपकिरी–काळसर, गांठचाळ, विटाळ वगैरे. व्रण; कॅन्सर. जडपणा. भरल्यासारखे वाटणे; फुगीरपणा.

काळेपणा–दात-धुपणी–बाळंतपणानंतरचा विटाळ वगैरे. शरीर झिजते. कुजणे (ग्रॅन्ग्रीन). वाळलेले इसम; वृद्ध स्त्रिया, विटाळ थांबल्यानंतर होणारे विकार. अनेक विकारात जांभया येतात. मुले थोपटल्याशिवाय व गोंजारल्याशिवाय झोपत नाहीत.

**मानसिक** :- **चिडखोरपणा, स्वतःची इच्छा तडीस नेणे; हट्टी.** मरावेसे वाटते. खुळेपणा. संगीत ऐकल्याने रडू येते व छातीत धडधडते. मुलाना प्रत्येक वस्तू हवीशी वाटते पण ती दिली की फेकून देतात, व दुसरी मागतात. काहीशी मनास येत नाही; असंतुष्ट. संभोगाच्या कल्पनेची ( स्त्रियाना ) भीती वाटते. मुले रात्रभर किचाळतात, रडतात.

**डोके** :- कपाळावर फळीने दाबल्याप्रमाणे डोके दुखते. विटाळसेपणी डोके दुखते. डोक्यात गुणगुणल्यासारखे आवाज होतात. कवटीची कातडी हुळहुळी होते, केस विंचरताना त्रास होतो.

**डोळे** :- पापण्या लाल व सुजलेल्या. डोळ्यातून कढत करवडणारे पाणी येते.

**कान** :- कानाभोवती व आत पुटकुळ्या. गुणगुण आवाज होतात. बहिरेपणा विशेषतः विटाळसेपणी.

**नाक** :- दुर्गंधी शेंबूड. वृद्ध इसमांची जीर्ण सर्दी.

**चेहरा** :- पिवळसर. थंडी वाजताना किंवा तापात मधुन मधुन लालसर होतो. संत्रस्त. कढत. गाल लाल. आग होते बोलताना, श्रमाने, आग होत असलेल्या बाजूस निजल्याने जास्त होते.

**तोंड** :- ओठ लाल त्यातून रक्त येते. ***दात अकाली कुजतात*** – वर काळे ठिपके पडतात. दाताना अत्यंत ठणका लागतो विशेषतः गरोदरपणी. चव कडू, आत खोल घशात ती जाणवते. पाणी पिण्यानंतर ते कडवट आहे असे वाटते. दात येताना दात दुखतात. तोंड येते, लाळ येते विशेषतः गरोदरपणी. **हिरडचा फुगीर– निळधा – दुखतात व त्यातून रक्त येते.** तोंडाला घाण येते.

**घसा** :- आग होते, गुदमरल्यासारखे वाटते. अन्न गिळताना कड लागते, पाणी प्याल्यानंतर घसा कडू होतो.

**जठर** :- फेसाळ ढेकरा. मळमळ, ओकाऱ्या. खाण्यानंतर बऱ्याच वेळाने ओकारी होते व त्यात अपक्व अन्न पडते. गोड पाण्याची ओकारी होते, विशेषतः सकाळी किंवा गरोदरपणी. जठरात बर्फासारखे गार पाणी आहे असे वाटते.

ओकारीत रक्त पडते. जठर हुळहुळे झाल्यासारखे वाटते, खाण्याने बरे वाटते. व्रण, कॅन्सर. कढत अन्नाने बरे वाटते.

**उदर** :– फुगलेले. हगवण–दुर्गंधी – विंगट पाण्यासारखे जुलाब होतात. खाल्ले की शौचास जावे लागते. शौचात दुर्गंधी रक्त पडते ( टायफाईड तापात ). मुलाना कॉलऱ्यासारखे जुलाब होतात विशेषतः दात येताना किंवा उन्हाळ्यात. मूळव्याधीची आग होते. शौचास होताना मूल किंचाळते, धडपडते, जणुकाय फीट येईल की काय असे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्राशयावर गोळा येऊन दाब पडला आहे असे वाटते. **लघवीला लागली की घाईने जावे लागते**; लघवीला वारंवार होते, **निजलेले असताना लघवीला नकळत होते.** लघवी होताना योनीची व योनिद्वाराची आग होते. लघवी दुर्गंधी.

**पुरुषजननेंद्रिये** :– संभोग करताना व नंतर शिश्नाची आग होते, योनीतून करवडणारा स्राव वाहत असल्यामुळे बोंडीची कातडी निळसर काळी होऊन त्यातून रक्त येते व ती कुजते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ गाळ्याळ व **थांबुन थांबुन** भरपूर जातो – निजल्याने जास्त जातो, बसलेले असताना किंवा चालताना थांबतो. योनिद्वार व मांड्या यामध्ये अतिशय कंड येते. **धुपणी भरपूर** जाते – रक्ताच्या पाण्यासारखी; पिवळी करवडणारी – कंड आणणारी. बाळंतपणानंतरचा विटाळ दुर्गंधी– थांबुन थांबुन वाहतो. संभोगानंतर रक्त येते. गर्भाशयाचा मुखाचा व्रण, कॅन्सर. स्तन वाळावयास लागून आत टणक गाठी येतात, व त्या दुखतात.

**हृदय** :– जागी टोचते. विश्रांति घेत असताना सर्व धमन्यातून ठुसठुसते.

**श्वसनेंद्रिये** :– अत्यंत त्रासदायक खोकला येतो–कफ थोडा पडतो–छाती व कंठात हुळहुळेपणा येतो. आवाज घोगरा होऊन कंठात दुखते. छातीत खोल दुखते त्यामुळे श्वासोच्छ्वास घेववत नाही – जडपणा वाटतो. फुफ्फुसे कुजतात –खोकला आला की खूप पुवळलेला दुर्गंधी कफ पडतो. क्षयरोग. हिवाळ्यात वृद्धाना होणारा खोकला–खोकताना छातीच्या मधल्या हाडावर जड ओझे ठेवल्यासारखे वाटते. छातीत विस्तव ठेवल्याप्रमाणे आग होते. मधुन मधुन कफातून रक्त येते.

**पाठ** :– पाठ ते जननेंद्रिये व मांड्यापर्यंत ओढल्यासारख्या वेदना होतात, योनीतून सर्व काही खाली येत आहे असे वाटते, व त्यावेळेस लघवीला व शौच्यास

जावेसे वाटते व अत्यंत अशक्तपणा वाटतो. माकडहाडात आग होते. पाठीची तिकोनि हाडे हुळहुळी.

**झोप** :– अस्वस्थ. लघवी होत आहे अशी स्वप्ने पडतात. जागे झाल्यानंतर पाय लुले पडल्यासारखे वाटतात. सर्वांगात अस्वस्थ वाटून, थकल्यासारखे वाटते. हातपाय दुखतात त्यामुळे झोप येत नाही. काही कारण नसताना रात्रभर तळमळणे.

**ज्वर** :– क्षयी ज्वर. गार घाम येतो.

**त्वचा** :– ओलसर किंवा खपल्या बसलेला इसब. पापण्यावर, चेहेऱ्यावर, सांध्यावर पंजाच्या मागील बाजूस इसब होतो व अतिशय कंड सुटते. व्रण वारंवार बरे होतात व पुन्हा उघडून वहावयास लागतात. संभोगानंतर व्रणातून रक्त येते. पाळीनंतर पित्ताच्या गांधी येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा हो :– *दात येताना*; गरोदरपणी; **विश्रांति; थंडी; खाण्याने**; निजल्याने; उन्हाळ्यात; विटाळसेपणी; संध्याकाळी ६ ते सकाळी ६ पर्यंत. संभोगाने ( क्रिया ). स्पर्श.

**ब वा** :– उष्णतेने; कढत अन्न; हालचाल. दाबल्याने.

**सहाय्यक औषधे** :– सल्फ.

**संबंधी औषधे** :– आर्से; कलि–का; कॅल्क–का; नक्स–व्हा; नाय–ॲसि; बेला; ऱ्हस–टा; लायको; सेपि.

---

## १९५. क्रोकस ( केशर ) Crocus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मन, मज्जातंतु*; डोळे; रुधिराभिसरण व स्त्रीजननेंद्रिये यावर होतो. **लक्षणाची जलद अदलाबदल होते किंवा लक्षणे आलटून पालटून होतात.** मनोवृत्ति एकमेकाविरुद्ध–मानसिक व शारीरिक विकार आळीपाळीने. एखाद्या स्नायूचे स्पंदन–वरची पापणी वगैरे कंपवात. मूर्च्छा येते; गुंगी येते; हिस्टेरिआ. **आत कोणीतरी उड्या मारीत आहे. किंवा जिवंत फिरत आहे असे वाटते**, उदरात, छातीत वगैरे–**रक्तस्राव–काळा–दाट–तारा येणारा**. मुंग्या येतात, कंड सुटते, गुदगुल्या होतात, चुणचुणते.

**मानसिक** :– मनोवृत्ति अस्थिर चंचल–एकमेकाविरुद्ध; **प्रेमळ उल्हासी नंतर खिन्नता**; वेड्यासारखे हसणे व रडणे विशेषतः संगीत ऐकल्यानंतर. हसण्याचे वेड. उड्या मारणे, नाचणे, हसणे, शिट्या वाजविणे. प्रत्येकाचा मुका घ्यावासा वाटतो. गाण्याची लकेर ऐकली की गाणे म्हणावयास लागणे.

**डोके** :– विटाळ थांबण्याच्या वयात सुरू झालेली अर्धशिशी. विटाळ जाण्याऐवजी किंवा पाळीत डोके दुखते, दाबल्याने बरे वाटते.

**डोळे** :– जणुकाय अतिशय रडल्यामुळे डोळे कोरडे होऊन त्यात आग होत आहे असे वाटते. डोळ्यातून गार वारे बाहेर येत आहे असे वाटते. डोळे मिचकावेसे वाटतात किंवा घट्ट मिटून ठेवावेसे वाटतात. वाचताना डोळ्यातून पाणी येते. डोळ्यात पू जमला आहे असे वाटून ते सारखे पुसावेसे वाटतात. वरची पापणी उडते. डोळ्यापुढे ठिपके किंवा विजेच्या ठिणग्या उड्या मारीत आहेत असे वाटते.

**कान** :– कानात आवाज होऊन कमी ऐकू येते, खाली वाकल्याने बरे वाटते.

**नाक** :– नाकातून काळे, तारा येणारे रक्त वाहते; रक्ताचे धागे नाकातून लोंबतात. रक्त जाताना मूर्च्छा येते व कपाळाला गार घाम येतो. तरुण मुलींच्या नाकातून रक्त जाते, वयात येण्याच्या काळात रक्त येते.

**तोंड** :– कढत झाल्यासारखे वाटते.

**घसा** :– गिळताना किंवा न गिळताना पडजीभ लांब झाली आहे असे वाटते.

**उदर** :– हट्टी मलावरोध. तान्ह्या मुलांच्या गुदात मुंग्या आल्यासारखे वाटते किंवा टोचते. उदरात व जठरात काहीतरी जिवंत फिरत आहे असे वाटते. अतिशय तहान लागते, गारपाणी प्यावेसे वाटते. शौच्यात काळे तारा येणारे रक्त जाते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– वैषयिक क्षोभ. **विटाळ काळा दुर्गंधी**– गाठ्याळ, **लांब धागे असलेला** अशा तऱ्हेचा विटाळ सुरू होऊन गर्भपात होण्याचा संभव असतो; जरा हालचाल केली की विटाळ जावयास लागतो. डाव्या स्तनात धक्के बसल्यासारखे वाटून तो दोरा बांधून मागे पाठीकडे ओढला जात आहे असे वाटते. उजव्या स्तनात काहीतरी जिवंत उड्या मारीत आहे असे वाटते. थांबून थांबून जाणारा रक्त प्रदर, विटाळ पौर्णिमेच्या सुमारास जास्त जातो. मिथ्या गरोदरपण.

**श्वसनेंद्रिये** :– कफातून लांब पांढरे धागे पडतात. खोकला निजल्याने जास्त होतो, पोटाच्या खळीत हात ठेवल्याने बरे वाटते. कफ फेसाळ. छाती जड होते, दीर्घश्वास घ्यावासा वाटतो.

**हृदय** :– खालून व हृदयाकडे काहीतरी कढत वर चढत आहे असे वाटते, त्यामुळे श्वासोच्छ्वास घेताना त्रास होतो. जांभई आल्याने बरे वाटते. छातीत डावीकडे टोचते.

**पाठ** :– गार पाणी ओतल्याप्रमाणे पाठीत गारवा वाटतो, एकाएकी कटीच्या सांध्यात व गुडघ्यात कटकट आवाज होतो.

**झोप** :– अतिशय गाढ झोप. झोपेत गाणे म्हणणे.

**त्वचा** :– चुणचुणते; मुंग्या येतात. शेंदरी लाल होते किंवा ठिपके पडतात. गुल्म करटे यांची वाढ कमी करण्याकरता याचा उपयोग होतो. जुने वण उघडतात व पुवळतात.

**ज्वर** :– अंतर्गत उष्णतेच्या लहरी येतात, त्यावेळेस चुणचुणते, मुंग्या येतात. कमरे खालील अंगाला घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– हालचालीने. वयात येण्याच्या काळात. गरोदरपणी. वाचताना. उष्णतेने. निजल्याने. उपाशी राहिल्याने. पौर्णिमा.

**ब वा** :– मोकळी हवा. जांभई आल्याने. सकाळच्या न्याहारी नंतर.

**संबंधी औषधे** :– इग्ने; टरेन्टु; नक्स–व्हा; पल्स; , सल्फ; सिंको.

---

## १२६. क्रोटन टिग्लिअम ( जमालगोटा ) Croton Tiglium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***श्लेष्मल त्वचा***; डोळे; आतडी; मूत्राशय; स्तन; गर्भाशय; त्वचा–***चेहऱ्याची*** व ***वृषणाची*** यावर होतो. **मागे ओढल्यासारखे वाटते**–डोळे स्तनाग्रे वगैरे. हगवण व त्वचेचे रोग आल्टुन पाल्टुन होतात. सर्वांग घट्ट बांधल्यासारखे वाटते, चामड्याच्या पट्ट्याने.

**मानसिक** :– स्वतःवर काहीतरी संकट येईल अशा तऱ्हेची काळजी वाटते. काम करण्याचा कंटाळा.

**डोके** :– टोपीच्या ओझ्याने डोके दुखावयास लागते.

**डोळे** :– मागे ओढल्यासारखे वाटतात. डोळे येतात, लालबुंद होतात, आतून पू येतो. बुबुळावर पुटकळी येऊन, डोळ्याभोवती पुरळ येते.

**कान** :– वाहताना अतिशय कंड येते.

**चेहरा** :– पुवळलेले पुरळ येते.

**जीभ** :– दुखते. अन्ननलिकेत आग होते.

**जठर** :– अतिशय मळमळून दृष्टि नाहिशी होते, घेरी येते, पिण्याने जास्त होते.

**उदर** :– उदरावर दाबल्याने गुदात दुखते किंवा शौचास लागते. **आतड्यात गुडगुड आवाज होतो किंवा पाणी हालत आहे असे वाटते** ***नंतर एकदम जोराने भडभडून पिवळ्या पाण्याचे जुलाब होतात.*** **पेये** ***पिण्यानंतर किंवा खाण्यानंतर जास्त,*** नंतर थकवा येतो. हगवण–काल्न्यासारखी–तान्ह्या मुलांची उन्हाळयात-गुदद्वारात खुंटी बाहेर ओढून काढल्याप्रमाणे दुखते.

**मूत्रेंद्रिये** :– रात्रीची लघवी फेसाळ होते, दिवसा फिकट व खाली पांढरा साख साचतो. लघवी नारिंगी होते किंवा काही वेळाने गढूळ होते, किंवा वर तेलकट थेंब तरंगतात.

**श्वसनेंद्रिये** :– छातीच्या डाव्या बाजूतून पाठीकडे ओढल्यासारख्या वेदना होतात. **भरपूर दीर्घ श्वास घेववत नाही.** उशीवर डोके टेकले की खोकला सुरू होतो–म्हणून उठून बसावे लागते. दमा.

**पुरुषजननेंद्रिये** :– वृषणाचा इसब. वृषणावर व शिश्नावर पाणी असलेले फोड येतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– अंगावर मूल पिताना स्तनापासून पाठीपर्यंत ओढ लागते. स्तनात गाठी होतात, स्तनाग्रापासून खांद्याच्या हाडापर्यंत वेदना होतात स्तनाग्रांना दोरा बांधून ते मागे ओढले जात आहेत असे वाटून चालणे भाग पडते. इंद्रियांना अतिशय कंड सुटते हलुहलु चोळण्याने बरे वाटते. स्तनाग्रे हुळहुळी त्याना स्पर्श सहन होत नाही.

**मान-पाठ** :– मान व खांदे दुखतात.

**त्वचा** :– अतिशय कंड सुटते. ताणल्यासारखी वाटून आग होते–लाल होते खाजविल्याने हुळहुळ होते–हलुहलु चोळण्याने बरे वाटते. पुंजक्या-पुजक्यांनी अंगावर **उगवण येते.** भाजल्यासारखे फोड येतात. ते फुटून त्याच्या खपल्या होतात. **भाजल्यासारखे फोड येऊन ते पुवळतात**–विशेषतः–जननेंद्रिये, टाळू ( डोक्याची ) व कानशिले.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– पाणी पिण्याने; खाण्याने;** धुण्याने; हालचालीने रात्री व सकाळी; **उन्हाळ्यात. स्पर्श. आलेली उगवण मावळू लागल्याने.**
**ब बा :– झोपेनंतर. हलुहलु चोळण्याने.**

संबंधी औषधे :– ऱ्हस–टा.

---

## १२७. क्रोटेलस कॅस्कव्हेला Crotalus Cascavella

**सर्वसाधारण :–** या सापाच्या विषाचे परिणाम क्रोटेलस हारिडस व लॅकेचिस या सापांच्या विषाप्रमाणेच सर्वसाधारणपणे होतात. मरणाचे विचार मनात येतात व मरणाची स्वप्ने पडतात. डोक्याभोवती आत काहीतरी जिवंत फिरत आहे असे वाटते. बोलण्याची क्रिया नष्ट. वर्फ खावासा वाटतो. अन्न पोटात एकदम दगडासारखे जड होऊन पडले आहे असे वाटते. खाण्यानंतर जठर गार झाल्यासारखे वाटते.

---

## १२८. क्रोटेलस हॉरिडस Crotalus Horidus

**सर्वसाधारण :–** या सापाच्या विषाचा परिणाम **रक्त, हृदय, यकृत, घसा,** डोक्याचा मागील भाग; व **उजवी बाजू** यावर होतो. **मरण येईल की काय अशा तऱ्हेने आजारीपण; कंप व अशक्तपणा. रक्तस्राव**–काळा–पातळ हळुहळु पाझरतो गोठत नाही, शरिराच्या सर्व द्वारातून–विशेषतः **घशातून. रक्तमिश्रित** पू किंवा **रक्तासारखा** घाम. **दुर्गंधी. *विकारांचा दुष्टपणा*–**जलद कुजणे. **दोषी ( सेप्टिक ) विकार** टानुसिल–गलगंड–व्रण–गळू वगैरे. काळेपणा किंवा **निळसरपणा.** अंगावर रक्ताचे ठिपके पडतात. सडणे–कुजणे. सर्वांगात आग होते. काळी पुळी. पीतज्वर ( येलो फिव्हर ) कावीळ. प्लेग. शरीराच्या सर्व द्वारातून रक्त येते. स्रावाला कुबट वास येतो. मूर्च्छा येते. आचके येतात. फेफरे येताना सर्वांग कापते, तोंडाला फेस येतो, मोठ्याने किंचाळणे व वात होतो. धास्ती, उन्ह, वीज, दुर्गंधी पाणी किंवा वास ह्यांनी झालेले उपद्रव. रक्ती गळवे.

**मानसिक :–** भित्रेपणा. काहीतरी वाईट गोष्ट घडेल अशी भीती वाटते. विसराळू. सुस्त. लिहिताना चुका होतात. वातात बडबड चालू असते. काही समजेनासे होते. मूर्च्छा येते. आकडे, नावे, जागा आठवत नाही. वाचताना अड-

खळणे. शब्दांची गुंतागुंत करणे, किंवा शब्द पुटपुटणे. वातात पुटपुटणे; दारुड्याचा वात. रडका स्वभाव. कविलवाणे बोलणे. शत्रूनी किंवा भयंकर जनावरानी आपल्याला गराडा घातला आहे असे वाटते. स्वतःच्या कुटुंबातील मंडळी आवडत नाहीत.

**डोके** :– **डोक्याचा मागील भाग रट्टा मारल्याप्रमाणे दुखतो**, कण्यातून वर लाटा आल्यासारख्या वाटतात. डोके दुखत असताना धक्के लागू नयेत म्हणून पायांच्या बोटावर चालावे लागते. कपाळाच्या मध्यभागी अतिशय दुखते. डोके दुखत असताना हृदयाच्या जागी दुखते, डाव्या कुशीवर निजल्याने जास्त, घेरी येताना मूर्च्छा येते, अशक्तपणा वाटतो व अंग कापते.

**डोळे** :– उजेड सहन होत नाही. विशेषतः दिव्याचा. डोळ्यात रक्तस्राव होतो. डोळ्याभोवती कापल्याप्रमाणे वेदना होतात. पिवळे. लाल होऊन पाणी येते. डोळ्याच्या आत झालेला रक्तस्राव.

**नाक** :– रक्त येते, विशेषतः घटसर्पात किंवा इतर दुष्ट ( सेप्टिक ) रोगांत. पिनस, गरमीमुळे किंवा विस्फोटक ज्वरानंतर झालेला.

**चेहरा** :– काळसर–धुंद, फुगीर–पांढरा फटफटित–मृतवत्. जांग झाल्यानंतर वेडावाकडा होतो. ओठ सुजलेले व बधिर.

**तोंड** :– दात खाणे. दातखिळी बसते. तोंडाला कुबट घाण येते. जीभ बाहेर काढताना उजवीकडे वळते. जीभ सुजलेली, बाहेर येऊन लोंबते. जीभ व घशाभोवती बांधल्यासारखे वाटून बोलता येत नाही, जिभेचा कॅन्सर–रक्त येते, लाळेने भरते. लाळ रक्तमिश्रित, फेसाळ.

**घसा** :– कोरडा सुजलेला. कोणताही घट्ट पदार्थ गिळता येत नाही. घट्ट आवळल्यासारखा वाटतो. टाळा ताटल्यासारखा वाटतो.

**जठर** :– पोटात काहीही टरत नाही. भयंकर ओकाऱ्या होतात. पित्ताची ओकारी. रक्ताची ओकारी. दरमहा विटाळशीच्या पाळीनंतर एकसारखी मळमळ व ओकाऱ्या होतात. उजव्या कुशीवर निजले की काळी हिरवट ओकारी होते. कॅन्सर; व्रण; काळी काफीच्या भुकटीप्रमाणे ओकारी होते. उत्तेजक पदार्थ किंवा साखर खावीशी वाटते. जठरावर वस्त्राचा दाब सहन होत नाही.

**उदर** :– फुगलेले, कडत, स्पर्श सहन होत नाही. कपड्याचा दाब सहन होत नाही. यकृतात व डाव्या खांद्यावर दुखते. शौचास काळे-पातळ, दुर्गंधी-काफीच्या भुकटीप्रमाणे होते. आतड्यातील रक्तस्राव. चालताना किंवा उभे

राहिले असताना गुदातून रक्त येते. गुदद्वार व जननेंद्रिये या भागातील गळू. कावीळ.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी काळी रक्ताची, थोडी पिवळी, हिरवट.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ फार दिवस जातो. विटाळ जाताना पोटात गळून गेल्यासारखे वाटते. कष्टार्तव; वेदना मांड्यापर्यंत जातात व हृदयाजवळ दुखावयास लागते. गर्भाशय खाली गळून पडेल की काय असे वाटते. बाळंतज्वर-विटाळ दुर्गंधी. सारखे पाय हलवावेसे वाटतात.

**श्वसनेंद्रिये** :– श्वासोच्छ्वास जड व कष्टाने होतो-काळजी वाटते. कफातून रक्त पडते व त्याला कुबट वास येतो. वृद्धपणी छाती कोंडल्यासारखी वाटते.

**हृदय** :– अशक्त-कापते. सैल झाल्यासारखे वाटते किंवा उलटे पालटे झाले आहे असे वाटते. विटाळसेपणी धडधडते. डाव्या कुशीवर निजल्याने दुखते.

**हातपाय** :– एकदा एक हात व पाय नंतर दुसरा हात व पाय बधिर होतो. उजव्या बाजूचा अर्धांगवात. डावा पंजा व पाय लुळा पडतो. शिवताना पंजा बधिर होतो.

**झोप** :– मेलेल्या माणसांची स्वप्ने पडतात. **भयंकर विक्राळ स्वप्ने पडतात.** जागे झाल्यानंतर गुदमरल्यासारखे वाटते. झोप आल्यासारखी वाटते पण येत नाही.

**ज्वर** :– अतिज्वर. टोपी-सेप्टिक ताप. रक्ताचा घाम येतो. घाम गार.

**त्वचा** :– कावीळ. **रक्ताची गळवे. त्वचा सुजते** ताणल्यासारखी वाटते व रंगी बेरंगी चट्टे पडतात. हुळहुळी पण **दाबल्याने बरे वाटते. जुने वण पुन्हा उघडतात.**

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **उजव्या कुशीवर निजल्याने; झोप लागता लागता;** उष्ण हवा; **वसंतऋतु;** दारू दमटपणा. दरवर्षी. धक्का; जागे झाल्यानंतर

**ब वा** :– हालचाल; उजेड.

**सहाय्यक औषधे** : – कार्बो व्हेजि; लायकोप.

**संबंधी औषधे** :– लॅके; सल्फु–ॲसि.

---

## १२९. क्लिमॅटिस Clematis

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा–डोळ्याची, मूत्रमार्गाची; गांठी–अंड–स्तन–रजःपिंड;* त्वचा डोक्याची; डोक्याचा मागील भाग यावर होतो. स्नायू शिथिल, आचके. सर्वांगात फडफडल्या-

सारखे वाटते. *गांठी सुजून दुखतात, ठणकतात व खूप टणक होतात–अंड* वगैरे. आग; कंड; नांगी मारल्याप्रमाणे वेदना; मुंग्या येणे. अतिशय अशक्तपणा. शरीर वाळते. आंघोळीचा तिरस्कार.

**मानासिक** :– बेपर्वाई. एकटे असण्याची भीती वाटत असली तरी मनपसंत मंडळींनासुद्धा भेटावेसे वाटत नाही. घराची ओढ लागल्यामुळे झालेले विकार.

**डोके** :– काय होत आहे ते समजत नाही. मोकळया हवेत बरे वाटते. डोक्याच्या मागील भागी केसाच्या कडेला पुरळ येते, फोड येतात, त्यातून लस वाहते, कंड सुटते.

**डोळे** :– जीर्ण डोळे आलेले– गारठा किंवा वारे सहन होत नाही–मिटून घ्यावे लागतात. आग होते, चुणचुणतात, डोळे मिटल्याने जास्त. पाणी येते. सूर्यप्रकाशाने उद्भवलेले विकार.

**चेहरा** :– उजवी बाजू दुखत असताना, डोळे, कान, कानशिले दुखतात, तोंडात गार पाणी धरल्याने बरे वाटते.

**तोंड** :– दात ठणकतात–रात्री व तंबाखूने जास्त, गार पाण्याने बरे वाटते.

**जठर** :– खाण्यानंतर हात पाय गळून जातात व सर्व धमन्यातून ठुसठुस सुरू होते. तंबाखु ओढल्यानंतर पायात अशक्तपणा वाटतो व मळमळते. जठरात चमत्कारिक गारवा वाटतो.

**उदर** :– उदर ते छातीपर्यंत दुखते; श्वासोच्छ्वास करताना व लघवी करताना जास्त होते. **जांघेतील गाठी** मोठ्या होतात व त्याने धक्के मारल्यासारख्या वेदना होतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थांबुन थांबुन सुटते–किंवा **थेंब थेंब गळते**. सुरवातीस कुंथून थोडे थेंब पडतात नंतर लघवी व्हावयास लागते. लघवी करताना आग होते. एकाच वेळेस लघवी पुरती करता येत नाही मूत्रमार्ग चाबकाच्या दोरी प्रमाणे टणक होतो व दाबल्याने दुखतो.

**पुरुषजननेंद्रिये** :– वीर्यवाहिनी नलिका सुजते व अंड ते उदरापर्यंत वेदना होतात. अंडाचा शोथ (सूज). अंड टणक होऊन मार लागल्याप्रमाणे दुखते. अंड जड होतात किंवा आत जातात (उजवी बाजू). संभोगाचा तिरस्कार. शिश्नात रेत पडत असताना आग होते. शिस्न ताठ होऊन आत टोचते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– स्तन भरल्यासारखे वाटून जड होतात. त्याना हात लाववत नाही. आतून बाहेर चमका मारतात. स्तन मोठे होऊन टणक होतात.

स्तनाचा व गर्भाशयाचा कॅन्सर. पाळी लवकर येते. स्तनात कळा येतात. लघवी करताना जास्त.

**श्वसनेंद्रिये** :– उंच सखल रस्त्यावरून चालताना किंवा चढाव चढताना श्वास घेववत नाही. भुंकल्याप्रमाणे कोरडा खोकला येतो व छातीत टोचते.

**झोप** :– अतिशय झोप येते. सर्वांगात कंप आल्यासारखा वाटून झोप अस्वस्थ.

**त्वचा** :– खूप कंड सुटून खवले जातात. भाजल्यासारखे पुवळलेले फोड येतात. उगवण चरत जाऊन त्याचे सपाट चरत जाणारे व्रण होतात व वर खपल्या बसतात– विशेषतः डोक्याच्या मागील बाजूस व तंगडीवर. नागीण.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***परम्यामुळे***; ***रात्री***; **अंथरुणाची ऊब; गार पाण्याने धुतल्याने**; अमावास्या पौर्णिमेला. पारा. उजेड. थंड हवा. गार वारे.

**ब वा** :– घाम आल्याने. अमावास्या पौर्णिमेला.

**सहाय्यक औषधे** :– मर्क्यु.

**संबंधी औषधे** :– फास्फ; ऱ्होडो; स्टॅफि.

---

## १३०. क्लोरम ( क्लोरिन वायु ) Chlorum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **श्वसनेंद्रिये** श्लेष्मल त्वचा; त्वचा व गांठी यावर होतो. शरीर जलद वाळावयास लागते. **आवळल्यासारखे वाटते.**

**मानसिक** :– वेडे होऊ अशी भीती वाटते. नावे व व्यक्ती आठवत नाहीत.

**डोळे** :– **बटबटीत** ( पुढे येतात ).

**नाक** :– सर्दी; **करवडणारा स्राव वाहतो.** एकाएकी नाकातून पाणी गळू लागते व डोळ्यातून पाणी येते.

**चेहरा** :– सुजलेला व डोळे बटबटीत.

**तोंड** :– येते. व्रणाना घाण येते. **जीभ कोरडी.**

**श्वसनेंद्रिये** :– ***श्वासोच्छ्वास कष्टाने होतो***; ***श्वास बाहेर टाकता येत नाही.*** घसा आवळल्यासारखा वाटतो. गळ्याच्या खळीत ठणकते–गुदगुल्या होतात किंवा शिटीसारखा आवाज होतो. छातीच्या वरच्या भागात हवा कोंबली जात आहे असे वाटते. एकाएकी ***श्वास कोंडून***, **डोळे पुढे येतात चेहरा निळा होतो, व गार घाम येतो.**

**ज्वर** :– सहजासहजी घाम येतो.

**त्वचा** :– हुळहुळी–स्पर्श सहन होत नाही.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **श्वास बाहेर टाकताना**; मध्यरात्रीनंतर; निजल्याने.

**ब या** :– हालचालीने; मोकळ्या हवेत.

**संबंधी औषधे** :– आयो; आर्से–आयो; मर्क्यु; मेफि.

---

## १३१. क्लोरल हैड्रेट Chloral Hydrate

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **मेंदू**; **हृदय**; स्नायू; यकृत व त्वचा यावर होतो. स्नायूंचा थकवा. भ्रम.

**मानसिक** :– बेपर्वा व झोपाळू किंवा **मेंदूची क्षुब्धता**. वेड. खोलित फेऱ्या घालीत काल्पनिक इसमाशी बोलणे. उतावीळ.

**डोके** :– एका कानशिलापासून दुसऱ्या कानशिलापर्यंत गरम पट्टा आवळल्यासारखा वाटतो.

**डोळे** :– मोठे झाल्यासारखे वाटतात, लाल होतात, पाणी येते. वस्तु पांढऱ्या दिसतात. पापण्या इतक्या जड होतात की त्या उघडता येत नाहीत.

**कान** :– आवाज ऐकू येत आहेत असा भास होतो.

**उदर** :– शौचास पांढरे होते.

**मूत्रेंद्रिये** :– अंथरुणात लघवीला होते.

**श्वसनेंद्रिये** :– पंख्याने वारे घ्यावेसे वाटते. श्वासोच्छ्वास कष्टाने होतो. छातीवर ओझे ठेवल्यासारखे वाटते. पाठीवर झोपले असताना श्वास नाकाने आत जातो पण तोंडातून बाहेर येतो. पाठीवर निजल्याने जास्त.

**हृदय** :– अशक्त, रुंदावते व छाती भरल्यासारखी पण हलकी झाली आहे असे वाटते व पोटात पोकळ झाल्यासारखे वाटते.

**झोप** :– अतिश्रमामुळे झोप येत नाही. मुलाना झोपेत भीती वाटते.

**त्वचा** :– **पित्ताच्या गांधी**, रात्री येतात दिवसा नाहिशा होतात, थंडी वाजली की एकदम येतात, उष्णतेने बरे वाटते; दारु घेतल्याने जास्त होते. त्वचा दगडासारखी गार.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– दारू; रात्री; श्रम; निजल्याने.

**ब वा** :– मोकळी हवा. पंख्याचे वारे घेतल्याने.

**संबंधी औषधे** :– एपि.

---

## १३२. गॉसिपिअम Gossypium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम गर्भाशय; रजःपिंड व मूत्रपिंड यावर होतो. **गर्भाशयाच्या विकृतीमुळे किंवा गरोदरपणी उत्पन्न झालेले परिणाम.**

**तोंड** :– लाळ गळते; मळमळते; ओकावयास होईल असे वाटते, विशेषतः सकाळी; न्याहरीचे अगोदर.

**जठर** :– जागे झाल्यावर मळमळावयास लागते. हालचाल केल्यास किंवा डोके वर केल्याने ओकावयास होते. गरोदरपणच्या वांत्या, पोटात काहीही ठरत नाही. पोटात वात धरतो व त्याा दाबलेले सहन होत नाही.

**स्त्रीजननेंद्रिये** :– थांबून थांबून रजःपिंडात वेदना होतात व त्या वेदना गर्भाशयापर्यंत जातात. विटाळ सुरू होईल असे वाटते पण होत नाही. पाळी उशिरा- विटाळ थोडा व पाण्यासारखा. **गर्भाशयाची निष्क्रियता** त्यामुळे वंध्यात्व. स्तनात गुल्मे होऊन खाकेतील गाठी मोठ्या होतात. गर्भाशयाची गुल्मे.

**मान** :– दुखते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– हालचाल केल्याने.

**संबंधी औषधे** :– अस्टि; सेनेसि.

---

## १३३. गॅम्बोजिआ Gambojia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम जठर, *आंतडी* व यकृत यावर होतो. **आग होणे.** डोळ्यांच्या पापण्यांना कंड सुटते व त्या सारख्या चोळाव्या लागतात. पापण्या चिकटून शिंका येतात. एकसारख्या जोराने शिंका येतात. दातांच्या कडेला गारवा वाटतो. घसा व जिभेची आग होते, चुणचुणते. जीभ व घसा कोरडा. वृद्धपणी पाण्यासारखे जुलाब होतात. आंतड्यात अगोदर **गुडगुड आवाज होतो, चिमटे घेतल्यासारखे वाटते नंतर एकदम पिवळे**

किंवा हिरवे *पातळ एकाच सपाट्यात शौचास होते*–त्यानंतर गुदद्वाराची आग होते पण शौचास झाल्याने फार बरे वाटते. लघवीला कांद्यासारखी घाण येते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** ***शौचानंतर.*** मोकळ्या हवेत चालल्याने.

**संबंधी औषधे :–** क्रोट–टि.

---

## १३४. गिम्नोक्लाडस Gymnocladus

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम मूत्रेंद्रिये; रुधिराभिसरण यावर होतो. फिकटपणा व बधिरपणा. आकलन शक्ती मंद. काही आठवत नाही. विचार व अभ्यास करता येत नाही. डोके बांधल्यासारखे वाटते, भुवयाखाली ते नाकापर्यंत दुखते. डोळे बाहेर येत आहेत असे वाटते व त्यामुळे ते चोळावेसे वाटतात. चेहऱ्यावर माशा चालल्या आहेत असे वाटते (डावी बाजू) भावऱ्याप्रमाणे चेहऱ्यावर सूज येते. दातांना गार वारे सोसत नाही. *जीभ निळसर.* घसा दुखतो–लालसर, काळसर होतो. कढत आंबट ढेकरा येतात. जठरात एका लहानशा जागी आग होते. पित्ताच्या गांधी. उष्णता हवीशी वाटून स्वस्थ राहावेसे वाटते. पुढल्या हातात (डाव्या) हाडे ठेचल्याप्रमाणे भयंकर वेदना होतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** थंडी. चालताना.

**ब वा :–** विश्रांति. कशावर तरी टेकल्याने.

**संबंधी औषधे :–** ओपि.

---

## १३५. गेल्सेमिअम (पिवळी चमेली) Gelsemium

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *मेंदू; मज्जारज्जू; डोक्याचा मागील भाग;* मान; *स्नायू;* डोळे; *दृष्टी; पापण्या* व उजवी बाजू यावर होतो. *ठणका, थकल्यासारखे वाटणे, जडपणा, अशक्तपणा व हुळहुळेपणा* विशेषतः हातापायांचा. आराम खुर्चीवर स्वस्थ पडून रहावेसे वाटते. *कंप*–एखाद्या स्नायूचा– चेहरा–हनुवटी– जीभ वगैरे. **कोणीतरी धरून ठेवावे असे वाटते.** कंपवात विशेषतः गरोदरपणी. लुले **पडणे–** डोळे घसा– गुदद्वार मूत्राशय वगैरे. **भरल्यासारखे वाटणे.**

**रक्ताधिक्य. बहुतेक विकारात घेरी– डोळे किंवा दृष्टीचे उपद्रव; गुंगी किंवा अतिशय लघवीला होणे ही किंवा यापैकी कोणती तरी लक्षणे होतात.** अशक्त, थकलेले, नाजुक, तापट, भित्रे इसम. लहान मुले व तरुण. स्नायूवर ताबा नसल्यामुळे झोकांडे जातात. विड्या सिगारेट तयार करणाऱ्या इसमाचे विकार. मुष्टिमैथुनाचे दुष्परिणाम. एन्फ्लुएंझा. गोवर. घटसर्पानंतर झालेला लुलेपणा. भीती, काळजी वाईट बातम्या, राग नको असलेल्या अनपेक्षित घटना यामुळे उद्भवलेले दुष्परिणाम. ओटीपोटातले व डोक्याचे विकार आलटुन पालटुन होतात.

**मानसिक :–** ***मनाचा गोंधळ***–भ्रमल्याप्रमाणे वाटते. सुस्त किंवा बेपर्वा. विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे सावकाश देणे. ***भीती वाटते***– **खाली पडू अशी,** मरणाची, वेदनाची किंवा कटीण प्रसगांची. पाळण्यातुन काढताना मुले आईला किंवा पाळण्याला धरून ठेवतात. स्वतःच्या दुखण्याविषयी पर्वा वाटत नाही. एकटेच असावे, कोणी येऊन त्रास देऊ नये असे वाटते. एक प्रकारची तंद्री येऊन शरीराची हालचाल करता येत नाही, डोळे मिटलेले असतात–बाहुल्या रुंद होतात परंतु सावधपणा असतो. उंचावरून स्वतःला खाली फेकून घ्यावे अशी इच्छा.

**डोके :–** ***घेरी***, तारवटल्याप्रमाणे–डोक्याच्या मागील भागात जाणवते–डोळयापुढे अंधेरी येते. डोके **जड** होऊन दुखते. **डोक्याचा मागील भाग** ते डोळ्यापर्यंत डोके दुखते. उजेडाने, घट्ट टोपीने डोके हालविल्याने त्रास होतो. झोपेत, किंवा ओकारी झाल्याने व खूप लघवीला झाल्याने बरे वाटते. डोके दुखावयाच्या अगोदर दिसेनासे होते. अर्धशिशी–पहाटे २।३ वाजता दुखावयास सुरवात होऊन दुपारनंतर त्याचा जोर कमी व्हावयास लागतो. टाळूपासून खांद्यापर्यंत दाबल्यासारखे वाटते. डोके उंच उशीवर ठेवावेसे वाटते. डोके मोठे झाल्यासारखे वाटते. मेनिन्जायटिस. सुनबहिरी. डोके कढत; हातपाय गार.

**डोळे :–** भरल्यासारखे होऊन **ठणकतात.** ***पापण्या जड होऊन खाली पडतात***, उघडता येत नाहीत. ***दृष्टी***–वस्तु एकाच्या दोन दिसतात, गरोदरपणी. पाणी तरंगल्यासारखे वाटते-अंधेरी येते-दृष्टीचे विकार होऊन नंतर अर्धशिशी दुखते. डोळ्याभोवती दुखते–तेथील स्नायू आवळल्यासारखे वाटतात किंवा त्यांचे स्पंदन होते. डोळे लाल होऊन ठणका लागतो. एकदम दिसेनासे होते. विशेषतः हिस्टेरिआत. काचबिंदु. डोळ्यातील वेदना डोक्याच्या मागील भागापर्यंत येतात. मच्छरदाणीतून बघितल्या सारखे वाटते.

**कान** :– कांहीं वेळ एकाएकी ऐकू येइनासे होते. गिळताना कानात दुखते. थंडी-मुळे ऐकू येत नाही.

**नाक** :– चोंदते. शिका येतात–पातळ करवडणारे पाणी वाहते. नाकातून कढत पाणी वाहते आहे असे वाटते. उन्हाळ्यात होणारी सर्दी.

**चेहरा** :– लालसर–काळसर–जड झाल्यासारखा वाटतो. धुंद किंवा विकाररहित. हनुवटी कांपते. एकसारखे बोलण्यामुळे वरचा ओठ लुला होतो. खालचा जबडा वासलेला.

**तोंड** :– घाण येते. चव घाणेरडी. जीभ जड–बोलणे जड. घोटाळत घोटाळत बोलणे. जिभेचा लुलेपणा. जीभ कापते, बाहेर काढताना, जिभेवर जाड पिवळ-सर थर. जीभ बधिर.

**घसा** :– गिळता येत नाही, विशेषतः गरम अन्न. गिळताना घसा ते कानापर्यंत दुखते. घशात गोळा आल्यासारखा वाटतो व तो गिळता येत नाही. घटसर्पानंतर आलेला लुलेपणा. विटाळशेपणी घसा दुखतो.

**जठर** :– *तहान लागत नाही*. उचकी संध्याकाळी जास्त लागते. भूक नसते पण अन्न पेये घेता येतात. जठरांत किंवा आतड्यात पोकळ किंवा गळून गेल्या सारखे वाटते. ताठ बसल्याने किंवा गाडीत पेटके येतात.

**उदर** :– भावनामुळे–भीती–धास्ती–वाईट बातम्या ऐकल्यामुळे जुलाब व्हावयास लागतात. शौचास पिवळे व खूप होते. जुलाब वेदनारहित किंवा न कळत होतात. बाळंत झाल्यानंतर गुदात दुखावयास लागते किंवा गुदद्वार बाहेर येते. ओटीपोटातील लक्षणे व डोक्याची लक्षणे आलटुन पालटुन होतात. शौच्यास चहा सारखे हिरवे किंवा पांढऱ्या रंगाचे होते. पित्ताशयात मुरडा येतो. मधुन मधुन आतड्यात वेदना होतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी स्वच्छ व भरपूर होते व त्यावेळेस शहारे येऊन अंग कापते. मूत्राशयाचे स्नायू थोड्या प्रमाणात लुले झाल्यामुळे लघवी तुंबते किंवा थांबून थांबून होते. लघवी करताना कधी कुंथावे लागते तर कधी आपोआप होते. एक सारखी लघवी होते, हिस्टेरिआत.

**पुरुषजननेंद्रिये** :– वैषयिक स्वप्नाशिवाय व शिश्न ताठ झाल्याशिवाय रात्री वारंवार स्वप्नावस्था होते. शौचास होताना वीर्यपात होतो. इंद्रिय शिथिल, गार. वृषणाला कढत घाम येतो. संभोगातिरेकामुळे, स्त्रीला स्पर्श करताच वीर्यपात होतो.

**स्त्रीजननेंद्रिये :– गर्भाशय जड व हुळहुळे,** मुठीत आवळल्यासारखे वाटते. कप्रातंब–कपाळ दुखते–दृष्टि मंद होते-वेदना कुल्यात–मांड्यात व पाठीपर्यंत जातात. विटाळ बंद झाल्यामुळे आकडी येते. बाळंतपणात गर्भाशयाचे मुख ताठते–वेणा सर्वांगात मागे पुढे पसरतात, वेदनांच्या लहरीवर लहरी वर घशापर्यंत येतात व गुदमरल्यासारखे वाटते. वेणा चांगल्या न आल्यामुळे पाणमोटली गर्भाशयाच्या मुखातून लोंबते, प्रत्येक वेळी कळ आली की चेहरा लाल होतो. बाळंतपणानंतर आचके येतात व ते येण्याचे अगोदर गुंगी येते व सर्वांगात निरनिराळ्या ठिकाणी स्नायूचे स्पंदन चालू असते. भीतीमुळे होणारा गर्भपात. धुपणी गडद पिवळ्या रंगाची. विटाळसेपणी घसा बसतो व दुखतो. मैथुनाचे वेळी योनीच्या स्नायूचे आकुंचन झाल्यामुळे संभोगाला त्रास होतो.

**श्वसनेंद्रिये :–** दमल्याप्रमाणे श्वासोच्छ्वास मंद चालतो. छातीच्यामध्ये हाडाच्या मागे गोळा आल्यासारखे वाटते. कोरडा खोकला, छातीत दुखते. आवाज बसतो विटाळसेपणी, स्त्रियांच्या - हिस्टेरिआत किंवा मनावर कोणताही वाईट परिणाम झाल्यास.

**हृदय :–** हालचाल केली नाही तर हृदय थांबेल असे वाटते. धडधड. नाडी मंद व अशक्त. वृद्धपणी नाडी अशक्त व मंद होते. हृदयाच्या जागी हुळहुळेपणा वाटतो. **नाडी मऊ भरलेली.**

**पाठ :–** कण्यात वर खाली असा ठणका लागतो, त्याच वेळेस डोक्याच्या मागील भागात दुखते–चालण्याने बेर वाटते. **खांद्याच्या तिकोनी हाडाखाली दुखते.** मान मार लागल्याप्रमाणे दुखते, डोके सावरता येत नाही.

**हातपाय :–** उजव्या हाताच्या वरच्या (खांद्यापासून कोपरापर्यंतच्या) हाडात ठणका लागतो. हात गार पाण्यात ठेवावेसे वाटतात. पाय जड होतात. **गुडघे अशक्त होतात** खाली उतरताना जास्त जाणवतात. **चालताना झोकांडे जातात,** पाय नीट रीतीने टाकता येत नाहीत. कंप. लिहिताना बोटाना पेटके येतात. आचके-हिस्टेरिआमुळे. जरा श्रम केले तरी हात पाय थकतात. पाऊले गार, गार पाण्यात ठेवल्याप्रमाणे वाटतात. मनगटे व पंजे गार.

**झोप :–** *गुंगी येते*, झोप लागता लागता दचकणे. गाढ झोप लागते. थकल्यामुळे अतिशय विचारामुळे-मनस्तापामुळे किंवा तंबाखुमुळे झोप येत नाही. विद्यार्थ्यांची झोप.

**ज्वर** :– थंडी वाजताना हातपाय गार होतात. थंडी वाजण्याचे अगोदर दृष्टीचे उपद्रव होतात. **थंडी वाजताना अंग ठणकते व सुस्ती येते. थंडी वाजताना अंग कढत होते किंवा थंडी व ताप आलटुन पालटून. तापात गुंगी येते** ***व तहान लागत नाही***, टायफाइड, विस्फोटक ज्वर-गोवर; विषम ज्वर; संतत ज्वर लहान मुलांचा. तापात अंग कापते.

**त्वचा** :– **ओली व पिवळी.** लाल होऊन कंड सुटते व त्यामुळे झोप येत नाही गोवराचे पुरळ. कढत व कोरडी.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***भावना-भीती***–आश्चर्य–**धास्ती–मानसिक धक्का.** वाईट बातम्या. ***वसंत ऋतु. दमट धुक्याची हवा*** **उष्णता.** नियमितवेळी. दात येताना. तंबाखू. गॅसचा उजेड वीज वादळ होण्याच्या अगोदर. आपल्या विकारांचा विचार केल्याने. सकाळी १० वाजता संध्या-काळी ४ ते ८.

**ब वा** :– पुढे वाकल्याने. **भरपूर लघवी झाल्याने. घाम आल्याने. गदगद हालल्याने. दारू घेतल्याने.** मानसिक श्रमाने. सारखी हालचाल केल्याने.

**सहाय्यक औषधे** :– आर्जे–ना; सेपि.

**संबंधी औषधे** :– इग्ने; इपि; कॅक्ट; कोनि; नेट्र–मू ; बॅप्टि; म्युरि–ॲसि; व्हेरा–व्हि.

---

## १३६. ग्रटिओला Gratiola

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम–मन, जननेंद्रिये, **जठर व आतडी** यावर होतो. **गारपणा.** शरीर लटके पडत आहे की काय अशा तऱ्हेच्या वेदना. स्वतःच्या प्रतिष्ठेला धक्का बसल्यामुळे उद्भवलेले मानसिक विकार. काफीच्या अतिसेवनाने उत्पन्न झालेल्या वेदना.

**मानसिक** :– इच्छाशक्ति दुर्बल. काहीतरी होत आहे असे वाटून किंवा अकारण दुःखी. चिडखोर. जगण्याचा कंटाळा. चिकाटीचा अभाव. स्त्रियांना कामोन्माद, हिस्टेरिआ.

**डोके** :– डोक्याकडे रक्ताधिक्य होऊन दिसेनासे होते. मेंदू लहान होऊन त्याजबरोबर डोके पण लहान होत आहे असे वाटते. डोके दुखत असताना कपाळाला आठ्या पडतात.

**जठर** :– खाताना व खाण्यानंतर घेरी येते. जेवणानंतर पोट रिकामे आहे असे वाटते. जठर गार झाल्यासारखे वाटते किंवा **आत काही सुटे जड ओझे ठेवल्याप्रमाणे वाटते.** पावाशिवाय काहीही खावेसे वाटत नाही.

**उद्र** :– **भरपूर–भडभडून–फेसाळ–पिवळट हिरवट– थकवा आणणारे शौचास होते पण त्यानंतर बरे वाटते.** आत गार झाल्यासारखे वाटते. शौच्यानंतर गुदद्वार हुळहुळे होते किंवा आग होते. उन्हाळ्यात अतिशय पाणी प्याल्यामुळे झालेली हगवण.

**पुरुषजननेंद्रिये** :– रात्री स्वप्नावस्था होऊन नंतर शिश्न ताठते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– संभोगेच्छा तीव्र. पाळी लवकर येते, विटाळ खूप जातो व बरेच दिवस राहतो. हट्टी धुपणी. कामोन्माद, मुष्टिमैथुन करण्याची इच्छा.

**हृद्य** :– शौच्यानंतर धडधडते व छाती दाटल्यासारखी वाटते.

**पाठ** :– गुदद्वाराच्या हाडात दुखते.

**हातपाय** :– गृध्रसीवात ( सायाटिका ), हातपाय लुले पडल्यासारखे वाटतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– खाताना; **फार पाणी प्याल्याने**; उन्हाळा; हालचालीने; काफी; रात्रीच्या जेवणानंतर.

---

## १३७. ग्रफाइट Graphite ( शिसपेन्सिलीतील शिसे )

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***पोषण***; **रुधिराभिसरण**; ***त्वचा***, **कानाच्या मागील बाजूची**; शरीराच्या द्वाराभोवती व **कातडीवर कातडी एकमेकावर बुमडली जाते** अशा जागा; नखे; श्लेष्मल त्वचा; गाठी व डोळे यावर होतो. ***जाडपणा; गाठयाळपणा किंवा टणकपणा***; त्वचा; गाठी; पापण्याच्या कडा; नखे–व्रण; घट्टे; शौच; खपल्या वगैरे. ***करवडणे किंवा भेगा पडणे***– डोळे–नाक-तोंडाचे कोपरे, बोटाची टोके, स्तनाग्रे–गुदद्वार वगैरे. विकार झालेला भाग **वाळतो. स्राव–थोडे–दुर्गंधी** व **करवडणारे.** रक्तस्राव पाण्यासारखा. **आग होणे.** बधिरपणा किंवा निर्जीवपणा. ज्या बाजूवर निजले नसेल त्या बाजूकडे वेदना जातात. **लठ्ठ–शिथिल–मलावरोधाची संवय असलेले व थंडी सहन न होणारे इसम.** उद्धट व त्रासदायक मुले, रागे भरले तर हसतात. **वारंवार होणारे धावरे.** जुने व्रण, यावर कॅन्सर होण्याची प्रवृत्ति. बाह्योपचाराने त्वचेचे विकार बरे केल्याने किंवा स्राव

बंद झाल्यामुळे सुरू झालेल्या जीर्ण व्याधी. अयोग्य पोषण झाल्याने लठ्ठ असलेले इसम वाळावयास लागतात. मोहनिद्रा. सर्वांगाला कापरे भरते, व अस्वस्थपणा वाटतो व त्यामुळे कण्हणे. चरबीमय गुल्माची वाढ. रक्तातील श्वेतपेशींची वाढ. ठिकठिकाणी पाणी साचण्याची प्रवृत्ती नाळगुद-जलोदर वगैरे. लहान किंवा तान्ह्या मुलाची वृषणवृद्धि. फेफरे; हिस्टेरिआ रोगी सावध असतो पण बोलता हलता येत नाही. त्वचेचे विकार व पचनेंद्रियाचे विकार आलटुन पालटून होतात. **थंडी सहन होत नाही,** त्याने हाडे दुखतात सर्दी होते व पचन बिघडते. शोक, भीती, अति ओझे उचलण्याने झालेले दुष्परिणाम. मधुन मधुन मूर्च्छा येते. लुले पडल्यासारखे वाटणे किंवा पडणे.

**मानसिक :– खिन्नता;** भीती वाटते; मरणाशिवाय दुसरे विचार मनात येत नाहीत. काहीतरी काल्पनिक अपघात होईल किंवा वाईट गोष्टी घडतील असे वाटून अस्वस्थपणा येतो. एके ठिकाणी स्वस्थ बसवत नाही. गाणे ऐकल्याने रडू येते, काही कारण नसताना रडू येते. क्षुल्लक गोष्टीबद्दल चीड व धुसफुस. मानसिक श्रम करण्याची भीती वाटते. **अनिश्चितपणा.** काम करण्याची भीती वाटते. कण्हावेसे वाटते. विस्मरण, लिहिण्यात वाचण्यात चुका करणे. पूर्वीच्या जुन्या गोष्टी आठवतात अलिकडच्या आठवत नाही.

**डोके :–** मेंदू बधिर झाल्यासारखा वाटतो. टाळूची आग होते. डोक्याचा मागील भाग जड होतो. सकाळी जागे झाल्यानंतर एका बाजूस डोके दुखावयास लागून ओकावयास होईल असे वाटते. कपाळावर कोळिष्टके चिकटली आहेत असे वाटते. केस चटईप्रमाणे एकमेकात गुंततात किंवा गळून पडतात ( टाळूवरचे किंवा कानशिलावरचे ). खवडे, इसब, आगपेण–यातून चिकट लस वाहते. टकलाप्रमाणे चट्टे पडतात. पाळीच्या वेळेस मळमळून डोके दुखते.

**डोळे :– सूर्यप्रकाश मुळीच सहन होत नाही.** पापण्यांच्या कडा आत वळल्यामुळे पडकेसांचा त्रास होतो. पापण्या व कडा लाल होऊन सुजतात. पापण्याचा इसब. पापण्यात भेगा पडतात. पापण्याच्या कडावर पापुद्रे जमतात. पापण्यावर बारिक टणक गुल्मे येतात. डोळ्याची जीर्णगळ. डोळ्यातून कढत पाणी येते.

**कान :– कानाच्या मागे ओलसर उगवण येते.** कान आतून कोरडे होतात. बहिरेपणा–गोंगाटात बरे ऐकू येते, किंवा गाडीतून जाताना बरे ऐकू येते. कानाच्या मागे काहीतरी मोठा पदार्थ आहे असे वाटते. कानात निरनिराळे आवाज होतात. कानातून पापुद्रे जातात. खारल्यासारखा दुर्गंधी स्राव येतो.

**नाक** :– कोरडे होते. सर्दी होऊन नाक चोंदते. विटाळशी होण्याचे अगोदर नाकातून रक्त येते. घ्राणेंद्रिय तीक्ष्ण, फुलांचा वास सहन होत नाही. जीर्ण सर्दी. हिवाळ्यात सर्दी होते. नाकात खपल्या बसतात किंवा भेगा पडतात. डोळे उघडल्यावर शिंका येतात.

**चेहरा** :– विटाळशी होण्याच्या अगोदर चेहऱ्यावर पुटकुळया येतात. इसब. धावरे. दाढीचे केस गळून पडतात. चेहरा फिकट–पांढरा. ओठाना भेगा पडून ते दुखतात. ओठ फिकट. ओठाच्या कोपऱ्यात भेगा पडतात. विटाळशेपणी ओठाना मुंग्या येतात. खालच्या ओठावर टणक पुटकुळया येतात व दुखतात.

**तोंड** :– गार वारे लागल्याने दातातून कळा येतात. हिरड्या सुजतात. दातापासून सरकतात. चव घाणेरडी, कुजलेल्या अंड्यासारखी किंवा आंबट. **जिभेवर दाट पांढरे ठिपके पडतात.** श्वासोच्छ्वासाला लघवीसारखा वास येतो किंवा आंबट वास योतो. जिभेखाली व्रण पडून ती दुखते. सकाळी व रात्री जागे झाल्यावर तोंड कोरडे पडते. रात्री तोंडातून लाळ गळते. दात आंबतात. हिरड्या सुजून त्यातून रक्त येते.

**घसा** :– गिळताना **गुदमरल्यासारखे वाटते.** जीर्ण घसेदुखी. घसा व्रण पडून सुजतो. घशात गोळा आहे असे वाटते, आवंढा गिळताना जास्त. गांठयाळ गलगंड, गिळताना त्रास होतो. टानसिल मोठया होतात. घसा सारखा धरल्या किंवा आवळल्यासारखा वाटतो.

**जठर** :– भूक लागते. मांस, मासे, शिजविलेले अन्न, खारटपदार्थ व गोड पदार्थ नकोसे वाटतात. गोड पदार्थाने मळमळते. कढत पेये मानवत नाहीत परंतु पोटातील वेदना कढत पेयाने विशेषतः दुधाने किंवा काही खाल्ल्याने काही वेळ थांबतात. पोटात आग होऊन भूक लागते व खाण्याने आग कमी होते. त्वचेचे व पचनेंद्रियांचे विकार आलटून पालटून होतात. सकाळी खूप तहान लागते. आंबट ढेकरा येतात. दुर्गंधी ढेकरा येतात. जठरातील वेदना शेकल्याने, कढत पदार्थांनी, खाण्याने व निजल्याने कमी होतात. अतिशय भूक लागते किंवा अन्नद्वेष. पाळीच्या वेळी सकाळी मळमळते. ओकारी आंबट, किंवा अन्न पडते. जठरात नियमित दिवशी, काही दिवसाच्या अंतराने दुखून खाल्ल्यानंतर ओकून पडते.

**उदर** :– वात धरल्याप्रमाणे उदर फुगते. वस्त्रांचा दाब सहन होत नाही. **आतड्याचे चलनवलन मंद, मलावरोध–शौचास मोठया गाठी होतात, चिकट**

**व कष्टाने होते.** गाठी श्लेष्म्याने एकमेकाला चिकटलेल्या असतात किंवा **वर श्लेष्म्याचा थर असतो.** हगवण-शौचास पिंगट पातळ व दुर्गंधी होते. खाल्ल्यानंतर शौचास जावे लागते. बद्धकोष्ठ-शौचास लागतच नाही. गेले म्हणजे फार वेळ लागतो व अतिशय कुंथावे लागते. रेचक घेतल्याशिवाय शौचास होत नाही. दिवसचेदिवस शौचास नुसतेच श्लेष्माचे गोळे पडतात. थोडेसे अपचन झाले की हगवण लागते. शौचास बोटासारखे बारीक होते. गुदद्वारात भेगा पडून त्यातून रक्त येते. गुदद्वारात कंड सुटते. मूळव्याध-मोडात आग होऊन टोचते, बसल्याने किंवा पाय लांब करून चालल्याने जास्त होते. फितीसारखे जंत पडतात. शौचास आंबट घाण येते. गुदद्वार सहजासहजी बाहेर येते. उदरात वेदना होत असताना लघवी होण्याचे प्रमाण कमी होते; कळा रात्री येतात.

**मूत्रेंद्रिये :–** लघवीची धार मंद व बारीक. लघवीला आंबट वास येतो. लघवी होताना गुदास्थीत व माकडहाडात दुखते.

**पुरुषजननेंद्रिये :–** शिश्न वेदना होऊन ताठते. संभोगानंतर थकवा येतो. संभोगाचा तिटकारा. नपुंसकत्व-अति कामोपभोगामुळे किंवा मुष्टिमैथुनामुळे आलेले संभोगेच्छा तीव्र पण शारीरिक दुर्बलता. वीर्यपात अकाली होतो. घर्षणजन्य सुखाचा अभाव. शिश्न व अंडकोष पाणी साचून फुगते. लहान किंवा तान्ह्या मुलांची वृषणवृद्धि.

**स्त्रीजननेंद्रिये :–** संभोगाचा तिटकारा. रजःपिंड मोठे व टणक होतात, पाळीच्या नंतर जास्त. रजःपिंडाना व गर्भाशयाला स्पर्श सहन होत नाही. रजःपिंडाचे गुल्म. गर्भाशय वाकडा होतो, योनीतून तो बाहेर येईल असे वाटते. ओटिपोट जड होते व मांड्यातून भोसकल्याप्रमाणे चमका येतात. फार उंच हात केल्याने गर्भाशयात खाली ओढ लागते. गर्भाशयाचा कॅन्सर-कोबीच्या फुलासारखी वाढ-आग होऊन कुजट रक्तस्राव होतो. पाळ्या अनियमित-फार उशीरा. विटाळ थोडा व फिकट किंवा लहानलहान गाठी पडतात. न्हाण उशिरा येते. विटाळ सुरू होण्याच्या अगोदर योनीखाली व गुदद्वारात कंड सुटते. गरोदरपणी किंवा विटाळसेपणी मळमळते-विशेषतः सकाळी. विटाळसेपणी कोरडा खोकला येतो-खूप घाम येतो- सर्दी होते-घसा बसतो-पाय फुगतात किंवा डोके दुखते. कष्टार्तव, विटाळातून पापुद्रे जातात. धुपणी-पांढरट-पिवळसर-पाण्यासारखी-चिकट-दुर्गंधी करवडणारी, स्राव भडभडून जातो, थकवा वाटतो पाळीच्या अगोदर व नंतर जास्त. विटाळाऐवजी

घुपणी जाते. योनी कोरडी–कढत किंवा गार. योनिद्वाराचे आवती भवती इसबासारखे पुरूळ येते. स्तनाच्या बोंडीला भेगा पडतात. स्तन टणक होतात. स्तनाचा कॅन्सर.

**श्वसनेंद्रिये** :– कंठाला हात लाववत नाही. संध्याकाळी आवाज बसतो. झोप लागता लागताच गुदमरल्यासारखे वाटते. मध्यरात्रीनंतर गुदमरल्यासारखे वाटते, अंथरुणातून एकदम उठून कशाला तरी धरावेसे वाटते, खाण्याने बरे वाटते. छातीत आवळल्यासारखे वाटते. कोरडा खोकला-खोकताना त्रास होतो, चेहऱ्यावर घाम येतो, डोळ्यातून पाणी येते. श्वास आत घेताना खोकला जास्त येतो. डांग्या खोकला. क्षय. छातीवर पुरळ येऊन कंड सुटते. छातीत टोचते. गाण्यास सुरवात केल्याबरोबर घसा बसतो आवाज फुटतो. आवाजावर ताबा राहत नाही पण बोलणे चालू ठेवले तर सुधारतो.

**हृदय** :– हृदयात आवळल्यासारखे वाटते–विजेसारखे धक्के बसतात, ते मानेपर्यंत जाणवतात. हालचालीने किंवा श्रमाने हृदय धडधडावयास लागते व सर्व शरीरात नाडी उडते आहे असे वाटते. हृदयाचे जागेत गार झाल्यासारखे वाटते. जीव गुदमरल्यासारखा वाटून जाग येते व अंथरुणावरून उठून बसावेसे वाटते. नाडी दिवसा मंद व सकाळी जलद चालते. रुधिराभिसरण अनियमित. डोक्याकडे रक्त चढते.

**मान व पाठ** :– अंथरुणाला धक्का लागला तरी पाठीचे मणके दुखावयास लागतात. मणके मोडले आहेत अशा तऱ्हेने पाठीच्या खालच्या भागात दुखते. मानेच्या खळीतून खांद्यापर्यंत दुखते, वर पाहिल्याने आणि मान खाली वाकविल्याने जास्त. माकडहाडापासून खाली पाउलापर्यंत बधिरपणा. माकडहाडात वेदना होऊन मुंग्या येतात.

**हातपाय** :– चांगले लांब करवत नाहीत. अशक्तपणा, लुले झाल्यासारखे वाटतात. दाब पडल्याने बधिर होतात. हाताची बोटे व हात बधिर होऊन गार होतात. बोटाची नखे–जाड–ठिसूळ व काळी होऊन गळून पडतात. तळ हातावर शिंगाप्रमाणे जाड घट्टे पडतात. चालताना मांड्या हुळहुळया होतात. संध्याकाळी पावले गार पडून त्यांना **दुर्गंधी करवडणारा घाम येतो**. तळवे व टाचात आग होते. नखे मांसात रुततात. घामामुळे पायाची बोटे पांढरी पडतात.

**त्वचा** :– ज्या ठिकाणी त्वचेवर त्वचा दुमडली जाते अशा जागी हुळहुळी होते. त्वग्रोग झालेला भाग ओलसर असतो–त्यात भेगा पडतात व त्यातून रक्त

येते—विशेषतः डोके व कानाच्या मागे. **त्वचा खरखरीत व** ***कोरडी.*** घाम मुळीच येत नाही किंवा थोडा येतो. वण नाहीसे करावयास हे औषध उपयोगी पडते. जुने व्रण—कडा व तळ टणक व आत आग होऊन टोचते. त्वग्रोगात ***चिकट लस*** वाहते. इसब—गुदद्वाराभोवती—तळहाताचा वगैरे. **वारंवार होणारे धावरे** किंवा पसरत जाणारे धावरे. त्वग्रोग उष्णतेने जास्त होतात. **जखमा लवकर बऱ्या होत नाहीत.** ***त्वग्रोगात खपल्या बसून त्या ओलसर असतात.*** जुन्या वणात आग होते.

**ज्वर** :– वारंवार पाळीने येणारा हिवताप. **संध्याकाळी थंडी वाजते.** तापाच्या तिन्ही अवस्थेत अंगावर पांघरूण घ्यावेसे वाटते. काही खाल्ले तरी थंडी वाजते—पाणी प्याल्याने किंवा उघड्या हवेत बरे वाटते. तापात हातापायाची आग होते व काळजी वाटून अस्वस्थता येते. थोडे श्रम केले तरी घाम येतो किंवा मुळीच येत नाही. घाम—दुर्गंधी—गार व त्याने पिवळे डाग पडतात.

**झोप** :– मध्यरात्रीपर्यंत येत नाही. दिवसा झोप येते. सकाळी उत्साह वाटत नाही. काही तरी भयंकर स्वप्ने पडतात. अतिशय थकल्यासारखे वाटून गुंगी येते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***थंडीने***; वाऱ्याची झुळुक; **उजेडाने**; विटाळशी होण्याचे अगोदर, **विटाळसेपणी** व नंतर. **बाह्योपचाराने त्वग्रोग बरे केल्याने**; गुटका गिळताना; कढत पेये; तेल, तूपे; अंथरुणाची ऊब; खाजविण्याने; **रात्री**; पावले भिजल्याने.

**ब वा** :– मोकळ्या हवेत. ढेकर आल्याने; खाण्याने; चालण्यानंतर; स्पर्शाने. कढत दूध.

**सहाय्यक औषधे** :– आर्से; कास्टि; फेरम; लायको; **सल्फ**; हेपार.

**संबंधी औषधे** :– कलि–बाय; कॅल्क–फ्ल्युओ; नेट्र–स; पल्स; सिलि.

---

## १३८. ग्रिंडेलिआ Grindelia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **श्वसनेंद्रियावर** होतो. स्राव भरपूर जातात.

**श्वसनेंद्रिये** :– **झोप लागता लागता जीव गुदमरून दम लागतो.** निजून श्वासोच्छ्वास करता येत नाही. बसून रहावे लागते. दमा. घशात घुरघुर वाजते. कफ चिकट पण पडल्यानंतर बरे वाटते. कफ भरपूर पडतो.

**उद्र** :– पांथरीच्या जागी कापल्यासारख्या वेदना होतात, त्या कुल्यापर्यंत जातात पांथरी मोठी होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– झोप लागताना.

**संबंधी औषधे** :– लॅके.

---

## १३९. ग्लोनोइन Glonoin.

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मेंदू*; *रुधिराभिसरण*; डोके ( कपाळ ); *हृदय*; श्वासोच्छ्वास व कानाच्या मागील हाडाचा उंचवटा यावर होतो. शरीरात अतिशय खळबळ होते, *जोराजोराने ठुसठुसते*; **अनियमितपणे रक्ताधिक्य होते.** सर्व शरीरात ठुसठुसते. ठुसठुसणाऱ्या वेदना. **शरीरांचे भाग जणु काय मोठे झाले आहेत किंवा ताणले आहेत असे वाटते.** किंवा लहान झाले आहेत असे वाटते. मेंदूत रक्ताधिक्य झाल्यामुळे आकडी येते. शरीराचे भाग फुगून मोठे होऊन फुटल्यासारखे वाटतात, डोके-डोळे जीभ वगैरे. दुखापत झाल्यानंतर दीर्घ काळाने त्या ठिकाणी वेदना सुरू होतात. आगचोट लागते. सूर्याघात. गॅसच्या किंवा विजेच्या उजेडाने झालेले दुष्परिणाम. मूर्च्छा येते, एकाएकी बेशुद्धी येते. लाटा लहरी आल्यासारखे वाटते. भीती, धास्ती, विस्तवाची उष्णता याने झालेले दुष्परिणाम. बाळंतपणात होणारी आकडी, आचके. जुने व्रण पुन्हा फुटतात. सावलीत किंवा छत्री घेऊन चालणे. सुनबहिरी. आचके येत असताना बोटे ताठ होऊन एकमेकापासून दूर होतात.

**मानसिक** :– मनाचा गोंधळ, भ्रमल्याप्रमाणे. कोठे आहोत हे सांगता येत नाही. नित्य परिचयाचे रस्ते ओळखता येत नाहीत. बेभान होऊन पळून जाण्याची प्रवृत्ति किंवा खिडकीखाली उडी टाकावीशी वाटते, वेदनामुळे. विषप्रयोग केला आहे अशी भीती वाटते. ज्ञानेंद्रियाचे ज्ञान नाहीसे झाले आहे असे वाटून बेशुद्धी येते. एकाएकी धास्ती वाटून रस्त्यात जाण्याचा धीर होत नाही.

**डोके** :– ***लाटावर लाटा येऊन डोक्यात भयंकर फुटल्याप्रमाणे किंवा फुटल्याप्रमाणे वेदना होतात***. डोक्यावर उभे आहोत असे वाटते. डोके उघडते व मिटते आहे असे वाटते, उन्हात किंवा दमट हवेत जास्त होते, ओकारी झाल्याने बरे वाटते. डोके जड झाले असले तरी उशीवर टेकवत नाही. मेंदूत खोल आवाज किंवा स्फोट होत आहेत असे वाटते किंवा धक्के

बसल्यासारखे वाटते. मेंदू हुळहुळा झाल्यासारखा वाटतो. कवटी लहान होऊन त्यातून मेंदू फुटून बाहेर येत आहे असे वाटते. डोक्यात रक्त जात असल्यामुळे मानेतील धमन्या उडतात. गालाच्या उंचवट्यात दुखावयास लागून त्याचा शेवट डोके दुखण्यात होतो. टाळू बधिर, कढत व हुळहुळी होते. मेनिंजायटिस. पाळीच्या ऐवजी डोके दुखते. डोके घट्ट धरून ठेवणे. खूप झोप झाली म्हणजे डोके दुखण्याचे थांबते.

**डोळे** :– **डोळ्याचा खालचा अर्धा भाग लाल होतो** किंवा पापण्या लाल होतात. डोळे कोरडे; वटारल्याप्रमाणे बटबटीत दिसतात किंवा खोल जातात. डोळ्यापुढे अंधेरी येते. वाचताना अक्षरे लहान दिसतात. डोळ्यापुढे ठिणग्या पडल्याप्रमाणे वाटते. पापण्या डोळ्याला चिकटतात डोळे वर किंवा बाहेर ( कानशिलाकडे ) फिरतात. वस्तूचा अर्धा भाग अंधारात आहे व अर्धाभाग उजेडात आहे असे दिसते.

**कान** :– कानाच्या मागे एकदम कळा येतात. कानशिलातील शिरा फुगतात. हृदयाचा ठोका कानात ऐकू येतो.

**चेहरा** :– निळसर. कढत, लाली येते. नाकाच्या बुंध्याशी दुखते. हनुवटी लांब झाली आहे असे वाटते. खालचा ओठ सुजला व बधिर झाला आहे असे वाटते. सूर्याघात झाल्याने दातखिळी बसते.

**तोंड** :– जीभ जड. सकाळी तोंडात दाट लाळ येते. दात लांब झाल्यासारखे वाटतात, ठुसठुस दुखतात. गोंधळल्यामुळे बोलणे अवघड जाते.

**घसा** :– सुजल्या फुगल्यासारखा वाटतो. कानाखाली फुगतो. कॉलर मोकळी करावीशी वाटते.

**उदर** :– पोटाच्या खळीत भयंकर गळून गेल्यासारखे वाटते व ठुसठुसते. मळमळ, ओकारी

**मूत्रेंद्रिये** :– लघवीतून अल्बुमिन जाते. रात्री लघवीला जास्त वेळा जावे लागते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ थांबतो व त्याऐवजी डोके दुखावयास लागते. विटाळ थांबण्याच्या वयात शरीरात तप्त लहरी येतात.

**श्वसनेंद्रिये** :– श्वासोच्छ्वास जड. छातीवर ओझे ठेवल्यासारखे वाटते, दीर्घ श्वास घेणे, उसासे टाकणे.

**हृदय** :– हृदय भरल्यासारखे वाटते. फडफडल्यासारखे वाटते. **जोराची धडधड** व त्याच वेळेस दम लागतो. जिना चढवत नाही. श्रमामुळे हृदयाकडे रक्त

जाऊन मूर्च्छा येते. सर्वांगात बोटाच्या टोंकात सुद्धा ठुसठुसते. हृदयातील वेदना सर्व बाजूला पसरतात–हातापर्यंत जातात, वेदना मागे वाकल्याने किंवा दारूमुळे जास्त होतात. नाडी भरलेली व टणक. शिरा उडतात. हृदयाभोवती मांजर गुरगुरल्या सारखा, आवाज किंवा उकळते आहे असे वाटते.

**मान** :– भरल्यासारखी वाटून ताठते. पाठ वरून खाली कढत झाल्यासारखी वाटते. पाठीच्या तिकोनी हाडामध्ये आग होते.

**हातपाय** :– हात कापतात. गुडघ्यांत शक्ती वाटत नाही. डोके दुखत असताना मांड्या व गुडघे शक्तिहीन वाटून चालताना एकमेकावर आपटतात. गृध्रसीवात. मांडी उदरावर दुमडली म्हणजे बरे वाटते.

**झोप** :– अर्धांगवात झाला आहे अशी भीती वाटून जाग येते.

**ज्वर** :– **डोक्याची टाळू** व पाठीचे मणके कढत होतात. एखाद्या भागात किंवा लहानशा जागी आग होते. अंग तापते व कढत घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***उष्णता–सूर्याची–उन्हाळा***; दिव्याचा उजेड. ***डोक्याला मार लागल्याने; अंग हलल्याने किंवा हलविल्याने; धक्का लागल्याने***; डोके मागे वाकविल्याने; दुखापत; दारू; **विटाळ बंद झाल्यामुळे**; फळे; टोपीचा भार; केस कापल्याने.

**क मी** :– **मोकळ्या हवेत; डोके उंचावर ठेविल्याने;** गार पदार्थाने; गार पाणी लावल्याने, आंघोळीने वगैरे.

**सहाय्यक औषधे** :– बेला.

**संबंधी औषधे** :– अमिल–नाय.

---

## १४०. ग्वाईआकम Guaicum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **गाठी; *टानसिल***; रजःपिंड; त्वचा; सांधे; स्नायुबंध व छाती यावर होतो. सांधे **ताठतात,** सुजतात व दुखतात. **संधिवात.** ***स्राव दुर्गंधी व भरपूर जातात***–कफ, घाम वगैरे. **गळवे किंवा पू होण्याची प्रवृत्ति** टानशिलमध्ये किंवा जीर्ण खोकल्यात वगैरे. फुप्फुसात; विकार झालेल्या भागात **आग होते.** कुरतडल्याप्रमाणे वेदना होतात विशेषतः छातीत, पापण्या-मांड्या-पाठ वगैरे. **स्नायुबंध आखडून** सांधे

वेडेवाकडे होतात. हाताचे तळवे आखडतात. खांद्याच्या त्रिकोनी हाडामध्ये आखडते. स्नायुबंध आखूड लहान होतात. टणक आवाळू शरीरावर वाढतात. गरमीचे दुष्परिणाम. क्षय. सर्वांगात अस्वस्थता वाटून जांभया द्याव्याशा वाटतात व हातपाय ताणून आळोखे पिळोखे द्यावेसे वाटतात व तसे केल्याने बरे वाटते. हाडावर हाड वाढते. सर्वांगाला घाण येते. टॉनसिल सुजून संधिवात होतो. कपडे दमट आहेत असे वाटते. हाडे स्पंजासारखी कुजतात, आंत पू होतो.

**मानसिक** :– विसराळूपणा, नावे लक्षांत राहत नाहीत. हट्टी; चिडखोर, सुस्त. मन जागेवर नसते विशेषतः सकाळी. दुसऱ्यांवर टीका करून त्यांचा तिरस्कार करण्याची प्रवृत्ती.

**डोके** :– डोके मानेपर्यंत दुखते. मेंदू सैल झाल्यासारखा वाटतो. वेदना चालण्याने किंवा दाबल्याने कमी होतात, बसल्याने किंवा उभे राहिल्याने जास्त होतात.

**डोळे** :– पापण्यांच्या आत डोळे मावत नाहीत असे वाटते. डोळे पुढे येतात. बाहुल्या रुंद होतात. डोळ्याभोवती टणक पुटकुळ्या येतात.

**चेहरा** :– संध्याकाळी ६ ते पहाटे ४ पर्यंत वेदना होतात (डावीबाजू). म्हाताऱ्या सारखा.

**तोंड** :– चव बदलते. जीभ पांढरी किंवा पिंगट.

**घसा** :– घशात आग होते, कोरडा पडतो–स्पर्श सहन होत नाही. टानशिल सुजतात. टानशिल वारंवार सुजण्याची प्रवृत्ति–नंतर सांधे धरतात. गिळताना कानापर्यंत टोचते, पाण्याच्या घोटाशिवाय गिळता येत नाही.

**जठर** :– अन्न खावेसे वाटत नाही. दुधाचा तिटकारा. फळे खाण्याची इच्छा होते. ( सफरचंद ), त्याने बरे वाटते. पोटाच्या खळीत आवळल्यासारखे वाटून बेचैनपणा येतो, खोकला येतो व दम लागतो. आग होते. ओकारीतून खूप पातळ श्लेष्मा पडतो, त्यानंतर थकवा येतो.

**उदर** :– पुष्कळ वात धरतो. सकाळी पाण्यासारखे जुलाब होतात. तान्ह्या मुलांचे काल्न्यासारखे जुलाब.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी झाल्यानंतरसुद्धा लघवीला लागली आहे असे वाटते. लघवी झाल्यानंतर टोचते.

**पुरुषजननेंद्रिये** :– स्वप्न न पडता वीर्यपात होतो. मूत्रमार्गातून स्राव जातो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ बंद होतो. कष्टार्तव–विटाळात पांढरे पापुद्रे जातात. स्तनात शहारे येतात, गार मुंग्या येतात. संधिवातात पाळया अनियमित होऊन रजःपिंडात सूज येते व लघवीच्या तक्रारी उद्भवतात.

**श्वसनेंद्रिये** :– कोरडा खोकला–चेहरा तापतो व आग होऊन ताप येतो. फुप्फुसात ( डाव्या ) वरच्या टोकाला टोचते दीर्घश्वास घेतल्याने जास्त. क्षय. खूप दुर्गंधी पुवळलेला कफ पडतो व तो पडल्याने बरे वाटते. वारंवार होणारी प्लुरिसी. गुदमरल्यासारखे वाटते. खोकल्यानंतर तोंडाला घाण येते.

**मानपाठ** :– मान हुळहुळी होते–ठणकते. मानेत व पाठीत टोचते. मान ताठते एक बाजू व खांदे दुखतात. तिकोनी हाडांच्यामध्ये आखडल्याप्रमाणे वेदना होतात.

**हातपाय** :– मांड्याचे स्नायू ताठून लहान होतात. बसल्याने जास्त. कटिशूळ. गृध्रसी वात. सांधे वेडवाकडे होतात. **वेदना उत्तरोत्तर वाढत जातात.** कुल्ल्यात सुयावर बसल्याप्रमाणे टोचते. घोट्यापासून वर दुखते.

**झोप** :– अस्वस्थ. पडतो आहोत असे वाटून जाग येते. जांभया व आळोखे पिळोखे द्यावेसे वाटणे.

**ज्वर** – संध्याकाळी शहारे येऊन ताप भरतो. अंगाची आग होते, हात कढत होतात. भरपूर घाम येतो किंवा एखाद्या भागालाच घाम येतो–चेहरा वगैरे. रात्रीचा घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **उष्णतेने, स्पर्शाने; हालचालीने** श्रमाने युवावस्थेत शरीराची एकदम वाढ होताना; पारा; दाबल्याने, दमट थंड हवा; संध्याकाळी ६ ते पहाटे ४ पर्यंत.

**ब वा** :– गार पाणी लावल्याने, सफरचंद खाल्ल्याने; जांभया दिल्याने व अंग ताणल्याने.

**संबंधी औषधे** :– कलि-ब्राय; कॅल्क-का; क्रियासो; फायटो; फास्फ–ॲसि; फेरम; मर्क्यु.

---

## १४१. चिओनॅन्थस Chionanthus

**सर्वसाधारण** :– या औषधाने पित्तामुळे किंवा विटाळसेपणी वारंवार उद्भवणारी डोकेदुखी थांबते. डोके दुखणे खालीवाकल्याने, धक्का लागल्याने, हालचालीने जास्त होते यकृताचे उपद्रव, कावीळ. विटाळ बंद झाल्यामुळे उद्भवलेली

काविळ. डोळे पिवळे, हुळहुळे नाकाच्या शेंड्याशी हालल्यासारखे वाटते किंवा नाकाचा उंचवटा पिळल्यासारखा वाटतो. आंबट कडु कढत पित्ताच्या, बुळबुळीत जोराने ओकाऱ्या होतात व त्याने दांत आंबतात. मुरडा होऊन ओकावयास होते, कपाळावर व पंजाच्या मागील बाजूस **गार घाम येतो.** पित्ताचे खडे. मधुमेह. जीभ वर ओढल्यासारखी वाटते जीभ रुंद व पिवळी. तोंडाला कोरड पडते. पाणी पिऊन कमी होत नाही. खूप लाळ गळते. बेंबीभोवती आत दुखते. वारंवार होणारी किंवा उन्हाळ्यात होणारी कावीळ आतड्याभोवती दोरीची सरक गाठ मारली आहे असे वाटते व ती गाठ एकदम आवळली जाऊन हळुहळु सुटत आहे असे वाटते. यकृत मोठे होऊन कावीळ होते. शौचास पांढरे किंवा पिवळे, डामरासारखे, मऊ चिकट असे होते. भूक लागत नाही. यकृताचे जागी हात लावलेला सहन होत नाही. लघवीला भरपूर होते. वारंवार जावे लागते. लघवी काळी, नारिंगी रंगाची दाट. लघवीतून पित्त व साखर जाते. त्वचा पिवळी व ओलसर.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– धक्का लागल्याने. हालचाल. थंडी.

**ब वा** :– पोटावर निजल्याने.

---

## १४२. चिमाफायलिआ Chimaphilia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **मूत्राशय; मूत्रपिंड,** यकृत; मूत्रग्रंथी व स्तन ( उजवे ) यावर होतो. लठ्ठ तरुण व लघवीचा उपद्रव होत असणाऱ्या स्त्रिया. मोठाले स्तन असलेल्या स्त्रिया. कपाळाच्या मधला उंचवटा दुखतो. उजेडाभोवती वर्तुळे दिसतात. डोळ्यात ( डाव्या ) भोसकल्याप्रमाणे वेदना होऊन डोळ्यातून पाणी येते. जबडे ताटल्यासारखे वाटतात; रात्री तोंड मिटता येत नाही, त्यामुळे तोंड उघडे ठेवून निजावे लागते. यकृताच्या किंवा मूत्रपिंडाच्या विकारामुळे आलेली जलयुक्त सूज. **लघवी चिकट, दाट, गढुळलेली, दुर्गंधी, पू व श्लेष्मायुक्त.** कुंथल्याशिवाय लघवी सुटत नाही. मूत्रग्रंथीच्या सुजेमुळे लघवी तुंबते. मधुमेह. उभे राहून पाय लांब करून वाकल्याशिवाय लघवीला होत नाही. **चेंडूवर बसल्यासारखे** वाटते. मोठे स्तन असलेल्या स्त्रियांचा स्तनात गाठ येऊन दुखते व दुधाचा स्राव येतो. मूत्रपिंडाच्या जागी फडफडल्यासारखे वाटते. मूत्रेंद्रियाचा शोथ. लघवीतून वाळू जाते. स्तन वाळतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– दमट थंड हवा; गार जागेवर किंवा दगडावर बसल्याने; उभे राहिल्याने; लघवीच्या सुरवातीस.

**ब वा** :– *चालताना.*

**सहाय्यक औषधे** :– कलि–मू.

**संबंधी औषधे** :– कोक–कॅ; बर्बे; साबाल.

---

## १४३. जट्रोफा Jatropha

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **जठर व आतडी** यावर होतो. बर्फासारखा गारपणा विशेषतः पायांचा.

**उदर** :– सहजासहजी ओकावयास होते, ओकारीत अंड्याच्या बलकाप्रमाणे श्लेष्मा पडतो. उचकीनंतर ओकावयास होते. **आतड्यात मोठ्याने पाणी बुडबुडून बाहेर येत आहे असा आवाज होऊन पिचकारी मारल्याप्रमाणे जुलाब** होतात. तांदुळाच्या धुवणीप्रमाणे पांढरे जुलाब. जुलाब होताना अंग गार पडते, मळमळते, ओकावयास होते. पोटऱ्यात इतके जोराने पेटके येतात की पोटऱ्या सपाट होतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– पांघरूण घेतल्याने; सकाळी; उन्हाळ्यात.

**ब वा** :– गार पाण्यात हात बुचकळल्याने.

**संबंधी औषधे** :– क्रोट–टि.

---

## १४४. जॅबोरंडि Jaborandi

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***गाठी***; डोळे; व मज्जातंतू यावर होतो. प्रथम कोरडेपणा येऊन नंतर अतिशय स्राव वाहू लागतात विशेषतः लाळ वाहू लागते व श्वसनेंद्रियातून पातळ कफ जाऊ लागतो. **फार घाम येऊन नंतर सर्दी होण्याची प्रवृत्ति.** उष्ण लहरी अंगात येतात. मळमळते; लाळ सुटते व खूप घाम येतो.

**मानसिक** :– अतिशय घाबरल्यासारखे वाटून कंप सुटतो. आपल्या कुटुंबातील मंडळीच्या लहानशा कुऱ्हाडीने आपण खून करू अशी टाम कल्पना.

**डोके** :– वाचताना मळमळते, घेरी येते व डोके दुखते.

**डोळे** :– दृष्टीचे उपद्रव. कोणत्याही कारणाने डोळ्यावर पडलेला ताण. बाहुल्या बारीक होतात. डोळ्यापुढे पांढरे टिपके दिसतात. डोळे पुढे येतात. दृष्टी मंद होते. डोळ्याच्या श्रमाने घेरी येते व मळमळते. पापण्या लवलवतात. डोळे चुणचुणतात. शस्त्रक्रियेनंतर आलेला तिरळेपणा.

**कान** :– बहिरेपणा, गोंगाटात बरे ऐकू येते. गालगुंड, नंतर अंड मोठे होतात. कानात आवाज होतात. आत पाणी साचते.

**तोंड** :– **तोंडाला लाळ येते**. लाळ दाट अंड्याच्या बलकाप्रमाणे. लाळेच्या गाठीत ताणल्यासारखे वाटते.

**जठर** :– फिरत्या वस्तूकडे पाहिल्याने मळमळते. गरोदरपणाची हट्टी ओकारी.

**हृदय** :– हृदयात व छातीत भयंकर खळबळ झाल्यासारखी वाटते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ सुरू होताना अंग गार पडते, डोक्यात व ओटीपोटात ठुसठुसावयास लागते व पाठ दुखते.

**श्वसनेंद्रिये** :– खोकला. दमा. फेसाळलेला कफ पडतो. पाण्यासारखा पातळ भरपूर कफ पडतो.

**त्वचा** :– लाल, **घाम येतो** व त्यावेळेस हृदयाची धडधड होते, सर्वांगात ठुसठुसते व अंग कापते. घाबरेपणामुळे घाम येतो. अंगाच्या एकाच बाजूस घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– विटाळ सुरू होण्याच्या अगोदर; थंडी; थकवा.

**संबंधी औषधे** :– अगारि; अॅन्टी–टा; इपि.

---

## १४५. जालप Jalap

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम जठर व आतडी यावर होतो. **मूल दिवसभर चांगले असते पण रात्री अस्वस्थ होऊन किंचाळते.** किंवा कोणत्याही विकारात मूल अस्वस्थ व त्रासदायक होते, रात्री व दिवसा. पोटात मुरडा होतो. **शौचास पाण्यासारखे**, गढूळ, आंबट होते किंवा रक्त पडते. तान्ह्यामुलांची हगवण, सर्वांग गार होते. चेहेरा निळा होतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– रात्री; ढेकरा येताना.

**संबंधी औषधे** :– कोलो.

---

## १४६. झॅन्थोझायलम Xanthoxylum.

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम मज्जातंतू; श्वासोच्छ्वास. स्त्रीजननेंद्रिये व डावी बाजू यावर होतो. लुलेपणा विशेषतः अर्धांगवात. वेदना उकरल्या प्रमाणे किंवा एकदम सुरू होऊन एकदम थांबतात. वेदना दूर दूर पसरतात. डावी बाजू बधिर. नाजुक प्रकृतीच्या किडकिडीत स्त्रिया.

**मानसिक** :– घाबरटपणा.

**डोके** :– डोक्याचे तुकडे तुकडे होतील असे वाटते. डोक्याचे दोन भाग झाले आहेत असे वाटते.

**घसा** :– पोकळ झाला आहे असे वाटते. तोंडात व घशात तिखट चव.

**जठर** :– अति खाण्याने किंवा अति पेयाने झालेले अजीर्ण.

**स्त्रीजननेंद्रिये** :– **कष्टार्तव**–भयंकर **कष्टदायक** उकरल्याप्रमाणे वेदना होतात कोणत्याही अवस्थेत बरे वाटत नाही, वेदना मांड्यात पसरतात–सर्व शरीरभर पसरून हृदयापर्यंत जातात. रजःपिंडात ( डाव्या ) वेदना होतात. विटाळ दाट व जवळ जवळ काळा. पाळीच्या ऐवजी धुपणी जाते. विटाळशी होण्याचे अगोदर मांड्यांचा पुढील भाग हुळहुळा होतो. वायगोळा. पाळी वेळेच्या बरीच अगोदर येते व विटाळ खूप जातो.

**श्वसनेंद्रिये** :– रात्रंदिवस कोरडा खोकला येतो. एकसारखा दीर्घ श्वास घ्यावासा वाटतो छातीत दाटते.

**हातपाय** :– मज्जारज्जूच्या विकारामुळे आलेला पंगुपणा (डावीबाजू). डावीकडील अर्धांगवात. डावी बाजू बधिर. गृध्रसीवात उन्हाळ्यात त्रास होतो. हातापायात विजेचे धक्के मारल्याप्रमाणे वेदना होतात.

**झोप** :– उडत आहेत अशी स्वप्ने पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– झोपेत. दमट हवा.

**ब वा** :– ओकारी झाल्याने.

**संबंधी औषधे** :– आर्से; लॅके.

---

## १४७. झिंकम (जस्त) Zincum Metallicum.

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मेंदू*; *मज्जातंतू*; **डोक्याचा मागील भाग; कणा; नाकाचा बुंधा;** रक्त व डोळ्याचे आतील कोपरे यावर होतो.

**अशक्तपणा, थकवा व मांद्य**– शारीरिक मानसिक. **अशक्तपणा** उत्तरोत्तर वाढत जातो, खाण्यानंतर जास्त होतो व **अस्वस्थपणा** येतो. निरनिराळ्या ठिकाणी एकमेकाला विरोधी असे परिणाम होतात-एखादा भाग बधिर होतो तर दुसऱ्याला स्पर्श सहन होत नाही. एखादा भाग गार तर दुसरा कढत. शरीराची झीज जितक्या झपाट्याने होते तितक्या लवकर ती भरून येत नाही. **मुंग्या येतात**. वेदना लहान जागी होऊन, त्वचा व स्नायू यांच्यामध्ये वेदना होत आहेत असे वाटते. वेदना शरीरात आडव्या पसरतात. **कंप. अंगाला धक्के बसतात. आचके**, रात्री जास्त होतात. कंपवात–भीतीमुळे उत्पन्न झालेला किंवा त्वग्रोग बाह्योपचाराने बरा केल्यानंतर झालेला. पंडुरोग ( रक्तक्षय ) व त्यामुळे अतिशय थकवा येतो. रक्तातील **रक्तगोल कमी** होऊन त्यांचा नाश होतो. शरीरातील स्राव योग्य प्रमाणात न गेल्यामुळे उत्पन्न झालेले उपद्रव किंवा त्वचेचे विकार बाह्योपचाराने बरे केल्यामुळे उद्भवलेले विकार. विस्फोटक ज्वरात अंगावरची उगवण चांगली उगवत नाही. **अस्वस्थपणा**–पाय एकसारखे हलविण्याची प्रवृत्ति व तसे केल्याने बरे वाटते किंवा ते आपोआप हालतात. लुलेपणा वरून खाली येतो. हाडात मोडल्याप्रमाणे वेदना होतात. स्राव रक्तमिश्रित. रात्रीचे जागरण, शोक, अतिशय अभ्यास याचे दुष्परिणाम. शस्त्रक्रियेनंतर किंवा पाठीच्या कण्याला झालेल्या दुखापतीमुळे उद्भवलेले उपद्रव. आपोआप हालचाल होते, तोंडाची, दातांची, पंज्याची वगैरे.

**मानसिक** :– चिडखोर, काही सहन होत नाही; आवाज सहन होत नाही. स्वतः बोलावेसे वाटत नाही व इतरांचे बोलणे पण ऐकावेसे वाटत नाही. सुस्ती; बुद्धिमांद्य; स्मरणशक्ती मंद. राग आला तर रडू येते. उगीचच्या उगीच दचकणे किंवा मन क्षुब्ध होणे. **विसराळू**. प्रश्न विचारल्यास त्याच प्रश्नाचा पुनरुच्चार करून नंतर उत्तर देणे. मेंदूचा थकवा. झोपेत, वेदनामुळे किंवा हलविले तर **किंचाळणे**. आपण काहीतरी अपराध केला आहे व त्यामुळे स्वतःला अटक होईल अशी भीती वाटते. घाबरल्याप्रमाणे टवकारून पाहणे. विशेषतः जागे झाल्यानंतर.

**डोके** :– भयंकर घेरी येऊन गुंगी येते. कमी जास्त प्रमाणात एकसारखे डोके दुखते; **टाळू व नाकाच्या बुंध्याशी दाबल्यासारखी वाटते**. डोके दुखताना डोळे दुखून दृष्टी मंद होते–उष्णतेने जास्त होते. जोराने दाबल्याने बरे वाटते. कानशिले जड होऊन दुखतात–चावताना जास्त त्रास होतो. कपाळ गार व

डोक्याचा मागील भाग कढत. डोक्याचा मागील भाग पाठीपर्यंत ओढल्यासारखा वाटतो, त्यावर मार लागला आहे असे वाटून पाय मोडल्यासारखे वाटतात. झोप लागताना डोक्यात स्फोट झाल्याप्रमाणे आवाज होतात. डोके इकडून तिकडे फिरवून दात खाणे. टाळूवरचे केस दुखतात व गळतात. केस उभे राहतात. मेनिन्जायटिस. डोक्याचा मागील भाग कढत, कपाळ गार. शाळेत जाणाऱ्या मुलांची डोकेदुखी, अभ्यासाचा अतिशय ताण पडल्यामुळे आलेली. तान्ह्या मुलांच्या डोक्यात पाणी साचते.

**डोळे** :– एकमेकाकडे ओढल्यासारखे वाटतात. तिरळेपणा. जेवताना-खाताना डोळ्यातून पाणी येते. डोळ्याचे आतील कोपराना कंड सुटते व ते हुळहुळे होऊन लाल होतात. डोळे इकडे तिकडे आपोआप हालतात. पापण्या जाड होऊन आत किंवा बाहेर वळतात. शस्त्रक्रियेनंतर चकचकीत वस्तु दिसतात.

**कान** :– वारंवार आत टोचते, विशेषतः मुलांच्या. दुर्गंधि पू येतो.

**नाक** :– सुजलेले. बुंध्याशी दाबल्यासारखे वाटते.

**चेहरा** :– फिकट, निळसर, केविलवाणा. फिकट व लाल आलटुन पालटुन.

**तोंड** :– ओठ चिकट, रक्तासारखी चव. तोंड कडू. दात खाणे. हिरड्यातून रक्त येते. समुद्रस्नान केल्यानंतर तोंडात फोड येतात.

**घसा** :– गिळताना घशाचे स्नायू दुखतात.

**जठर** :– खाखा सुटते विशेषतः सकाळी ११ वाजता. पेये पोटात गेली की लगेच ओकून पडतात. गोड पदार्थ खाल्ल्याने छातीत जळजळते. भराभरा खाण्याची प्रवृत्ती. पोटाच्या खळीतून घशापर्यंत किडा वळवळत आहे असे वाटते व त्यामुळे खोकला येतो. घशापर्यंत गोळा येतो. मूत्रपिंड आपल्या जागेपासून खाली आल्यामुळे उद्भवलेले उपद्रव. तान्ह्या मुलांचा मलावरोध.

**उदर** :– यकृताच्या भागात किंवा बेंबीजवळ गोळा आल्यासारखे वाटते. यकृत मोठे होते, टणक होते व दुखते. वात धरून उदरात दुखते व ते खपाटी जाते. खाण्यानंतर मुरडा होतो. ओटीपोटात वात धरतो. शौचास होताना गुदद्वारात खाजते. मूळव्याधीचे मोड खाली येतात. शेकल्याने बरे वाटते, चालताना त्रास होतो. कॉलऱ्यासारखे तान्ह्या मुलांचे जुलाब. एकाएकी हगवण थांबल्यास मेंदूचे उपद्रव उद्भवतात. मूळव्याधीच्या मोडात व्रण पडतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला जोराने लागते पण नेहमीच्या स्वाभाविक अवस्थेत लघवीला होत नाही. फार मागे वाकून बसल्याने किंवा मांडी घालून बसल्यास लघवी सुटते. लघवीनंतर रक्त येते. मूत्रपिंडाजवळ दाबून कापल्यासारख्या वेदना होतात. हिस्टेरिआत लघवी तुंबते. मूत्रपिंड जागेवरून निखळतात. पाऊलांची हालचाल केल्याशिवाय लघवीला होत नाही.

**पुरुषजननेंद्रिये** :– वीर्यपात ( स्वप्नावस्था ) होतो त्यामुळे उदासीनता येते. अंड सुजून वर येतात ( उचलले जातात ) अंडात वेदना होतात, चालताना जास्त. सहजासहजी वैषयिक इच्छा बळावते. वीर्यपात त्वरित किंवा अकाली होतो किंवा होताना त्रास होतो. खोकताना इंद्रिय धरणे. काहीही कारणामुळे धातू जातो. इंद्रियावरचे केस गळतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– संभोगेच्छा उत्तेजित होते. मुष्टिमैथुन करावेसे वाटते, पाळीच्या वेळी. विटाळसेपणी किंवा बाळंतपणानंतर कामोन्माद होतो. गाळ्याळ भरपूर विटाळ जातो. विटाळ रात्री जास्त जातो. रजःपिंडात ( डाव्या ) वेदना होतात व त्यामुळे स्वस्थ राहवत नाही. स्त्रियांच्या सर्व तक्रारी विटाळ चालू असताना बऱ्या असतात. स्त्रियांच्या सर्व तक्रारीत अस्वस्थपणा, उदासीनता, अंग गार पडणे, पाठीच्या कण्याला स्पर्श सहन न होणे व पावलाची हालचाल ही लक्षणे मुख्यत्वे आढळतात. स्तन दुखतात, स्तनाग्रे हुळहुळी. विटाळ जात असताना योनीद्वाराला कंड सुटते. गरोदरपणी शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात.

**श्वसनेंद्रिये** :– वारंवार दमा होतो, वात धरल्याने जास्त त्रास होतो, कफ पडल्याने बरे वाटते. खोकताना जननेंद्रिये धरण्याची प्रवृत्ति विशेषतः मुलात. विटाळशी होण्याचे अगोदर व विटाळसेपणी कोरडा खोकला येतो. छातीत आवळल्यासारखे वाटते. गोड खाल्याने खोकला जास्त होतो.

**हृदय** :– एखादा ठोका जोराने फुटल्याप्रमाणे पडतो. हृदयावर टोपी घातल्यासारखी वाटते. हृदयाचे ठोके जोराने पडतात.

**मानपाठ** :– लिहिताना किंवा मानसिक श्रमाने मान शिणल्यासारखी वाटते किंवा लुळी पडल्यासारखी होते नंतर गुंगी येते. **कण्यात ठणका लागतो व आग होते.** बसल्याने, बसत असताना किंवा अंथरुणात वळताना, खाली वाकताना जास्त त्रास होतो. **कण्याला दाब सहन होत नाही.** तिकोनी हाडांच्यामध्ये कापल्यासारखे वाटते, ढेकर आल्याने बरे वाटते. पाठीच्या मध्यभागी कण्यात ठणका लागतो. उभे राहिले तर कंबर अशक्त झाल्यासारखी वाटते.

**हातपाय** :– हाता-पायांच्या स्नायूंना कंप येतो, लुळे पडल्यासारखे वाटतात, अशक्त होतात. कण्याला आघात झाल्यामुळे आचके येतात. ***पावले एकसारखी हालतात त्याना स्वस्थ ठेवताच येत नाही.*** पाया-वरच्या शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात. पावलाना व पायाना मुंग्या येतात. चोळण्याने किंवा दाबल्याने बरे वाटते. अंग तापल्याने हात पाय दुखावयास लागतात. हात कापतात. आडव्या वेदना होतात. गारठ्यामुळे पायात पेटके येतात. बोटांची टोके ठणकतात. पायांची बोटे सुजल्यासारखी वाटतात; हुळहुळी होतात. तळपायाना स्पर्श सहन होत नाही. पावलांची हाडे मोडल्यासारखी वाटतात. पावलाना घाम येतो व बोटे करवडतात. चालताना झोकांडे जातात विशेषतः अंधारात किंवा डोळे मिटून चालताना. पाय ताठ करून चालावे लागते. चालताना सर्व तळपाय जमिनीवर टेकावा लागतो. अडखळत चालणे.

**झोप** :– जागे न होता रात्री झोपेत किंचाळणे. झोपेतसुद्धा पावले हलत राहतात. झोपेनंतर हुशारी वाटत नाही. झोपेत दचकणे, किंवा अंगात धक्के बसतात. भावनांचा कोंडमारा झाल्यामुळे झोपेत चालणे.

**त्वचा** :– इसब पंजाचा. मांड्याना कंड सुटते. गुडघ्याच्या मागील पोकळीत खाज येते. शिरा फुगून वेड्या-वाकड्या होतात–पायांच्या व जननेंद्रियाच्या. त्वचेवर किडे चालताहेत असे वाटून झोप येत नाही.

**ज्वर** :– ताप आल्याप्रमाणे पाटीला वारंवार शहारे येतात. हातपाय गार होतात. रात्री खूप घाम येतो. पावलाना भरपूर घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– शारीरिक व मानसिक *थकवा*; **स्राव किंवा त्वग्रोग बंद झाल्यामुळे; आवाज; स्पर्श**; दारू; अंग तापल्याने; गोड पदार्थ; दूध; खाण्यानंतर.

**ब वा** :– हालचालीने; जोराने दाबल्याने; गरम मोकळी हवा; ***मोकळे-पणाने स्राव बाहेर पडल्याने***; विटाळ वगैरे. चोळण्याने; खाजविण्याने; खाताना.

**सहाय्यक औषधे** :– **पल्स**; सल्फ; सेपि.

**संबंधी औषधे** :– इग्ने; कलि-फा; पिक्रि–ॲसि; लॅके; हेपार.

---

## १४८. झिंक आयोडाईड Zinc Iodide

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **हृदय** व मज्जातंतु यावर होतो. दचकणे, स्नायूना धक्के बसणे. **डाव्या कुशीवर निजल्याने**–घेरी येते, हृदयाची धडधड होते, हवेत तरंगल्यासारखे वाटते वगैरे. लाटा आल्याप्रमाणे किंवा टोचल्याप्रमाणे वेदना होतात.

**मानसिक** :– वाचलेले लक्षात ठेवणे कठीण जाते.

**नाक** :– रात्री चोंदते. दाट पिवळ्या खपल्या शिंकरताना पडतात. नाकपुड्या कढत, कोरड्या.

**घसा** :– गलगंड–आतील भागी दाब पडतो.

**जठर** :– आतड्यात व जठरात गारवा वाटून घाम येण्याची प्रवृत्ती.

**श्वसनेंद्रिये** :– घशात गुदगुल्या होऊन खोकला येतो. व खोकताना जास्त गुदगुल्या होतात. खालच्या ( उजव्या ) बरगड्याच्या कडेला लाटा आल्या-प्रमाणे वेदना होतात.

**हृदय** :– हृदयाचे स्नायू थकतात. डाव्या कुशीवर निजल्याने धडधडते.

**पाय** :– तरंगल्यासारखे वाटतात, डाव्या कुशीवर निजल्याने जास्त. पोटऱ्यात व घोट्यात पेटके येतात. जमिनीवर पावले दाबावीशी वाटतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **डाव्या कुशीवर निजल्याने**; उष्णता.

**संबंधी औषधे** :– स्टिक्टा.

---

## १४९. झिंक आर्सेनाईट Zinc Arsenite

**सर्वसाधारण** :– डोक्याच्या मागील भागात दुखते. दृष्टी निळसर. **मूत्राशयात** आग होते. उजवा हात बधिर होतो, नंतर डावा होतो–लिहिल्याने बरे वाटते. फार चालून दमल्यानंतर तळपाय दुखावयास लागतात–दाबल्याने बरे वाटते. **कंबर दुखते–श्रमाने**–बसल्याने धक्का लागल्याने किंवा उभे राहिल्याने जास्त.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** :– सकाळी १० वा. दुपारी ३ वा. हलके श्रम.

---

# १५०. झिंक क्रोमेट Zinc Chromate

**सर्वसाधारण** :- या औषधाचा परिणाम कान; नाक; घसा; व डावी बाजू यावर होतो. कुरतडल्या–उकरल्याप्रमाणे वेदना. वेदना इकडे तिकडे फिरतात व त्यावेळेस अंगाला धक्के मारल्याप्रमाणे वाटते. एकदम चमका मारतात त्यामुळे हालचालीत अडथळा येतो.

**मानसिक** :- काम करण्याचा कंटाळा. काम करण्याची मनाची तयारीच होत नाही.

**डोके** :- कपाळाच्या मध्यभागी आत दाबल्यासारखे वाटते. कानशिले ठुसठुसतात. कानाच्या मागे ठुसठुसते.

**डोळे** :- दृष्टी पुढे लवलवते.

**नाक** :- आत दुर्गंधी येते. नाकातून शिंकरल्यावर बऱ्याच प्रमाणात रक्त, पू किंवा खपल्या पडतात.

**तोंड** :- धातुसारखी चव.

**जठर** :- काहीतरी अनिश्चित स्वरूपाचे पदार्थ खावेसे वाटतात, पण कोणते ते कळत नाही. खाण्याच्या विचारांचा सुद्धा तिटकारा वाटतो. उदरावर स्वतःचे हात ठेवलेले सहन होत नाहीत.

**स्त्रीजननेंद्रिये** :- योनी कोरडी पडून शरीरात काही बिघाड होईल अशी भीती वाटते, विशेषतः सकाळी १० ते १२ वा.

**श्वसनेंद्रिये** :- गळ्याच्या खळीत गुदगुल्या होऊन खोकला येतो. कफ–गोड, खोकून तो सुटतो पण परत गिळावा लागतो किंवा वारंवार चिकट कफ थुंकावा लागतो. कंठाच्या डाव्या बाजूस चमका मारतात व त्या टानसिल- मधून कानापर्यंत जातात.

**हृदय** :- हृदयाच्या टोकाशी कापल्याप्रमाणे वाटते विशेषतः रात्री.

**पाठ** :- डाव्या तिकोनी हाडाखाली व वर कुरतडल्या–उकरल्याप्रमाणे वेदना होतात.

**पाय** :- पावले हुळहुळी. रात्री बोटात पेटके येतात किंवा उकरल्या–कुरतडल्या- प्रमाणे बोटे दुखतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :- हालचाल; पाठीवर निजल्याने; डोके धुतल्याने.

**संबंधी औषधे** :- पल्स.

---

## १५१. झिंक फास्फेट Zinc Phosphate

**मानसिक** :– थकवा, खिन्नता, लुळेपणा, ब्रोमाईड औषधांचा दुरुपयोग. फेफरे. वैषयिक क्षोभामुळे. झोप येत नाही. विसरभोळा, आळशी. सर्वांगात मुंग्या येतात. काहीतरी होईल अशी भीति वाटते विशेषतः दुपारी किंवा रात्री. घाबरटपणामुळे घेरी येते, निजल्याने बरे वाटते.

---

## १५२. झिंक व्हलेरिआनेट Zinc Valerianate

**सर्वसाधारण** :– काहीही सहन होत नाही; घाबरटपणामुळे झोप येत नाही. एकसारख्या जांभया येतात, उचकी लागते. चिडखोरणा, डाव्या कानात टिकटिक आवाज होतात. आंबट चव विशेषतः सकाळी. ओटीपोटात वात धरल्यामुळे पेटके येतात. आमातिसार. खाण्याचा प्रबल केला तर गुद-मरल्यासारखे वाटते. कष्टार्तव–वेदना पायापर्यंत पसरतात. रजःपिंडात विटाळसेपणी व नंतर वेदना होतात. पाठीत खालून वर ठणका लागतो. मानसिक श्रमाने किंवा मन प्रक्षुब्ध झाले तर पाठीत शहारे येतात. गार झालेल्या भागात उष्णता यावयास लागली म्हणजे त्या जागी भाग न्हावयास लागते.

---

## १५३ झिंजिबेरिस (सुंठ) Zingiberis

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम पचनेंद्रियावर होतो. खाल्ल्यानंतर अन्नाची चव बराच काळपर्यंत तोंडात राहते. टरबुज-खरबुज-कलिंगड खाऊन झालेले उपद्रव. अशुद्ध पाणी पिऊन झालेले उपद्रव. टायफाईड तापानंतर लघवी होण्याची क्रिया थांबते. दमा सकाळी जास्त असतो. कोरडा खोकला सकाळी खूप कफ पडतो. सर्व सांधे अतिशय अशक्त झाल्यासारखे वाटतात.

---

## १५४. टरेंटुला Tarentula Hispanica

**सर्वसाधारण** :– या कोळयाच्या विषाचा परिणाम *मज्जातंतु*; *हृदय*; *कणा*; *श्वासोच्छ्वास*; जननेंद्रिये व उजवी बाजू यावर होतो. बहुतेक विकार

एकदम सुरू होतात व त्यांचे *स्वरूप फार झपाटयाचे असते*. **अस्वस्थपणा; आपोआप हालचाल; चुळबुळ व उतावीळपणा.** एकसारखी हालचाल करणे भाग पडते परंतु चालले तर त्रास होतो. **गडबडा लोळणे;** डोके एकसारखे फिरविणे किंवा कशाला तरी घासणे व त्याने बरे वाटते. कंप, **आचके, धक्के बसतात.** चुणचुणल्यासारखे वाटून बधिरपणा येतो. कंपवात; नाचणे. भयंकर स्वरूपाच्या वेदना. एका अवयवात वेदना सुरू झाल्यावर त्याच वेळेस दुसऱ्या अवयवात वेदना सुरू होतात. गर्भाशयाच्या वेदनांबरोबर डोकेदुखी. घसा दुखत असताना डोळे दुखतात. कानात दुखत असताना उचकी लागते. जठरात वेदना होत असताना चेहेऱ्यात वेदना होतात. शरीर इतके वाळते की जणू काय हाडापासून त्वचा गळून पडली आहे असे दिसते. कॅन्सर. चालण्यापेक्षा धावता चांगले येते. गाणे ऐकल्याने त्रास होतो पण त्याने बरे वाटते. वैषयिक क्षोभ झाल्यामुळे होणाऱ्या वेदना. या औषधाचा आर्सेनिकच्या लक्षणाशी बरेच साम्य असल्यामुळे आर्सेचा परिणाम झाला नाहीतर हे औषध घ्यावे. शरीर वाळते. खोल गळवे होण्याची प्रवृत्ती. हिस्टेरिआ; फेपरे; आवळल्यासारखे वाटते; मुंग्या येतात. पडून दुखापती झाल्यामुळे, प्रेमभंगामुळे, शिक्षा किंवा रागे भरल्यामुळे, वाईट बातम्या ऐकल्यामुळे उद्भवलेले दुष्परिणाम. सेप्टिक विकार.

**मानसिक :–** काळा, लाल, हिरव्या रंगाचा तिटकारा. उड्या मारल्याप्रमाणे नाचण्याची प्रवृत्ती. घाबरट व काहीही सहन होत नाही. आपोआप हासणे नंतर किंचाळणे. **स्वतःवर ताबा राहात नाही; हास्यास्पद हालचाली;** अश्लील वागणुक. मनात येईल ते एकदम करून टाकण्याची प्रवृत्ती. स्वार्थीपणा. लबाड; दक्ष; द्वेषी; **लुच्चेगिरी व नासधूस, मोडतोड करण्याची प्रवृत्ती.** भ्रष्ट वागणूक. वस्तूंची फेकाफेक करणे. स्वतःला आजार झाला आहे असे ढोंग करणे, आपण बेशुद्ध होत आहोत असे दाखविणे. आपल्याकडे कोणी पाहत आहेत की काय इकडे लक्ष ठेवणे किंवा स्वतः आजारी आहोत अशी भ्रामक समजूत. वस्तू चोरण्याची प्रवृत्ती. मनोवृत्तीत **एकाएकी अदलाबदल;** रडणे–हसणे किंचाळणे, गाणे, थट्टा करणे वगैरे. रोग्याकडे कुणाचे लक्ष नसेल तर त्याला काही होत नाही पण त्याच्याकडे लक्ष दिले तर त्याला लक्षणे व्हावयास लागतात. वेड; उन्माद; हिस्टेरिआ. संगीत–गायन वादन सहन होत नाही. पण त्याने बरे पण वाटते. चिडखोर नैराश्य. मरणकाळच्या यातना. उपद्रवी. स्वतःचे केस ओढणे–स्वतःलाच मारणे

किंवा इतरांना मारणे. नाचणे, धावणे, हातवारे करणे, गाणे इतके की शेवटी आवाज बसतो व थकवा येतो.

**डोके** :– वारंवार घेरी येते. डोक्यावरून ओझे नेले की घेरी येते. घेरी आल्यानंतर आचके येतात. डोके उशीवर किंवा कशावर तरी घासण्याची प्रवृत्ती. मेंदूत सुया बोचल्याप्रमाणे चुणचुणते. ठेचल्याप्रमाणे भयंकर डोके दुखते. मेनिन्जायटिस. डोक्यावरून अंगावर गार पाणी ओतल्याप्रमाणे वाटते, केस विंचरावेसे वाटतात. किंवा त्याने बरे वाटते.

**डोळे** :- डोळ्यात वाळू किंवा काटा खुपत आहे असे वाटते. उजेड सहन होत नाही. डोळ्यातील पाणी दाट. एक बाहुली रुंद दुसरी बारीक. डोळे वटारलेले सताड उघडे. कंड येते.

**कान** :– उचकी आली म्हणजे कानात कटकट आवाज होऊन कानात दुखते. कानात घंटानाद होतो विशेषतः सकाळी चालताना.

**नाक** :– नाकातून रक्त जाते, त्यामुळे डोक्यातले भरल्यासारखे वाटणे कमी होते.

**चेहरा** :– सुकलेला. धडकी भारल्याप्रमाणे भीतिग्रस्त. लालबुंद, फुगीर.

**जठर** :– कच्चे अन्न किंवा वाळू खावीसी वाटते. पाव, मांस खाण्याचा तिटकारा. तहान लागते, गारपाणी प्यावेसे वाटते. कडवट ढेकरा येतात, हिस्टेरियात खाल्लेले सगळे ओकून पडते खावेसे वाटते.

**उदर** :– मलावरोध–रेचक किंवा एनिमा घेऊनसुद्धा शौचास होत नाही. रोगी अस्वस्थ–गडबडा लोळतो–डोके घासतो. डोके धुतल्यावर जुलाब होतात. शौचास काळे व दुर्गंधी होते. ओटीपोटात जडपणा त्यामुळे चालावयास त्रास होतो. शौच तेलकट.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी दुर्गंधी. हसताना, खोकताना लघवीला नकळत होते. लघवीखाली वाळूसारखा थर जमतो. मधुमेह.

**पुरुषजननेंद्रिये** :– वेड लागण्याइतकी संभोगेच्छा तीव्र होते–पण संभोगाने जास्तच त्रास होतो. वीर्य कढत किंवा रक्तमिश्रित. मुष्टिमैथुनानंतर उद्भवलेले मूत्रग्रंथीचे विकार.

**स्त्रीजननेंद्रिये** :– स्वतःवर ताबा न राहण्याइतकी संभोगेच्छा तीव्र होते. संभोगाने इच्छा जास्तच तीव्र होते, बरे वाटत नाही. कामोन्माद. **योनी व योनिद्वार** कोरडे–कढत हुळहुळे व अतिशय कंड सुटते–खाजविल्याने जास्तच त्रास होतो. पाळी लवकर व विटाळ भरपूर जातो. गर्भाशयात काहीतरी फिरत

आहे असे वाटते किंवा आग होते. गर्भाशयाची करटे–गुल्मे. गर्भाशय मुखाचा कॅन्सर. धुपणी स्वच्छ–करवडणारी किंवा चिकट गोळे पडतात. कष्टार्तव–रजःपिंडाना दाब सहन होत नाही. योनीतून वारा जातो. जननेंद्रियात अस्वस्थपणा वाटतो. पाळीनंतर योनिद्वाराला कंड सुटते.

श्वसनेंद्रिये :– *गुदमरल्यासारखे वाटते*, व त्यावेळेस रडणे, किंचाळणे व अस्वस्थपणा वाटतो. मोकळ्या हवेत असावे असे वाटते. खोकताना गुदमरल्यासारखे वाटते. खोकला तंबाखू ओढल्याने कमी होतो, आवाज ऐकल्याने, संभोगानंतर जास्त होतो. कफ टाकताना गुदमरते.

हृदय :– हृदयाला पीळ पडला आहे असे वाटते. एकदम उसळी मारल्याप्रमाणे ठोका पडतो. नाडी अनियमित. हृद्रोग–अॅन्जायना. हृदयाची लक्षणे हातापर्यंत पसरतात–गार पाण्यात हात बुचकळल्याने लक्षणे बळावतात. कंप, धडधड.

पाठ :– **कणा दुखतो व त्याला स्पर्श सहन होत नाही,** स्पर्श केला तर छातीत किंवा हृदयात दुखावयास लागते. गुदास्थित दुखते, उभे राहिल्याने बरे वाटते स्पर्श केला किंवा जरा हालचाल केली की जास्त होते. कण्यात उद्भवलेली गुल्मे.

हातपाय :– हात अस्वस्थ, **पंजांचा सारखा चाळा.** बोटे कुरतडावीशी वाटतात. पाय अस्वस्थ. चालावेसे वाटते, चालण्यापेक्षा धावता बरे येते. पंजे व पावले गार व ओलसर. तळपायाला कंड सुटते. हाडे करवतीने कापल्यासारखी वाटतात. अवास्तव, चमत्कारीक हालचाल, किंवा हातपाय आखडणे.

झोप :– मध्यरात्रीपूर्वी **झोप येत नाही.**

त्वचा :– **निळसर;** रक्ताचे ठिपके पडतात. ठिकठिकाणी गार ठिपके पडल्यासारखे वाटतात किंवा गार पाणी वाहात आहे किंवा वरून पडत आहे असे वाटते. काळी पुळी. खोल गळवे. या औषधाने पू लवकर बाहेर पडण्यास मदत होते. कोरडा इसब.

ज्वर :– **थंडी वाजणे व ताप आलटून पालटून.** अंग कढत, पावले गार. सेप्टिक दोषी ज्वर. भरपूर करवडणारा घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** ***स्पर्श***; **गारवा; आवाज**; दमटपणा; नियमितवेळी –ठराविक तासाला, दरवर्षी. विटाळशीपणानंतर; संध्याकाळी; दुसऱ्यांना

दुःखात पाहिल्याने. डोके धुतल्याने. गार पाण्यात हात टेवल्याने; संभोग केल्याने; संगीत ऐकल्याने.

**ब या** :– आरामशीर पडल्याने; **चोळण्याने; घाम आल्याने;** तंबाखू ओढल्याने. गाडीतून गेल्याने. उन्हात. भडक रंग. गाणे ऐकल्याने; **मोकळी हवा; संगीत–गायनवादन;** घोड्यावर बसून जाण्याने.

**सहाय्यक औषधे** :– आर्से.

**संबंधी औषधे** :– अगारि; मायगेल.

---

## १५५. टरेंटुला कुबेन्सिस Tarentula Cubensis

**सर्वसाधारण** :– **विकारांची सुरवात एकदम होते व त्यामुळे भीतीदायक अशक्तपणा येतो. भयंकर आग होऊन नांगी मारल्याप्रमाणे तीव्र वेदना होतात.** *विकार झालेल्या भागी* **लाकडाप्रमाणे** *टणकपणा* **येतो व भरपूर घाम येतो.** घटसर्प–अतिशय ताप येतो. विकारांचा दुष्टपणा, सेप्टिक अवस्था. काळी पुळी; **गळवे**–निळसर ठणकणारी गळवे. **मरणकाळच्या यातना.** लुलेपणानंतर आचके प्लेग–प्रतिबंधक व निवारक म्हणून या औषधाचा उपयोग होतो.

**मानसिक** :– घाबरटपणा, त्यामुळे अस्वस्थता.

**डोके** :– भरल्यासारखे वाटते. मेनिंजायटीस.

**जठर** :– ओकावयास होते.

**मूत्रेंद्रिये** :– खोकताना लघवीला होते. मूत्राशयात लघवी तुंबते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– योनिद्वाराला कंड सुटते.

**श्वसनेंद्रिये** :– मधुनमधुन श्वासोच्छ्वास घ्यावयास कष्ट होतात. खोकला खोकताना शरीर फुटते आहे की काय असे वाटते. डांग्या खोकला.

**हातपाय** :– पंजे कापतात; **पावले एकसारखी हालतात;** चालणे अस्थिर.

**त्वचा** :– **निळसर होते,** कुजते. तिखट आग झाल्यासारखी वाटते. फुगल्यासारखी वाटते.

**झोप** :– गुंगी, पण खोकल्यामुळे जाग येते.

**ज्वर :– तिखट लागल्याप्रमाणे आग होते.**

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** गार पेयाने; श्रमाने; रात्री.

**ब वा :–** तंबाखू ओढल्याने.

**संबंधी औषधे :–** ॲन्थ्रा; लॅक्ट्रो.

---

## १८६. टॅबॅकम (तंबाखू) Tabacum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम **मज्जातंतु; हृदय**; ***गाठी***; *व* ***स्राव*** यावर होतो. सर्व शरीराला **शैथिल्य येते, थकवा येतो; स्राव भरपूर वाहु** लागतात, लाळ गळू लागते, डोळ्यातून पाणी वाहते, खूप घाम येतो. मळमळणे; घेरी येणे; मेल्यासारखी अंगाची कळा होणे; ओकाऱ्या; बर्फासारखे अंग गार होणे व घाम ही महत्वाची लक्षणे आहेत. आवळल्यासारखे वाटते गळा-छाती, मूत्राशय, गुद वगैरे. रक्तदाब वाढतो. हृदयाला रक्ताचा पुरवठा करणाऱ्या धमन्या बारीक होतात. वेदना उष्णतेने वाढतात. फिकटपणा. श्वासोच्छ्वास कष्टाने होतो व नाडी कठीण दोरीप्रमाणे हाताला लागते. मूर्च्छा येते; अंथरुणातून खाली घसरणे. रोगावस्थेत त्वरित बदल होतो व त्यांचे स्वरूप गंभीर असते. तेच विकार मधुन मधुन उद्भवतात. आचके. पेटके येऊन नंतर लुलेपणा येतो. पेटके आतड्यात हृदयात वगैरे, येतात. कंप. धनुर्वात. शरीर अतिशय वाळते विशेषतः पाठ व गाल. चालणे हळुहळु, पाय फरफटत. सूर्याघात. मधमाशा किंवा डांस चावण्याला प्रतिबंध करते.

**मानसिक :–** खिन्न, निराश व केविलवाणी अवस्था–किंवा बेपर्वा. मनाचा गोंधळ. मानसिक शीण. आकलन शक्तिमंद. विसराळू.

**डोके :–** अतिशय घेरी येते व त्यावेळेस भरपूर (गार) घाम सुटतो, डोळे उघडल्याने घेरी जास्त होते. हातोडी मारल्याप्रमाणे एकाएकी दुखावयास लागते, लघवी होताना जास्त. घट्ट पट्टा आवळल्याप्रमाणे वाटते.

**डोळे :–** आंधळेपणा, काही कारण नसताना एकाएकी आलेला. डोळ्याच्या आतील पडद्यावर पाहिलेल्या वस्तूचे प्रतिबिंब डोळे मिटल्यानंतर फार वेळ राहते. पांढऱ्या वस्तूकडे एकसारखे पाहत राहिल्यामुळे दिसेनासे होते. दृष्टी अंधुक, जाळीदार कपड्यातून पाहत आहोत असे वाटते.

**कान** :– गाणे ऐकिल्याने कानात दुखते. कानात आवाज होऊन, आगबोट लागल्याप्रमाणे वाटते.

**नाक** :– फार गळते.

**चेहरा** :– *मृतवत फिकट*; **खिमटलेला**. खोल गेलेला. दातापासून ओठ विलग होतात. दातखिळी बसते. चेहऱ्यावर गार घाम येतो. एक गाल कढत व चमकदार, दुसरा फिकट. जबड्याच्या सांध्यात हसताना दुखते.

**तोंड** :– अनेक विकारात **एकसारखे थुंकावे लागते**. बोलणे कठीण जाते.

**घसा** :– आवळल्यासारखा वाटतो, विशेषतः हृद्रोगात.

**जठर** :– **मरण येईल की काय अशा तऱ्हेची मळमळ व जोराने ओकाऱ्या होतात**, जरा हालचाल केली की त्रास होतो. सारखे थुंकावे लागते. गरोदरपणाच्या ओकाऱ्या. आगबोट लागणे. मळाच्या ओकाऱ्या होतात. कोरडे उम्हासे.

**उदर** :– **पोटाच्या खळीत गळून गेल्यासारखे वाटते. उदर उघडे ठेवावेसे वाटते.** उजव्या बाजूस जडपणा वाटतो. **आतड्यात मुरडा होऊन** अशक्तपणा येतो, व किंचाळणे. शौचास न **कळत होते**–किंवा कॉलऱ्यासारखे जुलाब होतात. दाट **बह्यासारखे**, पाण्यासारखे, ताकासारखे आंबुस शौचास होते. आतड्याचे चलनवलन बंद होते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थेंब थेंब गळते. मुतखड्यामुळे मूत्रनलिकेत वेदना होतात, गार घाम येतो, भयंकर मळमळते.

**पुरुषजननेंद्रिये** :– नपुंसकत्व. स्वप्नावस्था होण्याची प्रवृत्ती. शिश्नात वेदना होत असल्यामुळे उदासीनता येते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– सकाळचे मळमळते (गरोदरपणी). विटाळ थांबण्याच्या वयात व प्रत्येक पाळीचे वेळी अतिशय केविलवाणे वाटते. धुपणी लसी सारखी पातळ, पाळीनंतर जास्त जाते.

**श्वसनेंद्रिये** :– छातीत आवळल्यासारखे वाटते. दमा. कोरडा खोकला, गार पाणी प्याल्याने बरे वाटते. खोकल्यानंतर उचकी लागते.

**हृदय** :– हृदयाभोवती पिरगळल्यासारखे वाटते. हृद्रोग ( ॲन्जायना ) कळा छातीच्या मध्यभागातून हातात पसरतात–मळमळते–गार घाम येतो व एकदम शक्तिपात होतो. हृदयाचे ठोके अस्थिर. नाडीचे ठोके मधुन मधुन थांबतात. भयंकर धडधडते, डाव्या कुशीवर निजल्याने.

**पाठ** :– निजल्याने पाठ दुखते, चालल्याने बरे वाटते. हाताच्या बोटांच्या टोकाना बुरसा आल्यासारखे वाटते. पाय गार. हातापायांना मुंग्या येतात. एखाद्याच बोटाला पेटके येतात, लिहिताना जास्त. आचके येताना डोके मागे वाकते. मान ताठते.

**झोप** :– भयंकर स्वप्ने पडतात. बेशुद्धीप्रमाणे झोप लागते.

**त्वचा** :– **बर्फासारखी गार.**

**ज्वर** :– एक गाल कढत. सर्व कण्यात उष्णता भासते. अंतर्गत उष्णता. शहारे येऊन एकाएकी गार घाम येतो – मूतखड्याच्या विकारात–हृद्रोगात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– डोळे उघडल्याने; संध्याकाळी; अत्यंत थंडी किंवा उष्णता; *हालचाल*–गाडी–आगबोटीत बसणे वगैरे; डाव्या कुशीवर निजल्याने.

**क मी** :– **थंडी–गारवा; मोकळी हवा;** संध्याप्रकाश; उदर उघडे केल्याने, रडण्याने, ओकारी झाल्याने.

**सहाय्यक औषधे** :– ओपि.

**संबंधी औषधे** :– आर्से; गेल्से; व्हेरा–आ.

---

## १५७. टॅरॅक्सकम Taraxacum ( उंदिरकानी )

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **यकृत** व जठर यावर होतो. **पित्त प्रकोप. आजाऱ्यासारखे वाटणे;** व थकवा. टोचणे. मूत्राशयाचा कॅन्सर. हिस्टेरिआत उदरात वात धरून उदर फुगते. बसावेसे किंवा निजावेसे वाटते. काविळ. पित्ताचे खडे.

**मानसिक** :– खिन्नता. स्वतःशीच पुटपुटणे. काम करावेसे वाटत नाही पण एकदा करावयास लागले म्हणजे चांगले करणे.

**डोळे** :– डोक्याची टाळू अत्यंत कढत झाल्यासारखी वाटते. पोट बिघडले म्हणजे डोके दुखते.

**तोंड** :– जिभेवर निरनिराळ्या रंगाचे चट्टे. जिभेवर पांढरा थर–जमतो व थर पडून लाल चट्टे पडतात व ते भाग हुळहुळे होतात. कडू चव व ढेकर. चव आंबट व आंबट कफ घशातून खाकरावा लागतो. लाळ गळत असताना कंठावर दाब पडून तो बंद होत आहे असे वाटते.

**उद्र** :– यकृत मोठे व टणक होते. आतड्यात बुडबुडे फुटताहेत असे वाटते. शौचास पांढरे होते. पित्तामुळे जुलाब होतात. कावीळ.

**पाठमान** :– कानापासून मानेत खालपर्यंत वेदना होतात.

**हातपाय** :– अस्वस्थ. गुडघ्यात, दुखते– दाबल्याने बरे वाटते. हातापायात फाडल्याप्रमाणे वेदना होतात. बोटाची टोके गार. पोटऱ्यात ( उजव्या ) धक्के मारल्याप्रमाणे वेदना होतात; स्पर्श केल्याने बरे वाटते.

**ज्वर** :– जेवणा-खाण्यानंतर अंगावर शहारे येतात, पेये पिण्यानंतर जास्त येतात. हाताच्या बोटाची टोके गार पडतात व पायांच्या बोटांची आग होते. रात्री भरपूर घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **विश्रांतीने**; बसल्याने; उभे राहिल्याने.

**ब वा** :– चालण्याने; स्पर्श केल्याने.

**संबंधी औषधे** :– नक्स–व्हा.

---

## १५८. टिलिआ Tilia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **स्नायू**; स्त्रीजननेंद्रिये; व मूत्रेंद्रिये यावर होतो. ओढल्यासारख्या वेदना; जलयुक्त सूज. हुळहुळेपणा–**गर्भाशय, उदर** वगैरे. अंथरूण फार टणक आहे असे वाटते. संधिवात. रक्तस्राव पातळ, फिकट. खाली ओढ लागल्याप्रमाणे वेदना होतात विशेषतः मूत्र–जननेंद्रिये व गुदात.

**मानसिक** :– मंडळीत बसण्या उठण्याची भीति. प्रेमभंग.

**डोके** :– डोळ्यापुढे जाळीदार कापड आहे असे वाटून डोके दुखते.

**डोळे** :– गार लोखंडाचा तुकडा आत खुपसला आहे असे वाटून आग होते. ( उजव्या )

**नाक** :– खूप शिंका येऊन नाक वाहते. नाकातून रक्त येते.

**उद्र** :– हुळहुळे होऊन, गरम घाम येतो पण त्याने बरे वाटत नाही.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्रमार्गात जडपणा वाटून ओढल्यासारखे वाटते. लघवीला थोडे होते.

**श्वसनेंद्रिये** :– घशात गुदगुल्या होऊन खोकला येतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गर्भाशयाभोवती अत्यंत हुळहुळे झाल्यासारखे वाटते. खाली ओढ लागते–कढत घाम येतो पण त्याने बरे वाटत नाही. योनिद्वार लाल व हुळहुळे.

**झोप** :– वेदना होत असताना **झोप येते.**

**त्वचा** :– पित्ताच्या गांधी. भयंकर कंड सुटते व खाजविल्यानंतर भयंकर आग होते. घाम कढत व भरपूर येतो. ***जसजसा जास्त घाम येतो तसतशा वेदना जास्त होतात.*** झोप लागल्यानंतर लगेच घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***घाम येताना***; वारे लागल्याने; झोपेनंतर.

**ब वा** :– मोकळ्या हवेत चालल्याने. थंड खोलीत.

**संबंधी औषधे** :– एपि; कॅल्क–का; लिलि–टि.

---

## १५९. टेरेबिंथिना ( टरपेन्टाइन तेल ) Terebinthina

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **श्लेष्मल त्वचा–मूत्रपिंडाची**–मूत्राशयाची; **श्वासोच्छ्वास**; हृदय व रक्त यावर होतो. संधिवात व मूत्रपिंडाचे विकार आलटून पालटून होतात. स्नायू एकाएकी पेटके येऊन **ठणकतात–ताठतात व हुळहुळे होतात.** वेदना होताना **लघवीला वारंवार जावे लागते. आग होते**–जिभेच्या टोकाची– पोटाच्या खळीत–पाठीच्या खालच्या भागात–**मूत्रपिंडात–गर्भाशयात** वगैरे. स्राव हळुहळु पाझरतो विशेषतः श्लेष्मल त्वचेतून. रक्तस्राव काळा दुर्गंधी. वेदना होताना वेदना होत असलेल्या जागेवर गारवा वाटतो किंवा कित्येक वेळा आतून नळीतून कढत पाणी वाहत आहे असे वाटते. समतोलपणात बिघाड झाला आहे असे वाटते. थकवा. क्षीण.

**मानसिक** :– थकलेला **पण काही सहन होत नाही.** एकाग्रता होत नाही. अतिशय चिडखोरपणा, मुलांचा.

**डोके** :– डोक्याभोवती पट्टा आवळल्याप्रमाणे वाटते. उदरात मुरडा होताना डोके दुखते.

**डोळे** :- दारु पिण्यामुळे आलेला आंधळेपणा. बेशुद्ध स्थितीत गिळताना डोळे उघडणे.

**कान** :– स्वतःचा आवाज कानाला अनैसर्गिक वाटतो. **मोठ्याने बोलले तर कानात** दुखते. घड्याळाप्रमाणे कानात कटकट आवाज होतो.

**नाक** :- नाकातून हळुहळु रक्त पाझरते; मुलांच्या सर्दीशिवाय नाकातून पाणी जाते.

**चेहरा** :- फिक्ट, मातट; खोल गेलेला.

**तोंड** :- जीभ कोरडी-गुळगुळीत-चकचकीत-लाल हुळहुळी. जिभेच्या टोकाची आग होते. तोंडापासून गुदापर्यंत आतड्यात व्रण पडतात. श्वासोच्छ्वास गार. तोंडाला घाण येते.

**उदर** :- **नगाऱ्यासारखे फुगते. वात धरतो. मार लागल्याप्रमाणे हुळहुळे होते.** जलोदर. शौचात भरपूर पांढरी आव पडते. पाण्यासारखे-हिरवे-दुर्गंधी रक्ताचे जुलाब होतात. जंत होतात. आतड्यात व्रण पडून रक्तस्राव होतो. मळमळ व ओकाऱ्या. पोटाच्या खळीत आग होते.

**मूत्रेंद्रिये** :- **मूत्राशय मार लागल्याप्रमाणे हुळहुळे होते.** लघवीला कष्टाने थेंब थेंब होते व लघवीतून रक्त जाते. मूत्रनलिकेत **आग** किंवा वेदना होतात. लघवी **धुरकट रंगाची**, कॉफीच्या भुकटीप्रमाणे किंवा दाट पिवळया बुळबुळीत चिखलाप्रमाणे गाळ खाली जमतो. लघवीला सुगंध येतो. मूत्रपिंडाची सूज व त्याबरोबर **खोकला येतो**. मूत्राशयाची सूज-मूत्राशयातून रक्त पाझरते. मूत्राशयात व बेंबीभोवती वेदना आलटून पालटून होतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :- गर्भाशयाचा शोथ. गर्भाशयात आग होते. खूप विटाळ जातो. पेसरी वापरल्यानंतर उद्भवलेले विकार.

**श्वसनेंद्रिये** :- दमा. फुप्फुसे ताणल्यासारखी वाटतात. रक्तमिश्रित कफ पडतो. खोकला झाला असताना मुलांना गुंगी येते व लघवी तुंबते.

**हृदय** :- नाडी जलद, मधुन मधुन थांबते.

**पाठ** :- पाठीत मूत्रपिंडाच्या जागेभोवती आग होते.

**हातपाय** :- पंजे सुजल्यासारखे वाटतात. गुडघ्यात पेटके येतात. शरीर सावरता येत नाही, पाय फाकून उभे राहावे लागते. स्नायू ताठतात. म्हाताऱ्याप्रमाणे वाकून चालणे.

**त्वचा** :- रक्ताचे डाग पडतात.

**झोप** :- गुंगी येते.

**ज्वर** :- नाडी जलद. त्वचेखाली उष्णता वाटते. टायफाईड. पायाना गार घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** **बमट**, हवा, जागा; थंडी; **रात्री**; निजल्याने. दाबल्याने.

**ब था :–** हाल्चालीने. खाली वाकल्याने.

**संबंधी औषधे :–** इरिजि; कॅन्था; फास्फ.

---

## १६०. टेलिआ Ptelea

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम जठर व यकृत यावर होतो.

**डोके :–** कपाळ नाकाच्या बुंध्यापर्यंत दुखते, आवाजाने–हाल्चालीने–डोळे चोळल्याने व रात्री जास्त होते.

**तोंड :–** फार लाळ गळते. चव व ढेकरा कडू किंवा कुजलेल्या अंड्याप्रमाणे. श्वासोच्छ्वास कढत, नाकाची भाग होते.

**उदर :–** यकृताचे जागी ठणका लागतो व जडपणा येतो. डाव्या कुशीवर निजल्याने जास्त त्रास होतो. जंठराच्या व यकृताच्या लक्षणाबरोबर हातापायात दुखते, पाय व पाऊलाना सूज येते. चीज-मांस.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** डाव्या कुशीवर निजल्याने. पहाटे.

**ब था :–** आंबट पदार्थ खाल्ल्याने.

---

## १६१. टेल्युरिअम Tellurium

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम **कणा**; मज्जातंतू; **डोळे**; **कान**; त्वचा; उजवी ते डावी बाजू यावर होतो. **दुर्गंधी**–लसणीप्रमाणे किंवा **कुजलेल्या माश्याप्रमाणे. खारटपणा**–चव व घशातील कफ–पू वगैरे. **स्राव करवडणारे**– त्यामुळे कंड सुटते व भाजल्यासारखे फोड येतात. एकदम चमका येतात, नंतर ती जागा हुळहुळी होते. **बधिरपणा.** आत कोठेतरी काहीतरी राहिले आहे किंवा तुंबले आहे अशी भावना. दुखापतीमुळे झालेले दुष्परिणाम विशेषतः कण्याच्या-रेषामारल्याप्रमाणे वेदना होतात.

**मानसिक :–** दुखत असलेल्या जागी कोणीतरी धक्का लावील अशी भीती वाटते. विसराळू व दुर्लक्ष करण्याची प्रवृत्ति.

**डोके** :– घेरी येते–झोप लागत असताना जास्त येते, स्वस्थ राहिल्याने बरे वाटते. डोक्यात रेघ मारल्याप्रमाणे वेदना होतात.

**डोळे** :– पापण्या जाड होतात–सुजतात व खाजतात. डोळयात पाणी साचते.

**कान** :– सुजून निळसर होतात; फुगतात. कानातून करवडणारा, माशासारखी घाण येणारा स्राव येतो. कानामागील इसब. पडद्यात दुखापत झाल्यामुळे आलेला बहिरेपणा. कंड सुटते. ठुसठुसते.

**नाक** :– सर्दी होऊन खूप नाक गळते, घसा बसतो व डोळ्यातून पाणी येते. बाहेर मोकळ्या हवेत चालताना जास्त होते, पण काही वेळाने कमी होते.

**तोंड** :– लसणीसारखा वास येतो

**चेहरा** :– चेहऱ्याचे स्नायूना कंप येतो त्यामुळे चेहरा वेडावाकडा दिसतो. बोलताना किंवा वेदनामुळे ओठाचा कोपरा (डावा) वर उचलला जातो. एकदम चेहरा लाल होतो.

**घसा** :– गुटका गिळताना दुखतो, पण खाण्या-पिण्याने बरे वाटते.

**जठर** :– सफरचंद खाण्याची वासना. करपट ढेकरा येतात. कोरड्या ओकाऱ्या येतात नंतर जांभया येतात. जठर पोकळ झाल्यासारखे वाटते. भात खाल्यानंतर ओकावयास होते.

**उदर** :– शौचानंतर गुदद्वारात व शिवणीत कंड सुटते. आंत चिमटे घेतल्याप्रमाणे वाटणे.

**श्वसनेंद्रिये** :– हृदयाच्या जागेत छातीत लचक भरल्याप्रमाणे वेदना होतात. हात वर केल्याने जास्त होतात. खोकताना माकड हाडात वेदना होतात.

**हृदय** :– जागी दुखते, पाठीवर निजल्याने बरे वाटते.

**पाठ** :– कणा हुळहुळा झाल्यासारखा वाटतो व त्याला स्पर्श सहन होत नाही. डोक्याचा मागील भाग व मानेची खळी बधिर. माकड हाडातील वेदना उजव्या मांडीत येतात, खोकताना, हंसताना, शौच्याचे वेळी कुंथताना जास्त होतात.

**पाय** :– गृध्रसीवात (उजवी बाजू) वेदना खोल–कुंथल्याने, खोकताना, शिंकताना, निजल्याने जास्त होतात. गुडघ्याच्या पोकळीतील स्नायुबंध आखडतात. पाउलाना दुर्गंधी घाम येतो.

**त्वचा** :– गजकर्ण सर्वांगाला, पायाना किंवा एखाद्या जागी वर्तुळाकृती त्वग्रोग उद्भवतात. कंड सुटते व ढेकूण चावल्याप्रमाणे चुणचुणते. जुन्या व्रणात आग व्हावयास लागते.

**झोप** :– ढेकरानंतर किंवा कोरड्या ओकाऱ्यानंतर जांभया येतात. जेवणानंतर गुंगी येते.

**ज्वर** :– कण्यात वरून खाली शहारे येतात, पाठीवर निजल्याने जास्त. वेदना होताना शहारे येतात. लहान जागी घाम येऊन कंड सुटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **स्पर्श; वेदना होत असलेल्या बाजूवर निजल्याने;** थंडी; गुटका गिळताना; कण्याला झालेल्या दुखापतीमुळे; खोकताना; हसताना; घर्षणाने

**संबंधी औषधे** :– सेपा; सेलेनि.

---

## १६२. ट्युबरकुलिनम Tuberculinum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम फुप्फुसे; मन; डोके; डोक्याचा मागील भाग; गाठी व कंठ यावर होतो. लक्षणे **अस्पष्ट व त्यांच्यात एकसारखी अदलाबदल.** विकार वारंवार उद्भवण्याची प्रवृत्ति. थकवा उत्तरोत्तर वाढत जातो. शरीर वाळते. **जीवनशक्तीची क्षीणता.** हवेतील फेरबदल सहन होत नाहीत. **वारंवार सर्दी होते** व त्यानंतर हगवण लागते. **क्षयी प्रकृति.** क्षयाची सुरवात किंवा प्रथमावस्था. गाठी मोठ्या होतात–टानसिल वगैरे. कंप फेफरे. नेहमी थकल्यासारखे वाटते; व हालचालीने किंवा थोड्या श्रमाने अत्यंत थकवा येतो. योग्य निवड केलेल्या औषधाची प्रतिक्रिया होत नाही किंवा झालेली टिकत नाही. सर्व शरीर ठेचल्यासारखे वाटते. हाडे दुखतात. हालचालीने वेदना कमी होतात. मुंग्या येतात. मूर्च्छा येते. रात्रीच्या जेवणानंतर हातपाय अशक्त झाल्यासारखे वाटतात, कधी कधी लुले पडल्यासारखे वाटतात. झोप लागताना अंगावर थंडी भरून शहारे आल्यासारखे वाटतात. अंथरुणात पावले गार असतात. **कपडे ओले झाले आहेत असे वाटते.** या औषधाची योग्य प्रतिक्रिया झाली नाही तर 'सिफिलिनम' हे औषध घ्यावे त्याने कित्येक वेळा योग्य परिणाम होतो. हे औषध देण्याचे अगोदर हृदयाची क्रिया योग्य तऱ्हेने चालली आहे की नाही याची खात्री करून घ्यावी, हृदय अशक्त असेल तर हे औषध न देणे चांगले.

**मानसिक** :– *काहीही सहन होत नाही.* प्रत्येक क्षुल्लक कारणाने चिडणे–जागे झाल्यानंतर जास्त. रागीटपणाचे झटके येतात त्यामुळे मारामारी भांडण करणे. असंतुष्ट. एकसारखी काहीतरी नवीन गोष्ट करावीशी वाटते.

प्रवास करावासा वाटतो. कोठेतरी जावेसे वाटते. बेहरपणा; उदास; खिन्न. निराश. भीती वाटते—जनावरांची विशेषतः कुत्र्यांची. शिवराळ भाषा वापरण्याची प्रवृत्ति. शिव्या देणे, शाप देणे. मनाचा गोंधळ. प्रत्येक वस्तु विचित्र भासते. काही कारण नसताना एखाद्याला वस्तू फेकून मारणे. एका जागी फार वेळ राहवत नाही. मनोवृत्तीत अदलाबदल. बडबड करणे विशेषतः तापात. मानसिक श्रमाचा कंटाळा.

**डोके** :– आत खोल वेदना होतात. डोळ्यावरून डोक्याच्या मागील भागापर्यंत तीव्र कळा येतात. वेदना इतक्या भयंकर असतात की डोके आपटून घ्यावेसे वाटते, केस ओढावेसे वाटतात, डोक्यावर बुक्क्या मारणे. हालचालीने वेदना जास्त होतात. मेंदू सैल झाल्यासारखा वाटतो. मेनिन्जायटिस. डोक्याची कातडी हुळहुळी होते. केस एकमेकात गुंततात.

**डोळे** :– पापण्यांचा इसब. डोळे हुळहुळे, वळविताना जास्त.

**कान** :– कानाच्या पडद्याला भोक पडते. कानातून दुर्गंधी स्राव येतो, सतत येत राहतो.

**नाक** :– नाकावर घाम येतो. नाकात अतिशय ठणकणाऱ्या बारीक पुटकुळ्या वारंवार येतात. सर्दी थांबली म्हणजे जुलाब व्हावयास लागतात.

**चेहरा** :– म्हाताऱ्यासारखा; मळकट. गालाच्या उंचवट्यात ठणका लागतो. फिकट.

**तोंड** :– दातांना वारे लागलेले सहन होत नाही. ते एकमेकात अडकले आहेत असे वाटते. दात लवकर येत नाहीत. तोंड कोरडे व चिकट होते. तोंडात दातांची गर्दी झाली आहे असे वाटते.

**घसा** :– खाल्ल्यानंतर घशातून कफ खाकरून काढावा लागतो. टानसिल व ॲडिना-ईडस मोठ्या होतात. नाकाचा मागील भाग कोरडा वाटतो.

**जठर** :– गार दूध पिण्याची इच्छा किंवा गोड पदार्थ खाण्याची इच्छा. मांस किंवा कोणतेही अन्न खावेसे वाटत नाही. पोटात गळून गेल्यासारखे वाटून भूक लागते व एकसारखें खावेसे वाटते.

**उदर** :– नगाऱ्याप्रमाणे. पिंगट दुर्गंधी पाण्यासारखे जुलाब होतात व ते होताना जोराचा आवाज होतो. गुदात खोकताना फाटल्यासारखे वाटते. सकाळी जुलाब होतात व त्यावेळेस अनादी घाई होते. लहान मुलांना कित्येक आठवडे हगवण लागते, त्यांचे शरीर वाळते, थकवा येतो व शरीर निळसर होते. जांघेतील सूज गाठी मोठ्या होतात व दिसतात. जुनी हगवण, अतिशय घाम

येतो. मलावरोध. शौचास मोठ्या प्रमाणात व टणक होते नंतर हगवण लागते. पांथरीच्या जागी फुगवटा येतो. धावताना कुशीत टोचते.

**मूत्रेंद्रिये** :– अंथरुणात न कळत लघवीला होते. लघवीखाली चिकट थर जमतो. लघवी करताना कुंथावे लागते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– बाळंत झाल्यानंतर लवकरच विटाळ जाण्यास सुरवात होते. पाळी लवकर येते–विटाळ खूप जातो व फार दिवस राहतो. कष्टार्तव-विटाळ जाताना असह्य वेदना होतात. स्तनात गाठी येतात. नष्टार्तव. स्तनाग्रे आत जातात.

**श्वसनेंद्रिये** :– ***सारखे वारे हवेसे वाटते***, भरपूर मोकळी हवा असून सुद्धा, गुदमरल्यासारखे वाटते. आवाज बसतो पण बोलताना सुटतो. दमा–खोकताना जास्त होतो. झोपेत कोरडा खोकला येतो. संध्याकाळी कोरड्या खोकल्यास सुरवात होऊन नंतर थंडी वाजावयास लागते. खोकल्याची वारंवार उबळ येऊन चेहरा लाल होतो. **संध्याकाळी** व हात वर केल्याने खोकला जास्त होतो. छातीत कफाची घुरघुर–पण कफ पडत नाही. न्युमोनिआ; इन्फ्लुएंझा दमा. छातीत लहानशा जागी दुखते. कफ भरपूर पडतो. कफ दाट पिवळा किंवा हिरवट पिवळा.

**हृदय** :– हृदयाच्या जागेत जडपणा वाटतो व दाबल्यासारखे वाटते. दीर्घ श्वास घेतल्याने छातीत धडधडते. संध्याकाळी जेवणानंतर धडधडते.

**मानपाठ** :– मानेत व पाठीच्या कण्यात ताणल्यासारखे वाटते. दोन्ही खांद्याच्या मध्य भागीं शहारे येतात. पाठीत दुखत असताना धडधडते.

**हातपाय** :– पंजे व हात लुळे झाल्यासारखे वाटतात, लिहिता येत नाही किंवा कप वर उचलता येत नाही. बोटाची (हातांच्या) टोके पिंगट. हातपाय दमल्यासारखे वाटतात. पाऊले गार. हातपाय, अशक्त लुळे पडल्याप्रमाणे वाटतात विशेषतः रात्रीच्या जेवणानंतर.

**त्वचा** :– **कोरडी व खरखरीत**–स्पर्श सहन होत नाही व उन्हाने ताबडतोब काळवंडते. गार वाऱ्यात कंड सुटते. बोटाची टोके पिंगट होतात. इसब, अतिशय कंड येते-रात्री जास्त. कोंड्याप्रमाणे पापुद्रे जातात.

**झोप** :– दिवसा अतिशय झोप येते. भयंकर स्वप्ने पडतात. लज्जास्पद स्वप्ने पडतात धडकी भरून जाग येते. झोप अस्वस्थ, झोपेत किंचाळणे. झोप लागता लागता थंडी वाजल्यासारखी वाटते.

**ज्वर** :– थंडी वाजत असली तरी मोकळी हवा हवीशी वाटते. अंथरुणात पावले गार असतात विशेषतः डावे पाऊल. गाल कढत होतो. उष्ण लाटा आल्या-सारख्या वाटतात. लहानसहान जागी, जननेंद्रियात आग होते खाण्यानंतर जास्त. शरीराच्या वरच्या भागात किंवा पंज्याना गार चिकट सहजासहजी घाम येतो. खोकताना घाम येतो. तापात तिन्ही अवस्थेमध्ये म्हणजे थंडी वाजताना, तापात व घाम येताना पांघरूण घ्यावेसे वाटते. घामाचे पिवळे. डाग पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **बंद *खोलीत*; हालचालीने; श्रमाने;** हवा ***कुमट*** गार; **हवेत फरक पडल्याने; जागे झाल्यानंतर; आवाज;** मनःक्षोभ; विकारांचा विचार केल्याने; **कमरेभोवती वस्त्रांच्या दाबाने;** संगीत; उभे राहिल्याने.

**ब बा** :– गार वाऱ्यात. मोकळी हवा. हालचालीने.

**सहाय्यक औषधे** :– कलि-स; कॅल्क-का; बेला; सल्फ; सेपि; सोरि; हैड्रास्टि.

**संबंधी औषधे** :– कॅल्क-फा; बॅरि-का; सिलि.

---

## १६३. ट्रांबोडिअम Trombodium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम आतड्यावर होतो. लक्षणे खाण्यानंतर व पिण्यानंतर जास्त होतात. आव. शौचास होण्याचे अगोदर व नंतर मुरडा होतो. वारंवार शौचास जावेसे वाटते. शौचास पिंगट, रक्तमिश्रित, होते. गुदद्वारात आग होते. रात्रीच्या जेवणानंतर नाकातून शेंबूड वाहतो.

---

## १६४. ट्रिलिअम Trillium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***स्त्रीजननेंद्रियावर होतो.* रक्तस्राव** जोराचा, लालभडक रक्तस्रावाबरोबर मूर्च्छा व घेरी येते. गर्भपात होण्याचा संभव उद्भवल्यास हे औषध घ्यावे. क्षयरोग–खूप पुवळलेला कफ पडतो व थुंकीतून रक्त पडते. बाळंत होण्याच्या अगोदर व नंतर होणारा रक्तस्राव. विटाळ थांबण्याच्या वयात होणारा रक्तस्राव.

**डोके** :– आवाजाने, चालण्याने, खोकताना जास्त दुखते, पुढे वाकल्याने बरे वाटते.

**नाक** :– भरपूर रक्त वाहते.

**तोंड** :– दात काढल्यानंतर होणारा रक्तस्राव.

**डोळे**: – फार मोठे झाले आहेत असे वाटून खाली गळून पडतील की काय असे वाटते. प्रत्येक वस्तू निळी दिसते.

**उदर** :– जुनाट हगवण. शौचास नुसते रक्त पडते. आव.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गर्भाशयातून रक्तस्राव होतो व त्यावेळेस पाठीच्या, कटीच्या व मांड्याच्या हाडांचे तुकडे होत आहेत असे वाटते–घट्ट बांधून ठेविल्याने बरे वाटते. पोटात गळून गेल्यासारखे वाटते. पाळी दर दोन आठवड्यानी येते. गर्भाशयातील गुल्मामुळे होणारा रक्तस्राव. विटाळ खूप जातो. गरोदरपणी शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात. धुपणी भरपूर जाते–पिवळी व चिकट. बाळंतपणानंतर लघवी थेंब थेंब गळते.

**श्वसनेंद्रिये** :– गुदमरल्यासारखे वाटून श्वासोच्छ्वास अनियमित चालतो व शिंका येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो**:– **हालचाल** विटाळ थांबण्याचे वयात. ताठ बसल्याने.

**क मा** :– मोकळया हवेत. श्रम केल्याने. घट्ट पट्टा बांधल्याने. पुढे वाकल्याने.

**सहाय्यक औषधे** :– कॅल्क-फा.

**संबंधी औषधे** :– साबि.

---

## १६५. डल्कामारा Dulcamara

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा*–श्वसनेंद्रियाची–मूत्राशयाची व डोळ्याची; *पाठ; कंबर;* पाठीचे स्नायू; *त्वचा;* ग्रंथी व रसवाहिन्या यावर होतो. श्लेष्मल त्वचेतून स्राव भरपूर वाहतात. संधिवात. त्वग्रोग होण्याची प्रवृत्ति. दमट हवेच्या परिणामामुळे ठणका लागतो, बधिरपणा, हुळहुळेपणा व ताठपणा येतो. फाडल्यासारख्या वेदना. इंद्रिये लुली पडण्याची प्रवृत्ति, जीभ वगैरे. पिळल्याप्रमाणे वेदना–आतड्यात–अंडात वगैरे. बर्फासारखा गारपणा विशेषतः लुल्या पडलेल्या भागात. जलयुक्त सूज ( नाळगुद वगैरे ) बर्फाच्या कारखान्यात काम करणाऱ्या इसमांचे

विकार. केव्हाही सर्दी झाली तर डोळ्याचे, घशाचे, मूत्राशयाचे, श्वसनेंद्रियांचे किंवा आतड्यात बिघाड होतो. एकाच बाजूस आचके येतात. व त्यावेळेस बोलता येत नाही. हवेत एकसारखा बदल झाल्यामुळे होणारे विकार.

**मानसिक** :– मनाचा गोंधळ; बोलताना योग्य शब्द योजता येत नाहीत, मनाची एकाग्रता होत नाही. खिन्नता. उगीचच राग भरणे. बोलताना कष्ट होतात. सहजासहजी वात होतो. मागितलेल्या वस्तु नाकारणे.

**डोळे** :– डोक्याचा मागील भाग मोठा झाला आहे असे वाटते, गार पडतो. डोके दुखणे संभाषणाने कमी होते. आगपेण–जाड पिंगट खपल्या बसतात व त्या खाजविल्याने रक्त येते. गजकर्ण. कपाळावर फळी ठेवली आहे असें वाटते-केस उभे राहिले आहेत असे वाटते.

**डोके** :– थंडीमुळे डोळे येतात. वाचताना ठणकतात. वरची पापणी लुळी पडते. दाट पिवळा स्राव येतो.

**कान** :– ठणकत असला म्हणजे मळमळते, रात्रभर दुखत राहिल्यामुळे झोप येत नाही. गोवरानंतर गालगुंड होतात.

**नाक** :– नाकात ठणका लागतो. थंडीत चोंदते. उन्हाळ्यात सर्दी होऊन हगवण लागते. जरा मोकळे वारे लागले की नाक चोंदते. विटाळाच्या ऐवजी नाकातून रक्त येते. नाकातून रक्त जाण्याची प्रवृत्ति. उपजलेल्या मुलांची सर्दी.

**चेहरा** :– गाल अगोदर गार पडून नंतर त्यात फाडल्यासारख्या वेदना होतात व खाज सुटते. पिंगट-पिवळ्या जाड खपल्या बसतात जरा थंड वारे लागले की दुखावयास लागतो. ओठावर ठणकणाऱ्या पुटकुळ्या येतात.

**तोंड** :– जीभ सुजलेली. लाळ चिकट बुळबुळीत. थंडीमुळे घसा धरतो.. तोंड वेडेवाकडे होते, एका बाजूस वळते. जीभ लुळी पडते, बोलणे अस्पष्ट. पडजीभ लांब झाली आहे असे वाटते व घशात दाब पडतो.

**जठर** :– अन्नाचा तिटकारा. एकसारखे गार पाणी प्यावेसे वाटते. शौचास लागली की मळमळते. ओकारी होताना शहारे येतात.

**उदर** :– बेंबीभोवती कापल्याप्रमाणे वेदना होऊन हिरवी बुळबुळीत आव पडते. आंबुस पाण्यासारखे जुलाब होतात विशेषतः रात्री. आतड्यात गारवा येतो. बेंबीभोवती त्वग्रोग.

**मूत्रेंद्रिये** :– थंडीमुळे मूत्राशय सुजतो. लघवीला वारंवार जावे लागते. कष्टाने थेंब थेंब होते. गारठ्यामुळे. लघवी गढूळ–श्लेष्मायुक्त किंवा दुर्गंधी असते.

गारठ्याने झालेले नाळगुद-मूत्राशयाचे स्नायू लुळे पडल्यामुळे आपोआप लघवी होते. गारठ्यामुळे मूत्राशयात लघवी तुंबते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळशी होण्याचे अगोदर अंगावर पुरळ येते किंवा वैषयिक वासना उत्तेजित होते. विटाळ पाण्यासारखा. कष्टार्तव. विटाळ जाताना अंगावर गांधी येतात. स्तन सुजून हुळहुळे होतात. विटाळाऐवजी स्तन मोठे व ठणक होतात. अंगावर पाजणाऱ्या स्त्रियांच्या स्तनाना पुटकुळ्या येतात. अंगावरचे दूध बंद झाल्यानंतर त्वग्रोग उत्पन्न होतात. गारठल्यामुळे बाळंतपणानंतरचा विटाळ व स्तनातले दूध येण्याचे बंद होते.

**पुरुषजननेंद्रिये** :– अंड मोठे होतात व त्यात पिळल्याप्रमाणे वेदना होतात. नपुंसकत्व. बोंडीच्या कातडीवर पुटकुळ्या येतात.

**श्वसनेंद्रिये** :– घशाच्या मागील बाजूस गुदगुल्या होऊन खोकला येतो. वारंवार उबळ येऊन ती बराच वेळ टिकते. पुष्कळ कफ पडतो. दमा. शारीरिक श्रमानंतर खोकला येतो. फुप्फुसात लाटा आल्यासारखे वाटून डाव्या छातीत दुखते.

**मानपाठ** :– मान ताठते. फार वेळ वाकल्याने कंबर दुखते. कंबर गार झाल्यासारखी वाटते.

**हातपाय** :– हाताच्या हाडावर हाड वाढते, त्वग्रोग नाहीसा केल्यानंतर, तळहाताला घाम येतो, संधिवात व हगवण आलटून पालटून, किंवा त्वग्रोग व संधिवात आलटुन पालटुन.

**त्वचा** :– पित्ताच्या गांधी, गारव्याने बरे वाटते, आम्लपित्त झाल्याने जास्त होते. त्वग्रोगात जाड खपल्या बसतात त्या ओलसर असतात, त्यातून रक्त येते. त्वग्रोग वर्तुळाकृती असतात–विटाळशी होण्याचे अगोदर ते जास्ती होतात. कंड सुटते. गुळगुळीत–मांसल चपट्या चामखिळी. नुकत्याच जन्मास आलेल्या मुलांचे त्वग्रोग. केसात झालेला गजकर्ण.

**ज्वर** :– पाठीत थंडी सुरू होते पांघरुणामुळे किंवा उबेने कमी होत नाही. संध्याकाळी थंडी जास्त वाजते. थंडी वाजताना लघवीला व शौचास जावेसे वाटते. दुर्गंधी घाम येतो. लुळा पडलेला भाग बर्फासारखा गार पडतो. व वेदना होतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *अंग कढत असताना गारठल्यामुळे*; हवेत एकाएकी फरक झाल्यामुळे. अंग उघडे झाल्याने. *पावसात* भिजल्याने; दमट

जागा– तळघरात. स्राव बंद झाल्यामुळे–घाम–त्वग्रोग–वगैरे. रात्री. विश्रांतीने. शरदऋतूत. दुखापती. पाऱ्याचे दुष्परिणाम. वीज वावटळीचे अगोदर. थंड पेयें. दिवसा उष्ण, रात्री थंडी.

**ब बा** :– हालचाल केल्याने. उष्णतेने. कोरडी हवा.

**सहाय्यक औषधे** :– अल्युमि; कलि स; कॅल्क-का; नेट्र-स; बॅरि-का; सल्फ.

**संबंधी औषधे** :– बेला; ऱ्हस-टा; सेपि.

---

## १६६. डाफ्ने Daphne Indica

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम स्नायू; हाडे व डावी बाजू यावर होतो. अवयव– हात–डोके वगैरे एकमेकापासून वेगळे झाले आहेत असे वाटते. मार लागल्याप्रमाणे वेदना. थकवा. दुर्गंधी. एकदम विजेचे धक्के बसल्यासारखे धक्के बसतात. तंबाखू सेवन करण्याची वासना. उदास, खिन्न. डोके मोठे झाल्यासारखे वाटते. धडापासून वेगळे झाले आहे असे वाटते. **जिभेच्या एकाच बाजूला थर जमतो**. लाळ कढत दुर्गंधी. लघवी दाट पिंवळी–गढूळ कुजलेल्या अंड्याप्रमाणे दुर्गंधी. कुल्ले गार झाल्यासारखे वाटतात. अजिबात झोप येत नाही कित्येक वेळा **हाडे ठणकल्यामुळे**. स्वप्नात काळी मांजरे दिसतात. चिकट; दुर्गंधी, घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– गार हवा. कृष्ण पक्षात. संध्याकाळी अंथरुणात.

**संबंधी औषधे** :– ऱ्हस-टा.

---

## १६७. डायास्कोरिआ Dioscorea

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम–उदर; **बेंबी**; **पित्ताशय** व उजवी बाजू यावर होतो. अनेक तऱ्हेच्या **वेदना**. *तीव्र*, *कापल्याप्रमाणे*, *उकरल्या-प्रमाणे*, *पिळवटल्याप्रमाणे असह्य वेदना होतात*. **वेदना एकदम जागा बदलतात** किंवा **दूरदूरच्या भागात पसरतात. मधुन मधुन थांबून होतात**. एकदम थांबून दुसऱ्याच ठिकाणी सुरू होतात. वेदना होत असताना **कापरे भरते**. चहाबाज इसम. थोडे कमी जास्त खाण्यामुळे पचन बिघडणारे इसम.

मानसिक :– घाबरेपणा; सहजासहजी त्रस्त होतो. वस्तूना भलत्याच नावाने संबोधणे. खिन्नता, वीर्यपात झाल्यानंतर.

डोके :– मरल्यासारखे वाटते. भ्रमल्यासारखे वाटते. डोके खाली ठेचल्याप्रमाणे वाटते. कानशिलात मंद दुखते किंवा सापळ्यात पिळल्याप्रमाणे वाटते, दाबल्याने बरे वाटते, नंतर जास्त होते.

कान :– नाक शिंकरताना खोकताना कानात दुखते. मळमळ कानात जाणवते.

नाक :– कोणत्याही घाणेरड्या वासाची जाणीव फार वेळ राहते.

डोळे :– डोळ्यात गोटी किंवा काडी आहे असे वाटते. कढत बोर आतून बाहेर येत आहे असे वाटते.

तोंड :– सकाळी कोरडे होऊन कडू होते. जीभ चावली जाते. जबडा आपोआप मिटतो.

जठर :– जठरातील वेदना छातीच्या मध्यभागातून हातापर्यंत जातात. ढेकरा येताना उचकी लागते. पोटाच्या खळीत मुरडा आल्यानंतर ढेकरा येतात.

उदर :– भयंकर मुरडा होतो हालचालीने बरे वाटते. वेदना पाठीत-छातीत हातापर्यंत पसरतात. यकृत ते उजव्या स्तनापर्यंत चमका मारतात. उदरातील वेदनामुळे हातापायांची बोटेसुद्धा दुखावयास लागतात. वात धरतो. गुदद्वार ते यकृतापर्यंत चमका मारतात. पित्ताच्या खड्यामुळे उद्भवलेल्या वेदना. बोराच्या घडाप्रमाणे मूळव्याध. सकाळी जुलाब होतात व त्यामुळे थकवा येतो, शौचास घाई होते.

पुरुषजननेंद्रिये :– शिश्नाचे उत्थापन सर्व रात्र राहते. इंद्रिये शिथिल व गार. मूत्रपिंडापासून अंडापर्यंत वेदना होतात. सुतखडा- शिश्नाचे उत्थापन न होता, स्वप्नावस्था होते व त्यानंतर विशेषतः गुडघ्यात अशक्तपणा वाटतो.

स्त्रीजननेंद्रिये :– कष्टार्तव-भयंकर वेदना सर्व बाजूला पसरतात व हातापायांच्या बोटांचे पेटके व गर्भाशयातील वेदना आलटुन पालटून होतात.

हृदय :– छातीच्या मध्यभागातून वेदना दोन्ही हातात पसरतात. श्वासोच्छ्वास घेताना छाती फुगत आहे असे वाटत नाही. थोडे श्रम केले तरी दम लागतो.

पाठ :– खाली वाकल्याने अशक्त झाल्यासारखी वाटते.

हातपाय :– नखुरडे-सुरुवातीस नखात टोचावयास लागते. गृध्रसी वात-वेदना वरून खाली येतात (विशेषतः उजव्या पायात). हालचालीने, बसल्याने जास्त होतात, स्वस्थ असले म्हणजे किंवा उभे राहिल्याने बरे वाटते. गुडघ्याच्या मागील पोकळीतील स्नायुबंध आखडले आहेत असे वाटते. नखे ढिसूळ.

**ज्वर** :– चिकट गार घाम येतो. जननेंद्रियावर उग्र घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– अंग घुमडल्याने; निजल्याने; चहा; खाण्याने; संध्याकाळी; रात्री.

**क मी** :– अंग ताठ केल्याने–मागे वाकल्याने. जोराने दाबल्याने. हालचालीने. मोकळ्या हवेत. ताठ उभे राहिल्याने.

**संबंधी औषधे** :– कोलो; मॅग-का.

---

## १६८. डिक्टामनस Dictamnus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम स्त्रीजननेंद्रिये व झोप यावर होतो. स्राव वाढतात. घशात खालून वर गोळा आल्यासारख्या वाटतो. खाली ओढ लागल्यासारखी वाटून पित्ताची ओकारी होते-उभे राहिल्याने जास्त. वारंवार खूप दुर्गंधी वात सरत राहतो. **विटाळाची पाळी** लवकर येते. विटाळात काळ्या गाठी पडतात. विटाळशी होण्याचे अगोदर दिसेनासे होते. स्तनात दूध वाहत आहे असे वाटते. विटाळशी होण्याचे अगोदर मांडीच्या पुढील भागापासून व गर्भाशयापर्यंत पेटके येतात. करवडणारी खूप धुपणी जाते. झोपेत चालणे. स्वतःच्या मुलांची शरीरे एकमेकांशी शिवतो आहोत अशी स्वप्ने पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– उभे राहिल्याने.

**संबंधी औषधे** :– पल्स.

---

## १६९. डिजिटॅलिस Digitalis

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम हृदय; *रुधिराभिसरण-यकृतातील*– फुप्फुसातील व जठरातील डोक्याचा मागील भाग; मूत्रेंद्रिये, व जननेंद्रिये यावर होतो. *अशक्तपणा–मूर्च्छा* आल्याप्रमाणे, बोलवतसुद्धा नाही. हृदयाची क्रिया मंद व त्याचेबरोबर संदिग्ध किंवा ज्यांच्या कारणाचा उलगडा होत नाही अशी लक्षणे उद्भवतात. *हृदयाची क्रिया मंद*, अशक्त किंवा अनिश्चित. हालचाल केली तर किंवा यकृताच्या लक्षणाबरोबर व लैंगिक लक्षणाबरोबर हृदय जलद चालू लागते. वयात येण्याच्या काळात

हृदयाची क्रिया जलद होते. यकृत मोठे व टणक झाल्यामुळे उद्भवलेली कावीळ. हृदयविकारात होणारी कावीळ. थोडेसे श्रम केले तरी थकवा येतो. शक्तिपात. **एकसारखे चालावे असे वाटते.** हृदयाच्या ठिकाणी अस्वस्थता उत्पन्न झाल्यामुळे, वारंवार लघवीला होईल होईलसे वाटते व त्यामुळे चालावे असे वाटते. नाळगुद, हृदय व मूत्रपिंडाच्या विकारामुळे उत्पन्न झालेला. सर्वांगात विजेचा धक्का बसल्यासारखे वाटते.

**मानसिक** :– मनाची चिंतायुक्त अस्वस्थता. पुढे काय होईल याची काळजी वाटते. उदासीनता, गाणे ऐकल्याने, प्रेमभंगामुळे, त्यामुळे झोप येत नाही. सुस्ती. नाडी मंद. वृद्ध इसमांची मूत्रग्रंथी वाढल्यामुळे वैषयिक विचार येतात. भीतिग्रस्त. सर्वांगाचे तुकडे होत आहेत असे वाटते. रात्री जीव गुदमरेल असे वाटते. एकटे असावे असे वाटते.

**डोके** :– चालताना किंवा उठताना घेरी येते. झोप लागता लागता डोक्यात स्फोट होत आहेत असे वाटते. गार पाणी प्याल्यानंतर किंवा आइसक्रीम खाल्ल्यानंतर डोके दुखावयास लागते. उशीत डोके जोराने दाबणे, केश ओढणे.

**डोळे** :– पिवळसर लाल. प्रखर उजेडात किंवा गार वारे लागल्याने डोळ्यात पाणी येते. वस्तु पिवळ्या किंवा हिरव्या दिसतात.

**नाक** :– बुंध्याशी ओकारीनंतर दुखते.

**कान** :– कानात उकळत आहे असे वाटते.

**चेहरा** :– **फिकट, निळसर.** ओठ निळे.

**तोंड** :– गोड व एकसारखी लाळ सुटते. जीभ निळसर. जीभ जाड व बिसबिशित. मळमळ व ओकाऱ्या होताना स्वच्छ.

**जठर** :– अतिशय मळमळ–ओकारीने कमी होत नाही. **भरण येईल की काय अशा तऱ्हेने मळमळते किंवा पोटाच्या खळीत अगदी गळून गेल्यासारखे वाटते.** पोटाच्या खळीत दाबलेले सहन होत. खाणे कमी तहान फार. नुसते अन्नाकडे पाहिले तरी मळमळावयास लागते. पोटात दुखते पण त्याचा खाण्यापिण्याशी संबंध नसतो.

**उदर** :– यकृत हुळहुळे व मोठे होते. पांढरे चिकट शौचास होते. कावीळ झाली असताना हगवण लागते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थेंब थेंब गळते. एकसारखे लघवीला होईल होईलसे वाटते. लघवी कढत – आग होते. लघवी होताना मूत्राशयाच्या मुखाशी कापल्या-

प्रमाणे किंवा ठुसठुसल्याप्रमाणे वेदना होतात. मूत्राशयात गवताची काडी आत बाहेर खुपसल्याप्रमाणे वाटते. मूत्रमार्गाचा शोथ. लघवीनंतर मूत्राशय भरल्यासारखा वाटतो. लघवी होण्याचे बंद होते.

**पुरुषजननेंद्रिये** :– पहाटे शिश्न ताठ होते. वृद्धपणी मूत्रग्रंथी मोठी होते. रात्री वीर्यपात होतो. शिश्नाची बोंडी सुजते. परमा – दाट, पिवळसर पांढरा स्राव वाहतो. वृषणवृद्धि – वृषण पाण्याने भरलेल्या पिशवीप्रमाणे दिसते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळीच्या अगोदर वेणा आल्याप्रमाणे उदरात व पाठीत कळा येतात.

**श्वसनेंद्रिये** :– श्वासोच्छ्वास मंद चालतो. दमा – दीर्घ श्वास घ्यावासा वाटतो. खोकताना खांद्यात व हातात दुखते. कफ गोडसर. कफातून रक्त जाते, हृद्रोगात किंवा जीर्ण खोकल्यात. ओकारीशिवाय कफ बाहेर पडत नाही. छातीत अतिशय अशक्तपणा वाढतो, बोलवत नाही. झोप लागता लागता गुदमरल्यासारखे वाटते त्यामुळे रात्रीची भीती वाटते.

**हृदय** :– अशक्त. हालचाल केली की थांबत आहे असे वाटते म्हणून श्वास रोखून स्वस्थ राहणे भाग पडते. वारंवार टोचते. हात वर केले की कळा येतात. हृदयावर ताण पडल्यामुळे अशक्त होते. जरा श्रम केले तरी धडधडावयास लागते. जरा हालचाल केली तर थांबेल असे वाटते. नाडी मंद मधुन मधून थांबते.

**हातपाय** :– डावा हात अशक्त किंवा बधिर. रात्री हाताची बोटे सुजतात. पायात तापलेली लाल तार खुपसली जात आहे असे वाटते. हाताची बोटे सहज व वारंवार बधिर होतात. पंजे व पाऊले गार. नखे निळी एक पंजा गार, दुसरा कढत.

**झोप** :– गुंगी. वरून खाली पडत आहोत असे वाटून दचकून भीतीने जागे होणे.

**त्वचा** :– गार. पाठीवर गोवराप्रमाणे उगवण. निळी. त्वचेखाली सूज.

**ज्वर** :– उष्ण लहरी अंगात येतात व त्यानंतर अतिशय अशक्तपणा वाटतो विशेषतः विटाळ थांबण्याच्या वयात. घाम गार, चिकट.

**लक्षणांचे वैशिष्ट्य वा ह्रो** :– उभे राहाताना किंवा अवयव, डोके वगैरे उभे करताना; श्रम; उष्णता; डाव्या कुशीवर निजल्याने; अन्नाच्या वासाने; थंड पेये; संभोगातिरेक; संगीत;

**ब वा** :– विश्रांति; गार हवा; पाठीवर सपाट निजल्याने. पोट रिकामे असले म्हणजे ताठ बसल्याने.

**संबंधी औषधे** :– ग्लोनो; स्पायजे.

---

## १७०. डिफ्थेरिनम Diphtherinum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम घसा व रक्त यावर होतो. **वेदनांचा अभाव पण अशक्तपणा व अस्वस्थपणा.** सांध्यात ठणका लागतो किंवा फोडल्याप्रमाणे वेदना होतात, निजल्याने बरे वाटते. स्नायूना ओढ लागते. एखाद्या अवयवात धक्के बसतात. अंतर्गत कंप. घटसर्प–प्रतिबंधक म्हणून या औषधाचा उपयोग होतो. घटसर्पानंतर आलेला लुलेपणा, किंवा इतर उपद्रव विशेषतः घटसर्पावरील इन्जेक्सने दिल्यानंतर झालेले. एखादया स्नायूस धक्के बसतात. स्राव दुर्गंधी. उलटणारा घटसर्प.

**मानसिक** :– वातात काल्पनिक वस्तु दिसतात, काल्पनिक वस्तु उचलण्याची प्रवृत्ति.

**डोके** :– केसाच्या कडेला ओलसरपणा.

**नाक** :– घोरताना किंवा श्वास घेताना नाकाच्या पाळ्या आत बाहेर हालतात. पिवळा दाट शेंबूड पडतो. गिळताना पेये नाकातून बाहेर येतात.

**चेहरा** :– लालसर–गालाचे मध्यभाग निळसर.

**तोंड** :– जीभ ओलसर, टोक लाल, किंवा टोकाच्या खाली लाल काळसर ठिपका.

**घसा** :– काळसर, जाड राखी रंगाचा थर–डाव्या टानसिलावर जमतो. दुर्गंधी. घशात गार गार घ्यावेसे वाटते किंवा गार पेये प्यावीशी वाटतात. वेदनारहित घटसर्प. वारंवार होणारी टानसिलची सूज.

**जठर** :– गळून गेल्यासारखे वाटते, दूध घोट घोट प्याल्याने बरे वाटते.

**हातपाय** :– तळहात कोरडे, कढत, सुरकुतत आहेत असे वाटते.

**झोप** :– झोपेत डोळे उघडे असून बोलणे.

**ज्वर** :– ताप फार नसतो. थंडी वाजते नंतर अंग कढत होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– निजल्याने.

**व वा** :– दुधाने. थंडी.

**संबंधी औषधे** :– कार्बो–ॲसि.

---

## १७१. ड्रोसेरा Drosera

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *श्वसनेंद्रिये*; हाडे; विशेषतः लांब हाडे; सांधे; कंठ; छाती; फुप्फुसे; व गाठी यावर होतो. क्षयरोग प्रतिबंधक म्हणून या औषधाचा उपयोग होतो. क्षयरोग– हाडांच्या, गाठी वगैरे. **आचके,**

फेफरे. रक्तस्राव होण्याची प्रवृत्ती. आवळल्याप्रमाणे वाटणे, घशात, कंठात, जठरात वगैरे.

**मानसिक** :– उगीचच राग येतो. बुडून जीव द्यावा असे वाटते. क्षुल्लक कारणाने बेफाम होणे. एकाच गोष्टीकडे मन लागत नाही. काही तरी नवे करावेसे वाटते. एकटे राहण्याची भीती वाटते. मित्रांचा संशय येतो. स्वतःचा छळ चालला आहे असे वाटते. अतिशय बेचैनपणा. आपला दुस्वास व मत्सर करणाऱ्या लोकांकडून आपण फसविले जात आहोत अशी भावना.

**डोके** :– जड, दाबल्याप्रमाणे वेदना होतात.

**नाक** :– आंबट वास सहन होत नाही. शिंकताना दुखते. खोकताना रक्त येते.

**डोळे** :– खोकताना, आंचके येताना, गोवरात बटबटीत दिसतात.

**चेहरा** :– उजवी बाजू कढत, डावी गार, व नांगी मारल्याप्रमाणे वेदना.

**तोंड** :– चव घाणेरडी. रक्तमिश्रित लाळ.

**जठर** :– आंबट पदार्थांचा तिटकारा व आंबट पदार्थांचे दुष्परिणाम. तेलकट पदार्थ खाण्यानंतर मळमळते. घट्ट पदार्थ गिळता येत नाही. डुकराच्या मांसाचा तिटकारा.

**श्वसनेंद्रिये** :– *मधून मधून बराच वेळ टिकणारी एकसारखी खोकल्याची उबळ येते, खोकला भुंकल्याप्रमाणे खोल, खोकताना गुदमरते.* **खोकला उदरातून सुरु होत आहे असे वाटते, श्वासोच्छ्वास घेता येत नाही; खोकताना दोन्ही बाजू धरून ठेवाव्या लागतात व शेवटी कोरड्या ओकाऱ्या येऊन ओकावयास होते. प्रथम अन्न नंतर पांढरा कफ पडतो, नाकातून रक्त येते, किंवा गार घाम येतो.** खोकल्याच्या उबळीनंतर बडबड करावीशी वाटते. डांग्या खोकला. लहान मुलांचा त्रासदायक खोकला. दिवसा नसतो पण रात्री अंथरुणावर डोके टेकले की सुरवात होते; कंठात मुसाने किंवा पिसाने गुदगुल्या होत आहेत असे वाटते. कफ पुवळलेला व रक्तमिश्रित. **आवाज बसलेला** किंवा नादरहित. छातीत **आवळल्यासारखे वाटते.** बोलताना, गाताना जास्त. काखेखाली टोचते. बोलताना दम लागतो व प्रत्येक शब्दागणिक घशात आवळल्यासारखे वाटते. आंचके आल्यानंतर थुंकीतून रक्त येते. शिंकताना किंवा खोकताना छातीत टोचते. खोकताना किंवा नंतर होणारी लक्षणे.

**हातपाय** :– लिहिणाऱ्यांच्या बोटांना पेटके येतात. हातात धरलेली वस्तू सोडता येत नाही, हाताची बोटे आखडतात व घट्ट होतात. उजव्या कटिसांध्यात

व मांडीत वेदना होऊन घोटे दुखावयास लागतात, चालताना लंगडावे लागते. हातपाय हुळहुळे. अंथरुण टणक आहे असे वाटते.

**त्वचा** :– कंड, चोळण्याने किंवा हाताने पुसण्याने कमी होते.

**ज्वर** :– थंडी वाजताना चेहरा कढत होतो, पंजे गार होतात. अंथरुणातसुद्धा पुरेशी ऊब आली आहे असे वाटत नाही. डांग्या खोकल्यात ताप येतो. स्वस्थ असले म्हणजे थंडी वाजते, हालचालीने बरे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **मध्यरात्रीनंतर; निजल्याने; बोलताना;** उष्णता; गार अन्न; गोवरानंतर; हसताना; गाताना; पिताना.

**ब वा** :– दाबल्याने.

**सहाय्यक औषधे** :– कार्बो–व्हेजि; नक्स–व्हा; सल्फ.

**संबंधी औषधे** :– कॅल्क–का; कोक–कॅ; कोनि; कोरा–रु; पल्स; व्हेरा-आ; सल्फ; सिना.

---

## १७२. थायराडिनम Thyroidinum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **हृदय**; उजवी बाजू व त्वचा यावर होतो. तुकडे झाल्यासारखे वाटणे-छाती–कणा वगैरे. मुठीत धरून आवळल्यासारखे वाटणे; गुदमरल्यासारखे वाटणे. पडून रहावेसे वाटते. घाबरटपणा. मूर्च्छा येते. शरीर झपाट्याने वाळत जाते. अनैसर्गिक जाडपणा किंवा लठ्ठपणा. मुलांचे वृषणात न उतरलेले अंड. डोळे पुढे येतात. नाडी जलद चालते. त्वग्रोग. स्तनांची करटे. गर्भाशयाची गुल्मे. गरोदरपणची ओकारी. थकल्यासारखे व आजाऱ्यासारखे वाटते, अंथरुणात पडून रहावे असे वाटते. मूर्च्छा येते. लहान मुलांची वाढ खुंटते. कंप. अशक्तपणा आला म्हणजे साखर खावीशी वाटते व ती खाल्ल्याने बरे वाटते. वेड. आंचके. अंगाला थंड वारे लागते आहे असे वाटते. लहान मुलांचे वाळणे. तुटलेली हाडे लवकर जुळून येत नाहीत.

**मानसिक** :– थकवा पण **चिडखोरपणा**. किरकोळ गोष्टीने रागावणे. अंगावरचे कपडे काढून रडणे. गुंगी व अस्वस्थ उदासीनता आलटून पालटून. खून करण्याची प्रवृत्ति. संशयी. छळ चालला आहे असे वाटते. कुरकुर.

**डोके** :– डोळ्यावर जडपणा येऊन दुखते. केस गळून पडतात. मेंदू हलका झाला आहे असे वाटते.

**डोळे** :– पुढे येतात, गलगंड होऊन. हळुहळु पाहण्याची शक्ती कमी होत जाते.

**नाक** :– घरात कोरडे असते, उघड्या हवेत ओले होते.

**तोंड** :– ओठ कोरडे व लाल. तांब्याच्या धातूप्रमाणे जिभेच्या टोकाला चव. जिभेवर जाड थर.

**घसा** :– घसा व कंठ कोरडा. घशात आरपार काटा खुपसला आहे असे वाटते.

**जठर** :– गोड खावेसे वाटते. गार पाण्याची तहान लागते.

**उदर** :– यकृताच्या जागेत कापल्याप्रमाणे वेदना होतात, दीर्घश्वास घेतल्याने जास्त होतात. वात धरून तो इकडे तिकडे फिरतो–गुडगुड आवाज होतो नंतर जुलाब होताना वारे जाते. ओटीपोटात खाली ओढ लागून त्या वेदना मांडीत जातात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला फार होते. अशक्त मुलांना अंथरुणात लघवी होते. लघवी सुवासिक. मधुमेह.

**स्त्रीजननेंद्रिये** :– ओटीपोटातून मांड्यापर्यंत ओढ लागते किंवा ठणका लागतो. गर्भाशयात कुरतडल्यासारखे वाटते. बाळंत होताना आचके येतात. नष्टार्तव.

**श्वसनेंद्रिये** :– गारव्यातून खोलीत शिरल्याने खोकला येतो व घशाशी जळजळ होते. कंठ कोरडा. आराम खुर्चीवर निजल्याने दम कमी होतो.

**हृदय** :– धडधडते, अगदी थोड्या श्रमाने मुठीत आवळल्यासारखे वाटते त्यामुळे दम लागतो. हृदयाचे ठोके कानात घण मारल्याप्रमाणे ऐकू येतात. वेदना काखेपर्यंत जातात. रक्त वरून खाली जोराने वाहत आहे असे वाटते. कष्टदायक श्रमाने हृदय मोठे होते. हृदय उड्या मारीत आहे असे वाटते.

**हातपाय** :– अतिशय श्रमामुळे झालेली अवास्तव वाढ. डाव्या हाताची बोटे बधिर होऊन नंतर उजवा पाय बधिर होतो. हातावर व पंज्यावर शिरा फुगलेल्या दिसतात. हातापायात थरथरते, कापतात. डावा पंजा बर्फासारखा गार. पंजे गार, चिकट.

**त्वचा** :– अतिशय कोरडी. अंगावर गार वारे वाहात आहे असे वाटते. उगवण न येता खाज सुटते. काखिळीत कंड येते.

**ज्वर** :– अंगात उष्ण लाटा आल्यासारखे वाटून नंतर थंडी वाजते किंवा भरपूर घाम येतो. घाम तेलकट. कुबट.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** **आ हो** :– जराशी थंडी किंवा किंचितही श्रम.

**ब वा** :– पोटावर निजल्याने. आराम खुर्चीवर पडल्याने.

**संबंधी औषधे** :– कॅल्क-का; ग्लोनो.

---

## १७३. थूजा Thuja Occidentalis

सर्वसाधारण :– या औषधाचा परिणाम श्लेष्मल त्वचा– *मूत्र–जननेंद्रियांची* व आतडी; **मन**; मज्जातंतु; डोक्याचा मागील भाग; **गाठी**; *त्वचा*; डावी बाजू व रज:पिंड यावर होतो. **शरीर विसविशित व थकलेले**; अतिशय थकवा; शरीर झपाट्याने वाळते. **मऊपणा**. **मांसांकुरांची** अवास्तव वाढ-मोड मस, चामखीळ-देठ असलेली, काळी वगैरे. बाह्योपचाराने चामखिळ-मस याना बरे केल्याने झालेले दुष्परिणाम. दुर्गंधी-तिखट कुबट; कुजकट, **वास**. तेलकट-त्वचा-शौच-घाम. **थेंब थेंब वाहत आहेत** असे वाटते विशेषत: मूत्रमार्गात. आग होते. टोचल्याप्रमाणे-ओढल्याप्रमाणे किंवा **इतस्तत: फिरणाऱ्या वेदना** होतात व त्या उष्णतेने जास्त होतात. बधिरपणा येतो. संधिवात. धक्के बसणे. बाह्योपचाराने परम्याचा स्राव बंद केल्याने झालेले दुष्परिणाम. देवी टोचण्यामुळे झालेले दुष्परिणाम. विकार झालेला भाग मृतवत दिसतो. तंबाखूचे दुष्परिणाम. शरिराच्या वरच्या भागात धक्के बसतात. कंपवात. हाडापासून मास सुटून लोंबत आहे असे वाटते. चालताना शरीर हलके आहे असे वाटते. रडणारी तान्ही मुले. मूळ जागेपासून वेदना एकसारख्या पसरत जातात. शरीर बारिक, नाजुक व त्याचे तुकडे होतात असे वाटते. गाठीत फाडल्या, टोचल्यासारख्या वेदना होऊन त्यांचे तुकडे होत आहेत असे वाटते.

मानसिक :– चिडखोर, खिन्न, आयुष्याचा तिटकारा. **मनात भ्रामक कल्पना** येतात नंतर त्यापैकी **काही मनात ठाम होतात**. शरीर व आत्मा वेगळे आहेत असे वाटते. शरीर काचेचे आहे असे वाटते, शरीर ठिसूळ आहे असे वाटते, **आत काही जिवंत फिरत आहे असे वाटते**, जवळ कोणीतरी आहे असे वाटते. आपण दुसऱ्या जबरदस्त शक्तीच्या ताब्यात आहोत असे वाटते. किरकोळ गोष्टीत **चिंताग्रस्त व उतावीळ**. मनाची एकाग्रता होत नाही. संगीत ऐकल्याने रडू येते व कापरे भरते. जलद बोलणे किंवा शब्द गिळणे. आपल्याला कोणी जवळ येऊन स्पर्श करू नये असे वाटते ( स्त्रियांना ). वाऱ्याची, हिरव्या रंगाच्या पऱ्याची भीती वाटते. चिडखोर, भांडखोर, मत्सरी, मुलाच्या, नवऱ्याच्या बाबतीत पण परक्यांचा देखत मनावर ताबा.

डोके :– घेरी येते – झोपाळ्यावर झोके घेत आहोत असे वाटते, डोळे मिटल्याने वर किंवा बाजूस पाहिल्याने जास्त. डोक्यात फाडल्याप्रमाणे वेदना

होतात किंवा खिळा मारल्याप्रमाणे वाटते विशेषतः डाव्या बाजूस. केस कोरडे व दुभगतात; गळतात. संभोगातिरेकाने डोके दुखते, मान मागे वाकविल्याने बरे वाटते. डोक्यातून पांढरा कोंडा जातो. गोडुस वास असलेला घाम येतो.

**डोळे** :– रक्तासारखे लाल; पाण्याने भरलेले; उघडे राहतात. रांजणवाड्या येतात किंवा गाठी येतात. डोक्यातून गार वारे डोळ्यातून बाहेर येत आहे असे वाटते, गरम फडके गुंडाळल्याने बरे वाटते.

**कान** :– पाण्यासारखा, पुवळलेला, दुर्गंधी स्राव येतो. गुटका गिळताना कानात कटकट आवाज होतात. पाणी उकळल्याप्रमाणे आवाज होतात.

**नाक** :– रक्ताच्या खपल्या बसतात किंवा नाकात मासासारखा वास येतो. नाकातून रक्त येण्याची प्रवृत्ति. नाक शिंकरताना दात दुखतात. दाट हिरवा शेंबूड.

**चेहरा** :– फिकट, शेणाप्रमाणे, पांढरा तुकतुकीत, डोळ्याखाली काळसर. चेहऱ्यावर कोळिष्टके चिकटल्याप्रमाणे शिरा दिसतात. गालाच्या उंचवट्यावर उकरल्याप्रमाणे वेदना होतात, स्पर्शाने जास्त. त्वचा तेलकट.

**तोंड** :– हिरड्यांच्या कडाजवळ दात कुजतात. कुरतडल्याप्रमाणे दातांना वेदना होतात, थंडीने किंवा चहा घेतल्याने जास्त होतात. जिभेच्या कडाशी बुंध्याशेजारी पांढरे फोड येतात व ते अतिशय दुखतात. जिभेखाली लाल गोळा उत्पन्न होतो. दातांचे तुकडे पडतात, ते पिवळे होतात. जीभ वारंवार चावली जाते. चव गोडुस.

**घसा** :– कफ साचतो व तो खाकरताना त्रास होतो.

**जठर** :– पेये गिळताना आवाज होतो. मोठ्या आवाजाच्या ढेकरा येतात. करपट किंवा तेलकट ढेकरा. चहाबाज लोकांचे अग्निमांद्य. कांदे सोसत नाहीत. बटाट्यांचा व ताज्या मांसाचा तिटकारा.

**उदर** :– उदरात ठोसल्यासारखे वाटते, पिळवटून कापल्यासारखे वाटते. विशेषतः आतड्यात, जांघात, मूत्राशयात, मूत्रमार्गात. आतड्याचे चलनवलन बंद होते. गुडगुड आवाज होऊन नंतर गवतासारखे हिरवे किंवा पाण्यासारखे वेदनारहित जुलाब होतात. शौचास होताना गुडगुडल्यासारखा आवाज होतो किंवा ते फटदिशी बाहेर येते–सकाळच्या न्याहारीनंतर जास्त होते. शौचात टणक काळ्या गाठी पडतात व त्याबरोबर जोराने पाणी बाहेर येते. वात

सरतो. गुदद्वार व आसपासचा भाग ओलसर. मुळव्याधीचे मोड सुजलेले त्यामुळे बसल्याने त्रास होतो. गुदद्वारात टोचते, आग होते. गुदद्वारात भेगा पडतात. मासांकुरांची वाढ. उदर मोठे फुगलेले, मध्ये इकडे तिकडे उंचवटे दिसतात. आत काहीतरी जिवंत फिरत आहे असे वाटते ( वृद्ध कुमारिका ). उदराचा वरचा भाग आत गेलेला.

**मूत्रेंद्रिये** – लघवी होताना आग होते. लघवी थेंब थेंब गळते, दुर्गंधी किंवा भरपूर होते. वारंवार जावे लागते. लघवीला बसल्यानंतर काही वेळाने लघवी सुटते. डावे मूत्रपिंड ते पोटाच्या खळीपर्यंत वेदना होतात–हालचालीने जास्त. मूत्रमार्गात आतून बाहेर कापल्यासारखे वाटते. मूत्रग्रंथी मोठी होते. मूत्राशयात कापल्या-पिळल्याप्रमाणे वेदना होतात. लघवीची धार दुभंगलेली व लहान. मूत्रमार्गात लघवीचा थेंब वाहत आहे असे वाटते. रात्री खोकताना लघवी न कळत होते. मधुमेह.

**पुरुषजननेंद्रिये** :– घाण येते. अंड ठेचल्याप्रमाणे वाटतात. बोंडीवरची कातडी सुजते, कुजते. परमा, लघवी होताना भाजल्यासारखी आग होते. शिश्न ताठ होऊन दुखते, रात्री. मूत्र ग्रंथि मोठी होते. वृषणाला गोंडुस वासाचा घाम येतो. अंड मार लागल्याप्रमाणे दुखतात व वर उचलले जातात. बोंडीवर मासांकुर येतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– रजःपिंडात फाडल्याप्रमाणे वेदना होतात (डाव्या), विटाळसेपणी जास्त. **योनी अतिशय हुळहुळी**, संभोग करताना अडथळा येतो व कंड सुटते. धुपणी दाट हिरवी. विटाळ कमी जातो किंवा जातच नाही. विटाळशी होण्याचे अगोदर इंद्रियाना खूप घाम येतो. मोड मासांकुरांची वाढ, रक्त येते. स्तनांची बोंडे आत जातात. गर्भ जोराने फिरतो, त्यामुळे जाग येते. तिसऱ्या महिन्यात गर्भपात होतो.

**श्वसनेंद्रिये** :– श्वास वरवर व कष्टाने होतो. दमा. छातीत निरनिराळ्या जागी टोचते. लहान मुलांचा दमा ( आर्सेनिक नंतर घ्यावे ). फक्त दिवसा खोकला येतो, गार अन्न पेयाने जास्त. निजल्याने कफ लवकर बाहेर येतो. कफ दह्याप्रमाणे. छातीतील वेदना निरनिराळ्या ठिकाणी जातात. गळ्याखालच्या हाडावरील त्वचा निळी होते. छातीवर पिंगट ठिपके पडतात.

**हृदय** :– धडधडते व त्यावेळेस काळजी वाटते.

**पाठ** :– पाठीत ठुसठुसते. मूत्रपिंडाच्या जागी दाबल्यासारखे वाटते. स्नायू वाळतात. कुबड, वाकून उभे राहावे लागते. रक्ती गळवे येतात.

**हातपाय** :– सांध्यात आवाज होतात. हाताची बोटे बधिर व गार होतात विशेषत: रात्री, झोपेतून जागे झाल्यानंतर. हातापायांच्या बोटांची टोके सुजतात किंवा त्याना मुंग्या आल्यासारखे वाटते. कमरेचे सांधे चालताना निखळल्यासारखे वाटतात. हात पाय लुले पडल्यासारखे वाटतात. गुडघ्यात अस्वस्थपणा वाटतो. **तळपाय दुखतात.** चालताना पाय लाकडाचे किंवा काचेचे आहेत असे वाटून ते सहज मोडतील असे वाटते. पावलाना करवडणारा दुर्गंधी घाम येतो. टाच व टाचेच्या स्नायुबंधात दुखते. नखे मांसात रुततात. नखे दिसूळ, मऊ, रंगीबेरंगी, वेडीवाकडी, त्यावर एकावर एक असे खवले बसतात. संधिवात परमा बंद केल्यानंतर.

**त्वचा** :– पिंगट, **चट्टे पडलेली**, अस्वच्छ, केसाळ. गार पाण्याने उगवणीत अतिशय कंड सुटते व आग होते. मोड–ओलसर–दुर्गंधी. व्रण–निळसर पांढरे. त्वचेत नांगी मारल्याप्रमाणे वाटते किंवा आत काहीतरी उडत आहे असे वाटते. खरूज. पाठीवर रक्ती गळवे येतात. **दुर्गंधी फोड**–त्यांची तोंडे बसलेली. कपड्यानी झाकलेल्या जागी उगवण येते.

**झोप** :– डाव्या कुशीवर झोप येत नाही. मेलेल्या इसमांची, वरून खाली पडत आहोत अशी स्वप्ने पडतात. निद्रानाश.

**ज्वर** :– हुडहुडी भरून जांभया येतात–उष्णतेने बरे वाटत नाही. लघवी करताना थंडी वाजते. मांड्यातून थंडी सुरू होते. छाती फटत झाल्यासारखी वाटून **पंजे बर्फासारखे गार होतात,** नाकातून रक्त पडते किंवा खोकला येतो. उघड्या अंगाला घाम येतो व कपडे असलेल्या अंगात कोरडी उष्णता भासते, पंजे गार होतात, धुतल्याने बरे वाटते. **जननेंद्रियांना भरपूर घाम येतो** विशेषत: मंडळीत बसल्याने. घाम दुर्गंधी, तिखट वासाचा, गोंडुस किंवा लसणीसारखा व त्याने डाग पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *दमट थंडी*; उष्णता–अंथरुणाची; नियमित वेळी पहाटे ३ वा, व दुपारी ३ वा. प्रतिवर्षी; विटाळसेपणी; चंद्रकला वाढत असताना; लघवी करताना; परमा; गरमी; पारा; देवी टोचणे; चहा, कांदे, तेलकट पदार्थ; उन्ह. चघळताना; प्रखर उजेड, ताणल्याने.

**क था** :– गरम वारे; डोके गुंडाळण्याने; **भरपूर स्राव गेल्याने; शिंकल्याने,** हालचालीने; पायाची अढी घातल्याने; स्पर्शाने; हातपाय आखडल्याने.

**सहाय्यक औषधे** :– आर्से; नाय–ॲसि; नेट्र–स; **पल्स; मर्क्यु;** मेडो; **सल्फ;** साबि; **सिलि.**

**संबंधी औषधे** :– असाफि; इग्ने; कलि–का; कॅल्क–का; लायको.

---

# १७४. थेरिडिआन Theridion

सर्वसाधारण :– या कोळयाच्या विषाचा परिणाम *मज्जातंतु*; कणा; हाडे; डावीबाजू–डोके-छाती; यावर होतो. *आवाज असह्य होतो, शरीर भेदून जात आहे असे वाटते.* काही सहन होत नाही. आवाजाने दात दुखावयास लागतात, मळमळते, थंडी वाटते, सर्व शरीरात वेदना होत आहेत असे वाटते, वेदना होत असलेल्या जागी जास्तच दुखावयास लागते. पाणी आहे त्यापेक्षा जास्त गार लागते. आत कोणी तरी उड्या मारीत आहे असे वाटते. हाडे मोडल्यासारखी वाटतात, कुजतात. क्षय–डाव्या फुप्फुसाच्या वरच्या टोकात टोचते. योग्य निवड केलेल्या औषधाची क्रिया टिकत नाही. हिस्टेरिआ. मुलांचे वाळणे, गाठी मोठ्या होतात व शरीर वाळते. आग होते. नांगी मारल्याप्रमाणे वेदना. सूर्याघात.

मानसिक :– क्षुल्लक गोष्टीने दचकणे. निरर्थक चाळा करावासा वाटतो. आपण दोन आहोत असे वाटते. कोठल्याही गोष्टीत मन रमत नाही. वेळ भराभर जात आहे असे वाटते. बडबड व आनंदी असणे.

डोके :– मळमळून घेरी येते विशेषतः डोळे मिटल्याने, वाकल्याने, थोड्या हालचालीने, गुडघे टेकल्याने. जरा हालचाल केली तर मळमळते, घेरी येते व ओकावयास होते. डोके झोपेत दुखावयास लागते-धक्का लागल्याने जास्त दुखते. डोके जाड झाले आहे असे वाटते; आपले स्वतःचे नसून दुसऱ्याचे आहे असे वाटते, स्वतःचे डोके आपण वर उचलून किंवा दूर करू शकू असे वाटते. डोके शौचानंतर जास्त दुखावयास लागते. डोके दुखत असताना निजवत नाही.

डोळे :– डोळ्यापुढे चमचमाट होऊन नंतर दृष्टी अंधुक होते. खाली वाकताना डोळ्यापुढे काजवे चमकतात. दृष्टि मंद होऊन नंतर डोके दुखते.

कान :– थोडा आवाज, प्रत्येक नाद सर्व शरिरात पसरत आहे असे वाटते, विशेषतः दातात. धबधब्यातून पाणी पडत आहे असा आवाज होतो.

नाक :– नाकाच्या बुंध्यावर दुखते. पिनस. पिवळा हिरवट दाट दुर्गंधी नाकातून स्राव येतो. नाकाच्या मागे घशातील भागातून स्राव येतो.

चेहरा :– फिकट, जबडा हालत नाही, विशेषत सकाळी.

तोंड :– आपोआप उघडे राहते, बंद करता येत नाही. हुडहुडी भरली असताना तोंडाला फेस येतो. गारपाणी दाताना जास्त गार लागते. तोंडाला बुरा चढला आहे असे वाटते, बधिर होते. झोपेत जिभेचे टोक चावले जाते.

**जठर** :– जरा हालचाल केली की मळमळते. आगबोट लागते. सारखे काहीतरी खावेस्यावेसे वाटते पण काय ते समजत नाही. केळी, नारिंग, आंबट फळे, पेये, दारूची इच्छा.

**उदर** :– यकृतात आग होते. पांथरीवर नांगी मारल्याप्रमाणे वेदना होतात. जांघांत संभोगानंतर दुखावयास लागते, किंवा हालचालीने, मांडी दुमडल्याने जांघांत दुखते. यकृतात गळू होते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला फार होते, रात्रीची.

**पुरुषजननेंद्रिये** :– दुपारच्या झोपेत वीर्यपात होतो. मूत्रग्रंथि मोठी होते. शिश्नणीत गोळा बसल्यासारखे वाटते

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ सुरू होण्याच्या व थांबण्याच्या काळांत हिस्टेरीआ होतो. नष्टार्तव.

**श्वसनेंद्रिये** :– **खालच्या डाव्या बरगड्यांच्या छातीकडील टोकाशी वेदना** होतात. छातीत फार हवा जात आहे असे वाटते. डाव्या फुप्फुसाच्या वरच्या टोकात टोचते. भयंकर **खोकला** येतो व त्याने शरीर एकत्र गोळा होते. क्षय.

**हृदय** :– हृदयाजवळ दुखते त्यामुळे चिंता वाटते. वेदना हात व डाव्या खांद्यापर्यंत जातात. घेरी येताना नाडी मंद होते.

**पाठ** :– कणा अतिशय हुळहुळा त्याला दाब किंवा धक्का लागलेला सहन होत नाही. नांगी मारल्याप्रमाणे वेदना.

**हातपाय** :– वरच्या हातात आग होते. पंज्यात अस्वस्थपणा वाटतो, त्यामुळे ते पिळवटावेसे वाटतात. जांघात संभोगानंतर दुखते. कोपर ते खांद्यापर्यंत नांगी मारल्याप्रमाणे वेदना होतात. पाऊलावर पांघरुण घेऊन निजणे, ते उघडे टाकवत नाहीत.

**त्वचा** :– त्वचेत **नांगी भोसकल्याप्रमाणे वाटते**. कंड.

**ज्वर** :– अंतर्गत गारवा. गार घाम उगीचच्या उगीच येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य ज्या हो** :– *आवाज*; स्पर्श; *डोळे मिटल्याने*; जराशी हालचाल; धक्का; गाडी, आगबोट; संभोग. कपडे धुतल्याने.

**क मा** :– सपाट निजल्याने, विश्रांति, उष्णता.

**संबंधी औषधे** :– असार; सिलि.

---

## १७५. नक्स मोस्चेटा ( जायफळ ) Nux Moschata

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **मन; *मज्जातंतु, स्त्रीजननेंद्रिये*; पचनशक्ति;** लहान मुले व वृद्ध बायका यावर होतो. कोणत्याही विकारात किंवा विकारामुळे ***मनस्वी गुंगी* येते.** दिवसा-श्रमामुळे-विटाळसेपणी उदरात वात धरला असताना गुंगी येते. कोरडेपणा (श्लेष्मल त्वचेचा) पण *तहान लागत नाही*. अंग थंडगार होते. वेदना इतस्ततः फिरतात. जडपणा जिभेचा–डोळे वगैरे. रक्तस्राव काळसर. वाळक्या स्त्रिया व ज्याना **उगीचच्या उगीच मूर्च्छा येते** अशा स्त्रिया. शौचाचे वेळी किंवा विटाळसेपणी थोड्याशा वेदनामुळे, रक्त पाहिल्याने मूर्च्छा येते. **रडणे व हसणे** आळीपाळीने स्तन लहान असतात. जठरात–यकृतात – घशात वगैरे टणक गोळा आहे असे वाटते. चालण्याचा प्रयत्न केला तर झोकांडे जातात. हिस्टेरिआ. आपोआप हालचाल, किंवा कांही कृत्ये घडतात. लहान मुलाना हगवण झाली असताना आंचके येतात. फेफरे असताना बेशुद्धि येत नाही. लुळे पडलेल्या भागाना आचके बसतात त्याना कंप येतो. मानसिक श्रम, धास्ती, उगवण बाह्योपचाराने बंद केल्यामुळे झालेले उपद्रव.

**मानसिक** :– स्वप्नात असल्याप्रमाणे. भविष्यज्ञानी. अंतर्ज्ञानी. वस्तु आहेत त्यापेक्षा मोठ्या दिसतात किंवा बदललेल्या दिसतात मनात आलेले विचार एकदम नाहीसे होतात. बोलताना वाचताना, लिहिताना चुकीचे शब्द वापरणे, डोके दुखीत, पूर्व गोष्टींची पूर्ण विस्मृति. मेंदूचा थकवा. मोठ्याने बोलणे, स्वतःशी चेष्टा करणे, थट्टा करणे, हसणे, नक्कल करणे. स्वतःला दोन डोकी आहेत असा भ्रम, आपण दोन आहोत असा भ्रम वेड; असंबद्ध हास्यास्पद हातवारे करणे. सभोवतालची जागा, परिस्थिती बदलली आहे असे वाटणे, नेहमीचे रस्ते ओळखत नाहीत. थोडा वेळ म्हणजे दीर्घकाळ वाटतो; तरंगत आहोत असे वाटते.

**डोके** :– **घेरी येते,** हवेत तरंगत आहोत असे वाटते. मोकळ्या हवेत चालताना घेरी येते. डोके **आखात** दुखते, जोराने दाबल्याने बरे वाटते. घेरी आली असताना मोकळ्या हवेत चालताना दारू प्याल्याप्रमाणे झोकांडे जातात, डोके भरल्यासारखे वाटून रुंद होत आहे असे वाटते. मेंदू सैल होऊन चालताना कवटीवर आपटतो आहे असे वाटते. वेदनारहित ठुसठुसते. आचके आल्याप्रमाणे डोके हलते, त्यामुळे बोलता व गिळता येत नाही.

**डोळे** :- वस्तु मोठ्या दिसतात, दूर आहेत असे वाटते, दिसेनाश्या होतात किंवा लाल दिसतात. दिसेनासे होऊन मूर्च्छा येते. डोळे कोरडे त्यामुळे पापण्या हालविताना त्रास होतो

**कान** :- तीक्ष्ण. दूरचे आवाज मोठ्याने ऐकू येतात.

**नाक** :- तीक्ष्ण. नाकातून काळे रक्त येते. कोरडे; चोंदते.

**चेहरा** :- फिक्ट. ओठ विलग होतात. खुळ्या मुलाप्रमाणे.

**तोंड** :- दात ओढल्यासारखे वाटतात. **तोंड व घसा कोरडा पडतो पण तहान लागत नाही**, झोपेत जास्त. जीभ टाळ्याला चिकटते. दाट, कापसाप्रमाणे लाळ. खडूसारखी चव. गरोदरपणी दात दुखतात, उष्णतेने बरे वाटते. खडू सारखी चव. जीभ बधिर; लुली पडते.

**जठर** :- खाताना किंवा अन्नाचा विचार मनात आला तर अन्नाचा तिट-कारा येतो. अग्निमांद्य. घसा कोरडा, गिळावयास त्रास होतो. अतिशय चमचमीत मसाल्याचे पदार्थ खावेसे वाटतात व तेच पचतात. पचनक्रिया मंद, खाल्लेल्या अन्नाचा वात तयार होतो. गर्भाशयात पेसरी घातल्यामुळे मळमळते व ओकावयास होते.

**उदर** :- अतिशय फुगते. काही खाल्ले तरी वात धरतो. वातामुळे **मुरडा होतो.** ओटीपोटावर फळी ठेविली आहे असे वाटते. **शौचास मऊ असले तरी कष्टाने बाहेर येते.** शौचास दुर्गंधी – चिक्कटधमक होते. खाल्ल्यानंतर शौचास जावे लागते विशेषतः रात्री. शौचास होताना किंवा नंतर मूर्च्छा येते. बेंबी हुळहुळी, पुवळते. उन्हाळी हगवण.

**मूत्रेंद्रिये** :- दारू प्याल्यामुळे, हिस्टेरिआत, वाख्यानंतर, गर्भाशयाच्या विकारामुळे लघवीला कष्टाने व थेंब थेंब होते.

**जननेंद्रिये** :- **विटाळ दाट काळसर. पाळी अनियमित, विटाळाचे प्रमाण अनियमित,** विटाळ बंद होतो व त्यामुळे वारंवार मूर्च्छा व गुंगी येते. योनीतून वारे जाते. विटाळाच्या ऐवजी धुपणी जाते. धुपणी गढूळ रक्तमिश्रित. बाळंतपणाच्या वेणा मंद किंवा अनियमित. स्तन अतिशय लहान. पेसरी घातल्यामुळे गर्भाशयांत दुखते. विटाळ एकसारखा व भरपूर जातो.

**श्वसनेंद्रिये** :- **वाऱ्यातून चालताना आवाज बसतो.** अंथरुणाच्या उबेने खोकला थांबतो.

**हृदय** :– धडधडते–चालण्याने गरम पाणी प्याल्याने बरे वाटते. नाडी अनियमित अशक्त. खिन्नता, भीती, धास्ती वाटल्याप्रमाणे हृदय धडधडते. फडफडते. नाडी इतका वेळ थांबते की मरण आले की काय असे वाटते पण पुन्हा सुरू होते.

**पाठ** :– कधी कण्यात तर कधी कमरेत तीव्र वेदना होतात. पाठीचा कणा दुखतो गाडीत पाठीत दुखते. गुदास्थित व माकडहाडांत वेदना होतात.

**हातपाय** :– तळहात कोरडे. थोडे श्रम केले तरी थकतात. हवेत तरंगत आहेत असे वाटते. संधिवात – दमट थंड हवेत, गार पावसाळी हवेत जास्त होतो. उष्णतेने बरे वाटते. पंगुपणा, हिस्टेरिआत.

**त्वचा** :– कोरडी गार.

**झोप** :– अतिशय गुंगी व घेरी येते. बेशुद्धी. सर्व तक्रारीत गुंगी येते

**ज्वर** :– थंडी व ताप आलटून पालटून. थंडी वाजताना गुंगी येते. लाल घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **गार पाण्याचे स्नान; दमट थंडी; गार वारे;** धुके; पावले गार झाल्याने; **गरोदरपणी;** ऋतु बदलताना; **भावनामुळे; विटाळसेपणी;** धक्का; खरचटणे; क्षुल्लक कारणे; मानसिक धक्का किंवा **श्रम;** उन्हाळ्यांत; उष्ण हवा; हालचाल. वेदना होत असलेल्या बाजूस निजल्याने.

**ब वा** :– **कढत पाण्याने शेकल्याने;** खोलीची उष्णता; कोरडी हवा.

**सहाय्यक औषधे** :– कॅल्क–का; लायको.

**संबंधी औषधे** :– ओपि; कॅनॅबि; क्रोक; गेल्से; मोस्क; व्हस–टा.

---

## १७६. नक्सव्हामिका (कुचल्याची बी) Nux Vomica

**सर्वसाधारणः**– या औषधाचा परिणाम *मज्जातंतू; पचनेंद्रिये–जठर–यकृत–* आतडी; *श्वसनेंद्रिये*; व पुरुष यावर होतो. कोणतीहि *क्रिया अत्यंत झपाट्याची* असली तरी ती अनियमित असते, मधून मधून होते व अर्धवट राहते, एखादी क्रिया होईल होईलशी वाटते पण होत नाही. शरीर व मन संत्रस्त व त्याना काहीही सहन होत नाही. **पिळवटल्याप्रमाणे वाटणे; धक्के बसणे;** आचके येतात पण शुद्धी असते. ताणून अखडल्यासारखे वाटणे, चमका मारणे. आत काहीतरी खरखरीत वस्तु आहे असे

वाटते. मार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा; *उदराचा*-मेंदूचा वगैरे. *आत* खरवडल्यासारखे वाटून *हुळहुळेपणा* वाटतो–घसा, कंठ वगैरे. **वारंवार सर्दी होते.** पित्त प्रकृति. **मूर्च्छा येते**– ओकारीनंतर–वेण। आल्यानंतर वगैरे. किडकिडित, उद्योगी इसम. घरात बसून मानसिक श्रम करणारे इसम. चैनी व विलासी इसम. खाण्यापिण्याच्या बाबतीत चोखंदळ इसम. आपल्याला कोणते पचेल किं पचणार नाही या बाबतीत नेहमी प्रयोग करणारे. अग्निमांद्यानी पछाडलेले इसम. विकार होण्याच्या अगोदर वेदना व्हावयास लागतात. एकाच वेळी अनेक कार्यात पडणारे इसम. अनेक प्रकारची औषधे घेतलेले इसम. दारू, मुष्टिमैथुन, संभोगातिरेक यामुळे उत्पन्न झालेले दुष्परिणाम. रक्तस्राव होण्याची प्रवृत्ति, शौचास होताना फेफरे, आचके येतात. कंप, लुलेपणा.

**मानसिक** :– दुसऱ्यांचे दोष दाखविण्याची प्रवृत्ति. **उद्योगी, चपळ, रागीट व उतावीळ. वेदना असह्य होतात** त्यामुळे वेड्यासारखे वागणे, रडणे, **आस्थेवाईक, घाबरट व प्रक्षुब्ध.** टोचून बोलणे. द्वेष करणे. निष्कारण खिन्न व चिडखोर. दरिद्री होऊ अशी भीती वाटते. मनात येतील त्या **भयंकर गोष्टी** करण्याची प्रवृत्ति. आततायीपणा. आपले लग्न झाले तर कसे होईल. याची अतीशय भीती वाटते. वेळ सावकास जात आहे असे वाटते. दुसऱ्याचे संभाषण, वाचणे सहन होत नाही. समाधान केले तर राग येतो.)

**डोके** :– पोट रिकामे असले म्हणजे **घेरी येते**–डोळ्यापुढे अंधारी येते किंवा क्षणभर बेशुद्ध झाल्यासारखे वाटते. घेरीत मेंदू किंवा इतर वस्तू चक्राकार फिरत आहेत असे वाटते. डोक्याची कातडी हुळहुळी. कपाळ फुगलेले. कपाळ दुखते व ते कशावर तरी दाबावेसे वाटते, उन्हात गेल्याने **डोके** दुखते. अर्धशिशी.

**डोळे** :– लालबुंद. विकार झालेल्या बाजूच्या डोळ्यातून पाणी येते. उजेड सहन होत नाही. दारू व तंबाखु यांनी आलेले **दृष्टिमांद्य.**

**कान** :- आंत घशाशी कंड सुटते. कोरडा.

**नाक** :– नाकपुड्या हुळहुळ्या. नाक चोंदलेले पण एका बाजूस पाणी गळते. जोरजोराने शिंका येतात किंवा शिंका अर्धवट येतात. नाकात अतिशय वळवळल्यासारखे वाटून ( डाव्या नाकपुडीत ) **सर्दी होते.** दिवसा व मोकळ्या हवेत नाक खूप गळते, रात्री चोंदते, लहान मुलांचे. वासामुळे मूर्च्छा येण्याचा संभव. खोकताना रात्री, किंवा मूळव्याधीचे रक्त थांबल्यामुळे नाकातून

रक्त येते. घ्राणेंद्रिय अत्यंत तीक्ष्ण. गंधक जळत आहे किंवा शिळ्या दह्यासारखा वास येतो.

**चेहरा** :- लाल, फुगीर किंवा पिवळसर–विशेषतः नाका व तोंडा भोंवती. तोंडाचे डावे कोपर खाली पडल्याप्रमाणे दिसते. **जबडा खटकन मिटतो**, ताठलेला, तोंड उघडता येत नाही. डोळ्याखाली अर्धवर्तुळात वेदना होतात; निजल्याने बरे वाटते. चीज खाल्याने पुटकुळ्या येतात.

**तोंड** :- दातखिळी बसते. तोंडाला घाण येते. चव **कडू**, आंबट घाणेरडी विशेषतः सकाळी. टाळ्याला कंड सुटते. कर्णनलिकेत कंड सुटते. तोंड येऊन त्यात लहान व्रण पडतात व त्यातून रक्तमिश्रित लाळ येते. जिभेचा पुढचा भाग स्वच्छ, मागील भागावर पिवळा पांढरा चाड थर. दांतदुखी गरम पाण्याने कमी होते.

**घसा** :- **खरखरीत खरवडल्यासारखा वाटतो**. आत घाणेरडी चव. खोकताना किंवा जागे झाल्यानंतर घशात गुदगुल्या होतात. घसा ते कानापर्यंत टोचते.

**जठर** :- उत्तेजक किंवा मसाल्याचे, तेलकट, खट्ट हे पदार्थ खावेसे वाटतात. मळमळते सकाळी किंवा खाण्यानंतर. *उचकी*, ज्यास्त खाण्याने किंवा थंड पेयाने जास्त होते. जोरजोराने कोरड्या ओकाऱ्या येतात पण ओकावयास होत नाही. घसा खाकरताना ओकाऱ्या येतात. **ढेकरा** आंबट. छातीत जळजळते. **तोंडाला पाणी सुटते. मळमळते, ओकावयास झाले तर बरे वाटेल असे वाटते**. आंबट पित्ताच्या ***जोराच्या ओकाऱ्या***. **जठरात अन्न जड गोळा होऊन बसल्यासारखे वाटते**. खाण्यानंतर लगेच किंवा काही वेळाने पोट जड होऊन दुखावयास लागते. जठरातून वेदना पाठीत व छातीत जातात, ओकारी झाल्याने, गरम पेयाने बरे वाटते. अजीर्ण, अग्निमांद्य. तेलकट तूपकट पदार्थ खावेसे वाटतात व ते पदार्थ पचतात.

**उदर** :- कमरेभोवती पट्टा बांधल्यासारखे वाटते. **वस्त्राचा दाब सहन होत नाही**. उदराचे बाह्यांग मार लागल्याप्रमाणे हुळहुळे होते. आतड्यात कधी इकडे कधी तिकडे असा मुरडा होतो. ***आतडी हुळहुळी, खोकताना किंवा पाऊल उचलून टाकताना जास्त त्रास होतो***. अंतर्गळ–तान्ह्या मुलाचा किंवा बेंबीचा. बाक धरून मुरडा होतो. यकृत मोठे होऊन हुळहुळे होते व आत टोचते. पित्ताच्या खड्यामुळे उत्पन्न झालेल्या वेदना. कावीळ–उपवासामुळे– अति किंवा पौष्टिक खाण्यामुळे किंवा कोयनेलमुळे

झालेली. आतड्यात *अस्वस्थपणा वाटून शौचास होईल होईलसे वाटते पण होत नाही किंवा अर्धवट व असमाधानकारक होते. शौचास झाल्यानंतर बरे वाटते.* शौचास होताना अतिशय कुंथावे लागते. गुदात आवळल्यासारखे वाटते–वात तुंबतो व मळ बाहेर न पडता आत राहिला आहे असे वाटते. मलावरोध. मलावरोध व जुलाब आलटून पालटून विशेषतः रेचक औषध घेतल्यानंतर. आव–रक्तीआव, शौचास झाल्यानंतर कळ थांबते. कावीळीत हगवण लागते. *मूळव्याध*–कंड सुटते–गार पाण्याने बरे वाटते. जांघांत गळून गेल्यासारखे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला होईल होईलसे वाटते पण होत नाही– थोंडी होते, थेंब थेंब होते, कष्टाने होते. लघवीतून रक्त जाते. मूत्रपिंडाच्या खड्यामुळे वेदना–वेदना जननेंद्रियापर्यंत जातात व लघवी थेंब थेंब गळते, पाठीवर निजल्याने बरे वाटते. उन्हाळे. मूत्राशय शक्तिहिन, लघवी गळते, म्हातारपणी, मूत्रग्रंथि मोठी झाली असताना किंवा परम्यानंतर.

**पुरुषजननेंद्रिये** :– क्षुल्लक कारणाने संभोगेच्छा होते. संभोगातिरेक व मुष्टिमैथुनाचे दुष्परिणाम. वीर्यपात अकाली होतो. स्वप्ने पडून स्वप्नावस्था होते व त्यानंतर पाठ दुखते, कण्यात आग होते, अशक्तपणा वाटतो व स्वभाव चिडखोर होतो..

**स्त्रीजननेंद्रिये** :– संभोगेच्छा तीव्र. **पाळी फारच लवकर येते, विटाळ खूप जातो व फार दिवस राहतो,** किंवा थांबून पुन्हा सुरू होतो. पाळया अनियमित. विटाळात काळसर रक्ताच्या गाठी पडतात. कष्टार्तव–वेदना सर्व शरीरात होतात किंवा माकडहाडात ठणका लागून वारंवार शौचास जावेसे वाटते. रक्तप्रदर. विटाळ जाताना शौचास होईल होईलसे वाटते. प्रत्येक वेणेला मूर्च्छा येते. वणांचा जोर मंद. कुंथल्याने किंवा उचलल्याने गर्भाशय खाली येते.

**श्वसनेंद्रिये** :– इतका **जोराचा खोकला येतो** की त्यामुळे रोगी खाली पडतो. खोकल्याची मधुन मधुन उबळ येते. डांग्या खोकला. दमा–पोटात भरल्यासारखे वाटून सकाळी व खाण्यानंतर जास्त होतो. खोकल्याची कोरडी ढास लागते व कधी कधी कफात रक्त पडते. खोकताना डोक्यात फुटल्यासारख्या वेदना होतात. श्वासोच्छ्वास वरवर होतो. खोकताना छातीत काहीतरी तुटून मोकळे झाले आहे असे वाटते. कंठात व छातीत खवखवल्यासारखे वाटून घसा बसतो. बरगडयामध्ये वेदना होतात, दाबल्याने जास्त.

**मान पाठ** :– मान ताठून दुखते व उजव्या खांद्यापर्यंत वेदना होतात. कंबर मोडली आहे की काय अशी दुखते. **अंथरुणात वळताना उठून बसून व**

**नंतर दुसऱ्या कुशीवर वळणे शक्य होते.** कटिशूळ. कण्यात मुंग्या आल्यासारखे वाटते, आग होते. मन्यास्तंभ गारठून किंवा मानसिक धक्क्यामुळे.

**हातपाय** :– पायाची बोटे ते मांड्यापर्यंत तीव्र कळा येतात शौचानंतर जास्त होतात. पोटऱ्यात व तळपायात ताणल्याप्रमाणे पेटके येतात. पावले ठोकळ्यासारखी वाटतात. चालताना पाय फरफटत चालणे. पाय निर्जीव व लुले झाल्याप्रमाणे वाटतात. गुडघे कोरडे वाटतात, चालताना आत कटकट आवाज होतात. पाण्यात पाय गारठल्यामुळे किंवा अतिश्रमाने पंगु होतात. हात बधिर होतात, ताठल्यासारखे वाटतात.

**झोप** :– एकसारख्या जांभया येतात. संध्याकाळी झोप येते, किंवा अनेक विचारांची गर्दी झाल्यामुळे झोप येत नाही. **रात्री लवकर जाग येते त्यानंतर झोप येत नाही.** विशेषतः ३ वाजण्यानंतर. झोप लागली तरी सकाळी जागे झाल्यानंतर केविलवाणे झाल्यासारखे वाटते. थोडी झोप लागली तरी बरे वाटते. भयप्रद स्वप्ने पडतात. स्वप्नात कुत्री, मांजरे वगैरे जनावरे पाठलाग करीत आहेत असे दिसते. वैषयिक स्वप्ने पडतात.

**त्वचा** :– कावीळ. अजीर्णामुळे पित्ताच्या गांधी येतात. केस उभे राहतात. चट्टे पडलेली, लाल.

**ज्वर** :– थंडी वाजताना तहान लागते, तापात तहान लागत नाही. हुडहुडी भरते व त्यावेळी बोटांची नखे निळी होतात. सर्वांग तप्त होते विशेषतः चेहरा, परंतु जरा हालचाल केली किंवा पाणी प्याले तरी ***थंडी वाजते. अंगावरचे पांघरूण काढू नयेसे वाटते.*** घाम आंबुस व एकाच बाजूला येतो. अंगावरचे पांघरूण काढले तर थंडी वाजते तरीपण पांघरूण घ्यावेसे वाटत नाही. तापाच्या पाळ्या वेळा बदलून अगोदर येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***पहाटे, सकाळी; थंडी; थंड मोकळी हवा; थंड वारे; अंगावरचे वस्त्र काढल्याने; विलासी जीवन; काफी;*** मसाल्याचे पदार्थ; मद्य, औषधे; **रेचक औषधे; बाहेरख्यालीपणा;** अति खाणे; बैठ्या **सवयीमुळे; मानसिक–श्रम–थकवा;** झोपेत अडथळा आणला तर; **क्षुल्लक कारणे** राग, आवाज, वास, उजेड; ***दाबल्याने;*** **वस्त्रांच्या** कंबरेभोवती दाबाने; **स्पर्श.** जांभई आल्याने. तंबाखु.

**ब वा** :– ***भरपूर स्राव गेल्याने,*** थोड्या झोपेने; विश्रांतीने; **डोके** गुंडाळण्याने. कढत पेये; दूध; दमट हवा; जोराने दाबल्याने. तेलकट पदार्थ.

**सहाय्यक औषधे** :– कलि-का; कामो; कोनि; पल्स; फास्फ; सल्फ; सेपि.

**संबंधी औषधे** :– आर्से; कॅल्क–का; कार्बो–व्हेजि; व्हिरु–टा.

---

## १७७. नॅफेलिअम Gnaphalium

**सर्वसाधारण** :- या औषधाचा परिणाम *मज्जातंतू* वर होतो. *गृध्रसीवात*– **तीव्र वेदना होतात** व त्यानंतर त्या जागी बधिरपणा येतो किंवा मुंग्या येतात किंवा बधिरपणा, मुंग्या व वेदना आलटून पालटून होतात. आतड्यात मुरडा होऊन दुर्गंधी जुलाब होतात, सकाळी जास्त. ओटिपोटात जड ओझे ठेवल्यासारखे वाटते. कष्टार्तव. विटाळ थोडा जातो; पहिल्या दिवशी फार वेदना होतात. सांध्यात दुखते, आत वंगण नाही असे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– चालताना; निजल्याने; दमट थंडी.

**ब वा** :– पाय दुमडल्याने; बसल्याने.

---

## १७८. नाजा (नाग) Naja

**सर्वसाधारण** :– या विषाचा परिणाम *हृदय*; **श्वासोच्छ्वास; घसा**; डावी बाजू; **रज:पिंड**; कानशिल; हात यावर होतो. **घाबरटपणा, क्षुब्धता व कंप** ही लक्षणे **हृदयविकारात बरेच** वेळा उद्भवतात व एकदम शक्तिपात होतो. विकारांचा दुष्टपणा. अनेक तऱ्हेच्या वेदना. अवयव एकमेकाजवळ ओढल्यासारखे वाटतात. **आवळल्यासारखे वाटते**-छातीत-घशात वगैरे. लोखंडाचा तप्त गोळा ठेवल्याप्रमाणे आग होते. उजवी बाजू बधिर. दुःख शोक यामुळे उद्भवलेले परिणाम. झिजत चाललो आहोत अशी भावना. हृदयाचे विकार पण लक्षणांचा अभाव.

**मानसिक** :– आत्महत्येसंबंधी चिंतन. बोलावेसे वाटत नाही. पावसाची भीती वाटते. काल्पनिक दुःखांचा एकसारखा विचार करून स्वतःला निष्कारण कष्टी करणे. खिन्नता, संध्याकाळी कमी होते. एकटेच असावे असे वाटते.

**डोके** :– डाव्या कानशिलात व डाव्या डोळ्याभोवती वेदना होऊन त्या डोक्याच्या मागील भागापर्यंत जातात व त्या वेळेस मळमळून ओकावयास होते. डोक्यात तिडका मारतात. डोक्याच्या मागील भागात व मानेवर रट्टा मारला आहे असे वाटते. टाळूला थंडी मुळीच सहन होत नाही. सर्व डोके पोकळ आहे असे वाटते.

**डोळे** :– वटारलेले. दोन्ही पापण्या उघडता येत नाहीत, लुल्या.

**कान** :– तोंडात चिळसवाणी चव येऊन कानात आवाज होतात.

**नाक** :– नाकातून पाणी वाहू लागते नंतर खूप शिंका येतात त्याने बरे वाटते.

**तोंड** :– सताड उघडे, लाळ गळते. जीभ गार.

**घसा** :– आवळल्यासारखा वाटतो. गोळा बसला आहे असे वाटते. घरावासा वाटतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– डावा रजःपिंड ते हृदयापर्यंत कळा येतात. रजःपिंड हृदयाकडे ओढल्यासारखा वाटतो. डाव्या जांघेत निष्कारण दुखते, किंवा शस्त्रक्रियेनंतर दुखते.

**श्वसनेंद्रिये** :– गुदमरल्यासारखे वाटून श्वासोच्छ्वास घेता येत नाही. घसा घरावासा वाटतो. फूत्कार टाकल्याप्रमाणे श्वासोच्छ्वास होतो. हृदयविकारामुळे झालेला दमा किंवा खोकला. कोरड्या खोकल्याची ढास लागून तळहाताला घाम येतो. दमा सुरू व्हावयाचे अगोदर पडसे येते, दमा निजल्याने जास्त होतो बसल्याने बरे वाटते. डाव्या फुफ्फुसात कोरडेपणा आल्यासारखा वाटतो किंवा पोकळ झाल्यासारखे वाटते. बरगड्या मोडल्यासारख्या वाटतात.

**हृदय** :– हृदयाच्या जागी अशक्तपणा वाटतो. तीव्र कळा येऊन त्या डाव्या तिकोनी हाडापर्यंत–खांद्यापर्यंत किंवा मानेत जातात, हृदयाची जागा हाताने धरून ठेवावी लागते. हृदयाची क्रिया खळबळकारक चालते, धडधडणे दिसते. एकाएकी छातीत धडधडावयास लागून बोलवेनासे होते. दोषी ज्वरामुळे बिघडलेले हृदय. नाडी– अशक्त–मंद–अनियमित, तिचा दाब व जोर बदलतो.

**हातपाय** :– खांद्यात, मानेत, मांड्यात पेटके येतात. डावा हात बधिर. पंजे व पावले फुगीर व त्याना घाम येतो. मांडीच्या हाडाच्या पोकळीत फोडल्यासारखे वाटते. आंगठ्याच्या नखाखाली तीव्र वेदना होऊन त्या वर हातात जातात.

**झोप** :– गाढ लागून मोठमोठ्याने घोरणे.

**त्वचा** :– व्रणात कंड सुटते.

**ज्वर** :– अंतर्गत उष्णता विशेषतः छातीत. पाठीच्या खालच्या भागात व घोट्याना घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा स्त** :– डाव्या कुशीवर झोपल्याने; झोपेनंतर; विटाळशीपणानंतर; हवा–गार–शुष्क; वस्त्रांचा दाब; दारू.

**क मी** :– गाडीत बसून मोकळ्या हवेत हिंडल्याने; शिंकल्याने; तंबाखू ओढल्याने.

**संबंधी औषधे** :– लॅके; लारो; सिमिसि; स्पाय्जे.

---

## १७९. नायट्रिक ॲसिड Nitric Acid

**सर्वसाधारण :**– या औषधाचा परिणाम *शरीराची द्वारे*–घसा–गुदद्वार-तोंड; *गाठी* वक्षल-लाळेच्या गाठी; मूत्रग्रंथी; त्वचा; रक्त; हाडे; सांधे; नळी-सारखी इंद्रिये व उजवी बाजू यावर होतो. शरीर थकलेले. शहारे येण्याची प्रवृत्ति. कंप. काहीही सहन होत नाही. हुळहुळेपणा. *काटा-ढलपी गेल्याप्रमाणे टोचते* किंवा व्रण पडून कुरतडल्यासारख्या वेदना होत आहेत असे वाटते. *स्राव करवडणारे*–पातळ-गढूळ–पिंगट त्याने आस-पासचा भाग लाल होतो व केसांचा नाश होतो, दुर्गंधी–घाम–लघवी-पिनस पाऊल वगैरे. विकारांचा दुष्टपणा. चरत जाणे. *रक्तस्राव*-उगीचच्या उगीच होतो, लालभडक–रक्तासारखे पाणी, वाहते. द्वारे लाल, सुजलेली किंवा भेगा पडलेली. श्लेष्मल त्वचा काळसर व गुळगुळीत. **एखाद्या भागाभोवती पट्टा बांधल्याप्रमाणे वाटते** किंवा ओझे लोंबकळत आहे असे वाटते. वेदना होत असलेली जागा **हुळहुळी होते** किंवा ताठते. हाडापासून मास तुटते आहे अशा वेदना होतात. ज्याना उगीचच्या उगीच सर्दी होते किंवा हगवण लागते असे जीर्ण रोगाने पछाडलेले इसम. फिकटपणा–गरमी, रक्तक्षय, हिवताप वगैरे कारणामुळे आलेला. मासांकुर येण्याची प्रवृत्ती–चामखीळ. कॅन्सर. नाडीव्रण. काळसर किडकिडीत इसम. क्षय. हाडे **हुळहुळी होऊन दुखतात**, कुजतात. दिवसा वारंवार घेरी येते व रात्री किंवा प्रथम झोपताना फेफरे येते. गर्भाशय आतून खरवडल्यानंतर होणारा रक्तस्राव. हट्टी पू. आजारी माणसांची शुश्रूषा केल्याने, निद्रानाश झाल्यामुळे झालेले दुष्परिणाम हाडावर हाड वाढते.

**मानसिक :– चिडखोर, दीर्घद्वेषी**, मायेफिरू. पवित्र गोष्टीबद्दल अनादर. **इतका राग येतो की** त्यामुळे कापावयास लागणे. वातात भांडणे. भुतांशी निरनिराळ्या भाषेत बोलणे. गोंधळलेला. मनात आलेले विचार नाहीसे होतात. मरणाची भीती वाटते. खिन्न, उदास बोलावेसे वाटत नाही. स्वतःच्या दुर्दैवासंबंधी कोणी सहानुभूती दाखविली तर ती धिःकारणे. स्वतःच्या दुखण्याविषयी चिंता, काळज्याची भीती. कोणतेही काम किंवा उद्योग मनापासून करावासा वाटत नाही.

**डोके :– ठेचल्याप्रमाणे डोके दुखते**– टोपी घातल्याने जास्त. डोके भरल्यासारखे वाटते–रस्त्यावरील गोंगाट सहन होत नाही. कवटी हुळहुळी होते. कातडीला

फुगीरपणा येतो. डोक्याभोवती पट्टा आवळला आहे असे वाटते. केस गळून पडतात.

**डोळे** :– डोळ्यावरून किंवा आतून कोंबट पाणी वाहत आहे असे वाटते. काळ्या बुबुळाला ठिपके पडतात. पांढरी त्वचा चिमटल्यासारखी दिसते. फूल पडते. एकाच्या दोन वस्तु दिसतात. पापण्या ताटून नाकाकडे वळतात.

**कान** :– बहिरेपणा पण गोंगाटात, आगगाडीत वगैरे जाताना बरे ऐकू येते. आवाज अगदी सहन होत नाही. चावताना कटकट आवाज होतात. स्वतःच्या आवाजाचा कानात प्रतिध्वनि उमटतो. कानाच्या मागील हाडांच्या उंचवटयात कुजणे.

**नाक** :– लाल, शेंडा खरबरीत. नाकातून काळसर रक्ताच्या गाठी पडतात. छातीच्या विकारात नाकातून रक्त येते. नाकाची हाडे कुजतात. सर्दी होते व त्यावेळेस श्वासोच्छ्वास घ्यावयास त्रास होतो. पिनस. नाकाचा घटसर्प–नाकातून अत्यंत करवडणारे पाणी वाहते. कापल्यासारख्या वेदना होतात. झोपेत शिंका येतात. नाकातून हिरव्या खपल्या शिंकरल्याने पडतात विशेषतः सकाळी. रडताना नाकातून रक्त येते.

**चेहरा** :– **पिवळा, आजाऱ्यासारखा.**

**तोंड** :– ओठांचे पापुद्रे जातात. ओठांचे कोपरे–सोलवटलेले–भेगा पडलेले किंवा खपल्या बसलेले. जीभ स्वच्छ तांबडी ओली व मध्यभागी सांख पडलेली. टाळ्यात व्रण पडून त्यात टोचल्याप्रमाणे वेदना होतात. रक्तमिश्रित लाळ. दात ढिले. हिरड्या विसविशित–हुळहुळ्या आतल्या बाजूतून रक्त येते. जिभेवर भेगा पडतात किंवा चट्टे पडतात. टाळा हुळहुळा. तोंडाला घाण येते. गाल चावले जातात. दात पिवळे. जिभेखाली गुल्म येते. दात हलतात, कुजतात.

**घसा** :– घशात काटा टोचल्याप्रमाणे वाटते व गिळताना कानापर्यंत टोचते. टान्सिल्स सुजून वेड्यावाकड्या होतात. गिळताना अतिशय त्रास होतो, चमचाभर पाणीसुद्धा गिळवत नाही.

**जठर** :– न पचणारे पदार्थ खाण्याची वासना–माती खडू वगैरे. तेलकट व खारट पदार्थ खावेसे वाटतात. भूक लागली असताना तोंड गोड होते.

**उदर** :– खूप कुंथले तरी थोडेसेच शौचास होते. शौच मऊ असून सुद्धा शौचास होताना गुदद्वार फाटल्यासारखे वाटून नंतर आत बराच वेळपर्यंत वेदना राहतात. आतड्यातून रक्तस्राव होतो. गुदद्वार बाहेर येते. **मुळव्याध**

वेदनायुक्त व त्यातून सहजासहजी रक्त येते. गुदद्वाराभोवती इसब येतो किंवा कंड सुटते. आतून ओलावा बाहेर येतो. कावीळ–यकृतात दुखते. आतड्यातील मुरडा वस्त्रे घट्ट केल्याने कमी होतो. आणि नंतर आतड्यात व्रण पडतात. उदरावर गरम कोरडे कापड ठेविले आहे असे वाटते.

**मूत्रेंद्रिये :–** लघवी घोड्याच्या मुताप्रमाणे दुर्गंधी. लघवी गार, कधी भरपूर होते कधी थोडी होते. मूत्रपिंड ते मूत्राशयापर्यंत पेटके येतात. मूत्रमार्गात तप्त तार घातली आहे असे वाटते. मूत्रपिंडाचा शोथ. लघवीतून रक्त जाताना कण्यात शहारे येतात. लघवीतून ऑक्सॅलिक असिड जाते.

**पुरुषजननेंद्रिये :–** बॉडीवरील कातडीत आग होते, कंड सुटते–कातडीला जलयुक्त सूज येते. गरमीचे चरत जाणारे व्रण. व्रणांत आग होते, नांगी मारल्याप्रमाणे वाटते व आतून दुर्गंधी द्रव्य बाहेर येते.

**स्त्रीजननेंद्रिये :–** बाह्यांग हुळहुळे व व्रण पडतात. योनीतून रक्तासारखे पाणी येते. पाळी लवकर विटाळ भरपूर गढूळ पाण्याप्रमाणे–व त्यावेळेस पाठीत, कुल्यात व मांड्यात वेदना होतात. गर्भाशय आतून शस्त्राने खरवडल्यानंतर रक्तस्राव थांबत नाही किंवा अशा तऱ्हेच्या शस्त्रक्रियेनंतर होणारे दुष्परिणाम. बाळंतपणानंतर खूप विटाळ जातो. धुपणी पिंगट, पातळ, चिकट. स्तन वाळतात किंवा आत टणक गाठी येतात. संभोगानंतर सुखकारक कंड सुटते.

**श्वसनेंद्रिये :–** खोकल्याचा कोरडा ठसका लागून शरीर फुटते आहे असे वाटते. कंठात गुदगुल्या होऊन खोकला सुरू होतो व त्यावेळेस कमरेत टोचते–गारव्याने जास्त होते. जिना चढताना दम लागतो. झोपेत खोकला येतो. कफ पुवळलेला–चिकट तोंडात चोपडला जातो, कफ काढताना घाम येतो. कंठात कापल्याप्रमाणे वाटते. छातीत खळबळ झाल्यासारखी वाटून धडधडावयास लागते व भीती वाटते. गर्भाशय सरकल्याने दम लागतो.

**हृदय :–** जिना चढताना धडधडते व चिंता वाटते. नाडी प्रत्येक चौथ्या ठोक्याला बंद पडते. नाडी अनियमित. क्षुल्लक मानसिक क्षोभाने धडधडावयास लागते.

**हातपाय :–** हाताच्या बोटांचे सांधे सुजतात. पंज्याच्या मागील बाजूस चामखिळी येतात. घोट्याचे सांधे अशक्त. पाऊलांना दुर्गंधी घाम येतो त्यामुळे बोटांचे बेचके हुळहुळे होतात. गुडघ्याच्या वाटीत दुखल्यामुळे चालताना अडथळा येतो. तंगडीचे हाड दुखते. पंज्याना, तळहाताला गार घाम येतो. नखे निळी.

एन ४२४८–२०अ

पायांच्या बोटांची नखे मांसात रुततात व खुपतात, स्पर्शाने जास्त होते. नखे वेडीवाकडी, कमानदार, रंग बदललेली.

**त्वचा** :– कोरडी, **करवडल्याप्रमाणे**, भेगा पडतात विशेषतः कोपरे असतील तेथे. तांब्याच्या रंगाचे चट्टे पडतात विशेषतः तंगडीच्या हाडावरील त्वचेवर. कपडे काढले की कंड सुटते. खपल्या बसून त्या पडतात. **व्रण** जलद चरतात, हुळहुळे होतात व त्यांच्या कडा वेड्यावाकड्या होतात; स्पर्श केल्याने किंवा धुताना रक्त येते. आत पुवाचे बूच बसल्यासारखे वाटते. हट्टी पू. वेड्यावाकड्या किंवा मऊ चामखिळी यांची उगवण. मांसाकुरांची वाढ. जुने वण थंडीत दुखतात.

**झोप** :– झोप लागता लागता धक्के बसतात. वेदना झोपेत सुरू होतात. झोपेनंतर हुशारी वाटत नाही. भयानक, चिंतायुक्त स्वप्ने पडतात.

**ज्वर** :– तापात–थंडी वाजताना–घाम येताना तहान लागत नाही. पंजे व पावले गार. **बर्फाप्रमाणे गारपणा** विशेषतः तळपायांचा. हट्टी हिवताप. सहजासहजी घाम येतो नंतर सर्दी होते. घाम भरपूर येऊन थकवा वाटतो--सकाळी किंवा रात्री येतो. खाकेत व पावलाना घाम येतो. घामाला लघवीसारखा वास येतो. दर चौथ्या ठोक्याला नाडी थांबते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **क्षुल्लक** ***कारणे; स्पर्श; धक्का लागणे;*** **आवाज–खडखडणे, हालचाल, पारा;** दूध; खाण्यानंतर; ***थंडी;*** **थंड हवा–दमट हवा;** रात्री, संध्याकाळी; हवेत फरक पडल्याने; अंथरुणाची ऊब; मानसिक श्रम किंवा धक्का–आघात.

**क मी** :– **संथ किंवा घसरत जाण्याने**. गाडीत बसल्याने. समशीतोष्ण हवा, एकसारखा दाब दिल्याने.

**सहाय्यक औषधे** :– आरम–ट्रा; आर्से; **कॅल्क-का**; थूजा; लायको.

**संबंधी औषधे** :– कलि–का; **क्रिआसो**; पल्स; फास्फ; मर्क्यु; सल्फ; सेपि.

---

## १८०. नेट्रम कार्बोनिकम (पापडखार)

## Natrum Carbonicum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***पचनक्रिया;*** **मज्जातंतू;** त्वचा; पंजे (मागील भाग) व टाचा यावर होतो. **अशक्त पण संत्रस्त. फुगीरपणा.** शरीराचे शैथिल्य व सहजासहजी थोडे श्रम केले तरी थकवा वाटतो. सहज

सांधे निखळतात. **काहीही सहन होत नाही,** मोकळी हवा–संगीत–आवाज खाण्यातील फरक उन्हाळ्यातील उष्णता–वगैरे. वेदनामुळे **कंप येतो, गार घाम येतो व चिंता वाटते.** उन्हाळ्यातील उष्णतेने अतिशय गळून गेल्याप्रमाणे वाटते. अंग तापलेले असताना गार पाणी प्याल्याने अति अभ्यासाने, लचक भरल्याने, झालेले, दुष्परिणाम. सहज लचक भरते (पाठीत) हातापायाना धक्के बसतात. चालताना अडखळणे. लहान मुले झोपेतून उठून उड्या मारतात, किंचाळतात व आईला चिकटतात. उगीचच्या उगीच दचकणारी मुले; सूर्याघाताचे जीर्ण परिणाम. तान्ह्या मुलाना दूध सोसत नाही. तांदुळ, गव्हाचे अन्न सोसते.

**मानसिक** :– रागीट, चिडखोर. **खिन्न उदास.** आनंदी. विजेच्या गडगडाटामुळे भीती वाटते व अस्वस्थपणा येतो, भीतिमुळे नव्हे पण हवेत झालेल्या फरकामुळे. एकंदरीत माणसांचा तिटकारा पण काही विवक्षित इसमांचा विक्षेप. आकलनशक्ति मंद. गाणे ऐकिले की आत्महत्या करावीशी वाटते. धार्मिक वेड. स्वतःच्या कुटुंबातील मंडळीचा तिटकारा. मंडळीत बसण्याची नावड.

**डोके** :– हवेतील उष्णतेमुळे डोके दुखते. गॅसच्या उजेडाखाली काम केल्याने, थोड्या मानसिक श्रमाने डोके दुखते. दारू प्याल्यामुळे घेरी येते. उन्हात घेरी येते. मानसिक श्रमाने घेरी येते. डोके खूप मोठे झाले आहे असे वाटते. डोक्यातील वेदना डोळ्यातून बाहेर येत आहेत असे वाटते. डोके मागे वाकलेले.

**डोळे** :– दृष्टीपुढे तेजस्वी तारे किंवा ज्वाळा दिसतात, जागे झाल्यानंतर.

**कान** :– वारंवार दुखून बहिरेपणा येतो.

**नाक** :– फुगीर सुजल्यासारखे किंवा त्याचे पापुद्रे जातात. सर्दी होते–जरा वारे लागले तर किंवा एक दिवसाआड. नाकातील स्रावांना घाण येते. जोराजोराने शिंका येतात. **नाकाच्या घशातील भागातून स्राव पडतो.** नाक लाल, त्यावर पादऱ्या पुटकुळ्या.

**चेहरा** :– फिकट, सुरकुतलेला, किंवा फुगीर. पिवळे ठिपके. पुटकुळ्या. वरचा ओठ सुजलेला.

**तोंड** :– उघडे राहते. चव वाजवीपेक्षा तीक्ष्ण, किंवा उलट, बदललेली. तोंडात, फोड येतात, व्रण पडतात, आग होते. कोरडे.

**घसा** :– पाण्याच्या घोटाशिवाय घट्ट पदार्थ गिळता येत नाहीत. जांभई येताना घसा दुखतो.

**जठर** :- आम्लपित्त. जीर्ण अग्निमांद्य, एकसारख्या ढेकरा येतात. वात धरतो. आम्लपित्त व सांधे धरणे. **पचनक्रिया मंद**, खाण्यात जरा फरक केला किंवा नेहमींपेक्षा जास्त खाल्ले की सोसत नाही. दुधाचा तिटकारा. खाखा-एकसारखे थोडे थोडे खावेसे वाटते. खाण्यामुळे पोटातील वेदना कमी होतात-किंवा थांबतात. पहाटे ५-वा भूक लागते.

**उदर** :- वात इकडेतिकडे सरकल्यामुळे मध्येच कोठे कोठे फुगवटी दिसते. पिष्टमय अन्नाने ( भात, बटाटे ) जुलाब होतात. दुधाने जुलाब होतात. एकदम घाई लागून शौचास आवाज होऊन घाईने होते, किंवा होत नाही शौचास पिवळसर नारिंगाच्या लगद्याप्रमाणे द्रव्य पडते किंवा तसेच शौचास होते. मलावरोध-शौचास काळे गुळगुळीत खडे होतात किंवा त्यांचा चुरा होतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :- वंध्यात्व. आत पडलेले वीर्य त्वरित बाहेर येते. पाळी उशीरा, विटाळ थोडा, लाल पाण्यासारखा. उदरांत वेदना होऊन धुपणी जाते, स्राव पिवळसर हिरवा व भरपूर, दुर्गंधी, चुरचुरणारा. योनीमुख टणक होते.

**पुरुषजननेंद्रिये** :- स्वप्नावस्था होण्याची प्रवृत्ती. लघवीला घोड्याच्या मूत्राप्रमाणे घाण येते. वैषयिक इच्छा बळावते, शिश्न वेदनायुक्त ताठते, त्यामुळे वीर्यपात होताना दुखते.

**श्वसनेंद्रिये** :- खोकला ओला. खोकताना पोकळ आवाज येतो. खोकला सकाळी ९ ते ११॥ पर्यंत जास्त येतो. बाहेरून खोलीत शिरल्याने खोकला येतो. खोकताना डावे स्तन गार झाल्यासारखे वाटते घशात एकसारख्या गुदगुल्या होऊन खोकला येतो. कफ पुवळलेला, खारट.

**पाठ** :- डाव्या तिकोनी हाडाच्या टोकाशी उकरल्याप्रमाणे वाटते. मानेच्या मणक्यात मान हलविल्याने कटकट आवाज होतात. पाठीच्या तिकोनि हाडामध्ये गारवा.

**हातपाय** :- चालताना गुडघ्याच्या मागल्या खळीत दुखते. पाय व पाऊले जड होतात व ताणल्यासारखे वाटतात, चालताना, बसलेल्या स्थितीत जास्त. मनगटात व घोट्यात आग होते. चालताना तळपायाची आग होते. तगड्याना भयंकर वेदना होतात, खाल्याने बेरे वाटते. **घोट्याचे सांधे अशक्त** त्यामुळे चालताना पाऊल दुमडते. घोटे सहज लचकतात किंवा निखळतात. घोट्यापासून बोटापर्यंत पेटके येतात. गुडघ्यापर्यंत पाय बर्फासारखे गार. बोटांच्या बेचका हुळहुळ्या होतात. तळपाय हुळहुळे. तळपायाना भेगा पडतात.

**त्वचा** :– लहान सांध्यावर (बोटांच्या) भाजल्यासारखे फोड येतात. बोटांच्या टोकाना फोड येतात. त्वचा दुधाप्रमाणे पांढरकी व ओलसर किंवा कोरडी-खरखरीत व भेगा पडतात. पुवळणारी उगवण येते.

**झोप** :– जेवणानंतर झोप येते वैषयिक स्वप्ने पडतात. दिवसा गुंगी. सकाळी लवकर जाग येते झोपेत तोंड उघडे राहते.

**ज्वर** :– पाठीत तिकोनी हाडांच्यामध्ये गार झाल्यासारखे वाटते. मनगटे व घोटे या ठिकाणी आग होते. **सहज घाम येतो.**

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *उष्णता*–उन्हाची; उन्हाळा; गॅसचा उजेड; **नियमित वेळी**, पहाटे ५ वा; हिवाळ्यात; **मानसिक श्रम**; मुष्टिमैथुन; खाण्यातील फरक; दूध; **वाऱ्याची झुळुक**; वीज वावटळ; आवाज ( एकदम झालेला ). संगीत. एक दिवसा आड. भाज्या.

**क** वा :– हालचालीने; चोळण्याने; खाण्याने; घाम आल्याने.

**सहाय्यक औषधे** :– सेपि.

**संबंधी औषधे** :– कॅल्क-का; नक्स-व्हा; नाय-ॲसि; नेट्र-मूर; पल्स; लायको; सल्फ; सेले.

---

# १८१. नेट्रम फास्फोरिकम Natrum Phosphoricum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम डोक्याचा मागील भाग; श्लेष्मल त्वचेच्या ग्रंथी; पित्तनलिका; व जननेंद्रिये यावर होतो. ***आंबटपणा***-ढेकरा, ओकारी, जठरात, शौच, धुपणीचा स्राव, कफ, घाम, वगैरे. **शरीरात आम्लाचे प्रमाण वाढते. स्राव पिवळेजर्द. थकवा. खादाड मुले.** कावीळ. जंत होण्याची प्रवृत्ति. रक्तवाहिन्यातून गोळी फिरत आहे असे वाटते. मुंग्या येतात. एकसारखी साखर खाणारी मुले. बाटलीचे दूध पिणाऱ्या मुलांचे वाळणे. स्नायू व स्नायूबंध ताणल्यासारखे वाटतात. मानसिक श्रम, वैषयिक भोग यांचे दुष्परिणाम.

**मानसिक** :– क्षीण. रात्रीची कांही तरी घडले असे वाटून भीती वाटते. खोलीतील सामान माणसे आहेत असे वाटते. शेजारच्या खोलीत पावले वाजत आहेत असे वाटते. घाबरट, विसराळू गाणे ऐकिल्याने उदास वाटते. बेपर्वा, स्वतःच्या कुटुंबातील मंडळीबद्दल. बराच काळ स्वस्थ बसून राहणे. उगीचच भीती वाटते.

**डोळे** :– डोळ्यातून पिवळे जर्द सायीसारखे द्रव्य येते. डोळे पिवळसर. गॅसच्या उजेडात दृष्टि मंद होते. जंतामुळे आलेला तिरळेपणा.

**कान** :– एक कान लाल व कढत, कित्येक वेळा कंड सुटते, रक्त येईतो खाजविणे.

**नाक** :– खाजते. पिवळा दाट दुर्गंधी शेंबूड. **मूल नाकात बोटे घालते**. जंत.

**चेहरा** :– फिक्कट किंवा एक बाजू लाल दुसरी फिकट आलटुन पालटून.

**तोंड** :– भोवती कंड सुटते. जिभेच्या टोकावर भाजल्यासारखे फोड येतात. *जिभेच्या बुंध्याशी पिवळा सायीप्रमाणे थर* जमतो. जिभेवर केस चिकटला आहे असे वाटते. मुले दात खातात.

**घसा** :– गिळताना त्रास होतो. टानसिलवर पिवळा थर जमतो. घशात गोळा बसला आहे असे वाटते, त्यामुळे बोलताना अडथळा येतो.

**जठर** :– आंबट ढेकर–ओकाऱ्या. ओकरी दह्यासारखी होते.

**उदर** :– वात धरतो व त्याने आत आवाज होतो. भरल्यासारखे वाटते–उभे राहिल्याने किंवा अगदी थोडे खाल्ल्याने जास्त. हिरवे जुलाब होतात. शौचास बसले असताना आतड्यात गोटी पडत आहे असे वाटते. संभोगानंतर शौचास व लघवीला लागली आहे असे वाटते ( पुरुष ). वात सरताना शौचास होईल असे वाटते. गुदद्वाराला कंड सुटते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला लागली म्हणजे मूत्रमार्गाच्या तोंडाशी आग व कंड सुटते, विशेषतः संभोगानंतर. बसल्यानंतर लघवी सुटावयास थोडा वेळ लागतो.

**पुरुषजननेंद्रिये** :– स्वप्ने न पडता वीर्यपात होतो व त्यानंतर पाठीत अशक्तपणा वाटतो व हातपाय कापतात. संभोगाची इच्छा होते पण उत्थापन होत नाही. वीर्य पाण्यासारखे पातळ. बोंडीची कातडी व वृषण याना कंड सुटते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळी लवकर, विटाळ पाण्यासारखा. योनीतील स्रावाच्या आम्लत्वामुळे आलेले वंध्यात्व. धुपणी–आंबुस वास, सायीप्रमाणे दाट पिवळसर. गर्भाशयातील स्राव आंबुस वासाचे. गरोदरपणी सकाळी ओकावयास होते.

**श्वसनेंद्रिये** :– खोकला बसल्याने जास्त होतो. खाण्यानंतर छातीत पोकळ वाटते.

**हृदय** :– जिना चढताना हृदयाजवळ कंप उत्पन्न होतो. हृदयातील वेदना पायाच्या आंगठ्यात वेदना सुरु झाल्याने कमी होतात. हृदयात एक बुडबुडा सुरू होऊन तो धमन्यातून जोराने जात आहे असे वाटते. संधिवात व हृदयातील वेदना आलटुन पालटुन. वीज वावटळीत धडधड होऊन चिंता वाटते.

**हातपाय** :– सांध्यात कटकट आवाज होतो. सांध्याभोवती उगवण. पावले दिवसा किंवा विटाळशेपणी बर्फाप्रमाणे गार असतात, रात्री आग होते. सांध्याना कंड सुटते–विशेषतः घोट्याना. हृदयाच्या वेदना व सांधे दुखणे आलटून पालटून. संभोगानंतर पाठ अशक्त होते. पाठ जड होऊन ओढल्यासारखी वाटते. मनगट व हाताच्या बोटांचे सांधे दुखतात.

**त्वचा** :– पित्ताच्या गांधी–गुळगुळीत–चकचकीत्–लाल.

**झोप** :– सकाळी गुंगी येते, मध्यरात्रीपूर्वी झोप येत नाही. वैषयिक, चिंतायुक्त, मेलेल्या इसमांची स्वप्ने पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– साखर; मुले; दूध; मानसिक श्रम; वीज वावटळ; गॅसचा उजेड. संभोग. जिना चढताना.

**ब वा** :– थंडी.

---

## १८२. नेट्रम मूरिआटिकम (मीठ)

### Natrum Muriaticum

**सर्वसाधारण** :– या औषधाचे परिणाम पोषण; पचनेंद्रिये; मेंदू; रक्त; स्नायू; मन; हृदय; गाठी–यकृत पांथरी; त्वचा यावर होतो. **शरीर वाळलेले, एकसारखी तहान.** एखादी गोष्ट अकस्मात करण्याची प्रवृत्ति किंवा मनात येईल तेच शेवटास नेण्याची प्रवृत्ति. **शरीराचे पोषण निकृष्ट.** वाळणे–विशेषतः वरून खाली **मान** किंवा उदर. पंडुरोग. **कोरडेपणा**–तोंड–त्वचा–घसा गुद–योनि वगैरे. **बधिरपणा**–एका बाजूचा किंवा ज्या भागावर दाब पडला असेल त्या भागाचा. बोटाचा (हाताच्या) **कंप.** उगीचच थकवा येतो. **अवयव किंवा भाग लहान झाल्यासारखे किंवा आखडल्यासारखे वाटतात**–मान, गुडघ्याचा मागील भाग वगैरे. अतिशय अशक्तपणा व शीण. गारपणा. वारंवार सर्दी होते. **स्राव–दाट, पांढरे, स्वच्छ, पातळ करवडणारे. अगदी ठराविक वेळी विकार उद्‌भवतात.** हट्टी हिवताप. गलगंड. मधुमेह. बहुमूत्रता. दुःख, आशाभंग, धास्ती, मुष्टिमैथुन, डोक्याला झालेले आघात, राग, शरीरातील स्राव गेल्याने, संभोगातिरेक या कारणानी उद्‌भवलेले विकार. आवळल्यासारखे वाटते–हृदयात, छातीत, गुदद्वारात, घसा वगैरे. खाल्लेले अन्न अंगी लागत नाही. जलयुक्त सूज–नाळगुद, जलोदर. मिठाचे दुष्परिणाम. हिस्टेरिआ. ठसठसणे. हातोड्याने मारल्याप्रमाणे

वेदना. मुले उशिरा चालावयास लागतात. मुली आपल्या पेक्षा वयाने मोठ्या असलेल्या किंवा अनुरूप नसलेल्या पुरुषाच्या प्रेमात पडतात. भावनातिरेका· मुळे शरीर लुले पडते. जीर्ण लचक.

**मानसिक** :– द्वेषी, ज्याने आपला अपराध केला असेल त्याबद्दल. उगीचच रागावणे विशेषतः सांत्वन करण्याचा प्रयत्न केला तर जास्त राग येतो. **खिन्न, एकलकोंडेपणा**–मंडळीत बसणे त्रासदायक वाटते. बोलावेसे वाटत नाही. निष्कारण उदासीनता. आततायी स्वरूपाचा शोक करणे. विचारांचा गोंधळ. एखादी कल्पना मनात ठाम होऊन बसते त्यामुळे झोप येत नाही, सूड घ्यावासा वाटतो. ओक्साबोक्शी रडणे; क्षुल्लक कारणाने चिडणे. उतावीळ. धांदरट. एकांतात रडावेसे वाटते. चिन्ता वाटते. **चोर दरोडे-खोरांची स्वप्ने पडतात** किंवा त्यांची भीती वाटते. हसणे रडणे आलटून पालटून. ज्यावेळेस रडू यावयास पाहिजे त्यावेळेस रडू येत नाही. मागे घडलेल्या अप्रिय गोष्टीची आठवण होते. पुढे काय होईल याची धास्ती वाटते. डोळ्यातून पाणी येईतो हसणे. बोलताना गोंधळ करणे. चित्त जागे-वर नसणे.

**डोके** :– घेरी येते, खाली पडत आहोत असे वाटते, डोळे मिटल्याने जास्त. ***डोकेदुखी* – हातोडे मारल्याप्रमाणे वेदना** होतात, जडपणा वाटतो, फुटल्या-प्रमाणे वाटते, वेड लागण्याइतक्या वेदना होतात, वेदना **डोळ्यांच्या वर,** टाळू वर विशेषतः **सकाळी जागे झाल्यानंतर** जास्त होतात; वेदना होत असताना डोके बधिरल्यासारखे होते किंवा दृष्टीचे विकार उद्भवतात; वाचताना, हालचालीने, (डोळ्याच्यासुद्धा), डोके जास्त दुखते; डोळे दाबल्याने बरे वाटते. डोके मागेपुढे हलते. अर्धशिशी. डोक्याचे केस गळतात. डोके दुखण्याच्या अगोदर जीभ, ओठ, नाक मिरमिरावयास लागून बधिर होते. शाळेत जाणाऱ्या मुलामुलींची डोकेदुखी.

**डोळे** :– एकत्र ओढले जात आहेत असे वाटते. **डोळयातून पाणी येते**- पाणी चुरचुरणारे कढत– विकार झालेल्या बाजूच्या डोळयातून, हसताना, शिंक-ताना, खोकताना वगैरे. निजल्यावर पापण्या लुल्या झाल्यासारख्या वाटतात. दृष्टि अंधुक, डोळ्यापुढे पुसट लवलवल्यासारखे वाटते. वाचताना अक्षरे एकात एक गुंतत आहेत असे वाटते. वस्तूंचा अर्धा भाग दिसावयास लागतो नंतर डोके दुखावयास लागते. कृत्रिम उजेडात वाचता येत नाही. नुकताच सुरू झालेला मोतीबिंदु. लासरू– नाकाकडील कोपऱ्यात दाबल्याने पू बाहेर येतो. डोळे चटबटीत. गलगंड. खाली पाहिल्याने डोळे दुखतात.

**कान** :– कानात आवाज होतात. अन्न चावताना कानात कटकट आवाज होऊन दुखते.

**नाक** :– भयंकर सर्दी होऊन नाक खूप वाहते, २–३ दिवसानंतर सर्दी थांबून अगदी वरच्या भागात नाक चोंदते. पहाटे शिंका येतात. नाक आलटून पालटून कोरडे पडते किंवा खूप वाहते. पाण्याची धार लागते, आत व्रण पडतात. वास व चव दोन्ही कळत नाहीत. अगोदर शिंका येऊन नंतर सर्दी होते. एक बाजू बधिर.

**चेहरा** :– फिकट, मळकट, तेलकट. तापात फोड येतात. ***ओठांभोवती वेदनायुक्त पुटकुळ्या येतात*** किंवा केसाच्या कडेला येतात. पुटकुळ्या पांढऱ्या मोत्याच्या दाण्याप्रमाणे. खालचा जबडा ठुसठुसतो–उष्णतेने, गारठ्याने किंवा चावताना जास्त. खालच्या ओठाच्या मध्यभागी खोल भेग पडते. ओठ मिरमिरल्यासारखे वाटून बधिर होतात. हिस्टेरीआत चेहेऱ्यावर लव येते पण रोगी सुधारावयास लागला तर ती नाहीशी होते.

**तोंड** :– जीभ मिरमिरते, बधिर होते, एक बाजू. ***जीभ नकाशाप्रमाणे रंगीबेरंगी*** **चट्टे पडलेली जिभेच्या कडेला मण्यासारखे फोड उगवतात किंवा तीवर पट्टे पडलेले दिसतात.** जिभेवर व तोंडात फोड येतात, व्रण पडतात, अन्नाच्या स्पर्शाने चुणचुणते, आग होते. हिरड्यावर लहान गुल्मे उगवतात. जिभेखाली लाल गुल्म येते. जिभेला केस चिकटला आहे असे वाटते.

**घसा** :– सारखा कफ खाकरावा लागतो. कफ कडू; खारट. पडजीभ एका बाजूला कललेली. घशात एके ठिकाणी कोरडेपणा व हुळहुळेपणा वाटून गुदगुल्या होतात व त्यामुळे खोकला येतो. घसा चकचकीत दिसतो. अन्न खाताना ते कंठात शिरते. फक्त पेये गिळता येतात, अन्न गिळताना ते अन्ननलिकेत एका ठराविक जागेपर्यंत जाऊन नंतर जोराने बाहेर फेकले जाते. गळगंड, डोळे बटबटीत.

**जठर** :– **तहान लागते, खूप पाणी प्यावेसे वाटते.** भूक लागून भरपूर अन्न जाते पण शरीराचे पोषण होत नाही ते वाळते. भूक लागते पण खाण्याची वासना होत होत नाही. **मीठ, आंबट पदार्थ, तृणधान्ये, शिपातील मासे, दूध, मासे खाण्याची इच्छा. पाव, मांस, काफी, खाण्याचा तिटकारा.** खाण्यानंतर जळजळीत ढेकरा येतात. खाताना घाम येतो तोंडाला पाणी सुटते. जठरात एकप्रकारची चिंता किंवा भीती वाटून ती डोक्यात शिरत

आहे असे वाटते. पांढरा कफ ओकारी येऊन पडतो. व त्याने बरे वाटते.

**उदर** :– ताणल्याप्रमाणे वाटते विशेषतः जांघात. शौचास कोरडे टणक खडे होतात व त्यांचे तुकडे पडतात. शौचास होताना गुदद्वार फाटते किंवा आग होते. शौचाभोवती चकचकीत पांढऱ्या आवेचा थर. मलावरोध, एक दिवसाआड शौचास होते. जीर्ण हगवण–वेदनारहित मोठाले जुलाब होतात व त्याचे अगोदर आंतड्यात चिमटे घेतल्यासारखे वाटते. गुद आवळल्या-सारखे वाटते. गुदद्वाराभोवती वेदनायुक्त पुटकुळ्या येतात. पोटाच्या खळीत उडते. एकाएकी उदर फुगते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी भरपूर होते. चालताना, खोकताना; शिंकताना लघवी नकळत होते. दुसऱ्यांच्या देखत लघवीला होत नाही. लघवीखाली लाल गाळ जमतो. बसल्यानंतर लघवी सुटावयास वेळ लागतो.

**पुरुषजननेंद्रिये** :– संभोगानंतरसुद्धा वीर्यपात होतो. संभोगानंतर पाठ दुखते, पाय अशक्त होतात व खिन्नता येते. परमा. वैषयिक वासना होते पण शारीरिक शक्ती नसते.

**स्त्रीजननेंद्रिये** – वंध्यात्व. संभोग करताना योनी कोरडी असल्यामुळे योनीत दुखते. संभोगाचा तिटकारा. धुपणीमुळे थकवा वाटतो. विटाळाऐवजी धुपणी जाते. पाळ्या अनियमित पण विटाळ बहुधा भरपूर जातो. धुपणी पाण्यासारखी, करवडणारी. संभोग करताना योनीत आग होते व चुरचुरते. योग्य वयात विटाळ सुरू होत नाही, उशीरा सुरू होतो. कष्टार्तव– आंचके येतात. गर्भाशय खाली सरकून पायाना ठणका लागतो, मूत्रमार्गात कापल्या-प्रमाणे वेदना होतात, सकाळी बरे वाटते. स्तन वाळतात. पांढरी धुपणी हिरवी होते. विटाळसेपणी अंग कढत होते.

**श्वसनेंद्रिये** :– पोटाच्या खळीत गुदगुल्या होऊन खोकला येतो. दम लागतो किंवा छातीत धडधडते. हिवाळयात होणारा खोकला. खोकताना यकृतात टोचते व लघवीला होते. चढताना दम लागतो. डांग्या खोकला, खोकताना डोळयातून पाणी येते.

**हृदय**:– धडधडते व सर्व शरीराला ती धडधड जाणवते. अशक्त, फडफडल्या-सारखे वाटते, मूर्च्छा आल्यासारखी वाटते, निजल्याने जास्त; किंवा हुळहुळे.

धडधडणे–भावनामुळे, डाव्या कुशीवर निजल्याने किंवा हालचालीने जास्त होते. हृदयाच्या जागेत गारवा वाटतो. हृदय व छाती आवळल्यासारखी वाटते. निजलेल्या स्थितीत नाडी मधुन मधुन थांबते.

**मानपाठ** – मानेचे स्नायू हुळहुळे होतात. मार लागल्याप्रमाणे पाठ दुखते विशेषतः सकाळी व खोकताना. पाठीवर निजल्याने किंवा दाबल्याने बरे वाटते. तळहात कढत व त्याना घाम येतो. हातांच्या बोटांच्या टोकाना भेगा पडतात. हाताची बोटे व पाय बधिर होतात व मिरमिरतात. गुडघ्याच्या मागील पोकळीत आखडल्यासारखे वाटते. किंवा ओढल्यासारखे वाटते. गुडघ्यात चमक मारते. तंगड्या गार. घोटे अशक्त, सहज वळतात. लिहिताना हात कापतात. झोप लागत असताना हातापायाना आंचके आल्याप्रमाणे धक्के बसतात.

**झोप** :– झोपेत उसासे टाकणे. झोपेत धक्के बसतात. दरोडेखोराची स्वप्ने पडतात. दुःख, शोकामुळे झोप येत नाही. **जागे झाल्यावर अशक्तपणा वाटतो.**

**त्वचा** :– **तेलकट,** कोरडी, खरखरीत, मळकट, पिवळसर, व लवकर बरी होत नाही. भेगा पडतात किंवा **वेदनायुक्त पुटकुळचा येतात,** विशेषतः ज्या ठिकाणी त्वचेवर त्वचा दुमडली जाते अशा जागी किंवा बोटांच्या सांध्यावर. पित्ताच्या गांधी येतात त्यावेळी कंड व आग होते; गांधी विशेषतः शारीरिक श्रमानंतर जास्त होतात.

**ज्वर** :– गारपणा–पंजे, पावले, हृदय वगैरे. तहान लागून सकाळी थंडी वाजते. एकसारखी थंडी पण उन्हात बरे वाटत नाही. हिवताप–सकाळी ९ ते ११ थंडी वाजते–अंग गार होऊन एकसारखी थंडी वाजल्यासारखी वाटते. घाम येतो. घाम गार असतो, थोडा येतो, केसांच्या कडेला, नाकाला किंवा चेहऱ्यावर, खाताना घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *नियमित वेळी*–सकाळी ९ ते ११, **सूर्योदय ते सूर्यास्त,** एक दिवसाआड; विटाळशी झाल्यानंतर; *उष्णता*–**सूर्याची,** उन्हाळा, दमट; **श्रम–डोळ्याचे,** मानसिक; भावनामुळे आलेल्या क्षुब्धतेने; **सहानुभूति दाखविल्याने; वयात येण्याचा काळ;** कोयनेल; जीर्ण हिवताप; चांदीचे क्षार; समुद्रकाठी. पाव. आंबट फळे, तेल तूप.

**ब वा** :– **मोकळी हवा;** गार पाण्याच्या स्नानाने; **घाम** आल्याने; विश्रांति; सकाळच्या न्याहारीच्या अगोदर; दीर्घ श्वास घेतल्याने; उपाशी राहिल्याने.

**सहाय्यक औषधे :–** आर्जे–ना; इग्ने; एपि; सेपि.

**संबंधी औषधे :–** कलि–का; कॅल्क–का; थूजा; पल्स; ब्रायो; र्‍हस–टा; सल्फ; हेपार.

---

## १८३. नेट्रम सल्फुरिकम Natrum Sulphuricum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम ***डोक्याचा मागील भाग***; ***यकृत***; आतडी; छाती व डावी बाजू यावर होतो. अगोदरच रोगाने ग्रस्त झालेल्या इसमाना एकदम तीव्र परिणाम जाणवू लागतात. **भोसकल्याप्रमाणे वेदना होतात**–डाव्या खालच्या बरगड्यात, कमरेच्या डाव्या सांध्यात, टाचात. उठता बसताना कमरेच्या सांध्यात दुखते. **पिवळेपणा– त्वचेचा,** शौच, फोड, **पातळ स्रावांचा.** पू दाट हिरवट पिवळा. **भरल्यासारखे वाटणे.** आंबटपणा. पित्त प्रकृति. वारंवार संधिवात होण्याची प्रवृत्ति. पाण्याजवळ राहणे, दमट हवा, पाण्याजवळ होणाऱ्या भाज्या किंबहुना मासे खाणेसुद्धा सोसत नाही, उष्ण कोरड्या हवेत बरे वाटते. डोक्याला झालेल्या आघातामुळे उद्भवलेले दुष्परिणाम. चामखिळी, मासांकुर येण्याची प्रवृत्ति. वातरक्त ( गाऊट). जल्युक्त सूज. मधुमेह. वेदनांचा विचार केल्याने त्या बळावतात.

**मानसिक :–** काहीही सहन होत नाही. संशयी. मंद उजेडात किंवा संगीताने, रंगीत काचा लावलेल्या खिडकीजवळ बसल्याने खिन्नता येते. मधुन मधुन वेडाचे झटके येतात. आत्महत्त्या करण्याची प्रवृत्ति व तसे होऊ नये म्हणून स्वतःवर ताबा ठेवावा लागतो. बोलावेसे वाटत नाही व दुसऱ्याने पण स्वतःशी बोलू नये असे वाटते. बंदुक, पिस्तुलाने आत्महत्या कराविशी वाटते. डोक्याला मार लागल्यामुळे उद्भवलेले मानसिक विकार. संशयी. शौचास झाल्यानंतर आनंद वाटतो.

**डोके :–** घेरी येते पण डोक्याला घाम आला म्हणजे कमी होते. **डोक्याच्या मागील भागात** ठेचल्याप्रमाणे किंवा कुरतडल्याप्रमाणे वेदना होतात. मेनिन्जायटिस. डोकेदुखी, आवाजाने, खाण्याने, उजेडाने जास्त होते; अंधारात, ओकारी झाल्याने बरे वाटते. कवटीची त्वचा हुळहुळी, त्यामुळे केस विंचरताना दुखते.

**डोळे :–** ***उजेड मुळीच सहन होत नाही***, सकाळी जागे झाल्यानंतर. डोळे पिवळे. खुपऱ्या. पापण्या जड.

**कान** :– दमट हवेत कानात तीव्र चमका मारतात.

**नाक** :– नाकातून रात्री पाणी वाहते. नाकातून रक्त पडते; विटाळसेपणी किंवा अगोदर; थांबुन थांबुन पडते. शिंका येऊन नाक खूप गळते.

**चेहरा** :– पिवळा.

**तोंड** :– तोंडात चिकट दाट कफ साचतो. जीभ **मळकट** पिंगट किंवा **हिरवट पिवळी**, ***जाड चिकट थर जिभेवर*** जमतो, **विशेषतः बुंध्याशी.** जिभेचे टोक भाजल्यासारखे वाटते. चव कडू. टाळ्याला भाजल्यासारखे फोड येतात. दात दुखी, गार पाणी तोंडात धरल्याने कमी होते. डोके दुखत असताना लाळ गळते. हिरड्यांची भाजल्यासारखी आग होते.

**घसा** :– घशात जाड पिवळा शेंबूड नाकातून उतरतो.

**जठर** :– तापाच्या सुरवातीस फक्त तहान लागते. बर्फ किंवा थंड घ्यावेसे वाटते. आम्लपित्त. छातीत जळजळ. ओकारी झाल्याने डोके दुखावयाचे थांबते. अग्निमांद्य. मळमळ; अनेक विकारात **हिरव्या** पित्ताची ओकारी. पिष्टमय पदार्थ (तवकील), दूध, बटाटे सोसत नाहीत.

**उदर** :– यकृताची सूज. यकृत हुळहुळे व जड होते–आत टोचते, वस्त्रांचा दाब, दीर्घ श्वास, धक्का सहन होत नाही, **डाव्या कुशीवर निजल्याने जास्त त्रास** होतो. यकृताखाली गोळा आहे असे वाटते. पित्ताशयात ओरबडल्यासारख्या वेदना होतात. उदर चोळण्याने किंवा मुठीने तिंबल्याने आतील वेदना कमी होतात. बेंबीजवळ पेटके येतात. ***वात धरतो***, वेदना होऊन इकडे तिकडे ठोसल्यासारखे वाटते, विशेषतः डाव्या बाजूस. ***आतड्यात गुरगुरल्या गुडगुडल्याप्रमाणे आवाज होऊन नंतर एकदम जोराने आवाज होऊन जुलाब होतात.*** जुलाब **विशेषतः सकाळी उठल्यानंतर** होतात किंवा काही वेळेस इतकी घाई होते की अंथरुणातून पळावे लागते. जुलाब पिवळे फेसाळ–आत हिरवी आव पडते. शौचास मोठ्या प्रमाणात किंवा आकारात होते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीखाली पांढरा गाळ जमतो. लघवीतून पित्त जाते. लघवीला भरपूर होते. मधुमेह.

**पुरुषजननेंद्रिये** :– मासांकुर उगवतात. परमा–दाट हिरवा स्राव.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळसेपणी नाकातून रक्त पडते. धुपणी हिरवट, पिवळी, परमा बरा झाल्यानंतर सुरू झालेली, धुपणी जाताना आवाज बसतो. योनीवर वेदनायुक्त फोड येतात.

**श्वसनेंद्रिये** :– पावसाळयात दमा होतो. खोकला ओला. खोकताना छाती व कुशी धरून ठेवाव्या लागतात. सारखा दीर्घश्वास घ्यावासा वाटतो. कफ दाट चिकट हिरवा. छातीत डाव्या खालच्या भागात वेदना होतात. प्रत्येकवेळी सर्दी झाली की दमा होतो. चालताना दम लागतो. दम्यात सकाळी जुलाब होतात.

**पाठ** :– कपडे काढल्यानंतर कंड सुटते. पाठीत, मानेत व डोक्याच्या मागील बाजूस तीव्र वेदना होतात. तिकोनी हाडांच्या मध्ये भोसकल्याप्रमाणे वेदना होतात. कण्याचा मेनिन्जायटीस. पाठीची कमान होते. पाठीत कापल्याप्रमाणे तीव्र वेदना होतात व त्या उलगडणाऱ्या पंख्याप्रमाणे खालून वर जातात. लघवी कोंडून धरली तर कमरेत दुखते.

**हातपाय** :– नखुरडे. टाचात ठुसठुसते. तळपायावर भाजल्यासारखे फोड येतात. डाव्या कमरेच्या सांध्यात दुखते–खाली वाकताना, उठताना, बसताना जास्त. गुडघ्याखाली पाउलापर्यंत आग होते. बोटांच्या बेचकात कंड सुटते. पावसाळ्यात होणारा संधिवात. तळपायावर फोड येतात. पाऊले सुजतात. गृध्रसी वात बसलेल्या जागेवरून उठताना किंवा अंथरुणात वळताना त्रास होतो.

**त्वचा** :– कपडे काढल्यानंतर कंड सुटते. चामखिळीप्रमाणे लाल गांठी सर्वांगावर येतात. पिवळसर भाजल्यासारखे पाण्याने भरलेले फोड.

**ज्वर** :– थंडी वाजते पण अंथरुणात सुद्धा पुरेशी ऊब आली आहे असे वाटत नाही. तापात अंगावरचे पांघरूण काढू नयेसे वाटते. गुडघ्याखाली आग होते. खाकेत दुर्गंधी घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– दमट, हवा, जागा, दिवस; रात्रीचे वारे; तळघरे; डाव्या कुशीवर निजल्याने; दुखापती विशेषतः डोक्याच्या; उचलताना; स्पर्श; दाबल्याने; संध्याकाळी; वारा; मंद उजेड. भाज्या. फळे. गार अन्न, पेये.

**ब वा** :– मोकळी हवा; शरीराची अवस्था बदलल्याने.

**सहाय्यक औषधे** :– आर्से; थूजा.

**संबंधी औषधे** :– कोलो; ग्लोनो; पल्स; मेडो.

---

## १८४. परेरा ब्रेव्हा Pareira Brava

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम मूत्र–जननेंद्रिये व डावी बाजू यावर होतो. **हातावर व गुडघ्यावर ओणवे होऊन डोके जमिनीला टेकल्याशिवाय लघवीला होत नाही.** मूत्राशयातून वेदना **शिश्नाच्या बोंडीपर्यंत** व मांड्यात जातात. शिश्नाच्या बोंडीत किंवा मूत्राशयात फुटल्यासारखे वाटते. एकसारखे लघवीला होईल होईलसे वाटते व खूप कुंथावे लागते. लघवी होण्याचा प्रयत्न करताना मांड्यात वेदना होतात. लघवी कष्टाने होते. मूत्रपिंडाच्या खड्याच्या वेदना. मूत्रग्रंथी मोठी होते. लघवीत दाट, पांढरा श्लेष्मा किंवा तांबडी वाळू जाते. पायांना सूज येते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य ब वा** :– हातावर व गुडघ्यावर ओणवे झाल्याने.

**संबंधी औषधे** :– बर्बे; मेडो.

---

## १८५. पलाडिअम Palladium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम गर्भाशय; **उजवे रजःपिंड** व मन यावर होतो. **एकदम इकडेतिकडे फिरणाऱ्या वेदना.** शारीरिक श्रमाचा कंटाळा. मार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा. अशक्तपणा. वाईट बातम्यांचे दुष्परिणाम.

**मानसिक** :– गर्विष्ठ. उगीचच अपमान झाला आहे असे वाटून रुसणे. लोकानी स्वतःची स्तुति करावी अशी इच्छा. मंडळीत असेतोपर्यंत आनंदी वाटते नंतर थकवा वाटतो व वेदना जास्त होतात. आपल्याकडे दुर्लक्ष होते आहे असे वाटते. वाईट बातमी ऐकली की सर्व लक्षणे जास्त होतात. वेळ फार सावकास चालला आहे असे वाटते. आपला काल्पनिक किंवा खरा अपमान किंवा आपल्याकडे कुणी लक्ष देत नाही असे वाटून एखादे वेळेस संतापणे.

**डोके** :– एका कानापासून दुसऱ्या कानापर्यंत टाळूवरून डोके दुखते. डोके मागे पुढे हेलकावे खात आहे असे वाटते.

**घसा** :– घशातून बुळबुळीत कफ पडतो. पावाचा भुगा आत अडकला आहे असे वाटते.

**उदर** :– बेंबी ते स्तनापर्यंत किंवा ओटीपोटापर्यंत तीव्र कळा येतात. शौचानंतर बरे वाटते. आतडी चावून टाकल्याप्रमाणे वाटतात, जांघात पोकळ झाल्यासारखे वाटते. खाली ओढल्याप्रमाणे वेदना होतात, चोळण्याने बरे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्राशयात कापल्याप्रमाणे वेदना होतात–शौचास झाल्याने कमी होतात. मूत्राशय भरल्यासारखे वाटते पण लघवीला थोडीशीच होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गर्भाशयात कापल्यासारख्या वेदना होतात- शौचास झाल्याने कमी होतात. मुलाला अंगावर पाजताना विटाळ जातो. विटाळशी होण्याच्या अगोदर व नंतर बुळबुळीत धुपणीचा स्राव जातो. उजवे रजःपिंड मोठे होऊन दुखते, जोराने दाबल्याने बरे वाटते. गर्भाशय स्वस्थानावरून खाली येतो, किंवा मागे वाकतो. ओटीपोटात जड शिसे ठेवल्याप्रमाणे वाटते.

**पाठ** :– कमरेत थकल्यासारखे वाटते.

**हातपाय** :– वेदना येतात व जातात. पायांच्या बोटांपासून कमरेच्या सांध्यापर्यंत चमका मारतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **भावना विशेषतः आनंददायक; अपमान; सामाजिक कार्यात;** उभे राहिल्याने. श्रम.

**ब बा** :– स्पर्श; दाबल्याने; मन दुसरीकडे गुंतविल्याने; चोळण्याने. झोपेनंतर. **शौचास झाल्याने.**

**संबंधी औषधे** :– असाफि; प्लॅटि.

---

## १८६. पल्सटिल्ला Pulsatilla

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मन; शिरा; श्लेष्मल त्वचा–जिभेची; जठर, आतडी, स्त्रीजननेंद्रिये; मूत्र–जननेंद्रिये;* श्वासोच्छ्वास; **एक बाजू; हृदयाची** उजवी बाजू यावर होतो. *लक्षणांच्या स्वरूपात व जागेत एकसारखी अदलाबदल* होते. **लक्षणांची ठराविक मर्यादेपर्यंत वाढ होऊन नंतर ती एकदम थांबतात. ज्या बाजूवर निजले असेल किंवा ज्या भागावर भार पडला असेल त्या ठिकाणी लक्षणे उद्भवतात.** लक्षणे एका बाजूस होतात. पचनेंद्रियांचे विकारात व स्त्रियांच्या विटाळासंबंधी उपद्रवात *तहान लागत नाही, दम लागतो व थंडी वाजल्यासारखी वाटते. स्राव बंद झाल्यामुळे उद्भवलेले विकार*–कानातील, विटाळ, दूध वगैरे. विकार आलटून पालटून होतात. एका अवयवातील रोग नाहीसा होऊन दुसऱ्या अवयवात होतो. रक्तक्षय. रक्तस्राव हळुहळु पाझरतो किंवा दुसऱ्या स्रावाच्या बदली सुरू होतो. *स्राव*

*विन करवडणारे, दाट हिरवट, पिवळे व भरपूर.* धक्के बसतात. फाडल्याप्रमाणे किंवा व्रण पडल्याप्रमाणे वेदना होतात. **बधिरपणा**–भार पडलेल्या भागात, किंवा पंजे, पाऊल वगैरे. स्वभावाने शांत, रडव्या, भित्र्या, भावनाप्रधान व स्थूल होण्याकडे प्रवृत्ति असलेल्या स्त्रिया. गरोदरपणी होणारे उपद्रव. न्हाण येण्याच्या वयात किंवा त्यावेळेपासून सुरू झालेले विकार. शिरा भरलेल्या दिसतात, **वेड्यावाकड्या होऊन फुगतात** व दुखतात. **डोके उंचावर ठेवून निजावेसे वाटते.** सकाळी अंथरुणातच लोळावेसे वाटते; डोक्यावर हात करून निजण्याची प्रवृत्ति. पावले ताणावीशी वाटतात. तहान लागत नसली तरी गार पाणी किंवा पेये प्याल्याने बरे वाटते. ठुसठुसणे. वेदना होत असलेला भाग रुंद झाल्यासारखा वाटतो. थंडी वाजत असली तरी मोकळ्या हवेत असावेसे वाटते. एकमेकाला विरोधी लक्षणे आलटून पालटून होतात. शरीराच्या दूरच्या भागात उद्भवलेल्या विकारा-मुळे दम लागतो. आईसक्रिम, डुकराचे मांस, तेलकट पदार्थ सोसत नाहीत, किंवा त्यांचे दुष्परिणाम. लोकरीचे कपडे घातल्याने झालेले उपद्रव.

**मानसिक** :– स्वभाव *शांत, भित्रा, भावनाप्रधान व रडवा.* निराश. कुरकूर. सहज अपमान झाल्यासारखा वाटतो. दुसऱ्याने स्वतःविषयी सहानुभूति दाखवावी अशी आवड. लहान मुलाना अंजारले गोंजारल्याने व हिंडविल्याने बरे वाटते. स्त्रीपुरुषाना व एकमेकाची भीती वाटते. लग्नाचा तिटकारा. संभोग करणे दुष्कृत्य आहे असे वाटते. चमत्कारिक धार्मिक समजुती. काहीतरी संकटे येतील अशी विवंचना. लोभी, अविश्वासु. संध्याकाळी भुताखेतांची भीती वाटते, त्यामुळे लपून बसावेसे किंवा पळून जावेसे वाटते. खाण्यानंतर उगीचच हसणे. स्वतःची लक्षणे सांगताना रडणे. सर्व गोष्टीचा तिटकारा. सहज हसू येते व रडू येते. अति सुख किंवा दुःख याचा शरिरावर व मनावर परिणाम होतो. एकटे असण्याची भीती वाटते. अतिशय चिड-खोर. आपला अपमान होत आहे असे वाटते. किंवा अपमान होण्याची भीती वाटते. प्रश्न विचारला तर मानेनेच हो किंवा नाही म्हणणे. काही विशिष्ट खाण्याचे पदार्थ मनुष्याला अयोग्य आहेत अशी कल्पना.

**डोके** :– टाळूत डोके दुखावयास सुरवात होते. डोक्यामागील भागात दुखते, खोकताना जास्त. फार काम केल्यामुळे डोके दुखावयास लागते. न्हाण येण्याच्या सुमारास शाळेत जाणाऱ्या मुलींची डोकेदुखी. मोकळ्या हवेत व चालण्याने डोकेदुखी कमी होते. घेरी येते– मोकळ्या हवेत बरें वाटते,

बसल्याने जास्त होते. कातडीला खूप घाम येतो. अर्धशिशी. ठुसठुसते, फुटल्यासारखे वाटते व जी बाजू दुखत असेल त्या बाजूच्या डोळ्यातून कढत पाणी येते. पचनक्रिया बिघडल्यामुळे, विटाळाच्या उपद्रवामुळे घेरी येते, मळमळते.

**डोळे** :– थंडीमुळे डोळे येतात. पाण्याने डोळे भरल्यासारखे दिसतात– विशेषतः वाऱ्यात. डोळ्यातून दाट पिवळा पू येतो, दीप फारशी नसते. पापण्या चिकटतात. परम्यामुळे आलेले डोळे. पापण्यांच्या कडा सुजतात. रांजणवाड्या. विटाळसेपणी अंधत्वाचे झटके येतात. फूल पडते, डोळ्यावर काही तरी आले आहे असे वाटून दृष्टि मंद होते त्यामुळे डोळे चोळावेसे वाटतात. डोळ्यातून करवडणारे पाणी येते. डोळ्याना कंड येते. आंधळेपणा.

**कान** :– रात्री कान ठणकतात. देवी, गोवर, कांजिण्या या रोगानंतर फुटलेले कान, दाट पिवळा दुर्गंधी हिरवा, नारिंगी रंगाचा स्राव वाहतो, कधी नुसते रक्तच येते. कानाची पाळी लाल होते, सुजते. कानातून काहीतरी जोराने बाहेर ढकलल्यासारखे वाटते. कानात दडे बसल्यासारखे वाटून ऐकू येईनासे होते, गाडीत बसल्याने किंवा खोलीच्या उष्णतेने बरे ऐकू येते.

**नाक** :– नाकाला घाण येते किंवा दुर्गंधी स्राव जातो. वास कळत नाही. सर्दी होते पण निजल्याने किंवा बंद खोलीत नाक चोंदते. जुनाट सर्दी. काल्पनिक वास येतात. पिनस. पाळीत, पाळीच्या अगोदर किंवा पाळी बंद झाल्यामुळे नाकातून रक्त येते.

**चेहरा** :– फिकट. गालगुंड, उजवी बाजू दुखून उजव्या डोळयातून पाणी येते, दुखणे चावताना ( अन्न ), बोलताना किंवा तोंडात गार कढत द्रव्य घेतल्याने जास्त होते.

**तोंड** :- ओठाची सालडी जाऊन भेगा पडतात. **ओठ चाटणे.** खालचा ओठ सुजतो; **मध्यभागी भेग पडते. घाण येते.** दातात ओढल्यासारख्या वेदना होतात, गार पाण्याने कमी होतात. **चव घाणेरडी विशेषतः सकाळी.** चव बदलते, कडू, खारट, तेलकट, रक्तासारखी. **तोंड बुळबुळीत** किंवा कोरडे पण तहान नाही. जीभ पिवळी किंवा पांढरी, भाजल्यासारखी वाटते. लाळ गोड. अन्न कडू लागते विशेषतः पाव. खाल्लेल्या अन्नाची मागे चव राहते. कोणत्याही अन्नपदार्थाची लागावी तशी चव लागत नाही.

**घसा** :– **अन्न घशात राहिले आहे असे वाटते** किंवा खाल्लेल्या अन्नाची चव घशात जाणवते. घशात किडा वळवळत आहे असे वाटते.

जठर :– गरम अन्न पेय, डुकराचे मांस, पाव, दूध, तंबाखु ओढणे, तेलकट पदार्थ व पाण्याचा तिटकारा. आंबट पदार्थ किंवा उत्तेजक पदार्थ, तिखट पदार्थ, चीज किंवा जे पदार्थ सोसत नाहीत ते खाण्याची वासना. मळमळ. छातीत जळजळ. खाल्लेले अन्न बऱ्याच वेळाने जसेच्या तसेच ओकून पडते. पोटाच्या खळीत कापल्याप्रमाणे वेदना होतात किंवा उडल्यासारखे वाटते. *जड ओझे ठेवल्यासारखे वाटते. अजीर्ण.* बहुतेक विकारात तहान लागत नाही. अन्न जास्त खारट लागते. खाता खाता एकदम जेवणाचा तिटकारा येतो. ढेकरांना खाल्लेल्या अन्नाची चव लागते. जठरात टोचते, चालताना, पाय वेडावाकडा पडला तर जास्त.

उदर :– आत जड दगड ठेवला आहे असे वाटते. बधिर. वेदना होऊन त्या जांघापर्यंत जातात. कावीळीत हगवण लागते, ताप आल्यासारखा वाटतो, तहान लागत नाही. शौचाचे रंग व रूप यांच्यात वारंवार बदल होतो. हिरवी आव पडते. नेहमीच दररोज ३।४ वेळा शौचास जाण्याची संवय. मूळव्याधीचे मोड निजल्याने किंवा पाळीच्या वेळेस बाहेर येतात.

मूत्रेंद्रिये :– लघवीला वारंवार लागली आहे असे वाटते, निजल्यानंतर जास्त. झोपेत लघवीला न कळत होते विशेषतः लहान मुलींना. निजल्याने, हसताना, खोकताना, शिंकताना, एकदम आवाज ऐकला तर, वात सरताना, आश्चर्य–आनंदाचा धक्का बसला तर लघवी न कळत होते. लघवी झाल्यानंतर रक्त येते. मूत्राशयावर ओझे ठेवल्यासारखे वाटते किंवा आत पेटके येतात, लघवी झाल्यानंतर मूत्राशयात दगड इकडे तिकडे फिरत आहे असे वाटते. मूत्रग्रंथी वाढलेली. राग आला तर लघवी थेंब थेंब गळते.

पुरुषजननेंद्रिये :– अंडाचा शोथ, परम्यामुळे किंवा गार दगडावर बसल्यामुळे झालेला. डाव्या वीर्यवाहिनीनलिकेत वरून खाली आग होते. परमा–साव दाट पिवळा. मूत्रमार्ग बारीक होतो त्यामुळे लघवी थेंब थेंब होते किंवा थांबून थांबून होते. वीर्य रक्तमिश्रित. अंड खाली लोंबतात.

स्त्रीजननेंद्रिये :– विटाळ सुरू होईल असे वाटते पण होत नाही. पाळी उशीरा, न्हाण योग्य वयात येत नाही. पाळी अनियमित किंवा बंद. *विटाळ, काळा, थोडा* जातो, गाठ्याळ, रंगरूप बदलते, थांबुन थांबुन जातो. विटाळाऐवजी नाकातोंडातून रक्त येते. कष्टार्तव–खाली ओढ लागल्याप्रमाणे वेदना होतात, निजल्याने जास्त होतात. धुपणी–पांढरी दुधाप्रमाणे, दाट सायीप्रमाणे, करवडणारी. धुपणी जाताना पाठीत दुखते, थकवा येतो. बाळंत-

वेदना मंद. वार बाहेर पडत नाही. गर्भाशयात मूल आडवे असल्यास या **औषधाने सरळ होते.** बाळंतपणानंतर पायाना पांढरी सूज येते. बाळंतपणा-**नंतरचा विटाळ दुधासारखा** पांढरा. वायगोळा फार जोराच्या कळा येतात व फार वेळ **राहतात.** कुमारिकांच्या स्तनात दूध येते; किंवा स्तनांचा क्षोभ झाला तर दूध येते. ( उदा. पुस्तके छातीशी धरून नेल्याने ). **दूध येण्याचे एकदम बंद होते किंवा थोडे येते.** स्तन हुळहुळे होतात, दुखतात. न्हाण येण्याच्या अगोदर मुलींच्या स्तनात गाठ येते ( उजव्या). नष्टार्तव, पाण्यात पाय राहिल्याने, थकवा येतो व पंडुरोग होतो. प्रत्येक वेळी अंगावर मूल पाजताना रडू येते. मूल तोडल्यावर स्तन सुजतात. दूध वाहते.

**श्वसनेंद्रिये :–** ***एकसारखे वारे हवेसे वाटते.*** सकाळी खोकला ओला असतो, संध्याकाळी व रात्री कोरडा होतो. खोकला आला म्हणजे **अंथरुणात उठून बसावे लागते.** पोटाच्या खळीत गुदगुल्या होऊन खोकला येतो. खोकल्याचा कोरडा ठसका लागतो पण जसजसा खोकला वाढत जाईल तसतसा खोकला ओला होऊन कफ कडू किंवा खारट व्हावयास लागतो. कफ दाट पुवळलेला, बुळबुळीत, गोड, खारट वगैरे. **छाती दाटलेली;** छातीवर जड ओझे ठेवल्याप्रमाणे वाटते. गळ्याच्या हाडाखाली टोचते. निजल्याने ( विशेषतः डाव्या कुशीवर किंवा अंग तापले तर ). गुदमरल्यासारखे वाटून वारे हवेसे वाटते. थुंकीत रक्त पडते. डांग्या खोकला. गोवरानंतरचा खोकला. काही कारण नसताना आवाज बसतो व सुटतो. दमा–स्राव बंद झाल्यामुळे उत्पन्न झालेला. छातीत धडधडते. डाव्या कुशीवर निजल्याने, भावनामुळे, नष्टार्तवात, चिंतायुक्त, रात्रीच्या जेवणानंतर.

**पाठ :–** खांद्यामध्ये व मानेत पाठीत तीव्र कळा येतात. बसल्यानंतर माकडहाडात दुखते. पाठीवर वरून खाली गार पाणी ओतले जात आहे असे वाटते. फार वेळ वाकून राहिल्यामुळे माकडहाडात व पाठीत दुखते. पाठीच्या वरच्या भागाचे कुबड. पाठदुखी पाठीवर झोपल्याने जास्त होते, कुशीवर निजल्याने किंवा अवस्था बदलल्याने बरे वाटते. विशेषतः गरोदरपणी.

**हातपाय :–** वेदना त्वरित जागा बदलतात. ओढल्या ताणल्याप्रमाणे वेदना एकदम सुरू होऊन एकदम थांबतात, हातपाय लोंबकळत ठेवल्याने जास्त त्रास होतो **सांधे सुजतात;** पावलांचा वरचा भाग सुजतो. कोपराभोवती बधिरपणा येतो. पाय जड, तंगडीच्या हाडात टोचते– निजल्याने जास्त, उघड्या हवेत व चालण्याने बरे वाटते. पायाना गार घाम येतो. पावलाना दुर्गंधी घाम येतो.

हात मोडल्यासारखे वाटतात, निखळल्यासारखे वाटतात. पायांच्या शिरा फुगतात, वेड्यावाकड्या होतात, दुखतात. गुडघे सुजतात.

**झोप** :- दिवसा अतिशय झोप येते. हात डोक्यामागे ठेवून निजणे, किंवा उदरावर एकमेकावर आडवें करून निजणे. स्वप्नें पडतात. जागे झाल्यानंतर भ्रमल्यासारखे वाटते किंवा थकवा वाटतो, हुशारी वाटत नाही. भयंकर किळसवाणी, वैषयिक, गुंतागुंतीची स्वप्ने पडतात, स्वप्नात मांजरे वगैरे दिसतात. झोपेत दातखिळी वाजते.

**त्वचा** :- गाठी मोठ्या होतात. व्रणाच्या कडा टणक व चकचकीत. फुगून वेड्यावाकड्या झालेल्या शिरात व्रण पडतात. गोंवर. पित्ताच्या गांधी, पौष्टिक अन्न खाल्ल्यानंतर गांधी येतात किंवा विटाळाची पाळी वेळीच न आल्याने गांधी येतात व त्यावेळेस हगवण लागते, कपडे काढल्याने गांधीचा जास्त त्रास होतो.

**ज्वर** :- थंडी वाजते. *गरम बंद खोलीत*, किंवा **वेदना होताना**, रात्री निजल्यानंतर थंडी वाजते, पण उष्णता ( ऊब ) नकोशी वाटते. एक पंजा गार. तापात तहान लागत नाही. झोपेत घाम येतो. कोणत्या तरी भागाला घाम येतो. एकाच बाजूला घाम येतो किंवा एकाच बाजूला उष्णता जास्त असते. एक बाजू गार होऊन बधिर होते. ताप आल्यासारखे वाटते पण ताप नसतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** **जा हो** :- *उष्णता–हवेची, खोलीची*, **कपड्यांची**, *अंथरुणाची*. पाऊले भिजल्याने. *स्राव बंद झाल्याने. संध्याकाळी. विश्रांति. हालचालीच्या सुरवातीस. निजल्याने*–**एका बाजूस (डाव्या)**. *पौष्टिक अन्न*. खाण्यानंतर बऱ्याच वेळाने. *तेल, तूप, लोणी* वगैरे. बर्फ. अंडी. *वयात येण्याच्या काळात. गरोदरपणी*. **विटाळशी होण्याचे अगोदर**. कोयनेल. लोह असलेली औषधे. विकार झालेला भाग लोंबकळत ठेवल्याने.

**ब वा** :- *थंडी. गार मोकळी हवा*. उघडे झाल्याने. *ताठ बसल्याने*. हालचाल हळुहळु **केल्याने** किंवा चालू ठेवल्याने. **मनसोक्त रडल्यानंतर**. दाबल्याने. जोराने चोळल्याने. उंच उशी घेऊन निजल्याने. असलेली स्थिती बदलल्याने.

**सहाय्यक औषधे** :- आर्से; कलि-बाय; कलि-मू; कलि-स; झिंक; ब्रायो; सल्फ; सिलि; सेपि.

**संबंधी औषधे** :- एपि; ग्रफाय; नेट्र–स; न्हस–टा; लायको; हॅमॅमे.

---

## १८७. पॅरिस Paris Quadrifolia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **डोके, कणा,** डोळे व एक बाजू यावर होतो. **जडपणा,** बधिरपणा ( डावी बाजू ). सांधे मोडल्यासारखे वाटतात. **अवयव किंवा भाग फार मोठे झाले आहेत** किंवा एकमेकाजवळ ओढले जात आहेत असे वाटते. उजवी बाजू कढत डावी गार. स्पर्शेंद्रियांच्या ज्ञानात बिघाड. त्वचा हुळहुळी स्पर्श सहन होत नाही, वस्तु जास्त खरखरीत लागतात. काल्पनिक दुर्गंधी वास येतात. दुर्गंधी वास सहन होत नाहीत, विशेषतः मासाचा. **एकसारखी बडबड करावीशी** वाटते. बडबडीचे वेड. दुसऱ्याशी वागताना उद्धटपणे व तुच्छतेने वागण्याची प्रवृत्ति. **डोळे आत मागे ओढल्याप्रमाणे वाटतात किंवा फार मोठे झाले आहेत असे वाटते.** नाकाच्या बुंध्याशी चेहरा एकत्र झाला आहे असे वाटते. घशातून **चिकट हिरवा कफ खाकरणे.** जीभ कोरडी, जागे झाल्यानंतर जीभ मोठी झाली आहे असे वाटते. घशात गोळा आहे असे वाटते. **नियमितवेळी** किंवा मधुन मधुन वेदना न होता **आवाज बसतो.** जागे झाल्यानंतर जीभ कोरडी पण तहान लागत नाही. डोक्याखाली मानेत जड ओझे ठेवल्यासारखे वाटून मान शिणल्यासारखी वाटते. हातांची बोटे बधिर. एक बाजू कढत किंवा गार. मोठ्याने वाचताना घेरी येते. कवटीचे कातडे हुळहुळे, केस विंचरता येत नाहीत. जठरांत दगड ठेवल्याप्रमाणे जड वाटते; ढेकर आल्याने बरे वाटते. पचनक्रिया मंद.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– विचार केल्याने; डोळ्याचे श्रम; स्पर्श.

**ब या** :– दाबल्याने. ढेकर आल्याने.

**संबंधी औषधे** :– नक्स–व्हा; बेला.

---

## १८८. पायरोजेन Pyrogen

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **रक्त; हृदय; रुधिराभिसरण;** स्नायू यावर होतो. **ठणका,** ***मार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा*** **व शक्तिपात** पण अस्वस्थपणा. अंथरूण टणक झाले आहे असे वाटते. **हाडे दुखतात. दुर्गंधी–चव,** अंगाला, विटाळ, घाम वगैरे सर्व **स्राव. अंगावर लाल गुलाबी रेषा उठतात.** सेप्टिक अवस्था. कुजलेले मांस किंवा अन्न खाऊन, गटाराच्या

दुर्गंधी वायुमुळे, प्रेते फाडताना झालेल्या जखमेमुळे होणारे दुष्परिणाम. बाळंत-ज्वर, टायफाइड, घटसर्प, वाखा, मुरलेला हिंवताप यामुळे झालेले दुष्परिणाम. *नाडी तापाच्या मानाने जास्त जलद* **किंवा मंद असते. ताप जलद वरखाली होतो.** बारंवार होणारी गळवे, भाग होते व ठणका. वाहत असलेल्या गळवातून पू एकदम थांबून ठणका लागणे. सेप्टिक कारणामुळे कोणतेही विकार उद्भवले तर हे औषध प्रथम द्यावे.

**मानसिक :–** विचार जलद मनात येतात व त्यामुळे सारखी **बडबड करणे. क्षुब्धता.** सर्व अंथरूण स्वतःच व्यापले आहे असे वाटते. अनेक हातपाय आहेत असे वाटते. आपण फार श्रीमंत आहोत असे वाटते. चिंता व अनेक प्रकारच्या वेडगळ कल्पना. आपण दोन आहोत असे वाटते. भ्रमिष्ट. स्वतःशीच बोलणे किंवा पुटपुटणे. एका कुशीवर निजल्याने आपण कोणी तरी आहोत असे वाटते तर कूस बदलल्याने दुसरेच कोणीतरी आहोत असे वाटते. स्वतःशीच किंवा झोपेत पुटपुटणे.

**डोके :–** डोक्यात भयंकर ठुसठुसते. ताप चढला म्हणजे वेदना कमी होतात किंवा घट्ट बांधल्याने बरे वाटते. डोके इकडे तिकडे फिरविणे. डोक्यावर टोपी ठेविली आहे असे वाटते.

**डोळे :–** हुळहुळे (डावा), वर पाहिल्याने, डोळे फिरविल्याने जास्त, उजेड सहन होत नाही.

**कान :–** लाल, गार, आत घंटानाद.

**नाक :–** स्वतःच्या अंगाला येणाऱ्या वासाचा तिटकारा येतो. नाक गार. नाकपुड्या आंत बाहेर हालतात. पांघरुणाच्या बाहेर हात पडला तर शिंका येतात.

**चेहरा :–** दुपारी ३ ते ४ च्या दरम्यान चेहऱ्यावर लाली (तापाची) येते, मध्य-रात्रीपर्यंत राहते नंतर गार घामाचे थेंब येतात.

**तोंड :–** जीभ लालभडक गुळगुळीत. गोड किंवा भयंकर दुर्गंधी चव. जिभेच्या मध्य-भागी पिंगट रेघ, जीभ मोठी, विसविसीत. तोंडाला अतिशय घाण येते. घसा कोरडा. घटसर्प, अतिशय दुर्गंधी.

**जठर :–** मळमळ– कढत पेयाने व ओकारी झाल्याने कमी होते. काफीच्या बुकटी-प्रमाणे ओकारी होते. पाणी पोटात गरम झाल्यावर ओकून पडते. एकसारखे ओकावयास होते. खूप तहान लागते, थोडे थोडे गार पाणी प्यावेसे वाटते पण थोडेही पेय घेतले तर ते तात्काळ ओकून पडते.

**उदर** :– जुलाब अंत्यत दुर्गंधी पिंगट–काळसर. नकळत शौचास होते. आतड्याचे चलनवलन बंद झाल्यामुळे झालेला मलावरोध, लहान, मोठे शौचास काळे दुर्गंधी खडे पडतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीतील गाळ चिकट, लाल, चुन्याप्रमाणे. लघवीला फक्त दिवसातून दोनदाच होते, लघवी थोडी होते. ताप येण्याचे अगोदर लघवीला लागते. लघवी पाण्याप्रमाणे स्वच्छ.

**पुरुषजननेंद्रिये** :– अंड शिथिल, खाली लोंबतात. वृषण पातळ झाल्यासारखे दिसते व हाताला लागते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गर्भाशय खाली येते, डोके धरून कुंथल्याने कमी होते. बाळंतपणानंतरचा विटाळ एकदम थांबल्याने थंडी वाजून ताप येतो व खूप दुर्गंधी घाम येतो. स्तनाग्र. (डाव्या) भोवती दुखते.

**श्वसनेंद्रिये** :– खोकताना, बोलताना छातीत (डाव्या) दुखते. पूर्ण बरा न झालेला न्युमोनिआ.

**हृदय** :– हृदयाजवळ मांजर गुरगुरल्याप्रमाणे आवाज होतो., ते थकल्यासारखे वाटते; मोठे झाले आहे असे वाटते किंवा **भरल्यासारखे** वाटते. धडधडते, व ते कानांत ऐकू येते, त्यामुळे झोप येत नाही.

**पाठ** :– मानेतील धमन्या ठुसठुसतात. पाठ अशक्त झाल्यासारखी वाटते.

**हातपाय** :– नखे गळून पडतील की काय असे वाटते. हाडे व पाय ठणकतात, हात पाय आपोआप हालतात ( उजवा ). खोकताना बोलताना सांध्यात (उजवा) दुखते.

**त्वचा** :– लहानसहान जखमा सुजून मोठया होतात.

**ज्वर** :– तिकोनी हाडांच्यामध्ये थंडी वाजण्यास सुरवात होते. **थंडी हाडात जाणवते.** थंडी वाजताना घाम येतो. रात्री थंडी वाजते. विटाळसेपणी ताप येतो. बाळंतज्वर. हळुहळु चढत जाणारा क्षयी ज्वर. घाम येतो पण त्याने बरे वाटत नाही. सडकून हुडहुडी भरते. अंग गार. त्रिस्तवाची उष्णता नाकाने आत घ्यावीशी वाटते. तापात बडबड.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– दमट थंडी. **हालचाल**- बसण्याने. डोळे हालविल्याने.

**ब वा** :– उष्णता; **उष्ण पाण्याचे स्नान.** दाबल्याने. झोके घेतल्याने. उष्ण पेये. अंग ताणल्याने. अवस्था बदलल्याने

**संबंधी औषधे** :– ॲन्थ्रा; आर्से; एकिने; बॅप्टि.

---

## १८९. पॉलिगोनम Polygoum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम मूत्र –जननेंद्रियें व **आतडी** यावर होतो. *कापल्याप्रमाणे वेदना* –मूत्रनलिकेत, रजोवाहिनी नलिकेत होतात व त्या वेळेस खाली ओढ लागते. कण्यात खालून वर कापल्यासारखे वाटते. **ठुसठुसणाऱ्या वेदना** इकडे तिकडे फिरतात. मूत्रग्रंथीत ठुसठुसते. स्राव चुणचुणणारे. एकाच भागात गारवा व उष्णता आलटुन पालटुन जाणवते, किंवा एका भागात गारवा तर दुसऱ्या भागात उष्णता.

**डोके** :– कानशिलात ठुसठुसते.

**डोळे** :– डोळ्याखाली फुगीरपणा, ( उजव्या )

**चेहरा** :– उजव्या बाजूस गार तर डाव्या बाजूस तीव्र वेदना होतात.

**तोंड** :– टाळ्यात आग होते, कंड सुटते, खाजवावेसे वाटते. जीभ सुजल्याप्रमाणे वाटते.

**उदर** :–उदरात मळमळ जाणवते. **कापल्याप्रमाणे, पिळल्याप्रमाणे वेदना होऊन** लघवीचे विकार उद्भवतात. मूत्रपिंडाच्या खड्यामुळे होणाऱ्या वेदना. गुदद्वारात पुटकुळ्या येऊन खाजते. उदरात खूप गुरगुरल्यासारखे वाटून कापल्यासारख्या वेदना होतात व आतड्यात पाण्यासारखे द्रव्य साचले आहे असे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थोडी, थेंब थेंब होते. काळी. चुन्याच्या भुकटीप्रमाणे चिकट गाळ खाली जमतो. मूत्राशयाचा व मूत्रपिंडाचा शोथ त्यामुळे लघवीतून पू जातो.

**पुरुषजननेंद्रिये** :– वृषण करवडलेले.

**स्त्रीजननेंद्रिये** :– तरुण मुलींचे नष्टार्तव किंवा रक्तप्रदर. स्तनात तीव्र कळा येतात.

**हातपाय** :– कमरेचे सांधे एके ठिकाणी ओढल्यासारखे वाटतात. पाय ठणकतात. टाचा हुळहुळ्या.

**त्वचा** :– पित्ताच्या गांधी. पायावर उथळ व्रण पडतात-विशेषतः विटाळ थांबण्याच्या वयात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– थंडी, दमटपणा, वस्त्रांचा दाब.

**संबंधी औषधे** :– कॅल्क-का.

---

## १९०. पिओनिआ Paeonia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **गुदद्वार**; शिरा व त्वचा यावर होतो. काहीही सहन होत नाही. तीव्र कळा किंवा काटे टोचल्याप्रमाणे वेदना.

**गुदद्वार** :– गुदद्वाराभोवती दुर्गंधी ओलसरपणा. **गुदद्वारात अत्यंत वेदना होतात** व त्या शौचास झाल्यानंतर बराच वेळ राहतात, त्यामुळे उठून चालणे भाग पडते. भगेंद्र किंवा भेगा पडतात. गुदद्वारावर खपल्या बसतात. मूळव्याधीचे मोड–मोटाले, सुजलेले व व्रण पडलेले. गुदास्थिखाली व्रण पडतात.

**झोप** :– भयंकर स्वप्ने पडून त्यांची धास्ती बसते.

**त्वचा** :– शिरा फुगलेल्या. बुटाचा वगैरे दाब पडून झालेले व्रण.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *शौचास होताना*; स्पर्श; रात्री; हालचाल. दाब.

**संबंधी औषधे** :– रॅटनि.

---

## १९१. पिक्रिक ॲसिड Picric Acid

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम मेंदू; डोक्याचा मागील भाग; **मज्जारज्जू ; कंबर; मूत्रपिंड** व जननेंद्रिये यावर होतो. शरीर व मन **अशक्त, थकलेले**. शरीर **जड** झाल्यासारखे वाटते. दुष्ट रक्तक्षय. सहज शक्तिपात होतो. अनेक भागात **आग होते– कण्यात**, पायांची वगैरे. मुंग्या येतात. बधिरपणा. सुया टोचल्याप्रमाणे वाटते. लुळेपणा, खालून वर. कंप. उन्हाळा सोसत नाही. शरिराने व मनाने खंगलेले इसम.

**मानसिक** :– आत्मविश्वासाचा अभाव. काम करण्याचा कंटाळा. बेचैन पण स्वस्थ बसावेसे वाटते. परीक्षेत नापास होऊ अशी भीती वाटते. दीर्घकाळ चिंता व मानसिक श्रम केल्याने आपल्या हातून कांही होणार नाही अशी भीती वाटते. कोणीही स्त्री पाहिली की वैषयिक भावना मनात येतात. जमीन किंवा जिना वर आपल्याकडे येत आहे असे वाटते.

**डोके** :– **डोक्याचा मागील भाग कण्यापर्यंत जड** वाटतो. मेंदूचा शीण. मानसिक श्रमाने डोके दुखावयास लागते, घेरी येते– नाकातून रक्त पडल्याने किंवा डोके घट्ट बांधल्याने बरे वाटते. विद्यार्थी, शिक्षक, धंदेवाईक लोक यांची डोकेदुखी. दिवसा डोके दुखते, झोपेत थांबते.

**डोळे** :– पिवळे. येतात, ( जीर्ण ). दाट पिवळा स्राव येतो.

**कान** :– कानात बारीक ठणकणारी गळवे येतात.

**जठर** :– चव कडू, अन्नाचा तिटकारा.

**उदर** :– मानसिक श्रमाने जुलाब होतात. शौचास होताना आग होते. शौच तेलकट, पिवळे पातळ.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला अमोनिआसारखा वास येतो. लघवी थेंब थेंब गळते. लघवी होण्याची क्रिया बंद होते. लघवीतून साखर व अल्बुमिन जाते. मूत्रग्रंथी मोठी होते.

**पुरुषजननेंद्रिये** :– वैषयिक इच्छा प्रबळ. शिश्न वेदना होऊन ताठते, अंडात व वीर्यनलिकेत कळा येतात, वारंवार स्वप्नावस्था होते त्यामुळे अतिशय थकवा येतो. नपूंसकत्व.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळीत अतिशय थकवा येतो.

**पाठ** :– इतकी अशक्त असते की ताठ बसता येत नाही, निजल्याने बरे वाटते. मानसिक श्रमामुळे पाठ दुखते व त्यावेळेस थकवा वाटतो. , पाठ पट्ट्याने आवळल्यासारखी वाटते. मानेवर ठणकणारी गळवे येतात.

**हातपाय** :– लिहिणाराच्या बोटाना पेटके येतात. टाईपराइटरवर काम करणाऱ्या इसमाची बोटे लुली होतात. पाय ठणकतात, सुया टोचल्याप्रमाणे वाटते. पट्ट्याने बांधल्याप्रमाणे वाटतात. जड होतात. शरीर खालून वर लुले पडत जाते. उभे राहताना पाय फाकून उभे राहावे लागते. पायावर लवचिक पायमोजे घातल्यासारखे वाटते.

**त्वचा** :– कावीळ. लहान ठणकणारी गळवे येतात- विशेषतः मानेवर. काळी पुळी.

**झोप** :– दिवसा झोप येते, रात्री येत नाही. झोप गाढ लागली तरी हुषारी वाटत नाही.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **श्रम–मानसिक,** शारीरिक. वीर्यपात. उष्णता. अभ्यास. थकवा.

**ब वा** :– विश्रांति; थंडी; **पट्टा बांधल्याने**; उन्हात.

**संबंधी औषधे** :– ऑक्झॅ-ॲसि; जेल्स; फास्फ; फास्फ-ॲसि.

---

## १९२. पेट्रोलिअम ( रॉकेल तेल ) Petroleum

**सर्वसाधारण** :- या औषधाचा परिणाम *डोक्याचा मागील भाग; त्वचा,* **ज्या ठिकाणी एकावर एक दुमडली जाते अशा जागा,** डोक्याची, चेहऱ्याची; जननेंद्रियांची; श्लेष्मल त्वचा; जठर व आतडी यांवर होतो. अशक्तपणा व कंप. अंतर्गत आजारी आहोत असे वाटते. **अंतर्गत कंड.** शरीर वाळते विशेषतः छाती. मोकळ्या हवेची भीती वाटते, मोकळी हवा लागली तर शहारे येतात. सर्वांगाला मार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा वाटतो विशेषतः सांध्यात. गाठी सुजून मोठ्या होतात. **कोरडेपणा**–कानात, नाकात घशात वगैरे. भेगा पडतात. जलयुक्त सूज. भीती, राग वगैरे मानसिक भावनामुळे उद्भवलेले व दीर्घकाळ टिकलेले परिणाम. रक्तस्राव, रक्त फिकट लाल. स्राव दाट, पुवळलेले, पिवळट हिरवे. मोहनिद्रा, आगबोट गाडी लागल्यावर हे महत्त्वाचे औषध आहे. रेंगाळणारे आतड्याचे व फुफ्फुसाचे विकार. गारवा वाटतो; लहान जागी, उदरात, हृदयाजवळ, खाजविल्यानंतर. अवयव लाकडासारखे वाटतात.

**मानसिक** :- संत्रस्त, रागीट, रागाने बोलावेसे वाटते. चिडखोर. मरण जवळ आले असे वाटून आपल्या कामाचा लवकर निकाल लावण्याची घाई, किंकर्तव्यता. आपण दोन आहोत, शेजारी कोणीतरी आहे, मुलाजवळ दुसरे मूल आहे असे वाटते. विशेषतः स्त्रियांना. **दिशाभूल होते;** कोठे जात आहोत ते समजत नाही. काळजी वाटते पण कसली ते कळत नाही.

**डोके** :- **डोक्याचा मागील भाग जड होऊन दुखतो.** डोक्याला गार वारे लागत आहे असे वाटते. डोके बधिर होऊन लाकडाचे केले आहे असे वाटते. डोकेदुखीत कानशिले धरून ठेवावीसी वाटतात. खोकताना डोके दुखते. *घेरी*– झोके घेत आहोत असे वाटते, **डोक्याच्या मागील भागात जाणवते.** कातडीवर ओलसर उगवण येते. केस गळतात.

**डोळे** :- पापण्याच्या कडांचा शोथ. कोपऱ्यात भेगा पडतात. लासरू. पापण्याचे केस गळतात.

**कान** :- कोरडे. बहिरेपणा, वृद्धपणी. आवाज सहन होत नाही– विशेषतः बरीच मंडळी बोलत असताना ती कटकट सहन होत नाही. कानामागे ओलसर उगवण. इसब. आत खोल कर्णनलिकेत कंड सुटते. पुवळलेला रक्तमिश्रित स्राव येतो.

**नाक** :– कोरडे. आत व्रण, भेगा पडतात व आग होते. रक्त येते. पिनस-खरपुड्या व पुवळलेला शेंबूड येतो.

**चेहरा** :– कोरडा; वर अंड्याचा बलक किंवा डिंक वाळला आहे असे वाटते. जबडा सहज निखळतो.

**घसा** :– कोरडा. आत दुर्गंधी कफ, सकाळी खाकरून काढावा लागतो.

**जठर** :– कढत, तीक्ष्ण आंबट ढेकरा येतात. भूक लागली म्हणजे मळमळते. शौचास झाले की लागलीच भूक लागते. मांसाचा, तेलकट पदार्थ, शिजविलेले अन्न, कढत अन्न यांचा तिटकारा. पोटातील वेदना खाण्याने कमी होतात त्यामुळे एकसारखे खाण्याची प्रवृत्ति. **मळमळते– आगबोटीत, गाडीत गरोदरपणी** वगैरे.

**उदर** :– फुगलेले. आत गार झाल्यासारखे वाटते. **हगवण, जुनाट फक्त दिवसा.** कोबी खाल्ल्याने जुलाब होतात. जुलाब झाल्यानंतर पोटात त्रासदायक पोकळपणा वाटतो. जुलाब पाण्यासारखे पातळ व ते जोराने होतात व गुदद्वारात कंड सुटते. उदरात चिमटल्याप्रमाणे दुखते, पोटाशी पाय घेतल्याने बरे वाटते. आव.

**मूत्रेंद्रिये** :– अंथरुणातून किंवा बसले असता उठताना नकळत लघवीला होते. **मूत्र-नलिका बारीक होते.** एकाएकी लघवीला जोराने लागते व त्याने लघवीला गेले नाही तर वेदना व्हावयास लागतात.

**पुरुषजननेंद्रिये** :– वृषणाला आग व कंड येणाऱ्या पुटकुळ्या येतात. जांघात व शिवणीत उगवण येते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– कोरडी हट्टी उगवण. जननेंद्रिये ओली होत आहेत असे वाटते. घाम येतो. स्तनाग्राना कंड सुटते व त्यावर पिठासारखा थर जमतो. स्तनाग्राना भेगा पडतात. संभोगाचा तिटकारा. विटाळाने कंड सुटते. धुपणी बुळबुळीत, भरपूर जाते व त्यावेळेस वैषयिक स्वप्ने पडतात.

**श्वसनेंद्रिये** :– फक्त रात्रीच खोकला येतो किंवा जास्त होतो. खोकताना डोके फुटत आहे असे वाटते. कानशिले दाबून धरावीशी वाटतात. गार वाऱ्याने छाती दाटल्यासारखी वाटते. खोकला खोल छातीतून येतो, त्यामुळे जाग येते ( तरुण मुली व मुले ).

**हृदय** :- हृदयाच्या जागी गार झाल्यासारखे वाटते. धडधडते. अंगात उष्ण लहरी येऊन मूर्च्छा येते.

**मान–पाठ** :– मान ताठते व दुखते. कमरेत अशक्तपणा वाटतो. गुदाचे हाड दुखते. बसल्याने. गृध्रसीवातात पाठीचा कणा व सर्वांग दुखते.

**हातपाय** :– सांधे ताठतात किंवा आत चालताना किंवा हालचालीने करकर आवाज होतो. जीर्ण लचक. हातपाय बधिर होतात. **पंजे व बोटे** वेडीवाकडी व **भेगा पडलेली,** भेगातून रक्त येते. टाचात टोचते. तळहातावर उगवण.

**त्वचा** :– **नाजुक, खोल भेगा पडतात– विशेषतः ज्या ठिकाणी त्वचा दुमडते अशा ठिकाणी.** तळहाताना भेगा पडतात. तळहाताचा त्वग्रोग. *त्वचा,– टणक खरखरीत, जाड*–कमावलेल्या कातड्याप्रमाणे दिसते. **ती सोलवटते पुवळते, व लवकर बरी होत नाही.** पिंगट ठिपके पडतात. उगवणीवर जाड टणक, ओलसर, किंवा हिरवट पिवळ्या खपल्या बसतात. थंडीत जास्त होते. इसब. वेदनायुक्त पुटकुळ्या. भाजल्यासारखे फोड. **कंड सुटते** व आग होते विशेषतः शरीराच्या द्वारांची. त्वग्रोगात अतिशय कंड सुटते. रक्त येईतो खाजविणे भाग पडते, खाजविल्यानंतर तो भाग गार पडतो.

***ज्वर*** :– लहान लहान जागी गारपणा वाटतो. थंडी वाजताना तोंडाला कोरड पडते. तळहात व पाय कढत होतात. ठिकठिकाणी घाम येतो. पावलाना व काखेत दुर्गंधी घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***हालचाल– गाडी, आगबोट, मोटार***; **थंड** हवा; **हिवाळ्यात**; हवेत फरक झाल्याने; **वीज वावटळ**; खाण्याने; राग; कोबी.

**ब वा** :– गरम हवा; डोके उंचावर ठेवून निजल्याने; कोरडी हवा.

**सहाय्यक औषधे** :– सेपि.

**संबंधी औषधे** :– कॅल्क–का; ग्रफाय; नाय–ॲसि; पल्स; लायको; सल्फ; सिलि.

---

## १९३. पेट्रोसेलिनम Petroselinum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम मूत्रेंद्रियावर होतो. एकदम इतक्या जोराने लघवीला लागते की आवरत नाही व लघवीला जर गेले नाही तर मूत्राशयात तीव्र वेदना होऊ लागतात. लघवी होताना कापरे भरते व वेदनांच्या यातनामुळे खोलीभर नाचावे लागते. मूत्राशयाचा व मूत्रमार्गाचा

शोथ. परमा–वारंवार घाईने लघवीला लागते, लघवीला कष्टाने व थेंब थेंब होते, मूत्रग्रंथी वाढल्यामुळे. परम्याचा स्राव दुधासारखा. शिश्नाच्या बोंडीत टोचल्याप्रमाणे, चावल्याप्रमाणे वेदना होतात, शिवणी–पासून सर्व मूत्र-मार्गात आग होते, गुदगुल्या झाल्याप्रमाणे वाटते. मूळव्याध, अतिशय कंड येते.

**संबंधी औषधे** :– कॅनॅबि; कॅन्था; मर्क्यु; सार्सा.

---

## १९४. पोडोफायलम Podophyllum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम यकृत; आतडी; *गुद*; उजवी बाजू; रजःपिंड, तिकोनी हाड व घसा यावर होतो. **पित्त प्रकृति**; गरोदरपणी व बाळंतपणानंतर होणारे उपद्रव, आलटुन पालटून विकार होतात, हगवण नंतर मलावरोध किंवा डोकेदुखी. गरोदरपणी होणारे अनेक विकार. चमका आल्यामुळे अंगाला एकदम धक्का बसतो.

**मानसिक** :– कण्हणे, बडबड विशेषतः तापात व थंडी वाजत असताना, नंतर काय काय घडते ते विसरणे. आपण मरू किंवा अतिशय आजारी होऊ अशी कल्पना. अस्वस्थ, अतिशय चुळबुळ, एके ठिकाणी बसवत नाही.

**डोके** :– इकडे तिकडे फिरविणे व कण्हणे. डोके दुखताना चेहरा कढत होतो व तोंड कडू होते विशेषतः सकाळी. डोकेदुखी व हगवण आलटुन पालटून. कपाळात चमका मारतात त्यामुळे डोळे अर्धवट मिटावे लागतात.

**डोळे** :– अर्धवट उघडे. पिवळे.

**तोंड** :– तोंडाला घाण येते. जिभेची आग होते. जीभ खरखरीत किंवा विसविशित व दाताचे ठसे पडलेली. **हिरड्यावर हिरड्या आवळाव्याशा वाटतात.** दात खाणे विशेषतः रात्री. चव कडू. लाळ गळते. जिभेवर मोहरी लावल्याप्रमाणे थर.

**चेहरा** :– पिवळा. विसविशित. गाल कढत व लाल होतात, हगवणीत.

**जठर** :– अन्ननलिकेत गोळा बसला आहे असे वाटते. आंबट पदार्थ किंवा फळे खाण्याची वासना पण ते सोसत नाहीत. कढत फेसाळ ओकारी होते. दूध ओकून पडते. **एकसारख्या कोरड्या ओकाऱ्या** येतात. तहान लागते. खूप गार पाणी प्यावेसे वाटते. कढत आंबट ढेकरा.

**उदर** :– यकृत दुखते, हुळहुळे होते. चोळण्याने बरे वाटते. उदरात पोकळ झाल्यासारखे, किंवा अशक्तपणा आल्याप्रमाणे किंवा काही त्रासदायक खळबळ होत आहे असे वाटते व त्याकरता उदर सारखे चोळावेसे वाटते. *आतड्यात गुरगुरल्यासारखा आवाज होऊन नंतर भरपूर दुर्गंधी जुलाब जोराने होतात.* जुलाब पांढरे गढूळ पाण्याप्रमाणे, फेसाळ– वर पाणी येऊन खाली पिठाप्रमाणे थर जमतो. उन्हाळयात होणारी हगवण. कॉलऱ्यासारखे जुलाब विशेषतः तान्ह्यामुलांचे. दात येताना होणारे जुलाब त्यावेळेस गाल लाल व कढत होतात. जीर्ण हगवण विशेषतः सकाळची. कावीळ–शौचास पांढरे, टणक खडूसारखे होते. *गुद*– हुळहुळे किंवा शिथिल, शौचास होण्याचे अगोदर बाहेर येते. मूळव्याधीचे मोड, दुर्गंधी व ओलसर. मलावरोध व हगवण आलटुन पालटून. गुद बाळंतपणानंतर, गरोदरपणी, ओकारीनंतर बाहेर यावयास लागते. यकृत व उदरातील अवयव ओकारी होताना, जुलाब होताना किंवा पाळीच्या अगोदर, पाळीत, हुळहुळे होतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– रजःपिंडात ठणका लागतो ( उजव्या ) तेव्हा आतड्यात इतस्ततः आवाज होतो, वेदना मांड्याच्या पुढील भागापर्यंत येतात, पाय लांब केल्याने जास्त होतात. गर्भाशय शौचास होताना किंवा जड पदार्थ उचलताना खाली येते. गरोदरपणी मूळव्याध होते व गुदद्वार बाहेर येते. शौचास होताना जननेंद्रिय बाहेर येत आहे असे वाटते. गरोदरपणी पहिल्या २।३ महिन्यात पोटावर झोपल्याने फार बरे वाटते.

**हृदय** :– वर घशात चढत आहे असे वाटते.

**पाठ** :– खालच्या भागात आग होते. खांद्याच्या मध्यभागी, तिकोनी हाडाच्या खाली ( उजव्या ) दुखते.

**झोप** :– झोपेत कण्हणे व कुरकुरणे. ताप येऊन गेल्यावर झोप येते ( हिवताप ).

**ज्वर** :– सकाळी ७ वा. थंडी वाजते. दोन्ही कुशीत व सांध्यात दुखते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– पहाटे. खाण्याने, आंबट पदार्थ, फळे. उन्हाळा. दात येताना. प्याल्याने. हालचाल, पारा. शौचास होण्याचे अगोदर, होताना व नंतर.

**ब वा** :– यकृत व उदर चोळण्याने. पोटावर निजल्याने.

**सहाय्यक औषधे** :– कॅल्क–का; नेट्र-मू; सल्फ.

**संबंधी औषधे** :– एलो; मर्क्यु; सिंको.

---

## १९५. पोथास Pothos Foetida

**सर्वसाधारण** :– दमा; हिस्टेरिआ. मधुन मधुन चमत्कारिक वेदना होतात. चित्त जागेवर नसणे. एखाद्या लहानशा जागी डोके दुखते व त्यावेळेस कानशिलातील धमन्या धाडधाड उडतात. नाकावर आरपार लाल सूज. शिंकताना घशात दुखते. जीभ बधिर. छातीत दुखते व श्वास लागतो. पोट फुगून ताणल्यासारखे वाटते. धूळ नाकात गेल्याने दमा होतो, शौचास झाल्याने कमी होतो. मोकळया हवेत बरे वाटते.

---

## १९६. प्यूलेक्स Pulex

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम मूत्रेंद्रिये व स्त्रीजननेंद्रियावर होतो. अत्यंत उतावीळ, रागीट, चिडखोर. डोळे मोठे झाल्यासारखे वाटतात. चेहरा सुरकुतलेला व म्हाताऱ्यासारखा. घशात दोरा अडकला आहे असे वाटते. तहान लागते विशेषतः डोके दुखत असताना. लघवी थोडी होते, वारंवार जावे लागते व त्यावेळेस मूत्रमार्गात आग होते व मूत्राशय दाबल्यासारखे वाटते. लघवी होता होता एकदम थांबते व वेदना व्हावयास लागतात. लघवीला लागली की आवरत नाही. विटाळसेपणी लाळ सुटते. योनीत अतिशय आग होते. योनीत कापसाचा बोळा आहे असे वाटते. धुपणी दुर्गंधी व भरपूर जाते. धुपणीचे व विटाळाचे हिरवट पिंवळे डाग पडतात ते धुवून निघत नाहीत. पाठ ठणकते व अशक्त झाल्यासारखी वाटते. अंगाला वाफ लागत आहे अशा तऱ्हेने अंग गरम वाटते. शेकाजवळ बसल्याने थंडी वाजते. सर्वांगावर लहान लहान जागी हुळहुळेपणा वाटतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– हालचाल केल्याने. डावी बाजू.

**ब वा** :– बसल्याने, किंवा निजल्याने.

---

## १९७. प्रूनस स्पायनोसा Prunus Spinosa

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम मूत्राशय व श्वासोच्छ्वास यावर होतो. **वेदनामुळे *दम लागतो***; वेदना **आतून बाहेर** दाबल्याप्रमाणे, तीव्र व एकदम सुरू होतात. पेटके, जलोदर, नाळगुद. हृद्रोगामुळे उत्पन्न झालेली

जलयुक्त सूज. नागीण बरी झाल्यानंतर राहिलेल्या वेदना. उन्ह, लचक, अति ओझे उचलण्याचे दुष्परिणाम.

**मानसिक** :- अस्वस्थ. एकसारखे चालणे, एकेठिकाणी राहवत नाही.

**डोके** :- उजव्या कपाळातून मेंदूतून डोक्याच्या मागील भागापर्यंत तीव्र वेदना होतात.

**डोळे** :- डोळ्यात आतून बाहेर फुटल्याप्रमाणे वेदना होतात, डोळ्यातून पाणी आल्याने बरे वाटते. डोळे एकमेकापासून दूर केल्यासारखे वाटतात.

**तोंड** :- दात बाहेर ओढल्यासारखे वाटतात. दात दुखी दातावर दात आवळल्याने कमी होते.

**मूत्रेंद्रिये** :- मूत्राशयात पेटके येतात, त्यामुळे लघवी करताना पाय पोटाशी घ्यावे लागतात, एकदम जोराने लघवीला लागते, लघवी शिश्नाच्या बोंडीपर्यंत येऊन परत जाते त्यामुळे मूत्रमार्गात व गुदात कळा लागतात वेदना होतात. बराच वेळ दाबल्याशिवाय लघवी सुटत नाही. लघवी थोडी थोडी व कष्टाने होते. लघवी होताना शिश्नाच्या बोंडीत दुखते. शिवणीत ठुसठुसते.

**पुरुषजननेंद्रिये** :- चालण्याच्या धक्क्यामुळे शिश्नाच्या बोंडीत ठुसठुसते.

**स्त्रीजननेंद्रिये** :- धुपणी पाण्यासारखी, किंवा पुवळलेली व करवडणारी, पिवळा डाग पडतो.

**श्वसनेंद्रिये** :- छातीत दाटल्यासारखे वाटून वारंवार दीर्घ श्वास घ्यावासा वाटतो. आत घेतलेला श्वास खोलपर्यंत जात नाही असे वाटते, त्यामुळे जांभया देऊन किंवा दीर्घ श्वास घेऊन हवा आत जावी असे वाटते. छातीत टोचते.

**हृदय** :- हृद्रोग-अन्जायना. हृदयाचे धाडधाड ठोके पडतात, गळ्यातील धमन्या उडताना दिसतात व श्वासोच्छ्वास कष्टाने होतो, सारखे वारे घ्यावेसे वाटते. जरा हालचाल केली की हृदयाचे ठोके जोराने पडावयास लागतात.

**पाठ** :- डाव्या तिकोनी हाडाखाली गोळा बसला आहे असे वाटते. हाताच्या बोटांची टोके खाजतात किंवा थंडीने गारठल्याप्रमाणे वाटतात. पावलांची ( जलयुक्त ) सूज.

**त्वचा** :- नागीण.

**ज्वर** :- रात्री घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :- खाली वाकल्याने, चढताना; लचक स्पर्श. दाबल्याने. धक्का बसल्याने.

**संबंधी औषधे** :- लारो.

---

## १९८. प्लॅटिनम Platinum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *स्त्रीजननेंद्रिये* व मज्जातंतु यावर होतो. **फाजील विनयशील वृद्ध कुमारिका. मनाला व शरीराला** काहीही सहन होत नाही. **भयंकर पेटके** येतात. पिळल्याप्रमाणे, ढोसल्याप्रमाणे किंवा **बधिर करणाऱ्या वेदना** होऊन नंतर आचके येतात. गर्भाशय व रजःपिंड यांच्या विकारामुळे उद्‌भवलेले उपद्रव. वेदना हळुहळु सुरू होऊन हळुहळु थांबतात. **अनियमितपणा,** आचके, रुधिराभिसरण अनियमित. एखाद्या अवयवाचा गारपणा– डोळे, कान वगैरे. कंप. शारीरिक, **मानसिक** किंवा **वैषयिक** लक्षणे आलटुन पालटून, होतात. **बधिरपणा–**डोक्याची कातडी, चेहरा, पोटऱ्या, गुदाचे हाड वगैरे. **चिकटपणा–**डोळ्यातील अश्रु, शौच, विटाळ वगैरे. **पट्टा बांधल्याप्रमाणे** वाटते. हिस्टेरिआ, अवयव लुले पडतात. संभोगातिरेक, मुष्टिमैथुन, जवळचे नातेवाईक यांच्या मरणामुळे झालेले दुःख, धास्ती, दीर्घकाळ रक्तस्राव, राग. यामुळे उद्‌भवलेले विकार. अनैसर्गिक संभोगाची आवड. मुंग्या येतात विशेषतः तापात. रक्तस्राव– रक्त पातळ पण आत काळया गाठी असलेले. चुणचुणल्यासारखे वाटणे. वेदना होत आहेत की काय अशा तऱ्हेचें अंगाला धक्के बसतात. शरीर वेडे-वाकडे होते. फेफरे. मोहनिद्रा.

**मानसिक :–** भलत्याच वेळेला हसणे. दुष्ट, भांडखोर व ध्यानीमनी नसता एखादी गोष्ट चटकन करून टाकण्याची प्रवृत्ति व **तारतम्यपणाचा** अभाव, **वस्तु लहान झाल्या आहेत** असे वाटते, विचित्र आहेत किंवा भयंकर आहेत असे वाटते. भीती वाटते– मरणाची, ते लवकरच येणार असे वाटते. बाहेर गेलेला नवरा परत येणार नाही, अशी किंवा काहीतरी घडेल अशी. *दुसऱ्याला तुच्छ लेखणे*; **उद्दाम गर्विष्ठ व वैषयिक** वृत्ति. आपण एकटेच आहोत, सर्वांनी आपणाला टाकले आहे असे वाटते. संत्रस्त पण रडणे. आत्मप्रौढी. मानसिक लक्षणे संध्याप्रकाशात व विटाळ बंद झाल्यामुळे जास्त होतात. कोणाला तरी ठार मारावेसे वाटते, (स्त्रियाना आपला नवरा किंवा मूल विशेषतः चाकू, सुरी पाहिल्यावर ) किंवा ज्याचा मनात द्वेष वाटतो अशा इसमाला. अश्लील बडबड करणे. गाणे, नाचणे, तोंडाने शिटी वाजविणे. गंभीर नसलेल्या गोष्टीबद्दल गंभीर होणे. क्षुल्लक गोष्टीमुळे चिडणे. विचारात मग्न झाल्याप्रमाणे काही न बोलता एखाद्या कोपऱ्यात बसून राहणे. वेदनामुळे रडणे. आपण उंच व डौलदार आहोत असे वाटणे.

**डोके** :- हळुहळु दुखावयास सुरवात होऊन हळुहळु थांबते. खिळे मारल्याप्रमाणे वाटते. डोक्याचे कातडे ताणल्यासारखे वाटते. बधिरपणा.

**डोळे** :- वस्तु आहेत त्यापेक्षा लहान दिसतात. डोळे गार झाल्यासारखे वाटतात. पापण्या लवतात.

**कान** :- बधिर, आत गार वाटतात, ओठ व गालापर्यंत.

**चेहरा** :- नाकाच्या बुंध्याशी पेटके येतात. सापळ्यात घालून पिळल्यासारखे वाटते. उजवी बाजू गार होते, बधिर होते व मुंग्या येतात. जबड्यात उकरल्याप्रमाणे वेदना होतात. चेहरा वेडावाकडा करण्याची प्रवृत्ति. गालाचे उंचवटे. बधिर.

**तोंड** :- जीभ भाजली आहे असे वाटते. मुंग्या येतात. गार वाटते. जिभेच्या टोकाला चव गोड. दातात ठुसठुस वेदना होतात.

**जठर** :- खिन्नतेमुळे भूक लागत नाही. पण कधी कधी खाखा सुटते व समोर दिसेल ते भराभर खाण्याची प्रवृत्ति किंवा त्याचा तिटकारा, पोट आवळल्यासारखे वाटते.

**उदर** :- सभोवती पट्टयाने घट्ट बांधले आहे असे वाटते. वात धरतो. गुरगुरते. मुरडा होतो. बेंबीपासून मागे पाठीपर्यंत ओढल्याप्रमाणे वेदना होतात व शरीर वेडेवाकडे ताणावे लागते. **शौचास फार कुंथून होते.** शौच गुदात मऊ चिखलाप्रमाणे चिकटते. **शौच चिकट टणक, काळे, थोडेथोडे किंवा मऊ शौचास होते.** मलावरोध विशेषतः प्रवासी लोकांचा किंवा गरोदरपणी. गुदद्वारात कंड सुटते, मुंग्या येतात विशेषतः संध्याकाळी.

**पुरुषजननेंद्रिये** :- वैषयिक इच्छा प्रबळ त्यामुळे मुष्टिमैथुन करण्याची प्रवृत्ति. जननेंद्रियात मुंग्या येतात, गुदगुल्या होतात कंड सुटते त्यामुळे वैषयिक क्षोभ. वयात येण्याच्या अगोदर केलेल्या मुष्टिमैथुनांचे दुष्परिणाम.

**स्त्रीजननेंद्रिये** :- **अतिशय हुळहुळी** होतात, स्पर्श, कपडासुद्धा सहन होत नाही. कंड येते, गुदगुल्या होतात व मुंग्या येतात. त्यामुळे वैषयिक वासना प्रबळ होते. कामोन्माद, विशेषतः बाळंतपणानंतर. **वैषयिक** चाळे करण्याची प्रवृत्ति. मुष्टिमैथुन करण्याची प्रवृत्ती. कुमारिकाना पाळी फार लवकर. विटाळ भरपूर जातो, काळा दाट किंवा काळ्या गाठी पडतात, विटाळ जाताना ओढल्याप्रमाणे वेदना होतात, शहारे येतात, आचके येतात. कष्टार्तव त्यावेळेस किंचाळणे किंवा अंगाला धक्के बसतात. रजःपिंड हुळहुळा,

त्याला दाब सहन होत नाही, आत आग होते. रजःपिंडाच्या शोथामुळे आलेले वंध्यात्व. योनिसंकोच विशेषतः संभोगाचे वेळी, त्यामुळे संभोगात अडथळा येतो. संभोगेच्छा अतिशय असल्यामुळे आलेले वंधात्व. धुपणी अंड्याच्या पांढऱ्या बल्काप्रमाणे, फक्त दिवसाच जाते, लघवी करताना जास्त जाते. गर्भाशयाचा कॅन्सर, गुल्मे.

**पाठ** :– मार लागल्याप्रमाणे पाठ दुखते–दाबल्याने किंवा मागे वाकल्याने जास्त. माकडहाडांत व गुदास्थित बधिरपणा

**हातपाय** :– मांड्या घट्ट बांधल्याप्रमाणे वाटतात. हातपाय बधिर व शिणलेले. लुले पडल्यासारखे वाटतात. पोटऱ्यात पेटके येतात.

**झोप** :– जांभया येतात त्या आवरत नाहीत. झोपेत सर्व शरीर उघडे करावेसे वाटते. गुडघे वर करून मांड्या एकमेकापासून दूर करून निजणे.

**लक्षणांचे वैशिष्टय जा हो** :– **भावना–वैषयिक**, मानभंग, संभोगासंबंधी. **स्पर्श. थकवा**. बसल्याने. उभे राहिल्याने. संध्याकाळी. उपाशी राहिल्याने. विटाळशेपणी. मागे वाकल्याने.

**ब वा** :– **मोकळया हवेत चालण्याने**. सूर्यप्रकाशात. शरीर ताणल्याने.

**संबंधी औषधे** :– इग्ने; कुप्रम; प्लंबं; स्टॅनम.

---

## १९९. प्लॅन्टॅगो Plantago

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **दात; कान**; मूत्रपिंड व मूत्राशय यावर होतो. **तीव्र इकडून तिकडे फिरणाऱ्या वेदना** होतात, विशेषतः कान व दात यामधे. हुळहुळेपणा. दोन्ही कानामध्ये व जांघात काहीतरी बाह्य वस्तु आहे असे वाटते. मार लागून झालेल्या, कापल्या, भोसकल्यामुळे झालेल्या जखमा, भाजणे व साप चावून झालेले दुष्परिणाम. तंबाखूच्या अतिसेवनाने झालेले दुष्परिणाम, विशेषतः वेदना. या औषधाने तंबाखुसेवनाची आवड कमी होते असा समज आहे. दीर्घकाळ तंबाखुसेवनामुळे झालेला निद्रानाश व खिन्नता.

**डोके** :– नियमित वेळी डोके दुखते–सकाळी ७ ते दुपारी २ पर्यंत. डोके दुखत असताना डोळ्यातून पाणी येते, उजेड सहन होत नाही. मेंदू उलटा झाला आहे असे वाटते.

**डोळे** :– डोळ्यापुढे केस लोंबत आहे असे वाटते ( डाव्या ). कुजलेल्या दांतामुळे डोळयात वेदना होतात.

**कान** :– **वेदना कान व दात यामध्ये स्थिर होतात** किंवा दोन्ही मध्ये आलटुन पालटून होतात. एका कानापासून दुसऱ्या कानापर्यंत आरपार वेदना होतात. कानदुखी. मोठा आवाज भेदून जात आहे असे वाटते. दोन्ही कानामध्ये कांही बाह्य पदार्थ आहे असे वाटते.

**नाक** :– नाकातून एकाएकी पिवळे पाणी पडते.

**तोंड** :– दात दुखतात, दात हुळहुळे होऊन त्याना स्पर्श सहन होत नाही. **दात** दुखत असताना लाळ गळते. दात लांब झाल्यासारखे वाटतात. दातदुखी चावताना कमी होते. **चव वाईट.**

**उदर** :– शौचास होईलसे वाटून जावे लागते पण होत नाही. आतडी गार झाल्यासारखी वाटतात. तपकिरी रंगाचे पातळ फेसाळ जुलाब होतात. मूळव्याध इतकी त्रासदायक की उभेसुद्धा राहवत नाही.

**मूत्रेंद्रिये** :– बहुमूत्रता. लघवी भरपूर होते व तहान लागते. मधुमेह. रात्री वारंवार लघवीला जावे लागते किंवा नकळत होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– स्तनाग्रात वेदना होतात.

**पाठ** :– पाठीत तिकोनी हाडांच्या मध्ये ठुसठुसते. माकडहाडावर गार घाम येतो. पाय बधिर व कंपयुक्त.

**त्वचा** :– हुळहुळी. पित्ताच्या गांधी. नागीणीच्या वेदना.

**झोप** :– उदासवाणी स्वप्ने पडून रडू येते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– रात्री; गरम खोलीत.

**क था** :– झोपेत; खाण्याने.

**संबंधी औषधे** :– आर्नि; पल्स; फेरम–फा.

---

## २००. प्लंबम ( शिसे ) Plumbum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मज्जारज्जु; मज्जातंतु; स्नायू;* उदर; मूत्रपिंड; वेंधी; रक्तवाहिन्या व रक्त यावर होतो. **गुप्त रीतीने हळुहळु विकार वाढत जातात** व त्यांच्याशी संबंध असलेल्या लक्षणात अदला-

बदल होते किंवा त्यांचा असंबद्ध रीतीने उद्भव होतो. इंद्रियांची शक्ती क्षीण होत जाते. लकवा, लुळेपणा, लहान मुलांचे अंगावरून वारे जाणे, शरीर लठ्ठ व हातपाय वाळलेले. लुळे पडलेल्या भागाला स्पर्श सहन होत नाही; ते वाळतात. मोकळी हवा सहन होत नाही. शरीर ताणावेसे वाटते. विशेषतः उदराच्या विकारात. स्वतःच्या रोगावस्थेबाबत अतिशयोक्ती करण्याची प्रवृत्ति. **खपाटी जाणे किंवा आकसणे–गुदद्वार, अंड,** उदर, बेंबी वगैरे. शारीरिक मांद्य. डोळ्याचा पांढरा भाग गडद निळसर लाल होतो. उदराला वेडीवाकडी टेंगळे येतात. उदरात त्रासदायक भावना उत्पन्न झाल्यामुळे हात-पाय ताणावेसे वाटतात. लघवी हळुहळु पण भरपूर होते. *भयंकर जोराने आखडल्या*प्रमाणे वाटते. **खपाटी जाणे, आकसणे.** तीव्र चमकामुळे रडू येते. उकरल्याप्रमाणे वेदना. पेटके नियमित वेळी येतात. **आचके.** भाग लुळे पडून शिथिल होतात. आचके येताना रक्तस्राव होतो. किंवा शरीराला स्पर्श असह्य होतो. जीर्ण फेफरे–फेफरे येण्याच्या अगोदर काही तरी स्पष्ट भावना होतात. लुळे पडलेले भाग किंवा एखादा भाग वाळतो. रक्तवाहिन्यांचा लवचिकपणा कमी होतो त्यामुळे रक्तदाब वाढतो. वातरक्त ( गाऊट ). रक्तक्षय. कावीळ. शरीर झपाट्याने व अतिशय वाळते. श्रम करीत असताना हात पाय गार होतात. हिस्टेरिआ– कोणाचे आपणाकडे लक्ष आहे असे दिसले तर लक्षणे व्हावयास लागतात. रक्तवाहिन्या बारीक होऊन एखाद्या भागाला रक्ताचा पुरवठा न झाल्यामुळे उत्पन्न झालेल्या वेदना. बधिरपणा. जीर्ण रोग. दोरीने बांधून आत किंवा मागे ओढल्यासारखे वाटते. मुलांचे वाळणे, उदर मोठे व ठणक होते व एकसारखा मलावरोध. बाह्योपचाराने त्वग्रोग बरे केल्याने, संभोगातिरेकाने उद्भवलेले दुष्परिणाम.

**मानसिक :–** बोलावेसे वाटत नाही. भित्रेपणा, अस्वस्थपणा व काळजी वाटते. आपला कोणीतरी खून करील किंवा विषप्रयोग करील अशी भीती वाटते. खुळेपणा. शारीरिक श्रम केल्याने मनाला शीण येतो. खिन्नता. वात–रात्रीचा किंवा पोटातील वेदना किंवा हातापायाच्या वेदना यांच्यामुळे आलटुन पालटून. विस्मरण. शब्द आठवत नाही. कोणत्याही गोष्टीचे आकलन लवकर होत नाही. आपल्या भोवतालची माणसे खुनी आहेत असे वाटते. उदास पण शांत. फसविण्याची प्रवृत्ति. आजारीपणाचे ढोंग करणे.

**डोके .–** घशातून गोळा वर चढून मेंदूत जात आहे असे वाटून डोके दुखावयास लागते. केस कोरडे. दाढीचे केस गळून पडतात. बरीच मंडळी बसलेल्या खोलीत मूर्च्छा येते.

**डोळे** :- पिंवळे, किंवा गडद निळसर. बाहुल्या बारीक. काचबिंदु. मूर्च्छा येऊन एकदम आंधळेपणा येतो. वरची पापणी लुली पडते.

**कान** :- आवाज होत. एकदम केव्हातरी ऐकू येईनासे होते.

**चेहरा** :- फिकट; पिवळसर, प्रेताप्रमाणे. गाल खोल गेलेले. नाका, ओठांच्या स्नायूना कंप. उजव्या बाजूला कंप, त्वचा तेलकट. एक बाजू सुजलेली.

**तोंड** :- आतून पिवळे. हिरड्यांच्या कडेला निळी रेघ. जिभेचा कंप, जिभेच्या कडा लाल. जीभ बाहेर काढता येत नाही. चव गोड. लाळ चिकट. तोंडात. व्रण पडतात. दुर्गंधी. हिरड्यावर ठणक पुटकुळ्या.

**जठर** :- घट्ट पदार्थ गिळता येत नाहीत, फक्त पेयेच गिळता येतात. दुर्गंधी, मळासारख्या ढेकरा येतात. जठरशूळ. एकसारखे ओकावयास होते. अन्न-नलिका बारीक होते, तिची गिळण्याची क्रिया नष्ट होते. ओकारीत पिंगट, काळपट द्रव्य पडते किंवा हिरवा श्लेष्मा पडतो.

**उदर** :- *बेंबी आत खपाटी गेली आहे असे वाटते*. अनेक लक्षणाबरोबर उदरात **मुरडा होतो**. वेदना सर्व शरीरात पसरतात. वेदना **उकरल्याप्रमाणे** होतात किंवा अरुंद जागेत कोंबल्याप्रमाणे वाटते. उदर ताणल्याप्रमाणे वाटते. देवीचा अंतर्गळ. आतड्यात आतडे शिरते. **गुदद्वार वर ओढल्याप्रमाणे वाटून किंवा आखडून वेदना होतात**. शौचास बारीक दाण्याप्रमाणे, **शेळीच्या लेंडीप्रमाणे काळे ठणक** होते. शौचास होताना गुदद्वारात पेटके येतात. **हट्टी मलावरोध व उदरातील मुरडा– विशेषतः तान्ह्या मुलांचा.** उदरात वेडीवाकडी टेंगळे दिसतात.

**मूत्रेंद्रिये** :- लघवी भरपूर पण हळुहळु होते; किंवा थेंब थेंब होते. मूत्राशयाचे स्नायू लुले पडतात, त्यामुळे लघवीला होत नाही. लघवी होण्याचे बंद होते. मूत्रपिंडाचा शोथ लघवीतून अल्बुमिन जाते. लघवी थोडी होते. लघवी तुंबते.

**पुरुषजननेंद्रिये** :- संभोग करण्याची शक्ति नष्ट होते. अंड आत जातात व आवळल्यासारखे वाटतात. स्वप्नावस्था होण्याची प्रवृत्ति.

**स्त्रीजननेंद्रिये** :- संभोगाचे वेळी योनिसंकोच होतो. स्तन ठणक होतात. स्तनात टोचते व आग होते. वाखा होण्याची प्रवृत्ति. विटाळ भरपूर व तो जाताना उदर दोरीने बांधून पाठीपर्यंत ओढल्याप्रमाणे वाटते. जांभया येतात, शरीर ताणावेसे वाटते. गर्भाशयाची योग्य वाढ होत नाही; त्यामुळे होणारे

वाखे. उदरांत कळा येऊ लागल्या म्हणजे स्तन काही क्षण टणक होतात किंवा लहान होतात. रजःपिंडातील वेदना पाय ताणल्याने कमी होतात.

**हृदय** :– नाडी बारीक, मंद एका मिनिटाला ४० पर्यंत. अशक्त.

**हातपाय** :– एखाद्याच स्नायूचा लुलेपणा. पंजा वर करता येत नाही किंवा काहीं उचलता येत नाही. हातपाय लांब करता येत नाहीत. मांडयात मधुन मधुन पेटके येतात. पावले सुजलेली. वाळलेल्या भागात वेदना होतात. उदरातील वेदनांशी हातापायांच्या वेदना आलटुन पालटुन होतात. पायाच्या उजव्या आंगठयात रात्री वेदना होतात. स्पर्श सहन होत नाहीं. चालतानाच फक्त पावले गार होतात. पायातील कळा दाबल्याने कमी होतात. पंगुवात. पाउले लाकडाची केली आहेत असे वाटते.

**झोप** :– वेड्यावाकड्या स्थितीत निजणे.

**त्वचा** :– **कोरडी, स्पर्श सहन होत नाही.** निळसर लाल ठिपके पडतात. व्रण– कोरडे व आग होते. कुजते. लहान जखमा सहज सुजून पुवळतात.

**ज्वर** :– शौचास होताना सर्वांगाला गार घाम येतो. श्रम केल्याने अंग गार होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– स्वच्छ हवा; मोकळे वारे; **श्रम**; हालचाल; मंडळीत बसल्याने; गुळगुळीत वस्तु धरल्याने; स्पर्श. बरीच मंडळी असलेल्या खोलीत.

**ब वा** :– जोराने दाबल्याने. चोळण्याने. अंग ताणल्याने.

**सहाय्यक औषधे** :– ऱ्हस-टा.

**संबंधी औषधे** :– ओपि.

---

## २०१. फॅगोपायरम Fagopyrum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम पचनेंद्रिये व त्वचा यावर होतो. स्राव दुर्गंधी. धमन्या उडताना दिसतात. **कंड सुटते** डोळ्याना, कानात, नाकाच्या मागील भागात, गुदद्वारात, पंज्यात खोल पायाना वगैरे. डोळ्याच्या आतील कोपऱ्यात वेदना होतात. कढत, भाजल्याप्रमाणे, आंबट ढेकरा येतात. हृदयातील वेदना खांदा व डाव्या हातापर्यंत जातात, पाठीवर निजल्याने बरे वाटते. योनिद्वाराला कंड सुटते व पिवळी धुपणी जाते विशेषतः विश्रांति घेत असताना. मानेला डोके सावरता येत नाही असे वाटते. हाताच्या

बोटाना कळा लागतात. रेघा मारल्याप्रमाणे हातात व पायात वेदना होतात. वृद्धपणीची कंड.

**लक्षणांचे वैशिष्ट्य ज्या हो :–** खाजविण्याने; सूर्यप्रकाशात, हालचालीने.

**ब वा :–** गार पाण्याच्या आंघोळीने. काफी घेतल्याने. दाबल्याने.

**संबंधी औषधे :–** पल्स.

---

## २०२. फार्मिका ( लाल मुंग्या ) Formica Rufa

**सर्वसाधारण :-** या औषधाचा परिणाम सांधे; कणा; यकृत; मूत्रपिंड व उजवी बाजू यावर होतो. सांध्यात एकदम कळा यावयास लागतात व अस्वस्थपणा येतो. डोकेदुखी केस विंचरल्याने कमी होते. कपाळात बुडबुडे फुटल्यासारखे वाटते. वारंवार सर्दी होते. क्षय. कॅन्सर. मोड– कानात, नाकात. पांढरे फेसाळ शौचास होते. शौचास होण्याच्या अगोदर बेंबीभोवती ओढल्यासारखे वाटते. पाणी गोड लागते. लघवीतून अल्बुमिन जाते, रजःपिंडांची पोकळ गुल्मे, आत पाणी साचते किंवा रक्त साचते. दमा. खोकला रात्री जास्त असतो. पायातील शक्ती नाहीशी होते. पंगुवात. त्वचा लाल, कंड सुटते व आग होते; पित्ताच्या गांधी, खपाट. सांध्या भोंवती टणक आवाळू येतात. **खूप घाम येतो** पण त्याने बरे वाटत नाही. मानेत, गळ्यात खाकरताना, गुळण्या करताना किंवा चावताना दुखते. जखमा वाळावयास लागतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य ज्या हो :–** **थंडी**; गार पाणी; हालचाल.

**ब वा :–** उष्णता, दाबल्याने; चोळण्याने; केस विंचरताना.

**संबंधी औषधे :–** अर्टिका; ऱ्हस-टा.

---

## २०३. फायटोलाका Phytolacca

**सर्वसाधारण :-** या औषधाचा परिणाम ग्रंथी– *स्तन*, टानसिल; घसा; स्नायू– *मानेचे*, पाठीचे; स्नायुबंध; मूत्रपिंड; हाडे; जीभ ( बुंधा ); पचनेंद्रिये; व उजवी बाजू यावर होतो. एकदम *अत्यंत ठणका लागून हुळहुळेपणा* येतो सर्वांगाचा किंवा विशेषतः डोळे, मूत्रपिंड, मान, खांदे पाठ,

पुढील हात व गुडघ्याखाली. अस्वस्थपणा. भाग निळसर लाल होतात– घसा गांठी वगैरे. पसरणाऱ्या वेदना. संधिवात– टानसिलच्या शोथानंतर उद्भवतो. धागे असलेले चिकट स्राव– शौच, विटाळ वगैरे. स्तन टणक. लठ्ठपणा. धनुर्वात, स्नायू ताठतात, आंचके व स्नायूंचे शैथिल्य आलटुन पालटुन. दात उशीरा येणे. ताठपणा. जुन्या व्रणांचे उपद्रव. गरमी व पारा यापासून झालेले उपद्रव. कॅन्सर. पू लवकर तयार करण्यास या औषधाचा उपयोग होतो; पू करवडणारा, पाण्यासारखा, दुर्गंधी. काही झाले तरी त्याची प्रतिक्रिया स्तनात होते ( स्त्रियांच्या ). गरमीमुळे हाड दुखतात.

**मानसिक** :– स्वतःचे शरीर कसेही उघडेवाघडे पडले तरी त्यासंबंधी बेपर्वा. कितीही आग्रह केला तरी खाणेपिणे नाकारणे. जिवाची पर्वा नसणे.

**डोके** :– उठताना घेरी येते. कपाळात दुखते. डोक्याला मार लागला आहे असे वाटते विशेषतः मेंदूला. प्रत्येक वेळी पाऊस पडावयास लागला की डोके दुखते.

**डोळे** :– चुणचुणतात. कढत पाणी येते. दृष्टी हिरवी. लिहिता वाचताना डोळे टणकतात. एकच डोळा हालतो.

**कान** :– दोन्ही कानात दुखते; गिळताना जास्त.

**नाक** :– जड झाले आहे असे वाटते. नाकपुड्या आलटुन पालटुन चोंदतात. सर्दी– स्राव करवडणारा. एका बाजूने पाणी वाहते दुसरी बंद होते, आलटुन पालटुन.

**चेहरा** :– पिवळसर, आजाऱ्यासारखा. गालांच्या उंचवट्यात टणका लागतो. जबड्याखालच्या गाठी सुजतात. जबडे टणकतात. गालगुंड. हनुवटी छातीला चिकटते.

**तोंड** :– ओठ बाहेर वळलेले. दातावर दात आवळणे (दात येताना) दातखिळी बसलेली; किंवा जबडा घट्ट बसलेला. जिभेचे टोक लालबुंद–भाजल्यासारखी वाटते किंवा बुंध्याशी दुखते. तारा असलेली लाळ वाहते. गालाच्या आत अतिशय दुखणारे व्रण पडतात व त्या बाजूने चावता येत नाही. जीभ बाहेर आलेली. खोकताना तोंडाला कोरड पडल्यासारखी वाटते.

**घसा** :– घशात पांढरे किंवा कफाचे ठिपके पडतात. घसा काळसर लाल किंवा निळसर लाल, फुगलेला; आग होते. काडी टोचते आहे असे वाटते; आत गोळा किंवा कढत गोळा बसला आहे असे वाटते. गिळताना अतिशय

दुखतो. जिभेच्या बुंध्यापासून कानापर्यंत वेदना होतात. टानशिल्चा शोथ टानशिलवर काळसर पांडुरका थर जमतो; उजव्या टानशिलमध्ये तीव्र ठणका लागतो. टानसिलमध्ये पू होतो. घटसर्प. कढत पेये गिळता येत नाहीत. घसा अरुंद, खरखरीत व कढत.

**जठर** :– जोरजोराने कोरड्या ओकाऱ्या येतात व ओकावयास होते, त्यापेक्षा मरण पत्करले असे वाटते. खाण्यानंतर पुन्हा भूक लागते.

**उदर** :– एकसारखे शौचास होईल होईल असे वाटते–झोपेत सुद्धा. रक्तीआव. गुदातून रक्त पडते. बरगड्याखाली जड होऊन ठणका लागतो. स्त्रियाना धुपणी गेल्याने बरे वाटते. शौचात नुसती पांढरी आव व रक्त पडते. वृद्ध इसमांचा किंवा ज्यांचे हृदय अशक्त आहे अशा इसमांचा मलावरोध. गुदाचा कॅन्सर.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्रपिंडात तीव्र ठणका लागतो. मूत्रपिंडाचा शोथ. लघवी काळसर लाल, अल्बुमिन जाते; घटसर्पानंतर लघवी थोडी होते किंवा होण्याचे बंद होते. लघवीखाली खडूसारखा गाळ साचतो. लघवीचे पिवळे डाग पडतात.

**पुरुषजननेंद्रिये** :– वीर्यवाहिनी नलिका हुळहुळ्या. शिवणीपासून शिश्नापर्यंत तीव्र कळा येतात. अंड टणक होऊन दुखतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळसेपणी लाळ गळते व डोळ्यातून पाणी येते. ***स्तन दगडाप्रमाणे टणक, जड, सुजलेले ( डावे ) किंवा हुळहुळे.*** स्तनांचा शोथ. **मूल पाजताना आत वेदना होतात** व त्या सर्वांगात पसरतात. **आत टणक गाठी होतात.** स्तनाग्रे भेगा पडलेली; आत गेलेली. स्तनाचा कॅन्सर–खाकेतील गाठी मोठ्या होतात. स्तनातून रक्तासारखे पाणी येते. जुने वण पुन्हा सुजतात. वंध्या स्त्रियांचे कष्टार्तव; विटाळात पांढरे पापुद्रे जातात. विटाळसेपणी स्तनांची जाणीव होते. गर्भाशय मुख करवडलेले.

**हृदय** :– हृदयाची लक्षणे उजव्या हातापर्यंत जातात. वेदनायुक्त धक्के बसतात. हृदय गळ्यापर्यंत आले आहे असे वाटते.

**मानपाठ** :– **मान** व पाठ ताठलेली. कण्यात वरखाली वेदना होत राहतात. कमरेत व माकडहाडात ठणका लागतो.

**हातपाय** :– **उजवा हात बधिर.** उजव्या खांद्यात तीव्र कळा येऊन तो ताठतो, हात वर करता येत नाही. विजेचे धक्के बसल्याप्रमाणे वेदना इकडे तिकडे फिरतात. कमरेच्या सांध्यात व मांड्यात हवेत फरक पडला की दुखावयास लागते.

तंगडीची हाडे ठणकतात–गरमीमुळे टाचात ठणका लागतो. पाऊल उंचावर ठेवले म्हणजे बरे वाटते. पाय इतके ठणकतात की उभे राहण्याची भीती वाटते. हाडात दुखते. पायांच्या नोंटात वेदना होतात.

**त्वचा** :– कोरडी खरखरीत. गळवे होण्याची प्रवृत्ति. गरमीचे बद. चामखिळी.

**ज्वर** :– अतिज्वर व थंडी आलटुन पालटून. अत्यंत थकवा येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– उभे राहताना. वर करताना. हालचाल. गिळताना. कढत पेये. उष्णता. दमट–थंडी. रात्र. हवेतील फरक. पाऊस पडत असताना. विटाळसेपणी.

**ब वा** :– पोटावर निजल्याने. गार पेये. डाव्या कुशीवर निजल्याने कोरडी हवा.

**सहाय्यक औषधे** :– सिलि.

**संबंधी औषधे** :– कलि-आयो; कलि-बाय; ब्रायो; मर्क्यु; ऱ्हस-टा.

---

## २०४. फास्फरस Phosphorus

**सर्वसाधारण**:– या औषधाचा परिणाम **डोके**; **फुप्फुसे**, **हृदय**; ***रुधिराभिसरण***; **रक्त**; ***रक्तवाहिन्या***, **धमन्या**; ***श्लेष्मल त्वचा–जठराची***, **आतड्याची**; **मेंदू**; मज्जारज्जु; **हाडे**– (वरचा) जबडा, तंगडीची, कण्याची; यकृत यावर होतो. **शरीरात जलद घडामोड होते.** त्यामुळे रोगाची व शरीराची वाढ झपाट्याने होते. गुप्त रीतीने विकार उद्भवतात व हळूहळू **उत्तरोत्तर थकवा वाढू लागतो** व त्याचे पर्यवसान एखाद्या गंभीर दुखण्यात होते. विकार वारंवार उद्भवतात–सर्दी, रक्तस्राव वगैरे. ***रक्तस्राव***–एका बदली दुसरा, किंवा लहानसहान जखमातून खूप जातो. रक्तमिश्रित स्राव व्रणातून शेंबूड, शौच वगैरे. रक्त दूषित होते. मोड. **आग होते.** हृदय व फुप्फुसाच्या विकारांमुळे उद्भवलेली लक्षणे. **उंच, किडकिडीत, डौलदार, घाबरट व नाजुक इसम.** क्षयी प्रकृति. अशक्तपणा वाटतो–सांध्यात, किंवा श्रम केल्यानंतर. **पोकळ झाल्यासारखे वाटते**– छातीत, जठरात वगैरे. ज्ञानेंद्रिये, तीक्ष्ण. मनःक्षोभामुळे थकवा येतो. ***आवळल्यासारखे वाटते*** छातीत, खोकताना वगैरे. लुलेपणा, अंतर्गत– घसा, गुद वगैरे. अंतर्गत कंड सुटते गुद्गुल्या होतात. ठिकठिकाणी ठुसठुसते. बधिरपणा. **हवेतील फरक**

दाखविणारे मानवी यंत्र. अतिशय मीठ खाण्याने झालेले जठराचे विकार. त्वचेखाली रक्त साखळते, त्यामुळे त्वचेवर काळे निळे ठिपके पडतात. मांसांकुर उगवण्याची प्रवृत्ति. लक्षणे एकदम सुरू होतात–शक्तिपात, घाम येणे, वेदना होणे वगैरे. अनेक विकारात कावीळ होते. जबड्याची हाडे कुजतात. गरमीची तृतीयावस्था. कावीळ. चालताना झोकांडे जातात. हाडे ढिसूळ होतात. अवयवात चरबी माजण्याची प्रवृत्ति– यकृतात, हृदयात, मूत्रपिंडात. नाळगुद पू पातळ, दुर्गंधी रक्तमिश्रित. सांधे ताठतात पण फारशा वेदना होत नाहीत. लुल्या पडलेल्या भागात आचके बसतात. फेफरे येताना शुद्धि जात नाही. शरीर वाळते. राग, भीती, दुःख, काळजी, पावसात भिजल्याने, धुणी धुतल्याने, तंबाखु, केस कापल्यानंतर होणारे उपद्रव.

**मानसिक** :– वैषयिक व शृंगारिक वृत्ति, शरीर उघडे करून जननेंद्रिये दाखविण्याची प्रवृत्ति. चिडखोरपणा. असुखकारक गोष्टीमुळे थकवा वाटतो. चिंता वाटते. भीती वाटते एकटे असण्याची, संध्याप्रकाशाची, भुताची, वीज वावटळीची. खोलीच्या प्रत्येक कोपऱ्यातून कोणी तरी सरकत येत आहे असे वाटते. अद्भुत गोष्टीचे ज्ञान, स्वतःच्या मोठेपणासंबंधी भ्रामक कल्पना. भित्रेपणा, अनिश्चितपणा. अभ्यास, काम करावेसे वाटत नाही, बोलावेसे वाटत नाही; उदास. रडणे, किंवा नकळत हसावयास लागून डोळ्यातून पाणी येऊ लागते. स्वतःच्या मुलासंबंधीसुद्धा बेपर्वा. विटाळशी होण्याचे अगोदर रडू येते. मजेदार गोष्टीमुळे किंवा नंतर अंग जणुकाय कढत पाण्यात बुडविल्याप्रमाणे तापते. आपल्याला सहानुभूति दाखवावी अशी इच्छा. गंभीर गोष्टीविषयी हसणे.

**डोके** :– अनेक लक्षणांबरोबर घेरी येते. जागे झाल्यानंतर, तरंगत आहोत असे वाटते, गरगरा फिरत आहोत असे वाटते. शौचास झाल्याने बरे वाटते. डोके जड होते. एकाच डोळ्यावरच्या भागात ठणका लागतो व त्यावेळेस भूक लागते. गार पाणी लावल्याने बरे वाटते, उजव्या कुशीवर निजल्याने जास्त होते. लहान मुलांची डोकेदुखी. कानशिलात आग होते. डोक्याचा मागील भाग गार होतो. टाळूत ठुसठुसते. डोक्यातून पांढरे पापुद्रे जातात. मधुन मधून टकलाचे चट्टे. मूठमूठ केस गळून पडतात. टाळूत ठुसठुसते, ती कढत होते. दुःखामुळे डोके खाजते.

**डोळे** :– वाऱ्यात डोळ्यातून पाणी येते. दृष्टीपुढे ज्वाळा दिसतात; उजेडाभोवती लाल–हिरवी–काळी वर्तुळे दिसतात. बुरख्यातून–धुक्यातून किंवा धुळीतून पाहत आहोत असे वाटते. डोळ्यावर हात ठेवून पाहिल्याने बरे दिसते.

आंधळेपणा–तंबाखुमुळे, विजेच्या धक्क्यामुळे, संभोगातिरेकामुळे किंवा मूत्रपिंडाच्या शोथामुळे आलेला. दृष्टीचा क्षेत्रविस्तार कमी होतो. दृष्टीपुढे निरनिराळे रंग दिसून नंतर अर्धशिशी सुरू होते. मोतिबिंदु; काचबिंदु. वाचताना अक्षरे लाल दिसतात. दृष्टिभ्रम. पापण्याचे केस लांब व वळलेले.

**कान** :– चांगले ऐकू येत नाही–विशेषतः लोकाचे बोलणे. कानात ध्वनि-प्रतिध्वनि होतात, विशेषतः गाण्याचे. तापानंतर आलेला बहिरेपणा. कानाच्या मागील हाडांच्या उंचवट्यांचा शोथ.

**नाक** :– **नाकाच्या पाळचा आतबाहेर हलतात.** सर्दी-नाक चोंदलेले असले तरी वाहते. नाक सुजते; आत व्रण पडतात. नाकाची हाडे कुजतात. **नाकातून रक्त येते**–तरुणपणी, विटाळाऐवजी किंवा खोकताना. जीर्ण सर्दी, नाक शिंकरताना थोडे थोडे रक्त जाते. मोड व त्यातून रक्त येते. वास सहन होत नाही त्यामुळे **शिंका येतात**, धूर गेल्याने शिंका येतात; शिंका येताना दम लागतो. **सर्दी नाकातून छातीत उतरते.** शिंकताना घशात दुखते.

**चेहरा** :– **नाकातोंडाभोवती फिकट;** आजाऱ्यासारखा. डोळे खोल गेलेले व भोवती निळी वर्तुळे. खालच्या जबड्याचे हाड सुजते-कुजते. एका किंवा दोन्ही गालावर लाली येते.

**तोंड** :– दात बधिर. हिरड्या हुळहुळ्या व त्यातून रक्त येते. टाळ्याला कंड सुटते, त्यावर गळू येते. जीभ कोरडी गुळगुळीत लाल किंचित पांढरी. चव आंबट, दूध प्याल्यानंतर; कडू; गोडुस. दात काढल्यानंतर एकसारखे रक्त येत राहते. तोंड एका बाजूला ओढल्यासारखे दिसते.

**घसा** :– घशात कापूस अडकला आहे किंवा काही तरी टोचत आहे असे वाटते. अन्ननलिकेची आग होते; बारीक होते. घसा कोरडा, चकचकीत.

**जठर** :– आंबट चव व ढेकरा. ढेकराबरोबर **तोंड भरभरून अन्न बाहेर येते.** ***गार पेये प्यावीशी वाटतात*** व त्याने बरे वाटते परंतु काही वेळाने ओकून पडतात. क्लोरोफार्म दिल्यानंतरची ओकारी. तोंडाला पाणी सुटते. **एकसारखी खा खा सुटते.** रात्री खावेसे वाटते; एखादा विकार होण्याचे अगोदर खाखा सुटते. **मीठ खाण्याची ( खारट पदार्थ ) वासना.** एकदा दिलेले पण नाकारलेले पदार्थ खाण्याची वासना. पोटात व अन्ननलिकेत आग होते–खाण्यानंतर जास्त पोटातील वेदना गार अन्नपेयानी कमी होतात. पोटाच्या खळीच्या वर दाबल्यासारखे वाटते. **जठरात *पोकळ झाल्यासारखे वाटते,***

आत काहीतरी इकडे तिकडे वळवळत आहे असे वाटते, फडफडल्याप्रमाणे किंवा कंपित झाल्यासारखे वाटते–विशेषतः भावनामुळे. काफीच्या भुकटी-प्रमाणे ओकारी. ओकारीत, रक्त; पित्त पडते. गरोदरपणी पाणी पिववत नाही. पाणी हद्दीस पडले की ओकारी येते, आंघोळ करताना डोळे मिटून घ्यावे लागतात. अन्न गिळण्याचा प्रयत्न केला की बाहेर येते.

**उदर** :– गार झाल्यासारखे वाटते. उदर चोळण्याने बरे वाटते. वात धरून त्रास किंवा वेदना होत असल्यास गरम पेयामे बरे वाटते. यकृताचा शोथ. कावीळ, न्युमोनियात, मेंदूच्या विकारात, गरोदरपणी किंवा भावनाक्षोभामुळे उदरावर मोठाले पिवळे चट्टे पडतात. शौचास साबुदाण्याच्या लापशीप्रमाणे होते. शौच–**बारीक बोटाप्रमाणे**, लांब, टणक. जुलाब–पांढुरके, निळसर, पातळ पाणी **ओतल्याप्रमाणे** होतात किंवा वेदनारहित, नकळत होऊन त्यानंतर थकवा येतो. घाबरटपणामुळे जुलाब होतात. गुदद्वार वासलेले, बाहेर येते. पांढरे टणक शौचास होते. रक्ती मूळव्याध. शौचास होताना गुदातून रक्त पडते, आव. डाव्या कुशीवर निजल्याने शौचास लागते. दुर्गंधी वारा सुटतो व शौचास होते. पोटाच्या खळीच्या वर दाबल्यासारखे वाटते; आत लहानशा जागी हुळहुळेपणा.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीतून रक्त जाते विशेषतः मूत्रपिंडाच्या शोथात. लघवी भरपूर पाण्यासारखी होते; लघवीनंतर थकवा वाटतो. लघवीवर तवंग येतो. मधुन मधुन लघवीतून अल्बुमिन जाते.

**पुरुषजननेंद्रिये** :– **संभोगेच्छा तीव्र** पण शारीरिक अपात्रता. शृंगारिक स्वप्ने पडून स्वप्नावस्था होते. वैषयिक उन्माद. शिश्नाचे उत्थापन होत नाही.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळी लवकर–विटाळ फार जात नाही पण फार दिवस जातो. दोन पाळ्यामध्ये थोडा थोडा बारंवार विटाळ जातो; गर्भाशयाचा कॅन्सर झाला असताना किंवा अंगावर मूल पिताना. धुपणी भरपूर–चुणचुणणारी–विटाळाऐवजी. नष्टार्तव; त्यावेळेस नाकातून, घशातून, गुदद्वारातून; लघवीतून रक्तस्राव होतो किंवा स्तनात दूध येते. विटाळशी होण्याचे पूर्वी रडू येते. स्तनाला गळू होते-पाण्यासारखा दुर्गंधी स्राव येतो. स्तनातील नाडीव्रण. कामोन्माद. गर्भाशयातील मोड. डाव्या स्तनाखाली दुखते. वंध्यात्व; अतिशय वैषयिक क्षोभामुळे किंवा भरपूर विटाळ जात असल्यामुळे किंवा विटाळ उशिरा येत असल्यामुळे. वैषयिक क्षोभ झाला असतानासुद्धा योनी संभोगाचे वेळी बधिर होते. गरोदरपणी व अंगावर मूल पिताना अतिशय संभोगेच्छा होते.

**श्वसनेंद्रिये** :- **दम कोंडल्यासारखा वाटतो**-जराशा हालचालीने जास्त. छातीत दाटल्यासारखे वाटून दम लागतो, खोकताना छातीत दाटते. खोकला, गार हवेने, हसताना, बोलताना, उग्र वासामुळे, गाताना, परकी इसमांच्या देखत, श्रमामुळे मोठयानें वाचताना जास्त होतो. खोकताना चव गोड होते. खोकल्याच्या ठसक्यामुळे सर्वांगात कंप येतो. छाती कढत झाल्यासारखी वाटते. कफ ताबुस किंवा पुवळलेला फेसाळ, गार, खारट, वारंवार कफातून रक्त पडते. खोकताना घशात दुखते. न्युमोनिआ. छाती भरलेली जड. **छातीतील वेदना पाठीपर्यंत** किंवा उजव्या हातापर्यंत जातात. छातीच्या डाव्या बरच्या भागात **टोचते.** छातीत घुरघुरते, गार पेयाने जास्त. कंठ हुळहुळा होतो, दुखतो, **आत मखमल आहे** असे वाटते. कंठात दुखल्यामुळे बोलता येत नाही. **आवाज घोगरा** विशेषतः संध्याकाळी. क्षयरोग. खोकल्या-नंतर दम लागतो.

**हृदय** :- हृदयातील वेदना उजव्या हातापर्यंत जातात. क्षुल्लक कारणाने धडधडा-वयास लागते. हृदय अशक्त, कढत झाल्यासारखे वाटते. गळ्यांतात **धडधडते** नाडी जलद. छातीवर पिवळे ठिपके पडतात.

**पाठ** :- **तिकोनी हाडांमध्ये** पेटके येतात, **आग होते.** डाव्या तिकोनी हाडापासून पुढे छातीत वेदना जातात. कमरेत लहानशा जागी आग होते, चोळण्याने कमी होते. बाळंतपणानंतर माकडहाडात दुखावयास लागते. गुदास्थि ते वर मणक्यातून डोक्याच्या मागील भागापर्यंत टोचते, शौचास झाल्याने कमी होते. पाठ मोडल्याप्रमाणे दुखते, हालचालीत व्यत्यय येतो.

**हातपाय** :- रात्री डाव्या खांद्यात फाडल्याप्रमाणे वेदना होतात. **हाता-पायांची** बोटे **बधिर** होतात. तळहातांची आग होते. कमरेच्या सांध्यात सांधे सुले पडताहेत की काय अशा तऱ्हेने टोचते; नंतर त्या वेदना पाठीत जातात. तंगडीची हाडे दुखतात, सुजतात, कुजतात. पंजे व हात बधिर. श्रमामुळे अशक्तपणा येऊन कंप येतो. हातात **काहीही धरवत नाही.** संधि एकदम मोडल्यासारखे वाटतात विशेषतः घोटयाचे. हातापायांच्या बोटांच्या टोकातून वर सुलेपणा येत जाऊन स्पर्शज्ञान कळेनासे होते. पावले बर्फासारखी गार. पायांच्या बोटाना पेटके येतात. घटसर्पानंतर आलेला सुलेपणा; पंज्याना व पाऊलाना मुंग्या येतात. **झोकांडे जातात;** सहजासहजी अडखळणे.

**झोप** :- झोप येत नाही विशेषतः अंतर्गत उष्णतेमुळे. डोळे मिटून धरता येत नाहीत असे वाटते. झोपेतून वारंवार जाग येते. दिवसा झोप येते. मध्य-

रात्रीनंतर झोप येते. झोपेत चालणे. विस्तवाची, रक्ताची किंवा वैषयिक स्वप्ने पडतात. गुंगी, बेशुद्धि पण डोळे उघडे.

**त्वचा :–** दाढी केल्यानंतर आग होते. अंगावर चरबीमय गाठी येतात. मोठ्या व्रणाभोवती बारीक बारीक व्रण पडतात. अंगावर पिंगट किंवा लाल चट्टे पडतात. लहानसहान जखमातून रक्त वाहण्याचे थांबत नाही, जखमा बऱ्या होतात व फुटून पुन्हा त्यातून रक्त येऊ लागते.

**ज्वर :–** दररोज संध्याकाळी थंडी वाजते. बंद खोलीत थंडी वाजते– पाठीत खालून वर थंडी वाजते. पाठीत खालून वर आग होते. तापात तहान लागत नाही पण भूक लागते. क्षयी ज्वर. वेदनारहित ताप. घाम येतो–चिकट, पहाटे पण त्यामुळे बरे वाटत नाही. थंडी वाजताना बर्फाचे पाणी प्यावेसे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** *निजल्याने–डाव्या कुशीवर* किंवा वेदना होत असलेल्या बाजूस किंवा *पाठीवर*. क्षुल्लक *कारणे–भावना*, बोलणे; स्पर्श; उजेड, वास. *थंडीमुळे*–गार पाण्यात हात घातल्याने. मोकळी हवा. *गरम अन्न पेये*. मीठ. वयात येण्याचा काळ. हवेत एकदम फरक झाल्याने. वाऱ्यात. वीज–वादळ. सकाळी व संध्याकाळी. मानसिक व शारीरिक श्रम. पावसात भिजल्याने. जिना चढताना. संभोगातिरेक. शरिरातील स्राव गेल्याने, संध्याप्रकाशात, हजामत केल्याने.

**ब वा :–** खाण्याने. झोपेने. गार अन्न पेये. चेहऱ्याला गार पाणी लावल्याने. चोळण्याने. बसल्याने. अंधारात. उजव्या कुशीवर निजल्याने.

**सहाय्यक औषधे :–** आर्से; कलि-का; कॅल्क–का; कार्बो–व्हेजि; लायको; सल्फ; सॅन्वि; सिलि; सेपि.

**संबंधी औषधे :–** पल्स; ब्रायो; ऱ्हस–टा.

---

## २०५. फास्फरिक ॲसिड Phosphoric Acid

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *मन*; जननेंद्रिये; कणा व हाडे यावर होतो. स्राव भरपूर जातात व त्यामुळे *अशक्तपणा व थकवा* वाटतो. शारीरिक व मानसिक मांद्य. निजलेल्या बाजूस किंवा भार पडलेल्या बाजूस वेदना होतात. मार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा. मुंग्या येतात–केसांच्या बुडाशी, कण्यात, हातापायात वगैरे. सांधे ढिले. झपाट्याने वाढलेली व शारीरिक व मानसिक श्रमाने थकलेली तरुण मुले. वाईट बातम्या, दुःख–

शोक, प्रेमभंग, घरादाराचा वियोग, संभोगातिरेक, जखमा, शस्त्रक्रिया इत्यादि कारणामुळे उद्भवलेले विकार. हातपाय कापल्यानंतर राहिलेल्या बुंध्यात वेदना होतात. कॅन्सरच्या वेदना. रक्तस्राव, रक्त काळे. हाडात खरवडल्याप्रमाणे वेदना. गळवे होण्याची प्रवृत्ति विशेषतः तापानंतर. दाबल्यासारखे वाटते, जड ओझे ठेवल्याप्रमाणे वाटते; कपाळात, छातीच्या मध्यभागी; टाळूत, डोळ्यात, स्तनात, बेंबीवर वगैरे. भाग गार पडतात. खंत घेऊन वाळणे. घाम येण्याची किंवा जुलाब होण्याची प्रवृत्ति.

**मानसिक** :– *शांत*, *निर्विकार*, *बेपर्वा*, मतिमंद. मनात आलेल्या विचारांची सुसंगती नसते, योग्य शब्द आठवत नाहीत, ते शोधावे लागतात, आकलन लवकर होत नाही. स्मरणशक्ति मंद. निराशा, बोलण्याचा कंटाळा. मेंदूचा शीण. उत्तरे नाइलाजाने, हळुहळु चुकीची किंवा थोडक्यात देणे. अवघड परिस्थितीशी झगडल्यामुळे शारीरिक व मानसिक गोष्टी करण्याचा *कंटाळा येतो*. पाळी थांबण्याचे वयात होणारा हिस्टेरिआ. रडावेसे वाटते विशेषतः घरादाराचा वियोग झाल्यामुळे वात. सहज रागावणे.

**डोके** :– ठेचल्याप्रमाणे दुखते. टाळू जड ओझ्यामुळे ठेचली जात आहे असे वाटते. डोके हालविल्याने किंवा आवाजाने जास्त. केस गळून पडतात; अकाली पांढरे होतात. डोळ्याच्या श्रमाने किंवा संभोगानंतर डोके दुखते. शाळेत जाणाऱ्या मुलींची डोकेदुखी. घेरी येते–चालताना, उभे राहिले असताना, पाय वरवर जात आहेत असे वाटते, अंथरुणात निजले असताना हवेत तरंगत आहोत असे वाटते, कानात आवाज घंटानाद होतात व डोळे चकचकीत दिसतात.

**डोळे** :– निस्तेज खोल गेलेले व डोळ्याभोवती काळी वर्तुळे येतात. डोळे आतून बाहेर दाबल्यासारखे वाटतात. मुष्टिमैथुनामुळे आलेले अंधत्व. सूर्यप्रकाश सहन होत नाही. इंद्रधनुष्य दिसल्याप्रमाणे वाटते. पिवळे ठिपके पडतात.

**कान** :– आवाज होतात, चांगले ऐकू येत नाही. आवाज सहन होत नाही, विशेषतः गाणे. नाक शिंकरताना कर्कश आवाज होतात. प्रत्येक आवाजाचा मोठ्याने प्रतिध्वनि ऐकू येतो.

**नाक** :– नाकातून रक्त येते. नाकात बोटे घालणे–कंड सुटते. छातीला वारे लागले की सर्दी होते.

**तोंड** :– ओठ कोरडे–भेगा पडतात. हिरड्या-दातापासून सरकतात व त्यातून रक्त येते. दात गार झाल्यासारखे वाटतात. झोपेत जीभ नकळत चावली जाते. जीभ बुळबुळीत. दात पिवळे होतात व बधिर झाल्यासारखे वाटतात. जिभेच्या मध्यावर लाल रेघ. तोंड कोरडे. घशातून चिकट कफ खाकरावा लागतो. टाळा कोरडा पडतो.

**चेहरा** :– फिक्ट–मळकट आजाऱ्यासारखा. चेहऱ्यावर अंड्याचा बलक वाळला आहे असे वाटते. एक बाजू गार झाल्यासारखी वाटते. मुष्टिमैथुनामुळे आलेल्या यौवनपीटिका.

**जठर** :– रसाळ पदार्थ खावेसे वाटतात. आंबट ढेकरा. आंबट पदार्थ सोसत नाहीत. गार दूध प्यावेसे वाटते. जड ओझे ठेवून दाबल्यासारखे वाटते.

**उदर** :– फुगते. वात धरतो. पांथरी मोठी होते. बेंबीजवळ ठणका लागतो. *भरपूर वेदनारहित मळकट पांढरे पाण्यासारखे* किंवा *खाण्यापिण्यानंतर जुलाब होतात परंतु त्यामुळे फारसा थकवा येत नाही*. उदरात गारपणा वाटतो. शौचास नकळत होते, वात सरताना, किंवा लहान मुलाना हलविले तर. शौचास वास येत नाही.

**मूत्रेंद्रिये** :– वारंवार लघवीला जावे लागते व ती भरपूर होते. लघवी दुधाप्रमाणे पांढरी. बहुमूत्रता, मधुमेह. मूत्रपिंडाच्या जागी आग होते.

**पुरुषजननेंद्रिये** :– अशक्त, शिथिल. संभोग करताना एकदम शिथिल होतात. झोपेत किंवा शौचाच्या वेळी वीर्यपात होतो. बोंडीच्या कातडीत पुटकुळया येतात. संभोगानंतर पुन्हा वीर्यपात होतो. अंड सुजतात व हुळहुळे. वृषणाचा इसब.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळी फार लवकर; विटाळ भरपूर जातो व त्यावेळेस यकृतात दुखते. धुपणी पिवळी कंड करणारी, पाळीनंतर जाते. अंगावर पाजण्यामुळे अशक्त झालेल्या स्त्रिया. गर्भाशय हवा भरून फुगले आहे असे वाटते. स्तनात दाबल्यासारखे वाटते (डाव्या).

**श्वसनेंद्रिये** :– खोकल्यामुळे शरीर हादरते. छातीत गुदगुल्या होऊन खोकला येतो बोलताना, खोकताना, बसले असताना, छाती अशक्त झाल्यासारखी वाटते, चालण्याने बरे वाटते. छातीत मध्यभागी दाबल्यासारखे वाटते किंवा पिळवटल्यासारखे वाटते त्यामुळे श्वासोच्छ्वास घेताना त्रास होतो. कफ खारट.

**हृदय** :– धडधडते विशेषतः झपाट्याने वाढणाऱ्या मुलांचे किंवा दुःखामुळे किंवा मुष्टिमैथुनामुळे. नाडी अनियमित, मधुन मधुन थांबते.

**पाठ** :– **कण्यात् लुला पडल्याप्रमाणे अशक्तपणा वाटतो.** मारल्याप्रमाणे वेदना होतात. कण्यात व कमरेखाली आग होते. कण्यात मुंग्या येतात. कंबर जड वाटते.

**हातपाय** :– पुढील हात जड. वरच्या हातात व मनगटात पेटके येतात. रात्री हाडात खरवडल्याप्रमाणे वेदना होतात. सहज अडखळणे व पाउले चुकीची टाकणे.

**झोप** :– *दिवसा झोप येते,* रात्री अंग गरम होऊन झोप येत नाही. **गुंगी** वैषयिक स्वप्ने पडून वीर्यपात होतो.

**त्वचा** :– चिकट, सुरकुतलेली. पुटकुळया. रक्ती गळवे. लाल होऊन आग होते. तापानंतर गळवे होण्याची प्रवृत्ति. वेदनारहित व्रण; दुर्गंधी पू वाहतो.

**ज्वर** :– तापात घाम येतो. **भरपूर घाम येतो** विशेषतः रात्री. **लवकर बरे न होणारे वेदनारहित ज्वर.** गारपणा वाटतो; उदरात; चेहऱ्याची एक बाजू वगैरे.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *शरीरातील जीवनोपयोगी स्राव गेल्याने;* **संभोगातिरेक;** **श्रम;** तापानंतर; *भावना;* **दुःख;** मानभंग; मानसिक आघात; प्रेमभंग; घरादाराचा वियोग. **थंडी. गार वारे.** संगीताने बोलणे. बसल्याने उभे राहिल्याने.

**ब बा** :– **उष्णता;** थोडीशी झोप; शौचानंतर.

**सहाय्यक औषधे** :– गेल्से; लायको; सेपि; सेले.

---

## २०६. फिजास्टिग्मा Physostigma

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **डोळे,** डावी बाजू, स्नायू यावर होतो. **अशक्तपणा.** स्नायूंची हालचाल होत नाही किंवा ते एका ठिकाणी गोळा होतात. कापरे भरते. **गार पाण्याची धास्ती.** आंघोळीचा तिटकारा. धनुर्वात, दातखिळी बसते. झोपेतसुद्धा मन अस्वस्थ असते. डोक्याभोवती पट्टा बांधला आहे असे वाटते. **डोळयांच्या स्नायूचा कंप.** पापण्या वर करणे सहन होत नाही. घशात गोळा गिळला आहे असे वाटते. गर्भाशय बधिर. हृदय

व घशात फडफडते आहे असे वाटते. **कण्याला दाब, स्पर्श सहन होत नाही.** हातापायांना धक्के बसतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा स्त :– डोळ्यांचे श्रम;** दुखापत; उष्णता व थंडी. खाली उतरताना.

**क मी :–** सपाट निजल्याने. डोळे मिटल्याने.

**संबंधी औषधे :–** अगारि; गेल्से; नक्स–व्हा.

---

## २०७. फेरम ( लोह ) Ferrum Mettalicum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *रुधिराभिसरण*; **रक्तवाहिन्या; रक्त;** पांथरी; **पचनक्रिया.** यावर होतो. शरीर धष्टपुष्ट पण अशक्त; लोळावेसे वाटते; बोलण्याचे, चालण्याचे श्रम वाटतात. रुधिराभिसरण अनियमित विशेषतः वरच्या भागात. डोके, चेहरा, छाती वगैरेत रक्ताधिक्य जास्त होते. **ठुसठुसणे. रक्तस्राव** लालभडक किंवा रक्तात लहान लहान गांठी पडतात. झपाट्याने वाढलेली तरुण मुले. रक्तवाहिन्या शिथिल–शिरा फुगतात विशेषतः विटाळसेपणी, तापात, वेदना होताना. दाबल्यासारखे वाटते छाती, जठर वगैरे. वेदना विशेषतः रात्री होतात, त्यामुळे **हालचाल करावी लागते.** श्लेष्मल त्वचा व त्वचा फिकट, किंवा लाली आलटुन पालटुन. **कोरडेपणा**–अन्न खाताना, योनीत, सांध्यात वगैरे. शरीर झपाट्याने वाळते. **पंडुरोग.** स्नायू विसविशित, शिथिल. हाडे मऊ होतात व वाकतात. मन व शरीर संत्रस्त. जलयुक्त सूज येते, रक्तस्रावानंतर किंवा जीवनोपयोगी स्राव गेल्यानंतर. सांध्यात कटकट आवाज होतात. लाल भाग फिकट होतात. मोहनिद्रा. गलगंड, डोळे पुढे येतात विशेषतः विटाळ बंद झाल्यामुळे.

**मानसिक :– काहीही सहन होत नाही,** संत्रस्त. थोडासा सुद्धा विरोध खपत नाही. बारीक आवाज सुद्धा सहन होत नाही. आपलेच बरोबर आहे अशी भावना, बेताल हसणे किंवा रडणे. आपलेच बरोबर आहे असे नेहमी वाटते.

**डोके :– ठुसठुसते, हातोडा मारल्याप्रमाणे वेदना होतात**– वेदना दातापर्यंत जातात डोक्याच्या मागील भागात दुखते. डोके दुखणे खोकताना, खाली उतरताना. किंवा खाली वाकल्याने जास्त होते, केस मोकळे सोडल्याने बरे वाटते. वाहत्या पाण्याकडे पाहिल्याने, एकदम उठल्याने, पुलावरून जाताना, घेरी

येते. डोके दुखत असताना घेरी येते. डोळ्यावर दुखते ( डाव्या ). डोके कढत, पाऊले गार. लिहिताना डोके पुन्हा दुखावयास लागते.

**कान** :– विटाळशी होण्याचे अगोदर कानात घंटा वाजल्याप्रमाणे आवाज होतात.

**डोळे** :– पाण्याने भरल्याप्रमाणे; लालसर. वाचताना लिहिताना अक्षरे एकमेकात गुंतत आहेत असे वाटते. अंधत्व आल्यासारखे वाटते. पापण्या फुगीर. रात्री अंधारात दिसत नाही; हिस्टेरिआत.

**नाक** :– नाकातून रक्त येण्याची प्रवृत्ति, विशेषतः पंडुरोगी इसमांची.

**चेहरा** :– आलटून पालटून लाल व फिकट होतो; किंवा क्षुल्लक कारणाने एकदम फिकट होतो. फुगल्यासारखा वाटतो. क्षुल्लक वेदनामुळे, भावनामुळे किंवा थोड्या श्रमाने लाल होतो. ओठ फिकट. गार पाण्याने चेहरा धुतला किंवा तापला तर वेदना व्हावयास लागतात.

**तोंड** :– दात दुखतात, बर्फाचे पाणी धरल्याने बरे वाटते. रक्तासारखी किंवा कुजलेल्या अंड्यासारखी चव. तोंड कोरडे, अन्न कोरडे आहे असे वाटते.

**घसा** :– आत काहीतरी फिरत असून त्याने घसा बंद होत आहे असे वाटते.

**जठर** :– आंबट पदार्थ, अंडी; नेहमीची सिगारेट बिअर व मांस यांचा तिटकारा. अजीबात भूक लागत नाही किंवा खाखा सुटते. खाण्याचा प्रयत्न केला तर जुलाब होतात. अंडी सोसत नाहीत. **ढेकराबरोबर तोंड भरभरून अन्न येते.** खाण्यानंतर ताबडतोब अन्न ओकून पडते. मध्यरात्री मळमळते व ओकावयास होते. सहज ओकावयास होते. ओकताना बहुधा मळमळत नाही. जठर कढत झाल्यासारखे वाटून आग होते.

**उदर** :– जुलाब–वेदनारहित, खाण्यानंतर, रात्रीचे, जोराने फरफर आवाज होऊन होतात. हगवण व मलावरोध आलटुन पालटून. घाबरटपणामुळे किंवा थकवा आल्यानंतर जुलाब होतात. शौचात अपक्व अन्न पडते. उदर फुगते, स्पर्श सहन होत नाही. शौचास टणक झाले तर पाठ दुखावयास लागते, किंवा गुदात पेटके येतात. गुदद्वारात कंड सुटते; जंतामुळे.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी एकदम हालचाल केली तर, खोकताना, चालताना न कळत होते. लहान मुलाना दिवसा फक्त लघवी न कळत होत राहते. मूत्रपिंडाचा जीर्ण शोथ. घाबरटपणामुळे भरपूर लघवी होते. लघवी कढत; रक्तप्रदरात. लघवीतून अल्बुमिन जाते.

**पुरुषजननेंद्रिये** :– रात्री स्वप्नावस्था होते व नंतर पाठ दुखते. अति श्रम केल्याने वीर्यपात होतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– योनि–हुळहुळी, कोरडी, संभोग करताना त्रास होतो, किंवा घर्षण कळत नाही. विटाळ एक दोन दिवस थांबून पुन्हा सुरू होतो. पाळी फार लवकर, विटाळ भरपूर जातो व फार दिवस राहतो, फिक्ट पाण्याप्रमाणे. धुपणी-करवडणारी, पांढरी, पाण्यासारखी. न्हाण येण्याच्या सुमारास धुपणी जाते. बाळा होण्याची प्रवृत्ति. अंग बाहेर येते.

**श्वसनेंद्रिये** :– आवाज घोगरा, आवाजात एकसारखा बदल होतो. छाती दाटलेली. श्वासोच्छ्वास दम लागल्याप्रमाणे. कोरडा खोकला, हालचालीने जास्त होतो. खोकताना डोक्याच्या मागील भागात दुखते. कफातून रक्त जाते ( रक्ताचे धागे ). छाती आवळल्यासारखी वाटते किंवा ठिकठिकाणी टोचते. दमा हळुहळु चालण्याने बोलताना कमी होतो.

**हृदय** :– धडधडते– हळुहळु चालण्याने कमी होते. नाडी भरलेली पण मऊ; अशक्त.

**मानपाठ** :– मान व खांद्याचा भाग दुखतो. कंबर रात्रभर दुखते, सकाळी बंद होते.

**हातपाय** :– एकाएकी पेटके येतात किंवा फाडल्या–उकरल्याप्रमाणे वेदना होतात. पंजे व पावले सुजतात. पाठीवर निजल्याने टाचात दुखावयास लागते. कटिशूळ. हळुहळु चालण्याने वेदना कमी होतात. लिहिताना पंजे कापतात पण जलद लिहिले तर बरे वाटते. वेदना होत असताना हात वाकवावेसे वाटतात. सांध्यात कटकट आवाज होतात.

**झोप** :– झोप येत नाही. अशक्तपणामुळे, शिवताना, बसले असताना, अभ्यास करताना झोप येते.

**त्वचा** :– फिक्ट, एकदम लाल होते. दाबल्याने खळगी पडते.

**ज्वर** :– थंडी वाजताना चेहरा लाल होतो व तहान लागते. तापात शिरा फुगतात. हातपाय गार, डोके व चेहरा कढत. तळपाय व हात कढत. घाम–चिक्ट, पिवळा, गार, करवडणारा, भरपूर व त्यामुळे थकवा वाटतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *रात्री*; भावना; अतिश्रम. खाण्याने; पिण्याने; जीवनोपयोगी द्रव्ये [illegible]ने; घाम आल्याने; कोयनेल; अंडी; उष्णता व थंडी; हात वर करताना; स्वस्थ बसल्याने. मध्यरात्री. एकदम केलेल्या हालचालीने

**ब वा** :– हळुहळु–हालचाल केल्याने; थोडेसे रक्त गेल्याने; कशावर तरी डोके टेकल्याने.

**सहाय्यक औषधे** :– अल्युमि; आर्से; सिको; हॅमने.

**संबंधी औषधे** :– आर्नि; पल्स; फास्फ; मॅग्ने; लायको.

---

## २०८. फेरम फास्फरिकम् Ferrum Phophoricum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **फुप्फुसे; कान**; नाक; ( बुंधा ), व कर्णनलिका यावर होतो. अशक्तपणा, थकवा, निजून राहणे भाग पडते. पंडुरोग. तापाची व शोथ यांची प्रथमावस्था. **रक्तस्राव**–लालभडक, धागे असलेला किंवा लाल पाण्याप्रमाणे. मार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा–छाती, **खांदे** स्नायूंचा. आग, चुणचुण. शरीर वाळलेले. क्षयी प्रकृति. क्षयात उत्पन्न होणारी तीव्र लक्षणे. उलटलेला क्षय; ***नाडी भरलेली मऊ व वाहती.*** सहज सर्दी होण्याची प्रवृत्ति. घाम बंद केल्याने किंवा झाल्याने, मार लागणे यापासून उद्भवलेले उपद्रव.

**मानसिक** :– स्वस्थ असणे. **प्रक्षुब्ध** अतिशय बडबड. किंवा उल्हासी मंडळीत बसण्याचा तिटकारा. एकटे असले म्हणजे बरे वाटते. आनंददायक गोष्टीविषयी उदासीन. गर्दीच्या ठिकाणी जाण्याची भीती वाटते.

**डोके** :– डोकेदुखी, टाळू ते दोन्ही बाजूस तीव्र कळा येतात–ठणका लागतो व त्या वेळेस **कान दुखतो**, नाकातून रक्त पडल्याने कमी होते–गार पाण्याने बरे वाटते. उन्हामुळे झालेले दुष्परिणाम. चालताना डोके पुढे ढकलले जात आहे असे वाटते. विटाळसेपणी डोके पोकळ झाले आहे असे वाटते.

**डोळे** :– लाल, आग होते. वरच्या पापणीत बारीक कण खुपतो आहे असे वाटते. खाली वाकले की दिसत नाही. पापण्यात पोकळ गुल्मे येतात.

**नाक** :–वारंवार सर्दी होते. नाकातून रक्त पडते, विटाळसेपणी सर्दी झाली म्हणजे बहिरेपणा येतो. शस्त्रक्रियेनंतर होणारा रक्तस्राव.

**कान** :– **भयंकर ठणकतो**, आतील भागाचा शोथ. कानात आवाज होतात विशेषतः निजल्याने.

**चेहरा** :– लाल व फिकट आलटूनपालटून. फुगीर. गाल कढत व हुळहुळे. दांत दुखत असताना.

**घसा** :– तोंड व घसा कढत. टानसिल लाल सुजलेली. घशात व नाकात शस्त्रक्रिया केल्यानंतरचा हुळहुळेपणा व रक्तस्राव. गवई लोकांची घसेदुखी.

**जठर** :– गार पाणी व आंबट पदार्थ सोसत नाही. आंबट ढेकरा. मांस व दूध यांचा तिटकारा. खाल्लेले अन्न जसेच्या तसेच ओकून पडते, मधुन मधुन केव्हा तरी लाल भडक रक्ताची ओकारी.

**उदर** :– लाल किंवा पिवळया पाण्याप्रमाणे वारंवार जुलाब होतात. हगवण, जुनाट आंव-रक्ताचे प्रमाण जास्त. आव झाली असताना ताप येतो. उदर फुगलेले कपडा सहन होत नाही. उन्हाळ्यात होणारी हगवण.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्रपिंडाचा शोथ. खोकताना लघवी नकळत होते. बहुमूत्रता. तापात लघवी तुंबते. पेये प्यालानंतर लोच लघवी होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळी लवकर, दर, तीन आठवड्यानी. त्रिटाळसेपणी टाळूत ठणका लागतो किंवा ती जड होते. योनी–कोरडी कढत. संभोग करताना दुखते.

**श्वसनेंद्रिये** :– कंठाची सूज विशेषतः गाणाऱ्यांची. खोकल्याचा ठसका–सकाळी व संध्याकाळी जास्त. छाती जड, हुळहुळी व भरल्यासारखी वाटते. न्युमोनियात किंवा छातीला मारल्यामुळे थुंकीतून नुसते रक्त पडते. खोकला दिवसा व रात्री फारसा नसतो. दीर्घ श्वास घेतल्याने किंवा खोकताना छातीत टोचते.

**हृदय** :– धडधडते, नाडी जलद चालते.

**हातपाय** :– हातापायाना धक्के बसतात. कोपऱ्याच्या सांध्याची लचक. खांदे मार लागल्याप्रमाणे दुखतात, वेदना छाती व मनगटापर्यंत येतात. पंजे सुजलेले व दुखतात, तळ हात कढत, मुलांचे पंज्याना घाम येतो. संधिवात एकामागून एक सांधे धरतात, हालचाल करताना त्रास होतो. मनगटे अशक्त वाटून दुखतात.

**झोप** :– गुंगी. अस्वस्थ. झोप येत नाही.

**त्वचा** :– मुरुम. गोवर.

**ज्वर** :– सतत ज्वर, दोषी ज्वर, न्यूमोनिया, गोवर दुपारी १ वाजता. थंडी वाजते. थंडी वाजताना हातपाय ताणावेसे वाटतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य वाढ** :– रात्री ( ४ ते ६ पहाटे ); हालचाल; आवाज; धक्का; गार हवा; घाम बंद झाल्याने. स्पर्श. गार पेयें; आंबट अन्न.

**घट** :– गार पाणी लावल्याने. रक्त गेल्याने. निजल्याने.

सहाय्यक औषधे :– कलि–मू ; नेट्र-मू .

संबंधी औषधे :– गेल्से.

## २०९. फेलांड्रिनम Phellandrinum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम श्लेष्मल त्वचा; छाती व स्तन (उजवे) यावर होतो. क्षय–खोकला, **अत्यंत दुर्गंधी भरपूर कफ पडतो**, तोंडाला चिकटतो व दम लागतो. प्रत्येक पदार्थ गोड लागतो. **भांडे वाजविल्याप्रमाणे मेंदूत नाद होतो.** टाळूवर जडपणा वाटतो. डोळ्यावर व कानशिलात ठणका व आग होते. उजेड सहज होत नाही; डोळे अर्धवट उघडे, फार वेळ रडू आल्याप्रमाणे दिसतात. स्तनात वेदना होतात पण मूल पीत असताना कमी होतात. स्तनाग्रातील वेदना मूल पीत असताना जास्त होतात. स्तनातून वेदना उदरापर्यंत किंवा पाठीत दोन्ही खांद्याच्या मध्यापर्यंत जातात. उजव्या छातीतून मागे पाठीत वेदना जातात. आंबट खाण्याची वासना. चालताना थकल्यासारखे वाटते. गुंगी. ढेकणांच्या वासाच्या ढेकरा. क्षयी ज्वर–तापात हात दुखतात. अतिशय झोप येते, उभे राहूत काम करताना झोप लागते. बाळंतपणानंतर अतिशय झोप येते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– थंडी, गार मोकळी हवा; डोळ्यांचे श्रम.

**ब वा** :– अंगावर मूल पीत असताना.

**संबंधी औषधे** :– असाफि.

---

## २१०. फ्रक्सिनस Fraxinus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम गर्भाशयावर होतो. घाबरट स्त्रिया. गर्भाशय मोठे व जड होते. व **योनीतून बाहेर येते.** गर्भाशयाची गुल्मे, खाली ओढ लागल्याप्रमाणे वाटून वेदना मांड्यापर्यंत जातात, पावलात पेटके येतात. मध्यरात्रीनंतर विटाळ किंवा धुपणी भरपूर जाते. उष्ण लाटा आल्या-प्रमाणे किंवा गार मुंग्या आल्याप्रमाणे वाटते. **टाळू कढत** किंवा कोरडी. डोक्याच्या मागील भागात ठुसठुसते. उदरात जड वाटते, खाली ओढल्या-प्रमाणे वाटते. आतडी खाली पडत आहेत असे वाटते. डाव्या रजःपिंडाला दाब सहन होत नाही. तान्ह्या मुलाना इसब.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– दुखापती; लचक; उचलणे.

**संबंधी औषधे** :– सेपि; व्हिबु.

## २११. फ्लुओरिक ॲसिड Fluoric Acid

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *शिरा*; त्वचा; हाडे; कानाच्या मागील हाडाचा उंचवटा यावर होतो. **सारखे अंग तप्त झाले आहे असे वाटून गार पाण्याने आंघोळ करावीशी वाटते.** फिकट, केविलवाणा. शरीर वाळलेले पिवळसर, शिथिल. रोगाने शरीर ढासळलेले, **फुगीरपणा; टणकपणा.** नाडीव्रण. तळहातातील गळू. नखुरडे. हाडांचे व्रण. कुजणे. **अंथरुणात फार दिवस पडून राहिल्याने आलेले व्रण.** जलयुक्त सूज. खोल व हळूहळू उद्भवणारे विध्वंसक परिणाम. स्राव–**पातळ, दुर्गंधी, करवडणारे** किंवा खारट, त्यामुळे कंड सुटते. वृद्धपणाच्या तक्रारी, अकाली वृद्धत्व. लहानपणीच दात कुजावयास लागतात, गलगंड. गरमी व पारा यांचे दुष्परिणाम. **शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात.** खूप श्रम केले तरी दमल्यासारखे वाटत नाही, अतिशय उष्णता किंवा थंडी असतानासुद्धा. वैषयिक वासना प्रबळ. ज्या भागावर भार पडला नसेल तो भाग बधिर होतो. शौचास लवकर वगैरे लागली तर, ती वासना शमविली नाही तर त्यापासून होणारे दुष्परिणाम.

**मानसिक :– जलद चालावेसे वाटते;** सारखी हालचाल करणे जरूर वाटते; उदासीन. खिन्न. मायेच्या माणसाविषयी बेपर्वा, पण इतराशी आनंदाने व रस घेऊन बोलणे. उल्हसित व आनंदी. वैषयिक वासना प्रबळ त्यामुळे रस्त्यावर उभे राहून स्त्रियांना निरखावेसे वाटते. एकही शब्द न बोलता स्वस्थ बसणे, विचारलेल्या प्रश्नाला उत्तर न देणे. जबाबदारीची जाणीव होत नाही.

**डोके :–** डोक्यात बेशुद्ध होत आहोत की काय अशा तऱ्हेचा वेदना होतात, लघवी झाल्याने कमी होतात. केस एकमेकात गुंतलेले व ढिसूळ. हाडावर हाड वाढते. **कपाळाचा मध्यभाग फुगीर.**

**डोळे :–** डोळ्यात गार वारे लागत आहे असे वाटते. लासरू आत काहीतरी आहे असे वाटते व ते चोळून काढता येत नाही, त्यामुळे पापण्या मिचकाव्या लागतात.

**कान :–** बहिरेपणा पण डोके मागे वाकविल्याने ऐकू येते.

**नाक :–** झोपेत नाकातून पाणी गळते.

**चेहरा :–** कढत झाला आहे असे वाटून गार पाण्याने धुवावासा वाटतो.

**तोंड :–** दात त्वरित कुजतात विशेषतः बुंध्याशी. जिभेवर भेगा पडतात सर्वभाजूस त्यामुळे बोलताना त्रास होतो. दात कढत झाल्यासारखे वाटतात. हिरड्यात होणारे नाडीव्रण.

**जठर** :– एकसारखी भूक. तिखट अतिशय चमचमीत किंवा गार पदार्थ खावेसे वाटतात काफीचा तिटकारा. गरम पेयाने जुलाब होतात. करपट ढेकरा. वस्त्र घट्ट केल्याने बरे वाटते. गुदात कंड सुटते व आग होते. अन्नात जरा बदल झाला की पित्ताच्या ओकाऱ्या होतात. यकृताच्या जागी हुळहुळेपणा वाटतो. बेंबीच्या भोवती पोकळ झाल्यासारखे वाटून दीर्घश्वास घ्यावासा वाटतो, पट्टा बांधल्याने बरे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्रमार्गात वर ओढल्यासारखे वाटते. लघवी थोडी, काळी.

**पुरुषजननेंद्रिय** :– वृषण सुजलेले. वृद्धपणी वैषयिक वासना बळावते, रात्री शिश्न ताठते. संभोगाचे वेळी अत्यंत सुख व समाधान झाल्यासारखे वाटते. वृषणातील शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात. वृषणाला सूज येते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गर्भाशयात व मुखात व्रण पडतात. पाळी लवकर येते. विटाळ खूप व फार दिवस जातो. धुपणी भरपूर व करवडणारी. कामोन्माद. विटाळ जाताना श्वासोच्छ्वास घ्यावयास त्रास होतो. पाळीची वेळ जरा चुकली तर बरे वाटत नाही. स्तनाग्रे हुळहुळी; भेगा पडतात.

**श्वसनेंद्रिये** :– श्वास कोंडल्यासारखा वाटतो, मागे वाकल्याने बरे वाटते. फुप्फुसा-भोवती पाणी साचते. विटाळ जाताना श्वासोच्छ्वास कष्टाने होतो; किंवा दमा व रक्तप्रदर आलटुन पालटून.

**हातपाय** :– बोटांचे सांधे सुजतात. नखाखाली काटा आहे असे वाटते. नखे वेडी-वाकडी, ठिसूळ; जलद वाढतात. नखुरडे, हाताच्या बोटांना केस चिकटलेले आहेत असे वाटते. हातपाय सुजतात.

**त्वचा** :– कोरडी, खरखरीत, कंड सुटते किंवा भेगा पडतात, आतून कढत वाफ बाहेर येत आहे असे वाटते. व्रण लाल होतात व खाजतात. व्रणाभोवती पुटकुळ्या येतात.

**झोप** :– ज्या बाजूस झोपले नसेल त्या बाजूवर निजलो आहोत असे वाटते.

**ज्वर** :– कढत लाटा आल्यासारख्या वाटून हाडात वेदना होतात. **घाम करवड-णारा, त्यामुळे कंड सुटते.** जननेंद्रियाना तेलकट, चुरचुरणारा घाम येतो. पंजे व पावले याना घाम येतो. रात्री मधुन मधुन ताप येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** : – *उष्णता*, खोलीची. **रात्री,** दारू. आंबट पदार्थ.

**ब वा** :– *गार पाण्याच्या स्नानाने*. **जलद चालण्याने.** थोडी झोप. खाण्याने. डोके मागे वाकविल्याने.

**सहाय्यक औषधे** :– सिलि.

**संबंधी औषधे** :– कॅल्क–स; फ्लस; सल्फु–ॲसि.

## २१२. बडिआगा ( गोड्या पाण्यातील स्पंज ). Badiaga

**सर्वसाधारण** :– स्नायू व त्वचा हुळहुळी–कपड्याच्या घर्षणानं जास्त होते. गाठी सुजलेल्या. गरमीचे बद. स्तनाचा कॅन्सर. सर्वांग लुले पडल्यासारखे वाटते. खोकताना शिंका येतात. नाकातून पाणी येते. गोड पदार्थ खाल्ल्याने खोकला येतो. कफ पिवळा, खोकताना **तोंडातून,** नाकातून **बाहेर लांब** उडतो. तोंड कढत. खूप तहान लागते. आनंददायक भावनामुळे हृदय धडधडते; बारीक आवाज फार मोठा वाटतो. हृदयाचे ठोके मानेपर्यंत जाणवतात. वण वर उचलले जाऊन रंगीबेरंगी होतात. तान्ह्या मुलांचा उपदंश.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :- थंडी हवा. वादळ दाब, स्पर्श.

**ब वा** :– उष्णता गरम खोली.

---

## २१३. बर्बेरिस व्हल्गॅरिस ( दारु हळद ) Berberis Vulgaris

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***मूत्रपिंड*; यकृत;** मूत्राशय; मूत्रमार्ग; आतडी; कंबर; सांधे; गर्भाशय वीर्यवाहिनी नलिका यावर होतो. शरीर व मन थकलेले. अनेक **एकदम बदलणारी किंवा आलटुनपालटून** होणारी लक्षणे होतात, भूक लागते नंतर अन्नाचा तिटकारा; तहान लागते नंतर पाण्याचा तिटकारा. वेदनाचे स्वरूप व जागा बदलतात, वेदना–**तीव्र कळा आतून बाहेर** येतात, मूत्रमार्गात, पायाच्या बोटात वगैरे किंवा **एका जागेपासून *सर्वत्र पसरतात*. टोचल्याप्रमाणे** वाटते, हुळहुळेपणा, आग, **चुणचुण.** बधिरपणा –थंड व उष्ण दोन्ही समजत नाही. **बुडबुडे आल्यासारखे वाटणे. श्लेष्मल त्वचा कोरडी,** तोंड, योनी वगैरे. मळकट **पांढरेपणा–चेहरा,** हिरड्या शौच वगैरे. खडे होण्याची **प्रवृत्ति** (मुतखडा पित्ताचा खडा वगैरे). संधिवातात–मूत्रेंद्रियांची लक्षणे उद्भवतात. लठ्ठ पण सहनशक्ति कमी असलेले इसम. **एखाद्या भागात गारपणा,** जननेंद्रियांचा वगैरे. देठ असलेली गुल्मे, मोड. लघवीतून यूरिक ॲसिड जाते. भगेंद्रावर, शस्त्रक्रिया केल्यानंतर झालेले छातीचे विकार. मूळव्याध. हाडे गार वाटतात.

**मानसिक** :- स्मरणशक्ती मंद. संध्याप्रकाशात मुलाना भयंकर देखावे दिसतात. निर्विकार, बेपर्वा. मानसिक काम करताना मन एकाग्र होणे कठीण जाते. जरा अडथळा आला तर विचारांची साखळी तुटते वस्तु मुळापेक्षा दुप्पट मोठ्या दिसतात.

**डोके** :– मोठे होत आहे असे वाटते. डोक्यावर घट्ट टोपी बसविली आहे असे वाटते. कानशिले गार. घेरी येताना मूर्च्छा येते.

**डोळे** :– पापण्यामधे कण आहे असे वाटते. गार वारे लागल्याने डोळे गार झाल्यासारखे वाटतात व डोळे मिटल्याने पाणी येते कोरडे वाचताना पापण्या लवलवतात. डोळे खोल गेलेले, भोंवती काळी वर्तुळे.

**कान** :– दाब पडून बंद झाल्यासारखे वाटतात. पाळ्यावर बारीक गाठी येतात. आत बुडबुडे आल्यासारखे किंवा गार झाल्यासारखे वाटते.

**नाक** :– कोरडे. मुंग्य; येतात. पाळ्यां खाजतात.

**चेहरा** :– मळकट आजाऱ्यासारखा, डोळे खोल गेलेले. गाल बसलेले. यौवनपीटिका पुवळतात. मोकळ्या वाऱ्यात चालताना गार थेंब पडत आहेत असे वाटते.

**तोंड** :– चिकट. फेसाळ कापसाप्रमाणे लाळ; जिभेच्या टोकावर वेदनायुक्त पुटकुळी येते. जीभ भाजल्यासारखी वाटते. हिरड्या मळकट; वर पांढऱ्या पुटकुळ्या येतात. दात लांब किंवा मोठे झाल्यासारखे वाटतात.

**जठर** :– पोटाच्या खळीत काहीतरी सुटून लोंबत आहे असे वाटते. एखादे वेळी खाखा सुटते तर काहीवेळी भूक अजीबात लागत नाही. काहीवेळा खूप पाणी प्यावेसे वाटते, काहीवेळा मुळीच तहान नसते. सकाळी खाण्याचे अगोदर मळमळते खाण्यानंतर मळमळ कमी होते, किंवा रात्रीच्या जेवणानंतर.

**उदर** :– पित्ताच्या खड्याच्या वेदना पोटाच्या खळीपर्यंत जातात. यकृतात भोसकल्याप्रमाणे वाटते, वेदना इतक्या तीव्र असतात की श्वासोच्छ्वास करता येत नाही. कावीळ. शौचास–पांढुरके, पाण्यासारखे, चिकट व होताना चुणचुणते. भगेंद्र.

**मूत्रेंद्रिये** :– **मूत्रपिंडाच्या खड्याच्या वेदना**– मूत्रनलिका ते मूत्राशयापर्यंत वेदना होतात. मूत्रपिंडात आग होते. बुडबुडे आल्यासारखे वाटते. लघवी होताना **मांड्यात व कुल्यात कळा येतात.** लघवी झाल्यानंतर आत थोडी शिल्लक आहे असे वाटते. **लघवी– दाट,** गढूळ; **पिवळी;** लाल; पिठाप्रमाणे किंवा **वाळूचा किंवा कफासारखा गाळ** खाली साचतो. वारंवार लघवीला लागते व कष्टाने होते. मूत्रमार्गात लघवी होत नसताना आग होते. लघवी होण्याचे अगोदर स्वच्छ स्राव बोंडीतून येतो (परमा). मूत्रग्रंथी वाढते त्यामुळे शिवणीत एकसारखे दाबल्यासारखे वाटते.

**पुरुषजननेंद्रिये** :– वीर्यवाहिनी नलिकेत व अंडात वेदना होतात. वृषणात, अंडात टोचते. गार घाम येतो. अंड वर उचलले जातात, अंडात वेदना आल्टुन पाल्टुन होतात. इंद्रिये गार, शिश्नाची बोंडी व कातडी गार.

**स्त्रीजननेंद्रिये** :– संभोगाचा तिटकरा. संभोगसुखाचा अभाव. संभोग करताना कापल्याप्रमाणे वेदना होतात. विटाळाऐवजी पांढरा किंवा पिंगट श्लेष्मा

जातो. विटाळ थोडा. धुपणी व विटाळ जाताना मूत्रेंद्रियाची लक्षणे होतात. संभोगानंतर अतिशय थकवा येतो. कष्टार्तव, विटाळ राखी रंगाचा, लसी सारखा.

**श्वसनेंद्रिये** :– आवाज घोगरा. कंठातील मोड. हात वर केल्याने श्वास घेण्यास त्रास होतो. कोरडा खोकला, छातीत टोचते.

**हृदय** :– भोवती टोचते. नाडी अतिशय मंद.

**पाठ** :– कण्याच्या खालच्या भागात वेदना सुरू होऊन सर्वत्र पसरतात. कटिशूळ. श्वासोच्छ्वास घेताना मानेत व पाठीत टोचते, **पाठ दुखत असताना अतिशय थकवा वाटतो**, पाठ दुखी बसण्याने, निजल्याने जास्त होते. कमरेत ठेचल्या-प्रमाणे, टोचल्याप्रमाणे वेदना होतात, तो भाग लुला पडतो की काय असे वाटते. कंबर बधिर. शस्त्रक्रियेनंतर कंबरेतील वेदना.

**हातपाय** :– बोटांच्या नखाखाली कळा लागतात–बोटाचे सांधे सुजतात. मांड्या बाहेरच्या बाजूस गार होतात. टाचात व्रण पडल्याप्रमाणे वेदना होतात. थोडेसे चालल्याने पाय अतिशय शिणल्याप्रमाणे व मोडल्याप्रमाणे वाटतात.

**त्वचा** :– चपट्या चामखिळी. कंड सुटते–आग होते–चुरचुरते–खाजविण्याने जास्त, गार पाण्याने बरे वाटते. त्वग्रोगानंतर पिंगट डाग पडतात. गुदद्वाराचा व पंजाचा इसब.

**ज्वर** :– निरनिराळ्या भागात गार पाणी शिंपडल्याप्रमाणे गार वाटते. कंबर, कुल्ले मांड्या कढत होतात. काही केले तरी घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **हालचाल; धक्का लागणे; पाय जोरात टाकण्याने.** बसलेल्या जागेवरून उठताना. श्रम. लघवी करताना. उभे राहिल्याने. संध्या-प्रकाशात.

**सहाय्यक औषधे** :– मॅग–मू.

**संबंधी औषधे** :– कलि–बाय; कोक–कॅ; पल्स; बेन्झा–ॲसि; लायको.

---

## २१४. बर्सा पॅस्टोरिस Thlaspi Bursa Pastoris

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम स्त्रीजननेंद्रियावर होतो. रक्तस्राव होण्याची प्रवृत्ति. रक्तस्राव किंवा योनीतून येणारे स्राव बंद झाल्यामुळे किंवा केल्यामुळे उद्भवलेले दुष्परिणाम. लांब चालत जावेसे वाटते. **वेदना डोक्यावर सुरू होऊन डोक्यावरून कपाळ मानेपर्यंत येतात.** नाकात शस्त्रक्रिया केल्यानंतर होणारा रक्तस्राव. कुजलेल्या अंड्यासारखी चव. ताक प्यावेसे वाटते. वात धरतो. मूत्रपिंडातील खडे. वारंवार लघवीस जावेसे वाटते,

लघवीतून रक्त जाते. लघवीला होताना लहान लहान चिळकांड्या उडतात. लघवी तुंबते. वृद्धपणी लघवी कष्टाने होते, थेंब थेंब होते. चिमट्याने मूल काढल्या-नंतर लघवी थेंब थेंब होते. गरोदरपणी लघवीतून अल्बुमिन जाते. **विटाळामुळे** किंवा **धुपणीमुळे न धुवून निघणारा डाग पडतो.** धुपणीमुळे कंड सुटते. उजव्या स्तनातून दुधासारखे पाणी येते. विटाळ भरपूर व बारंवार जातो, एका पाळीपासून दुसऱ्यापर्यंत क्वचितच थांबतो. विटाळ जाताना गर्भाशयात पेटके येऊन रक्ताच्या गाठी पडतात. एक महिना आड विटाळ जातो व तो जास्त जातो. उठताना गर्भाशयात हुळहुळे झाल्यासारखे वाटते. गर्भाशयाची गुल्मे. तिकोनी हाडांच्या मध्ये अशक्तपणा वाटतो व ठणका लागतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– एक महिना आड.

**ब वा** :– आंघोळीने. दमटपणा. जलद हालचाल.

**संबंधी औषधे** :– सेपि.

---

## २१५. बॅप्टिसिआ Baptisia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम रक्त; मन; आतडी; व डावी बाजू यावर होतो. *जडपणा; हुळहुळेपणा व ठणका–स्नायूत*, पित्ताशयात, हृदयात वगैरे, *व जलद शक्तिपात*; **अंथरुण टणक आहे असे वाटते पण अशक्तपणामुळे हालता येत नाही. काळेपणा–श्लेष्मल त्वचेचा**, स्राव, रक्तस्राव, शौच, विटाळ वगैरे. **पिंगट**– दातावरचे तापात आलेले कीट, जिभेवर मध्यभागी पट्टा, शौच, विटाळ वगैरे. *अत्यंत दुर्गंधी*– अंगाला, तोंडाला, शौच, लघवी घाम, इतर स्राव. इन्फ्लुएंझा, टायफाईडसारखे दोषी ज्वर. अंगाला क्षते पडतात ( अंथरुणात पडल्यामुळे ). वेदनांची जाणीव होत नाही. टायफाईड प्रतिबंधक. लहान मुलांचे आतड्याचे दोषी बिकार. भाग बधिर झाल्यासारखे किंवा मोठे झाल्यासारखे वाटतात.

**मानसिक** :– *आपण दोन आहोत*; शरीराचे *भाग वेगवेगळे झाले आहेत व इकडे तिकडे पडले आहेत*, **बधिर** किंवा मोठे झाले आहेत असे वाटते. **बुद्धिमांद्य, गोंधळल्याप्रमाणे**; उत्तरे देतादेताच झोप लागते. निर्विकार. वातात पुटपुटणे. अस्वस्थ. सारखे हात चोळणे; हिस्टेरिआत. आपले अवयव एकमेकाशी बोलत आहेत असे वाटते. शरिराचे झालेले तुकडे गोळा करण्याकरता इकडून तिकडे वळणे.

**डोके** :– जड, बधिर, मोठे झाल्यासारखे वाटते. कपाळाचे कातडे आवळल्यासारखे वाटते. डोक्याच्या मागील भागात रट्टा मारल्यासारखे वाटते किंवा जड होऊन दुखते. घेरी येताना पायाना शक्ती नाही असे वाटते. टाळू उडून जाते की काय असे वाटते. मेंदू हुळहुळा वाटतो.

**डोळे** :– सुजल्यासारखे वाटतात पापण्या जड. अर्धवट मिटलेले.

**कान** :– टायफाईडसारख्या तापात लवकरच कमी ऐकू यावयास लागते.

**नाक** :– बुंध्याशी दुखते, नाकातून काळे रक्त जाते. पिसे जळल्याचा वास येतो आहे असे वाटते.

**चेहरा** :– *काळवंडलेला, धुंद, तारवटल्याप्रमाणे* किंवा *रावळट*. जबड्याचे स्नायू ताठतात.

**तोंड** :– जीभ भाजल्यासारखी वाटते. पानचट, कडु चव. तोंडाला घाण येते. **तोंड घसा काळसर लाल फुगीर.** जिभेला भेगा पडतात त्यातून रक्त येते. जीभ जाड झाल्यासारखी वाटते व दाट थर जमतो. लाळ चिकट. तोंडात व्रण पडतात. जिभेवर मध्य भागी **पिंगट पट्टा.** बोलणे जड. आतून बधिर बाहेरून स्पर्श सहन होत नाही. अन्न खाण्याचा प्रयत्न केला तर गुदमरते. तोंड वासलेले. चिकट लाळ. आत दुष्ट व्रण पडतो.

**घसा** :– वेडेवाकडे व्रण पडतात. घट्ट पदार्थ गिळता येत नाहीत, फक्त पेयेच गिळता येतात. अन्ननलिका आवळल्यासारखी वाटते.

**जठर** :– सहज ओकावयास होते. जठर गळून गेल्यासारखे वाटते, एकसारखे पाणी प्यावेसे वाटते. मधुनमधुन एकाएकी ताप येऊन हगवण व ओकाऱ्या होतात. आत टणक पदार्थ ठेवला आहे असे वाटते. पोटाच्या खळीत दुखते.

**उदर** :– फुगलेले. आत गुरगुरल्याप्रमाणे आवाज होतो. यकृताच्या जागेत हुळहुळेपणा वाटतो. **जुलाब** अत्यंत दुर्गंधी, पातळ, काळे, रक्तमिश्रित, राखेच्या रंगाचे, वेदनारहित-पित्ताशय हुळहुळे वाटून जुलाब होतात. वृद्ध इसमांची आव; हातपाय दुखतात, कंबर दुखते व हुडहुडी भरते. ताप येऊन वेदनारहित आव पडते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थोडी होते, काळसर लाल; दुर्गंधी, फिक्ट हिरवी.

**पुरुषजननेंद्रिये** :– अंडाचा शोथ.

**स्त्रीजननेंद्रिये** :– मानसिक धक्का, खिन्नता, किंवा तापात वाखा होण्याचा संभव असतो. विटाळ; पाळी फार लवकर व विटाळ फार जातो. बाळंतपणा-

नंतरचा विटाळ दुर्गंधी, करवडणारा. बाळंतज्वर. अंगावर मूल पाजण्याऱ्या आयांचे तोंड येते.

**श्वसनेंद्रिये :– वारे हवेसे वाटते** विशेषतः जागे झाल्यानंतर किंवा दम्यात, उभे राहिल्याने बरे वाटते. छाती दाटल्या, आवळल्यासारखी वाटते. रात्री गुदमरून भयंकर स्वप्ने पडतील असे वाटून झोपण्याची भीती वाटते.

**पाठ** :– माकडहाडात वेदना सुरू होऊन त्या कुल्ल्याभोवती व पायात जातात. मान थकल्यासारखी, डोके कोणत्याही बाजूस सावरत नाही. पाठ मार लागल्याप्रमाणे हुळहुळी. फळीवर निजलो आहोत असे वाटते. हातपायाना ओढ लागते, दुखतात, ठणकतात, ताठतात.

**झोप** :– भयंकर स्वप्ने पडतात. एका कुशीवर कुत्र्याप्रमाणे हातपाय पोटाशी घेऊन निजणे.

**त्वचा** :– सर्व शरीरावर निळे डाग.

**ज्वर** :– **ग्लानि, सुस्ती, गुंगी**, अंथरुणात खाली सरकणे व तोंड वासलेले. अतिज्वर. बाळंतज्वर, दोषीज्वर, टायफाईड. घाम आल्याने बरे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– दमट उष्ण हवा**; धुके; खोलीत; दाबल्याने; जागे झाल्यानंतर. चालताना. मोकळी हवा. गार वारे. उन्हाळा. शरद ऋतु.

**संबंधी औषधे** :– आर्नि; ओपि; गेल्से; मुरि–ॲसि; लॅके; हायासा.

---

## २१६. बॅरिटा कार्बोनिका Baryta Carbonica

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम. ***पोषण***; ***मन***; *गांठी–घशातील* ( टानसिल ); मूत्रग्रंथि; ***हृदय***; **रक्तवाहिन्या** व फुप्फुसे यावर होतो. **शारीरिक व मानसिक मांद्य, खुजेपणा.** अशक्त. शरीर बाळके. **अकाली वृद्धत्व**. गाठी मोठया होतात, **ठणक होतात**, मानेच्या, गंडमाळा वगैरे. बधिर एखादा भाग–तोंड, जननेंद्रिये, हाताची बोटे वगैरे. **अरुंद जागेत कोंबल्याप्रमाणे वाटते**. रक्तवाहिन्या मऊ होऊन रुंद होतात. **लकवा, लुलेपणा. सुनबहिरी.** इतके थकल्यासारखे वाटते की खाववतसुद्धा नाही. सारखे निजावेसे वाटते, बसावेसे वाटते किंवा कशाचा तरी आधार घ्यावासा वाटतो. **वारंवार सर्दी होते** व टानसिल सुजून मोठ्या होतात. श्लेष्मल त्वचेचा शोथ. चरबीमय गुल्मे. **थोड्या श्रमाने थकवा** येऊन गुंगी येते. लहान मुले

व वृद्ध माणसे. सार्कोमा. रक्तदाब वाढतो. लहान मुलांची वाढ योग्य वेळी होत नाही व ती आपली कार्ये उशीरा करावयास लागतात. एखाद्या भागात विकार सुरू होतात, लुलेपणा, बधिरपणा, आंग वगैरे. पाऊलांना येणारा घाम बंद झाल्यामुळे होणारे दुष्परिणाम. चांगले धडधाकट इसम वाळावयास लागतात.

**मानसिक** :– *बुद्धीने मंद, नालायक व मागासलेला.* पोरकट, अविचारी, मूर्खपणाची, खुळयासारखी वागणूक. लाजाळू. **भित्रा.** क्षुल्लक कारणाने दुःख करणे. **मन थकलेले. स्मरणशक्ति मंद–** निरोप सांगण्याचे विसरणे. तोंडापुढे असलेला शब्द विसरणे. अनिश्चितपणा. **परक्या इसमांची भीती वाटणे** किंवा तिटकारा. आत्मविश्वासाचा अभाव. आपल्याकडे पाहून लोक हसताहेत किंवा चेष्टा करीत आहेत असे वाटते. कोणीतरी आपल्यासंबंधी बोलत आहे असे वाटते. **संशयी, शंकेखोर.** लहान मुलांच्या सर्वच गोष्टी उशीरा सुरू होतात– बोलणे, चालणे, शिकणे वगैरे. मुले लाजाळू भित्री– नवीन इसमाना तोंडावर हात ठेवून बोटाच्या फटीतून बघतात, किंवा सामानाच्या मागे लपतात. गुडघ्याबर चालतो आहोत असे वाटते. मूल खेळत नाही, काही न करता कोपऱ्यात बसून राहते. क्षुल्लक गोष्टीमुळे कण्हणे विकृतश्राद्ध घेण्याची प्रवृत्ति.

**डोके** :– मेंदू सैल झाला आहे असे वाटते, गार हवेत बरे वाटते. उन्हात उभे राहिल्याने डोक्यात टोचते. डोळ्यावर ( कपाळात ) जड ओझे ठेवल्याप्रमाणे वाटते. टाळूवर टकल पडते. घेरी येते, वृद्धपणी, मळमळते, खाली वाकल्याने जास्त होते. कातडीवर कोरडी उगवण किंवा ओलसर खपल्या बसतात. चरबीमय गुल्मे.

**डोळे** :– काळ्या बुबुळावर पांढरेपणा येतो. खाली पाहिल्याने डोळ्यांची लक्षणे कमी होतात. डोळ्यापुढे झालर आहे असे वाटते. मोतीबिंदु. डोळयावर जड वाटते. बाहुल्या जलद बारीक, रुंद होतात. खुपऱ्या. पापण्या जाड होतात.

**कान** :– बहिरेपणा. कानात तडतडल्याप्रमाणे आवाज होतात, गिळताना, शिंकताना, चालताना जास्त. कानाभोवतालच्या गाठी सुजतात व दुखतात. कानावर खपल्या बसतात. नाक शिंकरताना कानात प्रतिध्वनि उमटतात.

**चेहरा** :– **सुरकुतलेला, म्हाताऱ्यासारखा, आजारी.** चेहऱ्यावर कोळिष्टके चिकटली आहेत असे वाटते. वरचा ओठ सुजलेला. ओठ लोंबतात.

**नाक** :– कोरडे, शिंकरताना जास्तच कोरडे वाटते. सर्दी, शिंका येतात; नाक व वरचा ओठ सुजतो. नाकात धूर गेला आहे असे वाटते. शेंबूड दाट पिवळा. पाळ्याभोवती खपल्या बसतात. नाकातून रक्त येते.

**तोंड** :– विटाळशी होण्याचे अगोदर दात दुखतात. जीभ अशक्त, लुली; वृद्धपणी टणक होते. जिभेची आग होते हुळहुळी होते, किंवा आग होणाऱ्या पुटकुळ्या जिभेच्या टोकावर येतात. झोपेत लाळ गळते. गालाच्या आतल्या बाजूस भाजल्यासारखे फोड येतात. तोंडाला घाण येते पण ती स्वतःला कळत नाही. हिरड्यातून खूप रक्त येते. तोंड बधिर.

**घसा** :– **प्रत्येक वेळी सर्दी झाली की घसा ( टानसिल ) धरतो**, विशेषतः विटाळसेपणा. **टानसिल मोठ्या होतात. टानसिलची जीर्ण सूज**, गिळताना चुणचुणते, विशेषतः नुसता गुटका गिळताना. फक्त पेय पदार्थ गिळता येतात. अन्ननलिका आवळल्यासारखी होते; अन्न खाली उतरताच कोरड्या ओकाऱ्या येऊन गुदमरल्यासारखे वाटते. आवाजाचा अति उपयोग केल्यामुळे उद्भवलेले घशाचे उपद्रव.

**जठर** :– पोटाच्या खळीत लहानशा जागी दुखते. भूक असली तरी दिलेले पदार्थ नाकारणे. कढत अन्नपेयांनी त्रास होतो. लहान वयात मुष्टिमैथुन केल्यामुळे भूक मंद होते, रात्री वीर्यपात होतो. वृद्धपणी भूक कमी लागते.

**उदर** :– फुगलेले, टणक, पण बाकीचे शरीर वाळके. जुलाब होताना कमरेच्या भागात ठणका लागतो. मलावरोध. मूळव्याध लघवी करताना बाहेर येते. गुदात मुंग्या येतात. गुदद्वार ओलसर. शौचास टणक गाठी पडतात. लहान मुलांच्या उदरात वारंवार दुखते, त्याची वाढ होत नाही व भूक असूनसुद्धा खात नाहीत.

**मूत्रेंद्रिये** :– वारंवार लघवीला लागते, लघवी आवरत नाही. प्रत्येक वेळी लघवी करताना मूळव्याध खाली येते. लघवी करताना मूत्रमार्गात आग होते.

**पुरुषजननेंद्रिये** :– शिथिल विसविशित. वैषयिक वासना कमी होते. अकाली नपुंसकत्व. घोड्यावर बसून जाताना शिश्न ताठते. मूत्रग्रंथी मोठी. अंड टणक संभोग करताना झोप लागते. बधिर.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळशी होण्याच्या अगोदर पोटात व कमरेत दुखते. विटाळ थोडा. जननेंद्रिये बधिर. रजःपिंड व स्तन वाळतात.

**श्वसनेंद्रिये** :– कंठाची शक्ती क्षीण झाल्यामुळे आवाज उमटत नाही. दमा–उष्ण दमट हवेत जास्त होतो. जीर्ण खोकला. खोकताना गुदमरल्यासारखे वाटते,

कफ असूनसुद्धा बाहेर काढण्याची शक्ती नसते. कंठात श्वासाबरोबर धूर गेला आहे असे वाटते. फुप्फुसे धुराने भरली आहेत असे वाटते. वृद्धपणीचा दमा. खोकला परक्या इसमांच्या देखत, गरम अन्न घेतल्याने जास्त होतो.

**हृदय** :– मार लागल्याप्रमाणे हुळहुळे झाले आहे असे वाटते. धडधडते–डाव्या कुशीवर निजल्याने किंवा धडधडण्यासंबंधी विचार केल्याने जास्त होते. पावलाला येत असलेला घाम बंद झाल्यामुळे हृदयाची लक्षणे व्हावयास लागतात. नाडी मंद. रक्तदाब वाढतो.

**मानपाठ** :– डोक्याच्या मागील भागाखाली मानेच्या गाठी वाढतात. जुनाट मान आखडलेली. मानेवर चरबीमय गुल्मे येतात.

**हातपाय** :– पावले कापतात. तळपाय रात्री, झोपेत कढत व हुळहुळे होतात. **पावलांना दुर्गंधी घाम येतो.** हातपाय बधिर. गुडघ्यापासून वृषणापर्यंत बधिरपणा येतो पण बसल्याने नाहीसा होतो. पायाची आग होते. तळपाय चालताना दुखतात. गुडघे टेकल्याने गुडघे दुखतात.

**त्वचा** :– चामखिळी. पोकळ गुल्मे–चरबीमय.

**झोप** :– झोपेत बोलणे, विशेषतः वृद्धपणी. वारंवार जाग येते. शरीर फार कढत झाल्यासारखे वाटते.

**ज्वर** :– उष्ण लहरी येतात; रात्री जास्त. एखाद्या भागाला घाम येतो पंजे; पाऊले; अंगाच्या एका भागाला.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **मंडळीत असल्याने**; विकारांचा विचार केल्याने; **दमट थंडी**; पाय भिजल्याने. डोके भिजल्याने. हवेतील फरक. **निजल्याने; वेदना होत असलेल्या भागावर**; डाव्या कुशीवर. वास. उन्हाची किंवा शेगडीची उष्णता. हात वर केल्याने.

**ब वा** :– गरम पांघरुणाने. गार अन्न. एकटे असताना.

**सहाय्यक औषधे** :– ॲन्टी–टा; डल्का.

**संबंधी औषधे** :– कलि–फा; ट्यूब; पल्स; मेडो; लायको; सिली; सेपि.

---

## २१७. बॅरिटा मूरिआटिका Barita muriatica

**सर्वसाधारण** :– मानसिक व शारीरिक खुजेपणा. वैषयिक वासना प्रबळ, विशेषतः स्त्रियांत. रक्तदाब वाढल्यामुळे उद्भवलेले मेंदूचे विकार. हालचाल करण्याची

शक्ति नष्ट पण पूर्ण सावधपणा. अंग बर्फासारखे गार होते व हालचाल करता येत नाही. मुलांचे तोंड नेहमी उघडे असते व ती नाकात बोलतात. मुले दिसावयास बावळट व त्याना ऐकू कमी येते. ती नेहमी पोटावर निजतात. आचके येताना दचकल्यासारखे दिसते व हातापायांची अतिशय हालचाल होते. कोणत्याही प्रकारच्या वेडात वैषयिक वासना प्रबळ होते. डोके जड होते वृद्धपणी घेरी आली असताना कानात आवाज होतात. चावताना किंवा गिळताना कानात आवाज होतात. कान. दुखणे घोट घोट पाणी प्यालाने कमी होते. कानातून दुर्गंधी स्राव वाहतो. टानसिल मोठ्या झालेल्या. पडजीभ लांब होते, घसा रुंद झाल्यासारखा वाटतो. गिळताना त्रास होतो. पोटाच्या खळीत गळून गेल्यासारखे वाटते, जठरातून डोक्यापर्यंत उष्णता जात आहे असे वाटते. अन्ननलिकेचा, जठराचा जवळचा भाग बारीक होतो–खाण्यानंतर तात्काळ दुखावयास लागते व पोटाच्या खळगीला दाब सहन होत नाही. वृद्धपणाचा दमा, कफ घुरघुर वाजतो पण बाहेर लवकर येत नाही. फार चालल्याप्रमाणे पायाना दमल्यासारखे वाटते व सांधे ताठतात. झोपेत न जागे होताच शिंकणे. पायांच्या बोटाना पेटके येतात, पाय जवळ घेतल्याने बरे वाटते.

---

## २१८. बिस्मथ Bismuth

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **जठर व आतडी** यावर होतो. **निर्विकार** व थकलेला. **फाडल्याप्रमाणे, चिमटे घेतल्याप्रमाणे वेदना.** अंतर्गत जडपणा. उदरावर शस्त्रक्रिया केल्याने झालेले दुष्परिणाम.

**मानसिक** :– माणसात बसण्याची आवड. मूल आईला धरून बसते. एकटे असणे असह्य होते. असंतुष्ट. स्वतःच्या विकाराविषयी तक्रार करणे.

**डोके** :– डोकेदुखी आलटून पालटून. डोकेदुखी खाण्याने जास्त होते, गार पाणी लावल्याने बरे वाटते.

**डोळे** :– ठणकतात. कोपऱ्यात दाट श्लेष्मा जमतो.

**नाक** :– काळे रक्त जाते. बुंध्याशी जड वाटते.

**तोंड** :– हिरड्या सुजतात. दात दुखतात, तोंडात गार पाणी धरल्याने बरे वाटते. जिभेवर व कडेला काळे चट्टे पडतात. खूप लाळ गळते. चव, गोडुस, आंबट.

**चेहरा :**– मातट, डोळ्याभोवती निळा. गालाच्या ढंचवस्थात दुखते, धावल्याने आणि तोंडात गार पाणी धरल्याने बरे वाटते. चेहऱ्याच्या वेदना पोटाच्या वेदना आलटून पालटून.

**जठर :– गार पाणी पिण्याची वासना पण ते तात्काळ ओकून पडते.** पेय पदार्थच ओकून पडतात; घट्ट पदार्थ काही वेळ राहतात. मधुन मधुन बऱ्याच दिवसांनी **खूप ओकावयास** होते खाण्यानंतर पित्ताची ओकारी होते. जठर-शूळ, भयंकर पेटके येतात. किंवा आग होते; गार पाणी प्याल्याने वेदना कमी होतात परंतु **पोट भरले** ( पाण्याने ) **म्हणजे ते सर्व पाणी ओकून पडते.** पोटात अन्न जड होऊन एखाद्या जागेत दाबत आहे असे वाटते. वेदना-रहित जुलाब, जुलाब होताना तहान लागते वारंवार ओकारी होते व लघवीला जावेसे वाटते. आतड्यात चिमटे घेतल्याप्रमाणे वाटते. जुलाबानंतर थकवा येतो. तान्ह्या मुलाना कॉलऱ्यासारखे जुलाब होतात तरी अंग गरम असते. पचन क्रिया हळूहळू होते, दुर्गंधी ढेकरा येतात. जठरातल्या वेदना मागे वाकल्याने कमी होतात. जठराचा कॅन्सर, पिंगट रंगाचे ओकावयास होते.

**मूत्रेंद्रिये :**– लघवी वारंवार व भरपूर होते, फिकट. लघवी तुंबते.

**हातपाय :– तळहात व तळपाय कोरडे.** नखाखाली कापल्याप्रमाणे वेदना होतात हातपाय गार.

**त्वचा :**– काळे व्रण पडतात.

**झोप :**– वैषयिक स्वप्नामुळे अस्वस्थ, वीर्यपात होऊन किंवा न होऊन.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– खाण्याने**; अति खाण्याने.

**व बा :**– थंडी. गार पेये. गार पाणी पाल्याने. मागे वाकल्याने. हालचाल.

**संबंधी औषधे :**– आर्से; कॅड–स.

---

## २१९. बुफो Bufo

**सर्वसाधारण :**– या औषधाचा परिणाम **हृदय,** रक्त, रुधिराभिसरण; **मूत्रपिंड, जननेंद्रिये**; रजःपिंड; [illegible] व **त्वचा यावर होतो.** लठ्ठपणा. **व्यसनाधीनता व वाईट आनुवंशिक संस्कार** यामुळे उद्भवलेले परिणाम. **मानसिक व शारीरिक बिकार निकृष्ट.** रक्तस्राव पाझरतो– स्तनातून, लाळेतून वगैरे. सलल्याप्रमाणे वाटणे. रेघा मारल्याप्रमाणे वेदना. सांध्यांत खुंटी बसली

आहे असे वाटते. ठिकठिकाणी **आग होते**, उष्णतेच्या लाटा येतात सर्व शरीर सुजल्यासारखे वाटते विशेषतः सकाळी. कंप. शरीरात विजेचे धक्के बसताहेत असे वाटते. जलयुक्त सूज. फेफरे–वैषयिक कारणामुळे उद्भवलेले, विशेषतः रात्री झोपेत. स्त्रियांचे विटाळसेपणी, त्यांची वैषयिक वासना बळावते. तरुणाना मुष्टिमैथुनामुळे किंवा संभोग करताना फेफरे येते..शरीर अकाली थकते. शरीर वाढते पण मन पोरकट. बद. कॅन्सर. लहान सहान जागी त्वचा बधिर होते.

**मानसिक** :– **नैतिक घसरगुंडी**. पोरकट, खुळ्यासारखे हसणे. काहीतरी असंबद्ध बडबड पण तिचा अर्थ लोकाना कळला नाही म्हणजे राग येतो. जनावरांची व परकीय इसमांची भीती वाटते. चावण्याची प्रवृत्ति. एकांतवासाची आवड (विशेषतः मुष्टिमैथुन करण्याकरिता). कपटी लुच्चा, ढोंगी. बावळट, हेल काढून रडणे, आकांत करणे. रागावून कोणतीही वस्तु चावणे. चकचकीत वस्तूंचा व रात्रीचा तिटकारा.

**डोके** :– टाळूत कढत वाफ जात आहे असे वाटते. डोक्याच्या मागील भागाला उशीने त्रास होतो असे वाटते. मेंदू बधिर.

**डोळे** :– तेजस्वी वस्तूकडे पहात नाही. वस्तु वेड्यावाकड्या दिसतात. डावी पापणी लुली.

**कान** :– संगीत सहन होत नाही. बारीक आवाजानेसुद्धा त्रास होतो.

**नाक** :– नाकातून रक्त जाताना चेहरा लाल होतो व कपाळांत दुखते.

**चेहरा** :– वेडावाकडा. आचके येताना घाम येतो.

**तोंड** :– जीभ लुली पडते. तोतरे बोलणे. पाणी पीत असल्याप्रमाणे (कुत्र्याप्रमाणे) जीभ हालते. आचके येण्याचे अगोदर सताड उघडे राहते.

**उदर** :– गार गोळया आतड्यात फिरत आहेत असे वाटते. जांघात बद येतात. फेफरे येऊन गेल्यानंतर आत आचके आल्याप्रमाणे हालते.

**पुरुषजननेंद्रिये** :– मुष्टिमैथुनाचे दुष्परिणाम. स्वप्नावस्था होण्याची प्रवृत्ति. नपुंसकत्व. संभोग करताना– आचके (फेफरे) येतात. गरमीचे बद. जननेंद्रिये हाताळण्याची प्रवृत्ति. वीर्यपात सुखकारक न वाटता जलद होतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळसेपणी फेफरे येते. पाळी फार लवकर, विटाळात कधी खूप गाठी पडतात व कधी रक्तस्राव होतो. धुपणी पाण्यासारखी पिवळी, रक्तमिश्रित, दुर्गंधी. स्तनात तीव्र वेदना होतात विशेषतः रात्री; स्तन टणक, स्तनाचा कॅन्सर. गर्भाशयात रजःपिंडात आग होते. गर्भाशयाची गुल्मे, मोड,

व्रण. रक्तस्राव, दुर्गंधी. स्तनातून रक्तमिश्रित दूध येते. जांघेपासून गुडघ्यापर्यंत जाड दोरीप्रमाणे सूज.

**श्वसनेंद्रिये** :– फुफ्फुसात भाजल्याप्रमाणे आग होते. गुदमरल्यासारखे वाटून खोकला येतो. दमा.

**हृदय** :– **हृदय पाण्यात तरंगत आहे, फडफडत** किंवा हवेत फडफडत आहे असे वाटते. गलगंडात, नाडी जलद होते. मोठे झाल्यासारखे वाटते.

**पाठ** :– कटिशूळ–उठताना किंवा जरा हालचाल केली तर जास्त होतो. आंचके येण्याचे अगोदर मानेत धक्के बसतात.

**हातपाय** :– बधिर. चालताना झोकांडे जातात. नखुरडे–वेदना रेघा मारल्याप्रमाणे वर जातात. सांध्यात खुंटी मारली आहे असे वाटते. हातापायाना कंप, पेटके येतात. डावा हात बधिर होतो. हात आंचके येण्याचे अगोदर ताठतात.

**त्वचा** :– त्वचेखाली लाल रेघा. स्पर्श न कळणारे मधुन मधुन चट्टे पडतात. तळहात व तळपायावर भाजल्यासारखे फोड येतात. लहान जखमसुद्धा पुवळते. काळीपुळी. मोठाले भाजल्याप्रमाणे फोड येतात. केस उभे राहतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– गरम खोलीत. झोपेत. वैषयिक वासना उत्तेजित झाल्याने. जरासुद्धा हालचाल. दुखापती.

**ब वा** :– रक्त गेल्याने. गार हवा. गार पाण्याच्या आंघोळीने. गरम पाण्याने पाउले धुतल्याने.

**सहाय्यक औषधे** :– ग्रफाय; टरेन्टु; बॅरि–का.

**संबंधी औषधे** :– कॅल्क–का.

---

## २२०. बेन्झाइक ॲसिड Benzoic Acid

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **मूत्रपिंड**; **मूत्राशय**; ***लघवी***; ***सांधे***; **हृदय** आतडी व डावी बाजू यावर होते. अंगाला उग्र लघवीसारखा वास येतो. **वेदना जागा बदलतात. संधिवात व वातरक्ताच्या वेदना व मूत्रेंद्रियांची लक्षणे आलटुनपालटून** होतात. **वेदना हृदयाभोवतीच बहुधा जाणवतात.** सांध्याभोवती पोकळ गुल्मे येतात. वातरक्तामुळे सांध्याभोवती खडे जमतात. लहान मुलांना सारखे अंगावरच घ्यावे लागते, खाली ठेवलेले त्याना चालत नाही. लघवीला घाण येणे हे अनेक विकारात संबंधी लक्षणे

असते. लघवी कधी कमी कधी जास्त होते व लघवीच्या कमी जास्त प्रमाणावर विकारांचा चढ उतार होतो. लघवी भरपूर झाल्याने बरे वाटते.

**मानसिक** :– पूर्वी घडलेल्या दुःखकारक गोष्टीची वारंवार आठवण काढण्याची प्रवृत्ति. लिहिताना शब्द गाळणे. कुरूप, व्यंग असलेला इसम पाहिल्याने अंगावर शहारे येतात.

**डोके** :– घेरी येते व बाजूस पडू असे वाटते. लघवी कमी झाली की डोके दुखते.

**कान** :– अनेक लोक बोलत आहेत अशा तऱ्हेचे आवाज कानात होतात, गिळताना किंवा मोकळ्या हवेत चालताना जास्त.

**तोंड** :– जीभ स्पंजाप्रमाणे– खोल भेगा व पसरत जाणारे व्रण जिभेवर पडतात. तोंडाची व घशाची लक्षणे खाण्याने कमी होतात. निजल्याने दातदुखी जास्त होते.

**घसा** :– आत गोळा, सूज किंवा आवळल्यासारखे वाटते, खाण्याने बरे वाटते.

**जठर** :– खारट कडू ओकारी. खाताना घाम येतो.

**उदर** :– **भरपूर पांढुरके,** अतिशय दुर्गंधी, तीक्ष्ण लघवीच्या वासाचे, साबूच्या फेसाप्रमाणे **शौचास होते.** बेंबीभोवती कापल्याप्रमाणे वेदना होतात, शौचास झाल्याने बरे वाटते. यकृताच्या जागी टोचते.

**मूत्रेंद्रिये** :– ***लघवी*– चिळसवाणी दुर्गंधी, अमोनिआसारख्या वासाची, घोड्याच्या मुतासारख्या वासाची, *उग्र कढत पिंगट काळी*.** वृद्ध माणसाची दुर्गंधी लघवी– थेंब थेंब गळते, नकळत होते. लघवीतून वाळू जाते. लघवीचा कपड्याना पिंगट डाग पडतो. तान्ह्या मुलांची लघवी तुंबते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गर्भाशय खाली येते व लघवी दुर्गंधी होते.

**श्वसनेंद्रिये** :– संधिवात होणाऱ्या इसमांचा दमा. खोकला कोरडा, रात्री व उजव्या बाजूस निजल्याने जास्त होतो. खोकल्याची कोरडी ढास लागून नंतर हिरवा कफ पडतो. छातीला कपड्याचा दाब सहन होत नाही.

**हृदय** :– वेदनांच्या जागा वारंवार बदलल्यातरी त्या हृदयाजवळ स्थिर होतात. मध्यरात्रीनंतर भयंकर धडधडून किंवा हृदयाजवळ आग होऊन जाग येते.

**मानपाठ** :– माकडहाडात गारवा वाटतो. कंबरेत कंप मूत्रपिंडाच्या जागी ठणका.

**हातपाय** :– **चालताना सांध्यात कटकट आवाज होतो**. ( गुडघ्यात ). मनगटावर पोकळ गुल्म येते. टाचेच्या स्नायुबंधात दुखते. पायाच्या अंगठ्यांना गुल्मे येतात.

**त्वचा** :– लाल ठिपके पडतात. कंड सुटते, खाजविणे सुखकारक वाटते पण नंतर आग होते.

**झोप** :– काही दिवस गाढ झोप लागते, काही दिवस लागत नाही; आलटुन पालटुन.

**ज्वर** :– भरपूर घाम येतो पण त्याने बरे वाटत नाही. रात्रीचा घाम येतो. पंजे पाऊले, पाठ, गुडघे, गार वारे लागल्याप्रमाणे गार होतात. घामाला चांगला वास येतो, विशेषतः बेशुद्धीत.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– थंडी; मोकळी हवा; हवा बदलल्याने. शरीर उघडे केल्याने.

**ब वा** :– उष्णतेने. भरपूर लघवी झाल्याने.

**संबंधी औषधे** :– कॅल्क-का.

---

## २२१. बेलाडोना Belladona

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम मेंदू, रक्तवाहिन्या; **श्लेष्मल त्वचा–डोळ्याची, तोंडाची**, *घशाची*; त्वचा व **उजवी बाजू** यावर होतो. धष्टपुष्ट व बुद्धिवान इसम. *विकार एकदम सुरू होतात व त्याचे स्वरूप तीव्र खळबळकारक असते. कढतपणा, लालबुंदपणा, लाल रेषा, ठुसठुस व आग. भरल्यासारखे वाटणे. सूज*, शोथ. *वेदना–ठुसठुसणाऱ्या, कापल्याप्रमाणे* ओरबाडल्याप्रमाणे *एकदम सुरू होऊन एकदम थांबतात* किंवा येऊन जाऊन वारंवार होतात, त्यामुळे वेड लागण्याची पाळी येते. **स्राव थोडे किंवा कढत.** *धक्के बसतात, आचके येतात*, घशात योनीत वगैरे. *थरथरणे*. विकाराचे स्वरूप भयंकर खळबळकारक असले तरी रोग्याला भीती वाटत नाही, काळजी वाटत नाही व तहान लागत नाही. *आवाज, उजेड, धक्के* असह्य होतात. आचके हातात सुरू होतात. फेफरे आल्यानंतर मळमळते व ओकाऱ्या होतात. आचके थांबल्यानंतर बराच काळ बेशुद्धी राहते. ***कोरडेपणा***. मुलांचे विकार. सर्व ज्ञानेंद्रिये तीक्ष्ण. विमानात बसल्याने होणारे दुष्परिणाम, प्रतिबंधक म्हणून घ्यावे. बुद्धिमान पण लठ्ठ इसम. चांगले असताना आनंदी असून इतरांशी चांगले वागतात पण आजारी झाले की बेफाम **होतात. केस कापल्यानंतर**, डोके भिजल्यानंतर, उन्ह, चालताना गार वारे लागून **होणारे दुष्परिणाम** गलगंड होऊन डोळे पुढे येतात.

**मानसिक** :– अतिरेकी, प्रक्षुब्ध. *बेफाम वात,* मस्ती करणे *आरडा ओरड करणे अस्वस्थ* व जलद बोलणे, किंचाळणे, पळून जाण्याची प्रवृत्ति. वेड. चावणे, मारणे. स्वतःच्याच जगात दंग. भुते खेते, भयंकर देखावे दिसतात. अनेक प्रकारचे भ्रामक भास व कल्पना. चांगला असला म्हणजे देवासारखा, आजारीपणात पिशाच. नाचणे, हसणे, गाणे, शिट्या वाजविणे. एकसारखे कण्हणे, कोणी जवळ येण्याचा प्रयत्न केला तर भीतीने दचकणे, मुले रडतात पण हट्टीपणाने वागतात. मानसिक लक्षणे थोडे हल्के अन्न खाल्ल्याने कमी होतात.

**डोके** :– **डोक्यात ठुसठुसते– हातोडा मारल्याप्रमाणे** दुखते, विशेषतः **कानशिले.** डोकेदुखी आवाज, उजेड, धक्का हालचाल, निजल्याने जास्त होते, बसल्याने (अर्धवट ताठ) केस मोकळे सोडल्याने, डोक्यावर हात ठेवल्याने, दाबल्याने बरे वाटते. **डोके इकडे तिकडे फिरविणे.** स्वतःचे केस ओढणे. केस कापल्यानंतर डोके दुखते. मेनिन्जायटिस. केस कोरडे, गळतात, दुभंगतात.

**डोळे** :– *बाहुल्या रुंद होतात,* **तेजस्वी व बटबटीत, लाल.** डोळे मिटले की अनेक भयानक देखावे दिसतात. मधुन मधुन **डोळ्यापुढे अंधारी येऊन** नंतर पिवळे दिसावयास लागते. ज्वाळा दिसतात. **उजेड सहन होत नाही.** वस्तु दोन दिसतात. चंद्रप्रकाशात दिसत नाही. अर्धवट डोळे मिटले आहेत असे वाटते. पापण्या हुळहुळया, सुजल्याप्रमाणे वाटतात. वस्तु लाल दिसतात. मासाच्या वासाचे अश्रू येतात.

**नाक** :– लाल, सुजलेले. नाकातून रक्त येते व चेहरा लाल होतो. काल्पनिक वास येतात. तंबाखूचा वास सहन होत नाही.

**कान** – भयंकर ठणका लागतो, वेड लागण्याची पाळी येते. कानाच्या आतील भागांचा शोथ. कानदुखीमुळे मूल झोपेत किंचाळते. स्वतःचेच बोलणे ऐकू येते.

**चेहरा** :– *लाल* बुंद, फुगीर, **कढत;** किंवा आलटुन पालटुन फिकट व लाल. वरचा ओठ सुजलेला. एक बाजू सुजलेली. आचके येऊन चेहरा वेडावाकडा होतो. चेहऱ्याच्या स्नायूना आंचके बसतात. वेदना होताना स्नायूंना कंप येतो व चेहरा लाल होतो. खालचा जबडा मागे ओढल्याप्रमाणे वाटतो.

**तोंड** :– *तोंड व घसा कोरडा कढत.* दात दुखणे चावताना कमी होते. दात खाणे. जिभेवर लाल पुटकुळ्या उगवल्याप्रमाणे दिसतात (स्ट्राबेरी प्रमाणे). तोतरे बोलणे. जीभ कढत, लाल, सुजलेली; कडा लाल. जिभेचा पुढील भाग

गार व कोरडा. चावत असल्याप्रमाणे किंवा चोखत असल्याप्रमाणे तोंडाची हालचाल.

**घसा** :– लाल, *कोरडा*, *कढत*, आवळल्यासारखा वाटतो, विशेषतः पातळ पदार्थ गिळताना त्रास होतो. एकसारखे गिळावेसे वाटते व त्यावेळेस गुदमरते. **घोट घोट पिणे**, पाण्याच्या घोटाबरोबर अन्न गिळावे लागते.

**जठर** :– लेमोनेड पिण्याची वासना, व त्याने बरे वाटते. दुधाचा, मांसाचा आंबट पदार्थ, काफीचा तिटकारा. पाणी पिण्याची भीती वाटते. खूप गार पाणी प्यावेसे वाटते. उचकी लागून घाम येतो व आचके येतात. सर्व कांही ओकून पडते नंतर फिक्टपणा येऊन अशक्तता वाटते. जठरातील वेदना घसा, खांद्यापर्यंत जातात, दाबल्याने जास्त होतात.

**उदर** :– फुगलेले, कढत, हुळहुळे–स्पर्श, वस्त्र सहन होत नाही. आतड्यात मुठीत धरून आवळल्यासारख्या वेदना होतात. यकृतातून किंवा जठरातील वेदना खांद्यापर्यंत घशापर्यंत जातात, त्या बाजूस निजल्याने जास्त होतात. पोटाच्या खळीत कापल्याप्रमाणे वेदना होतात–मागे वाकल्याने बरे वाटते. डाव्या कुशीत शिंकताना, खोकताना किंवा स्पर्श केला तर टोचते. आतड्यात ओरबडल्याप्रमाणे वेदना होतात किंवा आतडी खाली दाबली जात आहेत असे वाटते. गुदद्वार एकदम बाहेर येते. शौचास खडूप्रमाणे खडे पडतात. शौचास होताना कापरे भरते. शौचास हिरवे, आव झाल्याप्रमाणे होते. शौचास नकळत होते. मुळव्याधीत पाठीत मोडल्याप्रमाणे दुखते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी तुंबते, निजल्याने नकळत होते, किंवा रात्री झोपेत नकळत होते. लघवी लालबुंद. मूत्राशयात किडा वळवळत आहे असे वाटते, पण लघवीला जावे असे वाटत नाही. लघवी भरपूर व वारंवार होते. लघवीतून रक्त जाते व त्याला काहीही कारण सापडत नाही.

**पुरुषजननेंद्रिये** :– अंड टणक वर ओढली गेलेली, शोथ. बोंडीवर मऊ गुल्म. जननेंद्रियाना घाम येतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळी लवकर, विटाळ भरपूर, लाल, गाठीयुक्त, **कढत व जोराने** वाहतो. बाळंतपणानंतरचा विटाळ कमी जातो, कढत दुर्गंधी असतो. सर्व आतडी जननेंद्रियातून खाली येत आहेत असे वाटते, उभे राहिल्याने, ताठ बसल्याने, बरे वाटते, निजल्याने जास्त होते. स्तनाचा शोथ–**स्तनावर लाल रेघा उमटतात**, स्तन जड टणक व लाल होतात, उशीरा वयात गरोदर

राहणाऱ्या स्त्रियाना या औषधाचा चांगला उपयोग होतो. बाळंत होताना गर्भाशयांचे मुख ताठते.

**श्वसनेंद्रिये** :– खोकल्याचा कोरडा ठसका रात्री जास्त. आवाज कुत्रा भुंकल्या-प्रमाणे. प्रत्येक श्वासागणिक कण्हणे. डांग्या खोकला. खोकताना छातीत टोचते. कंठ अतिशय दुखतो व खोकताना आंत काहीतरी बाह्य वस्तु आहे असे वाटते. डांग्या खोकल्यात दास लागण्याचे अगोदर जठरात दुखते व थुंकीतून रक्त येते.

**हृदय** :– मानेतील व कानशिलातील नाड्या उडलेल्या दिसतात. नाडी भरलेली, टणक, ताणल्याप्रमाणे. अतिशय धडधडते व श्वास कष्टाने घ्यावा लागतो. हृदयाभोवती बुडबुडे आल्यासारखे वाटते.

**मान-पाठ** :– मान व खांदा ताठलेला मानेतील गाठी सुजतात. पाठ **मोडल्यासारखी वाटते.** कंबर दुखताना कटिभागात व मांड्यात दुखते.

**हातपाय** :– धक्के किंवा आचके बसतात. सांधे सुजून लाल होतात, चकाकतात व त्यावर लाल रेघा उमटतात. हातपाय जड होऊन लुले पडल्यासारखे वाटतात. **हातपाय गार**. कंप. अशक्त वाटून चालताना झोकांडे जातात. कांही कारण नसताना लंगडणे. बसले असताना किंवा निजले असताना हातापायाची आढी घातली तर ती स्वतःला काढता येत नाही.

**त्वचा** :– ***लालभडक तुकतुकीत***. धावरे, गाठी सुजतात, लाल गळू, केसतुड.

**झोप** :– **डोळ्यावर झोप असते पण येत नाही.** ***झोपेत धक्के बसतात***. झोपेत चालणे, दात खाणे. भांडणाची, दरोडेखोराची, खुनी इसमाची, आगीची भयप्रद स्वप्ने पडतात. झोपेत कण्हणे व तळमळणे. झोपेत डोक्याखाली हात ठेवून निजणे.

**ज्वर** :– अंतर्गत गार पण बाह्यांग **चटका बसण्याइतके कढत व आग** होते, अंगातून कढत वाफ बाहेर पडत आहे असे वाटते. ***डोके कढत व हातपाय गार***. कढत घाम येतो. ताप अतिशय असला तरी तापात तहान लागत नाही व कोणत्याही प्रकारची दोषी लक्षणे उद्भवत नाहीत.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **उष्णता, सूर्याची**, अंग तापले तर, दुपारनंतर (३ वा.). ***वारे लागल्याने*** विशेषः **डोक्याला**. केस कापल्यानंतर. **थंडीने अंग गारठल्याने.** ***येत असलेला घाम एकदम बंद झाल्यास. आवाज.*** **उजेड.** ***धक्का लागणे*** **स्पर्श.** मंडळीत बसल्याने. हालचाल. **विकार झालेला**

भाग लोंबकळत ठेवल्याने. निजल्याने. चकचकीत वस्तु पाहिल्याने किंवा धावते पाणी पाहिल्याने.

**ब वा** :– पातळ पांघरूण. **मागे वाकल्याने**; विश्रांति. अंथरुणात. उभे राहिल्याने. आधार घेऊन डोके टेकल्याने. विकार झालेला भाग वळविल्याने.

**सहाय्यक औषधे** :– कॅल्क-का; नेट्र–मू; बोरा; मर्क्यु; हेपार.

**संबंधी औषधे** :– ग्लोनो; स्ट्रमो; हायासा.

---

## २२२. बेलिस पॅरेनिस Bellis Parennis

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **रक्तवाहिन्या; मज्जातंतू पांथरी**; सांधे; व डावी बाजू यावर होतो. *मार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा*. **ठणका**, ठुसठुस किंवा पिळल्याप्रमाणे वेदना. थकलेला भागलेला. **खोल झालेल्या दुखापती किंवा विषारी ( सेप्टिक ) झालेल्या जखमा विशेषतः उदरातील** (उदरावरील शस्त्रक्रिया) व ओटीपोटातील. पू करवडणारा त्याने केसांचा नाश होतो. रक्तस्राव. वृद्धपणी घेरी येणे. चालावेसेच वाटते. गरोदरपणी चालवत नाही, शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात. गर्भाशय पिळवटल्याप्रमाणे वाटून हुळहुळा होतो. **लवकर जाग येते** नंतर झोप येत नाही. आगगाडी, मोटारीतील अपघातामुळे दुखावलेल्या कण्यापासून उद्भवलेले उपद्रव. अंग तापले असताना थंड अन्न पेये घेतल्यामुळे किंवा एकदम अंग गारठल्यामुळे, उद्भवलेले उपद्रव. सर्वांगावर गळवे. गारठा सहन होत नाही. मुष्टिमैथुनाचे दुष्परिणाम. मार लागणे, पडणे, अपघात यापासून दीर्घ काळानंतर किंवा लवकरच सुरू झालेले दुष्परिणाम. रक्तस्राव होण्याची प्रवृत्ती. वेड लावणाऱ्या वेदना शेकाने जास्त होतात गारव्याने बरे वाटते. उदराचे बाह्यांग हुळहुळे होते. **पांथरीच्या जागी भरल्यासारखे** वाटून टोचते. पिवळे, दुर्गंधी, वेदनारहित जुलाब विशेषतः रात्री होतात. गर्भाशय व स्तन रक्ताने साखळतात. गर्भाशय पिळल्याप्रमाणे वाटते, हुळहुळे होते. पडल्यामुळे दुखावलेला गुदास्थि. दुखापतीनंतर राहिलेली सूज.

**लक्षणांचे वैशिष्ट्य आ हो** :– *दुखापती*; **लचकणे**; *स्पर्श*; **गार** किंवा **कढत पाण्याचे स्नान** किंवा गार पेये; भिजल्याने; **अंग कढत असताना गारठल्याने** अंथरुणाची ऊब. शस्त्रक्रियेनंतर. वादळ होण्याचे अगोदर.

**ब वा** :– सारखी हालचाल. विकार होत असलेल्या भागाला. गार पाणी लावल्याने.

**संबंधी औषधे** :– आर्नि.

---

## २२३. बोथ्राप्स Bothrops

**सर्वसाधारण** :– या सर्पविषामुळे रक्तवाहिन्यातच रक्त गोठते. रक्तस्रावामुळे अकाली थकलेले शरीर. शरीराच्या सर्व द्वारातून रक्तस्राव होतो, रक्त पातळ व काळे. त्वचेवर काळे डाग पडतात. अत्यंत सुस्ती व आळस. अर्धांगवात–जिभेची हालचाल होत असूनसुद्धा बोलता येत नाही. एकच हात किंवा एकच पाय लुळा पडतो. डोळयाच्या आतील पडद्यावर झालेल्या रक्तस्रावाने आलेले अंधत्व. दिवांधत्व–सूर्य उगवला की दिसेनासे होते. कापरे भरते. भाग कुजावयास ( गॅन्ग्रीन ) लागून हाडे उघडी पडून ती कुजावयास लागतात. लक्षणे बहुधा उजव्या बाजूस उद्भवतात. थोडी हुडहुडी भरुन नंतर खूप घाम येतो. पायाच्या अंगठ्याला असह्य वेदना होतात.

---

## २२४. बोरॅक्स (टाकणखार) Borax

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **डोक्याचा मागील भाग, *मज्जातंतु*; *पोषण*; *श्लेष्मल त्वचा*; *तोंड*; त्वचा**; मूत्रपिंड व मूत्राशय यावर होतो. शरीराचे पोषण नीट न झाल्यामुळे शरीर मऊ व विसविशित झालेली मुले. **श्लेष्मल त्वचेवर व्रण पडतात** ( तोंड जीभ येणे वगैरे ). **स्वच्छ, दाट, कढत, चुरचुरणारे** स्राव. एखाद्या भागात कढतपणा वाटतो– तोंड, योनी तळहात वगैरे. टोचल्याप्रमाणे किंवा ओढल्याप्रमाणे वेदना–**बरगड्यामध्ये**, तळपायात वगैरे. त्वचा व श्लेष्मल त्वचा सुरकुतलेली. शरीर वाळलेले. फेफरे. कोळिष्टके चिकटली आहेत असे वाटणे, चेहरा, पंजा वगैरे. लाल असलेले भाग पांढरे होतात. केस अस्ताव्यस्त व जाडेभरडे. जन्मतःच निळसर असलेली मुले. या औषधाने लवकर गर्भधारण होण्यास मदत होते.

**मानसिक :– घाबरट. काळजी वाटते, अस्वस्थ,** चंचल, चिडखोर, विशेषतः शौचास होण्याचे अगोदर, नंतर आनंदी. खाली येण्याची भीती वाटते– जिन्यावरून, लिफ्टमधून, खांद्यावरून खाली ठेवताना मूल भिते. क्षुल्लक कारणानी दचकणे, एकदम झालेल्या आवाजाने दचकणे. काळजी वाटून झोपेत रडणे, विशेषतः मुले. तान्ह्या मुलाचे डोके कढत असते व ती अंगावर पिताना किंवा शौचास व लघवीला होण्याचे अगोदर रडतात व किंचाळतात. विजेच्या कडकडाटाची भीती वाटते. मुले एकाएकी जागी होऊन किंचाळतात. पाळण्याला धरून ठेवतात; काही दृश्य कारण नसताना. दुसऱ्याचे दोष दाखविणे. काहीही करावेसे वाटत नाही. सर्व मानसिक लक्षणे रात्री ११ वा. कमी होतात.

**डोके :–** दुखत असताना मळमळते व अंग कापते. जिना चढताना किंवा उंचीवर चढताना घेरी येते. तान्ह्या मुलांचे डोके कढत असते. केसांची टोके एकमेकात गुंततात, चिकटतात, ती दूर करता येत नाहीत.

**डोळे :–** पापण्याचे केस आत वळतात. पापण्या सुजतात व डोळ्यावर घासतात. डोळ्याभोवती लाली. पापण्यावर खपल्या बसतात, चिकट. खुपऱ्या.

**कान :–** बारीक आवाज मुळीच सहन होत नाही, त्या मानाने मोठा आवाज सहन होतो.

**नाक :–** तरुण स्त्रियांचे नाक लाल. शेंडा सुजलेला. कोरड्या खपल्या बसतात. नाक सुजून चकाकते व ताणल्यासारखे वाटून ठुसठुसते.

**चेहरा :–** फिकट, मळकट, काही तरी होत आहे अशा तऱ्हेचा, विशेषतः खाली उतरताना. कोळिष्टके चिकटली आहेत असे वाटते. फुगीर; तान्ह्या मुलांचा निळा. खालच्या ओठाखाली ढेकूण चालला आहे असे वाटते.

**तोंड :–** येते. **पांढरा, मखमलीप्रमाणे जिभेवर व आत वर किंवा ठिपके** पडतात. तोंड कढत व हुळहुळे. जीभ फुगीर, भेगा पडलेली, दाताचे ठसे पडलेली. चव कडू. व्रण–खाताना किंवा स्पर्श केल्याने रक्त येते. तोंड आल्यामुळे तान्ही मुलं अंगावर पिताना रडतात. दातात पिळल्याप्रमाणे कळा येतात विशेषतः पावसाळ्यात, तंबाखु ओढल्याने बरे वाटते. टाळा टणक, सुरकुतलेला, भाजल्यासारखा वाटतो, खाताना दुखतो. हिरड्यात गळू होऊन ठणका लागतो.

**जठर** :– मळमळते विशेषतः–स्वतःच्या कामाविषयी गंभीरपणे विचार केला तर, व त्यावेळेस शरिराला कंप येतो व गुडघे अशक्त वाटतात. एकसारखे ओकावयास होते, पिण्यानंतर ओकावयास होते. ओकारीत आंबट कफ पडतो. जठरशूळ–गर्भाशयाच्या विकारामुळे उद्भवलेला. वेदना होत असलेल्या जागी दाबले तर ढेकरा येतात. जठराच्या जागी मोठे ओझे उचलल्यामुळे दुखावयास लागते, टोचते व ते मागे पाठीपर्यंत जाते.

**उदर** :– खोकताना जांघेत चमक मारते. तान्ह्या मुलांचे खिरीप्रमाणे होणारे दुर्गंधी जुलाब. शौच–झाल्यानंतर हिरवे होते, शौचास तवकीराच्या लापशीप्रमाणे होते. आमातिसार नुसताच श्लेष्मा पडतो–नंतर थकवा वाटतो. उदर मऊ बिसबिशित, खपाटी गेलेले. फुगते, प्रत्येक वेळी जेवणानंतर. जुलाब होतील की काय याप्रमाणे वेदना होतात. शौच दुर्गंधी, पातळ, पिठासारखे. विटाळशी होण्याचे अगोदर व पाळीत जांघेत टोचते. पांथरी-ते-छातीपर्यंत ओढल्या-सारखे वाटते.

**मूत्रेंद्रिये** .– कढत चुरचुरणारी तीक्ष्ण वासाची लघवी होते. मूत्राशयाचा शोथ, मूत्रपिंडाचा शोथ. लघवी होण्याचे अगोदर मूल किंचाळते, दुपट्यावर बारीक लाल कण पडतात.

**पुरुषजननेंद्रिये** :– वैषयिक वासना जवळ जवळ नसतेच. परमा.

**स्त्रीजननेंद्रिये** :– वंध्यात्व. हे औषध दिल्याने गर्भधारणा लवकर होते. पाळी फार लवकर, विटाळ भरपूर जातो व त्यावेळेस मळमळते, उदरात वेदना होतात. विटाळात श्लेष्मल त्वचेचे तुकडे पडतात. कष्टार्तव. वेणा येतात एक-सारख्या ढेकरा येतात. एका स्तनात मूल पीत असताना दुसऱ्या स्तनात वेदना होतात. मूल प्याल्यानंतर त्या स्तनात पोकळ झाल्यासारखे वाटून टोचते. दाबल्याने बरे वाटते. धुपणी बुळबुळीत अंड्यातील पांढऱ्या बल्का-प्रमाणे, स्वच्छ, चिकट, कढत. संभोगाचा तिटकारा. दूध दाट व चवीला वाईट त्यामुळे मूल दूध पीत नाही.

**श्वसनेंद्रिये** :– खोकल्याचा भयंकर ठसका. खोकताना, श्वास आत घेताना छातीत बरगड्यामध्ये टोचते. कफात रक्ताचे धागे पडतात व त्याला बुरसल्या-प्रमाणे चव व वास येतो. निजल्याने गुदमरल्यासारखे वाटून एकदम उठून श्वास घ्यावा लागतो व त्यावेळेस डाव्या कुशीत दुखते. जिना चढताना दम लागतो. पाठीवर निजल्याने किंवा छाती गार पाण्याने धुतल्याने किंवा दाबल्याने छातीतील वेदना कमी होतात.

**हृदय** :– उजव्या बाजूस आहे असे वाटते, व हातानी पिळल्यासारखे वाटते. जन्मापासून निळी असलेली मुले– भयंकर धडधडते.

**मानपाठ** :– पाळीत दुखते. खाली वाकता येत नाही.

**हातपाय** :– हातापायाना कंप, सकाळी १० वा. पंजावर कोळिष्टके चिकटली आहेत असे वाटते. आंगठ्याच्या ( हाताच्या ) टोकात ठुसठुसते. तळपायात टोचते. पायाच्या आंगठ्यात आग होते. पंजांच्या मागील भागाला कंड सुटते. पोटऱ्या अशक्त. टाच दुखते. हातापायांच्या बोटांना इसब त्यामुळे नखे नष्ट होतात. मांड्यावरून गरम पाणी वाहत आहे असे वाटते.

**झोप** :– अंग विशेषतः डोके फटत झाले आहे असे वाटून झोप येत नाही. भीती वाटल्याप्रमाणे झोपेत रडणे. संभोगाची, वैषयिक स्वप्ने पडतात.

**त्वचा** :– ***कोरडी* सहज चिघळते**– लवकर बरी होत नाही. उदरावर घाम येतो. व्यावसायिक इसब हाताचा बोटांचा व पंजाचा. कंड सुटते, नांगी मारल्याप्रमाणे वाटते. सुरकुत्या पडलेली.

**ज्वर** :– उष्ण लाटा येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***खाली येताना***; वर चढताना. **एकदम झालेला आवाज**; थंडी; दमट पावसाळा; तान्ही मुले; फळे; विटाळशीपणानंतर; तंबाखू ओढल्याने, झोके घेतल्याने, वरखाली केल्याने

**ब वा** :– दाबल्याने; संध्याकाळी; रात्री ११ वा. थंड हवा.

**संबंधी औषधे** – कॅल्क–का; नक्स–व्हा; बेला; ब्रायो; सल्फ–ॲसि.

---

## २२९. बोरॅसिक ॲसिड Roracic Acid

**सर्वसाधारण** :– गारपणा– लाळ, योनी वगैरे. भरपूर लघवीला होते. मधुमेह. जीभ कोरडी, लाल व भेगा पडलेली. मूत्रनलिकेत वेदना होऊन वारंवार लघवीला जावे लागते. विटाळ थांबण्याच्या वयात उष्ण लाटा येतात. योनी बर्फाने भरली आहे असे वाटते.

**ब वा** :– मोकळया हवेत चालल्याने.

---

## २२६. बोव्हिस्टा. Bovista

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *रुधिराभिसरण हृदय* गर्भाशय मूत्रपिंड व *त्वचा* यावर होतो. त्वग्रोग व रक्तस्राव होण्याची प्रवृत्ति. रक्तस्राव– पाझरतो विशेषतः रात्री. शिथिलपणा– सांधे सैल झाल्यासारखे वाटतात. **त्वचेवर सहजासहजी ठसे पडतात. सर्वांग फुगीर.** अवयव **मोठे झाले आहेत असे वाटते**– डोके, हृदय वगैरे. हृदयाची धडपड होणाऱ्या वृद्ध कुमारिका. कोळशाच्या वायूपासून बंद झालेला श्वासोच्छ्वास-बधिरपणा, बिरबिरल्यासारखे वाटणे. तोतरे बोलणारी मुले. अति शारीरिक श्रमाचे दुष्परिणाम.

**मानसिक** :– **बोलण्यात, वागण्यात, असंबद्धपणा व धांदरटपणा,** हातातील **वस्तु पडतात,** अडखळत बोलणे, तोतरे बोलणे, वगैरे. लक्ष नसणे. स्मरण-शक्ती कमी. जागे झाल्यानंतर गोंधळल्यासारखे वाटते. हसणे रडणे आलटून, पालटून. स्मरणशक्ति मंद. चिडखोर, प्रत्येक गोष्ट चुकीची झाली आहे असे वाटणे. आकाशाकडे कारण नसताना टवकारून पाहणे.

**डोके** :– मोठे झाले आहे असे वाटते. डोक्याच्या मागील भागात पाचर मारली आहे असे वाटते. संभोगानंतर डोक्यात बधिरपणा येऊन गोंधळल्यासारखे वाटते व झोकांडे जातात. डोके खाजते.

**डोळे** :– वस्तु आहेत त्यापेक्षा जास्त जवळ आहेत असे दिसते. आंधळेपणा

**कान** :– आंत गळू येते ( उजव्या ), गिळताना जास्त दुखते. दुर्गंधि पू येतो. अस्पष्ट ऐकू येते. दुसऱ्याचे बोलणे ऐकताना गोंधळ होतो.

**नाक** :– निजल्यावर चोंदते. नाकातून तारेसारखा शेंबूड येतो. नाकपुड्याभोवती खपल्या बसतात. सकाळी ( झोपेत ) नाकातून रक्त येते.

**तोंड** :– बधिर. लाळ वाढते. हिरड्यातून चोखले की रक्त येते.

**चेहरा** :– गाल व ओठ सुजलेले. यौवनपीटिका उन्हाळ्यात किंवा पावडरी लावल्यामुळे जास्त होतात. ओठांना भेगा. ओठांचे कोपरे सोलवटलेले. दमा होण्याच्या अगोदर चेहऱ्याचे स्नायू थरथरतात.

**जठर** : आंत बर्फाचा गोळा ठेवला आहे असे वाटते.

**उदर** :– फुगलेले. **वेदना,** अंग दुमडल्याने **व खाण्याने कमी होतात.** विटाळशी होण्याचे अगोदर **किंवा विटाळ चालू असताना जुलाब होतात.** वेदना होताना लघवीला लाल होते. वृद्ध इसमांची जीर्ण हगवण, शौचास

विशेषतः रात्री किंवा पहाटे जावे लागते. कमरेभोवती घट्ट वस्त्र सहन होत नाही. शिवणी गुद व जननेंद्रियापर्यंत टोचते. शौचास प्रथम घट्ट होते नंतर पाण्यासारखे पातळ होते.

मूत्रेंद्रिये :– लघवी झाल्यानंतर सुद्धा लघवीला लागली आहे असे वाटते.

पुरुषजननेंद्रिये :– संभोगानंतर झोकांडे जातात व डोक्यात गोंधळ होतो.

स्त्रीजननेंद्रिये :– पाळी लवकर, विटाळ रात्री किंवा पहाटे जास्त जातो; हालचाल करीत असताना कमी जातो; दोन्ही पाळ्यामध्ये थोडा थोडा विटाळ जात राहतो. कमरेभोवती वस्त्राचा दाब सहन होत नाही. रक्त प्रदर–विटाळ भरपूर जातो. रजःपिंडाची पोकळ गुल्मे. धुपणी दाट पुवाप्रमाणे, करवडणारी चिकट, हिरवी, चालताना किंवा पाळीनंतर जाते, हिरवे डाग पडतात. वैषयिक भावना जाणवते.

श्वसनेंद्रिये :– हातांची हालचाल केली तर श्वास लागतो. दमा चालू असताना हसू व रडू येते.

हृदय :– धडधडते– वृद्ध कुमारिकांचे धडधडणे डोळ्याला दिसते. पाण्यात धडधडते आहे असे वाटते. धडधडताना पंजे कापतात.

पाठ :– गुदाचे हाड खाजते. खाली वाकल्यानंतर पाठ जड होऊन दुखते.

हातपाय :– हातांची हालचाल केली तर श्वास लागतो. पंजे व पावले अशक्त, शिणल्याप्रमाणे. खाकेत घाम येतो व त्याला कांद्यासारखा वास येतो. पाय जड व दुखतात. सर्व सांधे अशक्त झाल्यासारखे वाटतात. पाऊल ( उजवे ) लचकल्यानंतर सूज कित्येक महिने राहते. पाय जड होऊन दुखतात. पंजे अशक्त, काम नीट करता येत नाही. सांध्याजवळ हाडे फुटल्यानंतर राहणारी सूज.

त्वचा :– उगवण खाजते त्यातून लस येते व जाड खपल्या किंवा पापुद्रे असतात व खाली पू होतो. अंग उष्ण झाले म्हणजे कंड सुटते, सर्वांगावर पुटकुळ्या येतात. इसब. पित्ताच्या गांधी–जुलाब होताना, विटाळ जाताना हृदयाची धडधड होताना सकाळी जागे झाल्यानंतर अंगावर येतात, आंघोळीने जास्त येतात. त्वचेवर कात्रीसारख्या हत्याराने ठसे पडतात.

ज्वर :– वेदना होताना थंडी वाजते.

लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– विटाळसेपणी. पौर्णिमा– अंग उष्ण झाल्याने. गार अन्न. दारू. काफी.

**ब** वा :– अंग दुमडून घेतल्याने. खाण्याने– कढत. अन्न.
**संबंधी औषधें** :– अस्टि; एपि.

---

## २६७. ब्रायोनिआ Bryonia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम रक्त; *रक्ताभिसरण*; **यकृत**; *डोके*; *छाती*; *सांधे*; उदर; स्नायू; व उजवी बाजू यावर होतो. विकार हळुहळू वाढतात व त्याचे स्वरूप तीव्र असते. **वेदनायुक्त लक्षणे**–खोकताना छाती कुशी, डोके धरावे लागते; सांध्यात हालचालीने दुखते. ***वेदना–फुटल्याप्रमाणे, टोचल्याप्रमाणे.*** जडपणा व हुळहुळेपणा. वेदना पुढून मागे जातात. ***जरासुद्धा हालचाल करण्याचा तिटकारा***, विकार झालेल्या भागापासून दूर असलेल्या भागांना मुद्रा–पंजे, पावले, घोटे वगैरे. ***श्लेष्मल त्वचा कोरडी त्यामुळे स्राव चिकट व थोडे.*** **रक्ताधिक्य शोथ व** शरीरात **द्रव्ये साखळण्याची** प्रवृत्ति. लाल रेघा. संधिवात; पित्तप्रकृति. लहान मुले घेऊन हिंडविण्यास किंवा वर उचलून घेण्यास नाखुष. उन्हाळ्यात किंवा अंग तापलेले असताना घेतलेल्या गार पेयाचे दुष्परिणाम. शारीरिक अशक्तपणा व त्यामुळे काहीही करावेसे वाटत नाही. राग, भीती, अपमान दारू, अतिखाणे, जखमा, स्राव थांबविल्याने किंवा अंगावरची उगवण नाहीशी झाल्याने उद्भवलेले दुष्परिणाम. सांध्याना मार लागल्यानंतर आर्निकानी बरे वाटले नाही तर ब्रायोने बरे वाटते. कोरडेपणा, **तोंड**, घसा वगैरे. शरिरात कोठेही दाबले की दुखते.

**मानसिक** :– निश्चयी, अबोल व तिरसट. स्वतःला एकटेच पडू द्यावे कोणी त्रास देऊ नये असे वाटते, नाहीतर आपण घरात नसून दुसरे कोठेतरी आहोत असे वाटून **घरी जावेसे वाटते.** वातात स्वतःच्या कामकाजाविषयी बडबड; मुले आपल्या खेळासंबंधी बोलतात. काहीतरी हवे असते पण काय ते समजत नाही; हवी असलेली वस्तु दिली तर ती नाकारणे, अतिशय चिडखोर कोणतीही गोष्ट खपत नाही. अशिष्ट वागणूक. पुढे काय होईल यासंबंधी काळजी व भीती वाटते.

**डोके** :– *डोके वर करताना किंवा उठताना घेरी किंवा मूर्च्छा येणे*, घेरी डोक्याच्या मागील भागात जाणवते. *डोक्याचे तुकडे तुकडे होत आहेत असे वाटते किंवा डोके जड होते* किंवा ठेचल्यासारखे वाटते.

कपाळ ते **मागील भागापर्यंत** दुखते. वेदना पापण्या हलविण्याने, **खोकताना** शौचाचे वेळी; कुंथताना जास्त होतात. डाव्या डोळ्यावर कपाळात दुखते. डोक्याची कातडी हुळहुळी. प्रत्येक केस टोचत आहे असे वाटते. केस तेलकट.

**डोळे** :- **डोळ्याच्या मागे दुखते.** डोळे हुळहुळे. काचबिंदु. डोळे दाबल्याने हलविल्याने दुखतात.

**कान** :- कानातील विकारामुळे घेरी येते. कानात आवाज होतात.

**नाक** :- विटाळाच्याऐवजी नाकातून रक्त पडते. कित्येक वेळा सकाळी नाकातून रक्त पडते व त्याने डोकेदुखी थांबते. नाकाचा शेंडा सुजतो व त्याला स्पर्श केला तर व्रण पडेल असे वाटून दुखते. नाकात गळवे येतात. सर्दी नाकातून घशात उतरते.

**चेहरा** :- काळसर तांबूस.

**तोंड** :- ओठ होरपळल्याप्रमाणे, कोरडे व भेगा पडलेले. **तोंड कोरडे.** जीभ अतिशय कोरडी, खरखरीत मध्यभागी पिवळी, पिंगट, बुंध्याशी लाल. **चव** **कडू** गार पेयाने कमी होते. लाळ साबणाप्रमाणे (बुळबुळीत). खालच्या जबड्याची चावत असल्याप्रमाणे हालचाल, लहान मुलांची, मेंदूच्या विकारात. ओठावरून जीभ फिरवून ते ओले करावेसे वाटतात. खालच्या ओठाची आग होते, नेहमी तंबाखू ओढणाऱ्यांची. दातात धक्के मारल्याप्रमाणे दुखले; विशेषतः तंबाखू ओढताना किंवा चघळताना.

**घसा** :- कोरडा, गिळताना टोचते. घशात चिकट कफ-बरेच खाकरल्यानंतर सुटतो. नाकाच्या घशातील बाजूतून पिंगट रंगाचे गोळे खाकरून काढावे लागतात. घशाचा मागील भाग सुजल्यासारखा वाटतो.

**जठर** :- *तहान लागून प्रत्येक वेळेस खूप पाणी प्यावेसे वाटते.* गरम पाणी पेण प्यावेसे वाटते व त्याने बरे वाटते. जे पदार्थ सोसत नाहीत तेच खावेसे वाटतात. उठताना मळमळते व मूर्च्छा येते. ओकारी कडू; खाल्ल्या-नंतर तात्काळ पाणी व पित्त ओकून पडते; गरम पेये ओकून पडतात. उजव्या कुशीवर निजल्याने मळमळते. अन्नाची किळस. पोटाच्या खळगीत दाबलेले सहन होत होत नाही व दुखते. **पोटात जड ओझे ठेवल्यासारखे वाटते**, खाण्यानंतर जास्त. फक्त घट्ट पदार्थ ओकून पडतात. काफी खूप आवडते. दुधाचा तिटकारा पण ते प्याल्यानंतर रुचकर लागते.

**उदर :-** यकृत जड व हुळहुळे पण त्यावर निजल्याने बरे वाटते. अॅपेन्डिसायटिस. ***शौचास कोरडे, मोठ्या आकाराचे व अतिशय टणक होते.*** शौच जाळल्याप्रमाणे दिसते. मलावरोध. सकाळी जागे झाल्यानंतर. हालचाल सुरू झाली की जोराने जुलाब होतात. कोबी खाल्ल्याने हगवण लागते. उन्हाळ्यात हगवण लागते, विशेषतः गार पेये घेतल्यानंतर, शौचानंतर चिकट श्लेष्म्याचे गोळे पडतात. शौच पिवळे पिठूळ. कावीळ. पाळीच्या अगोदर स्त्रियांच्या जांघात हुळहुळेपणा येतो. उदराच्या बाह्यांगाला स्पर्श सहन होत नाही.

**मूत्रेंद्रिये :-** लघवी कढत, थोडी, लाल, पिंगट. ओझे उचलताना श्वास कोंडला म्हणजे लघवीला लागते व जावेसे वाटते.

**स्त्रीजननेंद्रिये :-** विटाळ बंद पण त्याचेऐवजी नाकातून रक्त पडते व डोक्यात वेदना होतात. पाळीच्या सुमारास नाकातून वारंवार रक्त पडते. दोन पाळ्यामध्ये ओटीपोटात दुखते व उदर आणि ओटीपोट अतिशय हुळहुळे होते. स्तन विटाळशी होण्याचे अगोदर दगडाप्रमाणे टणक होतात. स्तनाचे गळू, स्तन कढत व ठणकतात; दुग्धज्वर. रजःपिंडात दीर्घ श्वास घेतल्याने टोचते, वेदना मांडीपर्यंत जातात. तान्ही मुले तोंड कोरडे पडल्यामुळे सुरुवातीस स्तन तोंडात धरत नाहीत पण ते थोडे ओले झाले म्हणजे ती चांगली पितात. विटाळ काळा, दुर्गंधी.

**श्वसनेंद्रिये :-** दीर्घ श्वास घ्यावासा वाटतो पण घेता येत नाही, त्यामुळे खोकला येतो. ***कोरडा अतिशय वेदनायुक्त खोकला;*** खोकला पोटातून येत आहे असे वाटते. खाण्यापिण्याने जास्त होतो; बाहेरून खोलीत आल्याने खोकला सुरू होतो; रात्री जास्त येतो. खोकला आला म्हणजे उठून बसणे भाग पडते; खोकताना छातीत टोचते. रक्ताचे धागे असलेला चिकट कफ– किंवा तांबुस कफ पडतो. न्युमोनिआ. ***छातीत एकदम टोचल्यासारख्या वेदना होतात*** किंवा **उजव्या तिकोनी हाडात टोचते**–प्लुरिसि. खोकताना छातीच्या मध्य भागी किंवा कुशी दाबून धराव्या लागतात.

**हृदय :-** ***नाडी भरलेली टणक,*** हृदयाच्या जागेत टोचते.

**पाठ :-** तिकोनी हाडांच्यामध्ये बधिरपणा किंवा दुखते–वेदना पोटाच्या खळीपर्यंत जातात किंवा डाव्या तिकोनी हाडापासून हृदयापर्यंत जातात. पाटीच्या खालच्या भागात ताठते व टोचते. कमरेत, चालताना, वळताना वाकताना जास्त दुखते.

**हातपाय** :– सांधे सुजलेले लाल कढत–आत टोचल्या किंवा फाडल्याप्रमाणे वेदना होतात, जरा हालचाल सोसत नाही. तळपायात सुया, टाचण्या बोचताहेत असे वाटते. त्यामुळे चालताना त्रास होतो. डावा हात व पाय एकसारखा हालत राहतो. कोपरे सुजतात. चालताना गुडघे लटपटतात व वाकतात.

**झोप** :– कष्टाची कामे करीत आहोत, घरची कामे किंवा नेहमीचा काम धंदा करीत आहोत अशी स्वप्ने पडतात. झोप लागताना दचकणे.

**त्वचा** :– बाहेर न पडलेला गोवर. कावीळ. केस अतिशय तेलकट. **विस्फोटक ज्वरात उगवण हळुहळु येते किंवा आलेली एकाएकी नाहिशी व्हावयास लागते.** त्वचा पिवळी, फिकट, सुजलेली, जलयुक्त.

**ज्वर** :– कोरडी कढत आग. थंडी वाजताना डोके कढत होते चेहरा लाल होतो– विशेषतः गरम खोलीत. वेदनायुक्त सतत ज्वर, टायफाईड. आंबुस तेलकट घाम येतो. रक्त गरम झाले आहे असे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *हालचाल–उठल्याने, शरीराचे भाग वर केल्याने; खाली वाकल्याने, श्रम; खोकताना; दीर्घश्वास घेतल्याने. अंग कढत झाल्याने. बंद खोलीत;* **उन्हाळ्यात अंग कढत असताना** गार पेये घेतल्याने. *मनःसंताप;* **स्पर्श;** भाज्या. आंबट पदार्थ; कॅलोमेल. सर्दी झाली असताना. पहाटे. ***खाण्याने.***

**ब** वा :– *दाबल्याने; वेदना होत असलेल्या* ***कुशीवर निजल्याने;*** पट्टा बांधल्याने. ***गार हवा. स्वस्थ असल्याने.*** आभाळ आलेले दमट दिवशी. पाठीवर निजल्याने; **गुडघे वर घेतल्याने.** शोथ आलेला भाग शेकल्याने. उतरताना. बसल्याने. गार अन्न, पेये.

**सहाय्यक औषधे** :– अब्रो; अल्युमि; कलि-का; लायको; ऱ्हस–टा; सल्फ; सेपि.

**संबंधी औषधे** :– फायटो.

---

## २२८. ब्रोमिअम Bromium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **कंठ;** ***श्वासोच्छ्वास;*** **हृदय; रुधिराभिसरण;** *गाठी, गालगुंड, गलगंड, रजःपिंड व स्तन यावर होतो. गाठी मोठ्या होण्याची प्रवृत्ति– गाठी टणक होतात पण क्वचितच पुवळतात.* अशक्तपणा. उष्णता सहन होत नाही त्याने घाम येतो व वारे लागलेले

सहन होत नाही. अति अंग तापल्याने उपद्रव उद्भवतात. सर्वांगात बारिक कंप.

**मानसिक** :– स्वतःच्या खांद्यावरून कोणीतरी पाहत आहे व मागे वळून पाहिले तर तो दिसेल असा भ्रम. भांडखोर. कोणी तरी मागे आहे असे वाटते. आनंदीवृत्ति; काहितरी मानसिक काम करावे असे वाटते. बेपर्वा. नेहमी-प्रमाणे चांगले वाटत नाही पण का ते समजत नाही.

**डोके** :– अर्धशिशी– ( डावी बाजू ) खाली वाकल्याने व विशेषतः दूध प्याल्या-नंतर जास्त होते. वाहते पाणी पाहिल्याने किंवा पुलावरून जाताना घेरी येते. डोक्यात रक्ताधिक्य होऊन डोके भरल्यासारखे वाटते व अर्धांगवात होईल की काय अशी भीती वाटते, उन्हात डोके दुखते, पण सावलीत गेल्याने थांबते.

**डोळे** :– अश्रू उत्पन्न करणाऱ्या ग्रंथींना सुजेमुळे डोळ्यातून पाणी येते. बाहुल्या रुंदावलेल्या. डोळे बटबटित, पुढे येतात.

**कान** :– गालगुंड सुजून टणक होतात, स्पर्श केल्याने गरम लागतात.

**नाक** :– **सर्दी, नाकातून जळजळीत करपडणारा स्राव येतो.** नाकातून रक्त पडण्याची प्रवृत्ति. नाकात कोळिष्टके चिकटली आहेत असे वाटून गुदगुल्या होतात व चुणचुणते. नाकाच्या पाळ्या आत बाहेर हलतात. नाकातून रक्त पडल्याने छातीतील विकार कमी होतात.

**चेहरा** :– निमुळता होऊन नाकाशी एकत्र गोळा झाला आहे असे वाटते. कोळिष्टके चिकटली आहेत असे वाटते.

**तोंड** :– येते व त्यावेळेस डोळ्याचे विकार उद्भवतात. कोरडे, भाजल्यासारखे.

**घसा** :– गिळताना दुखतो. टानसिल सुजलेल्या, गडद लाल व त्यावर फुगलेल्या शिरांचे जाळे दिसते. पेये गिळताना घट्ट अन्नापेक्षा जास्त दुखतो. लहानसे गलगंड असले तरी गुदमरल्यासारखा त्रास होतो.

**जठर** :– काफीच्या बुकटीप्रमाणे ओकावयास होते. ओकारीत रक्तमिश्रित कफ पडतो. आंबट पदार्थ सोसत नाहीत. कढत अन्नपेयाने जठरात वेदना होतात. जठरशूल खाण्याने कमी होतो. व्रण. जिभेपासून जठरापर्यंत आगीचा चटका बसतो.

**उदर** :– *नगाऱ्याप्रमाणे फुगलेले. शिंपातील मासे व आंबट पदार्थ खाल्ल्याने हगवण लागते. मूळव्याध अतिशय दुखते, रक्त पडते, कोंबट किंवा गार* पाणी लागल्याने जास्त होते.

**पुरुषजननेंद्रिये** :– अंड सुजतात, मोठे व टणक होतात, जरा धक्का लागला की दुखतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– योनीतून वारे सरते व आवाज होतो. रजःपिंड सुजतात. विटाळात श्लेष्मल त्वचेचे तुकडे पडतात. स्तनातील करटे–आत टोचते ( डाव्या ). स्तन ते खाकेपर्यंत टोचते. स्तनाला कॅन्सर झाला म्हणजे विटाळ बंद होतो.

**श्वसनेंद्रिये** :– श्वास आत घेताना गार लागतो, चुणचुणतो किंवा धूर आत आहे असे वाटते. फुप्फुसात लव जमली आहे असे वाटते. **दीर्घश्वास घ्यावासा वाटतो** पण त्याने खोकला येतो. **मधुन मधुन गुदमरल्यासारखे वाटते. गुदमरल्यासारखे** वाटून दचकून उठावे लागते नंतर **घरघरल्यासारखा खोकला येतो** किंवा छातीत धडधडते. कंठाचा घटसर्प. कंठ आचके बसून आवळल्यासारखा वाटतो. **सर्दी कंठात** सुरू होऊन **वर** नाकात **येते** आणि खाली छातीत जाते. दमा–श्वास घेववत नाही. फुप्फुसे धुराने भरली आहेत असे वाटते. दाट पांढरा कफ. खलाशाना समुद्र काठावर उतरल्यानंतर दमा होतो. आवाज बसतो, अंग तापल्याने जास्त. पांढरा दाट कफ. दमा लागला म्हणजे खूप घाम येतो.

**हृदय** :– अति व्यायाम करणारांचा हृदयविकार. हृदयाची अवास्तव वाढ होऊन धडधड होते, डाव्या कुशीवर निजल्याने जास्त होते. धडधड होताना मळमळते व डोके दुखते.

**हातपाय** :– हाडात उकरल्याप्रमाणे वेदना होतात. पुढील हात बर्फासारखे गार किंवा नुसते पंजे गार.

**झोप** :– सकाळी उठल्यानंतर अशक्तपणा वाटतो व अंग कापते. श्वासाच्या विकारात एकसारख्या जांभया येऊन गुंगी येते.

**त्वचा** :– यौवनपीटिका, पुटकुळ्या व पुवळलेले फोड. हातावर व चेहऱ्यावर गळवे येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *दमट उष्णता*; **अंग तापल्याने**; खोलीत; अंग तापलेले असताना, गारठल्याने; समुद्रस्नानाने; धुळीने; वारे लागल्याने; संध्याकाळी; मध्य रात्रीपर्यंत. डाव्या कुशीवर निजल्याने, तंबाखूचा धूर नाकात गेल्याने.

**ब वा** :– समुद्रकाठी; नाकातून **रक्त गेल्याने ( घेरी डोक्याची व छातीची** लक्षणे ) हालचाल. हजामत, दाढी केल्याने.

**संबंधी औषधे** :– लॅके; सॅम्बु.

---

## २२९. मर्क्युरिअस (पारा)

### Mercurius Solubilis & Vivus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **रक्त**; श्लेष्मल त्वचा; *गाठी*–तोंडातील *लाळेच्या, टान्सिल, यकृत*, मूत्रपिंड; *जननेंद्रिये*; सांधे; हाडे व त्वचा यावर होतो. अनेक प्रकारची लक्षणे होतात. शरीर डळमळीत, **कंपयुक्त,** अशक्त व **एकसारखा घाम येणे.** जलोदर, नाळगुद. सूज, लाली; ज्या भागात रक्ताधिक्य होते तो भाग निळसर होतो. **हुळहुळेपणा.** ***स्राव भरपूर–पातळ, बुळबुळीत, करवडणारे,*** जळजळीत, दुर्गंधी, दाट, **हिरवट पिवळे. गळू होण्याची प्रवृत्ति**–पू रक्तमिश्रित, पातळ, हिरवट. **व्रण. गाठी** सुजतात, मोठ्या होतात-गालगुंड, खाकेतील, जांघातील वगैरे. पित्तप्रकृति. संधिवात–गरमी. हवेतील फरक मोजण्याचे मानवी यंत्र. अनुवंशिक गरमी· मुळे उद्भवलेले दुष्परिणाम, मोठाले भाजल्यासारखे फोड, गळवे, मुडदुस, तान्ह्या मुलांचे नाक चोंदणे, हाडांची सूज. शरीरात स्राव साखळण्याची प्रवृत्ति, शारीरिक हालचाल व मानसिक वागणूक अनिश्चित. वेदना एकाच ठिकाणी जाणवतात. थंडी व उष्णता सहन होत नाही. प्रत्येक वस्तू आखुड आहे असे वाटते. **अशक्त, थकलेला व केव्हाही शक्तिपात होण्याची तयारी**-खारटपणा, चव, ओठांचा कफ वगैरे. घाम तेलकट. पंगुवात. कंपवात शरीर गोड पदार्थाचे बनले आहे असे वाटते. लुले पडलेल्या भागात वेडीवाकडी हालचाल. कंप, थरथर. **दुर्गंधी,** तोंड, स्राव, शरीर. लाली. पिवळेपणा, डोळ्यांचा, दाताचा, स्रावाचा नाकातील. भीती, परमा बंद केल्यामुळे उद्भवलेले दुष्परिणाम. आग. नांगी मारल्याप्रमाणे वेदना.

**मानसिक** :– **उतावीळ,** बावरट. मनात येईल ते करून टाकण्याचे वेड. आततायी प्रकाराची कृत्ये करणे. आत्महत्या किंवा दुसऱ्याचा खून करण्याचा प्रयत्न करणे. पुढे काहीतरी भयंकर गोष्ट घडणार असें वाटून अस्वस्थ होणे व काळजी करणे. विचारलेल्या प्रश्नाची उत्तरे सावकाश देणे. आपली विचार-शक्ति व बुद्धि नष्ट होत आहे असे वाटणे. तोतरे बोलणे, जलद बोलणे. विसरभोळेपणा. शारिरिक व मानसिक घाणेरडेपणा. किळस येण्यासारखी, मूर्खपणाची, खोडसाळ कृत्ये करणे. अस्वस्थ, एके ठिकाणी बसवत नाही. वारंवार जागा बदलणे. सर्व गोष्टींचा तिटकारा, खावेसेसुद्धा वाटत नाही. कोणाचे तरी नाक ओढण्याची प्रवृत्ति. अकाली प्रौढत्व.

**डोके** :– डोक्याचे कातडे ताणल्यासारखे वाटते त्यामुळे डोक्याभोवती पट्टा बांधला आहे असे वाटते. पाठीवर निजल्याने घेरी येते. डोके दुखत असताना कान व दात दुखतात. डोके दुखताना डोके तापते. मेंदूत पाणी साचते त्यामुळे मूल एकसारखे डोके इकडे तिकडे फिरविते व कण्हते. हाडावर हाड वाढते. मेनिन्जायटिस. तेलकट घाम.

**डोळे** :– पापण्यांच्या कडा सुजून त्यावर खपल्या बसतात. डोळे एके ठिकाणी ओढल्यासारखे वाटतात. उजेड सहन होत नाही विशेषतः दिव्याचा, विस्तवाचा. डोळ्यातून भरपूर जळजळीत, करवडणारा स्राव येतो. डोळ्यापुढे माशा तरंगत आहेत असे वाटते. सर्दी झाल्यामुळे डोळे येतात. पापण्या घट्ट मिटलेल्या.

**कान** :– दाट पिवळा स्राव, दुर्गंधी, रक्तमिश्रित. कानात टोचते–रात्री, अंथरुणाच्या उबेने जास्त. अंग तापल्याने ऐकू कमी येते. कानावर गळवे येतात.

**नाक** :– शिंका येतात, उन्हांत शिंका येतात. नाक जड होते, सुजते–हाडे कुजतात, व्रण पडतात, दुर्गंधी हिरवा शेंबूड येतो. पिनस. **सर्दी खालून वर येते**- शिंका येतात-नाकात हुळहुळे होते व चुणचुणते, भरपूर पाणी गळते. **नाडपुड्या मळकट** लाल, हुळहुळ्या. खोकताना, झोपेत, नाकातून रक्त येते. रक्ताचे काळे धागे लोंबतात. सर्दी नसताना वारंवार शिंका येतात. लाल, करवडलेल्या घाणेरड्या नाकांची मुले

**चेहरा** :– फिकट, मळकट; डोळ्याखाली फुगीर. **गाल सुजलेले**, लाल, कटत. जबडे दुखतात.

**तोंड** :– **दात दुखताना कानात** व घशात दुखते. ओठ खारट होतात, उजव्या कोपऱ्यात भेगा पडतात. **हिरड्यातून रक्त येते**, त्या सुजतात, दुखतात व वेडाबाकड्या होतात. हिरड्यांचे गळू. दात सैल, पोकळ, काळे व दुखतात– कटत किंवा गार पाण्यानी किंवा रात्री जास्त. **लाळ वाढते–ती झोपेत गळते**- लाळ पिवळी, रक्तमिश्रित व वाईट चवीची असते. तोंड येते. जीभ रुंद विसविशित ***व दाताचे ठसे पडलेली. चव तांब्याच्या धातूप्रमाणे***, गोडुस जिभेवर बुंध्यापासून शेंड्यापर्यंत मध्यभागी खळी पडते. तोंडाला घाण येते, टाळा खाजतो. तोंड ओले असूनसुद्धा तहान लागते. जिभेच्या कंपामुळे बोलताना त्रास होतो. तोतरे बोलणे. जिभेखाली व्रण पडतात; लाल गोळा येऊन लाळ गळते.

**घसा** :– टानसिल सुजतात. एकसारखे गिळावेसे वाटते, घसा ***हुळहुळा***. आत काटा, पी. अडकली आहे किंवा काही तरी लोंबत आहे असे वाटते. व्रण पडतात–गिळताना कानापर्यंत टोचते. टानसिल सुजून आत पू होतो, व त्यामुळे गिळताना त्रास होतो. घशात कढत वाफ येत आहे अशा तऱ्हेने आग होते. गिळलेले पाणी नाकातून येते. घशातून कफाचे गोळे खाकरून काढावे लागतात. घशात काहीतरी वर येत आहे असे वाटून ते परत गिळावेसे वाटते.

**जठर** :– कुजकट ढेकरा. अतिशय तहान लागते, थंड पेये प्यावीशी वाटतात. पचन क्रिया मंद तरीपण एकसारखे खावेसे वाटते. मांस, कॉफी, तेलकट पदार्थ, लोणी यांचा तिटकारा. दूध व गोड पदार्थ सोसत नाहीत. पोट नेहमी भरल्या भरल्यासारखे वाटते किंवा आवळल्यासारखे वाटते. कपट ढेकरा येतात.

**उदर** :– **यकृत हुळहुळे.** यकृताला सूज येऊन आत गळू होते, यकृत टणक होते. **कावीळ.** आतडी शिथिल झाल्यासारखी वाटतात त्यामुळे उदर धरून ठेवावे लागते. जांघातील गाठी सुजलेल्या, पुवळतात, बद्ध. ***शौचास*** – थोडे, रक्ताचे, **हिरवी आव,** राखेसारखे पांढरे, जळजळीत व वेदना होऊन होते. शौचास झाल्यानंतर पुन्हा होईल होईलसे वाटते किंवा थंडी वाजते. शौचास व लघवीस एकाच वेळेस होईल होईलसे वाटते. शौचास झाले आहे असे समाधान वाटत नाही. शौचानंतर गुदद्वार बाहेर येते. आव. सर्दी झाली म्हणजे जांघेतील गाठी मोठ्या होतात.

**मूत्रेंद्रिये** :– पाणी पिण्याच्या मानाने लघवीला जास्त होते. लघवी वारंवार व थोडी होते, लघवी झाल्यानंतर आग होते. लघवीतून अल्बुमिन जाते. लघवी काळी, रक्तमिश्रित.

**पुरुषजननेंद्रिये** :– शिश्नाची बोंडी किंवा वरील कातडे सुजते. बोंडीतील मूत्रमार्गाचा भाग लाल होतो. **इंद्रियांचा शोथ**–त्याना ओढावेसे वाटते. इंद्रिये गार झाली आहेत असे वाटते. गरमीचे व्रण. परमा. वीर्य रक्तमिश्रित. अंड सुजून मोठे व टणक होतात. लघवी झाल्यानंतर मूत्रमार्गाची आग होत असल्यामुळे मुले व मोठी माणसे इंद्रिय ओढतात. भाजल्यासारखे फोड.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ सुरू होताना शक्तिपात होतो आणि मूर्च्छा येते. विटाळ भरपूर जातो, त्यावेळेस उदरात दुखते. धुपणी दाट, पांढरी, करवडणारी, हिरवट, रक्तमिश्रित. लघवी करताना धुपणी जाते, संभोग केल्याने कमी होते.

योनीत आग होते व कंड सुटते विशेषतः लघवीनंतर, गार पाण्याने धुतल्याने बरे वाटते. रजःपिंडात नांगी मारल्याप्रमाणे वेदना होतात. विटाळसेपणी अंगावर गळवे येतात, नंतर नाहीशी होतात. लहान मुलींची धुपणी त्यामुळे मुलगी अशक्त होते. निवळ अशक्तपणामुळे वाळा होण्याची प्रवृत्ति. विटाळसे-पणी स्तनात दूध येते. गरोदर नसलेल्या स्त्रियांच्या स्तनात दूध येते किंवा कित्येक वेळा विटाळाऐवजी मुलींच्या स्तनात दूध येते. मुलांच्या स्तनात येते. स्तन सुजतात, टणक होतात व आत व्रण पडल्याप्रमाणे वेदना होतात. स्तनाचा व गर्भाशयाचा कॅन्सर. स्तनाखाली (उजव्या) वेदना होतात व त्या पाठीत तिकोनी हाडापर्यंत जातात. दूध बिघडलेले. योनि व गर्भाशय बाहेर येते, संभोग केल्याने कमी होते. अतिशय विटाळ जात असल्यामुळे आलेले वंध्यात्व. सहज संभोग केला तरी तात्काळ गर्भ राहतो.

**श्वसनेंद्रिये** :– खोकला–एका मागून एक अशा दोन वेळा ठसका लागतो, खोकला रात्री कोरडा असतो, दिवसा पिवळा–हिरवा कफ पडतो. छातीत बुडबुडे किंवा वाफ आल्यासारखी वाटते. डांग्या खोकल्यात नाकातून रक्त पडते. तंबाखू ओढल्याने खोकला जास्त होतो. न्युमोनिआत काबीळ होते. डाव्या कुशीवर निजल्याने श्वासोच्छ्वास घेण्यास त्रास होतो, उजव्या कुशीवर निज-ल्याने खोकला जास्त होतो.

**हृदय** :– कंपित झाले आहे असे वाटून जाग येते. अगदी थोड्या श्रमाने धडधडते.

**मान पाठ** :– **मान ताठलेली.** मानेतील गाठी मोठ्या होतात. गुदाच्या हाडात फाडल्यासारख्या वेदना होतात, उदरावर दाबल्याने बरे वाटते. वीर्यपात झाल्यानंतर पाठीत आग होते. पाठीच्या उजव्या तिकोनी हाडापासून पुढे छातीत दुखते.

**हातपाय** :– हातापायाना कंप; हाताची बोटे बधिर. कलायखंजवात. पावलाना गार घाम येतो विशेषतः सकाळी अंथरुणात. बाळंतपणानंतर पायाला पांढरी सूज येते. टाचा गार. विशेषतः रात्री हाडात वेदना होतात, त्यामुळे उठून चालणे भाग पडते, पायांना व पाऊलांना जलयुक्त सूज येते. वीर्यपात झाल्या-नंतर पंजे बर्फासारखे गार होतात.

**त्वचा** :– **पिवळी**, नाजूक, करवडून लाल होते. उगवणीवर ओलसर खपल्या बस-तात. व्रण–पसरत जाणारे, उथळ, वेडेवाकडे, आतून रक्त येते, कापल्याप्रमाणे वेदना होतात वगैरे. आतील मांस वाढल्यामुळे फुगीर दिसतात. नेहमी

त्वचा ओलसर असते; घाम येण्याची प्रवृत्ति असली तरी घाम आल्याने बरे वाटत नाही. मुख्य उगवणीच्या भोवती पुटकुळ्या येतात.

**ज्वर** :– एखाद्याच भागात **उष्ण लाटा** आल्यासारखे वाटते–छातीत, डोके. **शरीरात खळबळ होऊन अस्वस्थपणा येतो, थोडया श्रमाने जास्त होतो.** थंडी बाधते, उन्हाळा सोसत नाही. थंडी व ताप आलटून पालटून मुंग्या आल्याप्रमाणे अंगाला शहारे येतात. ***सहज भरपूर घाम येतो* –पण त्याने बरे वाटत नाही.** वेदना होताना घाम येतो. घाम तेलकट, दुर्गंधी, आंबुस, दरवळणारा, गोड्स वास येतो व त्याने न धुवून जाणारे पिवळे डाग पडतात. डोक्याला व छातीला घाम येतो. रात्री घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***रात्री***, रात्रीची हवा. ***घाम येताना. उजव्या कुशीवर निजल्याने. अंग तापल्याने*–अंथरुणाच्या उबेने**, विस्तवाने. ***वारे लागल्याने***–डोक्याला; **हवेतील फरकाने**–आभाळ आलेले असताना, **दमट हवेत**, सर्दी झाल्याने. **उष्णता व थंडी**. पाय भिजल्याने. **विस्तवाचा उजेड.**

**क मा** :– समशीतोष्ण हवा. संभोग केल्याने. विश्रांती

**सहाय्यक औषधे** :– आरम-मे; बेला; सल्फ सिलि; सेले; हेपार.

**संबंधी औषधे** :– कलि–आयो.

---

## २३०. मर्क्युरिअस आयोडेटम फ्लेव्हम

### Mercurius Iodatum Flavam

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***घसा*–उजवी बाजू; उजवी बाजू** व गाठी याबर होतो. गांठी मोठ्या होतात मानेच्या वगैरे. गरमी. लक्षणे उजवीकडून डावीकडे जातात. स्तनात गाठी होतात.

**मानसिक** :– आनंदी, उल्हासी, बडबड.

**डोके** :– **उठताना ( खुर्चीवरून ) मूर्च्छा येते किंवा घेरी येते.** कपाळात ठणका लागून नाकाच्या बुध्याशी दुखते, मन व शरीर कामात गुंतविल्याने बरे वाटते. हृदयात वेदना झाल्यानंतर डोके दुखावयास लागते.

**डोळे** :– बुबुळ ओरखडल्याप्रमाणे किंवा चिमटल्यासारखे दिसते. डोळ्याखाली काळी वर्तुळे येतात. उजव्या डोळ्याखाली सूज येते.

**कान** :– एकदम कानात चमका मारतात, स्पर्शाने जास्त होतात.

**नाक** :– मागील भागातून घशांत शेंबुड उतरतो त्यामुळे खाकरावे लागते.

**तोंड** :–झोपेत दातखिळी आवळल्यामुळे सकाळी जबडे दुखतात. दात शिवशिवतात, उष्णतेने, थंडीने किंवा गोड पदार्थाने जास्त. हिरड्यातून पू येतो. **जिभेवर ओलसर तवंग आल्याप्रमाणे थर येतो किंवा** ***बुंध्याशी पिवळा*** **थर** येतो, टोक व कडा लाल. दातांवर दात आवळावेसे वाटतात. दातातील वेदनामुळे जबडे ताठून दुखतात.

**घसा** :– **दुखतो** (उजवी बाजू नंतर डावी). टानसिल सुजलेल्या. गार पेयाने बरे वाटते. **टानसिलचा शोथ.** एकसारखे गिळावेसे वाटते. नाकाच्या घशातील भागातून कफाचे गोळे खाकरून काढावे लागात.

**जठर** :– आत पोकळ, गळून गेल्यासारखे वाटते. अन्नाच्या वासामुळे किंवा पाहिल्याने मळमळते.

**उदर** :– हृदयांत वेदना होताना उदरात वेदना होतात. शौचाचे वेळी किंवा तसाच गुदद्वारातून काळा स्राव जातो. शौचास होण्याचे अगोदर ओटीपोटात गळून गेल्यासारखे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी भरपूर; काळी, लाल, किंवा कमी होते.

**पुरुषजननेंद्रिये** :– गरमीचे व्रण, वेदनारहित. जांघातील गाठी मोठ्या होतात पण त्या पिकत नाहीत.

**स्त्रीजननेंद्रिये** :– मुलीची ( लहान ) पिवळी धुपणी. स्तनात गाठी येऊन खाकेत गाठी येतात, निळया होतात, गरम घाम येतो व पचनक्रिया बिघडते.

**हृदय** :– हृदयात दुखते नंतर डोक्यात दुखावयास लागते. धडधड व दम लागतो पाठीवर निजल्याने जास्त.

**मान** :– गाठी मोठ्या होतात. गलगंड, त्यामुळे गुदमरल्यासारखे वाटते.

**हातपाय** :– गुडघे बधिर. लिहिताना उजव्या हातात दुखते.

**त्वचा** :– चरस्या चामखिळी.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **वासाने.** उभे राहताना किंवा शरीराचा भाग वर करताना. गरम पेयें. डाव्या कुशीवर निजल्याने. गार, दमट हवा. स्पर्श.

**ब वा** :– मोकळी हवा.

**संबंधी औषधे** :– मर्क्यु; लायको.

---

## २३१. मर्क्युरिअस आयोडेटम रुब्रम

Mercurius Iodatum Rubrum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *घसा*; **गाठी, डावी बाजू** यावर होतो. गाठी सुजून **टणक होतात.** मानेतील गाठीचा शोथ. जीर्ण पू वाहणारे गरमीचे वद. गरमीचे व्रण. वेदना इकडून तिकडे फिरतात; संधिवातात. तान्ह्या मुलाना होणारी सर्दी. २×, ३×, शक्तीचे औषध झोपण्याचे अगोदर घेतल्याने दम्याला प्रतिबंध होतो.

**मानसिक :–** संत्रस्त. रडावेसे वाटते.

**डोके :–** डोक्याचा मागील भाग जड होऊन दुखतो. कपाळ दोरीने बांधल्यासारखे वाटते.

**डोळे :–** खुपऱ्या.

**कान :–** कर्णनलिका बंद होते, एकदम आत आवाज होऊन सुटते.

**नाक :–** सर्दी झाली असताना उजवी बाजू कढत होऊन सुजते.

**चेहरा :– गालाचे उंचवटे हुळहुळे** होतात व ठणकतात.

**तोंड :–** ओठ चिकट बुळबुळीत विशेषतः जागे झाल्यानंतर. जीभ सुरकुतलेली, बुंध्याशी ताठते, हालचालीने दुखते.

**घसा :– काळसर लाल. *हुळहुळा*.** टानसिल व मानेतील गाठी मोठ्या होतात. आत गोळा आहे असे वाटते, त्यामुळे सारखे खाकरावे लागते. जिभेचा बुंधा, घसा व मान ताठते. घशातून कफ खाकरावा लागतो. पडजीभ लांब होते. घटसर्प, जबड्याखालील गाठी सुजून दुखतात.

**जठर :–** खारट अन्न खाण्याची वासना.

**मूत्रेंद्रिये :–** मूत्रमार्गात टणकपणा.

**पुरुषजननेंद्रिये :–** गरमीचे व्रण. जांघेतील गाठी मोठ्या होऊन पुवळतात व लवकर बऱ्या होत नाहीत. अंड ( डावे ) मोठे होते.

**स्त्रीजननेंद्रिये :–** हिरवी करवडणारी भरपूर धुपणी जाते. गर्भाशयाची टणक गुल्मे.

**श्वसनेंद्रिये :–** दमा. जरा अंग भिजले की घसा बसतो.

**मान :–** ताठते.

**हातपाय :–** तळहातावर ओलसर भेगा पडतात.

**त्वचा :–** त्वचेवर बारीक लहान भेगा पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** नुसता गुटका गिळताना. झोपेनंतर. हवेतील फरक. फरशी धुतल्याने. अंग भिजल्याने.

**संबंधी औषधे :–** लॅके.

---

## २३२. मर्क्युरिअस कोरोसिव्हस (रसशेंदूर)

### Mercurius Corosivus

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम गुद; मूत्राशय; डोळे; घसा; गळा; पडजीभ; मूत्रपिंड, हाडे ( चपटी ) यावर होतो. लक्षणांचे स्वरूप तीव्र असते. अंतर्गत आग– घशात, जठरात, गुदात, मूत्राशयाच्या मुखात; मूत्रपिंडात वगैरे. शोथ आल्यानंतर भाग सुजून आवळल्यासारखा होतो. आवळल्यासारखे वाटते– घशात, गुदात, मूत्राशयात वगैरे भेगा पडतात– तळहात, तळपाय, तोंडाचे कोपरे. स्राव करवडणारे जळजळीत– नाकातील पाणी, डोळ्यातील पाणी वगैरे. चिघळत जाणे– व्रण वगैरे. गरमी.

**मानसिक :–** चिंतातुर, अस्वस्थ, जोराने डोलावेसे वाटते. विचार करवत नाही. बोलताना अडखळणे. बावळ्याप्रमाणे वागणे. बोलत असलेल्या व्यक्तीकडे एकसारखे टक लावून पाहणे पण ती व्यक्ती काय बोलत आहे ते समजत नाही.

**डोके :–** कानशिले ठणकतात– तिरळे पाहिल्याने जास्त.

**डोळे :–** उजेड अगदी सहन होत नाही. डोळे हुळहुळे होतात व अतिशय आग होते. पापण्या पाण्याने भरल्याप्रमाणे दिसतात व लाल होतात. फूल पडते. डोळ्यातून करवडणारे पाणी येते. पापण्या सुजून फुगतात, लाल होतात व करवडतात. नुकत्याच उपजलेल्या मुलांचे डोळे येतात. वस्तु लहान दिसतात.

**नाक :–** नाकातून शेंबडाप्रमाणे स्राव वाहतो. नाक सुजलेले लाल. नाकात व्रण पडतात, मधल्या पडद्याला भोक पडते. पिनस. जळजळीत पाणी येते.

**कान :–** कानात जोराने ठुसठुसते. दुर्गंधी पू येतो.

**चेहरा :–** लाल, फुगीर, सुजलेला. ओठ काळे, सुजलेले.

**तोंड** :– **तोंडाभोवती फिकटपणा.** जीभ चट्टे पडल्याप्रमाणे-लाळ येते. दात रात्रीचे जास्त दुखतात. पडजीभ लाल, सुजलेली. **चव** तुरट, खारट, कडू. तोंड येते व्रण पडतात. आग होऊन भाजल्यासारखे वाटते. हिरड्या निळ्या, सुजलेल्या, स्पंजप्रमाणे. हिरड्यातून पू येतो.

**घसा** :– लाल सुजलेला व दुखतो ( डावी बाजू )– उष्णतेने जास्त होतो. कानात चमका मारतात, गिळताना ( दाबल्याने ) जास्त. *गिळवत नाही.* घसा सुजल्यामुळे अतिशय आग होते, बाहेरचा स्पर्श सहन होत नाही. पडजीभ लाल, सुजलेली; लांब होते. गळ्याभोवती सर्व गाठी सुजतात. टानसिल मोठ्या होऊन त्यावर व्रण पडतात.

**जठर** :– तहान लागते, कितीही पाणी प्याले तरी समाधान होत नाही. ओकारीत कफ व रक्त पडते. जठराचा शोथ–जठर फुगते व त्याला स्पर्श सहन होत नाही. पोटाच्या खळीत पेटके येतात. ढेकरा बरोबर तुरट अन्न, पेये वर येतात.

**उदर** :– फुगलेले, स्पर्श सहन होत नाही. **आतड्यात कापल्याप्रमाणे वेदना** होतात. वात धरल्यामुळे उदरात दुखते. **एकसारखे शौचाला व लघवीला** होईल होईल असे वाटते. *शौचास झाल्याचे समाधान वाटत नाही* ( झाले की पुन्हा लागते. ) *शौचास, थोडे, रक्ताचे धागे असल्या-प्रमाणे किंवा आम पडतो व शौचास होताना कुंथावे लागते व असह्य वेदना होतात*; नुसते रक्त पडते. किंवा रक्तासारखे पाणी पडते. आव. संभोग करताना गुदात आचके येतात. शौचास कढत होते.

**मूत्रेंद्रिये** :– *लघवी कढत व थेंब थेंब होते* किंवा थोडी होते, वारंवार जावे लागते किंवा गळते, विशेषतः बसल्याने. लघवी झाल्यानंतर मूत्रमार्गातून रक्त येते. मूत्राशयाचा शोथ, मूत्रपिंडाचा शोथ, लघवीतून अल्बुमिन जाते विशेषतः गरोदरपणी.

**पुरुषजननेंद्रिये** :– परमा. बोंडीवरची कातडी मागे सरकत नाही. गरमीचे व्रण. शिश्न व अंड सुजून मोठे होतात, परम्यात हिरवा दाट स्राव जातो. शिश्न वेदनायुक्त ताठते, विशेषतः झोपेत.

**स्त्रीजननेंद्रिये** :– धुपणी फिकट, पिवळी, खावाला गोडुस पण किळसवाणी घाण येते. स्तनाग्राच्या वरच्या जागेत गाठी येतात.

**श्वसनेंद्रिये** :– धातूच्या नळीतून श्वासोच्छ्वास घेत आहोत असे वाटते. छाती आवळल्यासारखी वाटून **श्वास बरबर** चालतो. कंठात कापल्यासारखे वाटते.

**पाठ** :– मणके कुजतात, पाटीवर गुडघे वर करून निजावे लागते.

**हातपाय** :– वरचा हात शिथिल झाल्यासारखा वाटतो. पाय बधिर होतात. आवेत पोटऱ्यात पेटके येतात. हातपाय लुळे पडतात, कापतात.

**त्वचा** :– गार. खोल चरत जाणारे व्रण पडतात.

**ज्वर** :– त्वचा गार, शौचानंतर शहारे येतात. **प्रत्येक हालचालीने घाम येतो.** घाम दुर्गंधी. घाम रात्री येतो किंवा एखाद्या भागाला येतो कपाळ, पाय वगैरे. वाकताना अंग तापते, उठताना गार होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो**।– ***शौचास व लघवीला झाल्यानंतर***. गिळताना. रात्री. **थंडी शरदऋतु**.. उष्ण दिवस व गार रात्री. आंबट पदार्थ.

**ब वा** :– विश्रांति.

**संबंधी औषधे** :– आर्से; कॅन्था.

---

## २३३. मर्क्युरिअस डल्सिस (रस कापूर)

### Mercurius Dulcis

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम. **कान; कर्णनलिका**; टानसिल; **यकृत**; आतडी; **श्लेष्मल त्वचा** यावर होतो. **शरीर थिसथिशीत फिकट व फुगीर**-पित्त प्रकृति. श्लेष्मल त्वचा फिकट. जलयुक्त सूज–हृदय व मूत्रपिंड या दोघांच्या विकारामुळे आलेली, विशेषतः कावीळ असली तर. या औषधाने शरीरात साखळलेले स्राव जिरतात. सतत पित्तज्वर.

**डोके** :– डोक्याची कातडी दुखते. मेनिन्जायटिस.

**डोळे** :– भरभर पापण्या मिचकावणे.

**कान** :– कर्णनलिका बंद होते. ( कफाने ) त्यामुळे बहिरेपणा येतो. सर्दी झाली की बहिरेपणा येतो. कानातील पडदा आत जातो, जाड होतो.

**नाक** :– नाकातून शिंकरताना गोळे पडतात.

**तोंड** :– जीभ टणक. लाळ वाढलेली. तोंडाला घाण येते. काळसर दुर्गंधि एकसारखी लाळ गळते.

**घसा** :– टानसिल सुजलेली ( उजवी ), **गार पेयाने बरे वाटते**, गिळताना त्रास होतो.

**जठर** :– लहान मुलांची थांबुन थांबुन बऱ्याच दिवसानी होणारी ओकारी.

**उदर** :– जळजळीत गवतासारखे हिरवे जुलाब होतात– तान्ह्या मुलांना. आव– थोडी थोडी रक्तमिश्रित चिवळी आव पडते. गुदद्वार हुळहुळे होते व आग होते.

**पुरुषजननेंद्रिये** :– परमा एकदम थांबविल्यामुळे मूत्रग्रंथीना आलेली सूज.

**श्वसनेंद्रिये** :– बुळबुळीत पुवळलेला कफ. प्लुरिसी.

**त्वचा** :– तांबुस रंगाची उगवण. विसविशीत

**ज्वर** :– घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– आंबट पदार्थ.

व वा :– गार पेय.

**संबंधी औषधे** :– कलि-मू.

---

## २३४. मर्क्युरिअस सायानेटस Mercurius Cyanatus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *तोंड*; *घसा*; कंठ, गाठी यावर होतो. जलद लवकर अतिशय **थकवा येतो**. कंप, अंग गार व निळसर, **दुर्गंधी**. सुजलेला भाग जलद कुजावयास लागतो. रक्तस्राव– रक्त पातळ काळे. घशात व कंठात कापल्याप्रमाणे वेदना होतात. घशात दाट पांढरा किंवा राखी रंगाचा पापुद्रा येतो– घटसर्प ( सेप्टिक ). घटसर्प प्रतिबंधक म्हणून या औषधाचा परिणाम होतो. टानसिल मोठ्या होतात. **हृदय अशक्त. घाम** येतो. एकसारखी उचकी लागते. पायातील शिरा वेड्यावाकड्या होऊन फुगतात व स्पर्श केल्यास अतिशय दुखतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– गिळताना. बोलताना. खाताना,

**संबंधी औषधे** :– लॅके.

---

## २३५. मॅग्नेसिआ कार्बोनिका Magnesia Carbonica

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम गालाचे उंचवटे; जठर; आतडी; यकृत; चेहरा व दात यावर होतो. आजारी थकलेले इसम. शरीर **विसविशीत** आंबट–वास सर्वांगाला, चव, ढेकरा, फेसाळ ओकारी, **शौच वगैरे. शरीर**

वाळलेले. मुडदुस. तीव्र कळा येतात त्यामुळे चालणे भाग पडते. भाग बधिर व फुगल्याप्रमाणे वाटतात. मानसिक किंवा शारीरिक आघात, सांसारिक काळज्या यानी अकाली थकलेल्या स्त्रिया. विटाळ थांबण्याचे वयात किंवा गरोदरपणी होणारे उपद्रव, अकलदाढ येताना होणारे उपद्रव. लहान मुले व तान्ही मुले यांचे विकार. कोरडेपणा- डोळे, नाक, त्वचा वगैरे. रात्रीपेक्षा सकाळी उठल्यानंतर जास्त थकल्यासारखे वाटते. सर्व शरीर दुखते व थकल्यासारखे वाटते, पाय व पाऊले जास्त. वेदना होताना उठून चालणे भाग पडते. शरीर वाळते, मुडदुस- मुले औषधे व चांगले अन्न देऊनसुद्धा सुधारत नाहीत. उभे असताना किंवा चालताना एकाएकी वारंवार पडणे; फेफरे. पंज्यावर पांघरूण सहन होत नाही, पण ते दूर केले की गार पडतात. शारीरिक व मानसिक आघात, मानसिक संत्रस्तपणा, राग, संताप, अतिशय काळजी, अयोग्य रीतीने अन्न पेये घेतल्याने, दूध, दांत येताना होणारे दुष्परिणाम, क्षुद्र गोष्टी सहन होत नाहीत.

**मानसिक** :- सर्व दिवसभर काहीतरी अपघात घडणार आहे असे वाटून अंग कापते, चिंता वाटते, भीती वाटते, झोपण्यास गेले म्हणजे बरे वाटते.

**डोके** :- मेंदू जड. घेरी-उभे रहावत नाही. रस्त्याने झोकांडे जातात व आपण लोकांच्या अंगावर पडू अशी भीती वाटते. गुडघे टेकल्याने घेरी येते. डोके दुखत असताना केस ओढल्यासारखे वाटतात. दमट हवेत डोके खाजते. मुडदुस झालेल्या मुलाचे डोक्याचा मागील उंचवट्याचे हाड आत जाते.

**डोळे** :- कोरडे-पापण्या चिकटतात, उघडताना त्रास होतो. काळे ठिपके दिसतात. डोळे मोठे झाल्यासारखे वाटतात, दाबलेले सहन होत नाही.

**कान** :- एकदम बहिरेपणा येतो. आतील भाग ताणल्यासारखा वाटतो. बधिर.

**नाक** :- पाळीच्या अगोदर नाक बंद होते, व सर्दी होते.

**चेहरा** :- गालाच्या उंचवट्यात ठुसठुस वेदना होतात, उजवा उंचवटा सुजतो व दुखतो. उकरल्याप्रमाणे फाडल्याप्रमाणे दातात व चेहऱ्यात कळा येतात विशेषतः गरोदरपणी. चेहरा पांढरा फटफटीत. गालाच्या उंचवट्याची गुल्मे.

**तोंड** :- दात फार लांब झाले आहेत असे वाटते. तोंड कोरडे पडते विशेषतः रात्री. अकलदाढ येताना होणारे उपद्रव. चव कडू, आंबट, एकाएकी मधुन मधुन तोतरे बोलणे.

**घसा** :- घशातून दह्याप्रमाणे दाट कफ खाकरल्यानंतर येतो. पाळीच्या अगोदर घसा दुखतो. बोलताना व गिळताना घशात टोचते.

**जठर** :– आंबट पदार्थ, भाज्या, मांस, फळे खावीशी वाटतात. ढेकरा आंबट. ओकारीत जसेच्या तसेच दूध पडते किंवा कडू पाणी पडते. अतिशय तहान लागते. हिरव्या अन्नाचा तिटकारा.

**उदर** :– वात धरतो, जड होते. **कापल्याप्रमाणे वेदना होऊन शौचास, फेसाळ,** *हिरवट पाण्याप्रमाणे होते किंवा वर तवंग येतो.* खाण्यापिण्यानंतर शौचास जावे लागते. शौचास पांढऱ्या चिकण मातीप्रमाणे बुळबुळीत किंवा तुपासारखे गोळे पडतात. शौचास गवताप्रमाणे हिरवे होते. मानसिक ताण किंवा आघातामुळे मलावरोध होतो. शौचास टणक, भुगा होणारे खडे होतात. तान्ह्या मुलांचे जसेच्या तसेच दूध शौचावाटे बाहेर येते.

**मूत्रेंद्रिये** :– चालताना किंवा जागेवरून उठताना लघवी नकळत होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळशी होण्याचे अगोदर सर्दी होते, नाक चोंदते, घसा दुखावयास लागतो. पाळी उशिरा, विटाळ थोडा, दाट, काकवीप्रमाणे, डांबराप्रमाणे, चिकट, विटाळ रात्री (झोपेत) निजलेल्या स्थितीत आणि उठल्यानंतर जास्त जातो, चालण्याने कमी होतो, न धुवून जाणारा डाग पडतो. धुपणी, पांढरी, करवडणारी, धुपणी जाण्याच्या अगोदर उदरांत वेदना होतात, पाळी नंतर नियमितपणे जाते.

**श्वसनेंद्रिये** :– कोरडा खोकला, वारंवार ढास लागते; कफ लवकर सुटत नाही. कफ, पातळ, खारट किंवा रक्तमिश्रित. छातीत आवळल्यासारखे वाटून दम लागतो, मोकळे वारे हवेसे वाटते. कंठात गुदगुल्या होऊन रात्री खोकला येतो.

**हातपाय** :– पावले जड शिणलेली. निखळल्याप्रमाणे खांद्यात वेदना होतात. उजव्या खांद्यात दुखते तो वर करता येत नाही. गुडघ्याच्या खळीत सूज येते.

**त्वचा** :– मळकट, फिकट. त्वचेखाली टणक गाठी येतात. कोरडी, हुळहुळी गारवा सहन होत नाही.

**झोप** :– सकाळी हुशारी वाटत नाही, थकल्यासारखे वाटते. पहाटे २। ३ वाजता जाग येते नंतर झोप लागत नाही. दिवसा झोप येते रात्री येत नाही.

**ज्वर** :– संध्याकाळी थंडी वाजते. रात्री ताप येतो. आंबट, तेलकट घाम येतो. व त्याने न धुवून जाणारे डाग पडतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *रात्री*; **विश्रांतीने, आवाजाने; थंडी;** थंड वारा; थंड झुळुक. पिष्टमय अन्न. दूध, क्षुल्लक कारणे; स्पर्श; **दर एकवीस दिवसांनी** ( तीन आठवड्यांनी. )

**क वा** :– हालचालीने; एकसारखे चालण्याने; मोकळ्या हवेत; गरम हवा.

**सहाय्यक औषधे :–** कामो.

**संबंधी औषधे :–** ऱ्हिअम.

---

## २३६. मॅग्नेसिआ फास्फरिका Magnesia Phosphorica

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *मज्जातंतू*; स्नायू व उजवी बाजू यावर होतो. उंच, सडपातळ, कंटाळलेले, सुस्त, थकलेले इसम. **एकदम तीव्र वेदना सुरू होण्याची प्रवृत्ति. वेदना एकदम सुरू होतात, थांबुन थांबुन येतात, कळा तीव्र असतात, पेटके, मुरडा येतो,** वेदना एकदम जागा बदलतात, वेदनांच्या लाटा आल्यासारखे वाटते, त्या पसरत जातात, आवळल्याप्रमाणे उकरल्याप्रमाणे वाटते. **वेदनामुळे ओरडणे, रडणे, अस्वस्थपणा येतो व** थकवा वाटतो. **स्नायूंचा कंप.** एकसारख्या उचक्या येतात किंवा जांभया येतात. कंपवात. लिहितात बोटाना पेटके येतात. पाण्यात उभे राहिल्यामुळे, गार पाण्याच्या आंघोळीने, मुलांचे दांत येताना, अभ्यास, कॅथेटर घातल्याने झालेले उपद्रव.

**मानसिक :– एकसारखे स्वतःच्या वेदनाविषयीच बोलण्याची प्रवृत्ति.** अभ्यास किंवा कोणतेही मानसिक श्रम करण्याचा कंटाळा. अभ्यास करण्याचा प्रयत्न केला तर झोप येऊ लागते.

**डोके :–** मानसिक श्रमानंतर दुखावयास लागते. मेंदू पातळ झाला आहे असे वाटते किंवा मेंदूचा काही भाग जागा बदलत आहे असे वाटते.

**डोळे :–** गरगरा फिरतात. खूप पाणी येते. उजेड सहन होत नाही. पापण्या लवतात. डोळे कढत, थकल्यासारखे, दुखतात. भुवयाभोवती दुखते, उष्णतेने बरे वाटते.

**कान :–** कानात भयंकर टणका लागतो, उजव्या कानामागे जास्त; गार पाण्याने चेहरा व मान धुतल्याने जास्त होतो.

**चेहरा :–** गार पाण्याने धुतल्याने, गार पाण्यात काम केल्याने किंवा अंग गार झाल्याने दुखावयास लागतो.

**तोंड :–** कोपऱ्यात भेगा पडतात. दातदुखी कढत पाण्याने, शेकाने कमी होते. दात येताना होणारे उपद्रव, आचके. जीभ स्वच्छ, उदरात वेदना होताना.

**घसा :–** दुखतो, ताठतो, फुगल्यासारखा दिसतो, त्यावेळेस थंडी वाजते व सर्वांग टणकते.

**जठर** :- रात्रंदिवस उचकी, त्याबरोबर कोरड्या ओकाऱ्या येतात व ओकाऱ्या होतात. तहान–अतिशय थंड पाणी प्यावेसे वाटते. आग, ओकाऱ्या व उचक्या कढत पेयाने कमी होतात. कॅन्सर.

**उदर** :- वात धरून कळा येतात. आतड्यात कापल्याप्रमाणे वेदना होऊन त्या मांड्यापर्यंत जातात. उदर खपाटी जाते. आतड्यातील वेदना चोळण्याने, शेकाने, दाबल्याने कमी होतात; वेदना होताना ढेकरा येतात पण त्याने बरे वाटत नाही. उदर भरल्यासारखे वाटते, फुगलेले दिसते, त्यामुळे वस्त्र सैल करावी लागतात व चालावे लागते व एकसारखा वात सरतो. जुलाब बंद झाले की आचके यावयास लागतात किंवा मेंदूचे इतर विकार होतात.

**मूत्रेंद्रिये** :- अंथरुणात लघवी होते. कॅथेटर घातल्यानंतर मूत्राशयात वेदना होतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :- कष्टार्तव, विटाळ सुरू झाला की बरे वाटते. विटाळातून श्लेष्मल त्वचेचे तुकडे पडतात. विटाळ काळा, डामरासारखा, चिकट तारा येणारा, रात्री जास्त जातो, व न धुऊन जाणारा डाग पडतो; पाळी लवकर. रजःपिंडात वेदना होतात. योनीचे आकुंचन

**श्वसनेंद्रिये** :- खोकला गार हवेने कमी होतो. डांग्या खोकला. खोकल्याचा वारंवार येणारा ठसका–निजता येत नाही. बरगड्यामध्ये वेदना होतात.

**हृदय** :- अन्जायना.

**पाठ** :- कण्यातील एक मणका नाही असे वाटते. मान व पाठ ताठते. पेटके येतात.

**हातपाय** :- पंजे आपोआप हलतात. कलायखंजवात. गृध्रसी वातात पावले अतिशय हुळहुळी होतात. लिहिताना किंवा वाद्ये वाजविताना बोटाना पेटके येतात. हाताच्या बोटाची त्वचा घट्ट झाल्यासारखी वाटते. पाय दुखतात, आलटुन पालटुन; एकसारखे बराचवेळा श्रम केल्याने पेटके येतात.

**ज्वर** :- खाण्यानंतर किंवा संध्याकाळी थंडी वाजते. पाठीत वर खाली थंडी वाजते आहे असे वाटून हुडहुडी भरते नंतर गुदमरल्यासारखे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :- ***थंडी; गार वारे***; गार झुळुक; उघडे झाल्याने, गार पाण्याने. **स्पर्श. नियमित वेळी.** ***रात्री*** थकवा. दूध. उजव्या कुशीवर निजल्याने.

**ब बा** :- ***उष्णता***; **कढत *पाण्याच्या आंघोळीने*. दाबल्याने.** अंग **दुमडल्याने.** चोळण्याने.

**संबंधी औषधे** :- कोलो; डायास्को.

---

## २३७. मॅग्नेसिआ मूरिआटिका Magnesia Muriatica

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मज्जातंतू*; *यकृत*; पचनक्रिया; गर्भाशय; गुद व स्त्रिया यावर होतो. पित्त प्रकृति. गर्भाशयाच्या विकारामुळे किंवा हृदयविकारामुळे उद्भवलेले स्त्रियांचे उपद्रव. हिस्टेरिआ. पोटके कोरडेपणा. आग. चमका. रात्री जेवणानंतर मूर्च्छा येते किंवा दम लागतो, मळमळते, अंग कापते वगैरे अनेक विकार होतात. जीर्ण विकार. आचके. गोळा आला आहे असे वाटणे. कावीळ. पिवळा पातळ दुर्गंधी पू. जीर्ण अपचन व आम्लपित्त यानी पछाडलेले इसम. वैषयिक विकाराने ग्रस्त झालेले पुरुष, दांत येताना वाळणारी मुले. समुद्रस्नान केल्याने होणारे, विकार, विशेषतः थकवा. पूर्ण जागे असताना सर्वांगांत विजेचे धक्के बसल्याप्रमाणे धक्के बसतात

**मानसिक** :– चिडखोर. अस्वस्थ, बेचैन होऊन सहज रडू येते. वाचीत असताना आपल्या बरोबर दुसरे कोणीतरी वाचीत आहे असे वाटून मरमर वाचावेसे वाटते. बोलावेसे वाटत नाही.

**डोके** :– डोकेदुखी, दाबल्याने व डोके गरम कपड्याने गुंडाळण्याने कमी होते. हालचालीने, मोकळ्या हवेत जास्त होते. बराच घाम येतो. ज्या बाजूला निजले असेल त्या बाजूस उकळते पाणी वाहत असे वाटते. केस ओढल्या-सारखे वाटतात.

**डोळे** :– पिवळे. दिवसा उन्हात कोणत्याही वस्तूकडे पाहिल्याने डोळ्यातून पाणी येऊन आग होते.

**कान** :– आवाज सहन होत नाही. आत ठुसठुसते.

**नाक** :– चव व वास कळत नाही. सर्दी नंतर तोंडातून श्वास घ्यावा लागतो. निजल्याने नाक चोंदते. पिंजस खपल्या पडतात. लाल, सुजलेले

**तोंड** :– जीभ व तोंड भाजल्या पोळल्याप्रमाणे वाटते. जीभ रुंद पिवळी चमच्या-प्रमाणे. अन्नाचा स्पर्श झाला की दात दुखावयास लागतात. तोंडात एकसारखा पांढरा फेस येतो.

**जठर** :– पचनक्रिया मंद. भूक लागत नाही. ढेकरा बरोबर पांढरा फेस तोंडात येतो. दूध व खारट पदार्थ पचत नाही. गोड खावेसे वाटते. चाखताना ढेकराबरोबर अन्न येते. कुजलेल्या अंड्याच्या वासाच्या ढेकरा येतात. भूक लागते पण काय खावे ते समजत नाही.

**उदर** :– यकृत ते कण्ठापर्यंत किंवा पोटाच्या खळीपर्यंत वेदना होतात. **यकृत** हुळहुळे होते, मोठे होते, डाव्या कुशीवर निजले तर तिकडे ओढल्यासारखे वाटते. पित्ताशयात पेटके येतात ते खाण्याने कमी होतात. वात धरतो. *शौचास-कोरडे गाठयाळ* होते, लहान लहान खडे शेळीच्या लेंड्याप्रमाणे पडतात, खडे एकमेकाला चिकटलेले किंवा राखी रंगाचे असतात व गुदद्वाराशीच त्याचे तुकडे तुकडे होतात. पांथरी मोठी होते, चालताना जड वाटते. शौचास लागण्याची भावना होत नाही. कावीळ. फितीसारखे जंत.

**मूत्रेंद्रिये** :– कुंथल्याशिवाय किंवा ओटीपोटात मूत्राशयावर दाबल्याशिवाय लघवीला होत नाही. मूत्रमार्गातून लघवी जात आहे याची जाणीव होत नाही. मूत्रमार्ग बधिर. नळ्या घातल्यानंतर मूत्रमार्गाचे बारीक हाणे.

**पुरुषजननेंद्रिये** :– अंडांत व वीर्यवाहिनी नलिकेत संभोगानंतर वेदना होतात, वैषयिक वासनेची तृप्ती न करता आल्यामुळे वेदना होतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– **विटाळ भरपूर गाठयाळ, काळा, डांबराप्रमाणे.** विटाळ जाताना पेटके येतात, पाठीत आणि मांड्यात दुखते. रक्तप्रदर. विटाळ रात्री किंवा बसल्या स्थितीत जास्त जातो; चालताना कमी जातो. विटाळसेपणी मानसिक क्षोभ होतो. **शौचाच्या वेळी किंवा प्रत्येक वेळी पटके येऊन धुपणी जोराने वाहते.** विटाळशी होण्याचे अगोदर चेहऱ्यावर पुटकुळ्या येतात. कष्टार्तव, पाठ दाबल्याने, किंवा टणक उशीवर निजल्याने बरे वाटते.

**श्वसनेंद्रिये** :– मध्यरात्री पूर्वी कोरडा खोकला येतो. समुद्रस्नानाने कफातून रक्त पडते किंवा छाती भरल्यासारखी वाटून हुळहुळी होते.

**हृदय** :– धडधडते व वेदना होतात. बसल्याने जास्त होतात, चालल्याने किंवा कुशीवर निजल्याने बरे वाटते. हृदयविकारात यकृत मोठे होते.

**पाठ** :– डाव्या तिकोनी हाडाखाली ठुसठुसते. पाठीत कमरेच्या सांध्यात मार लागल्याप्रमाणे वेदना होतात किंवा आग झाल्यासारखी वाटते, किंवा संभोगानंतर ( पुरुष ) पाठीत दुखते. पाठीतील पेटके चालताना जास्त होतात, मांडीतील पेटके बसल्याने जास्त होतात. हाताच्या बोटाची टोके निर्जीव वाटतात. मांड्या व पोटऱ्या ताणल्याप्रमाणे वाटतात; त्यामुळे पाय हलविणे भाग पडते. घोटे गार होतात किंवा त्यात अस्वस्थपणा वाटतो विशेषतः रात्री. टाचात कापल्याप्रमाणे वाटते. पावलांना घाम येतो.

**झोप** :– दिवसा येते, रात्री डोळे मिटले म्हणजे अस्वस्थपणामुळे व चिंतेमुळे किंवा शरीर तापल्यामुळे किंवा धक्के बसल्यामुळे झोप येत नाही.

**त्वचा** :– सर्वांगाला मुंग्या येतात. गळवे; पू पातळ, दुर्गंधी; पिवळा.

**ज्वर** :– डोक्याला व पावलाना घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *उजव्या कुशीवर निजल्याने*. रात्री. आवाज. समुद्रस्नानाने. खाण्याने. खारट पदार्थ, दूध. स्पर्श. मानसिक श्रम.

**ब या** :– ***जोराने दाबल्याने***. पाय पोटाशी घेऊन निजल्याने विकार **झालेला भाग लोंबकळत ठेवल्याने. सावकास चालण्याने. थंड मोकळी हवा.**

**संबंधी औषधे** :– नेट्र-मू ; पल्स; सेपि.

---

## २३८. मॅग्नेटिस पोलस आस्ट्रॅलिस

**सर्वसाधारण** :– पायाच्या बोटाची नखे मांसात रुततात व चालताना अतिशय दुखतात, त्याना स्पर्शसुद्धा सहन होत नाही.

---

## २३९. मॅन्गॅनम Manganum.

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *कानाचा आतील भाग*; कंठ व श्वासनलिका; *पाय* **सांधे, घोटे, तंगडीची हाडे,** टाचा; त्वचा यावर होतो. **खोल अंतर्गत वेदनायुक्त हुळहुळेपणा**– कानात, हाडात, सांध्यात, त्वचेचा. शरीराच्या कोणत्याही भागाला हात लावला तरी दुखते. **तिरकस वेदना.** स्राव रक्तमिश्रित, गाळ्याळ, हिरवट पिवळे. सांधे चकाकतात. **भान, छाती डोके, पुढे वाकवून, हात कोपरापासून वर उचलून व शरीर ताठ करून चालणे.** स्नायू लुले पडतात. कलायखंज वात, पंगुवात. यकृतात चरबी माजते. कावीळ. हाडांचा व सांध्याचा शोथ, रात्री उकरल्याप्रमाणे असह्य वेदना होतात. **शरीरात कोठेही काहीही झाले तरी त्यामुळे कानात परिणाम होतो.** पराच्या गादीवर निजल्याने दमेकऱ्यांचा दमा जास्त होतो. वक्के व गवई यांचा बसलेला आवाज. मूत्रपिंडाचा शोथ–लघवीतून अल्बुमिन जाते. पंडुरोग. अंथरुणातच पडून रहावेसे वाटते; व त्याने सर्व लक्षणे कमी होतात. सांध्याभोवती त्वचा पुवळते. मागे मागे चालणे ( पुढे चालण्या-

ऐवजी ) मुलामुलींच्या आवाजात बदल होतो. हाडे कुजतात. टायफाईड सारखे ताप योग्य तऱ्हेने उपचार न केल्यामुळे झालेले उपद्रव.

**मानसिक** :– अस्वस्थपणा; काळजी व भीती वाटते. काहीतरी दुःखदायक गोष्ट घडत आहे अशी चिंता वाटते. खोलीत फिरत असताना काळजी भीती जास्त वाटते, निजल्याने बरे वाटते. उगीचच्या उगीच रडणे किंवा हसणे. एकसारखे कण्हणे व विवळणे.

**डोके** :– शौचाच्या वेळी कुंथताना, धक्क्याने, चालताना, डोके जड व मोठे झाल्यासारखे वाटून डोके दुखते.

**डोळे** :– दृष्टीचे क्षेत्र लहान होते. बारीक अक्षरे वाचताना, शिवताना डोळे दुखतात.

**कान** :– बंद झाल्यासारखे वाटतात, नाक शिंकरल्याने मोकळे होतात. शिटी वाजल्याप्रमाणे कानात आवाज होतात. गालगुंड टायफाईडसारख्या तापात उद्भवलेले. काही झाले तरी त्याचा परिणाम कानावर होतो. दुसऱ्या भागात होणाऱ्या वेदना कानापर्यंत जाणवतात. दमट हवेत बहिरेपणा येतो. नाक शिंकरल्याने बहिरेपणा कमी होतो. बोलताना, हसताना, गिळताना कानात कंड सुटते.

**नाक** :– शिंकरताना नाकात वेदना होतात. नाकाच्या बुंध्याशी पेटके येतात. नाकानी श्वासोच्छ्वास घेववत नाही.

**चेहरा** :– फिकट आजाऱ्यासारखा. मुखवट्याप्रमाणे हालचालरहित. खालच्या जबड्यापासून कानशिलापर्यंत दुखते, हसताना जास्त.

**तोंड** :– लाळ गळते, पोटात वेदना होत असताना किंवा स्नायूंच्या लुळेपणात. टाळ्यावर व जिभेवर टणक गाठी येतात. दातांतील वेदना कानापर्यंत जातात, चोखताना किंवा काहीही गार लागल्याने जास्त होतात.

**घसा** :– दुसऱ्याना त्रासदायक होण्याइतके एकसारखे खाकरणे.

**उदर** :– यकृत मोठे होते. गुदद्वारात, बसलेले असताना पेटके येतात, निजल्याने थांबतात. आतडी सैल होऊन चालताना हलता आहेत असे वाटते. बेंबीजवळ आवळल्यासारखे वाटते व दुखते. शौचास होताना बराच वारा सरतो. कधी मलावरोध व कधी जुलाब होतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– न्हाण लवकर येत नाही १८ ते २० वर्षापर्यंत. विटाळ फिकट थोडा, एक दोन दिवस दिसतो. पाळ्या लवकर. अंगात उष्ण लाटा येतात विशेषतः विटाळ थांबण्याच्या वयात. दोन पाळ्यामधे विटाळ जातो.

**श्वसनेंद्रिये** :– कंठ कोरडा, हुळहुळा. आवाज घोगरा व कर्कश. जीर्ण घोगरेपणा. सकाळी घोगरेपणा जास्त असतो, थोडासा कफ बाहेर काढल्याने किंवा तंबाखू ओढल्याने कमी होतो. खोकला– वाचताना किंवा हसताना जास्त होतो, निजल्याने थांबतो. कंठाचा क्षय. आवाज उमटत नाही. सर्दी झाली की खोकला होतो.

**हातपाय** :– पाय अशक्त, चालताना लटपटतात. पाय बधिर झाल्यासारखे वाटतात. चालताना पाऊल जमिनीवर आपटत चालणे. सांध्याभोवती ठिकठिकाणी आग होते. मागे चालताना पडावयास होते. पुढे पडण्याची प्रवृत्ति. सांधे व हाडे यांचा शोथ. तंगडीच्या हाडांना रात्री उकरल्यासारख्या वेदना होतात. घोटे सुजतात. घोट्याच्या विकारामुळे मुलाना चालता येत नाही.

**त्वचा** :– खरखरीत, त्वचेवर भेगा पडतात विशेषतः सांध्याच्या पोकळीत. त्वचा निळसर. व्रण कोरडे टणक. त्वचेवर लाल ठिपके पडतात. इसब–विटाळ बंद असताना, विटाळसेपणी किंवा विटाळ थांबण्याच्या वयात येतो. सांध्याभोवती त्वचा पुवळते. लाल ठिपके, उंचावलेले. मधुमेहात कंड सुटते. हट्टी त्वग्रोग.

**झोप** :– अनेक स्पष्ट स्वप्ने पडतात व ती सकाळी आठवतात.

**ज्वर** :– चेहरा, छाती, पाठीवर एकदम उष्ण लहरी येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– हवेतील फरकाने. स्पर्श. थंडी. दमटपणा. रात्री. बोलताना. हसताना. परांच्या गादीवर. हालचाल. मागे वाकल्याने.

**क मी** :– निजल्याने. मोकळी हवा.

**संबंधी औषधे** :– सिंको; सोरि.

---

## २४०. मॅन्सिनेला Mancinella

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम त्वचा, घसा, मन यावर होतो. आग होणे. करवडणे. न्हाण येण्याच्या वयात किंवा विटाळ थांबण्याच्या वयात शरीरात वैषयिक खळबळीमुळे मन उदास व खिन्न होते. निरनिराळ्या भागात आग व चुणचुण होते. जखमा त्वरित भरून येण्यास या औषधानी मदत होते.

**मानसिक** :– खिन्न. उदास. मनात आलेले विचार एकदम नाहीसे होतात. वेड लागेल अशी भीती वाटते. लाजाळू. पुढे काय करावयाचे आहे हे विसरणे, निरोप विसरणे.

**डोके** :– डोके पोकळ झाल्यासारखे वाटते, चालताना जास्त. टाळूत दुखते, निजल्याने जास्त. तीव्र रोगातून उठल्यानंतर केस गळून पडतात.

**डोळे** :– **चुरचुरतात–डोळे मिटल्याने जास्त**. पापण्या जड, हुळहुळे, मागील बाजूस ठणकतात. उजेड सहन होत नाही. दिसेनासे होते.

**नाक** :– काल्पनिक वास येतात. शेण, बंदुकीची दारू वगैरे.

**चेहरा** :– **सुजलेला,** चट्टे पडलेला. ओठावर वेदनायुक्त पुटकुळ्या.

**तोंड** :– **दुर्गंधी भरपूर लाळ गळते.** रक्तासारखी चव. आग होते व टोचते गारव्याने बरे वाटत नाही.

**घसा** :– कापल्याप्रमाणे वेदना होतात गार पेयाने **जास्त.** घटसर्प. बोलताना घशात गुदमरल्यासारखे वाटते. टानसिल सुजतात.

**जठर** :– पोटातून घशापर्यंत **गुदमरल्यासारखे** वाटते. गार पेये प्यावीशी वाटतात. ओकारीत अन्न पडते, नंतर आतड्यात अतिशय मुरडा होऊन भरपूर जुलाब होतात.

**उदर** :– पोटाची खळी सुजलेली. आतडी हुळहुळी व आग होते. आतील वेदना गार पेयाने जास्त होतात.

**श्वसनेंद्रिये** :– खोकला गार पेयाने जास्त होतो. छातीच्या मधल्या चपट्या हाडामागे ठणकते.

**हृदय** :– नाडी अशक्त. हृदयाजवळ सुयाप्रमाणे टोचते.

**हातपाय** :– पंजे व पावले बर्फाप्रमाणे गार. हाताच्या बोटाचा आंगठा दुखतो. **तळपायावर भाजल्यासारखे फोड येऊन आत चावते.** तळपायाचे पापुद्रे जातात, तळपाय कोरडे.

**त्वचा** :– पापुद्रे जातात. पोळल्याप्रमाणे मोठाले फोड येतात. **त्वचा कोरडी.** पिंगट खपल्या बसतात. त्वचा लालबुंद होते. चावरे. मांसाकुराची वाढ.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **गार पेये;** गार पाण्यात पावले भिजल्याने. दमटपणा. स्पर्श. न्हाण येण्याच्या वयात. विटाळ थांबण्याच्या वयात.

**संबंधी औषधे** :– आरम–ट्रा; कॅन्था; व्हस–टा.

---

## २४१. मॅलांड्रिनम Malandrinum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा देवीला प्रतिबंधक म्हणून चांगला उपयोग होतो. देवी टोचल्यानंतर उद्भवलेले सर्व तऱ्हेचे दुष्ट परिणाम. कॅन्सरचे राहिलेले भाग नाहीसे करण्याला या औषधाचा उपयोग होतो.

---

## २४२. मायगेल Mygale

**सर्वसाधारण** :– या कोळ्याच्या विषाचा परिणाम मज्जातंतूवर होतो. अस्वस्थ, मरणाची भीती वाटते. कंपवात. चेहऱ्याच्या स्नायूंचा कंप. तोंडाची व डोळ्याची उघडझाप जलद होते. डोके एका बाजूला झटकले जाते. बोलताना शब्द बाहेर फेकल्याप्रमाणे येतात. मळमळताना हृदय धडधडते व दृष्टि मंद होते. चालणे अस्थिर; चालताना पाय ओढून चालावे लागते. शिश्न जोराने ताठून दुखते. सर्व शरीर हालते. त्वचेवर लालबुंद रेषा पडतात. हृदयाची धडधड व अशक्तपणा.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– सकाळी. बसल्याने. खाण्याने.

**क या** :– झोपेत.

**संबंधी औषधे** :– अगारि; कुप्रम; टरेन्टु.

---

## २४३. मिरिका Myrica

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम यकृत व हृदय यावर होतो. **यकृत व हृदय यांची एकाच वेळी उद्भवलेली लक्षणे.** काबीळ– तान्ह्या मुलांची. नाडी मंद. श्लेष्मल स्राव दुर्गंधि व अतिशय चिकट.

**मानसिक** :– निरुत्साही. खिन्न.

**डोके** :– सकाळी उठल्यानंतर कानशिले व कपाळ जड होऊन ठणकतात.

**डोळे** :– पिवळे, **पापण्या लालभडक.**

**चेहरा** :– पिवळा. मुंग्या आल्यासारखे वाटते.

**तोंड** :– चिकट दुर्गंधी कफ साचतो. तोंडाला घाण येते. चव कडू. कोरडे, पाण्याने थोडा वेळ बरे वाटते. जीभ पिवळी, काळसर, जाड.

**जठर** :– आंबट पदार्थ खावेसे वाटतात. पोटाच्या खळीत गळून गेल्यासारखे वाटते, खाण्याने जास्त होते, जलद चालण्याने कमी होते. खाता येणार नाही अशी समजूत होते. चव अतिशय दुर्गंधी असल्यामुळे खाता येत नाही. भूक लागत नाही, अन्नाचा तिटकारा.

**उदर** :– यकृताच्या जागेत ठणकते व त्यावेळेस तिकोनी हाडाखाली दुखते. अंगावर पित्ताच्या गांधी येतात व काबीळ होते. पित्ताशयात भरल्यासारखे वाटून

आग होते. चालताना एकसारखा वारा सरतो. शौचास होईल होईलसे वाटते परंतु नुसता खूप वाराच सरतो. राखेच्या रंगाचे चिकट दुर्गंधी शौचास होते. कॅन्सरमुळे झालेली कावीळ, त्वचा तांबट पिवळी.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी काळी, फेसाळ, थोडी, लालबुंद.

**पाठ** :– यकृताच्या विकारात तिकोनी हाडाखाली दुखते.

**हृदय** :– नाडी मंद, अनियमित, अशक्त.

**झोप** :– निद्रानाश. गुंगी येते. वाईट स्वप्ने पडतात.

**हातपाय** :– चालताना झोकांडे जातात.

**त्वचा** :– पिवळी. किडे चालताहेत असे वाटते काविळीत कंड सुटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– अंथरुणाची ऊब. झोपेनंतर.

**ब वा** :– मोकळी हवा. खाण्याने

**सहाय्यक औषधे** :– कलि–बाय; डिजि.

**संबंधी औषधे** :– केलि.

---

## २४४. मिलिफालिअम Miliefolium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम फुप्फुसे; नाक, व गर्भाशय यावर होतो. मार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा. रक्तस्राव–भरपूर, वेदनारहित, लाल भडक–नाकातून, छातीतून, लघवीतून, आतड्यातून, गर्भाशयातून वगैरे. उंचावरून खाली पडल्याने, अति श्रमाने, उचलण्याने, स्राव बंद झाल्याने; विटाळ, बाळंतपणानंतरचा विटाळ, दूध, मूळव्याध उद्भवलेले दुष्परिणाम– आचके, फेफरे वगैरे. एकसारखे काहीतरी विसरले आहे असे वाटते. वात धरून पोटात दुखते. छाती दाटल्यासारखी वाटून हृदय धडधडते. एकसारखा अतिज्वर. गरोदरपणी शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात पित्ताचे खडे, मुतखडे वगैरेची शस्त्रक्रिया केल्यानंतर होणारे दुष्परिणाम. बंद केलेल्या जखमांच्या कडातून रक्त वाहते. भोसकल्याप्रमाणे वेदना. कानातून गार वारे जात आहे असे वाटते. आतड्यात वेदना होताना पातळ द्रव्य आतड्यातून वाहत आहे असे वाटते. अतिश्रमाने आंतड्यातून रक्त जाते. हृदयाची धडधड होताना कफातून रक्त जाते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– दुखापती. अतिश्रम. वाकल्याने.

**ब वा** :– स्नात्र गेल्याने. रक्त गेल्याने.

**संबंधी औषधे** :– आर्नि; लेडम.

---

## २४५. मेझेरिअम Mezerium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***त्वचा***; हाडे; **डोके; चेहरा**; जबडा; तोंड; जठर; व एक बाजू यावर होतो. स्राव करवडणारे–पू, धुपणी वगैरे. **अतिशय आग होऊन कंड सुटते.** आग होऊन चुणचुणते, आग होऊन उकरल्याप्रमाणे वेदना होतात. विकार झालेले भाग गार होतात. वेदनायुक्त पुट-कुळया बऱ्या झाल्यानंतर किंवा व्रण बाह्योपचाराने बरे केल्यानंतर उद्भवलेल्या वेदना. डोक्यावरचे इसब बाह्योपचाराने बरे केल्याने उद्भवलेले विकार, बहिरेपणा वगैरे. अंगाला गार वारे लागत आहे असे वाटते. **एकदम वेदना सुरू होतात**, नंतर थंडी वाजते किंवा नंतर तो भाग हुळहुळा किंवा बधिर होतो. भाग वाळतात. गरमी. संधिवात. **कोणत्याही कारणामुळे भीती वाटली तर तिची जाणीव पोटात होते.** उष्णतेने वेदना कमी होतात पण कंड जास्त होते. हाडे सुजतात, ( विशेषतः लांब, ) कुजतात, आग होते, हाडावर हाड वाढते. हाडे मोठी झाली आहेत असे वाटते. आंचके, कंप–पापण्यांचा, चेहेऱ्याचा स्नायूचा. आंचके घट्ट धरल्याने थांबतात. वारे अगदी सहन होत नाही पंख्याचे सुद्धा. एखाद्या भागात आत आग होते व बाहेरून अतिशय कंड सुटते.

**मानसिक** :– बोलण्याचा तिटकारा, चिडखोर. कोणतीही गोष्ट मनास येत नाही. बेपर्वा. खिडकीतून तासचे तास बघत राहणे पण काय बघत आहोत याची जाणीव नसणे. कोणत्याही कारणाने, वेदना, मानसिक आघात दुःखदायक बातमी ऐकण्याचा प्रसंग आलातर पोटाच्या खळीत भीतीचा गोळा उभा राहतो.

**डोके** – डोक्यातील वेदना, डोळे, गालाची हाडे व मानेपर्यंत पसरतात–डोळयातून पाणी येते, वेदना दुरून शेक लागल्याने कमी होतात. कवटी दुखते. डोकेदुखी वाकल्याने कमी होते, बोलताना जास्त होते. एक बाजू बधिर. पांढऱ्या खपल्या बसतात. मूठमूठ केस गळून पडतात. खवडे. आगपेण.

**डोळे**:– कोरडे झाल्यासारखे वाटतात, डोळ्याना वेदना होताना डोळे गार झाल्यासारखे वाटतात. डोळ्याची शस्त्रक्रिया केल्यानंतर किंवा तो काढल्या-नंतर होणाऱ्या वेदना. डोळा मोठा झाल्यासारखा वाटतो. डोळे मिच-कावेसे वाटतात. पापण्यांचा कंप.

**कान** :– उघडे होऊन आत गार वारे शिरत आहे असे वाटते. कानात बोटे घालावीशी वाटतात. बहिरेपणा. कानाचा पडदा जाड होतो.

**नाक** :– धुंध्याशी कंप होतो व तो दिसतो. वारंवार शिंका येऊन छातीत करवडल्या-प्रमाणे वेदना होतात.

**चेहरा** :– चमका मारतात, खाण्याने जास्त होतात, शेगडीच्या शेकाने बरे वाटते. सर्दी झाली की तोंडाभोवती उगवण येते. स्नायू उडतात (उजवी बाजू).

**तोंड**:– कोरडे, काळसर लाल. दात बधिर. दातदुखी– कानशिलापर्यंत वेदना जातात; गार वारे आत घेतल्याने बरे वाटते. जीभ एकाच बाजूने अस्वच्छ. जिभेला मध्यभागी भेगा पडतात. ओठांच्या कोपऱ्यात भेगा पडतात दात बधिर व लांब झाल्यासारखे वाटतात.

**घसा** :– हिवाळ्यात दुखावयास लागतो. लाल, काळसर, आग होते. मळमळ घशात जाणवते, खाल्याने कमी होते.

**जठर** :– तोंडाला पाणी सुटते. जिभेत आग होऊन ती जठरापर्यंत जाते. जठराचा जीर्ण शोथ–आग होते, मळमळते, चाकोलेट रंगाचे ओकावयास होते. व्रण, अतिशय आग होते, दूध पिण्याने वा खाण्याने वेदना व आग कमी होते. एक-सारखे खावेसे वाटते. चव आंबट, कडू. बियर कडू लागते व ती ओकून पडते. काफी, दारू पिण्याची वासना.

**उदर** :– बाळंतपणानंतरचा मलावरोध, शौचास मोठ्या आकाराचे होते व त्याने गुदद्वार फाटते की काय असे वाटते. शौचास चकचकीत कण पडतात. गुद आवळल्याप्रमाणे वाटते किंवा बाहेर येते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीवर तांबडा तवंग येतो. लघवी कढत रक्तमिश्रित, मूत्राशयात पेटके येऊन होते. लघवी झाल्यानंतर रक्ताचे थेंब पडतात.

**पुरुषजननेंद्रिये** :– शिश्नाची व वृषणाची वेदनारहित सूज. अंड मोठे होतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– हट्टी धुपणी–करवडणारी बुळबुळीत. गर्भाशयाच्या मुखाचे व योनीचे हट्टी व्रण.

**श्वसनेंद्रिये** :– कोरड्या खोकल्याची उबळ येऊन ओकावयास होते, कढत पेयाने जास्त खोकला येतो.

**हातपाय** :– गुडघ्याच्या खळीत कंड सुटते. ठणका लागतो. गुदास्थी दुखते, तीवर पडल्यानंतर. तंगडीच्या हाडात किंवा इतर लांब हाडात वेदना व आग होते. एक पंजा कढत. हातपाय गार; आखुड झाल्यासारखे वाटतात. हाताच्या बोटांचा लुलेपणा. बोटांनी काही धरता येत नाही.

**त्वचा** :– उगवणीतून करवडणारी, डिंकाप्रमाणे लस वाहते व त्याच्या जाड खपल्या बसून खाली पू होतो, किंवा खपल्या खडूसारख्या, पांढऱ्या. आगपेण. व्रण खोल. टणक, कंड सुटते, आग होते व्रणाभोवती त्वचा लालबुंद होऊन त्यावर फोड येतात. इसब. असह्य कंड सुटते. वृद्धपणीची कंड. एके ठिकाणी खाजविल्याने तेथील कंड कमी होऊन दुसरीकडे सुरू होते. व्रणातून करवडणारा पू येऊन त्याच्या खपल्या बसतात. व्रण शेकाने व स्पर्श केल्याने जास्त त्रासदायक होतात.

**ज्वर** :– थंडी वाजते, हातपाय गार वाटतात एक पंजा कढत दुसरा गार.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा हो: – *रात्री*; त्वग्रोग बरे केल्याने. *अंथरुणाची ऊब*. बिस्तवाची उष्णता. *गार वारे*, झुळुक. दमटपणा. हालचाल स्पर्श पारा. देवी टोचल्याने.

ब वा – दुरून शेक दिल्याने. खाण्याने. मोकळी हवा. कपड्याने गुंडाळण्याने

**सहाय्यक औषधे** :– मर्क्यु.

**संबंधी औषधे** :– आर्से; कलि–आयो. ग्वाईआ.

---

## २४६. मेडोऱ्हिनम Medorrhinum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम मन; मज्जातंतु. श्लेष्मल त्वचा; फुप्फुसे; ओटीपोट; सांधे; कणा; मूत्रपिंड; रजःपिंड ( डावे ) यावर होतो. शरीर कुणीर, ताठल्यासारखे. ठणका. हुळहुळेपणा. सांधे धरण्याची प्रवृत्ति. अनेक प्रकारच्या वेदना होतात. *परम्याचे विष शरीरात भिनल्यामुळे* योग्य निवड केलेल्या औषधांची क्रिया नीट होत नाही किंवा टिकत नाही. सांधे ढिले झाल्यासारखे वाटतात त्यात जोर वाटत नाही. स्राव भरपूर करवडणारे व त्याने कंड सुटते. मास्याप्रमाणे वास. जलयुक्त सूज.

अतिशय हुळहुळे बारीक व्रण किंवा भाजल्याप्रमाणे फोड येतात. **आग** होते. मुंग्या येतात विशेषतः अंतर्गत. **बधिरपणा.** कंप. शरीर वाळते. बुद्धीने व शरीराने खुरटलेली मुले. अंगाला घाण येणारी मुले व स्त्रिया. सर्वांगात कंप जाणवतो पण दिसत नाही; अतिशय घाबरटपणा व थकवा; शक्तिपात होतो. सर्वांगातील गाठी मोठया होऊन त्यात आग होऊन हुळहुळया होतात. एकसारखे पंख्याने वारे घ्यावेसे वाटते अंगाची घाण धुऊन जात नाही. स्त्रियांच्या ओटिपोटात उद्भवलेले जीर्ण विकार.

**मानसिक** :- **काहीही सहन होत नाही, घाबरट व उतावीळ.** स्मरणशक्ती कमकुवत. रडल्याशिवाय बोलता येत नाही. वास्तवतेपासून **फार दूर आहोत असे वाटते**, आज घडलेली गोष्ट आठ दिवसापूर्वी घडली असे वाटते वेळ सावकाश चालला आहे असे वाटते. वेडे होऊ अशी भीती वाटते. मागे कोणी तरी उभे आहे व ते पुटपुटत आहे असे वाटते. सर्व गोष्टी कृत्रिम वाटतात. **खिन्नता** रडणे आणि **भीती वाटणे.** निरोप व नावे लक्षात राहात नाहीत. बोलता बोलता शब्द विसरणे व पुढे काय बोलावयाचे हे न आठवून वाक्य पुरे करता येत नाही. तेच तेच पुनः पुनः सांगणे. मनाने येईल ते एकदम करून टाकणे, निष्ठुर. नीच. पुढे काय होईल याची कल्पना करणे. मनात अनेक कल्पना येतात पण त्या पुऱ्या करता येत नाहीत. भविष्याविषयी भीती पण खाण्याने बरे वाटते. *खिन्न*, रडवा व भीतिग्रस्त.

**डोके** :- मेंदूत खोल आग होत आहे असे वाटते. डोके जड होऊन मागे वाकते. डोक्याचा मागील भाग ते डोळयाच्या मागील भागापर्यंत दुखते. **डोक्याचे केस पिंजारलेले.** घेरी टाळूत जाणवते, वाकल्याने जास्त होते. कानाला धक्का लागल्याने डोके जास्त दुखते. स्वतःचे केस ओढणे.

**डोळे** :- टवकारुन बघत आहे असे वाटणे. पापण्यात काटे टोचत आहेत असे वाटणे. पापण्याचे केस गळून पडतात. पापण्या उघडता येत नाही. वस्तु एकाच्या दोन दिसतात किंवा लहान दिसतात.

**कान** :- बोलण्याचा आवाज ऐकू येतो. बहिरेपणा. कानात ठुसठुसते. कानाचे भोक हुळहुळे व चिडते.

**नाक** :- अतिशय कंड सुटते. शेंडा गार. जीर्ण सर्दी. सर्दी झाली म्हणजे वास व चव कमी होते. तान्ह्या मुलांचे नाक चोंदते व ते कोणत्याही औषधाने कमी होत नाही. शेंबुड घशात उतरतो.

**चेहरा** :- हिरवट, तेलकट, **केसांच्या कडाशी पिवळा.** विटाळसेपणी बारीक गळवे येतात. पाळीनंतर तोंडावर मुरुम येते.

**तोंड** :– जिभेवर भाजल्यासारखे फोड येतात. ओठावर व गालात फोड येतात. पाण्याची चव सुगंधी. दात मऊ, त्यांचा भुगा होतो.

**जठर** :– खा खा सुटते. जेवणानंतरसुद्धा भूक लागते. उत्तेजक पदार्थ खावेसे वाटतात. सकाळची मळमळ. **गरोदरपणची ओकारी.** अतिशय तहान लागते. खारट, गोड पदार्थ, नारिंगे, बर्फ, हिरवी फळे व कढत पेये घ्यावीशी वाटतात. जी दारू पूर्वी आवडत नव्हती ती प्यावीशी वाटते.

**उदर** :– ओटोपोट जड. पिळल्याप्रमाणे वेदना होतात, पावले ताणली म्हणजे बरे वाटते. मागे टेकून कुंथल्याशिवाय शौचास होत नाही. शौचानंतर हुडहुडी येते. तान्ह्या मुलांचे कॉलऱ्यासारखे जुलाब. **गुदद्वारात अतिशय कंड सुटते.** गुदद्वाराभोवती दुर्गंधी काळसर ओल्सरपणा येतो. **गुदद्वार लालबुंद होते.** पोटाच्या खळीत आग होते. वात धरून बधिरपणा येतो. वेदना होत असता उजव्या हाताने पोट दाबणे, डाव्या हाताने कमरेच्या पाठीमागे हात ठेवून मागे वाकणे.

**मूत्रेंद्रिये** :– जळजळीत अमोनियाच्या वासाची लघवी. रात्री झोपेत लघवी नकळत होते. लघवी सावकास होते. मूत्रपिंडाच्या जागी वेदना होतात, लघवी झाल्याने बरे वाटते. मूत्रपिंडाच्या जागी बुडबुडे आल्यासारखे वाटतात.

**पुरुषजननेंद्रिये** :– नपुंसकत्व. स्वप्नावस्था होते त्यानंतर अतिशय थकवा येतो. शिवणीत जडपणा वाटतो. मूत्रग्रंथी मोठी होते व दुखते, जड होते. परमा, सर्व मूत्रमार्ग हुळहुळा होतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ दुर्गंधी भरपूर जातो. काळा, गाठी पडतात, डाग पडतात व ते धुऊन निघत नाहीत. धुपणी पातळ, करवडणारी–माश्यासारख्या वासाची–अतिशय कंड येते. कष्टार्तव; पाऊले भिंतीशी दाबल्याने बरे वाटते. स्तनाग्रे गार, हुळहुळी, होतात, आतून ल्स येते. स्तन गार, बर्फासारखे, इतर शरीर कढत. योनीत कंड सुटते, चोळल्याने; कोमट पाण्याने धुतल्याने बरे वाटते. गर्भाशयाच्या मुखाला व्रण पडतात. पाळी व्यतिरिक्त स्तन हुळहुळे होतात. रजःपिंडात ओढ लागते, दाबल्याने बरे वाटते.

**श्वसनेंद्रिये** :– सारखे जोर हवेसे वाटते. दमा. **खोकला पोटावर निजल्याने** थांबतो. श्वास बाहेर टाकताना त्रास होतो. छातीत गारपणा वाटतो. फुप्फुसे कापसानी भरली आहेत असे वाटते. छातीत पोकळी झाली आहे असे वाटते.

**हृदय** :- असावे त्याजागी पोकळी आहे असे वाटते.

**पाठ** :- पाठीत दुखते व आग होते. त्रिकोनी हाडाच्या वर (डाव्या) मुंग्या आल्यासारखे वाटते, कापल्याप्रमाणे वाटते, आग होते. कणा हुलहुळा, दाबल्याने दुखतो. कण्यात आग होते.

**हातपाय** :- हाताच्या बोटांच्या टोकांची आग होते, त्याना भेगा पडतात. जड होतात, सर्व रात्र ठणकतात, त्याना सारखे हालवावे लागते. घोटे चालताना आत बाहेर वळतात. **तळपाय, टाचा, व बोटाखालचे उंचवटे हुळहुळे** होतात व खाजतात. हात केसाळ. नखे खाणे. पंजांची, पाऊलांची आग होते. पायात पेटके येतात पाय ताणल्याने कमी होतात. हातापायाना सूज येते.

**झोप** :- **गुडघ्यावर व छातीवर निजणे**. थोडी झोप आली तरी पुष्कळ आली असे वाटून बरे वाटते. काही तरी पीत आहोत अशी स्वप्ने पडतात.

**त्वचा** :- पिंवळी, एकसारखी कंड- तीसंबंधी विचार केल्याने जास्त होते. करटे, गुल्मे, मांसांकुर यांची वाढ. त्वचा गार पण रक्त कढत झाले आहे असे वाटते. लाल टणक गाठी येतात. लालबुंद ठिपके पडतात.

**ज्वर** :- आग होते व घाम येतो- पांघरूण घ्यावेसे वाटत नाही, त्यामुळे थंडी वाजते. हातपाय गार पडतात. पावलांची आग होते. सहज घाम येतो, विशेषतः सकाळी. तापात सारखे पंख्याचे वारे घ्यावेसे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :- विकाराचा विचार केल्याने. **सूर्योदय ते सूर्यास्त. दमटपणा**. पहाटे ३ ते ४. लघवी केल्यानंतर. स्पर्श. बंद खोलीत. वादळापूर्वी. **ब वा** :- ***पोटावर निजल्याने***. मागे वाकल्याने. **ताजी हवा**. उघडे राहिल्याने. **जोराने चोळण्याने**. समुद्रकाठी. सूर्यास्तानंतर. पंख्याच्या वाऱ्याने. दमट हवा.

**संबंधी औषधे** :- थूजा; नेट्र-मू ; बॅरि-का; सोरि.

---

## २४७. मेनिआन्थिस Menyanthes

**सर्वसाधारण** :- या औषधाचा परिणाम **रुधिराभिसरण**, डोक्याची टाळू यावर होतो. **बर्फासारखा गारपणा एखाद्या भागाचा** किंवा विकार झालेल्या भागाचा; नाक कान, उदर, बोटे, गुडघे वगैरे. स्नायू लवलवतात किंवा उडतात. **टाळूवर जड ओझे ठेवल्यासारखे वाटते, मानेवर ओझे आहे**

अशे वाटते. मानेतून वर वेदना येतात. धुक्यातून पाहत आहोत असे वाटते. जठरात व उदरात गारवा वाटतो व तो घशापर्यन्त येतो, दाबल्याने जास्त होतो. लघवीला थोडे थोडे व वारंवार होते. डाव्या तिकोनी हाडाखाली उकरल्याप्रमाणे वेदना होतात. मांडीच्या मागल्या भागात पेटके येतात, बसल्याने जास्त. घोट्यापासून पोटऱ्यापर्यंत पेटके येतात. त्वचा घट्ट झाल्यासारखी वाटते. थंडी वाजून जांभया येतात. सारख्या चुळबुळ करण्याऱ्या व लघवीचे विकार होत असलेल्या स्त्रिया. पाय उडतात, निजल्याने जास्त.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** विश्रांतीने. चढताना. अगदी थोडे चालण्याने.

**ब वा :– जोराने दाबल्याने.** संध्याप्रकाशात. विकार झालेल्या भागावर हात ठेवल्याने. खाली वाकल्याने.

**संबंधी औषधे :–** व्हेरा–आ.

---

## २४८. मेरम व्हेरम Teucrium Marum Verum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *नाक*; फुप्फुसे; *गुद*; हाताच्या बोटांची टोके; पायाच्या बोटांचे सांधे यावर होतो. नाजुक व काहीही सहन होत नाही. **नाकात मुंग्या येतात, सारखी नाकात बोटे घालावीशी वाटतात;** डोळ्यातून पाणी येऊन शिंका येतात व ज्या बाजूस झोपले असेल ती नाकपुडी चोंदते; दुर्गंधी गोळे पडतात. **भोक;** वास कळत नाही. घशात खोकताना किंवा खाकरताना बुरसल्यासारखी चव लागते. कान व टाळा खाजतात. नाकाच्या घशातील बाजूतून गोळे येतात. एकसारखी उचकी लागते व त्यावेळेस पाठीत दुखते. खाण्यानंतर उचकी लागते, तान्ह्या मुलांना पिण्यानंतर उचकी लागते. काळसर हिरवट रंगाचे पुष्कळ ओकावयास होते. **गुदद्वारात कंड सुटल्यामुळे झोप येत नाही.** बारीक कृमी. खोकल्यामुळे खोकला जास्त होतो. पायाची नखे मांसात रुततात; व्रण पडतात, हालचालीने बरे वाटते. अंग ताणावेसे वाटते वृद्ध व लहान मुलांचे विकार. गाणे म्हणावेसे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** हवेतील फरक. थंडी. दमटपणा. अंथरुणात. स्पर्श, वाकल्याने, बसल्याने. हलू चोळण्याने. निजलेल्या बाजूस.

ब वा :– मोकळी हवा. घाम आल्याने.

सहाय्यक औषधे :– कॅल्क-का.

संबंधी औषधे :– सिना; सिलि.

---

## २४९. मेलिलोटस Mellilotus

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम **डोके** व रुधिराभिसरण यावर होतो. वेदना व हुळहुळेपणा. तान्ह्या मुलांची आकडी. डोक्याला मार लागल्यामुळे फेफरे यावयास लागते. डोक्यात वेदना होतात व अशक्तपणा वाटतो. **ठिकठिकाणी रक्ताधिक्य होते.** रक्तस्राव लालभडक–पण त्यांनं बरे वाटते. **डोक्यात ठुसठुसणाऱ्या वेदना होतात**, वेड लागेल की काय असे वाटते. नाकातून रक्त गेल्याने किंवा विटाळ सुरू झाल्याने बरे वाटते. कोठेतरी पळून जाऊन लपून बसावेसे वाटते. कांहीतरी संकट येईल अशी किंवा आपल्याला गुन्ह्याकरता पकडतील अशी भीती वाटते, मोठ्याने बोलण्याची भीती वाटते. सर्वजण आपल्याकडे बघत आहेत असे वाटते. डोळे कढत, जड घट्ट मिटावेसे वाटतात. नाक कोरडे, तोंडाने श्वासोच्छ्वास घ्यावा लागतो. नाकातून खूप रक्त जाते. ***चेहरा लालबुंद होतो***. विटाळ थोडा, थांबून थांबून जातो. कष्टार्तव. विटाळसेपणी मळमळते. चालताना गुदमरल्यासारखे वाटते. त्वचा कोरडी.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– विटाळ थांबण्याच्या वयात**, चालताना. हवेतील फरक– वादळ, पावसाळा.

**ब वा :– रक्त गेल्याने. भरपूर लघवी झाल्याने. आंब किंवा खाटी घेतल्याने.**

**संबंधी औषधे :–** ग्लोनो; बेला.

---

## २५०. मोस्कस (कस्तुरी) Moschus

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम ***मज्जातंतू; जननेंद्रिये; श्वासोच्छ्वास*** व रुधिराभिसरण यावर होतो. ***मूर्च्छा येणे***–खाताना, विटाळसेपणी, हृदयविकारात वगैरे. **गुदमरल्यासारखे वाटणे.** आचके; कंप. गोळा आला आहे असे वाटते; पाचर मारल्याप्रमाणे, पिळल्याप्रमाणे किंवा गुणगुणल्याप्रमाणे वाटणे. हिस्टेरिआ. स्वच्छंदी, हट्टी, स्वार्थी, लाडात वाढलेल्या मुली, स्वतःचे छंद पुरविण्याकरता वाटेल ती लुच्चेगिरी करतात. मोहनिद्रा. गारपणा. अनावर हसू येणे, उचकी येणे वगैरे. **थंडी सहन होत नाही.** औषधांची क्रिया योग्यप्रकारे होत नाही व विकारांचा उद्भव यात गुंतागुंत दिसते. फेफरे येताना हुडहुडी भरते. काल्पनिक रोग. अंगावर गार वारे

बद्दात आहे असे वाटते. निजलो तर मरू असे वाटून निजण्याची भीती वाटते.

**मानसिक** :– उतावीळ, कंपयुक्त **व धांदरट.** राग. **मूर्च्छा येईतो** क्षुब्ध होऊन बडबड करणे, रागे भरणे. **भीती वाटते**–आवाजाची, मरणाची परंतु मरणासंबंधीच एकसारखी बडबड. **अनेक तऱ्हेच्या काल्पनिक रोगांचा उद्भव** विशेषतः स्वतःच्या मनासारखे करून घेण्याकरता. काम करण्याचा झपाटा पण अशक्तपणा त्यामुळे हातातील वस्तू पडतात. आपल्याला कोणी तरी गरगरा फिरवीत आहे असे वाटते.

**डोके** :– डोकें दुखताना अंग गार पडते, मूर्च्छा येते व खूप लघवीला होते. घेरी येताना वरून खाली पडत आहोत असे वाटते किंवा स्वतः गरगरा फिरत आहोत असे वाटते.

**डोळे** :– वर वळलेले. स्तब्ध, चकचकित.

**कान** :– तोफेसारखे आवाज होतात. फडफड आवाज होतात. बहिरेपणा.

**चेहरा** :– एक गाल लाल पण गार, दुसरा फिक्ट व कढत. ओठ निळे. खालचा जबडा चावल्यासारखा हालतो.

**जठर** :– जोरजोराने ढेकरा येतात. अन्नाचा तिटकारा, अन्न पाहिले की मळमळते. प्रत्येक पदार्थ बेचव लागतो. काळी काफी, बिअर, ब्रॅन्डी प्यावीशी वाटते.

**उदर** :– वात धरून खूप फुगते, व ताठते, त्यामुळे वस्त्रे घट्ट झाली आहेत असे वाटते. झोपेत न कळत शौचास होते. शौचाला गोडुस वास येतो.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला भरपूर होते. बहुमूत्रता. मधुमेह.

**पुरुषजननेंद्रिये** :– वैषयिक वासना प्रबळ–वृद्धपणीसुद्धा. नकळत वीर्यपात होतो. मधुमेहामुळे आलेले नपुंसकत्व. संभोगानंतर मळमळून ओकारी होते. वैषयिक वासनेमुळे जननेंद्रियात अतिशय गुदगुल्या होऊन शिश्न ताणल्यासारखे वाटून दुखते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– संभोगेच्छा तीव्र त्यामुळे जननेंद्रियात असह्य गुदगुल्या होतात. कष्टार्तव, मूर्च्छा येते.

**श्वसनेंद्रिये** :– **एकदम गुदमरल्यासारखे वाटते किंवा हृदय धडधडावयास लागून काळजी वाटते**–दीर्घ श्वास घ्यावासा वाटतो, ढेकरा आल्याने बरे वाटते. फुप्फुसात पेटके आल्याप्रमाणे वाटतात. खोकला थांबून छातीत कफ घुरघुर वाजतो पण बाहेर काढता येत नाही.

**हृदय** :– धडधडून चिंता वाटते, आपण मरणार असे सारखे म्हणणे. हृदया-भोवती कंप.

**हातपाय** :– एक पंजा लाल व गार, दुसरा फिकट व कढत. दुखतात. अस्वस्थ.

**झोप** :– दिवसा झोप येते, रात्री येत नाही. मिनिटा–मिनिटाला जाग येते.

**ज्वर** :– अंगाला गार वारे लागले की हुडहुडी भरते. डोक्याच्या कातडीला शहारे येतात. अंग गार. अंग तापून आग होते व अस्वस्थपणा येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **थंडी. मनःक्षोभ. स्राव बंद झाल्याने**, विटाळ वगैरे. निजलेल्या बाजूस.

**ब वा** :– मोकळी हवा. चोळण्याने. कस्तुरीच्या वासाने.

**संबंधी औषधे** :– इग्ने; कॅस्टो; नक्स-मो; व्हॅले.

---

## २५१. म्युरिआटिक असिड Muriatic Acid

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम रक्त; *हृदय*; *गुदद्वार*; *तोंड*; पचनेंद्रिये; *जीभ* व मेंदू यावर होतो. शरीर हुळहुळे. *शरीरात खळबळ वाटून अस्वस्थता वाटते*; **पण लवकरच अशक्तपणा येतो आणि इतका थकवा येतो की** निजून रहावे लागते. अंथरुणात खाली घसरणे विशेषतः तापात. डोळे उघडता येत नाहीत व तोंड मिटता येत नाही, स्नायूंची शक्ती क्षीण होते. **भाग निळसर होतात**, जीभ, मूळव्याध, व्रण वगैरे. हातापायांना फाडल्याप्रमाणे वेदना होतात, *आग होते*. भाग-कोरडे पडतात त्यातून रक्त येते, भेगा पडतात व **खोल व्रण पडतात. स्राव दुर्गंधी**, पातळ, करवडणारे. अतिशय रक्तस्राव. टाइफाईडसारखे ज्वर, दोषी ज्वर. एखाद्याच भागात ठुसठुसते.

**मानसिक** :– अंतर्मुख. **खिन्न, अबोल.** चिडखोर. **पुटपुटणे. एकसारखे मोठ-मोठ्याने कण्हणे.** यातना शांतपणे सोसण्याची वृत्ति.

**डोके** :– उजव्या कुशीवर झोपल्याने घेरी येते. मेंदू हुळहुळा. डोक्याच्या मागील भागात दुखते, **शिसे ठेवल्याप्रमाणे** जड होते, एखाद्या वस्तूकडे एकटक पाहिल्याने जास्त. डाव्या डोळ्यावर मधुनमधुन दुखते व त्यावेळेत उजवा हात वरून खाली बधिर होतो व बोलता येत नाही. केस उभे राहिले आहेत असे वाटते.

**डोळे** :– वस्तूचा अर्धा भाग दिसतो. बसले असताना डोळे थकल्यामुळे मिटतात.

**कान** :– बोलण्याचा आवाज सहन होत नाही. कानाच्या मागील हाडाच्या उंचवट्यापासून मानेपर्यंत दुखते–स्पर्श केल्याने जास्त. बहिरेपणा. दूरच्या आवाजाने डोके दुखावयास लागते.

**नाक** :– नाकातून रक्त पडते. शिंका येतात.

**चेहरा** :– काळसर किंवा चमकणारी लाली येते. पंजे गार व तहान लागत नाही. ओठावर खपल्या बसतात, भेगा पडतात व ते हुळहुळे होतात तोंड वासलेले. उन्हामुळे चेहऱ्यावर पुटकुळ्या येतात.

**तोंड** :– कोरडे. जीभ जड, ताठलेली, आकसलेली किंवा भाजल्याप्रमाणे दिसते. जिभेवर खोल व्रण पडतात, आत टणक गाठी येतात. जिभेच्या कडा निळसर लाल, तोंड येते. आंबट किंवा गोड खाल्ल्याने दातातून कळा येतात. दातावर कीट साचते. हिरड्या सुजलेल्या. रक्त येते.

**घसा** :– कोरडा व छातीत आग होते, गिळण्याचा प्रयत्न केला तर आचके येऊन गुदमरल्यासारखे होते. गिळण्याची क्रिया आपोआप होते.

**जठर** :– मांस खाण्याचा तिटकारा. जठरातील आम्लत्व कमी होते, त्यामुळे खाल्लेले अन्न पचत नाही.

**उदर** :– भरपूर शौचास न कळत होते. लघवी करताना किंवा वात सरताना शौचास नकळत होते. लघवी करताना गुदद्वार बाहेर येते. अतिशय हुळहुळी मूळव्याध, शेकल्याने कमी होते. गरोदरपणी मूळव्याध होते; मोड निळसर, कढत व भयंकर टोचणारे. थोडे जरी अन्न खाल्ले तरी उदर भरल्यासारखे वाटून फुगते. विटाळसेपणी गुदद्वार हुळहुळे होते. उदरात व जठरात पोकळ झाल्यासारखे वाटते, सकाळी व शौचानंतर.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्राशयाच्या स्नायूंच्या शक्तीची क्षीणता. लघवी सुटण्याकरता इतके कुंथावे लागते की गुदद्वार बाहेर येते. लघवी लवकर सुटत नाही. शौचास होतानाच लघवीला होते. लघवी रात्रंदिवस भरपूर होते, वात सरताना लघवी.ला होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळसेपणी गुदद्वार हुळहुळे होते. जननेंद्रियावर व्रण पडतात.

**हृदय** :– नाडीचे ठोके प्रत्येक तिसऱ्या ठोक्याला थांबतात. नाडी भरलेली, मऊ; अशक्त, जलद.

**हातपाय** :– हातापायाची बोटे लाल, सुजलेली व आग होते. मांड्या शिणल्या-प्रमाणे वाटतात. चालताना लटपटल्यासारखे वाटते. टाचेच्या स्नायुबंधात दुखते. हाताच्या आंगठ्याच्या बुडाशी लिहिताना पेटके येतात, हलविल्याने कमी होतात.

**त्वचा** :– पंज्यांच्या मागील बाजूस पापुद्रे बसल्याप्रमाणे उगवण येते. व्रणात चालताना ठुसठुसते. उन्हामुळे त्वचेवर पुटकुळ्या येतात. उन्हामुळे झालेला इसब.

**ज्वर** :– पहाटे अंथरुणात असताना अंग गार होते. तापात अंगाची अतिशय आग होते व त्यामुळे पांघरूण घ्यावेसे वाटत नाही. अतिज्वर. नाडी मधुन मधुन थांबते, बहुधा ३ ऱ्या ठोक्याला.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– स्पर्श; पावसाळ्यात; चालताना; गार पेयाने; आंघोळ केल्याने; बसल्याने; मनुष्याच्या आवाजाने.

**क मी** :– हालचाल; उष्णतेने; डाव्या कुशीवर निजल्याने.

**संबंधी औषधे** :– बॅप्टि; ब्रायो.

---

## २५२. म्युरेक्स Murex

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***स्त्रीजननेंद्रियावर होतो***. शरीर अकाली थकलेले, अशक्तपणा. क्षीण. घाबरट, आनंदी, प्रेमळ स्त्रिया. पडून रहावेसे वाटते पण त्याने बरे वाटत नाही, त्रास होतो.

**मानसिक** :– भीती व काळजी वाटते. धुपणीचा स्राव चालू असला म्हणजे मानसिक स्थिती चांगली असते. अतिशय उदासीन, खिन्न.

**डोके** :– मागील भागात पिळल्यासारखे वाटते, वर हात ठेवल्याने किंवा डोके मागे वाकविल्याने बरे वाटते.

**नाक** :– गार. सर्वदिवस, त्रासदायक भावना.

**जठर** :– एकसारखी खा खा; खाण्यानंतर सुद्धा भूक असते. **पोटात गळून गेल्याप्रमाणे वाटते.**

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला वारंवार जावे लागते, विशेषतः रात्री. लघवीला जटामांसी-सारखा वास येतो लघवी होताना थोडे रक्त जाते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– इंद्रिये ते उदरातून स्तनापर्यंत वेदना होतात, टोचते; किंवा डावे रजःपिंड ते उजवे स्तन किंवा उजवे रजःपिंड ते डावे स्तन अशा वेदना होतात. कामोन्माद, जननेंद्रियाना जरा स्पर्श झाला की **संभोगाची इच्छा प्रबळ होते. गर्भाशय वेदनायुक्त हुळहुळे** होते; खाली ओढ लागल्याप्रमाणे वेदना होतात; गर्भाशय असल्याची जाणीव होते. **पायाची घट्ट आढी घालून बसणे भाग पडते.** विटाळ भरपूर जातो, आत गाठी पडतात. धुपणी दाट, पिवळी, हिरवी, रक्तमिश्रित. धुपणी व मानसिक लक्षणे आलटुन पालटून होतात. ओटीपोटात एका हुळहुळ्या जागेवर काहीतरी दाबले जात आहे असे वाटते– बसल्याने जास्त होते. विटाळसेपणी स्तनात दुखते. स्तनाची गुल्मे.

**पाठ** :– कंबर दुखून चालावेसे वाटते पण चालण्याने कंबर जास्त दुखते.

**त्वचा** :– पित्ताच्या गांधी. कोरडी, इतकी की फुटेल असे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– स्पर्श; उन्हात; बसल्याने; **वाखा झाल्याने.** निजल्याने.

**ब वा** :– विटाळशी होण्याच्या अगोदर. खाण्याने. दाब. आधार. डोके मागे वाकविल्याने.

**संबंधी औषधे** :– प्लॅटि; लिलि–टि; सेपि.

---

## २५३. युआनिमस Euonymus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **यकृत, मूत्रपिंड**; डावी ते उजवीकडे यावर होतो. मुंग्या येतात विशेषतः पाठीला. **घेरी** कपाळात जाणवते, वर उचलून पुढे ढकलल्याप्रमाणे वाटते. भुवयावर दाबल्यासारखे वाटते; त्यामुळे डोळे दाबल्यासारखे वाटतात. यकृत मोठे होते; पित्ताचे खडे होतात; बेंबीजवळ वेदना होतात. शौचास भरपूर होते व त्याचे रंग रूप बदलत जाते किंवा अनेक रंगी शौचास होते. शौचास रक्त पडते. लघवी भडभडून होते. लघवीतून अल्बुमिन जाते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– खाण्याने. संध्याकाळी.

**ब वा** :– गार वाऱ्यात; दाबल्याने.

---

# २५४. युपेटोरिअम परफॉलिएटम

## Eupatorium Parfoliatum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *हाडे*; जठर; यकृत; डोक्यामागील भाग; स्नायू– छातीचे, पाठीचे; हातापायांचे यावर होतो. *हाडांत फुटल्याप्रमाणे भयंकर ठणका लागतो.* मार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा व ठणका विशेषतः पाठीत. अस्वस्थपणा, थंडी वाजते व मळमळते. सर्दी. इन्फ्लुएन्झा. पित्तप्रकोप; डोळे, चेहरा, ओकारी पिवळी. अशक्तपणा. दारू पिऊन ढासळलेली प्रकृति.

**मानसिक :–** कण्हणे, अंगाला ठणका लागल्यामुळे.

**डोके :–** घेरी, डावीकडे झोकांडे जातात, उजव्या कुशीवर निजल्याने जास्त होते, ओकारी झाल्याने बरे वाटते. डोके हुळहुळे होऊन ठुसठुसते विशेषतः डोक्याच्या मागील भागात. वातरक्ताच्या वेदना व डोकेदुखी आलटुन पालटून होते. अर्धशिशी. डोक्याला धातूची टोपी घातली आहे असे वाटते. दर तिसऱ्या किंवा सातव्या दिवशी येणारी डोकेदुखी.

**डोळे :–** हुळहुळे होऊन ठणकतात, डोके दुखत असताना. पिवळे.

**नाक :–** शिंका येतात. सर्दी, सर्वांग ठणकणे.

**चेहरा :–** एकाएकी गालाचे (उजव्या) स्नायू आखडतात.

**तोंड :–** जीभ पिवळी. चव कडू. कोपऱ्यात भेगा पडतात.

**जठर :–** अतिशय तहान लागते पण पाणी प्याले तर **कडू पित्ताची ओकारी** होते किंवा थंडी वाजते. ओकारी व जुलाबात नुसते हिरवे व भरपूर पित्तच पडते. ओकारी होण्याच्या अगोदर तहान लागते. शौचास पांढुरके होते. आइसक्रिम खावेसे वाटते. उचकी लागते. त्रासदायक वेदना ओकारी झाल्याशिवाय थांबत नाही. घट्ट कपडे त्रासदायक होतात. यकृत हुळहुळे.

**मूत्रेंद्रिये :–** लघवी कधी भरपूर होते कधी थोडी होते.

**श्वसनेंद्रिये :–** आवाज बसतो विशेषतः सकाळी. कंठात गुदगुल्या होऊन वेदनायुक्त खोकला येतो. खोकताना डोक्यात दुखते व **छाती धरून ठेवावी** लागते. छाती हुळहुळी होते, आत खवखवल्याप्रमाणे वाटते. पोटावर निजल्याने खोकला कमी होतो.

**हृदय :–** अगदी लहान जागेत आहे असे वाटते.

**पाठ** :– मार लागल्याप्रमाणे पाठीत ठणका लागतो. खालून वर ठणका लागतो.

**हातपाय** :– हाडात फूट लागते, स्नायू हुळहुळे होतात. हात व मनगटे ठणकतात. पायाचा आंगठा सुजतो. वातरक्त. पायाना विशेषतः पावले व घोटे याना जलयुक्त सूज येते (हिवतापानंतर) पायाच्या बोटांच्या सांध्यावर वेदनायुक्त गाठी येतात.

**ज्वर** :– तहान लागते किंवा मळमळते नंतर जोराची हुडहुडी भरते, पाठीच्या खालच्या भागातून थंडी वाजण्यास सुरवात होते. थंडीनंतर किंवा तापात **कडू ओकारी होते.** तापात अंगाची आग होते. घाम थोडा येतो. घाम आल्याने बरे वाटते पण डोके दुखणे कमी होत नाही. सर्वांग ठणकते. हिवताप. इन्फ्लुएंझा.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो**:– ***थंड वारे.*** हालचाल– ***नियमित वेळी***. सकाळी ७ ते ९, दर तिसऱ्या किंवा सातव्या दिवशी. खोकताना. अन्नाकडे पाहिल्याने किंवा वासाने.

**ब वा** :– **पित्ताची ओकारी झाल्याने.** घाम आल्याने. पोटावर निजल्याने. बडबड केल्याने.

**सहाय्यक औषधे** :– नेट्र–मू; सेपि.

**संबंधी औषधे** :– नक्स-व्हा; ब्रायो.

---

## २५५. युपेटोरिअम पुरपुरिअम
## Eupatorium Purpurium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम मूत्रेंद्रियावर होतो. थंडी व वेदना खालून वर जातात. नपुंसकत्व व वंध्यात्व. घरी असूनसुद्धा घरी जावेसे वाटते. डोके डाव्या बाजूस दुखते व घेरी येते. मूत्रपिंडात ठणका लागतो. मूत्राशयात व मूत्रमार्गात लघवी करताना आग होते. मूत्राशय तुंबल्यासारखा वाटून एकसारखे लघवीला होईल होईलसे वाटते. लघवी थोडी थोडी व कष्टाने होते, गरोदरपणी, खडबडीत रस्त्यावरून गाडीतून गेल्याने. रजःपिंडाची क्रिया योग्य न झाल्यामुळे आलेले वंध्यात्व. मूत्रपिंडाचा शोथ, लघवीला भरपूर होते, बहुमूत्रता. लघवी दुधासारखी पांढरी. लघवी सुवासिक. स्त्रियांचे लघवीचे उपद्रव. जननेंद्रिये (योनिद्वार) ओलसर आहेत असे वाटते. लघवीतून अल्बुमिन जाते.

जलयुक्त सूज, नाळगुद व त्याने उत्पन्न झालेला दमा. लघवीची धार बारीक. पाठीत व कमरेत जडपणा.

जा. हो :– हालचाल. स्थिती बदलल्याने.

---

## २५६. यूफोरबिअम Euphorbium

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम श्लेष्मल त्वचा; हाडे; दात व त्वचा यावर होतो. अंतर्गत आग, हाडात– विशेषतः रात्री. हाडे कुजतात. स्राव वाहतात व त्यामुळे कोरडेपणा आल्यासारखा वाटतो. लुले पडल्याप्रमाणे अशक्तपणा येतो विशेषतः सांध्यात. शोथ हळुहळु वाढत जातो. कॅन्सरच्या वेदना, असह्य आग. प्रत्येक वस्तु आहे त्यापेक्षा मोठी आहे असे वाटते. एकसारख्या शिंका येतील असे वाटते पण चांगल्या येत नाहीत. सर्दी होते, नाक सुजते. पिनस स्राव करवडणारा. तोंड आतून कुजकट चरबीने माखले आहे असे वाटते. खूप खारट लाळ गळते. गार पाण्याची तहान लागते. दात ढिसूळ होऊन त्यांचे तुकडे पडतात. दात एकमेकाशी स्क्रूने जखडले आहेत असे वाटते. खोकताना पोटाच्या खालीतून छातीच्या दोन्ही बाजूस टोचते. कढत अन्न गिळल्याप्रमाणे छातीत गरम झाल्यासारखे वाटते. धावरे –मोठमोठे भाजल्यासारखे पिवळे फोड येतात विशेषतः उजव्या बाजूस. श्लेष्मल त्वचेचे धावरे. अतिज्वर.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** बसताना. विश्रांतीने. हालचालीच्या सुरवातीस. पारा.

क था :– तेल लावल्याने. गार पाण्याने हालचाल.

**संबंधी औषधे :–** नाय–ॲसि; सल्फ.

---

## २५७. युफ्रेसिआ Euphrasia

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम डोळे; नाक; व छाती यावर होतो. स्राव पाण्यासारखे करवडणारे व भरपूर. पू करवडणारा.

**डोके :–** दुखत असताना नाका-डोळ्यातून पाणी येते.

**डोळे :–** *डोळ्यातून एकसारखे पाणी येते, पाणी भरपूर कढत किंवा करवडणारे,* मोकळ्या हवेत, निजल्याने किंवा खोकताना जास्त. डोळे

पाण्यात तरंगत आहेत असे दिसते. डोळ्यापुढे केस लोंबत आहे असे वाटते, सारखे पुसावेसे वाटतात. एकसारखे मिचकाविणे, मोकळ्या हवेत जास्त होते. काळ्या बुबुळावर बारीक फोड येतात. सारा. खोकताना किंवा निजल्याने डोळ्यातून पाणी जास्त येते. अश्रूमुळे रोगण लावल्याप्रमाणे डाग पडतात; उजेड सहन होत नाही. पापण्या घट्ट मिटलेल्या. डोळयात दाबून कापल्याप्रमाणे वेदना होतात. डोळ्यातील पू चिकट. पापण्याचा कडा लाल होऊन आग होते व कंड सुटते. डोळे लालबुंद होतात. डोळे येतात, गोवरात, विटाळाऐवजी. जीर्ण डोळेदुखी. मोतिबिंदु तयार होताना डोळ्यातून पाणी येते.

**नाक** :– नाकातून भडभळून पाणी येते **पण ते बिन करवडणारे असते.**

**जठर** :– खाकरताना ओकावयास होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ एक तास किंवा एकच दिवस जातो. विटाळ बंद होतो व पाळीच्या ऐवजी डोळे येतात.

**श्वसनेंद्रिये** :– खोकला ओला, फक्त दिवसाचाच कफ पडतो, खोकला रात्री निजल्यानंतर कमी होतो, डांग्या खोकला–डोळ्यातून पाणी येते.

**झोप** :– मोकळ्या हवेत चालताना एकसारख्या जांभया येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *सूर्यप्रकाशात. वाऱ्यात.* **उष्णतेने. खोलीत.** संध्याकाळी.

**ब वा** :– **मोकळ्या हवेत**. डोळे मिचकावण्याने. डोळे पुसण्याने.

**संबंधी औषधे** :– सेपा.

---

## २५८. युरेनिअम नायट्रिकम Uranium Nitricum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम मूत्रेंद्रियावर होतो. मूत्रपिंडाचा शोथ; मधुमेह; यकृताची विकृति; रक्तदाब वाढतो. अतिशय शरीर वाळते, थकवा येतो. जलयुक्त सूज, जलोदर नाळगुद अतिशय तहान लागते, मळमळ, ओकावयास होते. अतिशय भूक लागते, खाण्यानंतर पोटात वात धरतो; जठरात आग होते. जठरातील व्रण. लघवीला भरपूर होते. लघवी होताना मूत्रमार्गात आग होते. लघवी आवरून धरली तर वेदना व्हावयास लागतात. लघवीला न कळत होते. नपुंसकत्व पण रात्री स्वप्नावस्था होते.

---

## २५९. रॅटेन्हिआ Ratanhia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **गुद; गुदद्वार;** स्तनाग्रे व दात यांवर होतो. **रक्तस्राव. आवळल्यासारखे वाटणे. भेगा पडतात.** स्त्रियांना नाजुकपणामुळे वारंवार वाखा होत असेल तर या औषधाचा शक्तिवर्धक म्हणून उपयोग होतो.

**डोके** :– मेंदू कपाळातून बाहेर पडेल असे वाटते. शौचाच्या वेळी कुंथताना डोक्यात फुटल्याप्रमाणे वेदना होतात.

**डोळे** :– पापण्या ताठल्यासारख्या वाटतात.

**तोंड** :– दातातून गार वारे येत आहे असे वाटते. रात्रीचे दात दुखतात, निजल्याने जास्त दुखतात त्यामुळे चालावे लागते. उजव्या बाजूस कोळिष्टके चिकटली आहेत असे वाटते.

**जठर** :– तीव्र स्वरूपाची वेदनायुक्त उचकी. जठरात चाकूने कापल्याप्रमाणे वेदना होतात, ढेकर आल्याने बरे वाटते.

**उदर** :– **गुद आवळल्यासारखे वाटते किंवा आत धारेचे तुकडे ( काचेचे ) आहेत असे वाटते;** अतिशय कुंथावे तेव्हा शौचास होते, नंतर **बराच वेळपर्यंत आत ठणका लागतो व आग होते;** गार पाण्याने बरे वाटते. गुदद्वाराला भेगा पडतात. त्यामुळे आवळल्यासारखे वाटून भाजल्याप्रमाणे आग होते. गुदद्वार कोरडे किंवा कंड सुटते. बारीक कृमि पडतात. जंत. मूळव्याध. शौचातून किंवा तसेच रक्त पडते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– अंगावर पाजणाऱ्या स्त्रियांच्या स्तनाग्राना भेगा पडतात. गरोदरपणी रात्री उठून चालणे भाग पडते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– रात्री. उष्णतेने. काळजीने. श्रमाने, स्पर्श. शौचास कुंथताना.

**ब वा** :– गार पाणी लावल्याने. मोकळ्या हवेत चालण्याने. कढत पाण्याने.

**संबंधी औषधे** :– नाय–ॲसि; पिओनि.

---

## २६०. रॅननकुलस बल्बोसस Ranunculus Bulbosus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मज्जातंतू;* स्नायू; डोळे; *छाती; त्वचा* हातापायांची बोटे; व डावी बाजू यावर होतो. *वेदना*– **टोचल्याप्रमाणे,**

भोसकल्याप्रमाणे. **एकदम तीव्र कळा** येतात त्यामुळे डोळ्याला पाणी येते, व कापरे भरते, स्वस्थ राहवत नाही. आग, चुणचुण, मार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा, किंवा खोल व्रण पडून होत असल्याप्रमाणे वेदना. कंप. फुगल्याप्रमाणे वाटणे. दारू पिण्याचे, दुखापतींचे दुष्परिणाम. सर्वांगात धक्के बसतात. लहान जागा हुळहुळ्या होतात. वारं व स्पर्श सहन होत नाही. एकदम अशक्तपणा वाटून मूर्च्छा येते. अशक्तपणा व झोकांडे जाणे विशेषतः दारुड्याचे. जून गृध्रसी वात. फफेरे; दारुड्यांचे. ओला कपडा ठेविला आहे असे वाटते, विशेषतः छातीवर, मोकळ्या हवेत गेल्याने जास्त वाटते.

**मानसिक** :– भांडखोर. रागामुळे अंग कापते. भूतांची अतिशय भीती वाटते, विशेषतः संध्याकाळी, त्यावेळेस एकटे असण्याची भीती वाटते. उदासीनता; मरावेसे वाटते. दारुड्याचा वात व उचकी.

**डोके** :– डोक्याच्या कातडीत मुंग्या आल्यासारखे वाटते. डोके फुगून मोठे झाल्यासारखे वाटते.

**डोळे** :– धूर गेल्याप्रमाणे चुणचुणतात, दिवसा व रात्री दिसत नाहीं. काळ्या बुबुळावर वेदनायुक्त बारीक फोड येतात, उजेड सहन होत नाही, डोळ्यातून पाणी येते. डोळे फिरविताना दुखतात. वस्तूचा अर्धा भाग दिसतो; गरोदरपणी.

**नाक** :– आत मुंग्या येतात, गुदगुल्या होतात, खाकरून व नाक शिंकरून त्या कमी करण्याचा प्रयत्न करणे.

**तोंड** :– टाळा खाजतो–खाजवावेसे वाटते. लाळ वाढलेली. घशात खालपर्यंत खरवडल्यासारखे वाटून आग होते. ओठाना पेटके येतात, आचके येतात.

**उदर** :– उदराला स्पर्श सहन होत नाही. चिमटे घेतल्याप्रमाणे वेदना होतात. छातीतील व उदरातील वेदना आलटून पालटून होतात. दोन्ही कुशीत मार लागल्याप्रमाणे वाटते. दारुड्यांची उचकी.

**श्वसनेंद्रिये** :– श्वासोच्छ्वास जड व काळजीयुक्त. *छातीत* ( दोन्ही बाजूस ) ***तीव्र कापल्याप्रमाणे किंवा टोचल्याप्रमाणे वेदना होतात.*** मोकळ्या हवेत चालताना, गार हवा आत गेल्याने छाती गार झाल्यासारखी वाटते किंवा छातीला ओले फडके गुंडाळले आहे असे वाटते. बरगड्यामधील स्नायूत वेदना होतात. प्लुरिसी. रागामुळे दम लागतो.

**पाठ** :– तिकोनी हाडाच्या आतील कडअवळ दुखते, वाकून बसल्याने, विणकाम करताना, टाईप करताना, पिआनो सारखी वाद्ये वाजविताना जास्त. तिकोनी हाड चिकटलेले.

**हातपाय** :– तळहात खाजतात. हातांच्या बोटाना मुंग्या, गुदगुल्या होतात.

**त्वचा** :– वेदनायुक्त पुटकुळ्या येतात. **फोड** ***निळसर***, आतून करवडणारी लस येते. टणक खपल्या बसतात. आग होते; अतिशय कंड सुटते, स्पर्शाने जास्त. नागीण.

**ज्वर** :– थंडी वाजण्याची प्रवृत्ति.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **हवा– दमट, गार, मोकळी. झुळुक. हवेतील** फेरबदल. शरीराच्या स्थितीत **फेरबदल. दारू.** संध्याकाळी. **हालचाल–** हातांची. श्वास आत घेतल्याने. स्पर्श. खाण्याने. भीती. मनस्ताप. पाऊस व वादळ. हातपाय ताणल्याने.

**क** **मी** :– उभे राहिल्याने,

**संबंधी औषधे** :– कॅन्था; ऱ्हस-टा.

---

## २५१. रॅननकुलस स्क्लेरेटस Ranunculus Scleratus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***छाती***; ***त्वचा***; टाळू व उजवी बाजू यावर होतो. करवडणे, हुळहुळेपणा किंवा **आग-चुणचुण. कुरतडल्याप्रमाणे** ठेचल्याप्रमाणे वेदना. वेदनामुळे मूर्च्छा येते किंवा दम लागतो. आचके बसतात.

**मानसिक** :– आळस, मानसिक काम करावेसे वाटत नाही.

**डोके** :– टाळूत किंवा दोन्ही कानशिलात गुद्दी आहे असे वाटते. कुरतडल्याप्रमाणे वेदना होतात. कातड्यात कंड व चावल्यासारखे वाटते.

**नाक** :– सर्दी होते, शिंका येतात व लघवी होताना आग होते.

**तोंड** :– दात बधिर. जिभेवर रंगीबेरंगी चट्टे (नकाशाप्रमाणे). जिभेची आग होते व हुळहुळी होते.

**उदर** :– रात्री १२ नंतर मळमळते. बेंबीखाली पाचर मारली आहे असे वाटते. यकृताच्या जागी दुखते व त्यावेळेस जुलाब होतील असे वाटते.

**श्वसनेंद्रिये** :– **बरगड्यामध्ये पाचर मारली आहे असे वाटते.** छातीच्या मध्यभागी आग होते व हुळहुळे झाल्यासारखे वाटते. हृदयाजवळ पाचर मारली आहे असे वाटते.

**हातपाय** :– लहान सांधे धरतात. गुडघ्यात कुरतडल्याप्रमाणे वेदना होतात. घट्टे पडलेल्या जागी आग होऊन हुळहुळते, लोंबकळत ठेवल्याने जास्त.

**झोप** :– भयंकर स्वप्ने पडतात, प्रेतांची, सापांची, लढाईची वगैरे.

**त्वचा** :– पिवळे फोड येतात. भाजल्याप्रमाणे मोठाले फोड येऊन आतून करवडणारी लस येते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– संध्याकाळी. हालचाल. दीर्घ श्वास घेतल्याने. स्पर्श. हातपाय. लोंबकळत ठेवल्याने.

**ब था** :– मध्यरात्री नंतर.

**संबंधी औषधे** :– आरम-ट्रा; आर्से.

---

## २६२. रॅफेनस ( काळामुळा ) Raphanus

**सर्वसाधारण** :– या औषधामुळे पित्त व लाळ वाढते. पांथरीत व यकृतात टोचते. गोळा आल्यासारखे वाटते विशेषतः गर्भाशयातून वर घशापर्यंत व तो कढत असतो. अतिशय वात धरून उदर नगाऱ्याप्रमाणे फुगते; वात कोंडतो, खाली वर सरत नाही. उदरावर शस्त्रक्रिया केल्यानंतर वात धरून त्यामुळे वेदना होतात. ओकारीत मळ पडतो. स्त्रियांना मुलांचा विशेषतः मुलींचा तिटकारा वाटतो. कामोन्माद, वैषयिक वासना प्रबळ झाल्यामुळे झोप येत नाही. लघवी भरपूर होते, दुधासारखी दाट पांढरी; किंवा पाणी पिण्याच्या मानाने कमी होते. छातीच्या मध्यभागी जड गोळा बसला आहे असे वाटते आणि गारवा वाटतो. हिस्टेरिआ. एक पाऊल गार.

---

## २६३. रुमेक्स Rumox crispus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम कंठ; श्वासनलिका; *गळ्याची खळगी*; आतडी; त्वचा; सांधे; छाती (डावी बाजू); घोटे व डावी बाजू यावर होतो. **श्लेष्मल त्वचा कोरडी व हुळहुळी. चिकटपणा व आग.** प्रत्येक वेळेस सर्दी झाली की सांधे धरतात. तीव्र वेदना. लठ्ठपणा. स्राव वाढलेले विशेषतः डोळे, नाक, श्वसनेंद्रिये या भागातून. अनेक प्रकारच्या वेदना होतात व त्या एके ठिकाणी कायम रहात नाहीत.

**मानसिक** :– चेहऱ्यावर गंभीरपणा व खिन्नता. आजुबाजूच्या परिस्थितीच्या बाबतीत उदासीनता.

**डोके** :– डाव्या बाजूस चमका मारतात.

**डोळे** :– घरात डोळयाची आग होते; सकाळी फुगतात.

**नाक** :– सर्दी होते, सारखे नाक गळत राहते व मधुनमधुन जोरजोराने शिंका येतात. नाकाचा मागील भाग कोरडा. कफ घशापर्यंत येते.

**चेहरा** :– तारवटल्याप्रमाणे. उभे राहिल्याने फिकट होतो.

**घसा** :– एकसारखा चिकट कफ खाकरून काढावा लागतो. घसा पोकळ झाला आहे असे वाटते. घशात गोळा आहे असे वाटते, व तो गिळताना खालीवर होतो, खाकरल्याने कमी होत नाही.

**जठर** :- अतिशय भूक लागते. खाण्यानंतर डाव्या स्तनात दुखते. बोलण्याने त्रास होतो. जठरात वेदना होताना पाठीत ठणका लागतो, दीर्घश्वास घ्यावासा वाटतो. पोटाच्या खळीत जड होऊन ठणका लागतो, पाठीपर्यंत जातो, गुदमरल्यासारखे वाटते.

**उदर** :– वात धरून आवाज होतो. **सकाळी ( ५ ते ९ ) घाई होऊन दुर्गंधी, भरपूर पिंगट, पाण्यासारखे जुलाब होतात** व त्यावेळेस खोकला येतो विशेषतः क्षयात. बेंबीजवळ मुंग्या येतात, दुर्गंधिवात सरल्याने बरे वाटते. गुदात कंड सुटते व आत काटकी आहे असे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– एकदम लघवीला लागते; नकळत होते; खोकताना.

**स्त्रीजननेंद्रिये** :–उजव्या रजःपिंडापासून मागे पाठीपर्यंत दुखते. डाव्या स्तनाखाली दुखते. हृदयाजवळ छातीत टोचते, आग होते; दीर्घ श्वास घेतल्याने जास्त.

**श्वसनेंद्रिये** :– गुदमरल्यासारखे वाटते. झोपेच्या वेळेस रात्री दम लागतो. *गळयाच्या खळीत* पिसाने किंवा धुळीने *गुदगुल्या झाल्यासारखे वाटून खोकला येतो* किंवा *प्रत्येक गार वाऱ्याच्या श्वासागणिक एकसारखा खोकला येतो*– **तोंड मिटल्याने, तोंडावर हात ठेविल्याने, किंवा डोक्यावरून पांघरूण घेतल्याने कमी होतो.** भरपूर फेसाळलेला, पातळ, तोंड भरभरून कफ पडतो. खोकला बोलताना व रात्री ११ वा. जास्त येतो. भुंकल्याप्रमाणे खोकला. **गळयाच्या हाडाखाली ( डाव्या ) दुखते,** हुळहुळे झाल्यासारखे वाटते किंवा आग होते, तेथे गार वारे शिरत आहे असे वाटते, खाकरताना जास्त. **छातीच्या मध्ये चपटया हाडाखाली दुखते.** छाती हुळहुळी.

**हृदय** :– थांबल्यासारखे वाटून नंतर सर्व छातीत जोराने ठुसठुसावयास लागते.

**पाठ** :– खोकताना डाव्या खांद्यात दुखते किंवा हात वर करताना डाव्या खांद्यात दुखते. उजवे तिकोनी हाड दुखते. घोट्यात व पावलाना मधुन मधुन पेटके येतात. खोकताना पंजे गार होतात.

**त्वचा** :– अंग उघडे झाल्याने खाजावयास लागते. पाठीवर पुटकुळया येतात ( तरुणपणी ). वारे लागल्याने सर्व पाय खाजावयास लागतात. चित्ताच्या गांधी, एकसारखी कंड.

**झोप** :– एकदम गुंगी येते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *गार हवा नाकात ओढल्याने*; **गार** मोकळी हवा, झोंबणारी हवा. उघडे झाल्याने. रात्री. दाबल्याने. श्वासनलिकेवर दाबल्याने. बोलण्याने. दीर्घश्वास किंवा अनियमित श्वास घेतल्याने.

**ब या** :– तोंड झाकल्याने. पांघरूण घेतल्याने.

**संबंधी औषधे** :– कास्टि; सेनेगा.

---

## २६४. रुटा Ruta Graveolens

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **डोळे**; सांधे; स्नायुबंध; मनगट; घोटे; पाठ (कंबर); **गर्भाशय व त्वचा** यावर होतो. *मार लागल्या-प्रमाणे हुळहुळेपणा, ठणका व अस्वस्थपणा.* शीण येऊन शरीर दुखते. जडपणा. कपाळावर ओझे आहे असे वाटते किंवा पावलाना जड ओझे लोंबत आहे असे वाटते. **खरखरीत पण बोथट पाचर मारल्याप्रमाणे वाटते**, नाकात, डोक्यात वगैरे. टणक आवाळू. हालचाल करणे **अशक्य होण्याइतका ताठपणा**. अवयव वेडेवाकडे होणे. सांध्यात स्नायुबंधात गाठी होतात. संधिवात. **कुरतडल्याप्रमाणे वेदना**. आग. लचकणे, मुरगळणे. हाडांच्या दुखापती विशेषतः ठेचल्याने झालेल्या. हाडे ढिसूळ होतात; हाडे मोडणे. ओझी नेल्यामुळे होणारे दुष्परिणाम. लचक भरलेल्या भागात नंतर लुलेपणा येतो. ज्या बाजूवर भार पडला असेल तो भाग हुळहुळा होतो.

**मानसिक** :– असंतुष्ट स्वतःविषयी व दुसऱ्याशी. आपल्याला कोणीतरी फसवित आहे अशी कल्पना. चिडखोर, भांडखोर, विरुद्ध बोलणे, करणे.

**डोके** :– डोळ्यांच्या श्रमाने डोके दुखावयास लागते. वाचताना चमका मारतात. खिळा मारल्याप्रमाणे ठणका लागतो.

**डोळे** :– लाल, कढत, आग होते. डोळ्यातून पाणी येते. डोळे दुखावयास लागतात– शिवताना, बारीक अक्षरे वाचताना. **दृष्टि मंद**, आतील कोपरे खाजतात. खालची पापणी लवलवते, ती थांबल्यानंतर डोळ्यातून पाणी येते.

**कान** :– आत लाकडाचा तुकडा आहे असे वाटून दुखतो.

**नाक** :– घाम येतो. रक्त येताना बुंध्याशी दाबल्याप्रमाणे दुखते.

**तोंड** :– चव लाकडाप्रमाणे. जिभेत पेटके येऊन बोलण्यात अडथळा येतो.

**जठर** :– खाताखाता एकदम मळमळावयास लागून अन्न ओकून पडते. आग, कुरतडल्याप्रमाणे वेदना. ओझे उचलल्यामुळे आलेले अग्निमांद्य, पचनक्रिया बिघडते. बर्फाचे पाणी प्यावेसे वाटते. जठरात ताणल्यासारखे वाटते, दूध प्याल्याने बरे वाटते.

**उदर** :– पाथरी मोठी होते, व दुखते. कुंथल्याशिवाय शौचास होत नाही. शौचाबरोबर रक्त पडते. शौचास होईल असे वाटते परंतु नुसतेच **गुद बाहेर** येते. बाळंतपणानंतर गुदद्वार बाहेर यावयास लागते. ओणवे झाल्याने गुदद्वार बाहेर येते. बसले असताना गुदात फाडल्याप्रमाणे टोचते. गुदाचा कॅन्सर. ओणवे झाले की शौचास होते. गुदात मळमळ जाणवते. गुद बारीक होते.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्राशयसारखा भरल्यासारखा वाटतो, किंवा वरखाली होत आहे असे वाटते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– करवडणारी धुपणी, विशेषतः अनियमित पाळयामुळे किंवा विटाळ बंद झाल्यामुळे.

**श्वसनेंद्रिये** :– छाती घट्ट होऊन दम लागतो. दाट, पिवळा कफ पडल्यानंतर छातीत अशक्तपणा वाटतो. मध्यभागी हाडात एका जागी दुखते.

**पाठ** :– कंबर अशक्त, मार लागल्याप्रमाणे ठणका. कमरेच्या सांध्यात व पायाना मार लागल्याप्रमाणे ठणका लागतो. विशेषतः सकाळी. तळहातात टणक आवाळू. सहज अडखळणे. कटिशूळ.

**हातपाय** :– पाय लांब करताना **मांड्या मोडल्याप्रमाणे वाटतात**. हाडात खोल वेदना होतात त्यामुळे चालणे भाग पडते. गृध्रसीवात रात्री निजल्याने जास्त वेदना होतात, दिवसा बरे असते. स्नायुबंधात टणक गाठी येतात, स्नायुबंध हुळहुळे. सांध्याजवळ पोकळ गुल्मे येतात. पाऊलांच्या हाडात दुखते, जमिनी-वर जोराने पाऊल टाकता येत नाही. सांध्यात कटकट आवाज होतात, मोकळ्या हवेत चालताना जास्त. पाऊल, हातापायांची बोटे आखडतात. खुर्चीवरून

उठताना पायातील शक्ती गेली असे वाटतें, प्रयत्नपूर्वक उठावे लागते. पाठीत उसण भरली तर पायातील शक्ती नाहीशी होते. चढता-उतरताना पाय अशक्त वाटतात. टाचेचा स्नायुबंद आखडल्यासारखा वाटतो.

**त्वचा** :– कंड सुटते, खाजविण्याने त्वचा सोलवटते. चपट्या चामखिळी. **त्वचा** हुळहुळी होते. चालण्याने, गाडीतून गेल्याने त्वचा सहज हुळहुळी होते. विशेषतः मुलांची.

**ज्वर** :– चेहऱ्याची त्वचा तप्त झाल्यासारखी वाटते. उष्ण लहरी येतात.

**झोप** :– वारंवार जाग येते. गुंतागुंतीची स्वप्ने पडतात. जांभया देणे आळोखे-पिळोखे देणे व हात लांब करणे.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **अतिश्रम**, ओझे उचलणे वगैरे. ***डोळ्याचे श्रम***. दुखापती. **लचकणे**. ***थंडी***; **थंड हवा**; **थंड दमटपणा**; थंड वारे. ***निजल्याने***. ***बसल्याने***. वाकल्याने. विटाळसेपणी. कच्चे अन्न.

**ब ना** :– **पाठीवर निजल्याने**. उष्णता. हालचाल. चोळल्याने. खाजविल्याने.

**सहाय्यक औषधे** :– **कॅल्क-फा**.

**संबंधी औषधे** :– आर्नि; फायटो; रॅनन-स्क्लि; सिफाय.

---

## २६८. रेडिअम Radium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम त्वचा; हाडे; कंबर; पायाचा आंगठा; व बाजू अदलून बदलून, असा होतो. **अंगाची कोरडी आग**– विस्तवाने भाजल्याप्रमाणे होते त्यामुळे गार हवेची आवड. **एकदम वेदना बाजू बदलतात** किंवा विजेचे धक्के बसल्याप्रमाणे वेदना होतात, त्यामुळे निजणे भाग पडते. **ठणका**, सर्वांगात, सांध्यात खोल. अस्वस्थ, चालणे भाग पडते. **खोल आवळल्यासारखे वाटणे– सांध्यात**, छाती, हृदय वगैरे व त्यावेळेस वारे हवे हवेसे वाटते. बधिरपणा विशेषतः भाग लांब करताना. संधिवात. वातरक्त. अशक्तपणा मरगळणे, थकवा. कुजणे–हाडे वगैरे व्रण. कॅन्सर. झोपेत अंगाला विजेचे धक्के बसताहेत असे वाटते. एक्सरेचे दुष्परिणाम.

**मानसिक** :– भीती वाटते, खिन्न. अंधारात एकटेच असण्याची भीती वाटते. सारखे मंडळीत बसावेसे वाटते.

**डोके** :– जड. घेरी येते व त्यावेळेस डोक्याचा मागील भाग दुखतो. डोळ्यावर ( डाव्या ) दुखावयास लागून वेदना मागे डोक्याच्या मागील भागापर्यंत जातात. टाळूत व डोक्याच्या मागील भागात दुखून त्याचवेळेस कंबरेत अतिशय ठणका लागतो.

**डोळे** :– लाल, चुरचुरतात– वाचताना जास्त. डोळ्यात कापसाचे धागे आहेत असे वाटून डोळे चोळावेसे वाटतात.

**कान** :– कानात वारे शिरल्याप्रमाणे आवाज होतो. पोटावर निजल्याने कमी होतो.

**नाक** :– कोरडे व कंड.

**घसा** :– हुळहुळा होऊन कान दुखतात. मिरे खाल्ल्याप्रमाणे आत वाटते.

**चेहरा** :– लाल, वेदना होतात. खालच्या जबड्याच्या कोपऱ्यात (उजव्या) ठणका लागतो. मुरुम येते.

**तोंड** :– कोरडे. श्वास कढत वाटतो. धातुप्रमाणे चव. जिभेचे टोक चुरचुरते.

**जठर** :– गोड पदार्थ, आइसक्रिम खावेसे वाटत नाही पण पूर्वी ते आवडत असे. डुकराचे मांस खाण्याची वासना. मळमळ खाण्याने कमी होते.

**उदर** :– उदरातील वेदना व कानातील आणि छातीतील वेदना आलटून पालटून होतात. गुद हुळहुळे व बाहेर येते. उदरातील वेदना शौचास झाल्याने किंवा पोटाशी पाय घेतल्याने कमी होतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला थोडे थोडे व कष्टाने होते; नंतर शिश्न ताठते. मूत्रपिंडाचा शोथ व संधिवात.

**पुरुषजननेंद्रिये** :– शिश्नात व मांडीच्या आतील बाजूचा, इसब्र कंड सुटते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– कंड सुटते. उजवे स्तन हुळहुळे पण जोराने चोळण्याने बरे वाटते. विटाळ एक दिवस जातो, नंतर रक्तमिश्रित धुपणी जाते. इपिकॅकने रक्तस्राव थांबला नाहीतर रेडीअमने थांबतो. बाळंतपणानंतरचा विटाळ दुर्गंधि, थोडा किंवा एकदम बंद होतो.

**श्वसनेंद्रिये**:– कोरड्या खोकल्याचा ठसका. खोकला तंबाखू ओढल्याने जास्त होतो, मोकळ्या हवेत, खाण्याने, उठून बसल्याने व श्रमाने कमी होतो. छातीत दाबल्यासारखे वाटून श्वासोच्छ्वास पुरेसा होत नाही असे वाटते.

**हृदय** :– हृदयाच्या जागी आवळल्यासारखे वाटते. धडधडून जाग येते. नाडी जलद, अनियमित.

**मान पाठ** :– मानेच्या मणक्यात दुखते, मोडल्यासारखे वाटते, डोके खाली केल्याने जास्त, ताठ बसल्याने किंवा उभे राहिल्याने बरे वाटते. तिकोनी हाडाच्यामध्ये अशक्तपणा वाटतो. **कंबरेत खालून वर वेदना होतात,** चालण्याचे, श्रमाने कमी होतात.

**हातपाय** :– हातापायाना ठणका लागतो विशेषतः सांध्यात जास्त. पायाची बोटे ठणकतात. हातपाय टणक व ढिसूळ झाले असून ते मोडतील असे वाटते.

**त्वचा** :– **जाड होते, आग होते व कंड सुटते,** खाजविल्याने ओली होते, विशेषतः चेहरा व जननेंद्रिये. पांढरे पापुद्रे, खपल्या कानावर बसतात. इसब. त्वचा जाड होण्याची प्रवृत्ति. घट्टे पडतात. हाताच्या बोटांचा संधिवात.

**झोप** :– आगीची स्वप्ने पडतात. स्वप्ने खरी आहेत असे वाटून धाप लागून जागे होणे व हृदयाची धडधड.

**ज्वर** :– अंतर्गत गारठा वाटून दांत वाजतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **हालचाल, स्मश्रू केल्यानंतर.** आंघोळीनंतर. उठताना. धूम्रपान केल्याने

**ब वा**:– **मोकळी हवा. कढत पाण्याच्या स्नानाने. खाण्याने. गार पेये.** एकसारखी हालचाल. निजल्याने. दाबल्याने. **झोपेनंतर.**

**संबंधी औषधे**: – पल्स; **फाल्फ.**

---

## २६६. रोबिनिआ Robinia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम स्राव व जठर यावर होतो. **जळजळीतपणा.** आंबट चव, **जठरातील आम्लत्व वाढते.,** अतिशय जळजळीत आंबट ढेकरा येतात. **ओकारी इतकी आंबट असते की त्यामुळे दात शिवशिवतात** किंवा बधिर होतात. तोंडाला पाणी सुटते. जठरात व तिकोनी हाडामध्ये पाठीत आग होते. जठरात पिळल्याप्रमाणे वाटते. शौच आंबुस, घाम आंबुस. जठरातील आम्लत्व वाढल्यामुळे डोके दुखते, व आंबट ओकारी होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **खाण्याने. रात्री.** तेलतूप वगैरे.

**संबंधी औषधे** :– आयरि; मॅग-का.

---

## २६७. ऱ्हसटॉक्स Rhus Toxicodendron

सर्वसाधारण :– या औषधाचा परिणाम *त्वचा*– चेहऱ्याची, डोक्याची, जननेंद्रियांची; रक्त; स्नायूबंध; सांधे; *गाठी*– गालगुंड वगैरे; *मज्जारज्जू*; डावी बाजू किंवा डावी ते उजवी बाजू यावर होतो. सांसर्गिक विकार. *संधिवात, सांधे धरण्याची प्रवृत्ति. स्नायू लुले पडल्याप्रमाणे वाटतात, टोचल्याप्रमाणे, फाडल्याप्रमाणे वेदना होतात विशेषतः रात्री. शरीराच्या कोणत्याही स्थितीत बरे वाटत नाही. ताठपणा* **किंवा भार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा. मांस ठेचल्याप्रमाणे किंवा सुटून लोंबत आहे असे वाटते** सांधे निखळल्या-सारखे वाटतात. स्नायूंना आचके बसतात. मुंग्या येतात. बधिरपणा. कंप. शोथ, सूज, आग होते व भाग निळसर होतो. **स्राव करवडणारे तांबुस रंगाचे, लाल पाण्याप्रमाणे किंवा कुबट वासाचे** व त्यामुळे भोवती पुट-कुळ्या येतात. लचकणे, मुरगळणे, ओझे उचलण्याने किंवा घाम येत असताना अंग गारठल्याने, बर्फाचे पाणी प्याल्याने उद्‌भवलेले विकार. इन्फ्लुएंझा. देवी. *टायफाईड सारखे ज्वर*. **हालचाल करताना सुरवातीस त्रास होतो पण हालचाल चालू ठेवल्याने बरे वाटावयास लागते.** हाडांचे उंचवटे हुळहुळे, विशेषतः गालांचे. थंडीच्या दिवसात होणारा संधिवात. शस्त्रक्रियेनंतर होणारे उपद्रव. अर्धांगवात, उजवी बाजू. बधिर-पणा. लहान मुलांच्या अंगावरून वारे जाणे, दमट गारठ्यामुळे.

मानसिक :– **खिन्नता, उदासीनता, काळजी वाटते, मन गोंधळलेले,** उत्तरे सावकाश, जलद किंवा नाखुशीने देणे. **वात,** काहीतरी असंबद्ध बडबड. जागण्याचा कंटाळा आत्महत्या करावीशी वाटते पण धैर्य होत नाही, बुडून जीव द्यावासा वाटतो. बेचैनपणा. वातात विषप्रयोगाची भीती वाटते. रात्री जास्त भीती वाटते. त्यामुळे अंथरुणावर निजवत नाही. रडावेसे वाटते विशेषतः संध्याकाळी पण, का ते कळत नाही. विसरभोळेपणा, नुकत्याच घडलेल्या गोष्टी आठवत नाहीत.

डोके :– घेरी; वृद्धपणी; गरगर फिरत आहोत असे वाटते– डोके दुखावयास लागते. मेंदू सैल झाल्यासारखा वाटतो किंवा त्याचे तुकडे झाले आहेत असे वाटते– धक्का लागल्याने जास्त. कपाळावर फळी ठेविली आहे असे वाटते. डोक्याची कातडी दुखते, ताठल्यासारखी वाटते, तिच्यावर निजल्याने बरं वाटते. मनस्तापाने डोके जास्त दुखते.

**डोळे** :– **डोळ्याच्या मागील बाजूत दुखते**- डोळ्यांच्या हालचालीने जास्त. **पापण्या ताठलेल्या**, चिकटतात, कोरड्या, घट्ट मिटलेल्या; पापण्या जर उघडल्या तर डोळ्यातून कढत पाणी बाहेर येते. उजेड सहन होत नाही. एकावर एक अशा एकाच वस्तूच्या दोन वस्तू दिसतात.

**कान** :– कानात काहीतरी आहे असे वाटून कानात दुखते. पाळया सुजलेल्या. कानातून रक्तमिश्रित पू येतो. गालगुंड ( डावे ).

**नाक** :– नाकाचा शेंडा लाल व हुळहुळा व त्यातून थेंब थेंब पाणी पडते. नाकाची हाडे अतिशय ठणकतात. नाकातून रक्त पडते. विशेषतः रात्री किंवा खाली वाकल्याने, शौचास होताना, किंवा तापात, त्यामुळे बरे वाटते.

**चेहरा** :– चावताना जबडे कटकट वाजतात. जबड्याचा सांधा सहज निखळतो. **चेहरा सुजलेला, ताठलेला**. धावरे. डाव्या गालावर लाल ठिपका. सांध्यात दुखते. गालगुंड. वेदना होताना शहारे येतात.

**तोंड** :– ओठ कोरडे, खपल्या बसलेले, कोपऱ्याला भेगा पडतात. ओठावर वेदनायुक्त पुटकुळ्या येतात. **दातावर कीट साचते**. दात सैल व लांब झाल्यासारखे वाटतात. रक्तमिश्रित लाळ झोपेत गळते. ***जिभेचा शेंडा तिकोनी लाल***, जीभ एकाच बाजूला किंवा तिरकस अस्वच्छ; जीभ मध्यभागी कोरडी, लाल; भेगा पडलेली, हुळहुळी. तांब्यासारखी, गवता-सारखी किंवा कडू. चव, जिभेवर कातडे आले आहे असे वाटते.

**घसा** :– लाल. फुगीर व कंड सुटते. टानसिलवर पांढरा थर जमतो. घसा दुखतो विशेषतः सकाळी. गाठी सुजलेल्या. गिळताना टोचते. घट्ट पदार्थ गिळताना कमी दुखते. जळजळीत पदार्थ खाल्याने अन्ननलिकेला आलेली सूज.

**जठर** :– अतिशय तहान लागते, विशेषतः रात्री. गार पेये प्यावीशी वाटतात परंतु त्यामुळे खोकला जास्त होतो, थंडी वाजते. खाण्यानंतर मळमळते, घेरी येते. गार दूध प्यावेसे वाटते. जेवणानंतर गुंगी येते. खोकताना ओकावयास होते, पाठीवर निजल्याने ओकावयास होते. **मळाची ओकारी होते**. शिंपातील मांस खावेसे वाटतात. आइसक्रिम खाल्याने मळमळते.

**उदर** :– हुळहुळे, आत पाणी हालत आहे असे वाटते. आत गोळा आहे असे वाटते. पोटावर निजल्याने उदरातील वेदना कमी होतात, वेदना होताना खाली वाकून चालावे लागते; पाठीवर गुडघे वर करून निजल्याने बरे वाटते. अॅपेन्डीसायटिस. शौचास पाण्यासारखे, फेसाळ, रक्ताचे, दुर्गंधी, लाल

**चिटकराच्या बुकटीप्रमाणे**, बुळबुळीत, गिळगिळित, न कळत होते किंवा कुंथावे लागते. पेये प्याल्यानंतर शौचास जावे लागते. टायफाईड तापातील जुलाब– रात्री जास्त होतात. जीर्ण हगवण– फक्त सकाळीच जुलाब होतात व त्याचे अगोदर आतड्यात खूप खळबळते. उचलताना मूळव्याध बाहेर येते. **शौचास होताना मांड्यांच्या मागील भागात दुखते.** आमातिसार. आव, वेदना युक्त शौचास लागते पण शौचास होत नाही.

**मूत्रेंद्रिये** :– वारंवार कळा येऊन लघवीला व त्याचवेळेस शौचास लागली आहे असे वाटते. रात्री अंथरुणात लघवी न कळत होते. हिवाळ्यात स्त्रियांना न कळत लघवीला थेंब थेंब होते. मूत्रपिंडाचा शोथ.

**पुरुषजननेंद्रिये** :– जलयुक्त सूज विशेषतः बोंडीच्या कातडीची; वृषणाची-जननेंद्रिये सुजलेली, कंड सुटते. वृषण वृद्धि; ओझे उचलल्यामुळे झालेली.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गर्भाशयाचा शोथ (सेप्टिक). बाळंतपणानंतरचा विटाळ, थोडा पातळ, बरेच दिवस वाहतो, दुर्गंधी व तो जाताना योनीतून वर कळा जातात. श्रम केले तर विटाळ जावयास लागतो. योनिद्वार सुजून अतिशय कंड सुटते. पाळी लवकर येते, विटाळ भरपूर व फार दिवस जातो. पाण्यात भिजल्याने झालेले नष्टार्तव, त्यामुळे स्तनांत दूध येते. अतिश्रमाने, ओझे उचलल्याने गर्भाशय खाली येते. वायगोळ्याच्या वेदना मधुन मधुन सारख्या येतात.

**श्वसनेंद्रिये** :– कोरडा, अतिशय त्रासदायक खोकला. विशेषतः मध्यरात्री ते सकाळपर्यंत. खोकताना रक्तासारखी चव. खोकला थंडी वाजताना किंवा अंथरुणाच्या बाहेर हात काढल्याने जास्त येतो. घसा बसतो. बोलताना गाताना सुरवातीस आवाज बसतो पण गाणे बोलणे तसेच चालू ठेवले तर आवाज मोकळा होतो. आवाजावर ताण बसल्यामुळे बसलेला आवाज. तापात थंडी वाजण्याचे अगोदर खोकल्यास सुरवात होते. प्लुरिसि. न्युमोनिआ—कफ तांबुस रंगाचा. थुंकीतून रक्त पडते, वायुवाद्ये वाजविण्याने, अतिश्रमाने वगैरे. फुप्फुसात पाणी साचते. हातांची हालचाल केल्याने छातीत दुखते.

**हृदय** :– धडधडते, कंप, हालचाल केल्याने बरे वाटते. थकल्यासारखे वाटते. वेदना डाव्या हातापर्यंत जातात– हात बधिर होतो व निर्जीव वाटतो. नाडी, अनियमित, जलद, कंपयुक्त, मधुन मधुन थांबते व त्यावेळेस डावा हात बधिर होतो.

**मान पाठ** :- मान ताठलेली, हलविल्याने दुखते. पाठीत त्रिकोनी हाडामध्ये ठणका लागतो गिळताना जास्त होतो. पाठ मोडल्यासारखी किंवा आवळल्यासारखी वाटून दुखते– जोराने दाबल्याने, चालण्याने, किंवा मागे वाकल्याने टणक जागेवर निजल्याने बरे वाटते. कटिशूळ. गुदाच्या हाडापासून मांड्यापर्यंत ठणका लागतो.

**हातपाय** :- बधिर, विरविरल्यासारखे वाटतात. हात अस्वस्थ, हाडात विशेषतः डावा. कोपऱ्याच्या सांध्यात कुले पडल्याप्रमाणे वेदना होतात. पंज्याच्या मागील बाजूस भेगा पडतात. तळहात कोरडे, कढत, भेगा पडलेले आणि हुळहुळे, धुतल्याने आग व्हावयास लागते. गृध्रसी वात– झोपाल होताना आंखडाच्या मागील बाजूस वेदना होतात. पाय निर्जीव, लाकडाप्रमाणे वाटतात; पोटऱ्यात पेटके येतात. पायावर व्रण पडून ते कुजतात व त्यातून रक्तासारखे पाणी येते. कंड सुटते, विशेषतः पायाला सूज आलेली असताना. सांधे कढत, सुजलेले व आत वेदना होतात. हातपाय ताठलेले, कुले पडल्याप्रमाणे. मुंग्या येतात. पावलाला गुदगुल्या झाल्यासारखे वाटते. हाताच्या बोटांच्या टोकाना मुंग्या येतात. न कळत लंगडत चालणे. फार वेळ चालल्यानंतर घोटे सुजतात. पाऊले संध्याकाळी सुजतात.

**झोप** :– स्वप्नात श्रमाची कामे करीत आहोत असे वाटते. खून मारामारीची स्वप्ने पडतात. सकाळी उठल्यानंतर थकवा वाटतो व घाबरटपणा येतो. वारंवार जोरजोराने जांभया येतात, पण झोप येत नाही, हातपाय ताणावेसे वाटतात.

**त्वचा** :– ताठलेली, जाड, कोरडी, कढत, कंड सुटते व आग होते, विशेषतः केसाळ भागात. उष्णतेने बरे वाटते. थंड वाऱ्याने त्वचा दुखावयास लागते. उगवण, सुंदर बारीक *भाजल्यासारख्या फोडाप्रमाणे*; खपल्या असलेली; इसबासारखी, ओलसर किंवा *धावरे* विशेषतः जननेंद्रियावर. उगवण व आव आलटून पालटून होते. पू केसांचा नाश करतो. व्रणातून लस झिरपते. पित्ताच्या गांधी येतात भिजल्यामुळे, संधिवातात, तापात, थंडी वाजताना. गळवावर भाजल्यासारखे फोड येतात.

**ज्वर** :– गारठा सहन होत नाही; जरा अंग उघडे झाले तरी थंडी वाजावयास लागते, हातपाय दुखावयास लागतात, खोकला यावयास लागतो. अंगावर पाणी टाकल्याप्रमाणे थंडी वाजते, शिरातून गार पाणी वाहते

आहे असे वाटते, थंडी वाजण्याचे अगोदर खोकला यावयास लागतो; एखाद्या भागाला थंडी वाजते. थंडी व ताप आलटून पालटून. तापात वात होतो त्यावेळेस स्वतःच्या कामधंद्याविषयीच बडबड चालू असते. तापात अंगावर पित्ताच्या गांधी येतात. थंडी वाजताना आळोखे पिळोखे द्यावेसे वाटतात. वेदना होत असताना घाम येतो आणि गुंगी येते. टायफाईड; हिंवताप; इन्फ्लुएंझा.

**लक्षणांचे वैशिष्ट्य आ हो :–** *पाण्याने*; *थंडीने*; थंड वाऱ्याने; *धुण्याने* अंग तापले असताना किंवा घाम येत असताना *अंग गारठल्याने*. अंग उघडे झाल्याने हातपाय वगैरे. *हालचालीच्या सुरवातीस*; *विश्रांतीने*; लचक; अतिश्रम. *मध्यरात्रीनंतर*. मार लागणे. धक्का. बर्फाची पेये. ज्या बाजूस निजले असेल त्या बाजूस.

**क मी :–** हालचाल चालू ठेवल्याने. *उष्णता*–पांघरूण, शेकाने, कढत पाण्याचे स्नान. चोळण्याने; नाकातून रक्त पडल्याने; विकार झालेला भाग धरून ठेवल्याने, उदर, डोके वगैरे. अवयव (हातपाय) ताणल्याने. अवस्था बदलल्याने. कोरडी उष्ण हवा.

**साहाय्यक औषधे :–** कॅल्क–का; पल्स; फायटो; फास्फ; ब्रायो; मेडो; मॅग्न–का; सल्फ.

**संबंधी औषधे :–** आर्नि; आर्से; नक्स–व्हा; मर्क्यु; लॅके.

---

## २६८. ऱ्हस रॅडिकन्स Rhus Radicans

**सर्वसाधारण :–** या औषधाची व ऱ्हसटॉक्सची लक्षणे जवळजवळ सारखीच आहेत. जिभेची आग व शडा हुळहुळा होतो. गरम पेये पिताना त्रास होतो. लक्षणांचा उद्भव वार्षिक. वीज वावटळीने बरे वाटते.

---

## २६९. ऱ्हस व्हेनिनेटा Rhus Veneneta

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम त्वचेवर होतो. डोळ्याच्या भोवती भोवती आलेल्या सुजेमुळे डोळे उघडता येत नाहीत. नाक लाल व चकचकीत. चेहरा सुजलेला. कंड कढत पाण्याने कमी होते. धावरे– त्वचेचा रंग काळसर लाल. अंगावर मोठमोठ्या लाल गाठी येऊन त्या रात्री खाजतात व लांब हाडात वेदना होतात.

---

## २७०. ऱ्हिअम ( रेवाचिनी ) Rheum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम पित्तनलिका; आतडी व यकृत यावर होतो. **मुलांच्या अंगाला आंबुस वास येतो, त्यांच्या उदरात दुखल्यामुळे** ती सारखी रडत व किरकिरे असतात. अधीर उतावीळ मुले, अनेक वस्तु हव्या असतात व त्याकरता रडतात. आंबट–चव, ओकारी, शौच, घाम वगैरे. गरोदर व अंगावर पाजणाऱ्या स्त्रियांचे विकार. थोडी झोप पुरते व अन्नही फारसे लागत नाही. दांत येताना मुलांना फार त्रास होतो.

**मानसिक** :– अधीर मुले ओरडून अनेक वस्तु मागतात व रडतात. आवडीच्या वस्तु नको वाटतात. दिवसा ठराविक वस्तूचा हव्यास. अस्वस्थपणा, रडणे.

**डोके** :– डोक्याच्या केसात घाम येतो. केस भिजलेले.

**डोळे** :– एखाद्या वस्तुकडे पाहत राहिल्याने दृष्टी मंद होते. पापण्यांना आंचके बसतात.

**चेहरा** :– गार घाम येतो विशेषतः तोंडाभोवती व नाकावर, वरच्या ओठावर.

**तोंड** :– तोंडात दुर्गंधी कफ साचतो विशेषतः झोपेनंतर. दात गार झाल्यासारखे वाटतात. दात लवकर येत नाहीत. जुलाब होताना व उदरात वेदना होताना लाळ गळते. आंबट वास येतो.

**जठर** :– एक घास खाल्ला की अन्नाचा तिटकारा येतो. अनेक पदार्थ हवेसे वाटतात पण ते खावबत नाहीत.

**उदर** :– उदरात मुरडा होऊन मुले रडतात, हातपाय पोटाशी घेतल्याने त्यांना बरे वाटते. शरीराचा कोणताही भाग उघडा पडला तर वेदना जास्त होतात; वेदनानंतर *लगद्याप्रमाणे, आंबट, पिंगट, कुजलेले, बुळबुळीत किंवा जळजळीत शौचास होते, व त्यावेळेस हुडहुडी भरते.* कच्ची फळे खाल्ल्याने जुलाब होतात विशेषतः संध्याकाळी.

**मूत्रेंद्रिये** :– शौचास होण्याचे अगोदर लघवीला होईल असे वाटते पण होत नाही. मूत्राशयात व मूत्रपिंडात आग होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– बाळंतपणानंतर उद्भवलेले लघवीचे विकार. अंगावरचे दूध पिवळे व कडू त्यामुळे मूल पीत नाही. बाळंतपणानंतर सुरू झालेली हगवण.

**पाठ** :– माकडहाडात व मांडीच्या सांध्याभोवती ताठते, ताठ चालता येत नाही. शौचानंतर कमरेत कापल्यासारखे दुखते.

**हातपाय :–** ज्या बाजूवर निजले असेल ती बाजू बधिर होते. कोपरात बुडबुडे आल्याधारखे वाटवात. हाताच्या बोटाना धक्के बसवात.

**झोप :–** अस्वस्थ. झोपेत कण्हणे, रडणे. चेहऱ्याचा स्नायूचा व बोटाना कंप येतो.

**ज्वर :–** डोक्याला, नाकाभोवती, तोंडाभोवती वरच्या ओठावर घाम येतो. केस पाण्याने भिघळल्याप्रमाणे ओले.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** दात येताना. खाण्याने. उन्हाळ्यात. अंगावर पाजणाऱ्या स्त्रिया. हालचालीने.

**क था :–** उष्णतेने. पांघरुणाने. पाय पोटाशी घेऊन निजल्याने. वेडावाकड्या अवस्थेत.

**सहाय्यक औषधे :–** मॅग्ने–फा.

**संबंधी औषधी :–** कामो.

---

## २७१. ऱ्होडोडेन्ड्रन Rhododendron

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम पुढला हात; तंगड्या; लहान सांधे; हाडे; जननेंद्रिये यावर होतो. संधिवात व वातरक्त होण्याची प्रवृत्ति. घरात असले तरी *वादळ, वारे व पावसाळी हवा सहन होत नाही.* फाडल्याप्रमाणे, वेडयावाकडया, उकरल्याप्रमाणे, त्वरित जागा बदलणाऱ्या, वरून खाली येणाऱ्या, लुले पाडणाऱ्या वेदना. उन्हाळ्यात संधिवात होतो. *जरा श्रम केले तरी अतिशय थकवा येतो. विजेच्या कडकडाटाची भीती वाटते,* वादळापूर्वी कंपवात सुरू होतो.

**मानसिक :–** वादळाची भीती वाटते विशेषतः विजेच्या गडगडाटाची. गोंधळलेला, बावळट, आपण काय बोलत आहोत ते विसरणे, लिहिताना शब्दचे शब्द गाळणे. कामाचा कंटाळा. दारू लवकर चढते.

**डोके :–** उजव्या बाजूस ठुसठुसते, डोके सकाळी उठल्यानंतर दुखते, खाण्याने कमी होते.

**डोळे :–** भोवती व आत वेदना होवात, वादळापूर्वी जास्त. डोळयांच्या श्रमाने आग होते.

**कान** :– सकाळी बरे ऐकू येते पण त्यानंतर बऱ्याच वेळाने ऐकू येईनासे होते. कानात आवाज होतात, सकाळी उठल्यानंतर काही तासाने. आत किडा आहे असे वाटते.

**नाक** :– नाकपुड्या आलटून पालटून चोंदतात.

**चेहरा** :– फाडल्याप्रमाणे, धक्के मारल्याप्रमाणे चेहऱ्यावर व दातात वेदना होतात, खाल्ल्याने किंवा उष्णतेने बरे वाटते.

**तोंड** :– दांतदुखी खाण्याने व उष्णतेने कमी होते; दांत दुखणे एकदम थांबते पण २।३ तासानी पुन्हा सुरू होते.

**जठर** :– गार पेये घेतल्याने पोटात जड वाटते. थोडे अन्न खाल्ले तरी भरल्या-सारखे वाटते. गार पेयानंतर, हिरवट कडू ओकाव्यास होते.

**उदर** :– बेंबीजवळ मुरडा होतो. गुदापासून जननेंद्रियापर्यंत वेदना होतात. फळे खाल्याने जुलाब होतात. जलद चालताना पांथरीत टोचते. वात पाठीत आहे असे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– भरपूर दुर्गंधी लघवीला होते. मूत्राशयात ओढ लागून वारंवार लघवीला जावे लागते. मूत्रमार्गात व्रण पडल्याप्रमाणे दुखते.

**पुरुषजननेंद्रिये** :– **वीर्यवाहिनी नलिकेतून वर उदरास किंवा मांड्यास ओढल्याप्रमाणे वेदना होतात.** अंडाचा शोथ. अंड व शिश्नाची ओंडी ठेचल्याप्रमाणे वाटते. अंड टणक व आलटून पालटून वेदना होतात. वृषणाला घाम येतो, वृषण सुरकुतलेले व कंड सुटते. वृषणवृद्धि पाणी साचून झालेली, मुलांची.

**स्त्रीजननेंद्रिये** :– त्रिटाळसेपणी ताप येतो, डोके दुखते. नष्टार्तव. बाळंतपणा-नंतर गर्भाशयाच्या जागी आग होते, हातापायात वेदना व आग आलटून पालटून होते, हातांची बोटे आचके आल्याप्रमाणे मिटतात.

**श्वसनेंद्रिये** :– छाती लचकल्यासारखी वाटते किंवा मार लागल्याप्रमाणे वाटते. प्लुरिसी, छातीच्या पुढील भागात वरून खाली टोचल्यामुळे बोलवत नाही व श्वासोच्छ्वास करवत नाही.

**हृदय** :– जोराने ठोके पडतात. [illegible] झटा आल्यासारख्या वाटतात.

**हातपाय** :– मनगट लचकल्याप्रमाणे वाटते किंवा मार लागल्याप्रमाणे वाटते. पावलाना जड ओझे लोंबकळत आहे असे वाटते. सांध्यात फाडल्याप्रमाणे

वेदना होतात. हाडात फाडल्याप्रमाणे, औढल्याप्रमाणे वेदना होतात. थंडीत पंजे गरम असतात.

**झोप** :– पायाची भट्टी बातल्याशिवाय झोप लागत नाही.

**त्वचा** :– घाम येताना मुंग्या येतात, कंड सुटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य वा ढी** :– *वादळापूर्वी*. सोसाट्याचे वारे. आमाल आलेले असताना. दमट थंड हवा. रात्री. उन्हाळयात. दारू. विश्रांतीने.

**घ टा** :– उष्णता. उन्हात. हालचालीने. डोके गुंडाळल्याने. एकदम केलेल्या हालचालीने

**संबंधी औषधे** :– न्हस–टॉ.

---

## २७२. लॅक कॅनिनम ( कुत्रीचे दूध ) Lac caninum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मज्जातंतू ; घसा* उजवी ते डावीकडे. नंतर पुन्हा उजवीकडे; स्त्रीजननेंद्रिये यावर होतो. *लक्षणे ( विकार ) बाजू बदलतात*– घसा, रजःपिंड वगैरे, किंवा इकडे तिकडे फिरतात. चकचकीतपणा, सुजलेल्या भागाचा, व्रण वगैरे. काहीही सहन होत नाही– शरीराच्या भागांचा एकमेकाना झालेला स्पर्श किंवा बोटांचा एकमेकाना झालेला स्पर्श वगैरे. हिस्टेरिआ. अतिशय अशक्तपणा व थकवा, सकाळी गळून गेल्यासारखे वाटते. अस्वस्थपणा व अनेक प्रकारच्या भावना. अंगावरचे दूध बंद करावयाचे असल्यास हे औषध घ्यावे. घटसर्प व त्यामुळे आलेला पंगुपणा. उंचीवरून पडून झालेले दुष्परिणाम.

**मानसिक** :– **अनेक प्रकारच्या विचित्र भ्रामक कल्पना. हवेत तरंगत आहोत असे वाटते.** विशेषतः चालताना किंवा अंथरुणावर निजल्यावर. स्वतःचे नाक नसून दुसऱ्याचे चिकटले आहे असे वाटते, शरीर किळसवाणे झाले आहे असे वाटते. भयप्रद देखावे दिसतात, साप, किडे वगैरे. प्रत्येक लक्षण म्हणजे काहीतरी रोग झाला आहे असे वाटते, व तो बरा होणार नाही असे वाटते. स्वतःविषयी क्षुद्रत्वाची भावना. विसराळू. लिहिण्यात वाचण्यात चुका होतात. संभोगेच्छा तृप्त होण्याचे वेळी हिस्टेरिआची लक्षणे होतात. तान्ही मुले चिडखोर, संतापी, एकसारखी किंचाळतात विशेषतः रात्री. खिन्नता. रागाने झटके येतात. रोग होईल *अशी* भीती वाटते. जिन्यावरून खाली पडू अशी भीती वाटते. चित्त जागेवर नसते.

**डोके** :– दुखत असताना मळमळते, दृष्टी अंधुक होते व शेवटी ओकावयास होते. मेंदू आलटून पालटून लहान मोठा होत आहे असे वाटते.

**डोळे** :– डोळयापुढे चेहेरे दिसतात, विशेषतः अंधारात. जंतु, वळवळणारे किडे दिसतात.

**कान** :– कानात आवाज होतात. बोलणे फार लांबून ऐकू येत आहे असे वाटते. स्वतःच्या आवाजाचे प्रतिध्वनि ऐकू येतात. अनुवंशिक उपदंशामुळे आलेला बहिरेपणा.

**नाक** :– एक नाकपुडी चोंदलेली दुसरी मोकळी किंवा आलटून पालटून. पिनस; नाकातून रक्तमिश्रित पू येतो. गिळलेली पेये नाकातून येतात– घटसर्प. रात्री नाकातून स्राव जातो, पुवळलेला, उशीवर हिरवे पिवळट डाग पडतात. नाकपुड्याना भेगा पडतात.

**चेहरा** :– फिकट. चिंताग्रस्त.

**तोंड** :– चावताना सांधे वाजतात. किळसवाणी चव, गोड खाल्ल्याने जास्त होते. लाळ गळते–घटसर्पात. जिभेच्या कडा लालबुंद. बोलताना कष्ट होतात. नाकातून बोलणे. जीभ ताठते. कोपराना भेगा पडतात.

**घसा** :– *दुखतो, हुळहुळा*– आत चिनी मातीप्रमाणे चट्टे पडतात. टानसिल सुजतात, घटसर्प; घटसर्पानंतर घशांचे स्नायू लुले होतात त्यामुळे गिळलेले पदार्थ नाकातून बाहेर येतात. विटाळशी होण्याचे अगोदर व विटाळ थांबताना घसा दुखतो व खोकला येतो. विटाळसेपणी घसा बसतो. गिळताना घशात दुखते व वेदना कानापर्यंत जातात. मान ताठते. व जीभ ताठते. आंवढा गिळताना घसा जास्त दुखतो, गरम किंवा गार पेयाने बरे वाटते.

**जठर** :– दूध पिण्याची आवड व खूप दूध पिणे. पेये विशेषतः पाण्याचा तिटकारा. मळमळून पोटाच्या खळीत गळून गेल्यासारखे वाटते. खारट पदार्थच चवीला बरे लागतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थोडी व क्वचितच होते. दिवसातून एकदाच पण भरपूर लघवीला होते, पण थोडा त्रास होऊन होते. झोपेत लघवीला होते.

**बीजननेंद्रिये** :– विटाळ हिरवा, जोराने वाहतो, अमोनियासारख्या वासाचा. विटाळशी होण्याचे अगोदर स्तन हुळहुळे होऊन सुजतात, धक्का लागल्याने त्रास होतो, हाताने स्तन धरून वर खाली चढ उतार करावी लागते, विटाळ सुरू झाल्यावर बरे वाटते. अतिशय दूध येते किंवा कमी असते. मूल

मेल्यानंतर जर येत असलेले दूध बंद करावयाचे असल्यास या औषधाचा *चांगला उपयोग होतो.* योनीतून वारा जातो. धुपणी दिवसा जाते, उभे राहिल्याने, किंवा चालताना जास्त, रात्री जात नाही. स्तनावर हात ठेवला तरी बसले असताना योनीवर थोडा दाब दिला किंवा चालताना थोडे घर्षण झाले तर वैषयिक क्षोभ होतो.

**श्वसनेंद्रिये** :– घशात सारख्या गुदगुल्या होऊन खोकला येतो.

**पाठ मान** :– मान ताठते. कणा, मानेपासून ते गुदास्थिपर्यंत हुळहुळा, स्पर्श, दाब सहन होत नाही.

**हातपाय** :– बधिर व ताठल्यासारखे वाटतात. पावलाना पेटके येतात. टाचा हुळहुळ्या. पाय गुडघ्यापर्यंत गार. उजव्या कटिसांध्याच्या जागी एकसारखे दुखते. गृध्रसी वात.

**झोप** :– स्वप्नात साप दिसतात. एक गुडघा उभा करून व दुसरा लांब करून निजणे. झोपेत लघवीला होत आहे अशी स्वप्ने पडतात.

**ज्वर** :– पाठीत वरून खाली गार मुंग्या आल्यासारख्या वाटतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा हो :– ***स्पर्श***. **धक्का; विटाळसेपणी.** एक दिवस सकाळी दुसरे दिवशी संध्याकाळी. **थंड हवा.** झोपेनंतर.

**क मी** :– मोकळी हवा. गार पेये.

**संबंधी औषधे** :– लॅके; लायसि.

---

## २७३. लॅक डिफ्लोरेटम (साय काढलेले दूध) Lac Defloratum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *पोषण*; **रक्त; हृदय; डोके** (डावी बाजू) मांडी (बाहेरचा भाग) यावर होतो. पोषण अयोग्य. **थकवा,** काही काम केले किंवा न केले तरी. चालताना दमल्यासारखे वाटते. **पंडुरोग.** आपल्या अंगावरून गार वारे वाहत आहेत असे वाटते. कपडे, पांघरुण भिजले आहे असे वाटते. निद्रानाशामुळे उद्भवलेले विकार. हृद्रोगामुळे किंवा जीर्ण यकृताच्या विकारामुळे आलेली जलयुक्त सूज. दूध न सोसणारी मुले किंवा मोठी माणसे.

**मानसिक** :– उदासीनता, खिन्न, जगण्याची पर्वा नसते. मरणाची भीती वाटत नाही व आपण मरू अशी खात्री वाटते. **अरुंद,** बंद जागेची भीती.

**डोके** :– घेरी डाव्या कुशीवर निजल्याने जास्त होते. डोळ्यापुढे अंधारी येऊन नंतर कपाळात अतिशय ठुसठुसल्याप्रमाणे वेदना होतात, मळमळते, ओकावयास होते, लघवीला भरपूर होते; अर्धशिशी, संध्याकाळी थांबते. उजेड सहन होत नाही. डोके दुखत असताना आवाज, उजेड, हालचाल सहन होत नाही; विटाळसेपणी डोके दुखते व अतिशय थकवा येतो. डोके घट्ट बांधल्याने बरे वाटते. हात डोक्यावर उंच करताना मूर्च्छा येते. कवटी वर उचलल्यासारखी वाटते. डोक्याला मार लागल्यानंतर डोक्यात होणारी अस्वस्थता.

**डोळे** :– उजेड सहन होत नाही, मेणबत्तीचासुद्धा.

**चेहरा** :– सुजलेला, फिकट आजाऱ्यासारखा. पंडुरोग.

**जठर** :– दुधाचा तिटकारा, दूध सोसत नाही. लहान मुलांना दूध प्याले की सर्दी होण्याची प्रवृत्ति. मळमळते; आंबट ओकावयास होते. एकसारखे ओकावयास होते, खाण्याशी संबंध नसतो, प्रथम अपक्व अन्न पडते, नंतर आंबट नंतर कडू पाणी पडते. गरोदरपणच्या ओकाऱ्या. मळमळ व ओकाऱ्या होताना अतिशय आजाऱ्यासारखे वाटते.

**उदर** :– मलावरोध. कोरडे मोठे व वेदनायुक्त शौचास होते, गुदद्वाराला भेगा पडतात. मलावरोध, रेचक किंवा एनिमा घेतल्याशिवाय शौचास होतच नाही, व भयंकर डोके दुखते.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्रपिंड हुळहुळे व आत उकरल्याप्रमाणे वेदना होतात. भरपूर लघवीला होते विशेषतः वेदना होत असताना. गाडीत बसलेले असताना, थंड हवेत चालताना, किंवा गाडी पकडण्याची घाई असताना नकळत लघवीला होते. लघवी तुंबली असताना त्याची जाणीव होत नाही.

**स्त्रीजननेंद्रिये** :– नष्टार्तव, दूध पिण्याऱ्या मुलींचे किंवा गार पाण्यात हात बुचकळल्यामुळे झालेले. स्तनात दूध कमी. स्तन वाळलेले.

**त्वचा** :– गारठा मुळीच सहन होत नाही.

**झोप** :– निद्रानाशामुळे अस्वस्थपणा.

**ज्वर** :– एकसारखे अंगावर शहारे येतात. हाताच्या बोटांची टोके बर्फासारखी गार, बाकीचा पंजा गरम.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** *थंडी*; **थंडगार वाऱ्याची झुळुक.** भिजल्याने. गार पाण्यात हात घातल्याने. **दूध.** निद्रानाश. आठवड्याने. बंद जागा.

**ब वा :–** विश्रांती. पट्टा बांधल्याने.

**संबंधी औषधे :–** नेट्र-मू.

---

## २७४. लॅकेसिस Lachesis

**सर्वसाधारण :–** या सर्पविषाचा परिणाम **रक्त**; *हृदय*; *रुधिराभिसरण*; *डावी बाजू* **नंतर उजवी बाजू**; *घसा रज:पिंड*; *स्त्रिया*; टाळू; त्वचा यावर होतो. **विकार त्वरित उद्भवतात, त्यांची तीव्रता वाढत जाते, थकवा वाढत जातो, विकाराचे स्वरूप दुष्ट व्हावयास लागते.** सेप्टिक विकार. कुजणे. काळीपुळी. धावरे. निळेपणा, पंजे वगैरे. *विकार डावीकडे उद्भवतात किंवा डावीकडून उजवीकडे येतात. दुर्गंधी*; तोंड, स्राव, शौच वगैरे. स्राव करवडणारे. **रक्तस्राव** पातळ व आत जाळलेल्या गवताच्या तुकड्याप्रमाणे काळे तुकडे दिसतात. रक्तस्राव; नाकातून, विटाळा-ऐवजी इतर अवयवातून, लघवीतून होतो. त्वचेखाली रक्तस्राव झाल्यामुळे काळेनिळे ठिपके पडतात. *भावना खालून वर येतात*– घशात, डोळ्या-पासून किंवा मानेपासून टाळूपर्यंत; रज:पिंडापासून हृदयापर्यंत. थंडी वाजणे. *उष्ण लहरी लाटा येतात.* **रक्त खालून वर जाते.** *गोळा आहे असे वाटते*, घशात खालून वर येतो गिळल्याने पुन्हा परत जातो; गोळा यकृतात; उदरात, गुदात, मूत्राशयात इकडे तिकडे फिरत आहे असे वाटते वगैरे. *वेदना असह्य* **घशात**; व्रणात, एखाद्या लहानशा जागी. **आवळल्या-सारखे वाटते घशात,** खाण्याने बरे वाटते. डोक्यावर घट्ट टोपी घातली आहे असे वाटते. **ओढल्याप्रमाणे वाटणे**– गुदद्वारात, टाळू ते जबड्यापर्यंत; गुवात वगैरे. कंप–जिभेचा, पंजांचा वगैरे. जोराने ठुसठुसणे किंवा हातोडे मारल्याप्रमाणे वाटणे. सुनबहिरी. फेफरे झोपेत येते. दुखापती, विषारी जखमा, अणकुचीदार हत्यारांनी झालेल्या जखमा, दुःख संताप, भीती, मत्सर, प्रेमभंग, दारू, मुष्टिमैथुन, लचक ( निळी सूज ); ऊन, उष्ण हवा इत्यादि कारणाने उद्भवलेले विकार. तापट स्त्रिया, वारंवार बाळंतपणामुळे किंवा कष्टांची कामे केल्यामुळे थकलेल्या स्त्रिया. अशक्त, किडकिडीत, रोगामुळे शरीर खिळखिळे झालेले इसम. विटाळ थांबण्याच्या वयात किंवा विटाळ

बंद झाल्यामुळे उद्भवलेले विकार. धांदरटपणे चाल. डावी बाजू अशक्त. डाव्या बाजूचा अर्धांगवात. यकृत किंवा पांथरीच्या विकारामुळे उद्भवलेली जलयुक्त सूज. प्लेग. लक्षणे झोपेत सुरू होतात व त्यामुळे जाग येते. घटसर्प व त्यापासून आलेला लुलेपणा. स्त्रियाना त्यांचा विटाळ थांबल्यानंतर बरे वाटेनासे होते. वेदनांची जागा बदलत असताना छातीत धडधडते.

**मानसिक** :– *एकसारखी* **काही तरी असंबद्ध बडबड** नंतर खिन्न होणे, किंवा तेच तेच पुनः पुनः बोलणे. **भराभर विषयांतर करणे**, वाक्य अर्धेच टाकून दुसरेच बोलवयास लागणे. उतावीळ. सकाळी जागे झाल्यानंतर खिन्नता येते. **मत्सरी, वेड लागल्याप्रमाणे संशयी.** विषप्रयोगाची भीती वाटते त्यामुळे खाणेपिणे, औषध नाकारणे. **आपण एखाद्या जबरदस्त शक्तीच्या ताब्यात सापडलो असून ती शक्ती आपल्याकडून दुष्कृत्ये करून घेणार आहे असे वाटते.** भ्रम, आपल्या मागे कोणीतरी लागले आहे किंवा आपण दुसरेच कोणीतरी आहोत असे वाटते. धार्मिक वेड. लोकात मिसळावेसे वाटत नाही, स्वतःचे काम करावेसे वाटत नाही, दुसरीकडे कोठेतरी असावेसे वाटते. काळ-वेळेचा उमज पडत नाही. अचुक भविष्य वर्तविणे. गर्विष्ठ. आळशी. वात होतो; दारूमुळे, अतिशय दमल्यामुळे, अतिशय अभ्यास केल्यामुळे, शरीरातील स्राव गेल्यामुळे, किंवा शुश्रूषा करताना झालेल्या जाग्रणामुळे. धार्मिक वेड. अस्वस्थ, चैन पडत नाही. जमिनीवर रांगणे, वारंवार थुंकणे. लपून बसणे, हंसणे, रागावणे. बोलण्यात लिहिण्यात चुका करणे. आपण मेलो आहोत व आपल्याला स्मशानात नेण्याची तयारी चालली आहे असे वाटते. झोपावयास जाण्याची भीती वाटते; आपले हृदय थांबेल या भीतीने. बडबडणे, गाणे म्हणणे, तोंडाने शीळ वाजविणे, व वेडीवाकडी हालचाल करणे. एकसारखे वैषयिक विचार मनात येतात पण शारीरिक अपात्रता, अति अभ्यासामुळे वेड लागते.

**डोके** :– घेरी; उजव्या बाजूस वळण्याने; एखाद्या वस्तुकडे सारखे पाहिल्याने, मोकळ्या हवेत चालताना जास्त होते. डोकेदुखी–डोके जड होऊन नाकापर्यंत फूट लागते. बाजू ( उजवी ) कापून टाकली आहे असे वाटते. टाळू जड व आग होते. डोकेदुखी व हृदयाचे विकार एकाच वेळी सुरू होतात. केसाना स्पर्श सहन होत नाही. घेरी डोळे मिटल्याने जास्त होते. उन्हाळ्या-मुळे डोके दुखते. टाळू जड, दाबल्यासारखी वाटते, किंवा आग होते. केस गळून पडतात; विशेषतः गरोदरपणी. कवटीचे घरत जाणारे व्रण. गुल्म.

**डोळे** :– लहान झाल्यासारखे वाटतात. हृदयविकारामुळे किंवा घटसर्पानंतर उद्भवलेले दृष्टिमांद्य. नाकाच्या बुंध्याशी डोळे दोरीने ओढून बांधल्यासारखे वाटतात. लासरु, चेहऱ्यावर उगवण येऊन.

**कान** :– कानात काही घातले तर घशात गुदगुल्या होऊन खोकला येतो. कानात आवाज होतात बोट घातल्याने बरे वाटते. कान व मागील हाड यामध्ये सूज येते व तेथे ताठल्यासारखे वाटून ठुसठुसते. स्राव चिकट दुर्गंधी. गालगुंड ( सेप्टीक ).

**नाक** :– सर्दी अजिबात होत नाही. खोकताना नाक गळते. सर्दी होण्याचे अगोदर डोके दुखावयास लागते. मधून मधून खूप शिंका येतात. विनस–नाकातून दुर्गंधी रक्तमिश्रित पू येतो. नाक लाल व शेंड्यावर लाल पुरळ येते–हृदय-विकारामुळे किंवा दारुमुळे. नाकाजवळ धरलेले काही सहन होत नाही.

**चेहरा** :– निळसर; चट्टे पडलेला. बारीक शिरांचे जाळे दिसते. तापात लालसर, फुगीर, सुजल्यासारखा दिसतो, पिवळा.

**तोंड** :– वासलेले ( तापात ). तोंड येते. दात, चिकट पुष्कळ लाळ येते. जीभ, लाल, कोरडी, सुजलेली, आग होते, कापते, बाहेर काढताना दातात अडखळते, टोकाला भेगा. चव तिखट. बोलणे जड, अडखळत. नाकातोंडा-जवळ काही धरलेले सहन होत नाही. हिरड्या निळ्या स्पंजाप्रमाणे; रक्त येते. दातदुखी कानापर्यंत जाते. दातावर कोरडे कीट जमते ( टोपी ज्वरात ). तोंड भरपूर वासता येत नाही, तोंड आलेले असताना. दातदुखी कानापर्यंत जाणवते.

**घसा** :– *दुखतो*, कानापर्यंत. घशात काही तरी मऊ पदार्थ आहे असे वाटते. गुदमरल्यासारखे वाटते, *कॉलर सैल करावी लागते* ( कपड्यांचा दाब सहन होत नाही ). *गिळताना* घसा दुखतो. विशेषतः नुसता घुटका गिळताना जास्त, पेय पिताना कमी, घट्ट पदार्थ खाताना बरे वाटते. घसा दुखत असला तरी सारखे गिळावेसे वाटते. गिळलेले पदार्थ नाकावाटे बाहेर येतात. घसा आतून निळसर व बाहेरून स्पर्शही सहन होत नाही. फक्त पेये पिता येत नाहीत. गार पेयाने बरे वाटते. घशात फक्त गोळा आहे असे वाटते. घटसर्प–कंठाचा. टानसिलाची सूज–पू होतो. बाहेरून गळा अतिशय हुळहुळा. गळ्याखालील खळी सुजल्या सारखी वाटते. दुर्गंधि कफाचे तुकडे खाकरून काढणे. घशातील गोळा वर चढतो व गिळताना खाली जातो असे वाटते.

**जठर** :– दारू, शिंपातील मासे खावेसे वाटतात. भूक लागली की अन्न केव्हा येते असे होते. तहान लागते पण पाणी पिण्याची भीती वाटते. जठरात कुरतडल्या सारखे वाटते, खाण्याने थांबते पुन्हा काही तासाने सुरुवात होते (कॅन्सर). विटाळशेपणी ओकाऱ्या होतात व डोके दुखते, झोपण्याचे अगोदर. बर्फाचे पाणी प्याल्याने मळमळते.

**उदर** :– पोटाच्या खळीत हुळहुळे होते किंवा पेटके येतात, कंप झाल्याप्रमाणे हालचाल दिसते. यकृतात खोल ठुसठुसते–यकृताचे गळू. कंबरेभोवती वस्त्रांचा दाब सहन होत नाही. पित्ताशयाची सूज (सेप्टिक). उदर नगाऱ्याप्रमाणे, वर कपडा सहन होत नाही. गुदद्वारापासून बेंबीपर्यंत कळा येतात. अपेन्डीसायटीस–पाटीवर गुडघे वर करून निजावे लागते. डाव्या कुशीवर वळले तर आत गोळा फिरत आहे असे वाटते. प्रत्येक वेळी शिंकताना किंवा खोकताना गुदात किंवा मूळव्याधीत कळा येतात किंवा टोचते. मूळव्याध, निळसर, बाहेर येते. उदर, कदत हुळहुळे होऊन दुखते, मांड्यापर्यंत ताठल्यासारखे वाटते. गुदद्वार आवळल्यासारखे वाटते. गुदास एकसारखी भावना पण शौचाकरिता नव्हे. मलावरोध–गरोदरपणी.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी काळी, रक्तमिश्रित, फेसाळ, वारंवार जावे लागते. अल्बुमिन जाते. मूत्राशयात गोळा फिरत आहे असे वाटते.

**पुरुषजननेंद्रिये** :– मानसिक वैषयिक वासना पण शारीरिक अपात्रता. मनामध्ये नानाप्रकारचे वैषयिक विचार येतात पण शिश्न ताठ होत नाही. संभोगाचे वेळी वीर्यपात अपुरा किंवा होतच नाही. वीर्याला उग्र तिखट वास येतो. मुष्टिमैथुनाचे दुष्परिणाम.

**स्त्रीजननेंद्रिये** :– **विटाळ काळा, थोडा व थोडे दिवस किंवा एखादा तास** दररोज जातो. ओटीपोटात वेदना सुरू होऊन त्या घशापर्यंत येतात व घसा धरल्यासारखा वाटतो. डाव्या रजःपिंडाची सूज–गुल्मे–वेदना होताना उदरावर कपडा सहन होत नाही. विटाळ सुरू झाला म्हणजे सर्व वेदना थांबतात. स्तनाची सूज, निळसर; भोसकल्याप्रमाणे वेदना. दूध थोडे– निळसर. विटाळ थांबण्याच्या वयात–हृदयाची धडधड, अंगात उष्ण लाटा येतात, मूर्च्छा येते, टाळू दुखते. धुपणी, भरपूर जाते, चुरचुरते, कपड्याना हिरवे डाग पडतात व ते कडक होतात. गर्भाशय उघडे आहे असे वाटते. कामोन्माद.

**श्वसनेंद्रिये** :– **झोप लागत आहे तोच गुदमरल्यासारखे वाटते**; दीर्घ श्वास घ्यावासा वाटतो, सारखे वारे हवेसे वाटते. खोकताना गुदमरल्यासारखे वाटते.

मानेला स्पर्श केला किंवा कानात काही घातले तर खोकला येतो–खाकरून थोडा कफ बाहेर काढल्याने बरे वाटते. कंठात पडदा आहे किंवा कातडे लोंबत आहे असे वाटते. दमा–झोपेतूनच श्वास लागून जागे होणे– खोकून खोकून थोडा कफ पडल्याने बरे वाटते. न्युमोनिया– शेवटली अवस्था– फुफ्फुसात पू होतो– कफ फेसाळ, रक्त-पूमिश्रित व खूप घाम येतो. कंठाला स्पर्श सहन होत नाही. खोकताना बूच खाली वरती होत आहे असे वाटते.

**हृदय** :– अशक्त, वळत आहे किंवा मोठे झाले आहे असे वाटते. धडधडते व मूर्च्छा येते. उपजलेले मूल निळे होते.

**पाठ** :– गुदास्थीत वेदना होतात विशेषतः बसल्या जागेवरून उठताना. पाठीपासून हात पाय, डोळे वगैरे पर्यंत दोरे ताणल्यासारखे वाटतात. मान ताठते, जबड्याची हालचाल कष्टाने होते.

**हातपाय** :– खाकेतील गाठी सुजतात. खाकेतील घामाला लसणीसारखा वास येतो. डावा हात बधिर, बोटांची टोके बधिर. नखांच्या कोपऱ्यात भेगा पडतात. गुडघे गार, किंवा पावलाना दुर्गंधी गार घाम येतो. पायांची बोटे मोडल्यासारखी वाटतात. तंगडीचे हाड दुखते. गृध्रसी वात, जरा हालचाल केली की वेदना होतात स्वस्थ पडून बरे वाटते. स्नायुबंध आखडतात. घसेदुखीत तंगड्याची हाडे दुखतात. भीतीमुळे पोटऱ्यात पेटके येतात.

**झोप** :– येत नाही. स्वप्नात भयंकर देखावे दिसतात, साप दिसतात. लहान मुले झोपेत कण्हून इकडून तिकडे लोळतात.

**त्वचा** :– चट्टे पडलेली, निळसर: काळे ठिपके. पायावर चरत जाणारे व्रण. व्रणाभोवती काळे वर्तुळ पडते. **शिरा फुगून वेड्यावाकड्या होऊन त्यात व्रण पडतात.** क्षते, काळी पुळी, म्हातारपणाचे धावरे. जखमांचे वण लाल होतात, दुखतात, फुटतात व रक्त येते.

**ज्वर** :– जागे झाल्यानंतर किंवा झोप लागताना *अंगात उष्ण लाटा येतात*, टाळू कढत होते. पाणी प्याल्याने थंडी वाजते व घाम येतो–आंबट पदार्थ खाण्याने ताप येतो. हिवताप, दोषीज्वर, वसंत ऋतूत येणारा ताप. घाम येतो–मानेला, खाकेत, झोपेत. घाम रक्तासारखा, काळे डाग पडतात. घामाला लसणीप्रमाणे वास येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *झोपेत*; *झोपेनंतर*. *सकाळी*; *उष्णता*; खोलीची, *सूर्याची*. *उन्हाळा*; *वसंतऋतु*; *गिळताना*; आंवळा; पेये.

*किंचित्स्पर्श किंवा दाब. वस्त्रांचा दाब*, **मानेभोवती, कंबरेभोवती.** *स्राव येण्याचे बंद झाल्यामुळे.* विटाळ सुरू होण्याचे अगोदर व बंद होताना. *विटाळ थांबण्याच्या वयांत. दारू.* ढगाळ हवा. उभे राहिल्याने, खाली वाकताना. हालचाल. डोळे मिटल्याने. **कढत पेये.**

**ब या :–** *मोकळी हवा. भरपूर स्राव गेल्याने.* जोराने दाबल्याने *थंड पेये.* वाकून बसल्याने. खाण्याने. विकार झालेला भाग धुतल्याने

**सहाय्यक औषधे :–** आर्से;कॅल्क–का; कार्बो–व्हेजि; झिंक–आयो; नाय–ॲसि; फास्फ; लायको; हेपार.

**संबंधी औषधे :–** कास्टि; झिंक, सेपि.

---

## २७५. लॅक्टिक ॲसिड Lactic Acid

**सर्वसाधारण :–** मधुमेह–खूप तहान लागते, खूप भूक लागते व लघवीला वारंवार भरपूर होते. तोंडाला लाळ सुटते, पाणी येते, मळमळते विशेषतः गरोदरपणी, खाण्याने कमी होते. कढत जळजळीत ढेकरा येतात– तंबाखु ओढण्याने जास्त. स्तनात दुखते, खाकेतील गाठी मोठ्या होतात व वेदना पंजापर्यंत जातात. सांधे दुखतात– हालचालीने जास्त. चालताना सर्व शरीर कापते. पावलांना खूप घाम येतो. ताकाचा आंबटपणा या आम्लामुळे असतो.

---

## २७६. लॅक्नॅन्थस Lacnanthes

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम डोके; छाती व रुधिराभिसरण यावर होतो. डोके मोठे झाल्यासारखे वाटते. गालावर लाली. नाक चिमटल्याप्रमाणे वाटते. छातीत कढत झाल्यासारखे वाटते, हृदयाभोवती बुडबुडे येऊन उकळल्यासारखे वाटते. पाठीत तिकोनी हाडांमध्ये बर्फ ठेवल्याप्रमाणे गारपणा. मान वाकडी होते एका बाजूला विशेषतः घसा दुखत असताना; मन्यास्तंभ.

---

## २७७. लॅट्रोडेक्टस Latrodectus Mactans

**सर्वसाधारण :–** या कोळ्याच्या विषाचा परिणाम **हृदय** व रक्त यावर होतो. काळजी वाटते. वेदनामुळे किंचाळणे. मळमळते नंतर उदरात दुखावयास लागते. काळी ओकारी होते. पोटाच्या खळीत गळून गेल्यासारखे वाटते

किंवा तेथेच वेदना स्थिर होतात. **धापा टाकणे, श्वास न घेता आल्यामुळे मरू अशी भीती वाटते.** श्वासोच्छ्वास करता येत नाही. ***हृदयातील वेदना*** **तीव्र** व खांद्यापर्यंत व **दोन्ही हातात जातात**, हात बधिर होतात, निर्जीव होतात. **अन्जायना.** नाडी जलद, अशक्त, त्वचा दगडाप्रमाणे गार. स्वप्नात उडत आहोत असे वाटते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** अगदी जरा हालचाल–हाताची मुद्रा. श्रम.

**संबंधी औषधे :–** टरेन्टु.

---

## २७८. लॅथिरस (मसुराची डाळ) Lathyrus

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम मज्जारज्जूवर होतो. पाय लुळे पडतात. डोळे मिटून उभे राहिल्याने घेरी येते. जिभेच्या शेंड्याची आग होते–मिरमिरते–जीभ व ओठ बधिर, जीभ भाजल्यासारखी वाटते. चालताना *अंग* कापते, झोकांडे जातात. पाय ताठतात–चालताना पायाची आढी घातल्याप्रमाणे चालावे लागते; चालताना गुडघ्यावर गुडघे आपटतात; बसलेले असताना पाय लांब करता येत नाहीत किंवा आढी घालता येत नाही. कुल्ले व पायांचे स्नायू वाळतात. पाय लोंबकळत ठेवल्यास सुजतात, निळे होतात. चालताना टाचा जमिनीवर टेकत नाहीत, बोटावर चालावे लागते. पुढे वाकून बसावे लागते व उठताना अतिशय त्रास होतो. लघवीला इतकी घाई होते की गेले नाही तर आपोआप होते. एकसारख्या जांभया, झोप येते.

---

## २७९. लाप्पा Lappa

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम स्राव; **त्वचा;** यकृत व सांधे यावर होतो. **जडपणा, हुळहुळेपणा व ठणका** त्यामुळे निजणे सुखावह वाटत नाही. **बधिरपणा,** कंबरेचा. पोटऱ्या बधिर व ठणका लागतो. घेरी येताना मळमळते व ओकावयास होते. टाळूवर **जड ओझे** ठेवल्यासारखे वाटते. नाकावर आरपार व डोळ्याभोवती लाली येते. अनेक रांजणवाड्या एकदम येतात. चेहऱ्यावर पुटकळ्या येतात व त्याना स्पर्श सहन होत नाही. ***आंबटपणा*** चव आंबट, खाल्लेले अन्न आंबट होते व ओकून पडते. छातीत कंप. गर्भाशयात मार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा. गर्भाशय सरकते, चालताना,

उभे राहताना, धक्का लागल्याने, जास्त. मांड्यांचा पुढील भाग अशक्त झाल्यासारखा वाटतो. सांध्याभोवती हुळहुळेपणा. उगवण चिकट, चेहऱ्यावर डोक्यावर वगैरे. ओलसर दुर्गंधी इसब. लहान लहान गळवे बरीच येतात. *खाकेतील घाम गार व छातीवर गळतो, दुर्गंधी.*

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– दमट थंडी. हालविल्याने. उजव्या कुशीवर निजल्याने. जोराचे श्रम.

**ब षा** :– आभाळ आलेली हवा.

**संबंधी औषधे** :– ॲग्रे-का.

---

## २८०. लायकोपस Lycopus Virginicus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम हृदय; रुधिराभिसरण व डावी बाजू यावर होतो. संत्रस्त व अशक्तपणा. *हृदयाचे ठोके जलद व खळबळकारक.* **हृदयविकारामुळे रक्तस्राव होण्याची प्रवृत्ति. रक्तस्राव** नाकातून, फुप्फुसातून, मूत्रव्याधीतून वगैरे. वेदना जागा बदलतात. गलगंड.

**मानसिक** :– घाबरट, उतावीळ व कंपयुक्त. कोणत्याही गोष्टीचे आकलन लवकर होत नाही.

**डोळे** :– पुढे येतात, वटवटीत. डोळ्यावर (उजव्या) दुखते व त्याच वेळेस अंडात (डाव्या) ठणका लागतो.

**चेहरा** :– फुगलेला, निर्विकार, मुखवट्याप्रमाणे. पिंगट–पिवळसर.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला भरपूर होते. बहुमूत्रता. भरपूर पाणी पिणे.

**श्वसनेंद्रिये** :– निजल्याने गुदमरल्यासारखे वाटते. कफातून रक्त येते. कफ गोडुस. संध्याकाळी किंवा झोपेत खोकला येतो पण जाग येत नाही.

**हृदय** :– **हृदयविकारामुळे उत्पन्न झालेला खोकला. हृदयाचे ठोके जोराने व अतिशय जलद पडतात,** खळबळकारक. **हृदयाच्या जागी दाटल्यासारखे वाटते– हुळहुळे होते,** ठणका लागतो, आवळल्यासारखे वाटते. **नाडी भरलेली,** *मोठी, मऊ व हृदयाच्या ठोक्याशी असंबद्ध.*

**पाठ** :– *(उजव्या) तिकोनी हाडाखाली कढत होऊन ठणका लागतो.*

**त्वचा** :– गार.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– मनःक्षोभ. श्रम. उष्णता. झोपेनंतर. उजव्या बाजूस निजल्याने. हृदयाकरिता घेतलेल्या औषधांचा दुरुपयोग. स्राव बंद झाल्याने. भावनाविषयी विचार केल्याने.

**संबंधी औषधे** :– कॅक्ट; क्रॅटिग; कालिसो.

---

## २८१. लायकोपोडिअम Lycopodium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *पोषण*; *पचनेंद्रिये*; *मूत्रेंद्रिये*; *उजवी बाजू*– उजवी ते डावीकडे; *घसा*; छाती; रजःपिंड; मेंदू; व फुप्फुसे यावर होतो. **लक्षणे व विकार आलटून पालटून होतात किंवा तेच तेच पुन्हा उद्भवतात.** थंडीनंतर पुन्हा थंडी वाजणे, आखडणे नंतर लांब होणे, लाली व फिकटपणा, आपोआप हालचाल वगैरे. विकार हळुहळु वाढत जातात व **पुनः पुनः उद्भवतात.** ठुसठुस. वेदना क्षुल्लकसुद्धा सहन होत नाहीत, त्यानी राग येतो. वेदनामुळे धक्के बसतात. *आंबटपणा*; जठरातील आम्लत्व वाढते, **अंबट चव**, ढेकरा ओकारी वगैरे. **खडे होण्याची प्रवृत्ती**– मूतखडा, पित्ताचा खडा, लघवीतून वाळू जाणे, वातरक्तात सांध्यावर खडे जमणे वगैरे. **किडकिडीत, सुकलेले व** ***उदरात वात धरण्याची प्रवृत्ती असलेले इसम.*** रुधिराभिसरण मंद किंवा ते होतच नाही असे वाटते. हातपाय निर्जीव झाल्यासारखे वाटतात. वाळणे, वरुन खाली. अकाली वृद्धत्व. जलोदर, नाळगुद. इंद्रियांची शक्ती क्षीण. अशक्त, अकाली प्रौढ असलेली मुले. गार पेये सोसत नाहीत. **प्रत्येक पदार्थ फळत असावा अशी वासना.** बुद्धीने तीक्ष्ण पण शरीराने थकलेले इसम. कॅन्सर. *कोरडेपणा*–तळहात, योनि, त्वचा वगैरे. **गारपणा** एखाद्या भागाचा, डोके, घसा वगैरे. **करपडणे**; त्वचेवर त्वचाच्या जागी डुकली जाते अशाजागी, गुदद्वारात, स्तनाग्रे वगैरे. विकार झालेल्या भागात मुंग्या येतात. आचके येताना किंचाळणे, तोंडाला फेस येतो, हात आपटणे. हाडे मऊ होतात, टोकाना सूज येते, कुजतात. भीती, मनस्ताप, राग, काळजी, ज्वर, अति *ओझे उचलल्याने, मुष्टिमैथुन, गाडीत बसून जाताना, तंबाखु खाणे, दारू यामुळे उद्भवलेले दुष्परिणाम. एका बाजूनी अवास्तव वाढ, विशेषतः स्त्रियांची, विटाळ थांबण्याच्या वयात.*

मानसिक :– मनाने तल्लख पण शारीरिक अशक्तपणा वाढत जातो. विचार करवत नाही. बोलताना शब्द चुकीचे वापरणे, लिहिताना गाळणे, किंवा चुकीचे लिहिणे. मेंदूचा थकवा. जागे झाल्यानंतर राग येतो, खिन्नता वाटते किंवा काळजी वाटते. क्षुल्लक गोष्टीने त्रासणे. भीती वाटणे. आजारीपणात हट्टी व गुलमी; गर्विष्ठ; चंचल खवचट, अबोल, निराश. एकटे असण्याची भीती वाटते. आत्मविश्वासाचा अभाव—नवीन गोष्ट हातात घेण्याची भीती वाटते परंतु ती पत्करली तर ती चांगल्या रीतीने पार पाडणे. काय लिहिले ते वाचता येत नाही. कोणी आभार मानले तरी गहिवर येतो. मुले दिवसभर रडतात, कुरकुरतात, रात्री बरी असतात. खाताना घाईने खाणे. खिन्नता किंवा आनंदी. घरातील मंडळींचा तिटकारा, स्वतःची मुले सुद्धा नकोशी होतात. संशयी, अविश्वास, दुसऱ्याचे दोष दाखविणे. माणसांची भीती वाटते, विशेषतः अनोळखी इसमांचा. कोणतीही नवीन गोष्ट बघावीशी वाटत नाही. आपण लवकरच मरणार असे काळजीयुक्त विचार मनात येतात.

डोके :– वेळच्यावेळी जेवले नाही तर डोके दुखावयास लागते; डोक्यातील वेदना एका बाजूस सुरू होऊन दुसऱ्या बाजूस जातात व तेथे जास्त होतात. डोक्याच्या मागील भागात रात्री ठुसठुसते, अंग तापल्याने जास्त. खोकल्याची उबळ थांबल्यानंतर डोक्यात ठुसठुसावयास लागते. दोन्ही कानशिले एका ठिकाणी स्क्रू पिळल्याप्रमाणे वेदना होतात. अकाली टक्कल पडते किंवा केस पांढरे होतात. विनाकारण डोके हालवावेसे वाटते. कपाळावर खोल आठ्या पडतात; उदर, फुप्फुसे व मेंदूच्या विकारात किंवा चिक्कू माणसांच्या. डोके दुखणे मोकळ्या हवेत कमी होते. सकाळी उठल्यानंतर घेरी येते, फिरत्या वस्तूकडे पाहिल्याने घेरी येते. किडकिडीत मुलांची डोकेदुखी. डोक्यातून पांढरे पापुद्रे जातात. सर्दी झाल्यानंतर, नाकातील स्राव कमी व्हावयास लागला की डोके दुखावयास लागते.

डोळे :– अर्धवट अधूड. वस्तूची अर्धीच बाजू दिसते. दृष्टीपुढे ठिणग्या दिसतात. रांजणवाड्या आतील कोपऱ्यात येतात रात्रीचे दिसत नाही. मोतीबिंदू डोळ्याच्या बाहेरच्या कोपऱ्यात मोड येतात.

कान :– दाट पिवळा दुर्गंधी स्राव. कानावर किंवा कानामागे इसब येतो. कानात आवाज होतात व कमी ऐकू येते. कसल्याहि आवाजामुळे कानात चमत्कारिक प्रतिध्वनि उमटतात. कानात कढत रक्त चढत आहे असे वाटते.

**नाक :–** ***नाकाच्या पाळ्या आत बाहेर हलतात.*** नाकाचा मागील भाग चोंदलेला व कोरडा. नाक चोंदते. मूल झोपेतून दचकून जागे होऊन नाक चोळीत उठते. नाक चोंदल्यामुळे तोंडाने श्वास घ्यावा लागतो. पिनस–स्राव करवडणारा. लहानपणापासून सुरू झालेले नाकाचे विकार. जीर्ण सर्दी, नाक वारंवार शिंकरावे लागते. घ्राणेंद्रिय अतिशय तीक्ष्ण.

**चेहरा :–** **पिवळसर,** फिकट, पांढुरका; **कपाळावर आठ्या पडतात** किंवा भुवया चढवून आठ्या घालाव्याशा वाटतात; स्नायूंना कंप येतो विशेषतः मेंदूत पाणी साचल्यामुळे, मेनिन्जायटिसमुळे किंवा न्युमोनिआत.

**तोंड :–** **वासलेले** ( ज्वरात ), ओठ हुळहुळे. दातांना स्पर्श **सहन** होत नाही. दातदुखीत गाल सुजतात– शेकल्याने बरे वाटते. **जीभ**– आत बाहेर जलद घेणे; कंपयुक्त, **सुजलेली**, जड, इकडे तिकडे हालते, भेगा पडलेली, शेंड्यावर वेदनायुक्त फोड. बोलणे अस्पष्ट. लाळ टाळूवर व ओठावर वाळते. दांत पिवळे. तोंड कोरडे पण तहान लागत नाही. पाणी सुटते.

**घसा :–** गोळा खालून वर येऊन घशात चिकटून बसल्यासारखा वाटतो, आवळल्यासारखा वाटतो, काहीही गिळता येत नाही. गिळलेले पदार्थ नाकावाटे बाहेर येतात. **घसा हुळहुळा व दुखतो** ( उजवी बाजू ), गार पेयाने जास्त होतो. घटसर्प. टानसील सुजतात, मोठ्या होतात, पिकतात. **अन्ननलिकेत** टणक पदार्थ आहे असे वाटते.

**जठर :–** **भूक लागते पण एकदोन घास खाल्ले की समाधान होते.** ***थोडे अन्न खाल्ले तरी पोट अतिशय भरल्यासारखे वाटते.*** कडधान्ये, कोबी, पिष्टमय अन्न सोसत नाही. गोड खावेसे वाटते. अन्न आंबट लागते. **ढेकरा अर्धवट येतात**– घशापर्यंत येऊन तेथे बराच वेळ जळजळत राहते. **पोटाच्या खळीत** भीतीची किंवा **काळजीची जाणीव होते. जठर दाबल्यासारखे वाटते.** जठरात कुरतडल्यासारखे वाटते. व्रण, कॅन्सर. आग होते. पित्ताची ओकारी. ओकारी शाईप्रमाणे किंवा काफीच्या बुकटीप्रमाणे. पोटदुखी गरम पाणी प्याल्याने कमी होते. पचनक्रिया मंद. भूक लागत नाही, किंवा इतकी भूक लागते की जसजसे खाणे होईल तसतसे ज्यास्तच खावेसे वाटते.

**उदर :–** यकृत सुजते त्या जागी दाबलेले सहन होत नाही. यकृताची जीर्ण सूज. ***वात धरून आवाज होतो*** **विशेषतः ओटीपोटात.** वातामुळे उदर फुगते. उदर हुळहुळे विशेषतः ओटीपोट. कंबरेभोवती पट्टा बांधल्याप्रमाणे वाटते. वस्त्रांचा दाब सहन होत नाही. उदरावर पिंगट चट्टे पडतात. जलोदर,

यकृताच्या विकारामुळे झालेले. शौचास अपुरे झाल्यासारखे वाटते, झाल्यानंतर बरेचसे शिल्लक आहे असे वाटते, शौचात वाळू पडते. मलावरोध व हगवण आलटून पालटून. शौचास प्रथम घट्ट होऊन नंतर मऊ किंवा पातळ होते. त्यानंतर थकवा वाटतो किंवा मूर्च्छा येते. ओटीपोटात उजवीकडून डावीकडे कळा येतात. मूळव्याध अतिशय हुळहुळी व ठणका लागतो, कढत पाण्याने बरे वाटते. गुदद्वार सोलवटल्याप्रमाणे दिसते. उजवीकडे वळताना उदरांत कांही तरी वर, खाली होत आहे किंवा घट्ट पदार्थ फिरत आहे असे वाटते. प्रवासात मलावरोध होतो. यकृताच्या विकारामुळे झालेले जलोदर.

**मूत्रेंद्रिये** :– वारंवार लघवीला लागल्यासारखी वाटते–गाडीत बसल्याने बरे वाटते. लघवीला बसल्यानंतर लवकर सुटत नाही, कुंथावे लागते. लघवी तुंबते (मूत्राशयात) किंवा लघवी होण्याचेच बंद होते. मूत्राघात. लघवी होण्याच्या अगोदर पाठीत ठणका लागतो लघवी झाल्यानंतर थांबतो. रात्री लघवीला फार वेळा जावे लागून भरपूर होते. लघवी झालेली समजत नाही (तापात). **लघवी होण्याचे अगोदर किंचाळणे** ( विशेषतः मुले, ती वेदनामुळे झोपेत किंचाळत उठतात, हातपाय झाडतात ). **लघवीतून तांबडी वाळू जाते.** मूत्रपिंडातील खडा, वेदना मूत्राशयापर्यंतच येतात.

**पुरुषजननेंद्रिये** :– **नपुंसकत्व**; मुष्टिमैथुनामुळे, अशक्तपणामुळे, वृद्धपणी वगैरे. इंद्रिये शिथिल होतात, कामवासना कमी होते. स्वप्नावस्था. वीर्यपात संभोगाच्यावेळी अकाली होतो. शिश्न ताठ होत नाही. मूत्रग्रंथी मोठी होते. इंद्रियावर मांसांकुर येतात. संभोग करताना झोप लागते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– कष्टार्तव–अतिशय वेदनामुळे मूर्च्छा येते. विटाळात गाठी पडतात, विटाळ पातळ, शौचास होताना विटाळ जातो. **धुपणी ठराविक वेळी वाहते**– करवडणारी, योनीची आग होते. योनी कोरडी, संभोगाच्या वेळी व नंतर त्रास होतो. योनीतून वारे जाते. योग्य वेळीं न्हाण येत नाही व स्तनांची वाढ होत नाही किंवा अकाळी पाळ्या बंद होतात. नष्टार्तव. उजव्या रजःपिंडात ठणका लागतो. त्यात झालेले पोकळ गुल्म. स्तनांना ठणका लागतो, ते हुळहुळे होतात; आत टणक गाठी येतात, आग होते, टोचते ( डाव्या ). स्तनाग्रे सोलवटलेली. गर्भ कोलांट्या उड्या मारीत आहे असे वाटते.

**श्वसनेंद्रिये** :– गार वारे [illegible] **वाटते** पण त्यामुळे गारठल्यासारखे वाटते. **श्वासोच्छ्वास** करताना घुरघुर वाजते, विशेषतः पाठीवर निजल्याने. श्वासोच्छ्वास **दम लागल्याप्रमाणे**. कफ, खारट, पिवळट–हिरवा, दुर्गंधी, गोळे. छातीवर

पिंगट चट्टे पडतात, छाती ताणल्यासारखी वाटते, आत आग होते. जिन्या-वरून खाली उतरताना खोकला जास्त येतो. धूर गेल्याप्रमाणे किंवा पीस अडकले आहे असे वाटून खोकला येतो. खंत घेऊन वाळत चाललेल्या मुलाचा कोरडा खोकला. न्युमोनिआनंतर फुप्फुसे पूर्वस्थितीवर न आल्यामुळे उद्भवलेला खोकला किंवा इतर विकार. फुप्फुसाच्या विकारात नाकाच्या पाळ्या आत बाहेर हालतात. फुप्फुसातील गळू. क्षय. न्युमोनिआ. फुप्फुसा-भोवती किंवा हृदयाभोवती पाणी साचून त्यामुळे उद्भवलेला दमा.

**हृदय** :– रात्री धडधडते; डाव्या कुशीवर निजवत नाही. धमन्या फुगून रुंद होतात. नाडी जलद चालते विशेषतः खाण्यानंतर किंवा संध्याकाळी, चेहरा व पाऊले गार होतात. रुधिराभिसरण थांबले आहे असे वाटते.

**पाठ** :– पाठ ताठलेली; त्रिकोनी हाडाच्यामध्ये विस्तव ठेवल्याप्रमाणे आग होते. बुडबुडे आल्यासारखे वाटतात. पाठीत यकृताच्या व मूत्रपिंडाच्या जागेत ठणका लागतो, दाबल्याने जास्त होतो. मानेची एक बाजू ताठते व सुजते. मान वाळते. माकडहाडात दुखते, ताठ बसल्याने ज्यास्त होते, लघवीनंतर कमी होते.

**हातपाय** :– खाकेत गळू होते ( उजव्या ). पंजाना व पावलाना पेटके येतात. पंजे बधिर. झोपेत हाताच्या बोटाना बारीक झटके येतात; चिकट घाम येतो. वेदनामुळे तंगडी वर उडते. पावले बधिर विशेषतः टाचा. टाचात दुखते–चाल-ताना खड्यावरुन चालल्यासारखे वाटते. पावलाना करवडणारा घाम येतो.. हातापायाना मुंग्या येतात, ते निर्जीव व बधिर होतात. हातपाय जड, शिथिल, कापतात पण हालचाल सुरू केली म्हणजे बरे वाटते. एकच हात किंवा पाय वाळतो. एक पाऊल गार दुसरे कढत ( उजवे ). गृध्रसीवात–मांड्यांपासून टाचापर्यंत वेदना होतात, त्या कुशीवर निजवत नाही, शेक-ल्याने व चालताना बरे वाटते. हातापायाना झटके बसतात. तळपायाना वेदनायुक्त घट्टे पडतात. हातापायांची बोटे आखडलेली. रात्री हाडात वेदना होतात. हाडे कुजतात, मऊ होतात.

**झोप** :– अस्वस्थ. तापात गुंगी येते. झोपेत हसणे किंवा रडणे. घाबरल्यासारखे होऊन झोपेतून जागे होणे. मूल एकाएकी चिडून ओरडत उठते किंवा घाबरून आईला बिलगते. अपघाताची स्वप्ने पडतात. मूल दिवसभर झोपते व सर्व रात्र रडत राहते.

**त्वचा** :– कोरडी. सांध्याच्या बेचक्यात सोलवटलेली. उगवणीत पू होतो. आलेली उगवण एकदम मावळावयास लागते, घावरे गळवे वगैरे. रक्तवाहिन्यांचे वेडेवाकडे जाळे होते. जीर्ण व्रण–आग होते, टोचते–गार पाण्याने बरे वाटते. व्रणावर एकावर एक पापुद्रे बसतात व ते पडत नाहीत. जीर्ण पित्ताच्या गांधी, उष्णतेने बरे वाटते. त्वचेवर भेगा पडून त्यातून रक्त येते. ताठणारी गुल्मे. सूज येते विशेषतः विटाळशी होण्याच्या अगोदर. गळू किंवा उगवण आलेल्या जागी टणकपणा येऊन तेथे गाठी होतात. इसब, मूत्रविकार, पचनविकार किंवा यकृताच्या विकाराबरोबर होणारा.

**ज्वर** :– सतत, संतत, विषमज्वर. टायफाईडची शेवटची अवस्था–गुंगी, तोंड वासलेले, डोळे अर्धवट उघडे, डोळ्यातून पू येतो, लघवी झालेली समजत नाही, काहीतरी बडबड करणे, हातानी वस्तु उचलण्याची क्रिया करणे, बेशुद्धी, मूत्रावरोध, मलावरोध. **गारपणा** बर्फाप्रमाणे– डोके, घसा, जठरात वगैरे. थंडी वाजल्यानंतर पुन्हा थंडी वाजते, थंडीनंतर ओकावयास होते, पहिल्या झोपेनंतर थंडी वाजते. खोकताना अंग गार होते. विकट दुर्गंधी घाम येतो– खाकेत किंवा पावलाना. घामाला कांद्यासारखा वास.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *वस्त्रांच्या दाबाने*. उष्णता. **जागे झाल्यानंतर**. वारे. **खाण्याने**, अगदी थोडे किंवा पोट भरून. शिंपातील मासे. **अजीर्णाने**. संध्याकाळी ४ पासून ८–१० वाजेपर्यंत. पावसाळी, वादळी हवा. विटाळ बंद झाल्यामुळे किंवा पाळीच्या अगोदर. दाब. दूध, पालेभाज्या, कोबी, कडधान्ये.

**ब वा** :– *गरम पेये*– अन्न. गार पाणी लावल्याने. **हालचाल केल्याने.** ढेकरा आल्याने. लघवी करताना. मध्य रात्रीनंतर.

**सहाय्यक औषधे** :– **आयो**; कॅलि-का; **कॅल्क-का**; **पल्स**; फास्फ; **लॅके**; **सल्फ.**

**संबधी औषधे** :– कार्बो-व्हेजि; सिलि.

---

## २८२. लायसिन (पिसाळलेल्या कुत्र्याची लाळ)

Lyssin; Hydrophobinum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **मज्जातंतू**; मज्जारज्जू ; **घसा** व जननेंद्रियें यावर होतो. आचके. **ज्ञानेंद्रिये अत्यंत तीक्ष्ण.** हाडे ठणकतात. वैषयिक वासना प्रबळ झाल्यामुळे उद्भवलेले विकार. आचके, फेफरे–तेजस्वी

वस्तूकडे किंवा वाहत्या पाण्याकडे पाहिल्याने येते. भावना, वाईट बातम्या, पाण्यासंबंधी मनात विचार आल्याने लक्षणे बळावतात. भीती वाटते. राग येतो. अतिशय जलद बोलणे. उतावीळपणा व **प्रक्षुब्ध वागणूक**, आततायी कृत्ये करण्याची प्रवृत्ती, मुलाना खिडकीबाहेर फेकणे वगैरे. भटकण्याची प्रवृत्ती. शिंकताना डोके मागे वाकविणे. कुत्रे (साधे किंवा पिसाळलेले) चावल्यानंतर डोके दुखावयास लागते. **एकसारखी दाट**, बुळबुळीत, फेसाळ लाळ थुंकणे, तोंडाला फेस येतो. एकसारखे गिळावेसे वाटते पण गिळताना घसा दुखतो. पाणी पिताना गुदमरते. पाण्याचा आवाज ऐकल्याशिवाय लघवी होत नाही. वाहते पाणी पाहिले की लघवीला किंवा शौचास लागते. वैषयिक क्षोभ. शिश्न ताठ होऊन दुखते, व वारंवार वीर्यपात होतो. गर्भाशय असल्याची जाणीव, बाहेर येईल असे वाटते. योनी हुळहुळी त्यामुळे संभोग करवत नाही. गर्भाशय जागेवरून निखळते. धुपणी भरपूर, मांड्यापर्यंत वाहते. गरोदरपणी विचित्र कल्पना, किंवा विचित्र आवडीनिवडी उत्पन्न होतात. भुकल्याप्रमाणे खोकला. शिंकताना डोके मागे वाकते. हातापायाना आचके येतात. मानेत दुखते. त्वचा निळसर.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा हो :– **वाहते पाणी पाहिल्याने**, पाण्याचा आवाज ऐकल्याने. उन्हाची उष्णता. **तेजस्वी वस्तूंकडे पाहिल्याने**. वारे लागल्याने. खाली वाकल्याने. पाण्याची मनात कल्पना आली तरी.

**क मा** :– मागे वाकल्याने. हळुहळु चोळण्याने.

**संबंधी औषधे** :– लॅक–कॅनि; लॅके.

---

## २८३. लारोसरेसस Laurocerasus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मन*; **मेंदू**; **मज्जातंतू**, **अन्ननलिका**, छाती; श्वासोच्छ्वास व **हृदय** यांवर होतो. *लक्षणे होताना एकदम थकवा येतो*; **जीवनशक्ती क्षीण होते; ज्ञानेंद्रिये बधिर होतात, अंग गार पडते किंवा निळेपणा येतो**. गळून पडणे. आलेली मूर्च्छा बराच वेळ राहते. खाली गळून पडेल असे वाटते–मेंदू, उदर, हृदय वगैरे. शक्तिपात. सुनबहिरी. अंतर्गत आग. रक्तस्राव–रक्त पातळ. कंप, आचके– चेहऱ्यात. कंरवात, स्नायूना सारखे धक्के बसतात, स्वस्थ राहवत नाही. फेफरे, हातपाय हलतात व निर्जीव झाल्याप्रमाणे अशक्तपणा येतो. मनःक्षोभ झाला की

बोलणे अस्पष्ट येते. फेफरे येण्याचे अगोदर, फेफरे चालू असताना व नंतर धापा टाकणे. उपजल्यापासून निळी होणारी मुले.

**मानसिक** :- ***एकदम आठवण नाहीशी होते*** वेदना, भीतीमुळे वगैरे. पोटातल्या वेदनामुळे बोलण्याची क्रिया नष्ट होते. बेशुद्धि; बोलता येत नाही; हालचाल करता येत नाही. काल्पनिक संकटाची भीती व काळजी वाटते.

**डोके** :- दुखते सकाळी ११ ते रात्री १ पर्यंत. रात्री टाळूत फाडल्याप्रमाणे वेदना होतात. घेरी येताना गुंगी येते.

**डोळे** :- उघडे, बाहेर आल्याप्रमाणे, वटारल्यासारखे, वस्तु आहेत त्यापेक्षा मोठ्या दिसतात.

**चेहरा** :- निळसर, धापा टाकीत असताना. मुलाचा उपजल्यानंतरचा निळेपणा. माशा किंवा कोळी सरपटत आहेत असे वाटते.

**तोंड** :- फेफरे येताना फेस येतो.

**घसा** :- ***पेये गिळताना झालेला आवाज ऐकू येतो–आतड्यात गुडगुडल्याप्रमाणे आवाज होतो व वात धरतो.*** अन्ननलिकेला आचके बसतात.

**जठर** :- एकसारखी उचकी. कडू ढेकरा. खोकताना अन्न ओकून पडते. जठरात वेदना होताना बोलवत नाही. लघवी करताना जठरात दुखते. शेगडीजवळ मळमळते. बेंबीपासून खाली ओटीपोटापर्यंत आतडी गळून पडत आहेत असे वाटते, अति श्रमाने किंवा बोलताना जास्त. उदरात **गुडगुड आवाज होतो; वात धरतो.** यकृतात गळू होत आहे याप्रमाणे दुखते.

**मूत्रेंद्रिये** :- लघवी, तुंबते, होण्याचे थांबते, आपोआप होते, व त्या वेळेस छातीत धडधडते, गुदमरल्यासारखे वाटते, व मूर्च्छा येते.

**स्त्रीजननेंद्रिये** :- गर्भाशयात कॅन्सर झाल्याने वेदना होतात, लाल रक्त पाझरते व त्यात बुळबुळीत गाठी पडतात; झोपेत बरे वाटते. पाळीत मूर्च्छा येते व व अंग गार पडते.

**श्वसनेंद्रिये** :- कंठ व श्वासनलिका हुळहुळी होते. आवाज खोल गेलेला. **गुदमरल्यासारखे वाटून श्वासाकरिता धापा टाकणे, विशेषतः बसलेल्या स्थितीत.** श्वासोच्छ्वास वरवर होतो. दम लागलेला असताना छाती फुगविता येत नाही, असे वाटते. कोरडा खोकल्याचा ठसका, रात्रीचा, क्षयात किंवा हृदयविकारामुळे उत्पन्न झालेला. कफ गिळगिळीत असतो किंवा आत रक्ताचे

कण असतात. **हातानी हृदय दाबून धरणे.** हृदयविकारामुळे उत्पन्न झालेल्या छातीतील वेदना. नाडी मंद, बदलणारी, अनियमित.

**हातपाय** :– हातापायाच्या बोटाची नखे जाड व बोथट होतात. हाताची बोटे जाड ठोकळ्याप्रमाणे दिसतात. पंज्यांच्या शिरा फुगतात. पाऊलापासून गुडघ्यापर्यंत पाय गार चिकट होतात, विशेषतः कंपवातात. पायाची आढी घातल्याने पाऊले बधिर होतात.

**झोप** :– लागत नाही. भीतीयुक्त काळजी वाटते व अस्वस्थपणा येतो. बेशुद्धी पण डोळे उघडे.

**त्वचा** :– गार, निळसर.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **बसल्याने.** श्रमामुळे. थंडी. भीती, वाकल्याने.

**क मी** :– **डोके उशीवर न ठेवता सपाट निजल्याने.** खाण्याने. झोप. मोकळी हवा.

**संबंधी औषधे** :– अमो–का; गल्से; प्रून–स्पा; हैड्रो–ॲसि.

---

## २८४. लिथिअम कार्बोनिकम Lithium Corbonicum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **हृदय; लहान सांधे;** फुप्फुसे व लघवी यावर होतो. **हुळहुळेपणा** आणि **जडपणा. आम्लत्व वाढते.** आतून बाहेर दाबल्यासारखे वाटते; डोके, उदर, शिवणीत छातीत वगैरे किंवा बोथट वस्तूने दाबल्यासारखे वाटते. वातरक्त. संधिवात. लघवीतून युरिक ॲसिड जाते. पडलेल्या किंवा मार लागलेल्या जागी हुळहुळेपणा राहतो, तप्त सुया बोचल्याप्रमाणे भयंकर वेदना होतात. सर्व शरीर लुळे पडल्याप्रमाणे वाटून ताठते.

**मानसिक** :– एकाकी आहोत असे वाटून रडावेसे वाटते. वस्तूंची नावे आठवत नाहीत.

**डोके** :– दुखते, खाण्याने थांबते, काही वेळाने पुन्हा दुखावयास लागून पुन्हा खाले की थांबते. घेरी येताना कानात घंटेसारखे आवाज होतात.

**डोळे** :– वाचताना, लिहिताना डोळे कोरडे होतात. वस्तूंचा अर्धा बाजूचा भाग दिसत नाही ( उजवा ), विटाळसेपणी जास्त.

**नाक** :– लाल, व सुजलेले ( उजवी बाजू ). नाकाच्या मागील भागातून घशात शेंबडाचे गोळे उतरतात.

**चेहरा** : दोन्ही गालावर कोंड्यासारख्या खपल्या बसतात.

**घसा** :– आत शेंबडाचे गोळे उतरतात.

**जठर** :– कुरतडल्याप्रमाणे वेदना होतात त्याच वेळेस डाव्या कानशिलात दुखावयास लागते, खाण्याने बरे वाटते. पोटाच्या खळीतल्या फुगवट्यामुळे वस्त्राचा जरासुद्धा दाब सहन होत नाही. फळे किंवा चाकोलेट खाल्याने जुलाब होतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थोडी होते, व अतिशय तहान लागते. लघवीखाली लाल पिंगट गाळ बसतो. लघवी करताना हृदयाजवळ दाबल्यासारखे वाटते, झाल्यानंतर बरे वाटते. मूत्राशयाच्या जागी वेदना होऊन त्या लघवीनंतर वीर्यनलिकेपर्यंत येतात.

**पुरुषजननेंद्रिये** :– खूप लघवी झाल्यानंतर शिश्न ताठते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– स्तनातील वेदना हातातून बोटापर्यंत जातात.

**श्वसनेंद्रिये** :– श्वास आत फुफ्फुसातसुद्धा गार वाटतो. छाती आवळल्यासारखी वाटते.

**हृदय** :– हुळहुळे झाल्यासारखे वाटते व त्याच वेळेस डोळ्याची लक्षणे उद्भवतात. वेदना डोक्यापर्यंत जातात, पुढे वाकल्याने जास्त होतात; लघवीनंतर कमी होतात. हृदयात कंप, व फडफडते.

**हातपाय** :– लहान सांधे, हातापायांच्या बोटांचे दुखतात, सुजतात, कढत पाण्याने बरे वाटते. तळपायाच्या पोकळीतून गुडघ्यापर्यंत कळा येतात. हाताची बोटे हुळहुळी पण काही वस्तु धरल्याने बरे वाटते. घोटे चालताना दुखतात.

**त्वचा** :– कोरडी, खरखरीत. गालावर, पंजावर व डोक्यावर पांढरे खवले बसतात. वस्तरा लागून झालेले इसब.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– रात्री. विटाळसेपणी, नंतर किंवा विटाळ बंद झाल्यामुळे.

**क मी** :– पाण्याने. लघवीनंतर. हालचाल.

**संबंधी औषधे** :– नेट्र–फा; लायको; सल्फु–ॲसि.

---

## २८५. लिलिअम टिग्रिनम Lilium Tigrinum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***स्त्रीजननेंद्रिये***; **गर्भाशय**; **रज:पिंड**; ***हृदय***; **गुद**; **मूत्राशय**; डावी बाजू यावर होतो. ***भरल्यासारखे वाटणे***; ***जडपणा*** **किंवा आतून बाहेर दाबल्याप्रमाणे वाटणे**–गर्भाशयात, पापण्या, रज:पिंड वगैरे. **गर्भाशयाचे व रज:पिंडाचे शैथिल्य**– स्थानभ्रष्टता व त्यामुळे उद्भवलेली लक्षणे विशेषत: मानसिक किंवा हृदयाची. **कंप**– ओटीपोटात, कण्यात, गुडघ्यात वगैरे. **ठुसठुसणे**, खळबळ, लाटा, गुरगुरल्याप्रमाणे वाटणे आणि आग होणे. **वेदना मागे जातात**– डोळ्याभोवती, डोक्याच्या मागील भागापर्यंत, स्तनाग्रापासून आत छातीत, **हृदया**पासून मागे तिकोनी हाडापर्यंत. वेदना इतस्तत: जातात. शिरात रक्ताधिक्य होते. स्राव करवडणारे. अविवाहित स्त्रिया. काळजीने व संभोगातिरेकाने त्रस्त झालेल्या स्त्रिया. वैषयिक वासना उत्तेजित झाल्याने उद्भवलेली लक्षणे. संधिवात. उघडल्या मिटल्याप्रमाणे वेदना होतात.

**मानसिक** :– **उतावीळ**; **घाबरट**; **चिडखोर, तिरसट**– एकही चांगला शब्द न बोलणे, **वैषयिक प्रक्षोभ किंवा खिन्नता**. निरर्थक काम करण्याचा चाळा. **काहीतरी बेफाम** वेड लागल्याप्रमाणे भावना. **भीती वाटते**– वेड लागेल किंवा आपला रोग बरा होणार नाही अशी. सुंदर वस्तूंची आवड. शिव्या, शाप देणे, मारणे, स्वत:चे केस ओढणे. स्वत:च्या वस्तूविषयी असंतुष्ट, दुसऱ्याच्या बद्दल मत्सर. भराभर चालावेसे वाटते पण किती समजत नाही. कामधंद्याच्या काळजीने किंवा संभोगातिरेकाने लागलेले वेड. बोलावेसे तर वाटते पण आपण काहीतरी भलतेच बोलू अशी भीती वाटते. रडावेसे वाटते. गर्भाशयाची व मानसिक लक्षणे किंवा हृदयाची लक्षणे आलटून पालटून होतात. समजूत केल्याने जास्त होते. एकटेच बसून काल्पनिक तक्रारींविषयी विचार करणे. वैषयिक वासना व धर्माविषयी भीती आलटून पालटून.

**डोके** :– आग होते विटाळशी होण्याचे अगोदर व नंतर. डोक्यात भयंकर कलकलल्याप्रमाणे वाटणे, बेफाम खळबळ. डोळ्यावर डाव्या, टणका लागून घेरी येते व दृष्टीची लक्षणे उद्भवतात.

**डोळे** :– लचकल्याप्रमाणे वाटतात. **आग होते**, चुणचुणणे विशेषत: वाचताना. वेदना मागे डोक्यात जातात.

**नाक** :– शिंकल्याने डोक्यातील व डोळ्यातील वेदना कमी होतात.

**तोंड** :– जिभेवर मधुन मधुन पिवळे चट्टे. चव गोड– मागील भागात.

**जठर** :– कण्यातून भूक लागत आहे असे वाटते. मळमळते व त्यावेळेस पोटात गोळा आला आहे असे वाटते. तहान लागते. वारंवार बरेच पाणी पिणे विशेषतः लक्षणांचा प्रकोप होण्याचे अगोदर. आंबट पदार्थ, मांस किंवा गोड पदार्थांची वासना. जठराभोवती टणक वस्तु फिरत आहे असे वाटते.

**उदर** :– ताठलेले ताणल्याप्रमाणे. पांघरुणाचे वजन सहन होत नाही, विशेषतः पाळीनंतर. आत कळा येतात हातपाय पोटाशी घेतल्याने बरे वाटते. सकाळी घाई लागून शौचास जावे लागते. वारंवार थोडे थोडे अतिशय कुंथून शौचास होते– रक्त व आम पडतो. आव. गुदावर दाब पडल्यासारखे वाटून एकसारखे शौचास जावेसे वाटते विशेषतः उभे असताना, लघवी झाल्याने बरे वाटते. आत चमका मारतात, गरम पंज्याने हळुहळु चोळण्याने बरे वाटते. उदरात गुदद्वारापर्यंत कंपयुक्त अशक्तपणा वाटतो. सर्व अवयव खाली ओढल्याप्रमाणे वाटतात त्यामुळे छातीला पण खाली ओढ लागते. स्त्रियांची पाळी थांबण्याच्या वयात होणारी रक्ती आव.

**मूत्रेंद्रिये** :– वारंवार लघवी होईल असे वाटते. लघवी दुधासारखी, थोडी व कढत. मूत्राशयावर एकसारखा दाब पडून एकसारखी लघवी होईल होईलसे वाटते व त्यावेळेस गुदात गोळा बसला आहे असे वाटते. लघवीला लागल्या-नंतर गेले नाहीतर छाती भरल्यासारखी वाटते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– **ओटीपोटात जड होऊन खाली ओढ लागते, आतून बाहेर दाबल्यासारखे वाटते,** इंद्रिये जणू बाहेर येतील असे वाटते म्हणून हाताने आधार देणे भाग पडते व त्यावेळेस लघवीला थोडे थोडे व कष्टाने होते. रजःपिंडात (डाव्या) वेदना होतात, त्या मांड्यापर्यंत जातात व स्तनाखाली (डाव्या) दुखावयास लागते. विटाळ काळा, गाठ्याळ दुर्गंधी, फक्त हालचाल करतानाच जातो. धुपणी पिंगट, पातळ, करवडणारी, योनिद्वार चुणचुणते. पाळीनंतर जास्त जाते. गर्भाशय खाली येते किंवा पुढे वाकते. वैषयिक वासना प्रबळ झाल्यामुळे कामात मन गुंतविणे भाग पडते. स्तनाखाली (डाव्या) कूच किंवा गोळा बसला आहे असे वाटते.

**श्वसनेंद्रिये** :– छातीवर ओझे ठेवल्यासारखे वाटून श्वासोच्छ्वास करण्यास त्रास होतो; वारे हवे हवेसे वाटते. वारंवार दीर्घ श्वास घेणे. गर्दीच्या जागी किंवा बंद खोलीत गुदमरल्यासारखे वाटते. छातीच्या मध्यभागी आंवढा गिळताना खाली दर फिरतो आहे असे वाटते.

**हृदय** :– **मुठीत आवळल्यासारखे वाटते,** पूर्ण भरल्यासारखे वाटते, **गार झाल्यासारखे वाटते,** अशक्त, दोऱ्याला लोंबकळत आहे असे वाटते. सर्वांगात ठुसठुसते. वेदना उजव्या हातापर्यंत जातात, खाली वाकल्याने, उजव्या कुशीवर निजल्याने जास्त होतात, चोळण्याने, दाबल्याने बरे वाटते. **धडधडते.** नाडी अनियमित.

**हातपाय** :– दमल्यामुळे मानेत दुखते. पाठ तिकोनी हाडांच्या मध्ये मोडल्यासारखे वाटते. कमरेच्या सांध्यात आरपार दुखते. खडबडीत जमिनीवरून चालता येत नाही. तंगड्या दुखतात, स्वस्थ ठेवता येत नाहीत. गुडघ्यात कंप. हाताच्या बोटात चुणचुणते एका कटिसांध्यापासून दुसऱ्यापर्यंत दुखते.

**झोप** :– डोक्यात काहीतरी विचित्र भावनेमुळे येत नाही.

**ज्वर** :– मोकळ्या हवेत थंडी वाजते. तळहात तळपायांची आग होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***उष्णता*** खोलीची. हालचाल. **वाखे झाल्यामुळे. चालताना, उभे असताना. समजूत घालण्याचा प्रयत्न केला तर.** पांघरुणाचा दाब. धक्का लागल्याने.

**क मी** :– **मोकळी, ताजी, गार हवा. कामात गुंतल्याने.** डाव्या कुशीवर निजल्याने. सूर्यास्तानंतर. दाबल्याने. पायांची आढी घातल्याने. चोळण्याने.

**संबंधी औषधे** :– एलो; पल्स; प्लॅटि; स्पायजे.

---

## २८६. लेडम Ledum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***सांधे*** (लहान); **स्नायुबंध; डोळे;** टाचा; ***त्वचा***; फुप्फुसे; रक्त व डावी बाजू यावर होतो. **निळसरपणा, फुगीरपणा व गारपणा तरीपण बाह्य उष्णतेची नावड. भावना खालून, पावलातून वर जातात.** फाडल्याप्रमाणे वेदना होतात व त्या जागा बदलतात. सांधे दुखतात. विकार झालेले भाग अशक्त होतात, बधिर होतात, गार होतात व वाळतात. संधिवात, वातरक्त. रक्तस्राव होण्याची प्रवृत्ती; **रक्तस्राव**–लाल भडक, फेसाळ. त्वचेखाली रक्तस्राव होऊन काळे निळे डाग पडतात. जलयुक्त सूज. दारुडे. **भोसकून झालेल्या जखमा,** खिळा, गोळी लागणे, उंदीर चावणे, जनावरे, डांस वगैरेंचे चावे, नांगी लागणे; विंचू, गांधीलमाशी वगैरे. जखमा झालेल्या जागेत कंप होतो, दुर्गंधी पू येतो. धनुर्वात. केस कापल्यानंतर, स्राव बंद झाल्यामुळे झालेले दुष्परिणाम. गळू

व सेप्टिक विकार, गारव्याने बरे वाटते. भोसकून झालेल्या जखमेनंतर हे औषध ताबडतोब दिले तर धनुर्वात होण्याचे टळते. धनुर्वाताची लक्षणे व्हावयास लागली म्हणजे हैपरीकम घ्यावे.

**मानसिक** :– संत्रस्त. माणसांचा द्वेष करणे.

**डोके** :– दुखत असताना तडफड होते, ठुसठुस लागते, डोके गुंडाळण्याने जास्त त्रास होतो. चालताना घेरी येते. पाणी लावल्याने, डोक्याच्या कातडीला त्रास होतो.

**डोळे** :– लालबुंद; ठणकतात. करवडणारे अश्रु; खालच्या पापण्या व गाल करवडतात.

**कान** :– कापसाच्या बोळ्याने कान बंद झाले आहेत असे वाटून ऐकू येत नाही, केस कापल्यानंतर, डोके भिजल्यानंतर जास्त.

**नाक** :– एकसारखे रक्त येते. नाकात आग होते, व दुखते.

**चेहरा** :– चट्टे पडल्याप्रमाणे. गालावर व कपाळावर लाल पुटकुळ्या येतात. जबड्याखालच्या गाठी मोठ्या होतात. नाकातोंडाभोवती खपल्या बसतात.

**तोंड** :– कुबट किंवा कडु चव. उदरात वेदना होताना एकदम पाण्यासारखी लाळ वाहते.

**जठर** :– थुंकताना मळमळते. गुदद्वारात भेगा पडतात. मूळव्याधीत चुणचुणते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीतून युरिक असिड व वाळू जाते. लघवी होता होता मधेच थांबते. लघवी स्वच्छ होते, त्यात क्षाराचे प्रमाण कमी असते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गर्भाशयातील गुल्मामुळे रक्तस्राव होतो. पाळीत अंग गार पडते तरी पण गार वारे हवेसे वाटते.

**श्वसनेंद्रिये** :– कंठात खवखवल्यासारखे वाटून त्रासदायक खोकला येतो, नाकातून रक्त येते; उसासे टाकल्याप्रमाणे श्वासोच्छ्वास घ्यावा लागतो, विशेषतः अंगावरची उगवण मावळत असताना. एका मागून एक असा दोनदा आत श्वास घेण्याची प्रवृत्ति. छातीतून रक्त पडणे व संधिवात आलटून पालटून. दमा–श्वासोच्छ्वास न घेता आल्यामुळे गुदमरल्यासारखे वाटते. छातीला स्पर्श सहन होत नाही. कफ पिवळा पूमिश्रित.

**पाठ** :– ताठलेली, उठताना त्रास होतो. कटिशूळ. कमरेच्या सांध्यात पेटके येतात.

**हातपाय** :– पावले व पाय सुजलेले, चट्टे पडलेले, काळे निळे डाग. घोटे सहजच लचकतात. पावलांचा वरचा भाग रात्री खाजतो व सकाळी ताठतो. टाचा

हुळहुळ्या; तळपाय इतके हुळहुळे होतात की चालवत नाही. वातरक्त; सांधे सुजलेले कढत. पंज्याची हालचाल करताना किंवा धरताना कापतात. **घोटे सहजासहजी लचकतात.** पायांच्या आंगठ्याखालील उंचवटे सुजतात. चालण्याचा प्रयत्न केला तर पाऊले जमिनीला चिकटली आहेत असे वाटते. हात वर करताना खांद्याच्या सांध्यात दुखते.

**ज्वर** :– भाग गार होतात विशेषत: पाय, वेदना होताना किंवा तापात; गार पाण्यात असल्यासारखे वाटतात. दुर्गंधी घाम येतो. रात्री फार घाम येतो.

**त्वचा** :– दुखापती झाल्यानंतर काळे-निळेपणा बरेच दिवस राहतो. चेहऱ्याचा इसब. काळीपुळी. झाकलेल्या जागी उगवण येते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **गरम पांघरूण.** शेक. गरम हवा. दुखापती. हालचाल. रात्री. दारू. अंडी. थुंकण्याने

**ब वा** :– **गार पाणी.** गार हवा. स्वस्थ राहण्याने.

**संहाय्यक औषधे** :– सिंको; सेपि.

**संबंधी औषधे** :– आर्नि; ब्रायो; ऱ्हस–टा; सिकेल.

---

## २८७. लेप्टांड्रा Leptandra

**सर्वसाधारण** :– या औषधांचा परिणाम **यकृत** व उजवी बाजू यावर होतो. पित्त-प्रकृति व रक्तस्राव होण्याच्या प्रवृत्ती. **यकृताच्या भागात आग होते.** कावीळ. अशक्त; उभे राहणे, चालणे अशक्य होते. डोके दुखत असताना बेंबीत दुखते. डोळे चुणचुण होऊन ठणकतात. जीभ पिवळी किंवा मधे काळी रेघ. निराश. गुंगी येते. बर्फ घातलेली पेये घ्यावीशी वाटतात पण त्यामुळे जठरातील आग व वेदना वाढतात. पित्ताची ओकारी होते. **पित्ताशय किंवा यकृत हुळहुळे होते किंवा आतून फुटल्याप्रमाणे ठणका लागतो, वेदना आतड्यातून बेंबीपर्यंत येतात किंवा भागे डाव्या तिकोनी हाडापर्यंत येतात** किंवा कण्यात जाणवतात. यकृत आडवे सुजते, यकृताचे तीव्र उपद्रव. **पित्ताचे खडे.** ***शौचास काळे डांबराप्रमाणे; दुर्गंधी*** **चिकट तारा येणारे;** पांढरे मेणाप्रमाणे होते किंवा शौचाच्या चिळकांड्या उडून बेंबीजवळ वेदना होतात. जुलाबानंतर सुरू झालेली आव. मूळव्याधीचे मोड **बाहेर** येऊन **त्यातून रक्तस्राव होतो.** धुपणी कढत, पाण्याप्रमाणे व पायापर्यंत ओघळते.

यकृताच्या विकारात विटाळ चांगला जात नाही किंवा बंद होतो. बसलेले असताना गृध्रसी वातात ( डावी बाजू ) कळा जास्त येतात. **नखे अतिशय पातळ, मऊ व फुटतात.** कण्यात व हातात शहारे येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** गार पेये. हालचाल. नियमित वेळी.

**ब वा :– पोटावर निजण्याने** किंवा कुशीवर निजण्याने.

**सहाय्यक औषधे :–** फास्फ.

**संबंधी औषधे :–** कार्डु–मेरि; चिओ; बॅप्टि.

---

## २८८. लोबेलिआ Lobelia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***श्वासोच्छ्वास*; स्नाव; हृदय व** पोटाची खळी यावर होतो. ***शैथिल्य येते*– स्नाव वाढतात, अशक्तपणा येतो व घाम येतो,** मरण येईल की काय असे वाटून छाती दाटते **व श्वासोच्छ्वास करताना घुरघुरते.** गुडघ्यावर कोपरे ठेवून बसणे. दारूचे दुष्परिणाम. स्राव बंद झाल्यामुळे **उद्भवलेले** दुष्परिणाम. सर्वांगात चुणचुणते. तंबाखूची सवय असून सुद्धा तंबाखूचा वास सहन होत नाही. श्वासोच्छ्वासाच्या विकारात मळमळते व ओकाऱ्या होतात.

**मानसिक** :– उदास. लहान मुलासारखे हुंदके देणे.

**डोके** :– घेरी येते, मरू की काय असे वाटते. जड होऊन दुखते.

**चेहरा** :– गार घाम येतो.

**कान** :– स्राव बंद झाल्यामुळे किंवा इसब बरा केल्यानंतर आलेला बहिरेपणा.

**तोंड** :– खूप **लाळ गळते**– मळमळताना, कोरड्या ओकाऱ्या येताना, उचकीत किंवा दम्यात, भूक लागलेली असताना वगैरे.

**घसा** :- घशात किंवा जठरात गोळा बसला आहे असे वाटते, त्यामुळे गिळावयास त्रास होतो.

**जठर** :– **मरण येईल की काय अशा तऱ्हेची मळमळ.** घेरी येताना, रात्री किंवा पहाटे मळमळते, थोडे खाल्ले प्याल्याने कमी होते. **ओकारी होताना** घाम येतो विशेषतः चेहऱ्यावर गार. पोटाच्या खळीत किंवा **पोटात अशक्तपणा वाटून गळून गेल्यासारखे वाटते.** आंबट जळजळीत चव.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी भडक लाल व लाल गाळ साचतो. लघवी होण्याचे बंद होते किंवा क्वचितच होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गरोदरपणची सकाळची मळमळ, थोडे खाल्ल्याने प्याल्याने एकदम नाहीशी होते. वेणा येताना श्वासोच्छवास कष्टदायक होतो. माकड-हाडांत दुखते व जननेंद्रियात जडपणा वाटतो.

**श्वसनेंद्रिये** :– **दमा लागतो**– बाळंत होताना, छातीत आवळल्यासारखे वाटून किंवा कंठात पाचर बसली आहे असे वाटून. दम्यात सर्वांगात मुंग्या आल्यासारखे किंवा मिरमिरल्यासारखे वाटते, जलद चालण्याने दमा कमी होतो. खोकल्याची मधून मधून ढास लागते व त्यावेळेस शिंका येतात, ढेकरा येतात किंवा जठरात वेदना होतात. **छातीत घुरघुरते पण कफ बाहेर काढता येत नाही. छातीत दाटल्यासारखे वाटते, आवळल्यासारखे वाटते, किंवा** भरल्यासारखे वाटते.

**हृदय** :– थांबेल असे वाटते. नाडी अशक्त, मंद, वाहणारी.

**पाठ** :– माकडहाडांत दुखते, जराही स्पर्श सहन होत नाही, त्यामुळे पुढे वाकून बसणे.

**त्वचा** :– मधून मधून जलयुक्त सुजेचे चट्टे पडून त्यावर काळे निळे डाग पडतात. कंड सुटते, मिरमिरल्यासारखे वाटून अतिशय मळमळते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– गार पाण्याच्या आंघोळीने. झोपेत किंवा झोपेनंतर. तंबाखु. चहा. थोडीही हालचाल. बाह्य वस्तू शरिरांत गेल्याने.

**ब वा** :– जलद चालण्याने. थोडे खाल्लेप्याले तर.

**संबंधी औषधे** :– ॲन्टी-टा; इपि; टॅब्रॅकं.

---

## २८९. लोलिअम टेम्युलेन्टम Lolium Temulentum

**सर्वसाधारण** :– काळजी, खिन्नता. घेरी येत, डोळे मिटून घ्यावे लागतात. जीभ कापते. बोलताना त्रास होतो; सगळा शब्द उच्चारता येत नाही. मळमळते, ओकाऱ्या होतात, खूप जुलाब होतात. चालणे अस्थिर. हातपाय कापतात, गार पडतात, आचके येतात; लिहिता येत नाही. हातात भांडे धरवत नाही. हातपाय लुले पडल्याप्रमाणे वाटतात. पंजांचा कंप. पोटऱ्यात भयंकर वेदना होतात त्या दोरीने आवळल्यासारख्या वाटतात. अस्वस्थपणा व थकवा.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– दमटपणा; पावसाळा.

---

## २९०. व्हर्बस्कम Verbascum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम गालाचे उंचवटे; कान; श्वसनेंद्रिये; मूत्राशय; व डावी बाजू यावर होतो. कान दुखतो. सर्दी होते व त्यावेळेस डोळ्यातून पाणी येते. बहिरेपणा कानावर पडदा आला आहे असे वाटून किंवा पोहताना कानात पाणी गेल्यामुळे आलेला. तोंडात खूप खारट पाणी जमते. **वेदना, पेटके** आल्याप्रमाणे, पिळल्याप्रमाणे, **चिमटयात धरून दाबल्याप्रमाणे** होतात व भाग लुला पडल्याप्रमाणे **वाटतो विशेषतः चेहऱ्यात**, गालाचे उंचवटे, जबड्याचे सांधे. बेंबीजवळ **गोळा** आला आहे असे **वाटते**, किंवा पिळल्यासारखे वाटते. मूळव्याध, त्यामुळे शौचास होण्यास अडथळा येतो. लघवी नकळत होते, रात्री किंवा खोकताना. खोकला–खोल पोकळ हंबरल्याप्रमाणे किंवा तुतारी वाजविल्याप्रमाणे. जागे न होता झोपेतच खोकणे. खोकला दीर्घ श्वास घेतल्याने कमी होतो. **आवाज बसतो–घोगरा.**

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– वाऱ्याची झुळुक. थंडी उष्णतेचे फेरबदल. प्रत्येक वेळी सर्दी झाली म्हणजे. सकाळी ९ ते संध्याकाळी ४ पर्यंत. दिवसातून केव्हा तरी दोनदा. ठराविक तासाला, बोलताना, गाताना. शिंकताना. स्पर्श.

**ब वा** :– दीर्घ श्वास घेतल्याने.

**संबंधी औषधे** :– अको; प्लॅटि; सेपि.

---

## २९१. व्हॅक्सिनिनम Vaccininum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा देवीप्रतिबंधक म्हणून उपयोग होतो. हट्टी त्वग्रोग. देवीच्या फोडाप्रमाणे फोड येतात. वेदना. थंडी सहन न होणे. अपचन, पोटात वात धरून उदर फुगणे. डांग्या खोकला.

**सहाय्यक औषधे** :– मॅलॅन्ड्री; व्हेरिओ.

---

## २९२. व्हॅलेरिअन ( जटामांसी ) Valerian

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **कणा**; मूत्र जननेंद्रिये; **मन**; स्नायू–पोटऱ्या; टाचा; टाचेचा स्नायुबंध यावर होतो. **मनोवृत्तीत, वागणुकीत आणि लक्षणात एकदम अदलाबदल होते.** लक्षणे आलटून पालटून होतात;

किंवा **योग्य निवड केलेले औषध लागू पडत नाही. वेदना आतून बाहेर येतात** किंवा येतात जातात किंवा इकडे तिकडे फिरतात. **भ्रम**–वास, चव, ऐकणे या बाबतीत. तरंगत आहोत असे वाटते; गोळा किंवा बूच बसल्यासारखे वाटते. एकसारखी **हालचाल करण्याची आवड.** अस्वस्थपणा, स्वस्थ राहवत नाही. **धक्के बसतात. एखाद्या भागातच अशक्तपणा वाटतो**, डोळे, हात, मनगट, गुडघ्याची खळी वगैरे. हिस्टेरिआ. कंप. आचके. **बुद्धिवान, चिडखोर, अशक्त** स्त्रिया. ठिकठिकाणी वेदना होतात. लाल भाग पांढरे होतात. अगदी लहान दुखापत झाली तरी आंचके येतात. अंथरुणात पडलेल्या रोग्याना फार लवकर क्षते पडतात. अंग लुळे पडून हातपाय आखडतात. फेफरे.

**मानसिक** :– **घाबरट, क्षुब्धता व अशक्तपणा.** तडफडणे किंवा वळवळणे. मूर्च्छा येण्याची प्रवृत्ति. **रागीट**, अतिशय अतिरेकी कल्पना, भ्रम किंवा क्रिया, एकमेकाच्या विरुद्ध टोक गाठणाऱ्या. एकदा अतिशय आनंदी तर नंतर अतिशय खिन्नता; अतिशय शांत तर नंतर सारखी कुरकुर. उतावीळपणा. बोलता बोलता एकदम विषयांतर करणे, आपण दुसरेच कोणीतरी आहोत; आपल्या भोवती विचित्र व त्रासदायक वातावरण आहे असे वाटते. अंधारात एकटे बसण्याची भीती वाटते. मूर्च्छा येण्याची प्रवृत्ति. काल्पनिक आकृति जनावरे, माणसे दिसतात. रागाने वेडे होणे.

**डोके** :– अतिशय गार झाल्यासारखे वाटते; तारवटल्यासारखे वाटते. धक्के मारल्याप्रमाणे दुखते, डोके हलविल्याने बरे वाटते, उन्हात जास्त होते. घेरी खाली वाकताना जास्त होते, घेरी येताना तरंगत आहोत असे वाटते.

**कान** :– कानाला गार वारे लागले तर कान दुखावयास लागतात.

**डोळे** :– अंधारात प्रकाश, ठिणग्या वगैरे दिसतात. वस्तु अगदी डोळ्याजवळ आहेत असे वाटते. भेदरल्याप्रमाणे.

**चेहरा** :– एकदम धक्के मारल्याप्रमाणे वेदना होतात. स्नायूना कंप. मोकळ्या हवेत गाल लाल व कढत होतात.

**तोंड** :– चव तेलकट किंवा करपट. जिभेवर जाड कीट.

**घसा** :– घशात दोरा लोंबकळत आहे असे वाटून लाळ वाहते व ओकारी होते. घशात मळमळ जाणवते.

**जठर** :– दुर्गंधी करपट ढेकरा. भूक लागून मळमळते; बेंबीजवळ भूक लागली आहे असे वाटते. जठरात पेटके येतात. मूल अंगावर दूध प्याल्यानंतर ओकते व त्यात दह्याप्रमाणे मोठ्याला गाठी पडतात विशेषतः आईला राग आलेला असताना प्याले तर. काहीतरी गरम वर जात आहे असे वाटून गुदमरल्या-सारखे वाटते.

**उदर** :– **वात धरतो**; मुरडा होतो. मुलाना पाण्यासारखे जुलाब होऊन त्यात दह्यासारख्या गाठी पडतात व मूल शौचास होताना जोराने किंचाळते. खाण्यानंतर आणि रात्री अंथरुणात आतड्यात मुरडा होतो.

**मूत्रेंद्रिये** :– **भरपूर लघवीला होते, व वारंवार होते**, विशेषतः घाबरट स्त्रियांना. गुदमरल्यारखे वाटून जाग येते. दमा.

**श्वसनेंद्रिये** :– झोप लागता लागता गुदमरल्यासासारखे वाटते.

**हृदय** :– टोचते व नाडी जलद व अशक्त होते.

**हातपाय** :– वरच्या हाताच्या हाडात पेटके आल्यासारखे वाटून जाग येते, विजेचे धक्के बसल्याप्रमाणे वाटते. हातापायाला सारखे धक्के बसतात. गृध्रसी वात. वेदना उभे राहिल्याने, बसल्याने किंवा विश्रांति घेताना जास्त होतात, चाल-ताना बरे वाटते. बसलेले असताना टाचा दुखतात. पोटऱ्यात ताणल्याप्रमाणे वेदना होतात, पायाची आढी घातल्याने जास्त. वरच्या हाताच्या बेटकुळी येणाऱ्या स्नायूना लिहिताना पेटके येतात. पंजे व पाउले याना पेटके आल्यामुळे झोपेत व्यत्यय येतो.

**झोप** :– मनःक्षोभामुळे झोप येत नाही. अंगाला धक्के बसल्यामुळे किंवा रात्री कंड सुटल्यामुळे झोप येत नाही.

**ज्वर** :– डोक्याच्या मागील भागात शहारे येऊन ते खाली पाठीत उतरतात. ताप चमत्कारिक त्रासदायक उष्णतेचा. एकदम घामाच्या धारा लागतात, विशे-षतः कपाळावर. मळमळ व ओकाऱ्या होताना अंग गार पडते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***विश्रांती. उभे राहिल्याने.*** **मनःक्षोभ.** संध्याकाळी. मोकळी हवा, वाऱ्याची झुळुक. उपाशी राहिल्याने. अंधार. वाकल्याने.

**ब वा** :– **शरीराची स्थिति एकसारखी बदलल्याने.** इकडे तिकडे चाल-ण्याने. चोळण्याने. झोपेनंतर. जेवण्याने.

**संबंधी औषधे** :– असाफि; इग्ने; पल्स.

---

## २९३. व्हायपेरा Vipera

**सर्वसाधारण** :– या सर्पविषाचा परिणाम *शिरा* व **रक्त** यावर होतो. **फुटल्यासारखे वाटणे. रक्तस्राव होण्याची प्रवृत्ति.** पंगुवात. लुलेपणा खालून वर जातो. विटाळ थांबण्याचे वयात होणारे उपद्रव. गलगंड. पाऊले लुली पडतात.

**नाक** :– **रक्त गळते,** घेरी येताना, अंगावर मूल पाजताना.

**चेहरा** :– अतिशय सुजलेला. ओठ, जीभ सुजलेली. जीभ बाहेर येते. निळसर.

**उदर** :– **पोटाच्या खळीत असह्य कळा येतात,** दाब सहन होत नाही. यकृत सुजून मोठे होते, अतिशय ठणकते, कावीळ होते ताप येतो, वेदना खांद्यापर्यंत, कमरेच्या सांध्यापर्यंत जातात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ थांबण्याच्या वयात होणारा रक्तप्रदर. विटाळ लाल, आत काळया गाठी, फार जात नाही पण एकसारखा जात राहतो, त्यामुळे थकवा येतो, मूर्च्छा येते. अंगावर मूल पाजताना विटाळ जातो.

**हातपाय** :– **हातपाय भरल्यासारखे वाटून फुटल्याप्रमाणे असह्य वेदना होतात** व ते उंचावर ठेवावे लागतात, पाय उंचावर ठेवून बसणे भाग पडते. शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात व त्यात व्रग पडतात. शिरांचा शोथ. पायाना पेटके येतात किंवा ते निळसर होतात. पाऊले लुली पडल्यामुळे पाऊले घासत चालणे.

**त्वचा** :– सोलल्याप्रमाणे मोठाले पापुद्रे जातात. काळी पुळी; गळू–आत फुटल्याप्रमाणे वेदना होतात. व्रण. कुजणे.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *हातपाय किंवा विकार झालेला भाग लोंबकळत ठेवल्याने.* थंडी. दरवर्षी. स्पर्श.

**संबंधी औषधे** :– इलाप्स.

---

## २९४. व्हायोला ओडोरेटा Viola Odorata

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम डोळे; कान; दृष्टी; मनगट ( उजवे ) व त्वचा यावर होतो. कृमी, जंत होणे मुलाना. सर्पदंश. गांधीलमाशी चावणे. **ताणल्यासारखे वाटते.** काहीतरी उद्योग करावासा वाटतो पण नंतर एकदम थकवा येतो. **डोळे, कान, मूत्रपिंड** या अवयवातील लक्षणे एकाच वेळी उद्भवतात किंवा जंतामुळे लक्षणे उद्भवतात. उंच, किडकिडित, घाबरट मुली.

**मानसिक** :– रडावेसे वाटते, पण का ते कळत नाही. संगीताचा तिटकारा विशेषतः व्हाओलिनचा.

**डोके** :– कपाळाची आग होते. डोक्याचे कातडे ताणल्यासारखे वाटल्यामुळे आठ्या घालाव्या लागतात. भुवयावर वेदना होतात. कपाळात आडव दुखते.

**डोळे** :– डाव्या डोळ्यापासून टाळूपर्यंत दुखते, खोकताना जास्त. डोळ्यात पेटके आल्यासारखे वाटतात. सापाप्रमाणे तेजस्वी वर्तुळे दिसतात. झोप येत नसली तरी पापण्या मिटतात.

**कान** :– कानातून पू येतो. ऐकू येत नाही.

**नाक** :– बधिर.

**जठर** :– मांस खाण्याची वासना. गुदद्वाराला कंड सुटते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी दुधासारखी पांढरी, तिला उग्र वास येतो. लघवी न कळत होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गरोदरपणी श्वासोच्छ्वास घेण्यास त्रास होतो.

**श्वसनेंद्रिये** :– छातीवर ओझे ठेवल्यासारखे वाटते. गरोदरपणी दमा होतो. श्वासोच्छ्वास कष्टाने होतो व त्यावेळेस काळजी वाटून छातीत धडधडते. फक्त दिवसाच बराच वेळ टिकणारी खोकल्याची ढास लागते.

**हातपाय** :– खांदे गार. मनगटाच्या व पावलांच्या हाडात दाबल्याप्रमाणे वेदना होतात. हातपाय कापतात.

**त्वचा** :– कोरडी; तळहात ओलसर.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– आभाळ आलेली हवा. थंड हवा. संगीत. वयात येण्याचा काळ. स्राव बंद झाल्यामुळे.

**संबंधी औषधे** :– पल्स; स्पायजे.

---

## २९५. व्हायोला ट्रायकलर Viola Tricolor

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **त्वचा; डोक्याचे कातडे** व **मूत्रेंद्रिये** यावर होतो. डोक्याच्या त्वचेवर–भेगा पडतात, डिंकाप्रमाणे खपल्या बसतात, त्यातून भरपूर, पिवळी चिकट लस येऊन त्यामुळे केसांचा काथ्या होतो. मानेतील गाठी सुजतात. आगपेण. इसब. लघवीला मांजराच्या मुताप्रमाणे घाण येते; लघवी अंथरुणात न कळत होते. भडक स्वप्ने पडून

स्वप्नावस्था होते. त्वचेच्या विकाराबरोबर लघवीचे विकार होतात, संधिवात; सांध्याभोवती उगवण येते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** वेदना होत असलेल्या बाजूच्या विरुद्ध बाजूस दाबल्याने. हिवाळा. गार हवा.

**संबंधी औषधे :–** व्हस-टा.

---

## २९६. व्हिन्का मायनर Vinca Minor

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम त्वचा व केस यावर होतो. अशक्तपणा. मरण येईल की काय अशाप्रमाणे मूर्च्छा येते. डोक्यात खवडे होऊन त्यातून दुर्गंधी लस येते व त्यामुळे केस काथ्याप्रमाणे एकमेकात गुंततात. नाकाचा शेंडा रागामुळे लाल होतो; नाकात व्रण पडतात, नाकातून वारंवार रक्त जाते. गिळताना त्रास होतो, अन्ननलिकेच्या खालच्या भागात कापल्यासारखे वाटते. अतिशय विटाळ जातो, एकसारखा वाहतच रहातो, व त्यामुळे अशक्तपणा येतो. विटाळ थांबण्याच्या वयात किंवा गर्भाशयाच्या गुल्मामुळे होणारं रक्तस्राव. इसब– लस वाहते किंवा मधून मधून त्यावर दुर्गंधी जाड खपल्या बसतात. त्वचा अतिशय नाजुक जरा चोळली तरी लाल होऊन हुळहुळी होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** गिळल्यानंतर. राग.

**संबंधी औषधे :–** अस्टि.

---

## २९७. व्हिबुरनम Viburnum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम मज्जातंतू ; ***स्त्रीजननेंद्रिये*** व डावी बाजू यावर होतो. **पेटके येतात**, जोराने आचके बसतात **विशेषतः स्त्रियांना.** स्वस्थ बसवत नाही, वेदनामुळे. रक्तस्राव. **या औषधाने बाळा होण्याचे** टळते. उंच, सडसडीत स्त्रिया.

**मानसिक :–** अतिशय घाबरट व चिडखोर.

**डोके :–** उठून बसताना मूर्च्छा येते. डाव्या कानशिलात दुखते, व त्यावेळेस डोळ्याची उघडझाप होते असे वाटते. घेरी उतरताना जास्त होते.

**डोळे :–** हुळहुळे झाल्यासारखे वाटतात. नाक चोंदते.

**चेहरा** :– लाल व कढत.

**जठर** :– एकसारखी मळमळ पण खाण्याने कमी होते. भूक लागत नाही.

**उदर** :– एकाएकी आतड्यात मुरडा होतो, पेटके येतात, विशेषतः ओटीपोटात; विटाळ गेल्याने बरे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– **वारंवार भरपूर लघवीला होते** विशेषतः डोके दुखत असताना, विटाळसेवणी, किंवा रक्तस्राव होताना वगैरे. खोकताना, चालताना लघवी आवरून धरता येत नाही. मधुन मधुन कष्टाने लघवीला होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळी उशीरा, विटाळ थोडा, काही तास जातो, दुर्गंधी. कष्टार्तव –ओटीपोटात जड होऊन ठणका लागतो **किंवा तीव्र कळा येतात**; कळा विटाळ सुरू झाला म्हणजे थांबतात; पोटात वात धरतो, मोठमोठ्या ढेकरा येतात व घाबरल्यासारखे वाटते. खोट्या बाळंतवेदना. बाळंतपणानंतर वायगोळ्याच्या वेदना असह्य होतात. विटाळात श्लेष्मल त्वचेचे तुकडे पडतात. धुपणी, दाट, पांढरी, रक्ताचे धागे असलेली, शौचास होताना जाते. वारंवार पहिल्या २–३ महिन्यात वाखा होतो.

**श्वसनेंद्रिये** :– **रात्री गुदमरल्यासारखे वाटते**–विशेषतः दमट थंड हवेत. तान्ह्या मुलांचा दमा.

**पाठ** :– पाठीत दुखते व त्याचा शेवट **गर्भाशयात पेटके येऊन होतो; किंवा वेदना** मांड्याच्या पुढील भागापर्यंत येतात. विटाळशी होण्याचे अगोदर पोटऱ्यात पेटके येतात. पाठदुखी दाबल्याने कमी होते. कंबरेचे दुखणे कंबरेवर काठीने दाब देऊन चालण्याने कमी होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– भीतीमुळे. **विटाळशी होण्याचे अगोदर. थंडी.** बर्फ पडत असताना, डाव्या कुशीवर निजल्याने. एकदम धक्का बसल्याने. बंद खोलीत.

**ब वा :– विश्रांतीने. दाबल्याने.** मोकळी हवा.

**संबंधी औषधे** :– कालो; पल्स; सेपि.

---

## २९८. व्हिस्कम आल्बम Viscum Album

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम स्त्रीजननेंद्रियावर होतो. टेलिफोनची भीती वाटते. दमा, कंपवात, फेफरे. एकसारखी घेरी येते, फेफरे येऊन

गेल्यानंतर जास्त, **टाळूत** एकाएकी ठुसठुसते. कमरेभोवती हुळहुळेपणा वाटतो. लघवी पांढरी दुधाप्रमाणे. दमा. डाव्या कुशीवर झोपता येत नाही. विटाळ थांबण्याच्या वयात होणारे उपद्रव. वेदना होऊन विटाळ जातो. स्राव लाल व गांठी पडतात. पायापासून डोक्यापर्यंत कढत वाफ आल्यासारखी वाटते. सर्वांगात स्नायूना बारीक कंप येतो. पंजे व पावले यांच्या मागील भागावर कोळी चालत आहे असे वाटते. रक्त गोठत नाही व जखमा बऱ्या होत नाहीत. कमरेपासून खाली कोणीतरी ओढत आहे असे वाटते. लघवी ग्लासात ठेविल्यानंतर काही वेळाने पांढरी होते. संभोग करताना छातीत धडधडते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा हो :– अंग कढत असताना गारठल्यामुळे. हिवाळा. हालचाल. विटाळ बंद झाल्यामुळे. डाव्या कुशीवर निजल्याने.

**संबंधी औषधे** :– बुफो.

---

## २९९. व्हेराट्रम आल्बम Veratrum Album

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **उदर**; हृदय; रक्तवाहिन्या; ***टाळू***; रक्त; श्वसनेंद्रिये; पचनेंद्रिये यावर होतो. *अतिशय जोराचे परिणाम उद्भवतात. अत्यंत थकवा येतो; कपाळावर गार घाम येतो. मूर्च्छा येते किंवा शक्तिपात होतो. एकदम अतिशय स्राव जावयास लागतात*– ओकाऱ्या, जुलाब वगैरे. **पेटके**–छातीत, आतड्यात, हातापायांच्या बोटांना वगैरे, नंतर भाग ताठतात. तीव्र रोगात उत्तरोत्तर शरीर वाळत जाते व अशक्तपणा वाढत जातो. उदा० डांग्या खोकला, हिवताप वगैरे. ***अंग गार पडते***, **निळे होते**. शस्त्रक्रियेचा आघात, प्रेमभंग, मानभंग, भीती यामुळे उद्भवलेले परिणाम. **कॉलरा. वेड. *मूर्च्छा येण्याची*** प्रवृत्ति; भावनामुळे, अगदी थोड्या श्रमाने, क्षुल्लक दुखापतीमुळे, रक्तस्रावामुळे ओकारीनंतर; शौचानंतर. शरीरातील स्राव गेल्यामुळे आलेला लुळेपणा. आचके. फेफरे, धार्मिक प्रक्षोभामुळे. मुलाना जलद घेऊन हिंडविल्याने बरे वाटते. श्लेष्मल त्वचा अतिशय कोरडी होते. रक्त गार झाल्यासारखे वाटते. वातात काल्पनिक वस्तु धरणे. अफू, तंबाखू, दारू, त्वचेची उगवण बंद झाल्यामुळे उद्भवलेले दुष्परिणाम.

**मानसिक** :– **तापात लवकरच वात होतो**, वातातील क्रिया झपाट्याची असते, बडबड, वैषयिक चाळे, जननेंद्रिय उघडी टाकणे वगैरे. वेदना होताना वात

होतो. प्रार्थना करणे, शिव्याशाप देणे, आरडाओरड करणे आलटून पालटून. कपडे फाडणे. शृंगारिक गाणी म्हणणे. निरुत्साही, निराश. पश्चात्ताप वाटणे. स्वस्थ बसून राहणे. खिन्नता. काहीतरी दुर्दैवाची गोष्ट घडणार आहे असा भ्रम. घराच्या बाहेर पडून विनाकारण भटकणे. खोटे बोलण्याची प्रवृत्ति. फसविणे समाजातील आपल्या स्थानाविषयी निराशा. स्वतःला दुर्दैवी समजणे. पाळीच्या अगोदर दिसेल त्याचे मुके घेणे. गाणे म्हणणे; शीळ घालणे. हसणे. धावत सुटणे. ढोंग करणे, स्वतः गरोदर आहोत असे भासविणे. बाळंतपणानंतर लागणारे वेड. धार्मिक वेड. कामोन्माद. दुसऱ्यांच्या दोषाविषयी बोलणे. जग पेटले आहे असे वाटते. मरणाची भीती वाटते. आपल्याला मोक्ष मिळणार नाही असे वाटते.

**डोके** :– असह्य डोकेदुखी. **टाळूवर बर्फ ठेवल्यासारखे वाटते.** केस उभे राहतात व दुखतात. डोके दुखत असताना मळमळते, ओकारी होते, जुलाब होतात, लघवीला वारंवार जावे लागते. कपाळ चोळणे. कोणत्याही विकारात कपाळावर गार घाम येतो.

**डोळे** :– वटारल्याप्रमाणे, वर गेलेले, निस्तेज. लाल होऊन पाणी येते. पापण्या कोरड्या, जड. भोवती काळी वर्तुळे.

**नाक** :– काल्पनिक वास येतात. टोक बर्फासारखे गार. निमुळते. रक्त येते, उजव्या नाकपुडीतून, फक्त रात्री झोपेत.

**चेहरा** :– उठताना मृतवत् कळा येते. **निळा,** अतिशय फिकट, चिमटल्याप्रमाणे, खोल गेलेला, वेडावाकडा, आठ्या पडलेला, गार. नाक गार, डावा गाल लाल भाजल्याप्रमाणे दिसतो. चावताना जबड्यात पेटके येतात. भीतिग्रस्त. दातखिळी बसते. ओठ निळे, लोंबतात.

**तोंड** :– आतून गार. तोंडाला गार पाणी सुटते. जीभ गार पेपरमिंट खाल्ल्याप्रमाणे. दात जड वाटतात. दात खाणे. चव. तोंड कोरडे. तोतरे, बोबडे बोलणे; जीभ जड झाल्याप्रमाणे वाटून. लाळ खारट. पाणी कडू लागते.

**घसा** :– कोरडा; खरवडल्यासारखा वाटतो. खरखरीत. पाणी पिताना ते अन्ननलिकेतून न जाता बाहेरून जात आहे असे वाटते.

**जठर** :– फळे, रसाळ किंवा गार पदार्थ, मीठ खावेसे वाटते, खाखा सुटते. भयंकर तहान लागते. **बर्फाचे पाणी** किंवा आंबट पेये प्यावीशी वाटतात, परंतु गार पेये गिळल्याबरोबर किंवा थोडी हालचाल केली तर ओकून पडतात;

ओकारीत किंवा ढेकराबरोबर फेस येतो. *अतिशय ओकाऱ्या होऊन जुलाब होतात*, **जोरजोराने कोरड्या ओकाऱ्या येतात, आतड्यात कापल्याप्रमाणे वेदना होतात, हातापायांना पेटके येतात आणि जलद थकवा येतो.** कॉलरा, लहान मुलांचा वगैरे. फळे खाल्ल्याने पोट फुगते. मळमळ व ओकाऱ्या होताना सुद्धा अतिशय खावेसे वाटते.

**उदर** :– पोटाच्या खळीत दुखते, आग होते. जठरात व उदरात गार किंवा आग झाल्यासारखे वाटते; गळून किंवा पोकळ झाल्यासारखे वाटते. **पाण्या-सारखे**, हिरवे, रंगवासरहित, तांदुळाच्या धुणीप्रमाणे **जुलाब होतात.** शौचास मोठ्या आकाराचे होते, त्यामुळे फार कुंथावे लागते. घाम येऊन थकवा येतो. मलावरोध, लहान मुलाचा किंवा अतिशय थंडीमुळे झालेला. ओकाऱ्या होताना उदरात वेदना होऊन ते खपाटी जाते. **आतड्यात कापल्याप्रमाणे वेदना** होऊन आतड्याना गाठी पडत आहेत असे वाटते. आतड्याचे चलनवलन उलटे.

**स्त्रीजननेंद्रिये** :– कामोन्माद विशेषतः विटाळशी होण्याचे अगोदर, प्रेमभंग किंवा अतृप्त संभोगामुळे. कष्टार्तव, वेदना होताना अंग गार पडते, जुलाब होतात, गार घाम येतो, जरा हालचाल केली की मूर्च्छा येते. बाळंत होताना येणारे आचके.

**श्वसनेंद्रिये** :– हवा कढत आहे असे वाटते. दमा; डोके मागे वाकविल्याने बरे वाटते, दमट थंड हवेत जास्त होतो. घशातून फुप्फुसापर्यंत गुदगुल्या झाल्या-सारखे वाटते. एकसारखा जोराचा खोकला व कोरड्या ओकाऱ्या येतात. खोकला गार पेये पिण्याने जास्त होतो. घशात कफ घुरघुरतो पण बाहेर काढता येत नाही. वृद्ध इसमांचा जीर्ण खोकला. भुंकल्याप्रमाणे खोकला येऊन ढेकरा येतात. खोकताना लघवीला होते. डांग्या खोकल्याकडे दुर्लक्ष केल्यामुळे उद्भवलेले दुष्परिणाम. **आवाज उमटत नाही.**

**हृदय** :– गार झाल्यासारखे वाटते, कापल्याप्रमाणे वेदना होतात. अशक्त, धडधड डोळ्याना दिसते. नाडी अशक्त, अनियमित.

**पाठ** :– तिकोनी हाडामध्ये पेटके येतात, चालण्याने कमी होतात. मान इतकी अशक्त होते की ती मुलाना सावरता येत नाही, विशेषतः डांग्या खोकल्यात. माकडहाडात मार लागल्याप्रमाणे वाटते.

**हातपाय** :– हातांना बारीक आग झाल्यासारखी वाटते, उजवीकडून डावीकडे. शौचास होताना **पोटऱ्यात पेटके येतात.** हात पाय गार पडतात. गृध्रसी वात, विजेच्या चमका मारल्याप्रमाणे वाटते, बसून पाय लोंबकळत ठेविल्याने बरे वाटते. हात भरल्यासारखे व सुजल्यासारखे वाटतात. पंज्यात व बोटात मिरमिरल्यासारखे वाटते. अतिशय अशक्तपणामुळे चालवत नाही.

**झोप** :– रात्री झोपेतून जागे होऊन अंग कापावयास लागते. भीती वाटल्याप्रमाणे दचकणे.

**त्वचा** :– भाजल्यासारखी वाटते. सुरकुतलेली.

**ज्वर** :– रक्त गार झाल्यासारखे वाटते. अंतर्गत ज्वर पण बाहेरून अंग गार व सुरकुतलेले. थंडी वाजताना अंग अतिशय गार होते व तहान लागते. गार घाम येतो. तापात बाहेरून अंग गार लागते. टाळू, नाक, जीभ, तोंड, हातपाय, घाम, गार.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***श्रमाने. पिण्याने***; गार पेये. भीतीमुळे. वेदना होत असताना. दमट थंडी. रात्री. हवेतील फरक. पाळीच्या अगोदर व नंतर. शौचास होण्याच्या पूर्वी, होताना, व नंतर.

**ब वा** :– कढत पेये. चालण्याने. पांघरूण घेतल्याने. निजल्याने.

**सहाय्यक औषधे** :– आर्नि; आर्स; कार्बो–व्हेजि.

**संबंधी औषधे** :– कॅम्फ; कुप्रम; टबॅकं.

---

## ३०८. व्हेराट्रम व्हिराइड Veratrum Viride

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम डोक्याचा मागील भाग व ***मेंदूचा आतील भाग; छाती***; जठर; हृदय; यावर होतो. ***एकाएकी जोराचे रक्ताधिक्य होते*** **विशेषतः डोक्याच्या मागील भागाच्या, मेंदूत व छातीत व त्या वेळेस मळमळते आणि ओकावयास होते.** अशक्तपणा येतो व चालताना झोकांडे जातात. लक्षात येण्याजोगा अस्वस्थपणा, सर्व शरीरात वाटतो. झोपेत इकडे तिकडे कंप सुटून आचके येतील असे वाटते. **स्नायूंची शक्ती क्षीण होते.** सर्वांगात ठुसठुस विशेषतः उजव्या मांडीत. असंबद्ध हालचाल. **आचके येताना** स्नायूना कंप येतो, किंचाळणे किंवा

पाठीची कमान होणे. विटाळशी होण्याचे अगोदर किंवा नंतर आचके येतात; बाळंतपणात येणारे आचके. ठिकठिकाणी आग होते– जिभेची, घशात, अन्न-नलिकेत, त्वचेची. त्वचा गार होते व त्यावेळेस चुणचुणल्यासारखे वाटते. सूर्याघात. सुनबहिरी. कपडे दमट आहेत असे वाटते, किंवा ते अंगाला बरोबर बसत नसून कुठेतरी घासत आहेत असे वाटते. जमिनीसपाट निजण्याची प्रवृत्ति. **एकदम विकार सुरू होतात**; मूर्च्छा, थकवा, मळमळणे, बधिरपणा, सूर्याघाताचे दुष्परिणाम. मुले भीती वाटल्याप्रमाणे कापावयास लागतात, व त्यांना आंचके येतील की काय असे वाटते. कंपवातात स्नायू एकसारखे उडतात, झोपेत सुद्धा, ओठावर फेस येतो. एकसारखे डोक्याला धक्के बसतात व वैषयिक वासना बळावते.

**मानसिक** :– बडबड. वेड, बाळंतपणानंतरचे. वातात डोळे वटारल्याप्रमाणे दिसतात व हातांचे चाळे चालू असतात; काल्पनिक वस्तु उचलण्याची प्रवृत्ति. वातात ओरडणे, किंचाळणे, मारणे, एकसारखे पुटपुटणे. स्वतःकडे आलेल्या डॉक्टरला पाहण्याची भीती वाटते.

**डोके** :– कढत. डोके मागे वाकलेले; डोके मागे पुढे हलते किंवा इकडे तिकडे फिरविण्याची प्रवृत्ति. डोके वर उचलले की ठुसठुसावयास लागते; डोळ्या-मध्ये व टाळूला ठणका लागतो. डोक्याच्या मागील भागातून वर दुखावयास लागून दृष्टी मंद होते व बाहुल्या रुंद होतात. मेनिन्जायटिस. घेरी येताना मळमळते व एकदम थकवा येतो.

**डोळे** :– लालबुंद. दृष्टीपुढे लाल ठिपके दिसतात. डोळे मिटल्यानंतर निळसर दिसते.

**कान** :– बहिरेपणा विशेषतः जलद हालचाल केली तर जास्त जाणवतो, व मूर्च्छा येते.

**नाक** :– चिमटलेले व निळे. एकसारख्या एकामागून एक जलद शिंका येतात व तोंड आतून गरम होऊन चुणचुणल्यासारखे वाटते.

**चेहरा** :– *लाल निळसर फुगीर पण उठून बसल्यावर फिकट होतो.* गालाच्या हाडावर ताणल्यासारखे वाटते. चावत असल्याप्रमाणे जबड्याची हालचाल. चेहऱ्याचे स्नायूंना धक्के बसतात.

**तोंड** :– जीभ पांढरी किंवा पिवळी व **वरून खाली मध्यभागी लाल पट्टा किंवा रेघ किंवा कोरडी.** तोंडाला क्लोरोफार्म किंवा इथर सारखा वास येतो किंवा दुर्गंधी येते. जीभ भाजल्यासारखी वाटते.

**घसा** :– अन्ननलिकेचा दाह, आग होते.

**जठर** :- मळमळून ओकाबयास होते व जुलाब होतात. न मळमळता जोराच्या ओकाऱ्या. अतिशय वेदनायुक्त उचकी लागते. जठर पाठीच्या कण्याला चिकटले आहे असे वाटते. जठराचा शोथ– अगदी थोडे अन्न किंवा पाणी सुद्धा टरत नाही, जठराची आग होते. अतिशय तहान लागते, थोडे पाणी प्याले की थोडा वेळ बरे वाटते.

**उदर** :- ठणकते; बेंबीजवळ कापल्याप्रमाणे वेदना होतात. ओटीपोट हुळहुळे होते. आतड्यातील वेदना वृषणापर्यंत येतात. गुदात आग होते व शौचास होईल होईल असे वाटते पण शौचास होताना व झाल्यानंतर बरे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :- लघवी थोडी व गढूळ.

**स्त्रीजननेंद्रिये** :- बाळंतपणात गर्भाशयाचे मुख उघडत नाही. बाळंतज्वर. विटाळ सुरू होण्याच्या अगोदर ओटीपोटात मुरडा होऊन वारंवार थोडी थोडी लघवी कष्टाने होते. विटाळ बंद झाल्यामुळे डोक्यात रक्ताधिक्य होते.

**श्वसनेंद्रिये** :- श्वासोच्छ्वास मंद व जड; छातीवर ओझे ठेवल्यासारखे वाटते. दमा. न्युमोनिआ. सुरवातीपासूनच जोराचा खोकला यावयास लागतो. छातीत आग होते.

**हृदय** :- हृदयाच्या जागी मंद ठणका लागून आग होते. नाडी मंद; अशक्त; अनियमित, मधून मधून थांबते; किंवा जलद. सर्व शरीरात धमन्या ठुसठुसतात, उजव्या मांडीत जास्त. हृदयाचे ठोके जोरदार.

**हातपाय** :- मानेत व खांद्यात ठणका लागतो. हातापायांना विजेचे धक्के बसल्याप्रमाणे भयंकर धक्के बसतात. पंज्यावर भाजल्यासारखे फोड येतात. पावलांना, तळपायाला पेटके येतात.

**झोप** :- शुद्धि नसल्याप्रमाणे. झोप येत नाही. बुडत आहोत किंवा पाण्यात आहोत अशी स्वप्ने पडतात.

**त्वचा** :- धांवरे– मेंदूची लक्षणे होऊन. चुणचुणते, मिरमिरते. निरनिराळ्या ठिकाणी कंड सुटते, चोळण्याने बरे वाटते. गार, चिकट निळी.

**ज्वर** :- अतिज्वर. संध्याकाळी अतिज्वर सकाळी अंग थंडगार. तापाचा घाम येऊन एकसारखा जलद चढ उतार. दीर्घ ज्वर, बाळंतज्वर. छातीत आग होते. गार चिकट घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** उठ*ताना* किंवा शरीराचा भाग वर कर*ताना*. हालचाल. थंडी. पाठीवर निजल्याने. बाळंतपणानंतर.

**ब वा :–** चोळण्याने. डोके जमिनीवर ठेवून सपाट निजल्याने. खाण्याने.

**संबंधी औषधे :–** अको; गेल्से.

---

## ३०१. व्हेरिओलिनम (देवीच्या फोडाची लस)

Variolinum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम रक्त; कणा व स्नायू यावर होतो. **सर्वांगाला ठणका विशेषतः पाठीला, डोक्याच्या मागील भागात आणि पायाना.** रक्तवाहिन्यांचा लवचिकपणा कमी होतो, कण्यातील मणक्यात चुन्याचे प्रमाण जास्त होते. देवीप्रतिबंधक म्हणून या औषधाचा उपयोग होतो, तसेच देवी आल्यावर या औषधाने देवीचा जोर कमी होतो.

**मानसिक :–** देवी येण्याची अतिशय भीती वाटते.

**डोके :–** मेंदूत वेड लागल्याप्रमाणे भावना होते. डोके दुखत असताना पंजे व पाऊले बर्फासारखी गार होतात.

**डोळे :–** उठताना डोळ्यापुढे हिरवे दिसते.

**नाक :–** कोणत्याही वासाने मळमळावयास लागते.

**तोंड :–** दुर्गंधी, तांब्याप्रमाणे चव. झोपेत जीभ बाहेर लोंबते.

**घसा :–** बंद झाल्यासारखा वाटतो. उजव्या बाजूस गोळा बसल्याप्रमाणे वाटते.

**जठर :–** खाल्लेले अन्न ढेकराबरोबर परत बाहेर येईल की काय असे वाटते. प्यालेले दूध तावडतोब ओकून पडते.

**उदर :–** फुगते व तो फुगवटा वरच्या भागात दिसतो.

**स्त्रीजननेंद्रिये :–** उदर गरोदर असल्याप्रमाणे दिसते.

**पाठ :–** मोडल्याप्रमाणे दुखते.

**त्वचा :–** त्वचेखाली ढेकूण चालल्याप्रमाणे वाटते. तळहाताचा इसब. **दुर्गंधी पुवळलले फोड येतात. देवी.** वेदनायुक्त पुटकुळ्या येऊन त्या गेल्यानंतर राहिलेल्या वेदना. **व्रण कोरल्याप्रमाणे दिसतात.**

**ज्वर** :– पाठीवर वरून खाली पाणी थेंब थेंब पडत आहे असे वाटते. हुडहुडी भरते. अतिशय आग होऊन ताप येतो. दुर्गंधी घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– हालचाल. देवी काढविल्यानंतर.

**संबंधी औषधे** :– ॲन्टी-टा; मॅलॅन्ड्री; सिमि.

---

## ३०२. सल्फर (गंधक) Sulphur

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***रुधिराभिसरण– शिरातील, उदरातील व यकृतातील; पोषण***; गुद; छाती; ***त्वचा; टाळू; तळपाय;*** सांधे व गाठी यावर होतो; ***पोक आलेले, किडकिडीत, अस्वच्छ, अव्यवस्थित व लवकर बरे न होणारे रोगी.*** चांगली भूक असूनसुद्धा **शरीर वाळते**, लहान मुलांचे वाळणे, लहान मुले म्हाताऱ्याप्रमाणे मुरकुतलेली, डोके मोठे, पोट मोठे व हातापायाचा काड्या. मुले दचकतात उड्या मारतात व भयंकर रीतीने किंचाळतात. त्वग्रोग होण्याची प्रवृत्ति; गाठी वाढण्याची प्रवृत्ति. ***योग्य निवड केलेल्या औषधाची प्रतिक्रिया व्हावी तशी होत नाही.*** शरीरात साखळलेली द्रव्ये लवकर जिरत नाहीत. ***जीर्ण विकार. शरीराची द्वारे*** किंवा एखादा भाग ***लाल***–कान, ओठ, पापण्यांच्या कडा वगैरे. ***एखाद्या जागी ठुसठुसते, आग होते किंवा रक्ताधिक्य होते– तळपाय, टाळू***, हाडे, वेदना होत असलेल्या जागा वगैरे. ***कंड सुटते***– कंड उत्पन्न करणारे स्राव. **स्राव–दुर्गंधी करवडणारे किंवा रक्ताचे धागे असलेले. अशक्तपण व मूर्च्छेचे झटके येतात**, दिवसा किंवा वारंवार किंवा अंगावर दूध पाजल्यानंतर येतात. **पोकळ**, अतिशय भरल्याप्रमाणे, खरखरीत किंवा बधिर झाल्यासारखे वाटते. ***भावना खालून वर जातात***, आग, लाटा, लहरी, घेरी वगैरे. लक्षणांची गुंतागुंत किंवा न्यूनत्व. इतर गोष्टीपेक्षा स्वतःचा कोठा स्वच्छ ठेवण्याची आवड. शरीरातील घटक इतके निःशक्त होतात की थोड्याशा दाबाने भाग दुखतो, सुजतो व त्यात पू होतो. सतत दाबामुळे किंवा घर्षणामुळे आलेले काठिण्य–घट्टे, पाठीची क्षते वगैरे. संधिवात. सांध्याजवळ पोकळ गुल्मे उद्भवतात. कॅन्सर. फेफरे येण्याचे अगोदर अंगावरून उंदीर चालला आहे असे वाटते. आंघोळीचा तिटकारा, व ती केल्यानंतर लक्षणे जास्त होतात. ताठ चालता येत नाही. **बेडौल उंचीचे किडकिडित इसम.** आंघोळ करूनसुद्धा **अंगाला घाण**

येते. घाणेरडे, गलिच्छ, त्वचेचे रोग होणारे इसम. काही झाले तरी त्याची जाणीव पोटाच्या खळीत होते. दारूचे दुष्परिणाम. जलोदर. पडणे, मार लागणे, लचक ऊन यांचे दुष्परिणाम. आपले शरीर मावणार नाही इतके लहान आंथरूण आहे असे वाटते. थरथरत्या जागेवर उभे आहोत असे वाटते. कोळशाच्या खाणीत काम करणाऱ्याचे विकार, दमा.

**मानसिक** :– मंद आळशी, नेहमी भुकेला व थकलेला. कल्पनासृष्टीत रममाण होणारे आशावादी. स्वार्थी, कृतघ्न. दरिद्रि पण तत्त्वज्ञानी. विचित्र गूढविद्येचे वेड. आपण फार मोठे इसम आहोत असा समज. उदास, दुःखी, निराश रडवेपणा. आपणाजवळ फार सुंदर वस्तु आहेत व आपण फार सुखी आहोत असा गर्व; फाटक्या चिंध्यासुद्धा सुंदर वाटतात. कामाचा कंटाळा; कोणत्याच गोष्टीत मन रमत नाही. आयुष्याची तृप्ति, मरणाची इच्छा. अत्यंत आळसामुळे काम करावेसे वाटत नाही व दुर्दैवामुळे जगावेसे वाटत नाही. आंघोळीची भीती वाटते (मुलांना). सायंकाळी चिंता वाटते व काही तरी होईल अशी भीती वाटते. झोपेनंतर बराच वेळ काय करावे याबद्दल गोंधळ होतो. चिडखोर व संतापी. धार्मिक गोष्टींची चर्चा करण्याची आवड. आकलनशक्ति मंद, लिहिण्यात वाचण्यात चुका करणे, शब्दांची उलटापालट करणे, योग्य शब्दांची योजना करता येत नाही. प्रौढपणी सुद्धा बालिश चिडखोरपणा. अतिशय स्वार्थी, दुसऱ्याविषयी बेपर्वा. मनात काहीतरी. ठाम कल्पना करून तत्वज्ञान व धार्मिक गोष्टींच्या चिंतनात रमणारे इसम. स्वतःच्या शरीरातील स्रावांच्या घाणीचा मळमळ येण्याइतका तिटकारा. पाण्यात किंवा उंचावरुन (खिडकीतून) उडी मारून आत्महत्या करण्याची प्रवृत्ति, विशेषतः फेफरे येताना व विटाळसेपणी. नको त्या वस्तू दुसऱ्याना देऊन त्याच्या मृत्यूला कारणीभूत होऊ असे वाटते. कोणत्यातरी वस्तूला स्पर्श करण्याची इच्छा पण स्पर्श करता येत नाही. हे किंवा ते कोणी केले कसे केले याची चर्चा करणे पण त्याचे समाधानकारक उत्तर मिळत नाही. निरक्षर असून स्वतःला फार मोठा समजणे, शिक्षणाचा व सुशिक्षित लोकांचा तिटकारा करणे. चोरून बघणे.

**डोके** :– घेरी कपाळात जाणवते, विशेषतः नदी ओलांडताना, वाकताना. टाळू; ठसठसते, कढत, जड, हुळहुळी होते. मानेपासून टाळूपर्यंत वेदना होतात, शहारे येतात, दाबल्यासारखे वाटते वगैरे. डोक्याभोवती पट्टा बांधला आहे असे वाटते किंवा मेंदूत खोल दुखते. दर सातव्या दिवशी डोके दुखते. डोके दुखू

लागण्याच्या अगोदर डोळ्यापुढे तांबड्या हिरव्या रेघा, तारे चमकावयास लागतात; सतत २।३ दिवस डोके दुखते. डोके कढत, पावले गार. डोक्याच्या कातडीला घाम येतो. मुलाचे डोके मोठे असते टाळू लवकर भरून येत नाही. मेंदूत पाणी साचते, आचके येतात, तोंड लाल होते, बाहुल्या रुंद होतात. केस गार, कोरडे खवडे, नायटे, आगपेण वगैरे.

**डोळे** :– आग होते, वाळू गेल्याप्रमाणे खुपतात, फुटल्यासारखे वाटतात, थरथरतात. पापण्या लवतात. **प्रकाशाभोवती वर्तुळे दिसतात.** काजळी तरंगत आहे असे वाटते. उजेड सहन होत नाही. सर्दी होऊन डोळे येतात. पापण्यात व्रण पडून आग होते. सारा येतो. फूल. मोतीबिंदु. पापण्या चिकटतात. वस्तू आहेत त्यापेक्षा जास्त दूर दिसतात. डोळ्यात काही तरी जाऊन आलेली सूज. अश्रु तेलकट. रांजणवाड्या. पापण्यांचा इसब. खुपऱ्या.

**कान** :– कानात पाणी हालत आहे असे वाटते. खाताना किंवा नाक शिंकरताना कानात दडे बसतात. बहिरेपणा येण्याचे अगोदर कानात निरनिराळे आवाज होतात किंवा अतिशय चांगले ऐकू येते. आवाज कानातून न येता कपाळातून येत आहेत असे वाटते. दुर्गंधी पुवळलेला स्राव येतो; दर आठ दिवसानी.

**नाक** :– आलटुन पालटून चोंदते. थेंबथेंब पाणी गळते; सुजते, लाल होते विशेषतः थंडीने. वारंवार सर्दी होते. नाकातून रक्त येते विशेषतः रात्री किंवा उजव्या कुशीवर निजल्याने. घ्राणेंद्रिय अत्यंत तीक्ष्ण. काल्पनिक वास येतात.

**चेहरा** :– कपाळावरच्या शिरा फुगतात. *चेहरा म्हाताऱ्याप्रमाणे*; खड्डे पडलेला, मनःक्षोभाने, उष्णतेने, उत्तेजक पदार्थाने लाल होतो. ओठ कोरडे, लालबुंद. गालगुंड. यौवनपीटिका. ओठ सुजलेले, खरखरीत, भेगा पडलेले, आग होते.

**तोंड** :– जीभ कंपयुक्त, कोरडी; कडा व टोक लाल. चव कडू विशेषतः सकाळी. दात सैल होतात व हुळहुळे होतात, दात खाणे. हिरड्यातून रक्त येते, आग होते. तोंड येते– आग होते व टोचते. तान्ह्या मुलांच्या आयांचे आलेले तोंड. दातात धक्के बसल्याप्रमाणे वाटते, तोंड कोरडे पडून फार तहान लागते. सकाळी तोंड चिकट, कोरडे व बेचव होते. चव आंबट, गोडुस, कडु, वाईट. लाळ गळते, दुर्गंधी चवीमुळे मळमळते.

**घसा** :– घशात सूज आल्यासारखी वाटते किंवा वाफ वर येत आहे असे वाटते. टानसिल मोठ्या होतात, निळसर दिसतात, आग होते, चुणचुणते, टोचल्याप्रमाणे वेदना होतात. गळा लाल, बाहेरून. घशात गोळा, केस किंवा काटा आहे असे वाटते. गोळा वर येऊन घसा बंद झाल्यासारखा वाटतो.

**जठर :**– दुर्गंधी ढेकरा येतात ( कुजलेल्या अंड्याप्रमाणे ), विशेषतः रात्रीच्या जेवणानंतर. **खाणे थोडे, पिणे पुष्कळ.** अतिशय भूक लागते किंवा मुळीच लागत नाही. अन्न जास्त खारट लागते. मांसाचा तिटकारा, दूध सोसत नाही. गोड खावेसे वाटते. आम्लपित्त. आग होते. आंबट ढेकरा येतात. *एकदम भूक लागून अशक्तपणा वाटतो.* सकाळी ११ वाजता **पोटाच्या खळीत अशक्तपणा वाटतो.** वारंवार खाल्ले नाही तर डोके दुखावयास लागते किंवा मरगळल्यासारखे वाटते. ओकारीत अपक्व अन्न पडते, आंबुस घाण येते. गरोदरपणची मळमळ. दूध प्याल्याने तोंड आंबट होते व आंबट ढेकरा येतात. भूक लागते पण जेवावयास बसले की अन्नाची किळस येऊन ते बाजूला सारणे. वाटेल ते खाणे. पोटावर दाबले की ढेकरा येतात.

**उदर :**– *हुळहुळे,* स्पर्श, दाब सहन होत नाही; आत **जड** गोळा आहे असे वाटते– आतड्यात टोचते; गुदात खाली ओढ लागते. यकृताच्या जागी दुखते व हुळहुळेपणा येतो. पित्ताच्या खड्यामुळे होणाऱ्या वेदना. कावीळ– जीर्ण, पुन्हा पुन्हा होणारी. आतड्यात वात धरून आवाज होतो. पोट दुखण्याची सवय असलेली तान्ही मुले. गुदात वेदना होतात, कंड सुटते, शौचास होईलसे वाटते. **मूळव्याध होण्याची प्रवृत्ति.** वेदनामुळे शौचास न होऊ देण्याची प्रवृत्ति. मलावरोध व हगवण आलटुन पालटून. *हगवण, अगदी पहाटे शौचास जाण्याची घाई होते.* जुलाबाचे स्वरूप बदलणारे, दुर्गंधी, वेदनारहित, पाण्यासारखा राखेच्या रंगाचे फेसाळ– दुधाने जास्त होते. लहान मुलांचा अतिसार– मुले पांढरी पडतात, खूप गार घाम येतो, गुंगीत डोळे अर्धवट उघडे राहतात, लघवी बंद होते, हाता-पायाना आचके येतात, झोपेतून मूल ओरडत उठते. **गुदद्वार लाल होते.** पांथरीत टोचते, खोकताना, दीर्घ श्वास घेतल्याने जास्त. आतड्याना गाठी बसल्या आहेत असे वाटते, वाकल्याने जास्त. खाण्या-पिण्यानंतर वेदना होतात त्यामुळे वाकावे लागते. आत काहीतरी जिवंत फिरत आहे असे वाटते. शौचाची घाण स्वतःचे शरीर घाण झाल्याप्रमाणे जाणवते.

**मूत्रेंद्रिये :**– लघवी करताना मूत्रमार्गात आग होते, कंड सुटते, व ती बराच वेळ राहते. लघवीला एकदम लागून घाईने जावे लागते. रात्री लघवीला वारंवार जावे लागते. अंथरुणात न कळत लघवीला होते. पाण्यासारखी भरपूर लघवीला होते. लघवीतून श्लेष्मा व पू जातो. वात सरताना लघवी नकळत होते. लघवी कष्टाने, थोडी थोडी होते किंवा मूत्राशयात तुंबते. थंडीमळे मूत्राशयाचे विकार उद्भवतात.

**पुरुषजननेंद्रिये :–** मुष्टिमैथुनामुळे किंवा अतिशय कामोपभोगामुळे इंद्रिये शिथिल होतात. स्वप्नावस्था झाल्यानंतर सकाळी फार थकवा येतो. स्त्रीला स्पर्श केला की वीर्य गळते. वीर्य पातळ, वासरहित. संभोगानंतर पाठ दुखते, हातापायाना ताकद राहत नाही, औदासिन्य येते व स्वभाव किरकिऱ्या होतो. अंड खाली लोंबतात. शिश्न गार. वीर्यपात होताना मूत्रमार्गात आग होते.

**स्त्रीजननेंद्रिये :–** गर्भाशयात कापल्याप्रमाणे वेदना होतात विशेषतः विटाळसेपणी. योनिद्वाराला कंड सुटते, आग होते, व हुळहुळे होते– बसल्याने जास्त, स्वस्थ बसवत नाही. विटाळ दुर्गंधी दाट, थोडा व करवडणारा. पाळ्या अनियमित. थोड्याशा शारीरिक किंवा मानसिक क्षोभामुळे विटाळ बंद होतो. ओटीपोट जड खाली ओढ लागल्यासारखे वाटते त्यामुळे उभे राहवत नाही. योनीत आग होते, कंड सुटते, आसपास पुटकुळ्या येतात. इंद्रियाना घाण येते व त्यांचे भोवती– मांड्याना व पोटावर दुर्गंधी घाम येतो. विटाळ थांबण्याच्या वयात अंग तापते. नष्टार्तव. स्तनाग्राना भेगा पडतात– आग होते, चुणचुणते. **डाव्या स्तनाग्राला सूज येऊन मागे पाठीपर्यंत वेदना जातात.** स्तनात आग होते. बाळंतज्वरात विटाळ बंद होतो किंवा पुवळलेला असतो, अतिज्वर, सर्वांगाला घाम सुटतो, पोटाला स्पर्श सहन होत नाही गुंगी येते. .धुपणीत पिवळा श्लेष्मा जातो, आग होते व आसपासचा भाग करवडतो. गर्भाशय खाली येते, हात उंच करून वस्तु काढल्यानंतर. गर्भाशयाचा व स्तनाचा कॅन्सर. संभोग करताना योनी हुळहुळी होते.

**श्वसनेंद्रिये :–** *गुदमरल्यासारखे वाटून सारखे वारे हवेसे वाटते.* श्वासोच्छ्वास अनियमित. **खोकला** जोराचा, उताणे निजल्याने जास्त येतो. आवाज खोल, बसलेला– सकाळी जास्त. छातीत घुरघुर आवाज होतो, तापते विशेषतः सकाळी ११ वा. छाती पट्ट्याने आवळल्यासारखी वाटते किंवा वर जड ओझे ठेवल्यासारखे वाटते. छातीत कळा येतात, पुढून मागे टोचते. प्रत्येक वेळेस सर्दी होऊन दमा होतो. बोलताना छातीत अशक्तपणा वाटतो. खोकल्यामुळे सर्व शरीर हादरते, डोक्यात दुखते. कफ, रक्त पू मिश्रित, गोडसर. न्युमोनिआ. क्षय. फुप्फुसांभोवती पाणी साचते. छातीवर लाल पिंगट डाग पडतात. क्षय. फुप्फुसांभोवती पाणी साचते. छातीवर लाल पिंगट डाग पडतात. छातीत गारपणा किंवा आग होते व ती चेहेऱ्या-पर्यंत पसरते. कंठात लव असल्याप्रमाणे गुदगुल्या होऊन खोकला येतो.

खोकल्याचे २।३ ठसके येतात. डाव्या फुफ्फुसाच्या वरच्या भागात बूच बसल्यासारखे वाटते.

**हृदय** :– फार मोठे झाले आहे असे वाटते; निजल्याने धडधडावयास लागते. नाडी संध्याकाळपेक्षा सकाळी जलद चालते. श्रमाने, जिना चढताना दम लागतो. हृदयाभोवती पाणी साचते.

**मान-पाठ** :– मान अशक्त; मुलाना सावरत नाही. मानेवर गळवे येतात. खांदे जड होतात. तिकोनी हाडामध्ये ठणका लागतो, मणक्याना स्पर्श सहन होत नाही. अंगाला धक्का लागला तर पाठीतून कळा येतात. माकडहाडाचा भाग तापतो व पाय गार असतात. **कंबरेत ठणका** लागून पोटापर्यंत वेदना जातात त्यामुळे **ओणवे चालावे लागते**; हातावर भार देऊन बसावे लागते. शौचाचे वेळी गुदास्थीत दुखते. कुबड, मणके मऊ होतात. डोके वळविताना कण्याचे मणके एकमेकावर घसरत आहेत असे वाटते. डोके मागे वाकविल्याने मानेचे मणके कटकट वाजतात. लघवी करताना माकडहाडात ठणका लागतो.

**हातपाय** :– डावा हात बधिर होतो निजल्याने जास्त. तळहाताला भेगा पडून पापुद्रे जातात. तळहातावर इसब किंवा चामखिळी येते. हाताची ( उजव्या ) बोटे बधिर होतात. पंगुवात-दोन्हीपाय लुळे पडतात, लघवी बंद होते, बेंबीपर्यंत बधिरपणा येतो. गुडघ्याच्या पोकळीत ताणल्यासारखे वाटते (डाव्या). पोटऱ्यात पेटके येतात ( डाव्या ). ***तळपायाची आग होते, रात्री पांघरुणाच्या बाहेर पावले टाकावी लागतात*** किंवा अंथरुणात गार होतात. तळहात व तळपाय आलटुन पालटून गार होतात किंवा तापतात. **झोप लागता लागता एखाद्या हाताला किंवा पायाला धक्के बसतात.** सांधे सुजतात, मोठे होतात, ताठतात, आत पाणी साचते. गुडघीरोग. कमरेच्या सांध्याचा क्षय. नखुर्डे; बोट त्वरित सुजते, लाल होते, ठाठते, आत भयंकर आग होते, टोचते. नखाभोवती व्रण पडतात.

**झोप** :– गुंगी येऊन अर्धशिशी सुरू होते. दिवसा झोप येते, रात्री येत नाही. झोप अस्वस्थ – वारंवार जाग येते ( मांजराप्रमाणे ). झोप लागल्याबरोबर दचके बसतात. भयंकर स्वरूपाची स्वप्ने पडतात त्यामुळे काळजी वाटते. अगदी बारीक आवाजाने जाग येते. झोपेत गाणे म्हणणे, किंवा गाणे म्हणत जागे होणे. झोपेत बोलणे. किंचाळून जागे होणे.

**त्वचा :–** **कोरडी, खरखरीत, सुरकुतलेली, पापुद्रे जातात. कंड** *सुटते*-भयंकर विशेषतः रात्री किंवा प्रेमळ. *त्वचेवर भेगा पडतात*, **चिघळते लवकर बरी होत नाही.** खाजविल्यानंतर आग होते. त्वचेला हवा, वारे, आंघोळ सहन होत नाही. **अंगावरची उगवण व इतर उपद्रव आलटुन पालटून** होतात, दमा वगैरे. गळवे. केसतुडे. खरूज. त्वचा रोगट, त्वचा पुवळून त्यात हवेचे बुडबुडे येतात. व्रण–कडा उचललेल्या, भोवताली पुरूळ, आतून दुर्गंधी पू व रक्त येते. कातडीच्या बेचकीत कंड सुटते. धांवरे, गोवर, इसब, यौवनपीटिका वगैरे. अंथरुणाच्या उबेने कंड सुटते. सर्वांगाला मुंग्या आल्यासारखे वाटते. नाडी व्रण.

**ज्वर :–** पाठीत खालून वर थंडी वाजते. **अंग अतिशय कढत आहे असे वाटते, वारंवार उष्ण लाटा येतात,** त्यावेळेस सर्वांग ठुसठुसते, तिकोनी हाडांच्या मध्ये पाठीत ठुसठुसते. आतल्या आत थंडी वाजल्यासारखी वाटते, तहान लागत नाही. रात्री खूप घाम येतो व त्याला गंधकाचा वास येतो. एखाद्याच भागाला घाम येतो. खाक, पंजे, पावले वगैरे. खाकेतील भागाला लसणी-सारखा वास येतो. तापात त्वचा उष्ण व कोरडी होते किंवा घाम येऊन ताप कमी होत नाही. संतत ज्वर, ताप सकाळी कमी होतो संध्याकाळी वाढतो. हिंवताप किंवा हिंवताप सतत झाल्यास. बाळंतज्वर.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा हो :– *स्राव बंद झाल्याने किंवा बाह्योपचाराने त्वचेचे रोग बरे केल्यानंतर. आंघोळीने.* दूध. *अंग तापल्याने. श्रमाने, अंथरुणाच्या उबेने* किंवा गरम कपडे घातल्यामुळे. हवेतील फरक. बोलण्याने. **नियमित वेळी सकाळी ११ वा.** पौर्णिमा. **विटाळ थांबण्याचे वयात.** संध्याकाळी, मध्यरात्री नंतर, उभे राहिल्याने. स्पर्श मोकळ्या हवेत. खाली वाकण्याने. वाहते पाणी ओलांडताना. गोड पदार्थ. देवी काढल्यानंतर. हात उंच करून वस्तू काढल्याने.

ब वा :– मोकळी हवा. हालचालीने. शेकण्याने. घाम येण्याने. गरम कोरडी हवा. उजव्या कुशीवर निजल्याने.

**सहाय्यक औषधे :–** अको; आर्से; एलो; कॅल्क-का; नक्स–व्हा; पल्स; पायरो; बडी; बेला; मर्क्यु; ऱ्हस-टा; सल्फ–आयो; सेपि; सोरि.

**संबंधी औषधे :–** ग्रफाय; सिफि; सेले;

---

## ३०३ सल्फर आयोडेटम Sulphur Iodatum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम त्वचा; गांठी व उजवी बाजू यावर होतो. **घट्ट धरल्यासारखे वाटते**. अशक्त व कोणतीही गोष्ट सहन होत नाही. आजारी असल्याप्रमाणे वाटते; मूर्च्छा येते. **बाह्यांग गार पण अंतर्गत आग व चुणचुण**. स्राव करवडणारे. एखादा भाग बोटे वगैरे पांढरा पडून बधिर होतो. पू होण्याची प्रवृत्ति. शरीरात **साखळलेली द्रव्ये जिरण्यास या औषधाने मदत होते**. हट्टी त्वग्रोग. गाठी मोठ्या होतात. शोथानंतर त्या भागाला काठिण्य येते.

**मानसिक** :– श्रम करण्याची भीती वाटते. संशयात्मा उदास. उताविळ.

**डोके** :– सूर्यास्तानंतर डोके दुखणे थांबते. केस उभे राहिले आहेत असे वाटते. घेरी येते, खाली वाकताना, केस बांधल्याने, उपाशी असताना, पाळीच्या अगोदर व नंतर.

**डोळे** :– डोळ्यापुढे वेड्यावाकड्या रेषा दिसतात.

**चेहरा** :– यौवनपीटिका पुवळतात. गालगुंडानंतर, गाठी तशाच मोठ्या राहतात.

**तोंड** – दात मऊ झाल्यासारखे वाटतात. **जीभ गुळगुळीत व चकचकीत**. तोंड कोरडे व हुळहुळे, सारखे ओले करावेसे वाटते, गालगुंड सुजलेले. सुजेनंतर जीभ जाड होते.

**घसा** :– कोरडा, हुळहुळा. गिळताना दुखतो, सारखा ओला करावासा वाटतो. पडजीभ व टानसिल लाल व सुजलेल्या.

**उदर** :– पोटाच्या खळीत श्रम केल्याने कंप उत्पन्न होतो. आतड्यावरील गाठी मोठ्या होतात. हट्टी मलावरोध. शौच पिवळे धमक. गुदद्वारातून दुर्गंधी स्राव येतो. भूक लागत नाही. मुडदुशात मुलाना खा खा सुटते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थोडी व तीतून पू जातो; पिंगट वाळू जाते. परम्यानंतर मूत्रमार्गाचे आकुंचन होते. लघवी होताना वेदना होतात. लघवीची धार पिळल्याप्रमाणे. मूत्रग्रंथित मंद वेदना होतात.

**पुरुषजननेंद्रिये** :– अंड मऊ होतात. शिश्नाचे उत्थापन चांगले होत नाही. बोंडीच्या कातडीवर भेगा पडतात. लहान मुलांची वृषणवृद्धि.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळ्या अनियमित. धुपणी दाट, आग करणारी, पाळीच्या अगोदर व नंतर पुष्कळ जाते.

**श्वसनेंद्रिये** :– श्वासोच्छ्वास दम्याप्रमाणे, अनियमित, घुरघुर वाजते. खोकला सकाळी येतो. कफ हिरवट, पुवळलेला, पिवळा चिकट व भरपूर.

**हातपाय** :– गुडघ्याखाली ठणका व हुळहुळेपणा. तळपाय, दुखतात, आग होते हुळहुळे, विशेषतः उभे राहिल्याने.

**ज्वर** :– कंड सुटते. व्रण. इसब. लस वाहते. यौवनपीटिका. वस्तरा लागून झालेले त्वचेचे रोग.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **श्रम**, अगदी थोडी **उष्णता**. उजव्या कुशीवर निजल्याने. रात्री. वीज वावटळ होण्याच्या अगोदर. वाकल्याने.

**ब वा** :– गार हवा. उभे राहिल्याने. कफ पडल्याने. हिवाळ्यात.

**संबंधी औषधे** :– सल्फ.

---

## ३०४. सल्फुरिक ॲसिड Sulphuric Acid

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***पचनेंद्रिये***; **रक्त**; रक्तवाहिन्या व डावी बाजू यावर होतो. वृद्ध इसम. **दारुडे**. वाजवीपेक्षा जास्त अशक्तपणा. ***अंतर्गत कंप किंवा थरथरणे*** त्यामुळे धरून ठेवावे असे वाटते. **आंबटपणा**. करवडणे. **स्राव भरपूर, करवडणारे किंवा चिकट तारा येणारे. रक्तस्राव** सर्व द्वारातून येतो, अतिशय जातो, काळा व पातळ. भाग ताठल्याप्रमाणे किंवा आवळल्याप्रमाणे वाटतात. **वेदना हळुहळु सुरू होऊन** एकदम थांबतात. कुरतडल्याप्रमाणे वाटते. **अतिशय हुळहुळेपणा. बोथट खुंटी आत ठोकली जात आहे असे वाटते**. दुखापती, मार लागून झालेले उपद्रव, विशेषतः फार दिवस राहिलेला काळेनिळेपणा. व्रण लाल व निळे पडून दुखावयास लागतात. **उष्ण लाटा** अंगात येऊन घाम सुटतो व अंग कापते. अंगाला आंबुस वास येणारी मुले, शरीर वाळलेले, थंडी सहन होत नाही, काहीही विकार नसताना अशक्त असलेली मुले. विटाळ थांबण्याच्या वयात होणारे उपद्रव. वेदना झोपेत जाणवतात, जागे झाले की थांबतात. भाग ताठलेले व ताणल्यासारखे वाटतात. मार, दुखापतीनंतर भाग कुजावयास लागतो. वेदनामुळे धक्के बसल्यासारखे वाटते; आगीच्या चमका मारतात.

**मानसिक** :– **उतावीळपणा** प्रत्येक गोष्ट करण्यात, खाण्यात, काम करण्यात वगैरे. **चिडखोर**, संतापी, क्षुल्लक कारणाने. चंचल, उदास, हिरमुसलेला. काही

केले तरी समाधान होत नाही. एकसारखे रडणे. उत्तरे देण्याचा कंटाळा, हो किंवा नाही सुद्धा कष्टाने म्हणणे. थकवा. एकसारखी भीती वाटणे.

**डोके** :– डोक्यात विजेचे धक्के बसल्याप्रमाणे वाटते. कातडे चिमटल्यासारखे वाटते. मेंदू सैल होऊन इकडून तिकडे पडत आहे असे वाटते, मोकळ्या हवेत चालताना जास्त. डोक्याच्या मागील बाजूस दाबल्यासारखे वाटते, हात डोक्याजवळ धरल्याने बरे वाटते. डोक्यात रक्ताधिक्य होते. कानशिलात बूच ठोकल्याप्रमाणे धक्के बसतात. केस गळतात, अकाली पांढरे होतात.

**डोळे** :– वाचताना डोळ्यातून पाणी येते. बुबुळावरील रक्तवाहिन्या फुगतात. मार लागून डोळ्यात झालेला रक्तस्राव. बाहेरील कोपऱ्यात गोळा सरकला आहे असे वाटते, डोळे मिटल्याने तो आंतील कोपऱ्यात सरकतो व उघडल्याने पुन्हा बाहेरच्या कोपऱ्यात येतो.

**कान** :– बाहेर पान चिकटले आहे असे वाटते.

**नाक** :– नाकातून पातळ काळे रक्त बाहेर पडते. काफीच्या वासाने जास्त, किंवा वृद्धपणी.

**चेहरा** :– मेल्याप्रमाणे फिकट किंवा सुरकुतलेला. अंड्यातील पांढरा बलक चेहऱ्यावर वाळला आहे असे वाटते.

**तोंड** :– तोंड येते, दीर्घकाळ राहिलेल्या विकारात किंवा तान्ह्या मुलाचे किंवा त्यांच्या आयांचे. तोंडात भाजल्यासारखे फोड येतात. व्रण लवकर चरत जातात. हिरड्यातून रक्त येते. तोंडाला घाण येते. रक्तमिश्रित लाळ. मधुमेहात दात खराब होतात, कुजतात.

**घसा** :– हुळहुळा, चुन्याने सारविल्याप्रमाणे पांढरा. गिळताना पेये नाकातून बाहेर येतात. घटसर्प, पिवळसर रंगाचे शेंबडाचे धागे आत लोंबतात.

**जठर** :– तोंडाला पाणी सुटते. भयंकर उचकी लागते विशेषतः दारू पिण्याने. आंबट ढेकरा येतात त्यामुळे दात शिवशिवतात. आंबट ओकाऱ्या. छातीत जळजळ. जठर शिथिल होऊन लोंबत आहे असे वाटते. मळमळताना अंगाला शहारे येतात. ओकारीत अन्न न पडता कफ पडतो. गार पाणी प्याल्याने पोट गारठल्यासारखे वाटते. डाव्या कुशीवर निजल्याने ओकावयास होते. शौचानंतर पोट गळून गेल्यासारखे वाटते. खाण्यानंतर घाम येतो. ओकावयास होण्याचे अगोदर खोकला येतो, गरोदरपणी.

**उदर** :– गळून गेल्यासारखे वाटते. वेदना होताना अंतर्गळ बाहेर येईल असे वाटते विशेषतः डाव्या बाजूस. अतिशय दुर्गंधी हिरवे, काळे नारिंगी पिवळे किंवा **तोंडल्याप्रमाणे** शौचास होते किंवा जुलाब होतात. जीर्ण हगवण, शौचास होताना आग होते. मूळव्याधीतून लस वाहते. गुदात मोठा चेंडू आहे असे वाटते. मूळव्याध मोठी झाल्यामुळे शौचास होताना अडथळा येतो. अपक्व फळे, शिंपातील मासे, खाण्यात थोडाही फरक केला तर जुलाब होतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी लागलेली असताना जर गेले नाही तर मूत्राशयात वेदना व्हावयास लागतात. लघवीतून रक्त येते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळ्या लवकर विटाळ फार जातो. विटाळशी होण्याचे अगोदर व नंतर भयंकर स्वप्ने पडतात. योनी बाहेर येऊन कुजते, गर्भाशयाचे मुख करवडते, व्रण पडतात, त्यातून सहजासहजी रक्त येते, वृद्ध स्त्रियाच्या. पाळी थांबण्याच्या वयात सर्वांगात उष्ण लाटा येतात व सर्वांग कापते. धुपणी करवडणारी आग होते.

**श्वसनेंद्रिये** :– दमा. नाकाच्या पाळ्या आत बाहेर हालतात व कंठ जोराने वर खाली होतो, पाय लोंबकळत ठेवल्याने बरे वाटते. खोकला–कोरडा ठसका. खोकल्यानंतर ढेकरा येतात किंवा ओकावयास होते, कंड सुटते. कफातून रक्त पडते, पाळी थांबण्याच्या वयांत. क्षय, प्रथमावस्था.

**पाठ** :– कणा अतिशय अशक्त, बसवत नाही, उभे राहवत नाही. मानेच्या उजव्या बाजूस मोठाली गळवे येतात. अंथरुणात पडून झालेली क्षते.

**हातपाय** :– लिहिताना बोटे उडतात. गुडघे व घोटे अशक्त. झोपेत बोटांना झटके बसतात.

**त्वचा** :– काळे निळे चट्टे. त्वचेखाली रक्त साखळून लाल ठिपके पडतात. त्वचेवर लाल चट्टे पडून कंड सुटते. लवकर बरे न होणारे व्रण–आतून काळे रक्त येते. काळी पुळी, गळवे वगैरे. व्रण लाल किंवा निळे होऊन दुखावयास लागतात.

**ज्वर** :– टायफाइडसारख्या तापात अतिशय थकवा येतो. अतिशय घाम येतो, घाम गार असतो, विशेषतः शरीराच्या वरच्या भागाला. गरम अन्न पेये घेतल्यानंतर, हालचाल करताना घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** मोकळी हवा. थंडी. दारू. दुखापती. *कॉफीचा वास*. विटाळ थांबण्याच्या वयात. संध्याकाळच्या सुमारास. अत्यंत थंडी किंवा उष्णता. शस्त्रक्रियेनंतर. मेंदूला माराचा धक्का लागल्यामुळे. स्पर्श, दाब.

**ब वा :–** कढत पेये. डोक्याजवळ हात धरल्याने. समशीतोष्ण हवा. उष्णता.

**सहाय्यक औषधे :–** पल्स.

**संबंधी औषधे :–** आर्से; लॅके; सेपि.

---

## ३०५. संबूल Sumbul

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम मज्जातंतू; हृदय, व डावी बाजू यांवर होतो. घाबरट, चिडखोर व झोप येत नाही. क्षुल्लक कारणामुळे मूर्च्छा येते. भागातून कढत पाणी वाहते आहे असे वाटते. चुळबुळ करणे. स्राव पिवळे चिकट. अकाली वृद्धत्व. हिस्टेरिआ. हसणे व रडणे आलटून पालटून. कंपवात, डोके व हातापायाना सारखे धक्के बसतात व जीभ बाहेर येते. चेहऱ्यावर कोळिष्टके चिकटली आहेत असे वाटते. जीभ खरवडल्यासारखी वाटते. घसा आवळून गुदमरल्यासारखे वाटते. तोंडाला कढत पाणी सुटते. छातीत डाव्या बाजूस दाटल्यासारखे वाटते. श्वासोच्छ्वास कष्टाने होतो. स्तनात ( डाव्या ) दोरीने ओढल्यासारखे वाटते. दमा-हृदयविकारामुळे झालेला. वैषयिक वासना बळावते. लघवीवर तेलकट तवंग येतो. कण्यातून पाण्याचे थेंब वाहत आहेत असे वाटते. रक्तवाहिन्यांचा लवचिकपणा कमी कमी होतो त्यामुळे रक्तदाब वाढतो. घाबरटपणामुळे हृदय धडधडते; हिस्टेरिआत, पाळी थांबण्याच्या वयात. हृदयाची क्रिया पाण्यात होत आहे असे वाटते. डावा हात जड होतो, दुखतो, बधिर होतो व थकल्यासारखा वाटतो. अंग गार झाले म्हणजे बधिर होते. त्वचा गार फिकट. अंतर्गत कंड. वरून खाली पडण्याची स्वप्ने पडतात. संभोग करीत आहोत अशी स्वप्ने पडून भरपूर वीर्यपात होतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** हालचाल. आत श्वास घेतल्याने. विटाळ थांबण्याच्या वयात. संगीत. थंडी. विकारांचा विचार केल्यामुळे.

**ब वा :–** हळुहळु हालचाल केल्याने. उष्णता.

**सहाय्यक औषधे :–** लॅक्टु.

**संबंधी औषधे :–** मोस्क.

---

# ३०६. सॅनिकुला Sanicula

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **पोषण; स्त्रीजननेंद्रिये; मान; गुद व** त्वचा यावर होतो. शरीर वाळलेले, म्हाताऱ्याप्रमाणे. **मुडदूस**–लहान मुलांचे वाळणे. अंगाला शिळया दह्याप्रमाणे घाण येते. मूल रात्री पांघरूण फेकून देते. मोठे झाल्यासारखे वाटते–घसा योनी वगैरे. दाट पिवळा करवडणारा पू. टणक जागेवर निजावेसे वाटते, कपडे ओले आहेत असे वाटते. स्वतःच्या अवयवाचा एकमेकाला स्पर्श सहन होत नाही, ( बोटाना बोटांचा स्पर्श ) किंवा दुसऱ्या इसमाच्या जवळ निजवत नाही. फुटल्यासारखे वाटते, आतड्यात, शिवणीत, मूत्राशयात, टाळूत, छातीत. वेदना इकडे तिकडे होतात.

**मानसिक** :– हट्टी व अतिशय त्रासिक, चिडखोर; मुले. एकसारखे मागे बघावेसे वाटते. आपल्या मनाविरुद्ध क्षुल्लक क्रिया किंवा शब्दाने चिडणे. प्रत्येक गोष्टीचा विपरीत अर्थ करणे. मुले एकदा अतिशय चिडखोर होऊन नंतर लगेच खेळावयास लागतात. अंधाराची, खाली येण्याची भीती वाटते. दुसऱ्याचा स्वतःला केलेला स्पर्श सहन होत नाही. एका जागेवरून दुसऱ्या जागेकडे अस्वस्थ होऊन जावेसे वाटते.

**डोके** :– झोपेत मानेला व डोक्याच्या मागील भागाला खूप घाम येतो, झोपेत व त्याना गार वारे लागलेले सहन होत नाही. केस विंचरताना विजेसारखी तडतड होते. डोक्यातून कोंड्याच्या खपल्या पडतात. मेंदूभोवती ओला कपडा गुंडाळल्यासारखे वाटते.

**डोळे** :– पापण्या चिकटतात. गार हवेने, पाणी लावल्याने डोळ्यातून पाणी येते. भुवयातून कोंडा जातो.

**नाक** :– सर्दी, नाकातून पाणी गळते, खाण्यानंतर जास्त. पाण्याला शिळया पाण्याप्रमाणे कुबट वास येतो.

**तोंड** :– जिभेची इतकी आग होते की ती तोंडाबाहेर गार होण्याकरता काढावी लागते. जिभेचा गजकर्ण. टाळ्यात व तोंडात व्रण पडतात. जीभ टाळ्याला चिकटते. जिभेच्या कडा वर वळतात.

**घसा** :– पेपरमिंट खाल्याप्रमाणे गार झाल्यासारखा वाटतो. मोठा झाला आहे असे वाटते. पातळ पदार्थाच्या मानाने घट्ट पदार्थ बरे गिळता येतात.

**जठर** :– बर्फ घालून दूध प्यावेसे वाटते. गाडीत, मोटारीत बसल्याने मळमळून ओकावयास होते. थोडे थोडे एकसारखे पाणी प्यावेसे वाटते पण ते पोटात गेल्याबरोबर ओकून पडते. तान्ही मुले दूध प्याल्याबरोबर ओकतात–ओकारीत दह्यासारख्या गाठी पडतात. ओकारीनंतर झोप येते.

**उदर** :– **शौचास जड मोठ्या आकाराचे होते.** मलावरोध– पुष्कळ मळ साचल्या-शिवाय शौचास लागत नाही व खूप कुंथावे तेव्हा थोडेसे बाहेर येऊन पुन्हा मागे जाते. जुलाब– रंगरूप वारंवार बदलते, अतिशय दुर्गंधी. शौचास चौकोनी आकाराचे होते. शेळीच्या लेंड्याप्रमाणे बारीक खडे पडतात व ते हाताने काढावे लागतात किंवा त्याचा होताना भुगा होतो. मोठ्या पोटाची, आतड्यात मोठ्याने गुरगुर होणारी मुले. शौचास होताना शिवणीत फुटल्या-प्रमाणे वेदना होतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला माश्याप्रमाणे वास येतो. मूल लघवी होण्याचे अगोदर किंचाळते, लघवी करताना कुंथावे लागते. लघवीला अतिशय जोराची लागून मूत्राशयात फुटल्यासारखे वाटते. लघवी वारंवार, भरपूर होते, एकदम लागते.

**पुरुषजननेंद्रिये** :– इंद्रियाना माशासारखा वास येतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– ओटीपोटात खाली ओढ लागून आतील अवयव बाहेर येताहेत की काय असे वाटते, चालताना धक्का लागला तर जास्त, त्यामुळे योनिद्वार धरून ठेवावेसे वाटते. धुपणीला माश्याप्रमाणे किंवा शिळ्या दह्याप्रमाणे घाण येते. शौचानंतर धुपणी जाते. योनी मोठी झाल्यासारखी वाटून विटाळ आवरता येत नाही. गर्भाशयाचे मुख उघडे व रुंद होते.

**पाठ** :– **पाठ ताठून दुखते, हात मागे नेल्याने** जरा वळण्याने किंवा वर उचलल्याने जास्त. कमरेत व माकडहाडांच्या भागात गार झाल्यासारखे वाटते– गार पाण्यात भिजलेला कपडा वर ठेवला आहे असे वाटते. कटिशूळ, उजव्या कुशीवर निजल्याने बरे वाटते. मान बारीक वाळलेली, मुलाना सावरता येत नाही. मान ताठल्यामुळे सभोवती बघताना सर्वांग वळवावे लागते.

**हातपाय** :– पंजे व पावले गार चिकट. पावलाना पेटके येतात. पावलाना दुर्गंधी घाम येतो. तळपायाची व तळहाताची आग होते. दुर्गंधी घामामुळे पावलांच्या बोटांच्या बेचका करवडतात– जोडे खराब होतात व पायमोजे

कडक होतात. पाऊले गार पाण्यात आहेत असे वाटते. तळहात एकावर एक ठेविले तर त्याना घाम येतो.

**त्वचा** :– मळकट, तेलकट, पिंगट सुरकुतलेली. पंजे बोटे याना भेगा पडतात. मानेची कातडी सुरकुतते व त्याच्या घड्या लोंबतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **हालचाल,** खाली येतात. **हात मागे** किंवा वर **करताना.** गार वारे – डोक्याच्या मागील भागाला व मानेला लागले तर. धक्का.

**ब बा** :– मोकळी हवा. उष्णता. ओकारी झाल्याने.

**संबंधी औषधेः** :– लायको; सल्फ; सोरि.

---

## ३०७. सॅन्ग्विनेरिआ Sanguinaria

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *उजवी बाजू*– **डोक्याची, यकृताची,** छातीची; **श्लेष्मल त्वचा** व जठर यावर होतो. **लाली**–उदरावर, जिभेची वगैरे. *भाजल्याप्रमाणे आग होते आणि लाटा येतात.* श्लेष्मल त्वचा कोरडी. भाजल्यासारखे वाटणे– जीभ. **आग होते**– घशात, छातीच्या मध्यभागी, लहानशा जागी, छातीत आग होऊन टोचते, **तळपाय व तळहात** वगैरे कढत होतात. **सर्वांगात ठुसठुस. रक्ताधिक्य होते**– डोक्यात, छातीत, उदरात वगैरे. **भावना खालून वर जातात किंवा त्याचा शेवट ओकारीत होतो.** अर्धशिशी. अंतर्गत हुळहुळेपणा. **स्राव– करवडणारे, रक्ताचे धागे असलेले** व दुर्गंधी. पाठीवर, डोके उंच करून निजण्याची प्रवृत्ति. श्वसनेंद्रियाचे स्राव एकदम थांबल्यास हगवण सुरू होते. पित्त प्रकृती, विटाळ थांबण्याच्या वयात होणारे उपद्रव. मोड येतात–नाकात, कानात, गर्भाशयात वगैरे. त्वचेखाली असलेला हाडांचा भाग दुखतो. सूर्याच्या चढउताराप्रमाणे वेदनांचा चढ उतार होतो. फुलांच्या वासाने बरे वाटत नाही.

**मानसिक** :– चिडखोर, कुरकुऱ्या स्वभाव. मुद्दाम तक्रारी उकरून काढण्याची प्रवृत्ती. सुस्ती, हालचाल करावीशी वाटत नाही, किंवा मानसिक श्रम करण्याची इच्छा होत नाही.

**डोके** :– **उजव्या डोळ्यावर ठणका लागतो** *किंवा डोक्याचा मागील भाग ते उजव्या डोळ्यापर्यंत* **डोके दुखते**– भरपूर लघवी झाल्याने,

निजल्याने, झोपेत, डोके थांबते. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत डोके दुखते. कानशिलाच्या शिरा फुगतात. डोक्याच्या मागील भागात विजेच्या चमका मारल्याप्रमाणे दुखते. वेळेवर खाल्ले नाही तर डोके दुखते. वर बघताना किंवा डोके जलद हलविल्याने घेरी येते.

**डोळे** :– आग होते.

**नाक** :– **नाकाच्या बुंध्याशी वेदना होतात.** सर्दी होते, ती थांबली की हगवण सुरू होते. वास सहन होत नाहीत. नाकातील मोड. फुलांचा (गुलाब) वासाने सर्दी होऊन नंतर दमा होतो.

**कान** :– कानात आग होते. कान दुखताना डोके दुखते. कानातील मोड. कानात आवाज होतात. विटाळ थांबण्याच्या वयांत आवाज सहन होत नाही. कान दुखतात.

**चेहरा** :– **गाल लाल होऊन आग होते.** तापात गाल लाल होतात. जबड्याच्या कोपऱ्यात भरल्यासारखे वाटून तेथे दाबलेलें सहन होत नाही. वरच्या जबड्यात वेदना होतात व त्या दूर पसरतात, गुडघे टेकून डोके जमिनीवर जोराने दाबले म्हणजे बरे वाटते.

**तोंड** :– जीभ; तांबडी लाल, विशेषतः पुढील भाग, भाजल्यासारखी वाटते. टाळ्याची आग होते. गोड पदार्थ कडू लागतात.

**घसा** :– आग होते, दुखतो (उजवी बाजू); वेदना कानात व छातीपर्यंत जातात. घशातील आग गार हवा आत ओढल्याने कमी होते, गोड पदार्थ खाल्याने जास्त होते. टानसिल सुजून तीत आग होते. अन्ननलिकेत आग होते. गाणाऱ्या इसमांचा कोरडा पडतो.

**जठर** :– लोण्याचा तिटकारा. चमचमीत मसाल्याचे पदार्थ खावेसे वाटतात. मळमळताना पोटात आग होते व लाळ वाढून सारखे थुंकावे लागते. थुंकीत पित्त पडते. आंबट, कडु पाण्याची जळजळीत ओकारी. नाक शिंकरताना किंवा शिंक आल्याने मळमळते, खाण्याने मळमळणे कमी होते. पोटात गळून गेल्याप्रमाणे वाटते. मळमळ थांबल्यानंतर पित्ताच्या गांधी येतात.

**उदर** :– पोटाच्या खळीत ताणल्यासारखे वाटते. जठरापासून उजव्या खांद्यापर्यंत दुखते. यकृताच्या जागी दुखते. जुलाब पिंवळे, पाण्यासारखे व जोराने होतात. गुदाचा कॅन्सर. स्तनापासून उदरापर्यंत कढत पाणी वाहत आहे असे वाटून नंतर जुलाब होतात. उदर वाताने फुगून योनीतून वारे जाते. काविळ.

**मूत्रेंद्रिये** :- लघवी काळसर पिवळी. रात्रीची भरपूर व वारंवार लघवी होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :- विटाळ दुर्गंधी भरपूर जातो. धुपणी करवडणारी दुर्गंधी. स्तन हुळहुळे व मोठे होतात, विटाळ थांबण्याच्या वयात, विटाळशी होण्याचे अगोदर खाकेत कंड सुटते. गर्भाशयाचे मोड. स्तनाग्रा (उजव्या) खाली हुळहुळेपणा.

**श्वसनेंद्रिये** :- कंठ भरल्यासारखा आणि कोरडा वाटतो विशेषतः गाणाऱ्या इसमांचा. खोकला-ढेकर आल्याने किंवा वात सरल्याने थांबतो. खोकताना छातीत आग होते. खोकताना दुर्गंधी वारे बाहेर येते. कफ चिकट, रक्ताच्या गाठी असलेला, पुवळलेला. छातीच्या मध्यभागी गुदगुल्या होऊन सारखा ठसका लागतो- विशेषतः रात्री निजल्यानंतर. कढत वाफा आल्याप्रमाणे छातीपासून उदरापर्यंत आग होते. जठर बिघडल्यामुळे झालेला दमा- जळजळीत ढेकरा येतात. न्युमोनिआ. छातीत उजव्या स्तनापासून खांद्या-पर्यंत वेदना होतात.

**हातपाय** :- उजव्या खांद्याचे स्नायू ताठतात, कापल्याप्रमाणे वेदना होतात, हात वर करता येत नाही किंवा वळविता येत नाही. तळहात सुरकुतलेले. वेदनांच्या जागी स्पर्श केल्याने बरे वाटते. उजवा खांदा व डावा कमरेच्या सांध्यांचा संधिवात.

**त्वचा** :- कोरडी. कावीळ. यौवनपीटिका, विटाळ कमी जातो.

**ज्वर** :- **उष्ण लाटा चेहरा व डोक्यापर्यंत येतात** व त्यावेळेस डोके दुखते. घाम थोडा येतो व आग होते. सर्वांगात ठुसठुसते. तळहात व तळपायाची आग होते, पांघरूण सहन होत नाही.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :- **नियमित वेळी-*सूर्योदयापासून सूर्यास्ता-पर्यंत***. रात्री. दर आठवड्याला. **विटाळ थांबण्याच्या वयात. वास. धक्का** लागणे. उजेड. वर बघताना. हात वर करताना. गोड पदार्थ. हालचाल. स्पर्श.

**क वा** :- ***झोपेत***. पाठीवर निजल्याने. ओकारी झाल्याने. गार हवा. वारा सरकल्याने. आंबट पदार्थ.

**सहाय्यक औषधे** :- ॲन्टी-टा, फास्फ.

**संबंधी औषधे** :- बेला.

---

## ३०८. सॅम्बुकस Sambucus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम श्वसनेंद्रिये; **श्वासोच्छ्वास**; मूत्रपिंड व त्वचा यावर होतो. अनेक लक्षणांबरोबर **भरपूर घाम येतो किंवा दमा लागतो**. अनेक ठिकाणी जलयुक्त सूज येते, विशेषतः पायाना, पावलाना किंवा पावलाच्या आतील कडेला. चिंता वाटून अंग कापते. भीती, दुःख, चिंता, संभोगातिरेक यांचे दुष्परिणाम. लठ्ठ व भरलेले इसम एकाएकी वाळावयास लागतात.

**मानसिक** :– एकसारखा चिडखोरपणा. उगीचच भीती वाटते. भीती वाटल्यानंतर दमा लागतो.

**डोळे** :– अर्धवट उघडे; झोपेत.

**चेहरा** :– निळसर फुगीर विशेषतः खोकताना. चेहरा कढत होऊन घाम येतो.

**नाक** :– कोरडे होऊन चोंदते विशेषतः तान्ह्या मुलाचे, त्याना श्वासोच्छ्वास करताना त्रास होतो व पिता येत नाही.

**मूत्रेंद्रिये** :– अंग तापल्यासारखे होऊन लघवीला भरपूर होते. मूत्रपिंडाचा शोथ नाळगूद–पित्ताच्या ओकाऱ्या होतात व खाण्यानंतर जठरात अस्वस्थपणा येतो. लघवी वारंवार व थोडी होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– बाळंतपणानंतर खूप घाम यावयास लागतो.

**श्वसनेंद्रिये** :– ***एकदम गुदमरल्यासारखे होते*** **किंवा खोकताना गुदमरल्यासारखे** वाटते. झोप लागत असताना किंवा **मध्यरात्रीच्या सुमारास गुदमरल्यामुळे जाग येते व त्यावेळेस खूप घाम येतो**. भीती वाटल्यानंतर श्वासोच्छ्वास करताना शिटी वाजल्याप्रमाणे आवाज होतो. घसा आवळल्यासारखा वाटतो. चिरचिऱ्या आवाज.

**हातपाय** :– पंजे निळे होतात. पावलाना व पायाना सूज येते. पावले बर्फासारखी गार.

**ज्वर** :– **झोपेत अंग कढत व कोरडे, पण जागे झाल्यानंतर खूप घाम येतो**, खोकताना घाम येतो. पांघरूण घ्यावेसे वाटत नाही. फक्त जागेपणीच भरपूर घाम येतो. रात्रीचा भरपूर थकवा आणणारा घाम येतो. ताप येण्याचे अगोदर कोरड्या खोकल्याची ढास लागते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– गार कोरडी हवा. थंड पेये घेतल्याने, अंग तापलेले असताना. डोक्याखाली उशी न घेता निजल्याने. फळे खाल्ल्याने.

क मी :– दाबल्याने. हालचाल. गुंडाळल्याने.

**संबंधी औषधे** :– बेला; ब्रोमि.

---

## ३०९. साबाडिल्ला Sabadilla

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा – नाकाची गुदद्वाराची*; पचनेंद्रियाची; *मज्जातंतू*; यांवर होतो. थंडी सहन होत नाही, शहारे येतात, हुडहुडी भरते. अशक्त, घाबरट, उगीचच्या उगीच दचकणे. शारीरिक व मानसिक उपद्रव आलटुन पालटून होतात. मुंग्या येणे. कंप. बारीक झटके बसणे. कृमी जंत व त्यामुळे उद्भवलेले उपद्रव– आचके, कामोन्माद, मोहनिद्रा वगैरे. हाडात कापल्याप्रमाणे वेदना होतात. भीतीमुळे उत्पन्न झालेली हिस्टेरिआची लक्षणे. भीती, मानसिक श्रम, विचार केल्याने उद्भवलेले उपद्रव. काल्पनिक रोग.

**मानसिक** :– केविलवाणी अवस्था. रागीट. स्वतःच्या शरीरासंबंधी चुकीच्या पण ठाम कल्पना किंवा भ्रम, आपण अतिशय आजारी आहोत, शरीराचे भाग वाळताहेत, हातपाय वाकडे आहेत, हनुवटी लांब झाली आहे, एक बाजू दुसऱ्यापेक्षा मोठी आहे, गरोदर आहोत, कॅन्सर झाला आहे वगैरे काल्पनिक रोग. शुद्धीवर नसणे, विचारलेल्या प्रश्नाला उत्तर मिळत नाही, नंतर एकदम उडी मारून खोलीत बेफाट धावणे.

**डोके** :– कपाळाचा उजवा अथवा डावा भाग आलटुन पालटून दुखतो. अर्धशिशी. कातडे खाजते. घेरी, सर्व वस्तु एकमेकाभोवती फिरत आहेत असे वाटते, रात्री जागे झाल्यावर एकाएकी घेरी येते किंवा वाकले असता सरळ होताना घेरी येते, खाल्याने बरे वाटते. डोळ्यापुढे अंधेरी येऊन मूर्च्छा येते. विचार केल्याने डोके दुखावयास लागून झोप येत नाही. केसात आग होते, कंड येते, मुंग्या आल्यासारख्या वाटतात खाजविल्याने जास्त. शाळेत जाणाऱ्या मुलींची डोकेदुखी.

**डोळे** :– पापण्यांच्या कडा लाल होतात, कंड सुटते. **डोळ्यातून पाणी येते**; वेदना होताना, मोकळ्या हवेत, शिंकताना, खोकताना, जांभई देताना.

**कान** :– चांगले ऐकू येत नाही.

**नाक** :- *आत* **कंड सुटते**– चोळावेसे वाटते किंवा कुरतडावेसे वाटते. नाक कोरडे, आत गुदगुल्या होऊन सर्वांगात गुदगुल्या व्हावयास लागून नंतर दमा लागतो. **एकसारख्या *जोरजोराने शिंका येतात किंवा अर्धवट येतात.* वास सहन होत नाहीत.** लसणीचा वास सहन होत नाही. सर्दी होते नाकातून खूप पाणी गळते. इन्फ्लुएन्झा. तृणज्वर. हट्टी जुनाट सर्दी.

**चेहरा** :- लालबुंद, कढत वाटतो. ओठ कढत, भाजल्याप्रमाणे आग होते.

**तोंड** :- पडजिभेच्या भागाला कंड सुटते. जीभ भाजल्यासारखी वाटते. चव गोड.

**घसा** :- दुखतो प्रथम डावी बाजू नंतर उजवी बाजू; नुसता गुटका गिळताना जास्त त्रास होतो, गरम पेयाने बरे वाटते. घशात गोळा, घास अडकला आहे असे वाटते किंवा दोरा, कातडे लोंबत आहे असे वाटते, त्यामुळे एकसारखे गिळावेसे वाटते. घसेदुखीमुळे जीभ बाहेर काढता येत नाही. सर्दीनंतर टानसिल सुजतात.

**जठर** :- अतिशय खा खा सुटते. तहान लागत नाही. पोटात मधून मधून वेदना होऊन कोरडा खोकला येतो व श्वासोच्छ्वास करताना त्रास होतो. कढत पदार्थ, गोड पदार्थ, दूध घेण्याची वासना होते. पहिला घास घेईतोपर्यंत खावेसे वाटत नाही पण नंतर जेवण चांगले जाते, विशेषतः गरोदरपणी. आत गार किंवा पोकळ झाल्यासारखे वाटते. मांस, आंबट पदार्थ, काफी लसुण यांचा किंवा कोणत्याही अन्नाचा तिटकारा.

**उदर** :- आतड्यात गाठी बसल्या आहेत असे वाटते. शौचास होताना आग होते. शौचास फेसाळ, पिंगट पातळ होते व ते पाण्यावर तरंगते. **गुदद्वारात कंड सुटते. मुंग्या आल्यासारखे वाटते,** ही लक्षणे व कानात नाकातील गुदगुल्या आलटुन पालटुन होतात. कृमि, आतड्यात गोळा किंवा दोरा जलद फिरत आहे असे वाटते.

**स्त्रीजननेंद्रिये** :- विटाळ थांबतो व पुन्हा सुरू होतो, कधी कमी जातो कधी जास्त जातो. जंतामुळे आलेला कामोन्माद.

**श्वसनेंद्रिये** :- जोराची खोकल्याची मधुन मधुन ढास लागते. खोकला आतल्या आत येतो. राग आला तर खोकला येतो. आंगाला, नाकात, गुदद्वारात, कंड सुटून दमा लागतो. छातीवर लाल ठिपके पडतात. प्लुरिशी, शरीर निर्जीव वाटते.

**हातपाय** :- हात वर उडतात. पायाच्या बोटाखाली भेगा पडतात. नखे जाड शिंगाप्रमाणे व वेडीवाकडी होतात.

**त्वचा** :– कंड सुटते, गुदद्वारात व त्यावेळेस दम लागतो. कमावलेल्या कातड्या-प्रमाणे कोरडी.

**झोप** – ध्यान करताना, विचार करताना, वाचताना झोप येते.

**ज्वर** :– अनेक लक्षणांबरोबर हुडहुडी भरते. थंडी वाजल्यानंतर तहान लागते. थंडी वाजताना डोळ्यातून पाणी येते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– थंडी.** गार; वारे, पेये. *नियमित वेळी*; दर आठवड्याला, दोन व चार आठवड्यानी, **ठरलेल्या तासाला.** अमावास्या. पौर्णिमा. अंगावरची उगवण ( विस्फोटक ज्वरात ) चांगली न आल्याने.

**क मा :– मोकळी हवा. उष्णता.** खाण्याने, गिळताना.

**सहाय्यक औषधे** :– सेपि.

**संबंधी औषधे** :– अर्टिका; आर्से; पल्स.

---

## ३१०. साबाल Sabala Serrulata

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **मूत्रग्रंथी; रजःपिंड;** स्तन **मूत्राशय;** मूत्रमार्ग व श्लेष्मल त्वचा यावर होतो. मूत्रमार्गात तीव्र **नांगी मारल्याप्रमाणे वेदना होतात. शारीरिक थकवा.** या औषधाने शरीराचे पोषण होऊन शक्ती वाढते. स्त्रिया व वृद्ध पुरुष यांचे विकार. वैषयिक वासना नष्ट झाल्या-मुळे आलेला चिडखोरपणा. मूत्रग्रंथी वाढल्यामुळे लघवी अडते यावर हे औषध चांगले उपयोगी पडते. (मात्रा ३० थेंब टिंकरचे दिवसातून ३।४ वेळा)

**मानसिक** :– आळस. सहानुभूति दाखविली तर राग येतो. झोपण्याची भीती वाटते. बेपर्वा स्वतःच्या दुखण्याचा किंवा लक्षणांचा विचार करीत राहणे.

**डोके** :– अशक्त इसमांची डोकेदुखी. नाकातून वर वेदना जाऊन कपाळाच्या मध्य-भागी स्थिर होतात. डोके दुखताना घेरी येते. डोक्यात इकडे तिकडे एका-एकी कळा मारतात व जातात.

**डोळे** :– मूत्रग्रंथीच्या विकाराबरोबर डोळे येतात.

**कान** :– आवाज फार दुरून येत आहेत असे वाटते. कमी ऐकू येते.

**जठर** :– आम्लपित्त; ढेकरा येतात. दुधाची नावड असूनसुद्धा तेच सारखे हवेसे वाटते. उदरातील वेदना मांड्यापर्यंत जातात, दूरवर पसरतात व शेवटी रजःपिंडात स्थिर होतात.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थोडी थोडी व कष्टाने होते. रात्री वारंवार लघवीला जावे लागते. लघवी न कळत होते. लघवीत चुन्याप्रमाणे गाळ साचतो. मूत्राशयात जडपणा वाटून ठणका लागून गारवा वाटतो व तो जननेंद्रियापर्यंत जाणवतो. मूत्रमार्गात चुणचुण आग होते.

**पुरुषजननेंद्रिये** :– मूत्रग्रंथि मोठी होते–वृद्धपणी. अंड वाळतात, वैषयिक वासना नाहीशी होते, अंड वर उचलले जातात. शिश्नाचे उत्थापन होताना वेदना होतात किंवा संभोगात वीर्यपात होताना दुखते. **जननेंद्रिये गार होतात.** वैषयिक वासना नष्ट झाल्यामुळे चिडखोरपणा येतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– रजःपिंड मोठे होतात, त्याना दाब सहन होत नाही. स्तन वाळतात. किंवा त्यांची वाढ व्हावी तशी होत नाही. स्तन भरल्यासारखे वाटून हुळहुळे होतात गार पाण्याच्या आंघोळीने जास्त. तरुण चिडखोर स्त्रिया. अनैसर्गिक संभोगाची इच्छा होते. योनिद्वार उघडे राहिले आहे असे वाटते. जननेंद्रिये गार.

**श्वसनेंद्रिये** :– खूप कफ पडतो, व त्यावेळी नाकही वाहते, जीर्ण खोकला. छातीत घुरघुर होऊन खोकला येतो, निजल्याने जास्त, सकाळी ६ पर्यंत.

**पाठ** :– संभोगानंतर दुखते. माकडहाडात विटाळ सुरू होण्याचा अगोदर दुखते.

**झोप** :– झोपेची भीती वाटते, काही तरी घडेल असे वाटते व झोपेची गुंगी येताच भीती वाटून दचकून जागे होणे.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– थंड, दमट, आभाळ भरलेली हवा. सहानुभूति दाखविल्याने. पाळीच्या अगोदर.

**ब वा** :– झोपेनंतर

**संबंधी औषधे** :– सिलि; सेपि.

---

## ३११. साबिना Sabina

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *गर्भाशय*; गुद; **लहान सांधे** व टाचा यावर होतो. पुष्ट, अंग कढत असणाऱ्या व सांधे धरण्याची प्रवृत्ति असणाऱ्या स्त्रिया. **रक्तस्राव होण्याची प्रवृत्ति**–नाकातून, लघवीतून वगैरे. जोराने ठुसठुसणे. भरल्यासारखे वाटणे. सूज लाल, चकचकीत. सांध्यावर आलेल्या गाठींचा तीव्र शोथ. वाखा होण्याची प्रवृत्ति विशेषतः तिसऱ्या

महिन्यात. रक्तस्राव गाठ्याळ व पातळ. मांसाकुर व चामखिळी अंगावर येतात.

मानसिक :- संगीत-गाणे सहन होत नाही त्यामुळे घाबरटपणा येतो. उदास, खिन्न.

डोके :- घेऱ्या-विटाळ बंद झाल्यामुळे उद्भवलेल्या. एकदम फुटल्याप्रमाणे डोके दुखावयास लागते व हळूहळू थांबते, असे वारंवार होते.

तोंड :- चावताना दात दुखतात. जबड्याच्या स्नायूना ओढल्याप्रमाणे वेदना लागतात. चव कडू.

जठर :- लेमोलेड पिण्याची वासना. छातीत जळजळते. पोटाची खळी ते मागे पाठीपर्यंत तीव्र कळा लागतात.

उदर :- सुटलेले. आत काही तरी जिवंत फिरत आहे अशा तऱ्हेची थरथर होते. मूळव्याध व हातापायातील वेदना आलटून पालटून. मूळव्याधीतून लालभडक खूप रक्त जाते, व त्यावेळेस माकडहाडातून पुढे वेदना येतात.

मूत्रेंद्रिये :- मूत्रपिंडाच्या जागी ठुसठुसते व आग होते. लघवीला लागलीशी वाटून लघवीतून रक्त जाते.

पुरुषजननेंद्रिये :- कंड सुटून उत्तेजित होतात. मांसांकुरांची वाढ. आग होऊन हुळहुळे. परमा.

स्त्रीजननेंद्रिये :- *कंबरेपासून पुढे जननेंद्रियावरील हाडापर्यंत कळा येतात* किंवा उलट दिशेने जातात किंवा योनीतून वर कळा जातात. गर्भाशयातून कढत पाण्यासारखे व मधुन मधून गाठी ( काळ्या ) असलेले रक्त जोराने वाहते, हालचाल केल्याने जास्त, व त्यावेळेस सांधे दुखतात. दोन पाळ्यामध्ये विटाळ जातो, व वैषयिक वासना होते. धुपणी दुर्गंधी करवडणारी. गरोदरपणी कंड सुटते. स्तनाग्राना मुंग्या आल्यासारखे वाटते. जननेंद्रियाना कंड सुटून वैषयिक वासना उत्तेजित होते. वाख्वा झाल्यानंतरचा रक्तस्राव. वाख्यानंतर गर्भाशयाला व रजःपिंडाना आलेली सूज. मूढगर्भ किंवा आत राहिलेली वार बाहेर काढण्यास या औषधाचा उपयोग होतो.

हातपाय :- मांड्याच्या पुढील भागात मार लागल्याप्रमाणे दुखते. टाचातून व पावलांच्या हाडामधून तीव्र कळा येतात. वातरक्त, उजव्या पायाचा आंगठा सुजतो. सूज लाल चकचकीत.

**त्वचा** :– अंगावर दुर्गंधी, ओलसर आग व कंड करणारे मासांकुर– चामखिळी उगवतात.

**ज्वर** :– असह्य आग, सर्वांगाची; व अतिशय अस्वस्थपणा.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– रात्री. *उष्णता*– अंथरुणाची, खोलीची, श्रमामुळे आलेली. गरोदरपणी. विटाळ थांबण्याच्या वयांत. धुक्याची हवा. हातपाय लोंबकळत ठेविल्याने. वाकल्याने. दीर्घ श्वास घेतल्याने. संगीत.

**ब वा** :– थंडी. गार मोकळी हवा. नाकातून हवा बाहेर सोडल्याने.

**सहाय्यक औषधे** :– थूजा.

**संबंधी औषधे** :– आर्से; पल्स.

---

## ३१२. सार्सापरिला Sarsaparilla

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **मूत्र जननेंद्रिये**; त्वचा व उजवी बाजू यांवर होतो. **शरीर. वाळलेले, सुरकुतलेले, म्हाताऱ्याप्रमाणे व नाजूक.** लहान मुलांचे वाळणे, पोट मोठे. खडे ( मूत ) होण्याची प्रवृत्ति. **अंगावर उगवण येऊन कंड सुटते**, भाग एकमेकाशी रुतून पिळल्याप्रमाणे वाटतात. हाडात रात्री वेदना होतात. संधिवात. **वातरक्तात सांध्यावर आलेल्या गाठी अतिशय हुळहुळ्या होतात**. परम्याचे दुष्परिमाण. उन्हाळयात किंवा देवी टोचल्यामुळे अंगावर आलेली उगवण, गळवे, इसब, वगैरे. वेदना वेगवेगळ्या जागातून जाणवतात, व त्यामुळे खिन्नता येऊन काळजी वाटते. **जखमेवर मीठ टाकल्यासारखे** वाटते.

**मानसिक** :– खिन्नता. **बोलावेसे वाटत नाही.** त्वरित राग येतो. खाल्लेल्या अन्नाचा विचार केला तर **मळमळावयास लागते.**

**डोके** :– दुखत असताना खिन्नता येते. डोक्याचा मागील भाग ते डोक्यापर्यंत किंवा नाकाच्या बुंध्यापर्यंत वेदना होतात व नाकाचा बुंधा सुजतो. बोलताना डोक्यात घंटेची किणकिण होत आहे असे वाटते. डोक्याभोवती घट्ट पट्टा आवळल्याप्रमाणे वाटते, टोपी काढली तरी बरे वाटत नाही.

**डोळे** :– वीर्यपातानंतर डोळयापुढे धुके आल्यासारखे वाटते.

**कान** :– शब्दांचे प्रतिध्वनि कानात उमटून नाकाच्या बुंध्यापर्यंत येतात.

**नाक** :– चोंदलेले वर्षानुवर्ष. बुंध्याची सूज.

**चेहरा** :- चेहऱ्यावर व ओठावर पुटकुळ्या येतात.

**तोंड** :- येते, लाल गळते. तोंडाला घाण येते.

**उदर** :- वात धरून गुरगुरते. उदरातील वेदना व पाठीतील वेदना एकाच वेळी सुरू होतात. लहान मुलांचे कालऱ्याप्रमाणे जुलाब. शौचात वाळू पडते. उपाशी राहिल्याप्रमाणे, पोटात गळून गेल्याप्रमाणे.

**मूत्रेंद्रिये** :- **लघवी होताना वेदना होतात त्यामुळे ओरडणे भाग पडते.** लघवी संपताना अतिशय कळा येतात. बसलेले असताना लघवी गळते, दिवसा उभे राहिल्याने लघवी बरी होते व त्रास कमी होतो, पण रात्रीला त्रास होत नाही. विटाळशी होण्याचे अगोदर लघवी होताना कळा येतात. लघवी संपताना रक्ताचे थेंब पडतात किंवा पांढरे करवडणारे द्रव्य येते. मूल लघवी होण्याचे अगोदर व होताना किंचाळते. लघवीतून बारीक वाळू ( पांढरी किंवा पिवळी ) जाते. लघवीतून वारा जातो. मूत्रपिंडा ( उजवे ) पासून खालपर्यंत कळा लागतात. **लघवीत खपल्या बसल्याप्रमाणे गाळ साचतो.**

**पुरुषजननेंद्रिये** – दुर्गंधी, ओलसर. वीर्यातून रक्त पडते. वीर्यनलिका, वीर्यपातानंतर दुखते, वैषयिक क्षोभामुळे सुजते.

**स्त्रीजननेंद्रिये** :- विटाळशी होण्याचे अगोदर कपाळांवर ओलसर उगवण येऊन कंड सुटते, उजऱ्या जांघेत विटाळशी होण्याचे अगोदर ओलसर पुटकुळया येतात. स्तनाग्रे आत जातात. किंवा त्याना भेगा पडतात. स्तनाग्रे लहान व सुरकुतलेली. विटाळ उशिरा व थोडा जातो.

**पाठ** :- आतड्यात वेदना होताना पाठ दुखते.

**हातपाय** :- हातापायाच्या बोटाना **खोल भेगा** पडतात विशेषतः बाजूला. नखाखाली कापल्याप्रमाणे वेदना होतात. हातांच्या बोटांच्या टोकावर व्रण पडतात. पंजे व पावले कापतात. उजव्या पायाचे कोणतेही विकार.

**त्वचा** :- सुरकुतलेली, तिच्या घड्या पडतात, कोरडी, विसविशित. अंगावर बारीक लाल चट्टे पडतात. त्वचेवर भेगा पडतात– पंजे पावलावरती वगैरे. त्वचाटणक. मानेभोवती सुरकुत्या पडतात. लहान सहान जागी खपल्या बसून कंड सुटते. तांब्याच्या रंगाचे पुरळ.

**झोप** :- जांभया येतात. कोणत्याही विकारात जांभया येतात.

**ज्वर** :- मूत्राशयात थंडी वाजल्यासारखी वाटून ती पाठीत शिरते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– लघवी संपताना.** वसंत ऋतु. दमट थंडी. पारा. रात्री. जांभई देताना. विटाळशी होण्याचे अगोदर. हालचाल.

**ब वा :–**.छाती व मान उघडी केल्याने. उभे राहिल्याने.

**सहाय्यक औषधे :–** मर्क्यु; सेपि.

**संबंधी औषधे :–** कॅल्क-का; पेट्रो.

---

## ३१३. सालिडेगो Solidago

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम ***मूत्रपिंड***, पचनेंद्रिये; पाय व रक्त यावर होतो. अशक्तपणा. वारंवार सर्दी होण्याची प्रवृत्ति. रक्तस्राव. मूत्रपिंडाचे कार्य नीट होत नाही. जीर्ण मूत्रपिंडाचा शोथ. लघवी बंद झाल्यामुळे उद्भवलेला दमा. कुजणे–मधुमेहामुळे.

**डोळे :–** मूत्रग्रंथी वाढली असताना डोळे लाल होतात.

**नाक :–** मधुन मधुन खूप शिंका येतात व नाकातून खूप शेंबुड पडतो.

**तोंड :–** एकसारखी कडू चव विशेषतः रात्री.

**उदर :–** भरपूर नकळत आव पडते.

**मूत्रेंद्रिये :–** लघवी कष्टाने होते. **लघवी काळी, थोडी** किंवा स्वच्छ व अतिशय दुर्गंधी. ***मूत्रपिंडाच्या जागी* दाब सहन होत नाही, ते हुळहुळे होतात.** मूत्रपिंडाचा शोथ. मूत्राशयाचा शोथ. मूत्रग्रंथीचा शोथ, मोठी होते. **मूत्रपिंडांना ठणका लागतो** ते ताणल्यासारखे वाटतात. लघवीत श्लेष्मा, रक्त व अल्बुमिन जाते.

**श्वसनेंद्रिये :–** खोकला, खूप पुवळलेला कफ पडतो, कफातून रक्ताचे धागे जातात. छाती कोंडल्यासारखी वाटते. एकसारखा दमा-रात्री लघवीला कष्टाने होते.

**स्त्रीजननेंद्रिये :–** गर्भाशयाची गुल्मे, गर्भाशय मोठे होते व त्याचा दाब मूत्राशयावर पडतो.

**पाठ :–** कंबरेत ठणका लागतो व त्यामुळे सर्व शरीर आजाऱ्यासारखे वाटते.

**पाय :– पायावर लाल चट्टे पडतात.** पायाना जल्युक्त सूज येते–नाळगुद.

**त्वचा :–** इसब, लघवी बंद झाल्यामुळे उद्भवलेला. मधुमेहात कुजते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** दाबल्याने.

**ब वा :–** खूप लघवी झाल्याने.

---

## ३१४. सिआनोथस Ceanothus

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम पांथरीवर होतो. नियमित वेळी वेदना होतात. यकृत व पांथरी वाढलेले पंडुरोगी इसम. जीर्ण खोकला; खूप कफ पडतो. डाव्या कुशीत वेदना होतात व त्या होताना दमा लागतो, जुलाब होतात किंवा धुपणी जाते. पांथरीचा शोथ. पांथरी खूप मोठी होते. विटाळ खूप जातो. धुपणी पिवळी व ती गेल्याने थकवा वाटतो. लघवी हिरवी, फेसाळ. लघवीतून पित्त व साखर जाते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** थंड हवा. डाव्या कुशीवर निजल्याने. हालचाल.

**सहाय्यक औषधे :–** नेट्र–मूर.

**संबंधी औषधे :–** सिंको.

---

## ३१५. सिकुटा Cicuta Virosa

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम मेंदू ; *मज्जातंतू* व त्वचा यावर होतो. **जोराने आचके येतात त्यानंतर दीर्घकाळ बेशुद्धावस्था येते. धक्के बसतात,** डोक्याला. हाताना व बोटाना झटके बसतात. एकाएकी शरीरात किंवा डोक्याला धक्के बसून **शरीर ताठते** किंवा किंचाळणे. **भयंकर तऱ्हेचे आचके वरून खाली बसतात; डोळचाना धक्के बसून ते वटारले जातात,** ***पाठीची कमान होते*** **व चेहरा भयंकर वेडावाकडा** होतो, तोंडातून रक्ती फेस येतो व त्यानंतर पूर्ण **निःशक्तपणा येतो. घशाला आचके बसतात.** स्नायू ताठतात. दातखिळी बसते. फेफरे. मोहनिद्रा. काय घडले ते आठवत नाही, कोणाला ओळखता येत नाही, पण विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे नीट देता येतात. धनुर्वात. थांबलेले आंचके स्पर्शाने, आवाजाने मोठ्यानी बोलणे ऐकल्याने सुरू होतात. हजामत, दाढी केल्यानंतर उद्भवलेले विकार.

**मानसिक :–** वात–गाणे, नाचणे, ओरडणे, विचित्र हातवारे करणे. प्रत्येक वस्तु विचित्र व भयप्रद वाटते. वर्तमानकाळी घडलेल्या गोष्टी पूर्वी घडल्या असे वाटते. पोरकट चाळे, मुलांसारखे वागणे. संशयी. अविश्वासू. कण्हणे, कुरकुरणे, बेफाट वागणूक. दुःखदायक गोष्टीचा मनावर अतिशय परिणाम होतो. अविश्वास वाटून लोकाना टाळावेसे वाटते. दुसऱ्याना तुच्छ मानणे. अनोळखी जागेत आहोत असे वाटते. दुसऱ्याना सुखात पाहिल्याने उदास

वाटते. अस्थिरता वाटते. आचक्यात किंवा आचके नसताना जमिनीवर पडून लोळणे. आपण फार महत्वाचे इसम आहोत असे वाटणे. कित्येक तास किंवा दिवस विस्मृति.

**डोके** :- डोक्यात रक्ताधिक्य होऊन ओकावयास होते व जुलाब होतात. डोकेदुखी वात सरकल्याने कमी होते किंवा त्यासंबंधी विचार केल्याने कमी होते. डोके एका बाजूस वळलेले. घेरी येताना पोटात वेदना होऊन स्नायूंना आचके बसतात. मेनिन्जायटिस. घेरी येताना वस्तु एकाबाजूपासून दुसऱ्या बाजूस सरकत आहेत असे वाटते किंवा जवळ येऊन लांब जात आहेत असे वाटते.

**डोळे** :- वाचताना अक्षरे नाहीशी होतात. बाहुल्या रुंद होतात. तिरळेपणा, मधुन मधुन उत्पन्न होणारा किंवा डोक्याला मार लागल्यामुळे झालेला. डोके खाली करून एखाद्या वस्तूकडे एकटक पाहणे. वस्तु एकाच्या दोन व काळ्या दिसतात. हिमाकडे पाहिल्याने झालेले दुष्परिणाम. डोळ्याना धक्के बसतात व ते वटारले जातात. आचके येताना बाहुल्या बारीक होतात; मेंदूला धक्का बसल्याने त्या रुंद होतात.

**कान** :- आवाज एकदम दुमदुमतात विशेषतः गिळताना. कानातून रक्त येते, मेंदुला मार लागल्यामुळे.

**नाक** :- जरा धक्का लागला तर नाकातून रक्त येते. सर्दी नसताना वारंवार शिंका येतात.

**चेहरा** :- लाल होऊन घाम येतो. दातखिळी बसते. हास्यास्पद किंवा भयंकर वेडावाकडा होतो. फोड येऊन त्याच्या दाट खपल्या बसतात.

**तोंड** :- दात खाणे. तोंडाला फेस येतो. जीभ बोलताना, चावताना चावली जाते, जीभ सुजते, बोलणे कष्टाने.

**घसा** :- आचके बसून गिळता येत नाही. तीक्ष्ण पदार्थ टोचून झालेले उपद्रव, आचके.

**जठर** :- चुना, कोळसे व इतर अनेक विचित्र पदार्थ खावेसे वाटतात. **जोराने आवाज होणारी उचकी येते.** छातीतील आचके व उचकी आलटून पालटून. पोटाच्या खळीत ठुसठुसते व ती वर येऊन मुठीप्रमाणे दिसते. खाण्याचें पदार्थ कोणचे व न खाण्याचे पदार्थ कोणचे ते कळत नाही.

**उदर** :– उदरात वेदना होतात आचके येतात, ओकारी होते. वात धरल्यामुळे चिडखोरपणा येतो व काळजी वाटते.

**मूत्रेंद्रिये** :– वृद्धपणी लघवी न कळत होते. लघवीची धार जोराची. मूत्रमार्ग बारीक होतो, परमा किंवा सुजेनंतर.

**पुरुषजननेंद्रिये** :– अंड वर उदरात ओढले जातात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ न आल्यामुळे येणारे आचके.

**श्वसनेंद्रिये** :– छाती दाटल्यासारखी वाटल्यामुळे श्वासोच्छ्वास करताना त्रास होतो. छातीच्या स्नायूंना आचके बसून ते ताठतात. छातीत गार किंवा कढत वाटते.

**हृदय** :– थांबले आहे असे वाटते. सकंप धडधडते.

**पाठ** :– पाठीची कमान होते, डोके मागे वाकते. विटाळसेपणी गुदास्थीत धक्के बसल्याप्रमाणे वेदना होतात.

**हातपाय** :– ताठलेले वाकविता येत नाहीत व वाकलेले ताठ करता येत नाहीत. आचके येताना पाबले आतल्या बाजूस वळतात किंवा बोटे वर वळतात. हाताची बोटे उडतात, कंप. डाव्या हातास दिवसभर धक्के बसतात. डावा पाय कापतो. चालताना पाऊले आतल्या बाजूस वाकतात. चालताना पाऊल अर्धवर्तुळाकार फिरविणे.

**त्वचा** :– पुवळलेले फोड एके ठिकाणी जमून त्यावर **जाड, पिवळचा** ( मधाच्या रंगाच्या ) मोठाल्या खपल्या बसतात विशेषतः चेहऱ्यावर व डोक्यावर. इसब-कंड येत नाही. वस्तरा लागून झालेले त्वग्रोग.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***दुखापती–मेंदूला***, धक्का. धक्का. आवाज. स्पर्श. थंडी. दात येताना. अंगावरची उगवण बाह्योपचाराने बरी केल्याने. तंबाखूचा धूर. डोके वळविताना.

**ब वा** :– वेदनांचा विचार केल्याने.

**संबंधी औषधे** :– कुप्रम; स्ट्रिक्नि.

---

## ३१६. सिकेल Secale Cornutum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***रक्तवाहिन्या***; ***गर्भाशय***; **रक्त**; मज्जातंतु; मज्जारज्जू व हातपाय यावर होतो. शरीर मळकट व वाळलेले.

**रक्तस्राव होण्याची प्रवृत्ति,** रक्त पातळ पाण्यासारखे, दुर्गंधी, एकसारखे थोडे थोडे वाहते. एखाद्या भागात **बधिरपणा येतो, असह्य मिरमिरल्या-सारखे वाटते, मुंग्या येतात, कंप येतो,** कुरतडल्यासारखे वाटते किंवा **पेटके येतात,** व तो भाग ताठतो. ही लक्षणे चेहऱ्यात, पाठीत, हातापायाना, हाताच्या बोटाच्या टोकातून सुरू होतात किंवा वेदनानंतर सुरू होतात. विस्तवाने भाजल्याप्रमाणे इकडे तिकडे आग होते. किंवा सर्वांगात आग होते किंवा ठिणग्या पडल्याप्रमाणे वाटते. **स्राव पातळ, दुर्गंधी त्याने थकवा येतो.** कुजणे. त्वचेखाली रक्ताचे ठिपके पडतात. शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात. स्राव **काळे, दुर्गंधी, पातळ व थकवा आणणारे.** बारीक रक्तवाहिन्यांचे आकुंचन झाल्यामुळे शरीराच्या कोणत्याही भागाला रक्ताचा पुरवठा होत नाही त्यामुळे तो भाग गार पडतो. आचके येऊन शरीर ताठते, पण शुद्धि असते. अतिशय तहान लागते, खा खा सुटते तरीपण शरीर वाळते. लुला पडलेला भाग जलद वाळावयास लागतो. हालचाल करता येत नाही. अंग गार पडते परंतु पांघरूण घ्यावेसे वाटत नाही. मखमलीवरून चालत आहोत असे वाटते. आचके बसल्याप्रमाणे धक्के बसतात; लुल्या पडलेल्या भागात. शिरा फुगल्यामुळे होणाऱ्या वेदना. कोणत्याही भागात निर्जीवपणा वाटतो. शरीराचा भाग कुजतो, दुखापतीमुळे, मोहरीच्या लेपामुळे किंवा जळवा लावल्यामुळे. पंगुवात, अर्धांगवात, एकच हात किंवा पाय लुला पडतो, लुला पडलेला भाग बधिर होतो, मुंग्या येतात, चुणचुणते. लहान सहान जखमातून सारखे रक्त वाहते. आग, उष्णतेने कमी होते. चिडखोर, लठ्ठ इसम, किंवा किडकिडित, बारीक, वाळलेल्या स्त्रिया.

**मानसिक :–** थकवा विशेषतः आचके येऊन गेल्यानंतर. **भीती वाटते** व त्यामुळे खिन्नता येते. **वेड लागल्याप्रमाणे** भेदरणे. चावावेसे वाटते किंवा बुडून जीव द्यावासा वाटतो. बाळंतपणानंतरचे वेड, नागवे होणे जननेंद्रिये ओरबाडणे, योनीत बोटे घालून रक्त येईतो ओरबाडणे. निर्लज्जपणा.

**डोके :–** मागे वाकलेले. केस गळून पडतात. जड किंवा हलके वाटून पायात मिरमिरते.

**डोळे :–** डोळ्यापुढे ठिणग्या चमकतात. डोळे खोल गेलेले व त्यांच्याभोवती काळी वर्तुळे. मोतीबिंदु विशेषतः वृद्ध स्त्रियांचा. कोळशाच्या गॅसमुळे लुली पडलेली वरची पापणी.

**नाक** – एकसारखे काळे रक्त पाझरते, अतिशय थकवा येतो, वृद्धपणी, तरुण स्त्रिया किंवा दारुडे.

**कान** :– कॉलरा झाल्यानंतर आलेला बहिरेपणा.

**चेहरा** :– फिकट, खोल गेलेला व चिमटल्यासारखा. आचके येऊन वेडावाकडा होतो, भयप्रद दिसतो. चेहऱ्यात पेटके सुरू होऊन सर्व शरीरात पसरतात.

**तोंड** :– जीभ कोरडी, भेगा पडलेली, आतून शाईप्रमाणे काळे रक्त येते. जिभेचे टोक दाटल्यासारखे होऊन मिरमिरल्यासारखे वाटते. दातखिळी बसते.

**घसा** :– वेदना होऊन मिरमिरते, आग होते.

**जठर** :– अनैसर्गिक अतिशय खा खा सुटते. **तहान लागते.** आंबट पदार्थ घ्यावेसे वाटतात. उचकी. मळमळ. ओकारी रक्ताची किंवा काफीच्या बुकटीप्रमाणे. कोरड्या ओकाऱ्या येतात. आग होते.

**उदर** :– उदरात व जठरात आग होते. उदर अतिशय फुगते, व घट्ट होते. ओटी-पोटात पोकळ झाल्यासारखे वाटते, किंवा खाली ओढ लागते, त्यामुळे अंग दुमडून निजावे लागते. **उदर उघडे ठेवावेसे वाटते,** त्यावर वस्त्राचा दाब सहन होत नाही. वेदनारहित, जोराचे पाण्यासारखे, हिरवट रंगाचे किंवा रक्ताचे जुलाब होतात व त्यानंतर शक्तिपात होतो, शरीर बर्फासारखे गार होते पण पांघरूण घ्यावेसे वाटत नाही. शौचास नकळत होते. गुदद्वार उघडे राहते.

**मूत्रेंद्रिये** :– रक्ताची लघवी. वृद्धपणी लघवी नकळत होते. लघवी होण्याचे बंद होते. लघवी फिकट, पाण्यासारखी.

**स्त्रीजननेंद्रिये** :– **गर्भाशयातून खाली ओढ लागल्याप्रमाणे वेदना होतात. अंग गार पडते** पण उष्णता सहन होत नाही. कष्टार्तव. एका पाळीपासून दुसऱ्या पाळीपर्यंत एकसारखे पातळ दुर्गंधी, रक्त पाझरते. धुपणी पिंगट दुर्गंधी एकसारखी जाते. वाखा होण्याची सवय विशेषतः तिसऱ्या महिन्यात. बाळंतपणात गर्भाशय शिथिल होते, वेणा याव्या त्याप्रमाणे येत नाहीत. जननेंद्रिये कुजतात. गर्भाशयाचा शोथ. वार आत राहून ती कुजते. बाळंत-ज्वर. उदर फुगते दुर्गंधी स्राव जातात, शरीर गार पडते, लघवी बंद होते. बाळंतपणानंतरचा विटाळ हिरवा. दूध येत नाही. स्तन दुधाने भरावे तसे भरत नाहीत.

**श्वसनेंद्रिये** :– छातीत आग होते.

**पाठ** :– कणा दाबला तर छातीतून वेदना येतात. पाठ बधिर होते किंवा मुंग्या येतात, व त्या हातापायाच्या बोटापर्यंत पसरतात.

**हातपाय** :– गार. हातापायांची बोटे निळसर. **पंज्याना, पायाना व पावलाना पेटके येतात. हातांची बोटें पसरलेली**, मागे वाकलेली किंवा मुठीत आवळलेली, पाण्यात भिजल्याप्रमाणे दिसतात. अतिशय तंबाखू ओढणाऱ्या इसमांचे पंजे व पावले गार व कोरडी पडतात व हातांच्या बोटाना बुरा आल्यासारखा वाटतो. चालताना हातपाय कापतात, झोकांडे जातात.

**त्वचा** :– गळवे येतात त्यातून हिरवा पू येतो. भाजल्यासारखे रक्ती फोड. त्वचा **गार, कोरडी**, सुरकुतलेली, किंवा **निळसर** विशेषतः विकार झालेल्या जागी. व्रण लवकर न बरे होणारे, दुर्गंधी. त्वचेला कंप येतो, थरथरते. लहान सहान जखमेतून रक्त वाहण्याचे थांबत नाही. त्वचेखाली मुंग्या आल्यासारख्या वाटतात. नुकत्याच उपजलेल्या मुलांच्या अंगावर सूज येते.

**ज्वर** :– ***बाह्यांग बर्फासारखे गार पण आतून भाजल्यासारखी आग, पांघरूण नकोसे वाटते विशेषतः उदरावर***. ठिणग्या पडून भाजल्यासारखे वाटते. धावरे. गार दुर्गंधी घाम येतो त्याने जोडे खराब होतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***उष्णता***. विटाळसेपणी, किंवा विटाळ सुरू होताना. गरोदरपणी. शरीरातील द्रव्ये गेल्याने. ***पांघरूण***. स्पर्श. खाण्याने.

**ब वा** :– **गारवा, गार पाण्याची आंघोळ**. उघडे झाल्याने. झोके घेतल्याने. **हातपाय ताठ केल्याने** विशेषतः दुसऱ्याने. ओकारीनंतर अंग दुमडून निजल्याने.

**सहाय्यक औषधे** :– आर्से; थूजा.

**संबंधी औषधे** :– पल्स; मर्क्यु; सिंको.

---

## ३१७. सिक्लामेन Cyclamen

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **दृष्टी**; रक्त; पचनेंद्रिये व ***स्त्रीजननेंद्रिये*** यावर होतो. आळस; झोप येते व खिन्नता वाटते. ***दृष्टीचे उपद्रव*** किंवा घेरी– विटाळसेपणाच्या विकारात किंवा जठराच्या विकारात उद्भवतात. पंडुरोग. मोकळ्या हवेची भीती वाटते. शारीरिक श्रमाचा कंटाळा व लवकर

थकवा येतो. ज्या हाडावर फक्त कातडीचे आवरण आहे अशा हाडांत दाबल्यासारख्या वेदना होतात. खुपल्यासारखे वाटते.

**मानसिक** :- मंद, उदास, खिन्न. स्वतःलाच दूषण देणे. एकांतात शांतपणे रडणे. खोली अतिशय लहान आहे असे वाटते. ( नेट्र–का; बॅबे ) चिडखोरपणा व आनंदीपणा आलटुन पालटून. आपण स्वतः कर्तव्य बजाविले नाही किंवा काहीतरी दुष्कृत्य केले आहे असे वाटून खिन्नता वाटते. आपल्या जवळ अंथरुणात दोन माणसे निजली आहेत असा भास होतो. काल्पनिक, दुःखावर विचार करून रडणे, आपण एकटेच आहोत व आपला छळ चालला आहे असे वाटते.

**डोके** :- मेंदू कपड्याने गुंडाळल्यासारखा वाटतो. **डाव्या कानशिलात दुखते.** अर्धशिशी दीर्घकाळ टिकणारी. घेरी–वस्तु फिकट आहेत असे वाटते, वस्तु वर्तुळाकार फिरत आहेत असे वाटते. खोलीत बरे वाटते, मोकळ्या हवेत जास्त होते.

**डोळे** :- तिरळेपणा, डोके दुखताना, पाळीच्या विकारांत किंवा आंचक्यानंतर. डोळ्यापुढे **फडफडल्यासारखे वाटते, अनेक रंग तरंगतात किंवा काळोखी** येते. दृष्टिमांद्य, डोके दुखताना. तारे दिसतात. वस्तु अर्ध्या दिसतात किंवा एकाच्या दोन दिसतात. असंख्य तारे दिसतात.

**कान** :- मळ वाढून कंड सुटते.

**नाक** :- कानात कंड सुटून शिंका येतात. वास कळत नाही.

**चेहरा** :- फिकट, रक्तहीन.

**तोंड** :- चव खारट किंवा अजिबात लागत नाही. पदार्थ वाजवीपेक्षा जास्त खारट लागतात, किंवा सर्व पदार्थ खारट लागतात.

**जठर** :- उचकी लागल्याप्रमाणे ढेकरा येतात. **उचकी** लागते विशेषतः गरोदरपणी. उचकी येताना जांभया येतात. घशात मळमळते. लेमोनेड पिण्याची वासना. खाण्याने लवकर तृप्ति होते. एक दोन घास खाल्ले की अन्नाचा तिटकारा येतो व मळमळते. अतिशय ओकावयास होते ( गरोदरपणी ). डुकराचे मांस सोसत नाही.

**उदर** :- काफी घेतल्याने जुलाब होतात. गुदद्वाराभोवती व शिवणीत गळू झाल्याप्रमाणे दुखते, चालताना, बसल्याने त्रास होतो. आतड्यात काहीतरी जीव धावत आहे असे वाटते.

**पुरुष जननेंद्रिये** :– बोंडी व वरची कातडी जराशी घर्षणाने हुळहुळी होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ अतिशय जातो, पाळी लवकर. विटाळ काळा, वारंवार बदलणारा, गाठ्याळ किंवा त्यात पांढरे पापुद्रे जातात, पाठीतून पुढे वेणा लागल्याप्रमाणे वेदना होतात. हालचाल केल्याने विटाळ कमी जातो. कष्टार्तव. स्तनाग्रातून वारे वाहत आहेत असे वाटते. विटाळशीपणानंतर स्तन सुजतात व त्यातून दुधासारखी लस येते. कुमारिकांच्या स्तनात किंवा गरोदर नसताना दूध येते. नष्टार्तव

**श्वसनेंद्रिये** :– जागे न होता झोंपेतच खोकणे विशेषतः मुलांचे.

**हातपाय** :– ज्या हाडावर फक्त त्वचाच आहे अशा जागी वेदना होताना. अशक्त झाल्यासारखे. वाटतात विशेषतः गुडघे. टाचात आग होते, हुळहुळ्या होतात. आंगठा व तर्जनी याना पेटके आल्यासारखे वाटून ती हळुहळु वाकडी होतात व त्याना जोराने ताठ करावे लागते.

**त्वचा** :– तरुण स्त्रियांच्या यौवनपीटिका. खाजविण्याने किंवा विटाळसेपणी कंड कमी होते.

**ज्वर** :– सर्वांगाला थंडी वाजते. पांघरूण घेतल्याने बरे वाटत नाही. दुर्गंधी घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– गारठा. संध्याकाळी. मोकळी हवा. बसण्याने. उभे राहिल्याने. गार पाणी. तेलतूप.

**ब बा** :– विटाळ जाताना. हालचाल केल्याने. चोळण्याने. खोलीत. लेमोनेड घेतल्याने. रडण्याने.

**संबंधी औषधे** :– पल्स.

---

## ३१८. सिना Cina

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **उदर–पचनेंद्रिये; डोळे;** श्लेष्मल त्वचा व मुले यावर होतो. शरीर मार लागल्याप्रमाणे हुळहुळे, स्पर्श सहन होत नाही व हालचाल करवत नाही. अतिशय खा खा, जसजसे शरीर वाळत जाते तसतशी खा खा जास्त सुटते. शरीर ताठते विशेषतः **खोकताना, रोग्याकडे पाहिले तर, चिडखोरपणामुळे** वगैरे. **कंप, झटके,** आचके – जंतामुळे. एका-बाजूचे उपद्रव. आचके येताना किंचाळणे, हात पाय झाडणे. एकसारखे

झोके घ्यावेसे किंवा हातावर खालीवर करून घ्यावेसे वाटते. मुलांच्या अंगाला आंबुस वास येतो. आंचके येताना मुले हात एका बाजूने दुसऱ्या बाजूस झटकतात. अनेक विकारात जांभया सुरू होतात किंवा जांभयानंतर विकार सुरू होतात. धष्टपुष्ट मुले. वेदनामुळे धक्के बसल्यासारखे वाटतात, रोगी वेदना झाल्याप्रमाणे एकदम उडी मारतो.

**मानसिक :–** ***असहिष्णु*, अशिष्ट, चिडखोर.तिरसट, असंतुष्ट.** अनेक वस्तु हव्याश्या वाटतात पण दिल्या की नकोशा होतात. मुलांना, पाहिलेले, स्पर्श केलेला खपत नाही. मुलांना राग भरले किंवा शिक्षा केली तर त्याना आचके येतात. काही तरी दुष्कृत्य केल्याची अवास्तव जाणीव. सर्व वेळ अस्वस्थ व संत्रस्त. मुलाना कितीही आंजारले. गोंजारले तरी त्याना बरे वाटत नाही.

**डोके :–** केस विंचरलेले सहन होत नाहीत. डोकेदुखी व उदरातील वेदना आलटून पालटून, खाली वाकल्याने कमी होते. डोके दुखत असताना स्त्रियांना केस मोकळे सोडणे भाग पडते. मूल डोके एकसारखे इकडून तिकडे फिरविते. डोके एका बाजूस पडते व झटक्यासारखे मागे वळते.

**डोळे :–** बाहुल्या रुंदावलेल्या. तिरळेपणा, जंतामुळे आलेला. दृष्टीपुढे रंग दिसतात. डोळे शिणतात, चोळण्याने बरे वाटते. पिवळे दिसते. एकसारखे टक लावून पाहिल्याने भुवया थरथरतात. मुष्टिमैथुनामुळे आलेले दृष्टिमांद्य.

**नाक :–** पाळया आत गेलेल्या. ***नाकात एकसारखी बोटे घालावीशी वाटतात. किंवा कुरतडावेसे वाटते***; रक्त येई तोपर्यंत. कशाला तरी घासावेसे वाटते. डांग्या खोकल्यात शिंका येतात.

**चेहरा :– डोळ्याभोवती काळी वर्तुळे. *तोंडाभोवती निळसर पांढरेपणा.* आजाऱ्यासारखा, फिक्कट.** चेहऱ्याचा व पंज्यांचा कंपवात. गाल लालबुंद. चेहेरा आलटुन पालटुन फिकट होऊन गार होतो. किंवा लाल व कढत होतो.

**तोंड :–** ***दात खाणे*** विशेषतः झोपेत. चावण्याची व गिळण्याची क्रिया विशेषतः झोपेत. जीभ स्वच्छ.

**घसा :–** पेये गिळता येत नाहीत, गिळताना आवाज होतो, विशेषतः आचके **येऊन गेल्यानंतर.**

**जठर :– वखवखल्याप्रमाणे भूक लागते. खाण्यानंतर,** ओकारीनंतर भूक लागते, व आंत कुरतुडल्यासारखे वाटते. खाखा व भूक मंद आलटुन पालटून. थंडी वाजण्याचे अगोदर भूक लागते, घाम येऊन गेल्यानंतर भूक लागते.

गोड खाण्याची वासना. अनेक पदार्थ हवेसे वाटतात. खाण्यापिण्यानंतर ओकावयास होते व जुलाब होतात. ओकारीत जीभ स्वच्छ असते.

**उदर** :– टणक व फुगलेले. बेंबीभोवती मुरडा होतो, दाबल्याने बरे वाटते. शौचास पांढरे पाण्यासारखे होते. गुदद्वाराला कंड सुटते. जंत.

**मूत्रेंद्रिये** :– अंथरुणात न कळत लघवीला होते, विशेषतः पौर्णिमा जवळ आली असताना. *लघवी* गढुळ किंवा *दुधासारखी पांढरी असते* किंवा नंतर होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– वयात येण्याच्या अगोदर विटाळ जातो व तो फार जातो. मूल अंगावर पीत नाही.

**श्वसनेंद्रिये** :– गुदमरविणारा खोकला येतो विशेषतः सकाळी. नियमित वेळी खोकल्याची ढास वारंवार लागते. खोकला इतका भयंकर असतो की डोळ्यातून पाणी येते, छातीच्या मध्यभागी वेदना होतात व छातीत काहीतरी सुटून वेगळे झाले आहे असे वाटते. खोकल्यानंतर– आचके येतात, गिळावेसे वाटते व गिळताना घशापासून जठरापर्यंत गुडगुडल्याप्रमाणे आवाज होतो. खोकताना चेहरा फिकट होतो. खोकला येईल या भीतीने मूल बोलत नाही किंवा हालचाल पण करीत नाही.

**हातपाय** :– पाखडणे. हातापायाना झटके, धक्के बसून ते वेडेवाकडे होतात. उजव्या हाताची बोटे एकदम आतल्या बाजूस वळतात. मुलांची पावले आपोआप ताणली जातात. डावे पाऊल एकसारखे हालते. एकदम वेदना झाल्याप्रमाणे उडी मारणे. रात्री आचके येतात.

**झोप** :– अस्वस्थ. मूल झोपेत पोटावर निजते किंवा हातावर व गुडघ्यावर निजते. मुलाना भीतिप्रद स्वप्ने पडतात. झोपेतून **किंचाळत ओरडत** उठतात. जागी झाल्यानंतर घाबरलेली असतात. झोपेत किंचाळणे किंवा बोलणे

**ज्वर** :– तापात चेहरा फिकट होतो, गार होतो, पंजे कढत असतात. कपाळावर, नाकावर व पंज्याना गार घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **स्पर्श. जंत. राग. रोग्याकडे पहिल्याने.** ***झोपेत.*** **पौर्णिमा.** जांभया येताना. उन्हात. उन्हाळयात. एकसारखे टक लावून पाहिल्याने.

**ब बा** :– **पोटावर निजल्याने.** डोळे पुसल्याने. हालचाल केल्याने.

**सहाय्यक औषधे** :– कॅल्क–का; ड्रोसे; सल्फ.

**संबंधी औषधे** :– कामो; नेट्र–फा.

---

## ३१९. सिनापिस (काळी मोहरी) Sinapis Nigra

**सर्वसाधारण** :– कपाळावर व वरच्या ओठावर घाम येतो. नाक कोरडे, कढत. डोळ्यातून पाणी येते व शिंका येतात. डावी नाकपुडी सर्व दिवस चोंदलेली असते. नाकपुड्या आलटून पालटून चोंदतात. तोंडाला घाण येते. कांद्याप्रमाणे कढत, आंबट ढेकरा येतात. जठरापासून घशापर्यंत जळजळते. खाली वाकल्याने उदरात वेदना सुरू होतात, ताठ बसल्याने बरे वाटते. रात्रंदिवस भरपूर लघवीला होते.

---

## ३२०. सिनाबारिस (हिंगुळ) Cinnabaris

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **रक्त; नाकाचा घशातील भाग**; मान व हाडे यावर होतो. उजव्या कुशीवर निजल्याने सर्व काही त्या बाजूस आले आहे असे वाटते.

**डोके** :– डोळ्याच्या आतील कोपऱ्यातून **भुवयावरून डोळ्याभोवती वेदना होतात** किंवा नाकाच्या बुंध्यावर खोगीर ठेवल्यासारखे वाटते. डोळ्या-भोवतालच्या हाडात वेदना होतात.

**नाक** :– बुंध्यावर जड, **दडपल्यासारखे वाटते**, चष्म्याचा दाब सहन होत नाही. नाकातून जळजळीत लस वाहते किंवा काळे गोळे पडतात. स्राव दुर्गंधी करवडणारे. नाकावर घाम येतो.

**तोंड** :– कोरडे पडून झोपेतून जाग येते. पाण्याने खळबळणे भाग पडते.

**घसा** :– चिकट तारेचा शेंबूड घशातून खाकरून काढावा लागतो, किंवा गोळे नाकाच्या मागील भागातून घशात उतरतात. घशात व तोंडात लालबुंद व्रण पडतात.

**उदर** :– पातळ पांढरे जुलाब होतात. मोठा जंत असल्याप्रमाणे गुदात मुंग्या येतात. रक्ती आव.

**पुरुषजननेंद्रिये** :– वृषण व मांड्या यामध्ये करवडणारा दुर्गंधी घाम येतो. बोंडीवरच्या कातडीवर चामखिळी येतात. गरमीचे जुने टणक व्रण.

**स्त्रीजननेंद्रिये** :– धुपणी. योनीत दाबल्यासारखे वाटते.

**हृदय** :– फडफडल्यासारखे होऊन डोक्यात रक्त चढते.

---

**हातपाय :–** कोपरापासून खाली हातात पंज्यासकट वेदना होतात. सांधे गार तंगडीच्या हाडावर टणक आवाळू येतात. चालल्यानंतर पोटऱ्याना पेटके येतात. एकपाय चालताना दुसऱ्यापेक्षा लहान आहे असे वाटते.

**त्वचा :–** अतिशय लालबुंद दिसणारे व्रण. बद. सहजासहजी रक्त येणारे मासांकुर. अंगावर लालबुंद उगवण येते. अतिशय कंड सुटून चुणचुणते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** स्पर्श. उजेड दमटपणा

**ब वा :–** मोकळी हवा. उन्ह.

**सहाय्यक औषधे :–** थूजा.

**संबंधी औषधे :–** मर्क्यु.

---

## ३२१. सिफिलिनम Syphilinum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम **श्लेष्मल त्वचा; मज्जातंतु व हाडे** यावर होतो. **जीवनशक्ती क्षीण होते.** त्यामुळे दिलेल्या योग्य औषधाचा परिणाम होत नाही किंवा टिकत नाही. लक्षणे थोडी पण अशक्तपणा फार. **अनेक प्रकारची लक्षणे होतात.** ***गरमीपासून उद्भवलेले आनुवंशिक किंवा प्रत्यक्ष परिणाम.*** सकाळी उठल्यानंतर **अशक्तपणा वाटतो. व्रण पडतात**- तोंडात, नाकात, जननेंद्रियात, त्वचेवर. डोक्याला टक्कल पडते. ओठ चंबूप्रमाणे व उदर मोठे. बुटकेपणा, शारीरिक व मानसिक. शरीर वाळते. अंगाला दुर्गंधी येते. भयंकर किंवा रेघ मारल्याप्रमाणे वेदना होतात. स्नायूत गाठी होतात. **एकामागून एक गळवे उत्पन्न होतात. पू दुर्गंधी किंवा हिरवा. जीर्ण विकार.** संधिवात. हळुहळु वाढत जाणारा अर्धांगवात. लक्षणे हळुहळु सुरू होऊन हळुहळु कमी होतात. **हाडात करवतीने कापल्याप्रमाणे वेदना होतात.** शरीराच्या दोन्हीबाजूस सारख्याच तऱ्हेचे विकार होतात. हाडावर हाड चढते. खुरटलेली, सुरकुतलेली, म्हाताऱ्यासारखी दिसणारी तान्हीमुले. मुले उपजल्यापासून एकसारखी रडत राहतात. रक्तवाहिन्यातून कढत पाणी वाहात आहे असे वाटते. हाडे हुळहुळी, कुजतात, वाकडी होतात. गाठी मोठ्या होतात.

**मानसिक :– मंडळीत उठण्या बसण्याचा तिटकारा. भयंकर खिन्नता किंवा** निराशा, आपण बरे होणार नाही म्हणून. चिडखोर. वेडे होऊ की काय असे वाटते किंवा शरीर लुले पडणार की काय असे वाटते. **सारखे हात धुवावेसे वाटतात.** स्मरणशक्ती मंद. चेहरे, नाव, जागा, घडलेल्या गोष्टी

आठवत नाहीत. गरमीमुळे आलेला वेडेपणा. रात्री वात होतो. मेंदूची झीज. तान्ही मुले एकसारखी रडतात. अतिशय घाबरट, हंसणे. काही कारण नसताना रडणे, जगापासून आपण फार दूर आहोत असे वाटते; भविष्याविषयी बेपर्वा. रात्रीची भयंकर भीती वाटते आपण स्वतः नसल्यासारखे वाटते.

**डोके** :– **डोक्यात खोल ठेचल्याप्रमाणे वेदना होतात** त्यामुळे डोके भिंतीवर आपटणे. डोक्यात रेघ मारल्याप्रमाणे वेदना होतात. डोके मागे ओढल्याप्रमाणे वाटते. केस भरपूर गळून पडतात. टाळू उडून जात आहे की काय असे वाटते. कवटीच्या कातडीवर बारीक गाठी येतात.

**डोळे** :– येतात, फूल पडते– गार पाण्यानी बरे वाटते. उजेड अजिबात सहन होत नाही, खूप पाणी गळते. डोळ्यापुढे चमका दिसतात. एकावर एक **दोन वस्तू दिसतात. पापण्या खाली पडतात.** डोळ्याला गार वारे लागत आहे असे वाटते. उपजलेल्या मुलांचे डोळे येतात. तिरळेपणा. आंधळेपणा. बुबुळावर ठिपके पडतात.

**कान** :– आतील भागात गळू होते. कानातील पडद्यावर खडे जमतात. बहिरेपणा काहीही कारण नसताना.

**नाक** :– आत श्वास घेताना दुखते विशेषतः भोवतालच्या पोकळीत. पिनस; दाट, दुर्गंधी, हिरवट पिवळा स्राव. **नाक चोंदते** (तान्ह्या मुलाचे). नाकामधील पडदा व हाडे कुजतात. घशातून शेंबडाचे हिरवे गोळे खाकरावे लागतात. नाकावर चट्टा पडतो.

**चेहरा** :– सुरकुतलेला, म्हाताऱ्याप्रमाणे दिसतो. उजव्या डोळ्यावर दुखते, जीभ बाहेर काढल्याने जास्त. एक बाजू लुळी पडते.

**तोंड** :– **दात चिकट झाल्यासारखे वाटतात.** दातात किडा वळवळल्याप्रमाणे वाटते. हिरड्याच्या कडेला दात कुजतात. दात बुटके, टोकाना चंद्रकोरीप्रमाणे खळगी पडते. **तोंडातून रात्रीची झोपेत लाळ गळते.** चव चिळसवाणी. जिभेवर वरून खाली मध्यभागी भेग किंवा भेगा पडतात. व्रण पडतात, चुणचुणतात, आग होते.

**घसा** :– नाकाच्या मागील भागातून घशात हिरवे गोळे उतरतात. घसा दुखतो उजवीकडून डावीकडे, गार पेयाने जास्त. अनुवंशिक गरमी असलेल्या मुलांच्या टानशिल फार मोठ्या होतात.

**जठर** :– भूक छांदिष्टपणाची. **दारू किंवा तत्सम पेये पिण्याची वासना.** खाण्याची वासना नसणे महिना महिना. कोणचेच अन्न मानवत नाही. मांसाचा तिटकारा.

**उदर** :- गुदात व्रण पडतात, भेगा पडतात, मासांकुर येतात, आग होते, ठिकठिकाणी बांधल्यासारखे वाटते. एनिमाचे पाणी बाहेर येताना कळा लागतात, गुद बाहेर येते, हट्टी मलावरोध.

**मूत्रेंद्रिये** :- लघवी फेसाळ; थोडी होते, पिवळी धमक. चौवीस तासातून केव्हा तरी एकदाच होते. रात्री अंथरुणात लघवी होते. बसण्यापेक्षा उभे राहिल्याने लघवी बरी होते.

**पुरुषजननेंद्रिये** :- वृषणात, अंडात व वीर्यनलिकेत टणक गाठी येतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :- विटाळाला कुजलेल्या मांसाप्रमाणे घाण येते. धुपणी, भरपूर करवडणारी पावलापर्यंत वाहते व त्यावेळेस रजःपिंडात कापल्याप्रमाणे वाटते व कंड सुटते. योनिद्वारावर व्रण पडतात. संभोगाची तृप्ति होताना रजःपिंडात कापल्याप्रमाणे वेदना होतात. स्तन हुळहुळे स्पर्श सहन होत नाही, पाळीच्या दिवसात किंवा इतर केव्हांही.

**श्वसनेंद्रिये** :- आवाज बसतो विशेषतः विटाळशी होण्याच्या अगोदर. उन्हाळ्यात किंवा रात्री दमा लागतो. रात्री १ ते ४ पर्यंत दमा लागतो. कंठात एकसारख्या तीक्ष्ण वेदना होतात, कंठाला स्पर्श सहन होत नाही. खोकला कोरडा, रात्री जास्त येतो, उजव्या कुशीवर निजल्याने जास्त होतो.

**हृदय** :- हृदयाच्या बुंध्यापासून टोकापर्यंत कळा लागतात. शिरातून कढत पाणी वाहते आहे असे वाटते. नाडी मऊ.

**मान, पाठ** :- मान लहान झाल्यासारखी वाटते. सर्व कण्यात ठणका लागतो. पाटीत मूत्रपिंडाच्या जागेत ठणका लागतो, लघवी केल्यानंतर जास्त होतो.

**हातपाय** :- हात वर करताना वरच्या हाताचे स्नायू दुखतात. हाताची मधली बोटे दुखतात. पायाना ठणका लागतो, गार पाणी लावल्याने बरे वाटते. तंगड्यात गार वेदना होतात. स्नायूच्या टणक गाटी बनतात. कोपरावर उगवण येऊन कंड सुटते. चालताना मान, डोके छाती पुढे वाकून, हात कोपरापासून वर उचलून व शरीर ताठ करून चालावे लागते. नखे वेडीवाकडी होतात. गृध्रसीवात, रात्री जास्त त्रास होतो. हाडावर हाड वाढते.

**त्वचा** :- इतस्ततः पसरणारे धावरे. वण पांढरे. एकावर एक निमुळत्या होत जाणाऱ्या खपल्या बसतात. भाजल्याप्रमाणे मोठाले फोड येतात. पिंगट लाल चट्टे पडून त्याना घाण येते. ढेकूण चावल्यासारखे वाटते.

**झोप** :- झोप येत नाही.

**ज्वर** :- थंडी वाजते. रात्रीचा घाम येऊन खूप थकवा वाटतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** ***रात्री.*** दमट हवा. **सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत.** जीभ बाहेर काढताना. अतिशय थंडी किंवा उष्णता. एका पौर्णिमेआड. वीज वावटळ. समुद्रकाठी. उन्हाळ्यात. हालचाल, कोणत्याही स्थितीत. उकिडवे बसल्याने. हिवाळ्यात. हात बाजूला वर करताना

**ब वा :–** शरीराची अवस्था बदलल्याने. मंद किंवा एकसारखी हालचाल केल्याने. उंच पर्वतावर. शेकल्याने. दिवसा.

**संबंधी औषधे :-** आरम–मे; कलि-आ; नाय–ॲसि; मर्क्यु.

---

## ३२२. सिमिसिफूजा Cimicifuga; Actea Racemosa.

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम **मन**; **डोक्याचा मागील भाग**; टाळू; मान; ***स्नायू***; डोळे; ***स्त्रिया***; रजःपिंड; **गर्भाशय; हृदय**; सांधे; डावी बाजू छाती; मांड्यांचा पुढील भाग यावर होतो. नाजुक, काहीही सहन न होणाऱ्या स्त्रिया. **अत्यंत खिन्नता व उदासीनता** वाटून थकवा येतो व त्याच वेळेस **काहीही सहन होत नाही** विशेषतः वेदना होताना. लठ्ठपणा. **लक्षणे अनियमित**, बदलणारी किंवा आलटुन पालटुन होतात. **संधिवात.** भयंकर स्वरूपाच्या वेदना–**ठणका**, तीव्र चमका, **इकडे तिकडे फिरतात**, त्यावेळेस **मूर्च्छा येते, किंचाळणे.** विजेचे धक्के बसल्याप्रमाणे वाटते. वेदना **मानेतून वर** येतात, छाती भोवती येतात, **रजःपिंडापासून दुसऱ्या रजःपिंडापर्यंत** कमरेत जाणवतात किंवा इतर विकाराबरोबर आलटुन पालटुन होतात. स्नायू ठणकतात, रजःपिंड ठणकतात. कटिशूळ. **स्नायू मार लागल्याप्रमाणे हुळहुळे किंवा जड** होतात–गर्भाशयाचे **मानेचे, डोळ्याचे मागील बाजूस** व त्यावेळेस **सर्व शरीर आजारी झाले आहे असे वाटते.** ज्या बाजूवर निजले असेल त्या बाजूच्या **स्नायूंना कंप उत्पन्न होतो**, झटके, धक्के बसतात, जीभ, हाताची बोटे कापतात. कंपवात–हृदयविकारामुळे झालेला. दाबल्याप्रमाणे वेदना होतात कानशिलात, पावलात वगैरे. देवी. इन्फ्लुएन्झा. या औषधाने गर्भधारणा होण्यास मदत होते, विशेषतः ज्या स्त्रियांना मृत मुलेच होतात अशा स्त्रियांना. भीती, धास्ती, प्रेमभंग, धंद्यासंबंधी तूट बूड आल्यामुळे झालेले दुष्परिणाम, वेदना होत असलेली जागा हुळहुळी होऊन तेथे दाबलेले सहन होत नाही. घाबरेपणामुळे हुडहुडी भरते. बहुतेक विकार रजःपिंड व गर्भाशयाच्या विकारामुळे उत्पन्न होतात. बाळंतपणाच्या अगोदर कांही दिवस दिल्याने बाळंतपण सोपे होते. दात येताना होणारे मुलांचे विकार.

**मानसिक** :– विटाळशी होण्याचे अगोदर वेड लागते. उदासीनता. संत्रस्तपणा. मानसिक व शारीरिक विकार आलटुनपालटून होतात. **घाबरटपणा, हातापायाची चाळवाचाळव करण्याची प्रवृत्ति, प्रक्षुब्धपणा** व दचकणे. मनाविरुद्ध गोष्टी घडल्यास वेड लागल्यासारखे होते. खिन्नता पण **बडबड करावीशी वाटते** व भराभर विषयांतर करणे. संशयी. भविष्यकाल **भयाण वाटतो.** वेड लागेल, मरण येईल असे वाटते. **मरण येईल की काय अशातऱ्हेची भीती** वाटते. उंदीर दिसतात. अनेक प्रकारचे रंग किंवा आकृति दिसतात. वेड–आळंतपणानंतरचे किंवा दारूमुळे आलेले. स्वतःवर ताबा राहत नाही. वेदना थांबल्यानंतर वेड लागते. दारे बंद असलेल्या गाडीतून जाण्याची भीती वाटते, गाडीतून उडी टाकावी की काय असे वाटते. औषध घेण्याचे नाकारणे, खिन्न होऊन विचार करीत स्वस्थ बसणे, प्रश्न विचारला तर रडावयास लागणे. **उंदराची अतिशय भीती वाटते.** जुलाब झाल्याने किंवा विटाळ सुरू झाल्याने मानसिक लक्षणे कमी होतात.

**डोके** :– मेंदूत लाटा आल्यासारखे वाटते. किंवा तो उघडतो आहे व मिटतो आहे असे वाटते. **डोके मागे वाकलेले. टाळू उडून जात आहे की काय असे वाटते,** जिना चढताना जास्त. टाळूवर गार वारे लागत आहे किंवा कढत झाली आहे असे वाटते. डोक्यात तीव्र कळा येतात किंवा घण मारल्याप्रमाणे वेदना होतात विशेषतः अति अभ्यासामुळे, मानसिक काळजी किंवा गर्भाशयाच्या विकारामुळे. **डोक्याच्या मागील भागात रट्टा मारल्याप्रमाणे** किंवा दाबल्याप्रमाणे वेदना होतात. मेंदूत चमत्कारिक खळबळ झाल्यासारखी वाटते. मेंदू मोठा झाल्यासारखा वाटतो. मेनिन्जायटिसमुळे आचके येतात.

**डोळे** :– **अतिशय, ठणकतात,** दाबल्याने बरे वाटते डोळ्याच्या जरा हालचालीने जास्त होते. मोठे झाल्यासारखे वाटतात. डोळ्यापासून डोक्याच्या टाळूपर्यंत वेदना होतात. कृत्रिम उजेड सहन होत नाही. डोळे भेदरल्यासारखे. डोळ्यात सुया खुपसल्याप्रमाणे वाटते. डोळ्यासमोर काळ्या कडा असलेल्या लाल ज्वाला दिसतात.

**कान** :– भयंकर आवाज होतात व बहिरेपणा येतो. आवाज सहन होत नाही, विशेषतः वेणा येताना.

**नाक** :– गार वारे सहन होत नाही; आत घेतलेल्या प्रत्येक श्वासागणिक मेंदूला गार वारे लागत आहे असे वाटते.

**चेहरा** :– फिकट, कढत. हाडाचे उंचवटे दुखतात, विशेषतः रात्री. कपाळ गार. तरुण स्त्रियांच्या चेहेऱ्यावर असलेली व्यंगे या औषधाने दूर होतात.

**तोंड** :– लाळ दाट, दातावर श्लेष्मा साचतो, किंवा घशातून तांब्याच्या चवीचा कफ खाकरून काढावा लागतो. जीभ निमुळती व कापते. बोलण्याचा प्रयत्न केला तरी शब्द उच्चारता येत नाहीत.

**घसा** :– घशात आग होते.

**जठर** :– **सकाळी मळमळते**, गरोदरपणी किंवा दारुड्याना. आतड्यात मळमळल्यासारखे वाटते; कण्यावर किंवा मानेवर दाब पडल्याने मळमळावयास लागते. हिरवी ओकारी होते. ओकारी होताना डोके धरून कण्हणे. स्नेही भेटला म्हणजे पोटात गळून गेल्यासारखे वाटते.

**उदर** :– वेदना अंग दुमडल्याने व शौचानंतर कमी होतात. शौचास पातळ, काळे, दुर्गंधी. वारंवार होते. मुलाना फक्त सकाळीच जुलाब होतात.

**मूत्रेंद्रिये** :– भरपूर स्वच्छ लघवीला होते व त्यामुळे थकवा येतो. लघवीतून पिवळी वाळू जाते. घाबरेपणामुळे लघवीला व्हावयाला लागते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळी वेळ व प्रमाण या बाबतीत अनियमित. कष्टार्तव, **विटाळ जसजसा जास्त जातो तसतशा वेदनापण जास्त होतात**. विटाळ भरपूर, काळा, गांठी असलेला व दुर्गंधी. विटाळ जाताना पाठीत कळा येतात व घाबरटपणा येतो. ओटीपोटात एका बाजूने दुसऱ्या बाजूपर्यंत वेदना होतात. रजःपिंडातील वेदना वर जातात आणि मांड्यातील पुढील भागापर्यंत येतात. वेणा मंद व त्या येताना घाबरटपणा येऊन हुडहुडी भरते. वायगोळ्याच्या वेदना असह्य व त्या जांघेत जास्त जाणवतात. स्त्रियाना खोकताना, लघवी करताना घाबरटपणा येतो. घाबरटपणामुळे हुडहुडी भरते. वेदना होत असलेल्या जागा हुळहुळ्या होऊन त्या जागी दाब सहन होत नाही. डाव्या स्तनाखाली दुखते. धुपणी जाताना गर्भाशयात जडपणा वाटतो. स्तनात आग होते. बाळंतपणानंतरचा विटाळ भावनामुळे किंवा गारठल्याने बंद होतो.

**श्वसनेंद्रिये** :– एकसारखा रात्रीचा कोरडा खोकला येतो, बोलताना खोकला जास्त होतो. खोकताना स्नायू हुळहुळे होतात. छातीत तीव्र टोचल्याप्रमाणे वाटते. हालचालीने जास्त होते, त्यामुळे रडू येते. घाबरटपणामुळे खोकला येतो. बरगड्यामध्ये कळा येतात.

**हृदय** :– हुळहुळे झाल्यासारखे वाटते, मोठे झाले आहे असे वाटते. हृदयाच्या जागी पुढून मागे सुया टोचल्याप्रमाणे वेदना होतात किंवा डाव्या हातापर्यंत टोचल्यासारखे वाटते. नाडी अशक्त, मंद, दर तिसऱ्या किंवा चौथ्या ठोक्याला थांबते. नाडी कंपयुक्त. हृदयाची क्रिया थांबल्यासारखी वाटून गुदमरल्यासारखे होते.

**गळा** :– गलगंडात विटाळशी होण्याचे अगोदर ठणका लागतो.

**मान पाठ** :– **मानेत ठणका लागतो,** डोके मागे वाकवावे लागते. मान व पाठ ताठून आखडल्यासारखी होते, हाताच्या हालचालीने जास्त होते. कमरेत व माकडहाडात जडपणा वाटतो व ठुसठुस कळा येऊन त्या कुल्यातून मांड्यापर्यंत येतात. **कण्याला दाब सहन होत नाही,** डाव्या तिकोनी हाडाच्या कोपऱ्यात दुखते.

**हातपाय** :– हात बधिर होतात, वरून खाली पेटके येतात. डावा हात कुशीला बांधला आहे असे वाटते (हृद्‌रोगात). **हातपायाना पेटके येतात,** पोटऱ्यात पेटके येतात. टाचेचा स्नायुबंध ताठून आखडल्यासारखा वाटतो. तळपायाना कंड सुटते. संधिवात व मानसिक लक्षणे आलटुन पालटुन होतात. मांसल भागात ठणका लागतो. हातापायाना झटके बसतात. लिहिताना हात कापतात. डाव्या हाताची व उजव्या पायाची वेडीवाकडी हालचाल एकसारखी होते ( कोरी आत ). हातापायाना अस्वस्थपणा वाटतो. पाय कापतात, चालता येत नाही.

**झोप** :– हात डोक्यावर घेऊन झोपावेसे वाटते किंवा जांभया येतात. झोप येत नाही व घेरी आल्यासारखे वाटते. दारू प्याल्याप्रमाणे झोप लागते.

**ज्वर**:– थंडी सहन होत नाही. पंजे व पावले याना गार घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **विटाळ जाताना;** नष्टार्तव. बाळंत होताना. भावनामुळे. **दारू. रात्री. दमट थंड, हवा, वारे.** हवेतील फरक. उष्णता व थंडी. बसल्याने. न्हाण येण्याच्या वयात व विटाळ थांबण्याच्या वयात.

**ब का** :– **गरम पांघरुणे.** मोकळी हवा. दाबल्याने एकसारखी हालचाल. हातात वस्तू धरल्याने. खाण्याने.

**संबंधी औषधे** :– **इग्ने; कालो; गेल्से; बॅप्टि; पल्स.**

---

## ३२३. सिलिसिआ ( गारगोटी ) Silicea; Silica

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***पोषण***; ***मुले***; ***मज्जातंतू***; ***गाठी***; **हाडे;** श्लेष्मल त्वचा व **त्वचा** यावर होतो. वाळलेल्या शरीराचे किंवा वृद्ध इसम. डोके मोठे व शरीर वाळलेले, टाळू उघडी असलेली मुले; मुलांचे **उदर मोठे, कढत, पाय वाळके.** मुले घाबरून रडतात, किंवा त्यांच्याशी गोड बोलले तरी रडतात. आयांच्या हाताला धरून फरफटत जातात, धावले तर पांढरी पडतात. **आवाज, वेदना, थंडी *अगदी सहन होत नाही***; शेकापाशी सारखे बसावेसे वाटते, भरपूर गरम कपडे घालावे लागतात. **भयंकर टोचल्याप्रमाणे वेदना**, एखाद्या जागी– कानात, घशात, व्रणात वगैरे. सहजासहजी थकवा येतो. घाम येतो. लहान सहान जखमा पुवळतात. **शोथ हळहळू वाढत जातो नंतर अर्धवट स्थितीत राहून त्याजागी टणकपणा येतो.** ***कोणतीही जखम चिघळते*, पू होण्याची प्रवृत्ति कमी होत नाही**– नाडीव्रण, गळवे, केसतुडे वगैरे. **टणकपणा** वण वगैरे. शरीराचे पोषण नीट होत नाही. वाढ खुंटते. मूल उशिरा चालावयास शिकते. गांठी मोठया होतात. ज्या जागेवर दाब किंवा भार पडला असेल ती जागा बधिर होते. जलयुक्त सूज सकाळी जास्त असते. शरीरात घुसलेल्या बाह्य वस्तु गोळी, काटा वगैरे बाहेर निघण्यास मदत होते. आचके, फेफरे– प्रथम छातीत किंवा पोटात काहीतरी चालल्यासारखे वाटते, डोळे वेडेवाकडे होतात, ओठ उडतात, जीभ लळलळा लोंबते, हातपाय वेडेवाकडे होऊन ताठतात. झटका येण्याचे अगोदर अंग गार पडल्यासारखे वाटते, अमावास्येला जोर जास्त असतो. हाडे कुजतात, मऊ होतात, हाडावर हाड वाढते. स्राव, घाम वगैरे बंद होऊन उद्भवलेले दुष्परिणाम. देवी टोचण्याचे दुष्परिणाम. पाथरवटाचा क्षय किंवा इतर विकार. चामखिळीप्रमाणे त्वचेवर उगवण येते. ***भावना खालून वर जातात***– घेरी वेदना वगैरे. अंगात उष्णता कमी, व्यायामानेसुद्धा अंग तापत नाही. **शारीरिक व मानसिक सहनशक्तीचा अभाव.** शरिरातील स्नाव, दुखापती, लचक. यामुळे उद्भवलेले विकार. कण्याला झालेल्या आघातामुळे झालेले विकार, विशेषतः जेव्हा कण्यावर दाबल्याने दूरच्या भागात वेदना होतात. केस चिकटला आहे असे वाटते, जिभेवर, कंठात, वगैरे.

**मानसिक** :– शरीराने अशक्त व मंद पण बुद्धीने तीव्र. चळवळ करण्याची प्रवृत्ति. हट्टी व कुढा. योग्यता असून आत्मविश्वासाचा अभाव. अपयशाची भीती वाटते पण काम अंगावर घेतले तर ते चांगल्याप्रकारे पार पाडणे शक्य

असते. हट्टी व दुराग्रही मुले, त्यांच्याशी गोड बोलले तर रडावयास लागतात थोड्याशा आवाजाने दचकणे व भीतीयुक्त काळजी वाटणे. धर्माविषयी औदासिन्य. दुःखी, निराश, आयुष्याचा कंटाळा. बोलताना गोंधळ होतो, योग्य शब्दात सांगावयाचे ते सांगता येत नाही. अति मानसिक श्रमामुळे आलेला मेंदूचा थकवा. एखाद्या गोष्टीची कल्पना मनात पक्की होऊन बसते व ती नाहीशी होत नाही. सुया, टाचण्या यांची भीती वाटते व त्या शोधून मोजाव्याशा वाटतात. धर्माविषयी बेपर्वा. पुढे काय होईल या धास्तीने उद्भवलेले विकार.

**डोके** :– भयंकर घेरी येते, वर पाहिल्याने जास्त होते. गरम कपडा गुंडाळण्याने किंवा डाव्या कुशीवर निजल्याने बरे वाटते. ***डोक्याच्या मागील भागात वेदना होतात***, दाबल्याने बरे वाटते. डोक्याच्या मागील भागात डोके दुखावयास सुरवात होऊन वेदना सर्व डोक्यात पसरून डोळ्यावर स्थिर होतात. अर्धशिशी. डोके दुखल्यानंतर दिसेनासे होते. डोके दुखणे मानसिक श्रमाने, आवाजाने, हालचालीने, धक्याने, प्रकाशाने, थंड हवेने, बोलण्याने, शौचाचे वेळी कुंथण्याने जास्त होते; घट्ट आवळण्याने, गरम कपडा गुंडाळण्याने, भरपूर लघवी झाल्याने बरे वाटते. उपवासाने किंवा वेळेवर जेवले नाहीतर डोके दुखावयास लागते. टाळू दुसटुसते. मुलांची टाळू उघडी व उदर फुगलेले. डोक्याच्या कातडीवर रेंगळे येतात. केसात ओलसर पुरळ येते व त्याचे पापुद्रे जमतात. कवटी व कातडे यामध्ये सुजेमुळे बुळबुळीत पाणी जमते. तान्ह्या मुलांची रक्तगुल्मे. डोक्याला भरपूर घाम येतो. मेंदु झुला पडल्यासारखा वाटतो, विशेषतः संभोगानंतर. कपाळाच्या मधोमध फुगवटा येतो.

**डोळे** :– सुजतात. काळ्या बुबुळावर व्रण–फूल पडते ते चरत जाऊन भोक पडण्याचा संभव उद्भवतो. पापण्या सुजतात. पुवळलेल्या रांजणवाड्या येतात. डोळे हुळहुळे होतात, पापण्या मिटल्याने जास्त त्रास होतो. दिवसा डोळे दिपतात. आग होते, टोचते, लाल होतात. जुनाट नेत्रविकार, डोळ्यातून एकसारखे पाणी येते किंवा दाट पिवळा रक्तमिश्रित पू येतो. गरमीमुळे आलेले डोळे. सारा; ठिपके लासरू. डोळ्याभोवती गळवे किंवा फोड येतात. मोतीबिंदू, अस्पष्ट दिसते. डोळ्यापुढे ठिपके, रेषा दिसतात. डोळ्यात रक्ताचे मोड येतात. वाचताना अक्षरे एकमेकात गुंततात.

**कान** :– दुर्गंधी स्राव येतो– दह्यासारखा दाट पिवळा. बहिरेपणा. बंदुकीसारखे आवाज होतात. कान बंद झाल्यासारखे वाटते, दडे बसल्यासारखे वाटते, एखादे वेळेस मोठा आवाज होऊन ते मोकळे झाल्यासारखे वाटतात. कानातील दडे जांभई येताना किंवा गिळताना मोकळे झाल्यासारखे वाटतात. पडद्याला भोक पडते. कानाचे मागील हाडाचा उंचवटा कुजतो. कर्णविकारात गालगुंड मोठे व टणक होते. कानात खपल्या बसतात.

**नाक** :– नाकाच्या शेंड्याला कंड सुटते. नाकात कोरड्या, टणक खपल्या बसतात त्या काढल्या की रक्त येते. सर्दी झाली म्हणजे रक्त येते. नाकातून फेसाळलेला स्राव येतो. नाकाची हाडे कुजून नाक पिशवीप्रमाणे होते. पिनस. नाकाची हाडे हुळहुळी. नाक कोरडे पडते, चोंदते, वास कळत नाही. तान्ह्या मुलांच्या नाकातून रक्त येते. नाकाच्या पाळ्याना भेगा पडतात. सकाळी शिंका येतात. सर्दी लवकर बरी होत नाही.

**चेहरा** :– पांढरा. गालगुंड. जबड्याखालील गाठी मोठ्या होतात. हनुवटीवर पुटकुळया येतात. भेगा पडतात.

**तोंड** :– ओठावर भेगा पडून त्या टणक होतात. जिभेवर, घशात, कंठात, श्वास-नलिकेत केस अडकला किंवा चिकटला आहे असे वाटते. दाताच्या बुंध्याशी गळू होते. हिरड्यातून पू येतो. दाताना गार वारे, पाणी सहन होत नाही.

**घसा** :– कडू होतो. दुर्गंधी कफाचे गोळे खाकरून काढावे लागतात. सर्दी झाली की घसा धरतो. टानसिल सुजून त्यात पू होतो. टानसिलामध्ये टाचणी टोचल्या-प्रमाणे वेदना होतात. गिळताना नांगी मारल्याप्रमाणे दुखते. गिळताना अन्न, पाणी नाकातून बाहेर येते.

**जठर** :– अतिशय भूक लागते किंवा अन्नावर मुळीच वासना नसते. कढत अन्न, किंवा मांस खाण्याचा तिटकारा. तहान फार लागते; पाण्याला वाईट चव लागते. तान्ह्या मुलाना आईचे दूध मानवत नाही, ओकारयास होते किंवा हगवण लागते. ओकारीला आंबुस वास येतो. खाण्यानंतर आंबट ढेकरा येतात. ढेकराबरोबर पाणी येते व अंगावर शहारे येतात. खाण्यानंतर पोटाच्या खळीत पिळल्याप्रमाणे किंवा ओरबाडल्याप्रमाणे वेदना होतात, तेथे दाबलेले सहन होत नाही. आईस्क्रीम, बर्फाचे पाणी आवडते व ते जोपर्यंत पोटात आहे तोपर्यंत बरे वाटते.

**उदर** :– **मोठे, टणक, कढत व पाय बारीक. मलावरोध– मळ बाहेर येऊन परत आत जातो, विशेषतः विटाळसेपणी व अगोदर.** मळाचे लहान मोठे खड

होतात, मऊ असला तरी अतिशय कुंथावे लागते त्यामुळे थकवा येतो. उदर फुगते, आवळल्यासारखे वाटते, वस्त्रांचा दाब सहन होत नाही. गुदात कापल्याप्रमाणे वेदना होतात किंवा पेटके येतात व ते अंडापर्यंत जातात, संभोगाचे वेळी गुदात वेदना होतात. गुदद्वाराला भेगा पडतात, मूळव्याध, गुदद्वार आवळल्यासारखे होऊन तीत वेदना होतात. भगेंद्र, जीर्णातिसार– शौचास दुर्गंधी वेदनारहित होते. खाण्यानंतर शौचास जावे लागते. वारंवार शौचास होईल असे वाटते पण होत नाही. मूळव्याधीचे मोड शौचास होताना बाहेर येतात व त्याना ठणका लागतो. फितीसारखे जंत होतात. यकृतात गळू होते. गुदद्वार ओलसर, दुर्गंधी वात सरतो– उदरात वेदना होताना तळहात पिवळे होतात.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्राशयाची जीर्ण सूज. लघवीतून पू व रक्त जाते. मूत्रमार्गातून दुर्गंधी स्राव येतो– दाट दह्यासारखा पुवळलेला. परमा. मुलामुलींना रात्री नकळत लघवीला होते विशेषतः जंतामुळे. भरपूर लघवीला झाल्यामुळे डोके- दुखी थांबते.

**पुरुषजननेंद्रिये** :– कामेच्छा कमी किंवा जास्त होते. रात्री स्वप्नावस्था होते. शौचाचे वेळी कुंथताना धातू जाते. वृषणावर ठिकठिकाणी जागा ओलसर होऊन कंड सुटते. जीर्ण सुजेमुळे अंड ठणक होऊन त्यात पिळवटल्या- प्रमाणे वेदना होतात. अंडाभोवती पाणी साचते. अंडकोशाचा हस्तिरोग. मैथुनानंतर अत्यंत थकवा येतो; ८।१० दिवसाच्या विश्रांतीनंतर पूर्वस्थिती येते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– पाळी लवकर, बिटाळ थोडा जातो. दोन पाळयामध्ये विटाळ जातो. मनःक्षोभाने किंवा अंगावर मुलाला पाजताना विटाळ जातो. नष्टार्तव, कित्येक महिने विटाळ जात नाही. योनीत कापल्याप्रमाणे वेदना होऊन त्या वर जातात विशेषत लघवी होताना. योनीला कंड सुटते. योनीत व भोवती नाडीव्रण व गळवे होतात व त्यातून दाट दह्यासारखा स्राव येतो. व्रण बरे होऊन पुन्हा उद्भवतात. रजोनलिका सुजून त्यात पाणी किंवा पू साचतो व तो मधुन मधुन गर्भाशयातुन बाहेर येऊन रजोनलिकांची सूज कमी होते. धुपणी स्राव करवडणारा, चुणचुणणारा व तो सुरू होण्याच्या अगोदर बेंबी- भोवती कापल्याप्रमाणे वेदना होतात. लघवी होताना धुपणी जाते. धुपणी दुधासारखी करवडणारी, भडभडून जाते. विटाळ जास्त असताना मधुन मधुन अंग बर्फासारखे गार होते. स्तनाग्रे हुळहुळी होतात, आत जातात. स्तनात टणक गाठी येतात. स्तनाचे नाडीव्रण. गर्भाशयात व स्तनात एकदम वेदना होतात. अशक्तपणामुळे स्त्रियांचा गर्भपात होतो. किंवा त्या गरोदर राहत

नाहीत. गर्भाशयाचा कॅन्सर. लघवी करताना योनीत कापल्यासारख्या वेदना होऊन त्या वर जातात.

**श्वसनेंद्रिये** :– खोकल्यामुळे शरीर हादरते, गुदमरल्यासारखे वाटते, कोरड्या ओकाऱ्या येतात; गार पाणी प्याल्याने, बोलण्याने, निजल्याने, सकाळी उठल्यानंतर खोकला जास्त होतो. अतिशय श्रमामुळे, अंग तापल्यामुळे, मानेला गार वारे लागल्याने दमा होतो. परम्यांमुळे उत्पन्न झालेला दमा. कफ भरपूर, पिवळा, गाठ्याळ दुर्गंधी. कफात लहान लहान गोळ्या पडतात, त्या फोडल्या तर दुर्गंधी येते. वारंवार सर्दी होऊन खोकला होण्याची व त्यानंतर दमा होण्याची प्रवृत्ति. क्षय. न्युमोनिआ नंतर उद्भवलेले फुप्फुसाचे विकार. पाथरवटांचे विकार. छातीत घुरघुर वाजते. टोचल्याप्रमाणे वेदना होतात.

**हृदय** :– हालचाल करताना किंवा बसले असताना सर्व शरीरात नाडी उडल्यासारखे व धडधडल्यासारखे वाटते.

**मानपाठ** :– मज्जारज्जूचा क्षोभ– मान ताठून डोके दुखावयास लागते. मणके धक्का लागला की दुखतात. फार वेळ गाडीत बसल्याप्रमाणे पाठीत दुखते. मणके कुजतात. मोकळ्या हवेत चालून अंग तापले म्हणजे पाठीत आग होते.

**हातपाय** :– खाकेतील गाठी सुजतात. हातांच्या बोटांची टोके कोरडी होतात कागदाप्रमाणे वाटतात. किंवा दुखतात. हातांचा उपयोग करावयाचा झाल्यास हात कापतात. पुढील हात लुळा पडल्याप्रमाणे अशक्त होतो. नखावर पांढरे टिपके पडतात. पायातील शक्ती गेल्यासारखी वाटते. पोटऱ्यात व तळपायात पेटके येतात. चालताना पाय कापतात; लवकर दमतात (सकाळी). संभोगानंतर किंवा स्वप्नावस्थेनंतर सर्व शरीर मार लागल्याप्रमाणे दुखते. पावले बर्फासारखी गार. ***पावलाना दुर्गंधी घाम येतो***– त्याने कंड सुटते **करवडणारा असतो,** जोडे बूट यांचा नाश होतो. नखे खडबडीत व पिवळी होतात. नखुरडे– तोडल्या बोचल्याप्रमाणे वेदना होतात, बधिरता येते, पू होईलसे वाटते. पावलाच्या कमानीत ठणका लागतो. गुडघा आवळल्याप्रमाणे दुखतो. घोटे अशक्त होतात. खिळल्या. टाचेवर व्रण पडून ते खाजतात. पायाच्या बोटांची नखे मांसात रुततात. सांध्याभोवती व्रण पडतात त्यातून पातळ दुर्गंधी रक्तमिश्रित पू वाहतो किंवा दह्यासारखे कण येतात. हाडे कुजतात, सुजतात, मऊ होतात. मूल उशिरा चालावयास लागते. बोटांच्या सांध्यावर पोकळ गुल्मे येतात. अजागळाप्रमाणे चालणे.

**झोप** :– झोपेत चालणे. झोप अस्वस्थ. झोप लागता लागता भयंकर स्वप्ने पडून जागे होणे. पूर्वी झालेल्या गोष्टींची स्वप्ने पडतात, वैषयिक स्वप्ने पडतात. भीतीमुळे झोपेतून जाग येऊन सर्व शरीर कापावयास लागते. झोपेत बडबडणे. अतिशय जांभया येतात.

**त्वचा** :– गळणे, केसतुडे, नाडीव्रण, काळीपुळी. व्रणाना हात लावलेला सहन होत नाही, व्रण दुर्गंधी, स्पंजाप्रमाणे, शेकल्याने बरे वाटते. ओल्सर पुरळ येते. लहानसहान जखमा लवकर बऱ्या होत नाहीत. त्वचा सुरकुतलेली व भिजल्याप्रमाणे दिसते. गुलाबी रंगाचे चट्टे पडतात. चामखिळीप्रमाणे मासांकुर. टणक वारंवार वाढणारी करटे. महारोगाचे आवाळू. अंगावरची उगवण दिवसा किंवा संध्याकाळी फक्त खाजते. वण एकाएकी दुखावयास लागतात.

**ज्वर** :– *गारवा सहन होत नाही*. अंथरुणात निजल्यावर, श्रम केल्यानंतर थंडी वाजते. **विकार झालेला भाग गार होतो. थंडी वाजून बर्फाप्रमाणे अंग गार** होते. डोके खूप तापून ताप येतो– दुपारनंतर किंवा रात्री. तापात तहान लागते व श्वास अडखळत चालतो. ***घाम* भरपूर येतो– शरीराच्या एखाद्या भागाला, डोक्याला, विकार झालेल्या भागाला किंवा रात्री**, झोप लागता लागता. घाम दुर्गंधी, करवडणारा.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा हो :– *गारठा, गार वारे, हवा*, **दमटपणा**, शरीर उघडे केल्याने. आंघोळीने. घाम बंद झाल्याने विशेषतः **पावलांचा.** आवाज. उजेड. मनःक्षोभ. मणक्याना धक्का लागल्याने. रात्री. अमावास्या. सकाळी. निजल्याने, डाव्या कुशीवर निजल्याने. स्पर्श, **दाब**, हवेतील बदल, केस विंचरताना.

**ब वा** :– *उष्णता. गरम पांघरुणे*. डोके गुंडाळण्याने. भरपूर लघवी झाल्याने. उन्हाळ्यात. दमट उष्ण हवा.

**सहाय्यक औषधे** :– कल्के-का; थूजा; पल्स; फास्फ; फ्लुओ-ॲसि; लायको; सॅनिकु; हेपार.

---

## ३२४. सिल्ला ( जंगली कांदा ) Scilla, Squilla

**सर्वसाधारण**:– या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा*–श्वसनेंद्रिये व पचनेंद्रिये; मूत्रपिंड; हृदय व पांथरी यावर होतो. भरपूर स्राव वाहूनसुद्धा शरीरात

पाणी साठण्याची प्रवृत्ति. नाळगुद– जलोदर या विकारात लघवीला भरपूर होते. हृदय व मूत्रेंद्रिये यांचे विकार. गुडगुडल्यासारखे वाटणे.

**मानसिक :–** क्षुल्लक गोष्टीमुळे राग येतो. शारीरिक व मानसिक श्रम करावेसे वाटत नाहीत.

**डोळे :–** **चोळावेसे वाटतात** मेंदूच्या विकारात, गोवर येताना, व शिंका येतात. डोळे गार पाण्यात तरंगत आहेत असे वाटते. खोकताना पाणी येते. डावा डोळा उजव्या पेक्षा लहान दिसतो.

**नाक :–** सर्दी होऊन खूप पाणी गळते. स्राव करवडणारा. नाकपुड्यांच्या कडा हुळहुळ्या होतात. शिंका येतात. सकाळी नाक फार वाहते.

**चेहरा :–** मूल चोळते, खोकताना.

**तोंड :–** दातावर काळे ठिपके पडतात. **चव गोड** अन्नाला, कफाला, वगैरे.

**जठर :–** जठरातील वेदना डाव्या कुशीवर निजल्याने कमी होतात. दगड ठेवून दाबल्यासारखे वाटते.

**उदर :–** दोन्ही कुशीत ठणका लागतो. डाव्या कुशीत पांथरीच्या जागेत टोचते. काळसर, पिंगट, फेसयुक्त शौचास होते. ओटी पोटात गुरगुरल्यासारखे वाटते. जलोदर, लघवी कमी होते.

**मूत्रेंद्रिये :–** एकदम लघवीला लागून खूप लघवीला होते. रक्ताची लघवी. खोकताना लघवीला होते. लघवी करताना शौचास होते.

**पुरुषजननेंद्रिय :–** वैषयिक विचाराने वीर्यपात होतो.

**श्वसनेंद्रिये :–** हट्टी *खोकला*. खोकताना– **घुरघुर आवाज होतो, शिंका येतात, डोळ्यातून नाकातून पाणी येते, लघवीला होते** व कित्येक वेळा शौचास पण होते, अंग तापते; खोकल्यानंतर गुदमरल्यासारखे वाटते. खोकला गार पाणी प्याल्याने आणि दीर्घश्वास घेतल्याने जास्त होतो. खोकताना मूल मुठीने चेहरा चोळते. दमा–छातीत टोचते व उदराच्या स्नायूना पेटके येतात. दम्यात पाणी घोट घोट घ्यावे लागते. खोकून खोकून थोडासा कफ बाहेर पडतो पण त्याने फार बरे वाटते. कफ जड, सहज बाहेर येतो. विशेषतः सकाळी आणि संध्याकाळी. छातीत (डाव्या बाजूस) टोचते. प्लुरिसी. खोकला असताना पांथरी मोठी होते.

**हृदय :–** उत्तेजक औषध आहे. नाडी मंद व थोडी टणक.

**हातपाय** :– पंजे व पावले गार, अंग कढत. उभे राहून पावले हुळहुळी होतात.

**त्वचा** :– सर्वांगावर लहान लाल ठिपके पडून त्यात चुणचुणते.

**ज्वर** :– अंग तापते पण उघडे रहावेसे वाटत नाही. घाम मुळीच येत नाही.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– पहाटे. हालचालीने. उघडे झाल्याने. वृद्धपणी.

**ब वा** :– विश्रांति. बसल्याने. थोडासाही कफ पडल्याने.

**सहाय्यक औषधे** :– ॲन्टी-क्रू.

**संबंधी औषधे** :– आर्से; नक्स-व्हा; बॅरि-का; र्‍हस-टा; सिलि.

---

## ३२५. सिस्टस Cistus Canadensis

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *गाठी*–घशातील, मानेच्या; स्तन; घसा; फुप्फुसे व त्वचा यावर होतो. **गारठा अगदी सहन होत नाही. त्याने त्रास होतो; गार वारे नाकात घशात गेले तरी सहन होत नाही. गार–** जीभ, लाळ, घशात, ढेकरा, जठर वगैरे–विशेषतः घाम आल्यानंतर. **पू होण्याची प्रवृत्ति. दाट पिवळा श्लेष्मा खूप बाहेर पडतो** व तो पडल्यानंतर श्लेष्मल त्वचा हुळहुळी होऊन दुखते. **कंड** अंतर्गत व बाह्यांगात. **आग होते.** टणकपणा. घट्टे. गांठी मोठया व त्यांचे स्वरूप दुष्ट होण्याची प्रवृत्ति. विषारी जनावरे चावल्याने किंवा जखमा झाल्याचे दुष्परिणाम. चरत जाणारे व्रण. सर्वांगावर मुंग्या चालल्याप्रमाणे वाटते, व त्यावेळेस चिंता वाटून श्वासोच्छ्वास कष्टाने होतो.

**मानसिक** :– भीती वाटते. मनःक्षोभामुळे झालेले दुष्परिणाम.

**डोके** :– दुपारची जेवणाची वेळ टळली तर डोके दुखावयास लागते, खाण्याने बरे वाटते. गळ्यातील गांठी मोठया झाल्याने ते एका बाजूला कलते.

**डोळे** :– भोवती काही तरी फिरत आहे असे वाटते. कोपऱ्यात भेगा पडतात.

**कान** :– कानातून पातळ दुर्गंधी पू वाहू लागतो, विशेषतः स्फोटक तापानंतर. कानाच्या पाळ्यावर, भोवती आंतील भोकापर्यंत उगवण येते.

**नाक** :– नाकाच्या घशातील भागात गोळा बसला आहे असे वाटते. आत गार वाटते किंवा आग होते. टोक दुखते. इसब. जुनाट सर्दी, वारंवार जोराच्या शिंका येतात.

**चेहरा** :- उजव्या गालाच्या उंचवट्यावर आग होते, कंड सुटते, खपल्या बसतात. चरत जाणारे व्रण. कॅन्सरचे व्रण. गळ्यातील गाठी वाढलेल्या असताना खालील जबड्याचे हाड कुजते. ओठावर भेगा पडतात.

**तोंड** :- गार झाल्यासारखे वाटते. हिरड्यातून पू येतो. जीभ बाहेर काढताना त्रास होतो. लाळ गार. श्वासोच्छ्वास गार.

**घसा** :- थंडीमुळे घसा धरतो, व तो गार वाटतो, घसा स्पंजाप्रमाणे मऊ झाल्यासारखा वाटतो, खरखरीत होतो, कंड सुटते, एके ठिकाणी जागा कोरडी झाल्यासारखी वाटून घोट घोट पाणी प्यावे लागते किंवा एकसारखी लाळ गिळावी लागते. गार वारे आत गेले तर घसा दुखतो. घशातील गाठी सुजतात पुवळतात.

**जठर** :- जेवणाच्या अगोदर व नंतर गार झाल्यासारखे वाटते. चीज खाण्याची वासना. तिखट पदार्थ खावेसे वाटतात. ढेकरा गार.

**उदर** :- गार झाल्यासारखे वाटते. काफी किंवा फळे खाल्ल्याने हगवण लागते. शौचास घाई लागून पातळ, पिंवळे शौचास होते विशेषतः सकाळी. गलगंड वाढलेले असताना हगवण लागते.

**पुरुष जननेंद्रिये** :- वृषणाला कंड सुटते.

**स्त्रीजननेंद्रिये** :- स्तन सुजून टणक होतात ( डावे ). दुर्गंधी धुपणी. गार वारे सहन होत नाही. कॅन्सर.

**श्वसनेंद्रिये** :- चिकट बुळबुळीत खूप कफ पडतो. निजल्याने जास्त. छाती गार होते. सर्वांगाला मुंग्या आल्यासारख्या वाटून नंतर दम लागतो. कफ पडून गेल्यानंतर छातीत हुळहुळे झाल्यासारखे वाटते.

**[मा]न** :- **मानेतील गाठी सुजून टणक होतात.** गालगुंड मोठे होते व त्यामुळे डोके एका बाजूस झुकते. गुदास्थीत आग होऊन हुळहुळे होते, बसल्याने स्पर्श केल्याने जास्त.

**हातपाय** :- पावले गार. बोटाच्या टोकावर भेगा. हाताने काम करण्याऱ्या इसमांच्या तळहातास टणक घट्टे पडून त्यात भेगा पडतात.

**त्वचा** :- सर्वांगाला कंड सुटते. पंज्याची त्वचा जाड. टणक कोरडी होऊन आत खोल भेगा पडतात. ओठावर, डोळ्याच्या कोपऱ्यात, हाताच्या बोटांची टोके यावर भेगा पडतात. हात सुजून कंड सुटते.

**झोप** :- सर्वांगाला कंड सुटल्यामुळे किंवा छातीत गारवा वाटल्यामुळे झोप येत नाही.

**ज्वर :–** थंडी वाजते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** *गारठा.* **गार हवा नाकात घशात गल्यान. गार** पाणी. मानसिक श्रमाने, मनःक्षोभाने. स्पर्श. हालचाल.

**ब वा :–** खाण्यानंतर. कफ पडल्याने.

**संबंधी औषधे :–** कॅल्क-का; हेपार; हलोड.

---

## ३२६. सिंकोना Cinchona; china

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम **रक्त;** *रुधिराभिसरण;* **पचनेंद्रिये;** यकृत; पांथरी व मज्जातंतू यावर होतो. *विकार मधुन मधुन थांबून उद्भवतात. शरीरातील स्राव गेल्यामुळे थकवा वाटतो,* **रक्तस्राव,** वीर्यपात, धुपणी, सारखा पू वाहणे, मुलांचे अंगावर पिणे, हगवण वगैरे. रक्तस्राव चालू असताना कानात घंटानाद होतात, दृष्टी मंद होते, अंग गार गार पडते किंवा कित्येक वेळा आचके येतात; रक्तस्रावानंतर अंगावर जलयुक्त सूज येते. शोथ इतका जलद पसरतो की तो भाग कुजावयास लागतो. **अशक्त घाबरट व काहीही सहन होत नाही;** प्रत्येक गोष्टीने तब्येत बिघडते– **आवाज, उजेड, वास,** वेदना वगैरे. सुजेचा टणकपणा. **फुटल्याप्रमाणे वेदना.** वेदना थांबतात व आचके येतात. शरीर वाळते. रक्तक्षय, पंडुरोग. जलोदर, नाळगुद. संधिवात. मुष्टिमैथुन, राग, थंडी, पडसे एकाएकी बंद होणे; चहा, दारू, पारा यामुळे उद्भवलेले दुष्परिणाम. मणके कुजून झालेली गळवे.

**मानसिक :–** हट्टी, उदासीन, निराश. न ऐकण्याची, दुसऱ्यांच्या भावना दुखविण्याची प्रवृत्ति. कुत्र्याची किंवा इतर जनावरांची भीती वाटते विशेषतः रात्री. आनंदी असताना एकाएकी ओरडून, किंचाळून गडबडा लोळणे. निरनिराळे विचार मनात येतात. शेख महंमदी मनोरथ रचण्याचे काम सुरू असते त्यामुळे झोप येत नाही. मनावर ताबा राहत नाही. बोलण्याचा कंटाळा. बोलताना लिहिताना चुका करणे, शब्दांची उलटापालट करणे. मानसिक श्रमाचा कंटाळा. मनात काही कल्पना होतात, शत्रू आपला छळ करीत आहे असे वाटते.

**डोके :–** मेंदू ठुसठुसतो, फुटल्यासारखा वाटतो, आत पाणी हालत आहे असे वाटते, डोलतो आहे असे वाटते, कवटीवर आपटतो आहे असे वाटते, मार लागल्याप्रमाणे हुळहुळा झाल्यासारखा वाटतो, विशेषतः कानशिलात. डोक्यात

फुटल्याप्रमाणे वेदना होतात. कानशिलात टोचते ठुसठुसते– आवाज, धक्का, थंड हवा, हालचालीने जास्त होते; जोराने दाबल्याने, चोळण्याने, घट्ट आवळण्याने बरे वाटते. केस ओढल्यासारखे वाटतात. केस विंचरलेले सहन होत नाही. चालताना घेऱ्या येतात, मागे पडू असे वाटते. मोकळ्या हवेत फिरताना डोक्याला खूप घाम येतो. डोक्याची त्वचा हुळहुळी. केसाना स्पर्श सहन होत नाही. डोकेदुखी डोके खालीवर हलविल्याने कमी होते.

**डोळे** :– डोळ्याभोवती काळी निळी वर्तुळे पडतात; पिवळे होतात; दाबल्यासारखे वाटतात; मीठ गेल्याप्रमाणे चुरचुरतात; आत वाळूचे कण खुपताहेत असे वाटते. रातांधळेपणा. भुवयात दुखते. बाहुल्या रुंद होतात. वाचण्याचा, लिहिण्याचा प्रयत्न केला तर डोळे दुखतात. डोळ्यातून जळजळीत पाणी येते.

**कान** :– पाळ्या लाल, कढत, सुजलेल्या. निरनिराळे आवाज होतात, डोके दुखताना, रक्तस्राव होताना नंतर घेरी येते. बहिरेपणा. दुर्गंधी पुवळलेला रक्तमिश्रित स्राव येतो.

**नाक** :– पडसे एकदम बंद होते नंतर डोके दुखावयास लागते. सहजासहजी नाकातून रक्त येते विशेषतः सकाळी उठताना. जोराच्या कोरड्या शिंका येतात. वास सहन होत नाही. नाकाभोवती गार घाम येतो.

**चेहरा** :– फिक्ट, मातट, पांढरा. तापात किंवा थंडी वाजताना लाल होतो. डोळ्याखालच्या भागात चाकूने भोसकून तोडल्या फाडल्याप्रमाणे वेदना होतात. चेहऱ्याच्या शिरा फुगतात विशेषतः तापात व घाम येताना. लाल कढत, पंजे गार.

**तोंड** :– ओठ काळे व कोरडे. दात ठुसठुसतात. अंगावर मूल प्यावयास लागले की दात दुखावयास लागतात, जोराने एकमेकावर दाबले किंवा शेकल्याने बरे वाटते. जिभेच्या शेंड्याची आग होऊन नंतर लाळ सुटते. तोंडातून रक्त पडते ( थुंकीतुन ). जीभ पांढरी, पिवळी, घाणेरडी. चव कडू किंवा अतिशय खारट किंवा तीक्ष्ण. पदार्थ जास्त खारट लागतात. प्रत्येक पदार्थ– पाणी सुद्धा कडू लागते.

**जठर** :– अन्नाचा तिटकारा. भूक अजिबात लागत नाही. रुचकर पदार्थ खावेसे वाटतात. मुलाना नेहमीच्या अन्नाचा कंटाळा येतो पण ती दुसरेच काहीतरी मागतात व खातात. थोडे खाल्ले की पोट भरल्यासारखे वाटते. खाण्याची

वासना नसताना भूक लागते, थोडे खाल्ले की अन्नाला रुची लागून भूक लागल्यासारखी वाटते. ढेकरा कडवट. दूध प्याले तर आंबट ढेकरा येतात. **ढेकरा येताना मोठा आवाज होतो पण त्याने बरे वाटत नाही.** अग्नि-मांद्य, अन्न लवकर पचत नाही. जठर हुळहुळे होते. तहान लागते, गार पाणी प्यावेसे वाटते पण त्याने जुलाब होतात. आंबट किंवा गोड पदार्थ खावेसे वाटतात. अपक्व अन्न ओकून पडते. वारंवार ओकावयास होते. उचकी लागते. रक्ताची ओकारी होते. थंडी वाजण्याचे अगोदर तहान लागते व ताप नसताना तहान लागते. ( तापात लागत नाही ). अंगावर मूल तोडल्या-नंतर सुरू झालेली मुलांची हगवण.

उदर :– वात धरून **फुगते**, नगाऱ्याप्रमाणे होते. गुदापासून जननेंद्रियापर्यंत वेदना होतात. यकृताचे मधुन मधुन विकार उद्भवतात. यकृत व पांथरी मोठी होते. यकृताचा शोथ, दाबलेले सहन होत नाही. पित्ताचे खडे होऊन वेदना होतात. वातामुळे आतड्यात वेदना होतात, अंग दुमडले म्हणजे बरे वाटते. कावीळ; संभोगातिरेक, हगवण, धुपणी, यामुळे उत्पन्न झालेली. उदरात व जठरात गारवा आल्यासारखा वाटतो. ***शौचास*–काळसर, दुर्गंधी, पाण्यासारखे, *रक्तमिश्रित*, वेदनारहित** होते; खाण्यानंतर व रात्री जास्त. फक्त रात्रीच जुलाब होतात. उन्हाळ्यात, फळे खाल्ल्याने, दूध, बीअर घेतल्याने हगवण लागते. मुलाचा जीर्णातिसार–मूल सुकते, बाहुल्या मोठ्या होतात, श्वास जलद चालतो, अंग गार पडते, विशेषतः कान, नाक. हनुवटी. शौचास नकळत होते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीतून रक्त जाते. वारंवार लघवी होते. वस्त्राच्या घर्षणाने मूत्र-मार्गाच्या मुखाची आग होते. लघवी; गढूळ, काळसर, थोडी.

**पुरुषजननेंद्रिये** :– स्वप्नावस्था वारंवार होऊन त्यामुळे अशक्तपणा वाटतो. वैषयिक विचार मनात येतात पण नपुंसकत्व. परम्यानंतर अंड व वीर्यवाहिनी नलिका सुजते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ काळसर, गाठ्याळ व भरपूर जातो. पाळी अतिशय लवकर, विटाळ जाताना कधी कधी छातीत व उदरात कळा येतात, पापण्या फुरफुरतात व बेशुद्धी येते, आचके येतात. रक्तमिश्रित धुपणी कित्येक वेळा पाळीच्या ऐवजी जाते. बाळंतपणानंतर संभोगेच्छा तीव्र होते. बाळंतपणानंतरचा विटाळ खूप व फार दिवस जातो.

**श्वसनेंद्रिये** :– श्वासोच्छ्वास जड व मंद. उशी न घेता निजल्यास श्वासोच्छ्वास करता येत नाही, फुफू करून श्वास घ्यावा लागतो, घुरघुर आवाज होतो.

प्रत्येक वेळी हालचाल करताना हृदय धडधडावयास लागते व श्वास घेताना त्रास होतो. हसताना व खाण्यानंतर खोकल्याची उबळ येते. श्वासनलिकेत कफ दाटल्यासारखा वाटून गुदमरते, संध्याकाळी व रात्री जास्त. दमट हवेत, शरद-ऋतूत किंवा शरिरातील स्त्राव गेल्यामुळे दमा होतो. **थुंकीतून रक्त जाते.** क्षय-कफ पुवळलेला. **छाती हुळहुळी होऊन दुखते** स्पर्श दाब सहन होत नाही आणि **तिकोनी हाडांच्यामध्ये पण हुळहुळेपणा येतो.**

**पाठ** :-- खांद्यावर, तिकोनी हाडांच्यामध्ये किंवा माकडहाडाच्या जागी जड ओझे ठेवल्यासारखे वाटते. पाठीभोवती चाकूने कापल्याप्रमाणे वेदना होतात. फार वेळ वाकून राहिल्याप्रमाणे पाठ दुखते. थोडी हालचाल केली की कमरेत कळा येतात.

**हातपाय** :- हातापायाना व सांध्यात लचक मारल्याप्रमाण वदना होतात, स्पर्शाने जास्त होतात, जोराने दाबले म्हणजे किंवा हालचालीने बरे वाटते. अशक्त, कापतात, बधिर झाल्यासारखे वाटतात. गुडघ्यात भिरभिरल्यासारखे वाटते. पायाभोवती पट्टा बांधला आहे असे वाटते. हाडांच्या पोकळीत दुखते. सांधे शिणल्यासारखे वाटतात विशेषतः सकाळी आणि बसले असताना. पंज्यांच्या शिरा फुगतात. हात मुठीवळून आपोआप लांब होतात. पंजे लिहिताना कापतात एक पंजा बर्फासारखा गार, दुसरा गरम. हाडे कुजावयास लागली म्हणजे एक-सारखा घाम येतो.

**झोप** :- गुंगी येते. गाढ झोप लागून घोरणे. काळजीयुक्त किंवा उंचावरून पडल्याची स्वप्ने पडतात. मुले घोरतात. निद्रानाशानंतर विकार सुरू होतात.

**त्वचा** :- स्पर्श सहन होत नाही पण जोराने दाबल्याने बरे वाटते. गार घाम येतो. कावीळ. एक पंजा बर्फासारखा गार दुसरा कढत.

**ज्वर** :- **ताप येण्याच्या अगोदर पूर्व चिन्हे चांगली होतात.** थंडी वाजणे, ताप चढणे व घाम येणे या अवस्था नियमितपणे होतात. थंडी वाजण्याच्या अगोदर तहान लागते, तापात लागत नाही, घाम येताना पुन्हा तहान लागते. तापात चेहरा लाल व कढत होतो व पंजे गार होतात. थंडी वाजताना गरम पांघरुणाने बरे वाटत नाही पण ताप भरला की पांघरूण नकोसे वाटते. एक, दोन, तीन दिवसाआड येणारे पाळीचे हिवताप. हाड्याज्वर-शरीरात कोठेही पू होण्याची क्रिया सुरू असल्यामुळे उद्भवलेला. रोगी भेदरट व चिडखोर होतो, तापामुळे इतका अशक्तपणा वाटतो की डोके उचलवत नाही, हगवण लागते. ताप नस-ताना तहान लागते. ***भरपूर घाम येतो*** विशेषतः ***रात्री*** किंवा जरा हालचाल

केली तर झोपेत किंवा पांघरूण घेतल्याबरोबर घाम येतो. निजलेल्या बाजूस घाम येतो, अशक्तपणामुळे घाम येतो. दोषी ज्वर.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** *शरीरांतील जीवनोपयोगी स्राव गेल्याने.* *स्पर्श.* धक्का. आवाज. *नियमित वेळी*– एक दिवसाआड, दर चौदा दिवसांनी. वास. थंडी वारे, झुळुक लागल्याने. मोकळी हवा. खाण्याने. फळे. दूध. मानसिक श्रम. रात्री, मध्य रात्री. शुक्लपक्ष. दर तीन महिन्यानी. शरद ऋतु. उन्हाळा. तंबाखू ओढल्याने. शौचास होत असताना व नंतर.

**क मी :–** जोराने दाबल्याने. चोळण्याने. सैल कपडे वापरण्याने. शेकल्याने. बंद खोलीत हातपाय पोटाशी घेतल्याने.

**सहाय्यक औषधे :–** आर्से; कलि-का; कॅल्क-फा; कार्बो-व्हेजि; फेरम.

**संबंधी औषधे :–** पल्स; फास्फ; फास्फ-ॲसि; मर्क्यु; लॅके; व्हेरा-आ; सल्फ.

---

## ३२७. सिंफायटम Symphytum

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम हाडे-चपटी हाडे; हाडावरील आवरण यावर होतो. दुखापत झालेल्या जागी अतिशय वेदना होतात. *हाडे मोडल्यानंतर* ती लवकर जुळून येत नाहीत. झिणझिण्या किंवा टोचल्याप्रमाणे वेदना, जखमा बऱ्या झाल्यानंतर, त्याना स्पर्श सहन होत नाही. डोळ्याच्या व चेहऱ्यावरील दुखापती. शिवणीत किंवा हाडाना भोसकून झालेल्या जखमा. हातपाय कापल्यानंतर राहिलेल्या थुंध्यात बेचैनपणा. पडणे, मार लागणे यामुळे उद्भवलेले दुष्परिणाम. संभोगातिरेकामुळे पाठ दुखावयास लागते; किंवा कुस्ती खेळल्यानंतर उद्भवलेली पाठदुखी. स्नायुबंधाना झालेल्या दुखापती. जठरातील व्रण. मणके कुजून त्यामुळे उत्पन्न झालेली गळवे. गारपणा.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** *दुखापती.* बोथट हत्यारानी लागलेला मार. स्पर्श संभोगातिरेक.

**संबंधी औषधे :–** आर्नि; कॅल्क-फा.

---

## ३२८. सेड्रन Cedron

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम मज्जातंतू व रक्त यावर होतो. *अगदी ठराविक वेळी विकार उद्भवतात* विशेषतः वेदना. विषारी जनावरांनी

चावल्यामुळे झालेले दुष्परिणाम. डोळयाभोवती वेदना होतात. **डोळयांची भाजल्याप्रमाणे आग होते.** डोळे लाल होतात. संभोगानंतर भुवईत वेदना होतात. डोळयातून कढत पाणी येते. वस्तु दिवसा पिवळया दिसतात व रात्री लाल दिसतात. बधिरपणा. थंडी वाजण्याच्या अगोदर बेचैनपणा येतो. हिवताप – उष्ण देशात, दलदलीच्या जागेत, उष्ण दमट हवेत उत्पन्न झालेला; यकृत व पांथरी मोठी होते. संभोगानंतर स्त्रियांना कंपवात होतो व पुरुषाना वेदना व्हावयास लागतात. संभोगानंतर तोतरे बोलणे. सर्वांग बधिर होते. कंप. आंगठयाच्या ( उजव्या ) उंचवट्यावरुन एकाएकी वेदना व्हावयास लागून त्या हातातून वर खांद्यापर्यंत जातात; त्याच प्रमाणे पावलातून (उजव्या) गुडघ्यापर्यंत वेदना होतात त्यामुळे जमिनीवर बसणेच भाग पडते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– नियमित वेळी, ठरलेल्या तासाला, झोपेनंतर.

**ब वा** :– ताट उभे राहिल्याने.

---

## ३२९. सनगा Senega,

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा–छातीची*, **डोळयाची**, नाकाची, मूत्राशयाची; स्नायू व डावी बाजू यावर होतो. **श्लेष्मल त्वचेचे स्राव वाढलेले**, भरपूर बुळबुळीत स्राव जातात. **भाग निर्जीव होतात** (लुले पडतात), विशेषतः डोळ्याचे स्नायू. वृद्ध इसम. **लठ्ठ गुटगुटीत मुले.** शरीर शिथिल. **श्वसनेंद्रियात आग होते.** अशक्तपणा छातीत जास्त जाणवतो. मोकळया हवेत चालण्याने मूर्च्छा येते. विषारी जनावरे चावल्यामुळे झालेले विकार. लचक.

**मानसिक** :– भांडण्याची प्रवृत्ति. काळजी वाटते. श्वास जलद चालला असताना.

**डोके** :– डोके डोळ्याच्या आतपर्यंत दुखते, गार वारे लागल्याने बरे वाटते. कपाळात फुटल्याप्रमाणे वेदना होतात.

**डोळे** :– फुगून मोठे झाल्यासारखे वाटतात; बर्फाचे गार चेंडू झाल्यासारखे वाटतात. पापण्या लुल्या होऊन खाली पडतात; एकाच्या दोन वस्तू दिसतात; डोळयातून भरपूर पाणी येते, डोळ्यांचे विकार डोके मागे वाकविल्याने कमी होतात. पापण्यांच्या कडा कोरड्या व त्यावर खपल्या बसतात. वारंवार डोळे पुसावेसे वाटतात. वस्तु सावलीत आहेत असे दिसते. खोकताना डोळ्यात खुपते.

**नाक** :- इतक्या शिंका येतात की त्यामुळे घेरी येते. नाकात तिखट गेल्याप्रमाणे आग होते.

**चेहरा** :- डावी बाजू लुली पडते. ओठांच्या कोपऱ्यात पुटकुळ्या येऊन त्यात आग होते.

**तोंड** :- तोंड, घसा व छातीत कोरडेपणा येऊन खरवडल्यासारखे वाटते, बोलताना जास्त होते. चव; तांब्याप्रमाणे, लघवीप्रमाणे खाकरताना चिकट श्लेष्मा तुकड्या तुकड्यानी पडतो.

**जठर** :- मळमळते, अन्नाचा तिटकारा येतो, ओकावयास होईल असे वाटते.

**मूत्रेंद्रिये** :- लघवीतून श्लेष्मा व धागे जातात. लघवी होण्याचे अगोदर व नंतर भाजल्यासारखी आग होते. लघवी फेसाळ, कधी कमी कधी जास्त होते.

**श्वसनेंद्रिये** :- आवाज घोगरा किंवा अस्थिर होतो, गारठ्यामुळे किंवा वीर्यपातामुळे. बोलताना त्रास होतो. खोकताना पाठीत फुटल्याप्रमाणे वेदना होतात. छाती अरुंद झाल्यासारखी वाटते. छातीत घुरघुर वाजते, परंतु कफ भरपूर असला तरी चिकट असल्यामुळे पुढे येऊन मागे जातो. एकसारखा खोकला येतो त्याने गुदमरल्यासारखे वाटते व शेवटी शिंका येतात; खोकला उजव्या कुशीवर निजल्याने किंवा संध्याकाळी जास्त होतो. कफ चिकट, स्वच्छ, बुळबुळीत किंवा थोडा रक्तमिश्रित. जिना वगैरे चढताना छाती दाटल्यासारखी वाटते. छातीत ठिकठिकाणी हुळहुळेपणा वाटतो किंवा मार लागल्याप्रमाणे वाटते. खाली वाकल्याने वेदना एका बाजूकडून दुसरीकडे जातात. प्लुरिसी, न्युमोनिआ. वृद्ध इसमांचा जीर्ण खोकला किंवा दमा. छातीवर ओझे ठेवून ठेचल्याप्रमाणे वाटते किंवा ती अशक्त झाली आहे असे वाटते. खोकला येण्याचे अगोदर किंवा नंतर छातीत आग होते

**पाठ** :- पाठीत मूत्रपिंडाच्या जागेत फुटल्याप्रमाणे वेदना होतात

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :- हवा- मोकळी, वारे लागल्याने. गार हवा नाकाने आत घेतल्याने. विश्रांती. दाबल्याने. स्पर्श. टक लावून बघण्याने.

**ब वा** :- हालचालीने. मोकळ्या हवेत. डोके मागे वाकविल्याने.

**संबंधी औषधे** :- कॅल्क-का; फास्फ; लायको; सल्फ; हेपार.

---

## ३३०. सेनेसिओ Senecio Aureus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***स्त्रीजननेंद्रिये, मूत्रेंद्रिये***; **मूत्राशय;** ***श्लेष्मल गाठी***; नाक; फुप्फुसे; कंबरेतील कणा यावर होतो. जननेंद्रिये व मूत्रेंद्रिये याच्यावर निवड केलेल्या औषधाचा व्हावा तसा परिणाम होत नाही. श्लेष्मल त्वचेचे स्राव वाढतात. **स्राव थकवा आणणारे** असतात किंवा एका स्रावाऐवजी दुसरा स्राव वाहतो. स्नायू ओढल्यासारखे वाटून त्यांच्या गाठी होतात. दाटल्यासारखे वाटते– नाकात, घशात वगैरे. गोळा आल्यासारखे वाटते. **घाबरट, फिकट, अशक्त, झोप न येणाऱ्या स्त्रिया.** रक्तस्राव होण्याची प्रवृत्ति. योग्य वयात विटाळ न सुरू झाल्यामुळे किंवा बंद झाल्यामुळे, जखमामुळे उद्भवलेले दुष्परिणाम. रक्तस्रावानंतर, किंवा पंडुरोगात आलेली जलयुक्त सूज.

**मानसिक** :– चिडखोर, कुरकुर करणे. हर्षाने फुगणे व दुःखी आलटून पालटून. स्वतः संबंधीच विचार करण्याची प्रवृत्ति. एकाच विषयात मन एकाग्र होत नाही.

**डोके** :– डोक्याच्या मागील भागापासून कपाळापर्यंत वेरीच्या लाटा आल्यासारखे वाटते. डाव्या डोळ्यावर व डाव्या कानशिलातून तीव्र चमका मारतात.

**नाक** :– नाकपुड्यात आग होते, **शिंका येतात** व नाक खूप गळते. नाकात दाटल्यासारखे वाटते.

**डोळे** :– डोळ्यातून पाणी आल्यामुळे कंड सुटते.

**तोंड** :– तोंडाभोवती कंप होतो, थरथरते. तोंड व घसा कोरडा पडतो. घशात, कर्णनलिकेत कंड सुटते. घशात दाटल्यासारखे वाटल्यामुळे दुखत असले तरी सारखे गिळावेसे वाटते.

**जठर** :– आंबट ढेकरा येतात. पूर्वी आवड असून सुद्धा गोडाचा तिटकारा. मळमळ व ओकाऱ्या विशेषतः मूत्रपिंडाच्या विकारामुळे होणाऱ्या. जठरांतून घशात गोळा वर जातो आहे असे वाटते.

**उदर** :– बेंबीभोवती पेटके येतात व ते सर्व उदरात पसरतात; शौचास झाल्याने बरे वाटते. शौचास पाण्यासारखे होते पण त्यात मधुन मधुन टणक खडे पडतात. शौचास कुंथून कुंथून काळे, पातळ, रक्तमिश्रित होते. विटाळ बंद झाल्यामुळे झालेले जलोदर.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी थोडी रक्तमिश्रित. मूत्राशयात किंवा मुखाशी आग होऊन वारंवार लघवीला लागते व कष्टाने थोडी थोडी होते. मूत्रपिंड दुखतात; मूत्रपिंडातील खड्यामुळे उद्भवलेल्या वेदना. मुलाना वारंवार लघवीला लागून त्यांचे डोके दुखते.

**पुरुषजननेंद्रिये** :– वैषयिक स्वप्ने पडून स्वप्नावस्था होते. मूत्रग्रंथि मोठी होते, टणक व सुजल्यासारखी वाटते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– न्हाण योग्य वेळी येत नाही. तरुण मुलींचा विटाळ बंद होतो. व त्यामुळे पाठ दुखते, खोकला येतो, जलयुक्त सूज येते वगैरे. विटाळ सुरू होण्याच्या अगोदर घशात, छातीत व मूत्राशयात शोथ होतो. कष्टार्तव– वारंवार थोडे थोडे कष्टाने लघवीला होते. विटाळ खूप जातो व त्यामुळे पंडुरोग होतो. वैषयिक क्षोभामुळे स्राव जावयास लागतो. धुपणी दाट पिवळी मांड्यापर्यंत वाहते. विटाळ सुरू होईल असे वाटते, पण होत रजःपिंडापासून स्तनात वेदना होतात. डाव्या स्तनाग्रात आग होते. वैषयिक क्षोभामुळे योनिद्वाराला कंड येते, आग होते व सुजते.

**श्वसनेंद्रिये** :– घशात गुदगुल्या होऊन खोकला येतो. कफात रक्त पडते. विशेषतः विटाळ न सुरू झाल्यामुळे. खोकला ओला पण श्वासोच्छ्वास जड होतो. जिना चढताना दम लागतो. खोकला कोरडा, खोकताना छातीत टोचते.

**पाठ** :– कमरेत मोडल्याप्रमाणे वेदना होतात विशेषतः विटाळ बंद झालेल्या स्त्रियांच्या किंवा मूत्रपिंडाच्या विकारामुळे.

**हातपाय** :– मधुन मधुन सांधे दुखतात. वेदना एका सांध्यातील थांबून दुसऱ्या सांध्यात सुरू होतात. अंथरुणात निजल्यावर पावले गार होतात. नखे ठिसूळ.

**त्वचा** :– कोरडी.

**झोप** :– अनेक तऱ्हेची स्वप्ने पडतात विशेषतः वैषयिक. झोप येत नाही– विटाळ बंद झालेल्या किंवा गर्भाशयाचे विकार असलेल्या स्त्रियांना.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– न्हाण येण्याच्या वयात. वैषयिक क्षोभामुळे, दमटपणा. थंडी मोकळी हवा. बसल्याने; हालचाल करणे भाग पडते.

**ब वा** :– विटाळ सुरू झाल्याने.

**संबंधी औषधे** :– पल्स; सेपि.

---

## ३३१. सेपा ( लाल कांदा ) Allium cepa

**सर्वसाधारणः**–या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा–नाकाची, डोळ्याची,* **कंठाची** व आतड्याची; मज्जातंतू; डावी ते उजवी बाजू यावर होतो. तीव्र स्वरूपाची सर्दी होते. **वेदना होतात**–एकदम कळा येतात किंवा अगदी **बारीक रेघ मारल्याप्रमाणे वेदना होतात.** आग होते– नाकात, घशात, तोंडात, मूत्राशयात त्वचेची वगैरे. शरीर निराळ्या ठिकाणी तप्त झाल्यासारखे वाटते. मार लागल्यानंतर मज्जातंतूतून होणाऱ्या वेदना. गाणाऱ्यांची सर्दी वृद्धपणी शरीर कुजते. शस्त्रक्रियेनंतर किंवा दुखापतीमुळे उद्भवलेल्या जीर्ण वेदना.

**मानसिक** :– वेदना असह्य होतील अशी भीती वाटते.

**डोके** :– कपाळात ठणका लागून तो डोळ्यात व चेहऱ्यावर पसरतो, नाक वाहिल्याने किंवा विटाळ सुरू झाल्याने बरे वाटते, पण विटाळ थांबला की पुन्हा दुखते. टाळूवर चुरचुरणारा घाम येतो दर वेळी जेवणाने जास्त.

**डोळे** :– लाल, आग होते, चुरचुरतात. **डोळ्यातून पाणी येते**, खोकताना जास्त, सारखे चोळावेसे वाटतात.

**कान** :– कानात ठणका लागतो व तो घशात जाणवतो.

**नाक** :– *वारंवार जोरजोराने शिंका येतात, भरपूर पाणी वाहते,* त्याने आग होऊन चुणचुणते. नाकातून थेंब थेंब पाणी गळते किंवा पडजिभेतून गळते. नाकाच्या बुंध्यात गोळा बसला आहे असे वाटते. सर्दी झाली म्हणजे डोके दुखते, खोकला येतो व आवाज बसतो. वास सहन होत नाहीत.

**चेहरा** :– एक बाजू लुळी पडते व त्याच बाजूचे हात, पाय लुळे पडतात.

**घसा** :– हुळहुळा होतो, कानापर्यंत जाणवते. पडजिभेतून थेंब गळतात. आत गोळा बसला आहे असे वाटते. मोठा घास गिळला आहे असे वाटते.

**जठर** :– खा खा सुटते, तहान लागते; मळमळते, ढेकरा येतात. कच्चा कांदा खावासा वाटतो.

**उदर** :– वात धरून वेदना होतात– बसल्याने किंवा हालचाल केल्याने वेदना जास्त होतात. वातामुळे उदरात गुरगुरते, दुर्गंधी वात सरतो. गुदद्वारात कंड सुटून मेगा पडतात. गुद कढत झाल्यासारखे वाटते.

**मूत्रेंद्रिये :–** भरपूर लघवीला होते; सर्दी असताना. पाय ओले राहिल्याने लघवीला कष्टाने होते. वृद्धपणी लघवी थेंब थेंब होते.

**स्त्रीजननेंद्रिये :–** चिमट्याने मूल काढल्यानंतर पायाना सूज येते.

**श्वसनेंद्रिये :–** **गुदगुल्या होऊन एकसारखा खोकल्याचा ठसका लागतो. खोकला येताना कंठ फाडल्याप्रमाणे किंवा दुभंगल्याप्रमाणे वाटतो** त्यामुळे खोकला न येऊ देण्याची प्रवृत्ति किंवा कंठ धरून ठेवावासा वाटतो. **आवाज बसतो,** गाताना बोलताना त्रास होतो. वृद्धपणीचा खोकला. बोलताना, गाताना कंठ दुखतो.

**हातपाय :–** कापल्यानंतर राहिलेल्या बुंध्यात वेदना होतात. पावले ओल्यात राहिल्याने उद्भवलेले दुष्परिणाम. फार चालण्यामुळे हुळहुळी झालेली पावले. सांधे अशक्त वाटतात. हातपाय विशेषतः हात हुळहुळे व थकल्यासारखे वाटतात.

**झोप :–** जांभया येतात, डोके दुखते व गुंगी येते. गाढ झोप लागली असताना जांभया देणे.

**त्वचा :–** लाल रेघा खालून वर येतात. बाळंतपणानंतर झालेले नखुरडे.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** संध्याकाळी. ***गरम बंद खोलीत.*** **पावले ओल्यात राहिल्याने.** गाताना. **दमटपणा.** वसंतऋतु.

**ब वा : –** गार मोकळी हवा. आंघोळीने. हालचाल केल्याने

**सहाय्यक औषधे :–** थूजा; पल्स; फास्फ; सार्सा.

**संबंधी औषधे :–** कलि–आयो; गेल्से; युफ्रे.

---

## ३३२. सेपिआ Sepia

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम ***स्त्रीजननेंद्रिये***; **पचनेंद्रिये; मज्जातंतू व त्वचा यावर होतो. पुष्ट पण शिथिल व अवयवाना खाली ओढ लागणाऱ्या स्त्रिया. अवयवांचा भ्रंश होण्याची प्रवृत्ति**–गर्भाशय वाकडे होणे, योनीतून बाहेर येणे, योनी बाहेर येणे वगैरे. सहज सांधे निखळण्याची प्रवृत्ति. **लक्षणे पाठीत स्थिर होतात** किंवा खालून वर जातात–गुदातून, योनीतून वगैरे, किंवा मागे जातात डोक्यातून, रजःपिंडातून, आतड्यातून वगैरे, किंवा लक्षणे होताना कापरे भरते. **आत *गोळा बसला आहे असे***

वाटते किंवा इकडे तिकडे काहीतरी फिरत आहे असे वाटते. अशक्त, पोकळ झाल्यासारखे वाटते– पोटाच्या खळीत, छातीत, स्नायूत, कमरेत, कमरेच्या सांध्यात, गुडघ्यात वगैरे; किंवा भरल्यासारखे वाटते. गर्भाशयाच्या विकारामुळे उद्भवलेले इतर उपद्रव. वाखा होण्याची प्रवृत्ति, विशेषतः ५ ते ७ व्या महिन्यात. सहजासहजी मूर्च्छा येते. उबदार जागेतसुद्धा अंग गार झाल्यासारखे वाटते. थोड्या श्रमाने थकवा येतो. शरीरांतर्गत किंवा सर्व शरीरात ठुसठुसल्यासारखे वाटते. स्राव दुधासारखे पांढरे. रक्तस्राव होण्याची प्रवृत्ति. अंगावर पिवळे किंवा पिंगट चट्टे पडण्याची प्रवृत्ति. गरोदरपणी, बाळंतपणानंतर व अंगावर मूल दूध पीत असताना होणारे उपद्रव. नाजुक प्रकृतीचे तरुण स्त्रीपुरुष. संभोगातिरेकाने खंगलेले किंवा वैषयिक कल्पनेने क्षुब्ध होणारे इसम. दारू, आघात, दुखापती, जड पदार्थ उचलणे ( अग्निमांद्य ), राग, त्रास या कारणाने उद्भवलेले उपद्रव. हवेत फरक झाल्यामुळे सर्दी होणारी मुले. एकदम मधून मधून बेचैनपणा येतो. लठ्ठ, शैथिल्य आलेल्या मोठ्या पोटाच्या स्त्रिया. उकळलेले दूध पिण्याने झालेले उपद्रव आचके, अंग ताठते. मोहनिद्रा. यकृताचे किंवा गर्भाशयाच्या विकाराने पछाडलेले क्षयी इसम. गुडघे टेकून बसल्याने मूर्च्छा येते. सर्वांगांत ठुसठुसते. अतिश्रमाने, शरीरातील स्राव ( धुपणी, रक्तप्रदर वगैरे ) यानी खंगलेल्या स्त्रिया. रेंगाळणारे विकार, खोकला, ताप वगैरे.

**मानसिक** :– संतापी, चिडखोर, सहज अपमान होतो. केविलवाणे. वेदना सहन होत नाहीत. क्षुद्र गोष्टीविषयी काळजीयुक्त भीती वाटते. स्वतःच्या कुटुंबातील प्रेमाच्या माणसांचा तिटकारा वाटतो. एकटे असण्याची भीती वाटते पण मंडळीत बसण्याचा तिटकारा वाटतो. आपल्याबद्दल कोणी सहानुभूति दाखवू नये असे वाटते. भावनांचा कोंडमारा. विरोध बिलकुल खपत नाही. मंडळीत बसल्याने द्वेष व राग येऊन तो आपल्या प्रेमाच्या माणसावर काढणे. चिडखोर, खिन्नता, बेपर्वा किंवा कुढेपणा. मनात सारखे वैषयिक विचार येतात. स्वतःच्या तब्येतीविषयी किंवा घरातील सांसारिक कामासंबंधी खिन्नता. कोठेतरी जावेसे वाटते. स्वस्थ बसून हो किंवा नाही वगैरे एखाद्या शब्दानेच उत्तरे देणे. स्मरणशक्ति मंद, लिहिताना वाचताना चुका होतात. लक्षणे सांगताना रडू येते. स्त्रियांना पुरुषांचा व पुरुषांना स्त्रियांचा तिटकारा वाटतो. दुसऱ्याना त्रास देण्यात सुख वाटते. नेहमीचा कामाचा तिटकारा. आत्महत्या करावीशी वाटते. घाबरटपणामुळे आपण कशाला तरी धरले नाहीत किंवाळ

असे वाटते. काहीतरी विचित्र बोलणे किंवा करणे. काय करील किंवा करणार नाही हे दुसऱ्याना समजत नाही. खुळेपणा. मधुन मधून रडण्याचे झटके येतात. **बेपर्वा.**

**डोके** :– घेरी– डोक्याभोवती काहीतरी फिरत आहे असे वाटते, हाताची हालचाल केलीतर व मोकळया हवेत चालताना जास्त येते. डोकेदुखीचे भयंकर झटके येतात विशेषतः विटाळसेपणी व विटाळ थोडा असताना. डाव्या डोळयावर डोके दुखते किंवा डोक्याच्या मागील भागाच्या दोन्ही बाजू आलटून पालटून दुखतात व त्यावर निजलेले सहन होत नाही. टाळू जड किंवा **गार** होते. डोक्यात एकदम तीव्र कळा येतात किंवा फुटल्यासारखे वाटते. डोके दुखत असताना, मळमळते, ओकावयास होते, संभोगाची इच्छा होते; वेदनामुळे रडावयास होते. डोकेदुखीबरोबर कावीळ होते. अर्धशिशी डोक्याला पुढेमागे झटके बसतात, हिस्टेरिआत. मुलांची टाळू उघडी असताना किंवा वेदना होताना केस गळून पडतात, विंचरलेले सहन होत नाही. कपाळावर केसांच्या कडेला पुटकुळया येतात. लहान मुलांची टाळू उघडी राहते. टाळु गार व जड.

**डोळे** :– **पापण्या खाली पडतात.** पापण्याच्या कडा लाल होऊन त्यांना कंड येते. डोळे गळून पडत आहेत असे वाटते. दृष्टीपुढे काळे ठिपके दिसतात; ज्वाला, वेड्यावाकड्या रेघा वगैरे दृष्टिभ्रम होऊन नंतर शक्तिपात होतो. दृष्टिमांद्य– अतिसंभोग, मुष्टिमैथुन, गर्भाशयाच्या विकारामुळे आलेले. विटाळसेपणी एकाएकी दिसेनासे होते, निजल्याने बरे वाटते. उजेडाचे परावर्तन सहन होत नाही. पापण्यांचा कॅन्सर. स्त्रियाना होणारा मोतिबिंदु.

**कान** :– दाट, पिवळा, दुर्गंधी पू येतो. कानाच्या मागे व मानेवर वेदनायुक्त पुरळ येते. कानाच्या पाळ्या सुजून त्यावर पुरळ येते. आवाज सहन होत नाही किंवा गाणे. कानांत बूच बसल्यासारखे वाटून एकाएकी ऐकू येईनासे होते.

**नाक** :– **वासांची किळस येते,** शिजत असलेल्या अन्नाचा वास सहन होत नाही. ***नाकावर पिंगट रंगाचा पट्टा येतो,*** नाकाच्या बुंध्याशी दाबल्याप्रमाणे दुखते. दाट हिरवा शेंबूड येतो किंवा हिरव्या खपल्या बसतात. नाकातून दुर्गंधी गोळे पडतात, कधी ते इतके मोठे असतात की ते घशात ओढून घेऊन थुंकावे लागतात त्यामुळे ओकावयास होते. जुनाट सर्दी. पिनस. सर्दी झाली म्हणजे डोक्याचा मागील भाग दुखतो व हातापायाना ओढ लागते. नाकाला जरा धक्का लागला तर, किंवा पाळीत नाकातून रक्त येते.

**चेहरा** :– डोळयाभोवती काळी वर्तुळे पडतात. चेहऱ्याचा रंग वारंवार बदलतो. चेहऱ्यावर पिवळे चट्टे पडतात विशेषतः गरोदरपणी. गालाचे उंचवटे बधिर होतात. चेहरा फिकट, फुगीर, खालचा ओठ सुजतो व त्यात भेगा पडतात. ओठाचा कॅन्सर. म्हाताऱ्यासारखा, सुरकुतलेला व चट्टे पडलेला. पाळीच्या अगोदर चेहऱ्यावर यौवनपीटिका येतात.

**तोंड** :– भाजल्यासारखे वाटते. दात संध्याकाळी ६ ते रात्री १२ पर्यंत दुखतात, निजल्याने जास्त. विटाळसेपणी गरोदरपणी किंवा सर्दी झाली म्हणजे दात दुखतात. चव-आंबट, खारट किंवा कडू आंबट. जीभ घाणेरडी पण विटाळसेपणी स्वच्छ होते.

**घसा** :– सकाळी दुर्गंधी कफ किंवा बारीक गोळ्या खाकरून थुंकाव्या लागतात. घशात सर्दी होऊन नंतर ती वर येते. आग होते, खरवडल्यासारखा वाटतो, खाकरल्याने जास्त. कोरडा होतो; गोळा बसला आहे असे वाटते.

**जठर** :– ढेकरावाटे चिकट फेसाळ कफ बाहेर येतो. **अन्नाच्या कल्पनेने किंवा वासाने मळमळावयास लागते.** तीव्र खा खा सुटते. आंबट पदार्थ गोडपदार्थ खावेसे वाटतात– लोणची वगैरे. प्रत्येक पदार्थ जास्त खारट लागतो. खाण्यानंतर ओकावयास होण्याची प्रवृत्ति, **ओकारीत** घट्ट पदार्थ पडतात किंवा दुधासारखे द्रव्य पडते; गरोदरपणी, सकाळी. दूध पचत नाही विशेषतः उकळलेले. तंबाखूच्या सेवनाने किंवा अति ओझे उचलल्यामुळे आलेले अग्निमांद्य. पोटात काहीतरी पिळले जात असून ते वर घशात चढत आहे असे वाटते. **पोटाच्या खळीत गळून गेल्यासारखे वाटते** पण खाण्याने बरे वाटत नाही; गोळा बसला आहे असे वाटते. जठरातील अस्वस्थपणा ओकारीनंतर जास्त होतो.

**उदर** :– पित्ताशयात पेटके येतात वाकल्याने जास्त. यकृत हुळहुळे होते व दुखते, उजव्या कुशीवर निजल्याने बरे वाटते. वात धरून फुगते व त्यावेळेस डोके दुखते. **ओटीपोटात** जडपणा वाटतो; **खाली ओढ लागल्यासारखी वाटते** किंवा ते गळून पडत आहे असे वाटते त्यामुळे ते धरून ठेवावेसे वाटते किंवा पायाची आढी घातल्याने बरे वाटते. उदरावर अनेक पिंगट चट्टे पडतात; ते खाली लोंबते. मलावरोध– पाच पाच सहा सहा दिवस शौचास लागत नाही, नंतर शौचास होताना इतके कुंथावे लागते की घाम फुटतो, अतिशय कुंथून बोटाच्या मदतीने थोडेसे होते त्यानंतर बचकभर पिवळी, पिवळट पांढरी, दुर्गंधी आंव पडते. कफाने चिकटलेल्या शेळीच्या लेंड्याप्रमाणे खडे होतात,

किंवा मोठाले खडे होतात. उकळलेले दूध प्याल्याने जुलाब होतात. गुदात आवळल्यासारखे वाटते; **गोळा बसला आहे असे वाटते.** तान्ह्या मुलाची हगवण विशेषतः उकळलेल्या दुधामुळे होत असलेली, मूल जलद वाळते. गुदद्वार बाहेर येते. गुदद्वारातून एकसारखे पातळ द्रव्य झिरपते. मूळव्याध बाहेर येते, त्यात टोचते. चालताना किंवा शौचास होताना मोड बाहेर येतात. गरोदरपणाची मूळव्याध.

**मूत्रेंद्रिये** :– *लघवी; दुर्गंधी, दाट, खाली चिकट लाल वाळूचा थर जमतो* किंवा पांढरा खरखरीत गाळ साचतो. लघवी हळुहळू होते; होण्याच्या अगोदर मूत्राशयात कापल्याप्रमाणे वेदना होतात. पहिल्या झोपेत लघवीला नकळत होते. खोकताना, शिंकताना, हसताना, एकदम जोराने दार आपटले तर, भीतीने किंवा मन दुसरीकडे गुंतविल्याने लघवीला नकळत होते त्यामुळे विशेषतः स्त्रियाना लघवी होण्याच्या क्रियेवर सारखे लक्ष ठेवावे लागते. लघवीला झाली नाही तर सर्वांगाला शहारे येतात. लघवी रक्तमिश्रित किंवा दुधासारखी.

**पुरुषजननेंद्रिये** :– गार, दुर्गंधी घाम येतो. जुनाट परमा-स्राव रात्रीच फक्त वाहतो. बोंडीवर मासांकुराची वाढ. शारीरिक अशक्तपणा असला तरी संभोगाची जास्तच इच्छा होते. संभोगानंतरचे उपद्रव. नपुंसकत्व.

**स्त्रीजननेंद्रिये** :– संभोगानंतर गळून गेल्यासारखे वाटते. संभोगाच्या कल्पनेने मळमळावयास लागते, चिडखोरपणा येतो. पाळ्या अनियमित– पाळी लवकर आली तर विटाळ जास्त जातो, उशिरा आली तर विटाळ थोडा जातो. न्हाण येण्याच्या वयात विटाळ सुरू होत नाही किंवा मूल अंगावरचे तुटल्यानंतर विटाळ सुरू होत नाही. नष्टार्तव. गर्भाशयात आग होते, टोचते, आवळल्यासारखे वाटते ( मुखात ). बाळंतपणानंतर गर्भाशय पूर्वस्थितीवर येत नाही. *गर्भाशयात अशक्तपणा वाटतो. किंवा त्याला जोराने खाली ओढ लागते.*– सर्व अवयव योनीतून बाहेर येत आहेत की काय असे वाटते त्यामुळे पायांची घट्ट आढी घालणे किंवा तो भाग हाताने धरून ठेवणे भाग पडते. गर्भाशयाची सूज– दाब सहन होत नाही, कमरेत दुखते व वारंवार लघवीला लागते. धुपणी, दुर्गंधी मोठमोठ्या गाठी पडतात, पिवळी, हिरवट, कंड येते. लहान मुलींची धुपणी. गरोदरपणी– तांबुस हिरवट स्राव जातो, उदर हुळहुळे होते, गर्भाची हालचाल सहन होत नाही. बाळंतपणानंतर दुर्गंधी करवडणारा विटाळ जातो– त्यामुळे बराच वेळ चावल्यासारखे वाटते.

योनी कोरडी, संभोग करताना दुखते. पाचव्या, आठव्या महिन्यात गर्भपात होण्याची सवय. विटाळ थांबण्याच्या वयात सुरू झालेला रक्तप्रदर. विटाळ थांबण्याच्या वयात एकाएकी अंगात कढत लाटा येतात, अशक्तपणा वाटतो व घाम येतो. योनिद्वार सुजते, पू येतो; आवती भोवती पुरळ येते. स्तनाग्राना भेगा पडून त्यातून रक्त येते, योनी व योनिद्वार पाळीनंतर कोरडे पडते त्यामुळे चालताना बरे वाटत नाही. संभोगाचा तिटकारा.

**श्वसनेंद्रिये** :– थकवा आणणारा कोरडा खोकला. खोकला पोटातून येत आहे असे वाटते. सकाळी खोकला येऊन खूप खारट कफ पडतो. खोकला डाव्या-कुशीवर निजल्याने किंवा एकदम हवेत फरक पडल्याने जास्त होतो. कफ दुर्गंधी. खोकताना कुजलेल्या अंड्याप्रमाणे घाण येते. रेंगाळणारा डांग्या खोकला. झोपेतून जागे झाल्यानंतर दम लागतो, जलद चालण्याने कमी होतो.

**हृदय** :– रुधिराभिसरण अनियमित; रक्त तुंबले आहे असे वाटते. हृदयाची धडपड डोळ्यानी दिसते व ती डोक्याच्या मागील भागापर्यंत होते. सर्वांगात ठुसठुसते. रात्री रक्तवाहिन्यात खळबळ झाल्यासारखी वाटते, रक्तवाहिन्या तुडुंब भरून चालल्या आहेत असे वाटते. एखादा ठोका केव्हातरी टणक लागतो. डाव्या कुशीवर निजल्याने धडधडावयास लागते.

**मान व पाठ** :– कालर घट्ट झाल्यासारखी वाटते. तिकोनी हाडांच्या मध्ये: *कमरेत* ठणका लागतो. कंबर मोडल्यासारखी वाटते त्यामुळे ती दाबून धरावीशी वाटते. **तिकोनी हाडांच्या मध्ये गार झाल्यासारखे वाटते.** पाठदुखी टणक पदार्थाने दाबल्याने किंवा टणक जागेवर निजल्याने, टेकर आल्याने कमी होते, गुडघे टेकून बसल्याने किंवा वाकल्याने जास्त दुखते. पाठ ताठते, चालल्याने बरे वाटते. हातोड्याचा ठोका मारल्याप्रमाणे एकाएकी पाठ दुखावयास लागते, खाली वाकल्याने जास्त. तिकोनी हाडामधे बर्फासारखे गार वाटते. कांही झाले तरी कंबर धरते.

**हातपाय** :– पाठ ताठतात. लुले झाल्यासारखे वाटतात, आखुड होऊन ताणल्या-सारखे वाटतात. हातपाय अस्वस्थ, त्याना रात्रंदिवस धक्के बसतात आणि थरथरतात. टाचा दुखतात. पाय व **पावले गार पडतात** विशेषत: संध्याकाळी किंवा अंथरुणात. गुडघे किंवा टाचा गार होतात. पंजे निळे होतात. पंजे कढत असले तर पावले गार असतात किंवा पावले कढत असली तर पंजे गार होतात. तळपायाना खूप दुर्गंधी घाम येतो त्यामुळे बोटांच्या बेचक्या

सोल्वटतात. गृध्रसिवात गरोदरपणी कमी होतो. पायावरून उंदीर पळत आहे असे वाटते. थोडेसे चालले तरी थकवा येतो.

**त्वचा** :– **ठिकठिकाणी चट्टे पडण्याची प्रवृत्ति.** त्वचा खरखरीत, टणक, भेगा पडलेली विशेषतः सांध्याच्या बेचकांत. ओठा–तोंडा–नाकाभोवती पुटकुळ्या येतात. गजकर्ण. भाजल्यासारखे फोड येऊन त्याना कंड सुटते. खाकेत गळवे येतात. कोपऱ्याच्या सांध्यावर जाड खपल्या बसतात. लहान सांध्यावर व्रण पडतात. पित्ताच्या गांधी मोकळया हवेत जास्त होतात, खोलीच्या उष्णतेने कमी होतात. गजकर्ण. वसंत ऋतूत जास्त होते. त्वचेच्या घर्षणाने जाड होऊन ती नीळसर होते.

**झोप** :– झोपेत मोठ्याने बोलणे. डाव्या कुशीवर निजल्याने स्वप्ने पडतात.

**ज्वर** :– गारठा सहन होत नाही. थंडी वाजताना वारे हवेसे वाटते. **ठिकठिकाणी गार झाल्यासारखे वाटते.** एकदम थकवा वाटतो, नंतर अंगात कढत लाटा येऊन काळजी वाटते. **घाम येतो**– जननेंद्रियावर, **खाकेत**, पाठीवर. अनियमित ज्वर.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– ***थंडी***; ***गार हवा***; दमट हवा; बर्फ पडत असताना; **संभोगातिरेक. गरोदरपणी.** विटाळशी होण्याचे अगोदर वाखा झाल्यानंतर **सकाळी आणि संध्याकाळी.** वाकल्याने. उभे राहिल्याने. जिना चढताना. झोप लागताना. पहिल्या झोपेत. चोळण्याने. खाजविण्याने, उचलण्याने. धक्का. धुणी धुतल्याने. पहिल्या झोपेनंतर. बसल्याने. संभोग करताना (स्त्रिया) वादळापूर्वी. स्पर्श.

**ब वा** :– ***जोराची हालचाल*** (पळणे, नाचणे वगैरे). **उष्णता.** गार पेये; गार पाण्याचे स्नान. पायाची अढी घालून बसल्याने. मोकळी हवा. दाबल्याने

**सहाय्यक औषधे** :– नक्स-व्हा; **नेट्र–मू**; **पल्स**; **फास्फ**; सल्फ; साबा; सोरि.

**संबंधी औषधे** :– कॅल्क-का; कोनि; नेट्र-का; लायको; लिलि-टी; म्युरेक्स.

---

## ३३३. सेलेनियम Selenium

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***जननेंद्रिये व मूत्रेंद्रिये***; **कंठ** व **यकृत** यावर होतो. **सहजासहजी थकवा येतो.** सूर्याच्या उष्णतेमुळे, आजारातून किंवा टायफाइडसारख्या तापातून बरे झाल्यानंतर थकवा वाटतो. थोडे मान-

सिक किंवा शारीरिक श्रम केले तरी झोप यावयास लागते. वृद्धपणी विकार झालेला भाग किंवा एखादा भाग **वाळावयास लागतो**–चेहरा, पंजे वगैरे. पेटके येतात व त्यानंतर भाग ताठतो. चुणचुण किंवा चावल्यासारखे वाटते. **शरीर वाळते**, वृद्धपणी, खाण्यानंतर सर्वांगात ठुसठुस विशेषतः उदरात. बदफैलीपणा, चहा, साखर, लेमोनेड, मीठ यांचे अतिसेवन, मुष्टिमैथुन, संभोगातिरेक, शरिरातील स्राव गेल्याने उद्भवलेले उपद्रव

**मानसिक** :– बडबडणे, विशेषतः मनःक्षोभ झाल्याने त्यामुळे बोलताना अडखळणे, तोतरे बोलणे व शब्द चुकीचे वापरणे. अतिशय खिन्न. जागे असताना काही आठवत नाही पण झोपेत, स्वप्नात, विसरलेल्या गोष्टी आठवतात. संभोगानंतर चिडखोरपणा येतो. कोणतेही काम करण्याची अपात्रता. आकलन होत नाही, काय वाचले किंवा ऐकिले ते समजत नाही. मनांत वैषयिक विचार येतात शारीरिक अपात्रता. वारे लागत आहे असे वाटते.

**डोके** :– डाव्या डोळ्यावर दुखते. उन्हात चालण्याने, उग्र वासाने, चहा घेतल्याने जास्त होते, व त्यावेळेस लघवीला जास्त होते. केस गळून पडतात. डोक्याची कातडी ताणल्यासारखी वाटते किंवा एके ठिकाणी गोळा झाल्यासारखी वाटते. भुवयांचे दाढीचे व जननेंद्रियांवरचे केस गळून पडतात. केसाना हात लावलेला सहन होत नाही.

**कान** :– मळ घट्ट झाल्यामुळे बहिरेपणा येतो.

**नाक** :– सर्दी होते त्यानंतर हगवण लागते. नाक चोंदते, कंड सुटते, आत बोटे घालून खाजवावेसे वाटते. नाक पिवळ्या, दाट बुळबुळीत शेंबडाने भरलेले असते.

**चेहरा** :– वाळलेला, वर पुटकुळ्या. तेल्कट, चकचकीत.

**तोंड** :– चहा घेतल्याने दात दुखावयास लागतात.

**जठर** :– खारलेले पदार्थ आवडत नाहीत. चहा दारू किंवा इतर उत्तेजक पेये प्यावीशी वाटतात. तहान लागत नाही. तंबाखू ओढल्यानंतर उचकी लागते व ढेकरा येतात. चव गोडुस.

**उदर** :– यकृताचे जीर्ण विकार. यकृत मोठे होते–श्वास आत घेतल्याने किंवा दाबल्याने दुखते, आत टोचते किंवा यकृताच्या जागेवर बारीक उगवण किंवा ठिपके पडतात. उदरात ठुसठुसते त्यामुळे झोप येत नाही. मलावरोध– शौचास मोठ्या आकाराचे होते, मळ आतच चिकटून बसतो बाहेर येण्यास अतिशय त्रास पडतो, बोटाने किंवा इतर मार्गांनी काढावे लागते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवी झाल्यानंतर, शौचानंतर किंवा चालताना लघवीला होते. डोके दुखत असताना लघवी जास्त प्रमाणात होते. मूत्रमार्गातून चुणचुणणारे थेंब बाहेर येत आहेत असे वाटते. लघवीतून खरखरीत वाळू जाते.

**पुरुषजननेंद्रिये** :– झोपेत वीर्य गळते. **मनात सारखे वैषयिक विचार येतात** पण शिश्नाचे उत्थापन होत नाही. **सहजासहजी वीर्यपात होतो**– अकाली, संभोग करताना, शौचास होताना वगैरे. वीर्य पाण्यासारखे पातळ. जुनाट परमा. वृषणवृद्धि. वीर्यपातानंतर त्याची सुखद जाणीव बराच वेळ राहते. झोपेत, बसले असताना, चालताना, शौचास होताना धातु गळते.

**स्त्रीजननेंद्रिये** :- विटाळ अतिशय जातो व तो काळसर असतो. गरोदरपणी उदरात ठुसठुसते, खाण्यानंतर जास्त.

**श्वसनेंद्रिये** :– गाण्यास सुरवात केली, बोलावयास, वाचावयास सुरवात की **आवाज बसतो, घोगरा होतो**. थंडीने आवाज बसतो. सकाळी खोकला येऊन रक्तमिश्रित दाट कफ पडतो. कंठात घुरघुरते. कंठात टणक गाठी येतात. स्वच्छ कफ खाकरून पडतो. दीर्घ श्वास घ्यावासा वाटतो. छातीत अशक्तपणा वाटतो.

**पाठ** :– पाठ व कणा लुला पडल्याप्रमाणे वाटतो, विशेषतः थोड्याशा आजारानंतर. मानेच्या गाठी मोठ्या व टणक होतात.

**हातपाय** :– गृध्रसीवात एकदम कळा येतात ( डावी बाजू ) नंतर तो भाग हुळहुळा होतो. रात्री पंजांना फाडल्याप्रमाणे कळा लागतात. हातपाय वाळतात.

**झोप** :– सर्वांगात व विशेषतः उदरात ठुसठुसल्यामुळे झोप येत नाही. मध्यरात्रीपर्यंत झोप येत नाही, सकाळी लवकर व अगदी ठरलेल्या तासाला जाग येते.

**त्वचा** :– तेलकट. घोट्याला व सांध्याच्या बेचकात कंड सुटते. खाजविल्यानंतर त्वचा ओलसर राहते. ठिकठिकाणी आग होते. यौवनपीटिका. तळहातावर कोरडी खपल्या बसणारी उगवण येते. अंगाला वाऱ्याची झुळुक लागत आहे असे वाटते.

**ज्वर** :– **घाम** भरपूर येतो. पिवळा असतो, त्याने कपडे कडक होतात व अंगावर **खारट थर जमतो**; घामामुळे केस कडक होतात आणि त्याना वळ्या पडतात. जननेंद्रियाना घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :– कोणतीही थकवा आणणारी कारणे– उष्ण** दिवस, संभोगातिरेक, निद्रानाश. गाताना. झुळुक लागल्याने, गरमसुद्धा. झोपेनंतर. चहा. लेमोनेड. शौचानंतर. संभोगानंतर.

**ब वा** :– सूर्य मावळल्यानंतर. गार वारे नाकात घेतल्याने.

**संबंधी औषधे** :– कॅल्क–का; नक्स-व्हा; नेट्रम-मू. मर्क्यु; सल्फ; सेपि.

---

## ३३४. सोरिनम Psorinum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *त्वचा–वेचका*; *कान*; *आतडी*; **श्वासोच्छ्वास** व उजवी बाजू यावर होतो. सर्वांगात आजारी असल्यासारखे वाटते. **योग्य निवड केलेल्या औषधाची क्रिया व्हावी तशी होत नाही** विशेषतः जीर्ण विकारात. संसर्गजन्य रोगाचे वर्षानुवर्षे रेंगाळणारे दुष्परिणाम. निःशक्तपणा विशेषतः कोणताही विकार झालेला नसताना किंवा तीव्र रोगातून उठल्यानंतर आलेला. *तेच तेच विकार पुनः पुनः उद्भवतात*. लक्षणांची गुंतागुंत झाल्यामुळे कोणते औषध निवडावे असा प्रश्न पडल्यास सोरिनम घ्यावे. *दुर्गंधी*– **अंगाचा वास**, अंगावरची उगवण, घाम, शौच वगैरे. स्राव दाट. **अशक्त, नाजुक** आणि शरीर वाळलेले, **जराशा थंडीने गारठते; वारंवार सर्दी होते;** कपडे मैल झाले आहेत असे वाटते. सांधे मैल झाल्यासारखे वाटतात. *विकार होण्याचे अगोदर भूक लागते* किंवा अवास्तव बरे आहे असे वाटते. **हातपाय वगैरे सारखे धुवावेसे वाटतात.** उन्हाळ्यात सुद्धा गरम कपडे घालावेसे वाटतात. मोकळ्या हवेत किंवा उभे राहिलेले असताना श्वासोच्छ्वास करण्यास त्रास होतो, घरी जाऊन पडावेसे वाटते. **सर्व शरीर थकते, योग्य निवड केलेल्या औषधाची क्रिया होत नाही;** इंद्रिये निर्जीव होतात त्यांच्याकडून योग्य कार्य होत नाही. लघवीला व शौचास एकाच वेळी पुरे होत नाही; अनेक वेळा जावे लागते. तान्ही आजारी मुले रात्रंदिवस रडतात, कुरकुर करतात व चिडखोर असतात. त्वग्रोग उन्हाळ्यात नाहीसे होऊन हिवाळ्यात पुन्हा उद्भवतात. स्राव दुर्गंधी–घाम, धुपणी, विटाळ वगैरे. अंगावर उवा होण्याची प्रवृत्ति. आंघोळ केली तरी अंगाची घाण जात नाही. कांही दिवस बरे वाटते व पुन्हा बिघडते. घाबरट, चुळबुळ करणारे इसम, सहजासहजी दचकतात. भावना, मार लागणे, लचक, सांधे निखळणे अति ओझे उचलल्यामुळे झालेले दुष्परिणाम. घाणेरड्या सवयी असलेले इसम.

**मानसिक** :– **काळजी वाटते.** पुढे होणाऱ्या गोष्टीबाबत चिंता करणे. **निराशा**–दुखण्यातून बरे होणार नाही असे वाटते. **उदास, खिन्न.** काही वेळा बरे वाटते तर काही वेळा आजारी आहोत असे वाटते. मनात भयप्रद कल्पना, विचार येतात, आत्महत्या करावीशी वाटते. काम करण्याचा तिटकारा. दरिद्री आहोत अशी भावना, धंदा चांगला चालला असून सुद्धा, धंद्यात बूड येत आहे असे वाटते. मनोदौर्बल्य, मनाचा गोंधळ होतो, विचार करवत नाही. क्षुल्लक भावनामुळे तीव्र स्वरुपाचे विकार उद्भवतात. वीज वादळ होण्याचे अगोदर कित्येक दिवस अस्वस्थपणा येतो.

**डोके** :– धडापासून वेगळे झाले आहे असे वाटते. वारंवार उद्भवणारी **डोकेदुखी.** डोके दुखण्याच्या अगोदर **दृष्टीचे** उपद्रव **उद्भवतात**, डोके दुखत असताना भूक लागते, कित्येक वेळा खाण्याने बरे वाटते. डोक्यात हातोडे मारल्याप्रमाणे वेदना होतात. इतर विकाराबरोबर आलटुन पालटुन होणारी डोकेदुखी. **डोक्याला वारे लागलेले सहन होत नाही**, उन्हाळ्यातसुद्धा ते **गुंडाळावेसे वाटते**. कानशिलात थरथरते. केस निस्तेज कोरडे एकमेकात गुंतलेले. अर्धशिशी.

**डोळे** :– डोळयात पांढरे द्रव्य साचते. पापण्याच्या कडांची सूज. पापण्या चिकटतात. पापण्या वर वळलेल्या. वारंवार डोळे येण्याची प्रवृत्ति. डोळ्यापुढे कोणीतरी बोटे नाचवित आहे असे वाटते.

**कान** :– कानामागे ओलसर उगवण येते– इसब, दुर्गंधी लस वाहते. कानातून **अत्यंत दुर्गंधी पू येतो.** कानातील मळ लाल. कान दुखत असताना डोके दुखते, किंवा दुर्गंधी जुलाब होतात.

**नाक** :– वारंवार सर्दी होते. लहान लाल पुटकुळ्या वर येतात.

**चेहरा** :– फिकट, **मळकट**, आजाऱ्यासारखा. चेहऱ्यावर लव येते किंवा तो फुगीर दिसतो. लहान लाल पुटकुळ्या येतात.

**तोंड** :– न बऱ्या होणाऱ्या तोंडाच्या कोपरातील भेगा. जिभेवर व हिरड्यावर व्रण पडतात. जिभेचे टोक भाजल्यासारखे वाटते. **चव चिळसवाणी.** दात सैल होतात. वरचा ओठ सुजलेला.

**घसा** :– घशातून दुर्गंधी दह्यासारखे गोळे खाकरून काढावे लागतात. टानसिल वारंवार सुजून त्या पुवळतात.

**जठर** :– भूक नष्ट होते विशेषतः आजारातून उठल्यानंतर. एकसारखे खावेसे वाटते. मध्यरात्रीसुद्धा उठून काहीतरी खावे अशी वासना. भूक नसते पण तहान लागते. ओकाऱ्या विशेषतः गरोदरपणच्या दुसऱ्या कोणत्याही औषधाने न थांबणाऱ्या. आंबट पदार्थ, बिअर घ्यावीशी वाटते.

**उदर** :– *काळसर अत्यंत दुर्गंधी जोराने* ( भडभडून) ***शौचास*** होते, **दुर्गंधी** सर्व घरात **दरवळते**; कुजलेल्या अंड्यासारखा दुर्गंधी वात सरतो. मलावरोध विशेषतः तान्ह्या मुलांचा. शौचास टणक होते, गुदातून रक्त जाते. शौचास रात्री जास्त वेळा होते. शौचास मळ मऊ असला तरी तो बाहेर पडण्यास त्रास होतो. तान्ह्या मुलांचे कालव्यासारखे जुलाब, झोपेत शौचास नकळत होते. वृद्ध स्त्रियांच्या गुदातून रक्त जाते. अनेकवेळा शौचास जावे तेव्हा शौच साफ झाल्यासारखे वाटते. जीर्ण हगवण, सकाळची, घाई होते.

**मूत्रेंद्रिये** :– अंथरुणात लघवी नकळत होते, विशेषतः पौर्णिमेच्या सुमारास. मूत्राशयाच्या अशक्तपणामुळे अनेकवेळा लघवीला जावे लागते.

**पुरुषजननेंद्रिये** :– दुर्गंधी. अंडात पिळवटल्यासारखे वाटते. जुनाट परमा, मूत्रमार्गातून वेदना होत नाहीत व त्याचे पिवळे डाग पडतात. संभोगाचा तिटकारा, संभोगात वीर्यपात होताना सुखाचा अभाव.

**स्त्रीजननेंद्रिये** :– धुपणी, दुर्गंधी गाठ्याळ. भडभडून जाते. अतिशय थकवा येतो व पाठ दुखते. विटाळ फार दिवस जातो. वाखा झाल्यानंतर गर्भाशय पूर्वस्थितीवर येत नाही, मधून मधून गाठ्या असलेले लाल रक्त वाहते, किंवा उभे राहून चालण्याचा प्रयत्न केला तरी विटाळ जावयास लागतो. गरोदरपणी गर्भाची हालचाल जोराने झाल्यामुळे ओकाऱ्या होतात. स्तन सुजतात दुखतात, वर पुरळ येऊन त्यातून वाहणाऱ्या लसीमुळे स्तन करवडतात व आग होते. कष्टार्तव, विटाळ थांबण्याच्या वयात. पाळीच्या अगोदर वैषयिक वासना प्रबळ होते. वैषयिक वासना नुसत्या हात खाजविण्याने उद्दीपित होते, पण समाधान लवकर होते. पाळीच्यावेळी अंगाला तिखट वास येतो. योनी व गर्भाशय शौचाचे वेळी खाली येते.

**श्वसनेंद्रिये** :– मोकळ्या हवेत श्वासोच्छ्वास करण्यास त्रास होतो. दमा–श्वास कष्टाने होतो, बसवत नाही, हात दूर करून निजल्याने बरे वाटते. हृद्रोगामुळे उद्भवलेला दमा. छातीच्या मधील चपट्या हाडाखाली व्रण पडल्यासारखे वाटते. खोकल्याचा कोरडा ठसका–छातीत अशक्तपणा वाटतो. दरवर्षी

हिवाळ्यात खोकला होतो. खोकला निजल्याने जास्त येतो. रक्तमिश्रित कफ पडतो, छातीत कढत झाल्यासारखे वाटते.

**हृदय** :– हृदयाच्या जागी गुडगुडल्यासारखा आवाज होतो; निजण्याने जास्त. नाडी अशक्त, अनियमित.

**पाठ** :– कमरेत टणका लागतो, उभे राहिल्याने व चालताना जास्त.

**हातपाय** :– संधि अशक्त होतात, ते स्थिर राहणार नाहीत असे वाटते. बोटांच्या नखाभोवती उगवण येते. पावलांना हट्टी दुर्गंधी घाम येतो. तळपाय कढत व कंड सुटते.

**त्वचा** :– **त्वचेला भेगा पडतात. करवडते** विशेषतः ज्या ठिकाणी त्वचेवर त्वचा दुमडली जाते अशा जागी. त्वचा **मळकट**, खरखरीत व खपल्या बसतात. त्वचा तेलकट–त्वचेच्या कडांवर मासांकुर येण्याची प्रवृत्ति. **असह्य कंड सुटते** विशेषत अंथरुणाच्या उबेत किंवा गरम कपडे घातल्याने, हुळहुळे होईतो-पर्यंत किंवा रक्त येईतोपर्यंत खाजविणे भाग पडते. श्रम केल्यास पित्ताच्या गांधी येतात. व्रण लवकर भरून येत नाहीत.

**झोप** :– स्वप्ने स्पष्ट दिसतात व त्याची जाणीव जागे झाल्यानंतर पण राहते.

**ज्वर** :– तापात अंगातून कढत वाफा निघतात. **घाम सहज येतो**, भरपूर येतो, विशेषतः रात्री. तळहाताला घाम येतो. घाम गार.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *थंडी*. **मोकळी हवा. गार पाण्याने स्नान. हवेतील बदल. वावटळ**. हिवाळ्यात. उष्णता श्रमाची, अंथरुणाची, **लोकरीच्या कपडयाची**. दरवर्षी स्वतःचे हातपाय अंगाला किंवा एकमेकाला चिकटविल्याने. ***बाह्योपचाराने त्वग्रोग बरे केल्यानंतर***, किंवा स्राव थांबल्यानंतर.

**ब वा** :– **सपाट निजल्याने** किंवा स्वस्थ निजल्याने. खाण्याने. धुण्याने. नाकातून रक्त गेल्याने. जोराने दाबल्याने. भरपूर घाम आल्याने.

**सहाय्यक औषधे** :– टयुब; सल्फ; सेपि.

**संबंधी औषधे** :– ग्रफाय; फास्फ; मॅन्ग.

---

## ३३५. स्टॅनम Stannum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***मज्जातंतू***; ***श्लेष्मल त्वचा***; ***छाती*** व ***स्त्रीजननेंद्रिये*** यावर होतो. विकार पुनः पुन्हा उद्भवतांत व थोडा वेळ

राहतात. ***पराकाष्ठेचा अशक्तपणा***, विशेषतः ***छातीत***, घशात; जठरात, वरच्या हातांचा आणि मांड्यांचा, उभे राहवत नाही, बोलवत नाही, चालताना अंग कापावयास लागते. **शरीर जड होऊन लुळे पडल्याप्रमाणे वाटते. श्लेष्मल त्वचेचे स्राव भरपूर व पुवळलेले.** शरीर वाळते. ***वेदना हळु हळु सुरू होतात व हळुहळु थांबतात***. **दाबून ओढल्यासारखे वाटते**. ठणका. पेटके. आचके हिस्टेरिआ. खाली उतरताना अशक्तपणा जास्त वाटतो, घेरी येते. लहान मुलाना खांद्यावर ओणवे घेऊन हिंडविल्याने बरे वाटते. आचके येताना उदरात दुखते. फेफरे यताना हातपाय झाडणे, आंगठे आखडतात, पाठीची कमान होते, बेशुद्धि येत, वैषयिक उपद्रव उद्भवतात हळू चालण्याने अंग जास्त कापते. भावना, भीति, मुष्टिमैथून, दांत येणे, आवाजाचा उपयोग करताना होणारे उपद्रव. अंगाभोवती पट्टा बांधल्याप्रमाणे वाटत. विशेषतः जांभई येताना. शरीर बाळते.

**मानसिक :– काळजी वाटते, घाबरटपणा व खिन्नता** विशेषतः विटाळशी होण्याचे अगोदर. **अशक्त, केविलवाणे, निरुत्साही**. लोकाना भेटण्याची भीती वाटते: बोलावेसे वाटत नाही. मनात आलेली एखादी गोष्ट पक्की होते. एकाएकी राग येतो. विसरभोळेपणा, चित्त जागेवर नसणे. आपल्याविषयी लोक काय बोलतात याबद्दल अतिशय जागरूक. अस्वस्थ, स्वतःविषयी काय करावे ते कळत नाही.

**डोके** :– दाबल्याप्रमाणे डोके दुखते, धुंदी येते. चालण्याच्या हेलकाव्यामुळे किंवा थक्क्यामुळे डोक्यात वेदना होतात. डोके पट्ट्याने आवळल्यासारखे वाटते. कोयनेलच्या दुष्परिणामामुळे उद्भवलेली डोकेदुखी. ओकारी झाल्याने डोकेदुखी थांबते.

**नाक** :– हट्टी तीव्र स्वरूपाची सर्दी, खोकला येतो व ताप येतो. वास सहन होत नाही.

**चेहरा** :– फिकट, डोळे खोल गेलेले. गालांच्या उंचवट्यात ठणका लागतो.

**कान** :– कानाना पाडलेल्या भोकांचे चिडणं. नाक शिंकरताना कानांत किंचाळण्याप्रमाणे किंवा तडतड आवाज होतात.

**तोंड** :– जिभेच्या बुध्याशी गुदगुल्या होतात. चव आंबट, गोड, पाण्याशिवाय सर्व पदार्थ कडू लागतात.

**घसा** :– घशात चिकट कफ साचतो, खाकरून काढताना त्रास पडतो व तसा प्रयत्न केला तर मळमळते कोरडा, चुणचुणते. गिळताना कापल्यासारखे वाटते.

**जठर** :– जोरजोराने ओकाऱ्या होतात विशेषतः सकाळी, ओकारीला खाल्लेल्या अन्नाचा वास येतो. स्वयंपाकाच्या वासामुळे ओकावयास होते. जठर पोकळ झाल्यासारखे वाटते. ओकारीत रक्त, पित्त पडते.

**उदर** :– यकृतात आग होते. आतड्यात चिमटे घेतल्याप्रमाणे वेदना होतात, जोराने दाबल्याने बरे वाटते, वेदना होताना शौचास होते, जोराने दाबल्याने बरे वाटते व त्यामुळे थकवा येतो, भूक लागते. लहान मुलांच्या वेदना खांद्यावर ओणवे घेऊन हिंडविल्याने कमी होतात. जंत होतात. मलावरोध, शौचास टणक, गाठ्याळ, कोरडे होते, अर्धवट होते हिरवे असते.

**मूत्रेंद्रिये** :– मूत्राशय भरला असला तरी लघवीला लागली असे वाटत नाही.

**पुरुषजननेंद्रिये** :- वारंवार स्वप्नावस्था झाल्यामुळे थकवा येतो. संभोगेच्छा वाढते. जननेंद्रियात सुखकारक वैषयिक जाणीव होऊन वीर्यपात होतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळशी होण्याचे अगोदर कामोन्माद होतो. विटाळसेपणी शरीराला उग्र वास येतो. गर्भाशय किंवा योनी खाली येते. विशेषतः शौचास होताना. धुपणी, भडभडून वाहते. व त्यामुळे थकवा येतो. संभोगेच्छा वाढते, पण समाधान लवकर होते. हात खाजविले तरी संभोगसुखाची जाणीव होते. पाळी लवकर व विटाळ भरपूर जातो. धुपणी पांढरट पिवळी किंवा स्वच्छ. मूल अंगावरचे दूध पीत नाही गर्भाशयाच्या लक्षणांत छातीत गळून गेल्याप्रमाणे अशक्त वाटते.

**श्वसनेंद्रिये** :– श्वासनलिकेत कफ साचतो. आवाज खोल व पोकळ खाकरल्याने सुधारतो. **जरा श्रम केले की दम लागतो**, कपडे सैल करावेसे वाटतात. **खोकला भरपूर व सहज कफ पडतो.** कफ गोडसर, पिवळा धमक, पुवळलेला, हिरवट, किंवा गोळ्या गोळ्या पडतात. खोकला गाताना, हसताना बोलताना उजव्या कुशीवर निजल्याने जास्त होतो. छातीत डाव्या बाजूस टोचते ( प्लुरिसी ). श्वासोच्छ्वास करताना किंवा त्याच बाजूस निजल्याने जास्त. क्षय. क्षयीज्वर, सकाळी १० वाजता थंडी वाजते. छाती पोकळ किंवा हुळहुळी झाल्यासारखी वाटते, चालताना किंवा काहीही श्रम करताना खोकला येतो, खोकताना कोरड्या ओकाऱ्या येतात.

**हातपाय** :– लुळे पडल्याप्रमाणे अशक्त, हातातून वस्तु पडतात. पंजे व घोटे सुजलेले. गुडघे कापतात. बसण्याचा प्रयत्न केला तर पाय एकदम लुळे पडल्याप्रमाणे वाटतात. बोटात टाक पेन्सिल धरली तर बोटाना पेटके येतात. हातात धरलेली केरसुणी सोडता येत नाही, टाईपरायटरवर काम करणाऱ्यांच्या बोटांना लुलेपणा. गाताना बरच्या हातात अशक्तपणा वाटतो, व तो सर्व शरीरात जाणवतो.

**झोप** :– एक पाय वर करून व दुसरा लांब ठेवून झोपण्याची प्रवृत्ति. झोपेत कण्हणे, रडणे किंवा कळवळणे.

**ज्वर** – सकाळी १० वाजता थंडी वाजते, व त्यावेळेस हाताची बोटे बधिर होतात. **तळहात व पाय यांची आग होते.** क्षयी ज्वर. संध्याकाळी अंग तापते. रात्री घाम येतो, घामामुळे थकवा येतो. घामाला कुबट वास येतो पहाटे ४ वाजता विशेष घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **आवाजाचा उपयोग करताना** ( हसताना, बोलताना, गाताना ). थंडी. सकाळी १० वा. **उजव्या कुशीवर निजल्याने.** ***हालचालीने.*** हालचाल केल्यानंतर,, हळुहळु चालण्याने. जिना चढताना गरम पेये. शौचास होताना. जिना उतरताना.

**ब वा** – जलद हालचाल. जोराने दाबल्याने. कफ पडल्याने. खोकताना. टणक जागेवर निजल्याने. अंग दुमडल्याने.

**सहाय्यक औषधे** :– पल्स.

**संबंधी औषधे** :– कलि-का; कॅल्क-का; फास्फ; सल्फ.

---

## ३३६. स्टॅफिसॅग्रिआ Staphysagria

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मज्जातंतू, दात*; **जनन-मूत्रेंद्रिये; डोळयाच्या पापण्या; त्वचा;** गाठी; यावर होतो. **भावनामुळे** किंवा **घाबरटपणामुळे कापरे भरते.** पिळवटल्याप्रमाणे वेदना होतात. **चाकूने कापल्याप्रमाणे** वाटते. **नांगी, मारल्याप्रमाणे चुणचुण** होते. वेदनांची जाणीव दातात होते. उदरावर शस्त्रक्रिया केल्यानंतर उद्भवलेले दुष्परिणाम. भावनांचा कोंडमारा झाल्यामुळे किंवा राग गिळल्यामुळे, राग, मानभंग, पडणे, दुखापती, शस्त्रक्रिया, दांत येताना, तंबाखु पारा यानी उद्भवलेले उपद्रव.

मुष्टिमैथुन संभोगातिरेक यामुळे उद्भवलेले विकार. फाडलेल्या जखमा किंवा चाकू सुरीने झालेल्या जखमांचे दुष्परिणाम. गाठी मोठ्या होऊन दुखतात. हाडावर हाड वाढते. हाडे सुजून आत पू होतो. मस मोड येण्याची प्रवृत्ति. रागामुळे झालेला अर्धांगवात.

**मानसिक** :– **स्वभाव नाजुक होतो**. क्षुल्लक गोष्टीने अपमान झाल्यासारखा वाटतो. **नेहमीच राग आलेला असतो**. खिन्नता कारण नसताना व **चिडखोरपणा**, वस्तूंची फेकाफेक करणे. स्मरणशक्ति मंद. निष्कारण उदासीनता. संभोगासंबंधी ( वैषयिक ) विचार सारखे मनात येतात. अतृप्त संभोगेच्छा, **विधवा** स्त्रिया. शरीर व मन हळवे होते, काहीही सहन होत नाही. **लाजरेपणा**, मानभग, अपमान झाला अशी कल्पना करून घेणे. चिडखोर, घाबरट, व भयंकर प्रक्षुब्ध. मूल अनेक गोष्टीकरिता रडते पण त्या वस्तु दिल्या तर त्या नको असतात. मुलाना रागे भरल्यामुळे किंवा शिक्षा केल्यामुळे उद्भवलेले विकार. आपल्याविषयी दुसरी माणसे काय बोलतात या बाबतीत जागरूक. आपण केलेल्या किंवा दुसऱ्यानी केलेल्या गोष्टींबद्दल संताप येऊन खेद वाटतो.

**डोके** :– मेंदू फाडल्याप्रमाणे वाटतो. डोक्यात दाबल्याप्रमाणे वेदना होतात, गुंगी येते, जांभया आल्याने बरे वाटते. कपाळात जड गोळा बसला आहे असे वाटते. डोक्याचा मागील भाग पोकळ किंवा बधिर झाला आहे असे वाटते. घेरी– गरगर फिरते आहे असे वाटते, बसल्याने, निजल्याने जास्त, आपल्या सभोवती गरगर फिरल्याने बरे वाटते. डोक्यावरची उगवण ओलसर, दुर्गंधी व चरणारी, खपल्या बसतात– विशेषतः डोक्याच्या मागील भागी. कोंडा जातो, केस गळतात.

**डोळे** :– पाणी येऊनसुद्धा डोळ्यात कोरडेपणा वाटतो. पापण्यात लहान गाठी येतात. वारंवार होणाऱ्या रांजणवाड्या. पापण्यांच्या कडांचा शोथ. डोळ्यात फुटल्याप्रमाणे वेदना होतात, आग होते. खोल गेलेले, भोवती काळी वर्तुळे.

**कान** :– टानसिल्स वाढल्यामुळे आलेला बहिरेपणा.

**चेहरा** :– **आजाऱ्यासारखा, निमुळता, डोळे खोल गेलेले**. वेदना डोळ्यात जातात. जबड्याखालच्या गाठी सुजतात व पिकतात.

**नाक** :– सर्दी– स्राव कधी घट्ट कधी पातळ. आत व्रण पडतात. सर्दीशिवाय शिंका येतात.

**तोंड** :– हिरड्या फिकट, आतून रक्त येते. **दात सैल, काळे पडलेले व ढिसूळ**. दात खाताना व विटाळशेपणी दुखतात, **जोराने दाबल्याने** आणि उष्णतेने बरे

वाटते. हिरड्यातून पू येतो. चव कुबट. कुजलेले दात अतिशय दुखतात. भरल्यानंतर दुखतात. दात आले की लगेच कुजावयास लागतात.

**घसा** :– टानसिल मोठ्या होतात. गिळताना कानापर्यंत टोचते ( डावीकडे ). खाण्यानंतर दुखावयास लागतो. बोलताना सारखे गिळावे लागते.

**जठर** :– **भूक लागते,** पोट भरलेले असले तरी. दूध प्यावेसे वाटते. तंबाखू खावीशी, ओढावीशी वाटते. मळमळ विशेषतः उदरावर शस्त्रक्रिया केल्यानंतर.

**उदर** :– आतड्यात वात धरल्यामुळे वेदना होतात. कढत वात सरतो. उदरावर शस्त्रक्रिया केल्यानंतर आत तीव्र कळा येतात. गार पाणी प्याल्यानंतर जुलाब होतात. अशक्त व आजारी मुलांची आव. मूळव्याध, स्पर्श सहन होत नाही. कुजलेल्या अंड्याप्रमाणे दुर्गंधी वात सरतो. उदरात अशक्तपणा वाटून ते खाली गळून पडेल असे वाटते, वर उचलून धरावेसे वाटते. राग आल्याने वेदना होतात.

**मूत्रेंद्रिये** :– वारंवार लघवीला लागते. मूत्राशयावर दाबल्यासारखे वाटते, तो पूर्ण मोकळा झाला आहे असे वाटत नाही. मूत्रमार्गात लघवीचा एक थेंब सारखा फिरत आहे असे वाटते. धार बारीक. मूत्रमार्गाच्या मागील भागात गुदगुल्या होतात किंवा आग होते, चालताना जास्त, लघवी होताना बरे वाटते. मूत्रग्रंथी मोठी होते, वारंवार लघवी लागते व लघवी होत नसताना आग होते. **लघवी थोडी थोडी व कष्टाने होते,** गरोदरपणी किंवा **नुकत्याच लग्न झालेल्या तरुण मुलींना.**

**पुरुषजननेंद्रिये** :– वैषयिक विचार सारखे मनात घोळतात. वीर्यपातानंतर पाठ दुखते, अशक्तपणा वाटतो व चिडखोरपणा व खिन्नता येते. संभोगानंतर छातीत दाटल्यासारखे वाटते, दमा लागतो. शिश्न ताठ होताना दुखते. मूत्र-ग्रंथीची सूज मूत्रग्रंथी वाढलेली असताना मूळव्याध होते. गालगुंडानंतर अंड सुजतात. बोंडीच्या मागे मांसल उगवण येते. वृषणाला कंड सुटून वैषयिक वासना उत्पन्न होते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– योनिद्वाराला कंड सुटते किंवा ते हुळहुळे होते, विशेषतः बसलेले असताना. रजःपिंडापासून मांड्यापर्यंत वेदना होतात. रजःपिंडात ठणका लागतो संभोगानंतर जास्त. गर्भाशय बाहेर येतो व त्यामुळे उदरात गळून गेल्यासारखे वाटते व कमरेच्या सांध्याभोवती ठणका लागतो. रजोनलिकांचा शोथ. एकसारखे संभोगाचे विचार मनात येतात, वासना वाढते.

**श्वसनेंद्रिये** :– दात घासताना खोकला येतो. गृध्रसीवात व खोकला आलटून पालटून.

**पाठ** :– सकाळी अंथरुणातून उठण्याच्या अगोदर पाठ जास्त दुखते. हाताच्या बोटांच्या टोकात बारीक फाडल्यासारखे वाटते किंवा ती बधिर होतात. हाताच्या बोटांच्या **सांध्यावर टणक गाठी** येतात. सांध्यात दुखणे व त्वचेचे विकार आलटून पालटून. गुडघे अशक्त. पोटऱ्या मार लागल्याप्रमाणे दुखतात. हाताच्या बोटांच्या हाडांची वाढ खुंटते.

**झोप** :– जोरजोराने जांभया व आळोखे-पिळोखे येतात, डोळ्यातून पाणी येते. डोकेदुखीनंतर जांभया येतात, त्यामुळे डोके दुखणे कमी होते. वैषयिक स्वप्ने पडून वीर्यपात होतो.

**त्वचा** :– किडे चावत आहेत, वळवळत आहेत असे वाटते, कंड सुटते, एके ठिकाणी खाजविल्याने दुसरीकडे कंड सुटते. ***फाडल्याप्रमाणे झालेल्या जखमा*** **विशेषत: गुदद्वार; योनिद्वाराच्या,** शिवणितल्या जखमाना घातलेले टाके किंवा त्या जागी दुखते. देठ असलेले मांसांकुरे. नागीण होण्याच्या अगोदर होणाऱ्या वेदना. संधिवात व त्वचेचे विकार आलटुन पालटून. इसब, जाड खपल्या बसतात व अतिशय कंड येते. व्रण, मांसाकुर इतके नाजुक असतात त्याना स्पर्श केला तर आंचके येण्याचा संभव असतो.

**ज्वर** :– कुजलेल्या अंड्याच्या वासाचा घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **भावना–राग गिळणे, मानभंग, अपमान, संताप, भांडणे. मुष्टिमैथुन. संभोगातिरेक. स्पर्श. गार पेये. फाडल्याप्रमाणे झालेल्या** जखमा. शरिराचा द्वारे किंवा भाग ताणले गेल्यामुळे. पारा. रात्री. लघवी झाल्यानंतर.

**ब वा** :– **सकाळच्या न्याहारीनंतर.** उष्णता. विश्रांति.

**सहाय्यक औषधे** :– कास्टि; कोलो.

**संबंधी औषधे** :– कामो; मर्क्यु.

---

## ३३७. स्टिक्टा Sticta

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **मज्जातंतू; नाक;** छाती; सांधे; खांदा ( उजवा ) यावर होतो. **घाबरटपणा. ताठणे व सांधे धरण्याची प्रवृत्ति.** श्लेष्मल त्वचा कोरडी व दुखते. वेदना तिरकस उद्भवतात. शरीर जड व

मरगळल्यासारखे वाटते. रक्तस्रावानंतर झालेला हिस्टेरिआ. पडण्यानंतर किंवा रक्तस्रावानंतर झालेले उपद्रव. निरनिराळे भाग हवेत तरंगत आहेत असे वाटते.

**मानसिक** :– हवेत तरंगत आहोत असे वाटते. काहीतरी पण एकसारखे बोलावेसे वाटते मग कोणी ऐको न ऐको. आनंदी, खेळकर, हवेत टाचा उंच उडविणे.

**डोके** :– सर्दी होऊन नाक गळण्याचे अगोदर डोके दुखावयास लागते, कपाळात जडपणा वाटतो.

**डोळे** :– पापण्यांची आग होते. डोळे हुळहुळे होऊन आग होते, पापण्या मिटल्याने किंवा डोळ्याच्या हालचालीने जास्त.

**नाक** :– जोराची सर्दी होते, जोरजोराने शिंका येतात, अतिशय डोके दुखते व डोळे लाल होतात, बरेचवेळा सांधे धरण्याच्या अगोदर किंवा नंतर. **नाकाच्या बुंध्याशी ठेचून भरल्यासारखे वाटते किंवा दाबल्यासारखे वाटते.** एकसारखे नाक शिंकरावेसे वाटते पण बरे वाटून समाधान होत नाही. नाकात कोरड्या खपल्या बसतात.

**घसा** :– कोरडा. नाकातून श्लेष्मा खाली उतरतो.

**उदर** :– हगवण, फेसाळ जुलाब होतात विशेषतः सकाळी.

**मूत्रेंद्रिय** :– लघवी भरपूर होते व त्यावेळेस मूत्राशय हुळहुळा होऊन ठणका लागतो.

**स्त्रीजननेंद्रिये** :– बाळंतपणानंतर दूध कमी येते.

**श्वसनेंद्रिये** :– घशात वरच्या भागात गुदगुल्या होतात. **एकसारखी कोरड्या खोकल्याची ढास लागते त्याने झोप येत नाही.** श्वास आत घेताना खोकला येतो किंवा **खोकल्याने खोकला वाढतो**; खोकला भुंकल्याप्रमाणे, दमल्यानंतर जास्त होतो. गोवरानंतर राहिलेला खोकला. छातीच्या मधोमध पुढून मागे मणक्यापर्यंत वेदना होतात. छातीच्या मधल्या चपट्या हाडाच्या उजव्या बाजूतून उदरापर्यंत ठुसठुसते. श्वासनलिका बधिर होते.

**मान** :– हुळहुळी होते व ताठते, खांद्यापर्यंत दुखते.

**हातपाय** :– पंजे व पावले अस्वस्थ. **संधिवात.** विकार झालेल्या सांध्यावर लाल ठिपका पडतो. सांध्यात पाणी साचते. हातपाय गार व ओले. तंगड्या हवेत तरंगत आहेत असे वाटते. पंज्याना खूप घाम येतो. कंपवाताप्रमाणे कापतात.

**क्षोप :**– घाबरटपणा, खोकला, शस्त्रक्रियेनंतर क्षोप येत नाही.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा ह्रो :**– रात्री. निजल्याने. हाल्चालीने. हवेत बदल झाल्याने.

**ब वा :**– स्राव गळावयास लागल्याने. मोकळी हवा.

---

## ३३८. स्टिलिंजिआ Stillingia

**सर्वसाधारण :**- संधिवाताचे व गरमीचे उपद्रव. भविष्यकाळी भयाण गोष्टी घडतील असे वाटते. लघवी दाट दुधासारखी, खाली पांढरा गाळ सांचतो. खोकला कोरडा, वारंवार ढास लागते. श्वासनलिका दाबल्याने दुखते. आवाज बसतो, वक्त्यांचे कंठाचे जीर्ण विकार. हाडांत– हातापायांच्या, पाठीचा ठणका लागतो. मानेतील गांठी मोठ्या होतात. हाडावर हाड वाढते. गरमीचे अंगावर पडलेल चट्टे.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा ह्रो :**– हालचाल. दुपारानंतर. दमट हवा.

**ब वा :**- सकाळी कोरडी हवा.

---

## ३३९. स्ट्रमोनिअम ( धोतरा ) Stramonium

**सर्वसाधारण :**– या औषधाचा परिणाम *मन*; रुधिराभिसरण; घसा; त्वचा; हात; कमरेचा सांधा (डावा) व जननेंद्रिये यावर होतो. ***विकारांचे स्वरूप भयप्रद***, अत्यंत खळबळीचे *पण वेदनांचा अभाव*, व त्याच वेळेस **शरीरातील स्राव बंद होतात**, लघवी होत नाही व शौचास पण होत नाही. **हालचालीत अव्यवस्थितपणा किंवा डौलदारपणा** विशेषतः डोक्याचा किंवा हाताचा. कंपवात, किंवा मुष्टिमैथुनामुळे सुरू झालेले कंप. आचके विशेषतः रात्री. धडापासून हातपाय वेगळे आहेत असे वाटते. वस्तूचा आकार व जागेचे अंतर याची योग्य जाणीव होत नाही. एक बाजू लुळी पडते दुसऱ्या बाजूत कंप. भीतीमुळे उत्पन्न झालेला कंपवात किंवा फेफरे हिस्टेरिआ; वैषयिक वासना उद्दीपित होऊन हंसणे रडणे. मोहनिद्रा. फेफरे येताना, शरीर ताठणे व आचके आलटुन पालटून. मानसिक धक्का, भीती, उन्ह बाळंतपण यानी उद्भवलेले उपद्रव. पाण्याची भीती वाटते.

**मानसिक :–** ***अंधाराची भीती, धास्ती वाटते*** आणि चकाकणाऱ्या वस्तूंचा भीतियुक्त तिटकारा वाटतो. **भीतिग्रस्त,** आसपास माणसे असावीशी वाटतात किंवा पळून जावेसे वाटते. **वात–** एकसारखी बडबड करणे, गाणे म्हणणे, प्रार्थना करणे, करुणा भाकणे, हसणे. अनेक प्रकारची किळसवाणी दृश्ये दिसतात किंवा तेजस्वी पदार्थ, भुतेखेते यांचे देखावे दिसतात विशेषतः एका बाजूस. **वातात भयंकर प्रक्षुब्धपणा येतो.** निरनिराळ्या प्रकारच्या वेड लागल्याप्रमाणे गोष्टी करणे. कपडे फाडणे, जननेंद्रिये उघडी करणे वगैरे. भयंकर **वेड लागल्याप्रमाणे चाळे करणे** व त्यावेळेस गार घाम येतो. शिव्याशाप देणे. धार्मिक वेड. दुसऱ्यांचे बोलणे ऐकणे सहन होत नाही. बोलण्याची किंवा **विचार, विवेक करण्याची क्रिया नष्ट.** मूढ, बावळट. पाण्याकडे पाहिल्याने किंवा चकाकणाऱ्या वस्तु पाहिल्याने आचके येतात. मूल भीतीने घाबरून जागे होते, कोणाला ओळखीत नाही, भीतीने किंचाळते व जवळ कोणी असेल त्याला चिकटते. स्वतःलाच दोष लावून घेणे. स्वतःच्या शरीराविषयी भ्रामक कल्पना. आपण दोन आहोत, उंच झालो आहोत, धडापासून हातपाय वेगळे आहेत वगैरे. बोगद्यातून गाडी जाताना काळजी वाटते. अश्लील बडबड. परकी भाषेत बोलणे. उद्धट, गर्विष्ट, मित्रेपणा, लपून बसणे किंवा पळून जाणे. जमिनीकडे नजर लावून स्वस्त बसणे, कपड्यांशी चाळे करणे, लोकांचा खून करावासा वाटतो किंवा आत्महत्या करावीशी वाटते. पाण्याचा आवाज ऐकला तर भीती वाटते.

**डोके :–** उशीवरून, वारंवार डोके उचलून खाली टाकणे, वातात, बेशुद्धीत, दोषी तापात, अंधारात घेरी येते, किंवा डोळे मिटल्याने जास्त होते. डोके दुखत असताना काहीतरी बरळणे, डोके मागे वाकलेले. खाली वाकताना किंवा उठताना डोके धरावे लागते, विशेषतः सूर्याघातानंतर. कानातील स्राव थांबल्यामुळे झालेला मेनिन्जायटिस.

**डोळे :–** वटारलेले, चकचकीत, **टक लावून बघणे.** बाहुल्या रुंद झालेल्या. तिरळेपणा. एकाच्या दोन वस्तु दिसतात. रातांधळेपणा. हिरवे दिसते. दृष्टिभ्रम, वस्तूंचा आकार व अंतर या बाबतीत भ्रम. **सर्व वस्तू काळ्या दिसतात,** एकमेकात गुंतलेल्या वेड्यावाकड्या दिसतात.

**कान :–** कानातून हवा जोराने बाहेर येत आहे असे वाटते.

**चेहरा** :– लाल, फुगीर, किंवा चेहऱ्यात एकदम अदलाबदल होते, लाल होतो, फिक्कट पडतो, विकट हसल्याप्रमाणे होतो किंवा **भीतिग्रस्त** होतो. कपाळावर आठ्या पडतात, मेंदूच्या विकारांत. चेहरा लांब झाला आहे असे वाटते.

**तोंड** :– **जिभेवर बारीक सुंदर लाल ठिपके पडतात.** एकसारखे थुंकणे, चघळल्याप्रमाणे जबड्याची हालचाल. जीभ कोरडी, सुजलेली, तोंडाबाहेर लोंबते. तोतरे बोलणे. दाट लाळ गळते.

**घसा** :– घसा कोरडा, अतिशय तहान लागते पण **पाणी पिण्याची भीती वाटते,** कारण पाणी पिताना गुदमरते.

**जठर** :– अन्न गवताप्रमाणे लागते. ओकारीत कफ व हिरवे पित्त पडते.

**उदर** :– **दुर्गंधी काळसर,** वेदनारहित नकळत **जुलाब होतात,** तिरळेपणा येतो, व चेहरा फिकट होतो,

**मूत्रेंद्रिये** :– लघवी होण्याचे बंद होते. विशेषतः टायफाईडसारख्या तापात. मूत्राशय मोकळा. वृद्धपणी लघवी हळुहळु होते, घाईने करता येत नाही.

**पुरुषजननेंद्रिये** :– संभोगेच्छा तीव्र. अश्लील बोलणे व क्रिया करणे; जननेंद्रियावर एकसारखा हात ठेवणे.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ जाण्याच्या अगोदर वैषयिक वासना बळावते. विटाळ अतिशय जातो, विटाळ जाताना बडबडणे, गाणे म्हणणे. बाळंतपणानंतरचे वेड, वेडात खूप घाम येतो. बाळंतपणानंतर आचके येतात. कामोन्माद. जननेंद्रिये हाताने चाळविण्याची प्रवृत्ति.

**श्वसनेंद्रिये** :– खोकल्याची वारंवार ढास लागते; उजेडाकडे विस्तवाकडे पाहिल्याने खोकला जास्त होतो. कंठाला आचके बसतात. तारस्वरात आवाज एकदम बसतो. दमा.

**हृदय** :– अशक्त, नाडी अनियमित. हृदयविकारात छाती आवळल्यासारखी वाटून मानसिक लक्षणे उत्पन्न होतात.

**पाठ** :– ओढल्यासारखी वाटते. कण्याला स्पर्श सहन होत नाही. पाठ ताठते, मागे वाकविता येत नाही. धनुर्वात.

**हातपाय** :– अर्धांगवात, लुल्या पडलेल्या अवयवात थरथरते. कमरेच्या सांध्यात भयंकर कळा येतात, कमरेच्या सांध्याचा क्षय (डाव्या). चालताना झोकांडे जातात. हात वर करून टाळ्या वाजविणे. जिना उतरताना पायऱ्या चुकतात.

**झोप** :– अंधारात झोप येत नाही. **भीतीमुळे** किंवा किंचाळत जागे होणे. स्वप्ने पडत असताना रडणे. बेशुद्धिप्रमाणे झोप गाढ लागते, भयंकर स्वप्ने पडतात.

**त्वचा** :– अंगावर अनेक ढेकूण चावल्याप्रमाणे वाटते. विस्फोटक ज्वरांची उगवण चांगली होत नाही. अंगावर लालबुंद चट्टे पडतात. जीर्ण गळवे, नाडीव्रण.

**ज्वर** :– टायफाईडसारखे दोषीज्वर. अतिज्वर, खूप घाम येतो पण त्याने बरे वाटत नाही.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **चकाकणाऱ्या वस्तूकडे पाहिल्याने धास्ती.** *झोपे-नंतर.* अंधारात. आभाळ आलेले असताना. **स्राव बंद झाल्याने.** गिळताना. स्पर्श. असंयमित वागणे.

**ब व** :– उजेडात; **मंडळीत.** उष्णता.

**संबंधी औषधे** :– ओपि; बेल; हायासा.

---

## ३४०. स्ट्रांशिअम कार्बोनिका Strontium Carbonica

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **रुधिराभिसरण; हृ**दय; मूत्रपिंड; **घोटे** व उजवी बाजू यावर होतो. ताणल्यासारखे वाटते. **इतस्ततः फिरणाऱ्या वेदना.** हाडात फिरत आहेत असे वाटते. आग होते. **कुरतडल्याप्रमाणे वेदना.** वेदना हळुहळू सुरू होऊन हळुहळू थांबतात येतात, जातात, कोठे आहेत हे नक्की सांगता येत नाही, किंवा वेदनामुळे मूर्च्छा येते. आणि सर्वांग आजारी असल्यासारखे वाटते. एकदम आपोआप दचके बसतात. **हालचाल बंद**– एका अंगाची जलयुक्त सूज. **लुले पडल्याप्रमाणे अशक्तपणा** वाटतो, शरीर वाळते, शस्त्रक्रिया केल्यानंतर आलेला अशक्तपणा. शस्त्रक्रियेचा आघात. हातापायाना मुंग्या येतात. लचकेमुळे झालेले जीर्ण उपद्रव. रक्तदाब वाढतो. रक्तस्रावाचे जीर्ण दुष्परिणाम, चेहरा लाल होतो, धमन्या जोराने उडतात. हाडांचे विकार विशेषतः मांडीच्या. अनेक विकारात घोट्याला सूज येते.

**मानसिक** :– अतिशय विसराळूपणा. चिडखोर, एकदम संताप येतो. काहीतरी दुष्कृत्य केल्याप्रमाणे भीती वाटते खिन्नता.

**डोके** :– वरच्या जबड्यापर्यंत दुखते, घेरी येते व मळमळते, निजल्याने जास्त, बसणे भाग पडते. डोके दुखत असताना मळमळते व घेरी येते, मानेत

नंतर भयंकर वेदना होतात, गुंडाळण्याने बरे वाटते. भुवयात दुखते. सर्व डोके ताणून दाबल्यासारखे वाटते.

**डोळे** :- लाल होतात. आग होते, डोळ्याच्या श्रमाने डोळे दुखावयास लागतात. पाणी येते व पाहत असलेल्या वस्तू नाचत आहेत असे वाटते. व त्यांच्या रंगात फरक पडल्यासारखा वाटतो. शस्त्रक्रियेनंतर उजेड सहन होत नाही. व वस्तू रक्ताने माखल्यासारख्या दिसतात.

**नाक** :- रक्ताच्या खरपुड्या बसतात. कंड सुटते, आग होते, लाल होते.

**चहरा** :- अतिशय फिकट किंवा अतिशय लालबुंद होतो, चालण्याचा प्रयत्न केला तर आग होते,

**तोंड** :- बधिर, कोरडे, विशेषतः सकाळी, जागे झाल्यानंतर.

**जठर** :- अन्न बेचव लागते. पाव खावासा वाटतो.. उचकी येताना छातीत वेदना होतात. अन्नाचे पचन होत असताना जठरात दाबल्यासारखे वाटते.

**उदर** :- बेंबीभोवती पेटके येतात. शौचास ठणक गाठी पडतात, कष्टाने होते, झाल्यानंतर गुदद्वाराची बराच वेळ आग होते. हगवण मधुन मधुन उद्भवणारी, रात्रीचे जुलाब होतात; पिवळे पाणी पडते व त्याने अतिशय थकवा येतो, पहाटे कमी होवात.

**मूत्रेंद्रियें** :- अमोनिआचा वास येत असलेली फिकट लघवी होते.

**श्वसनेंद्रिये** :- छातीवर ओझे ठेवल्यासारखे वाटते. जेवणानंतर, डाव्या स्तनात दुखते.

**हृदय** :- **गुदमरल्यासारखे वाटते.** नाडी मधुन मधुन थांबते.

**हातपाय** :- पंजे बधिर. **घोट्याची लचक किंवा फुगीरपणा.** पोटऱ्यात, तळपायाना पेटके येतात, पोटऱ्यात गार ठिपके पडल्याप्रमाणे वाटतात. सांधे धरलेले असताना हगवण लागते. गृध्रसी वातात घोटे सुजतात. घोट्याना पेटके येतात.

**त्वचा** :- ओलसर उगवण येते, कंड सुटते, आग होते, मोकळ्या हवेत किंवा उन्हात बरे वाटते.

**ज्वर** :- **उष्ण लाटा येतात** विशेषतः चेहऱ्यात, **पण पांघरूण किंवा कपडे काढावेसे वाटत नाहीत,** विशेषतः विटाळ थांबण्याच्या वयात. रात्री घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :- ***थंडी* उघडे झाल्याने. चालताना.** लचक. रक्तस्त्रावानंतर. संध्याकाळी. वाकताना. हवेतील बदल. स्पर्श. चोळण्याने:

ब वा :- उष्णता, शेक व उजेड– सूर्याचा; गरम पाण्याचे स्नान; गुंडाळण्याने.

संबंधी औषधे :- कॅल्क–का; ऱ्हस–टा.

---

## ३४१. स्ट्रिक्निनम Strychninum

**सर्वसाधारण** :- आचके, पेटके. धनुर्वात. पाठीची कमान होते, पाठ ताठते, मानेचे स्नायू ताठतात. कणा गार झाल्यासारखा वाटतो. हातापायाना भयंकर धक्के बसतात, आचके येतात, कापतात. स्नायूना धक्के बसतात. डोक्याला व छातीला घामाच्या धारा लागतात. श्वास आत घेता येत नाही छाती वर खाली होत नाही. आवाजाने, स्पर्शाने, हालचालीने जास्त होते. पाठीवर निजल्याने बरे वाटते.

---

## ३४२. स्ट्रोफॅन्थस Strophanthus

**सर्वसाधारण** :- या औषधाचा परिणाम रुधिराभिसरण; **हृदय**; जठर व मूत्रपिंड यावर होतो. **टोचल्याप्रमाणे वेदना. थरथरणे.** स्राव वाढतात. **लक्षणे आलटून पालटून होतात**-नाडी जलद व मंद, डोक्याकडे व हृदयाकडे लाटा येतात, बाहुल्या रुंद व बारीक होतात वगैरे. **लाटाप्रमाणे शरीरात खाली वर** झाल्यासारखे वाटते. ठुसठुसणे. तंबाखु ओढणारांच्या हृदयाची होणारी चलबिचल. रक्तदाब वाढतो. पंडुरोग, छातीत धडधडते व दम लागतो. गलगंड. मूर्च्छा येते. शस्त्रक्रियेनंतर झालेल्या रक्तस्रावाने किंवा तीव्र रोगातून उठल्यानंतर आलेला थकवा.

**मानसिक** :- **कठीण प्रसंगाची भीती वाटते.** वर उचलल्यासारखे वाटते विशेषतः दुपारच्या झोपेत. मुलांची प्रौढासारखी बडबड.

**डोके** :- घेरी येते–डोळयापुढे पाणी तरंगत आहे असे वाटते. डोक्यात लाटा येतात.

**डोळे** :- बाहुल्या एकसारख्या बारीक व रुंद होत असतात. डोळ्यापुढे चमचम दिसते. तेजस्वी. गलगंडात पुढे येतात.

**चेहरा** :- लाल ठिपके पडतात, किंवा सर्व लाल होतो.

**घसा** :- आवळल्यासारखा वाटतो. आग होते त्यामुळे सारखे गिळावेसे वाटते.

**जठर** :– काफी पिण्याची वासना. भूक लागत नाही. ओकाऱ्या होतात. दारूचा तिटकारा येऊन मळमळते. अन्नाची किळस येते, खाल्ले तर गुदमरल्यासारखे वाटून ओकावयास होते.

**उदर** :– जुलाब होताना उदरात गुरगुरते व वेदना होतात, गुदद्वाराची आग होते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीचे होण्याचे प्रमाण वाढते; किंवा थोडी होते, अल्बुमिन जाते.

**हृदय** :– **हृदयाची मजेदार हालचाल चालली आहे असे वाटते; हृदयाच्या जागी ठणका लागतो.** हृदय अशक्त. धडधडते. हृदयविकारामुळे लागलेला दमा व अंगावर आलेली सूज. नाडी अशक्त, जलद किंवा अनियमित चालते.

**हातपाय** :– पुढील हात व बोटे जड होतात. पावलाना कंड सुटते.

**त्वचा** :– पित्ताच्या गांधी विशेषतः जीर्ण.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– श्रम. दारू. तंबाखू. चहा.

**संबंधी औषधे** :– अपोसा; स्पायजे.

---

## ३४३. स्पायजेलिआ Spigelia

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम ***मज्जातंतू***; **हृदय**; मान; ***डोळे***; **वात** व ***डावी बाजू*** यावर होतो. **हृदयाची व डोळयांची लक्षणे एकाच वेळी** उत्पन्न होतात किंवा डोळ्याची लक्षणे इतर विकाराबरोबर असतात. ***वेदनांचे* भयंकर झटके येतात, एका जागेपासून दूरवर वेदना पसरतात,** चाकू भोसकल्याप्रमाणे वाटते, वेदना टोचल्याप्रमाणे किंवा तप्त सुयानी भाजल्याप्रमाणे; वेदना सकाळी सुरू होऊन संध्याकाळी थांबतात. स्पर्श केला किंवा खरचटले तर कापरे भरते. जंत होतात, व मुले बेंबीजवळ दुखते असे म्हणतात.

**मानसिक** :– अणकुचीदार वस्तूंची, सुया टाचण्या वगैरे यांची भीती वाटते. तोतरे बोलणे. भीतियुक्त अस्वस्थता. विचार करीत असल्याप्रमाणे बघणे. एकाच वस्तूकडे एकसारखे बघणे

**डोके** :– डोक्याच्या मागील भागाच्या डाव्या बाजूकडून डाव्या डोळयापर्यंत वेदना होतात, खाली वाकल्याने किंवा चुकून पाय वेडावाकडा पडल्याने, जास्त. घेरी येते, डोक्यापेक्षा पाय उंचावर आहेत असे वाटते. डाव्या भुवयाभोवती वेदना होतात.

**डोळे** :– हुळहुळे; आत ओढल्याप्रमाणे ठणका लागतो; **मोठे झाले आहेत असे वाटते;** लाल; विकार झालेल्या बाजूच्या डोळयातून पाणी वाहते; खोल गेलेले. तिरळेपणा. डोळयाभोंवती पिवळी वर्तुळे. डोळयात, डोळयाभोवती आत खोलपर्यंत वेदना होतात, गार पाण्याने बरे वाटते. मिचकावेसे वाटतात. पापण्या उघडताना त्या ताठल्यासारख्या वाटतात चष्म्याचा नंबर बरोबर लागत नाही.

**नाक** :– पुढचा भाग कोरडा, मागील भागातून घशात श्लेष्मा पडतो. आत गुदगुल्या होतात. गालाचे उंचवटे, डोळे, गाल, दांत कानशिले यात वेदना होतात स्पर्श केल्याने, वाकल्याने जास्त; सकाळपासून संध्याकाळपर्यंत.

**तोंड** :– **तोंडात घाण येते.** दातात फाटल्याप्रमाणे वेदना होतात, खाण्यानंतर व गारठयाने जास्त, तंबाखु ओढल्याने कमी होतात.

**जठर** :– अतिशय खाखा सुटते. तंबाखु ओढण्याचा तिटकारा, तपकीर नकोशी वाटते.

**उदर** :– बेंबीभावती वेदना होतात विशेषतः मुलांच्या. शौचात आत्रेचे गोळं पडतात. जंत होतात. गुदात कंड सुटते व मुंग्या आल्यासारखे वाटते. अतिशय दुर्गंधी वात.

**श्वसनेंद्रिये** :– दमा–हात हालविल्याने, अंथरुणात हालचाल केल्याने जास्त होतो, डोके उंचावर ठेवून उजव्या कुशीवरच निजावे लागते.

**हृदय** :– **जोराने धडधडते, कानाला ऐकू येते.** इतर विकारात धडधडते. **हृदयात जोराने टोचल्याप्रमाणे** किंवा दाबल्याप्रमाणे वेदना होतात, वेदना घसा, हात, पाठीच्या तिकोनी हाडांपर्यंत पसरतात, गरम पाणी प्यावेसे वाटते व त्याने बरे वाटते. हृदयाच्या जागी हुळहुळे होते, मांजर गुरगुरल्याप्रमाणे आवाज होतो. हृद्रोग. हृद्रोगामुळे उत्पन्न झालेला दमा. उजव्या कुशीवर उंच उशीवर निजणे भाग पडते. नाडी अशक्त, कंपित, अनियमित. हृदयाची धडधड चालू असताना तोंडाला घाण येते.

**मानपाठ** :– मान ताठलेली. मानेपासून डाव्या कानशिलापर्यंत दुखते किंवा डाव्या खांद्यापासून मानेपर्यंत दुखते. डाव्या तिकोनी हाडाजवळ कापल्यासारखे वाटते.

**हातपाय** :– डावा हात बधिर. गुडघ्याच्या वाटीत ठुसठुसते.

**ज्वर** :– जरा हालचाल केली तर शहारे येतात.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो :–** *स्पर्श. हालचाल.* धक्का. नियमित वेळी; सकाळ ते संध्याकाळ. तंबाखु. संभोगाने. हात वर केल्याने. आवाजाने. खाल्याने, विकाराविषयी विचार केल्याने. खाली वाकल्याने, नाक शिंकरताना, श्वास बाहेर टाकताना.

**ब वा :–** उजव्या कुशीवर डोके उंच उशीवर ठेवून निजल्याने. आत श्वास घेतल्याने. सारखा दाब दिल्याने.

**सहाय्यक औषधे :–** स्पांजि.

---

## ३४४. स्पांजिआ (भाजलेला स्पंज) Spongia Tosta

**सर्वसाधारण :–** या औषधाचा परिणाम *हृदय*; कंठ; श्वासनलिका व गाठी यावर होतो. *शैथिल्य*, अशक्तपणा व जडपणा. ठेचून भरल्यासारखे वाटते. टणक सूज, गाठींची वगैरे. छातीत रक्ताधिक्य होते. अंगाचा खालचा भाग बधिर. श्लेष्मल त्वचा कोरडी. कपडे सुखदायक वाटत नाहीत.

**मानसिक :–** काळजी, भीती वाटते. गाणे म्हणण्याची उत्कट इच्छा, व अतिशय उल्हासी. भविष्याची भीती वाटते. आयुष्याचा कंटाळा, मरणाची भीती वाटून गुदमरल्यासारखे वाटते.

**डोळे :–** पुढे आल्याप्रमाणे दिसतात, वटारल्याप्रमाणे. वस्तु एकाच्या दोन दिसतात, निजल्याने बरे वाटते.

**नाक :** ठासून भरल्याप्रमाणे चोंदते

**चेहरा :–** भयग्रस्त, काळजीयुक्त. ओठ निळे. श्रमाने फिकट होतो.

**तोंड :–** जीभ कोरडी, पिंगट, सर्व ठिकाणी फोड आलेले. चव गोडूस.

**घसा :–** दुखतो गोड खाल्याने जास्त. एकसारखा घसा साफ करावा लागतो. घशात चव कडू. घशातील लक्षणे पाठीवर निजल्याने कमी होतात.

**जठर :–** अतिशय भूक व तहान लागते. पोटाभोवती घट्ट कपडे सहन होत नाहीत. जठर शिथिल झाल्यासारखे, उघडे आहे असे वाटते.

**उदर :–** श्वास आत घेताना उदराचे स्नायूंची जोराने हालचाल होते. आतील सर्व अवयव वर खेचल्यासारखे वाटतात.

**पुरुषजननेंद्रिये :–** अंड व वीर्यनलिका सुजते व दुखते; आत टोचते, पिळल्या-प्रमाणे वाटते. अंड टणक व मोठे होतात. जननेंद्रिये कढत.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळशी होण्याच्या अगोदर माकडहाडात दुखते, भूक लागते व हृदय धडधडते. विटाळसेपणी गुदमरल्याप्रमाणे होऊन जागे होणे. नष्टार्तवामुळे झालेला दमा.

**श्वसनेंद्रिये** :– झोप लागत असताना शिटी वाजल्याप्रमाणे आवाज होतो. कंठात बूच, पान, पडदा अडकला आहे असे वाटून ***गुदमरते*** त्यामुळे जाग येते, **भयंकर वेदनायुक्त हृदयाची धडधड होते**, ओठ निळे होतात व खूप घाम येतो. काळजीयुक्त, **धापा टाकल्याप्रमाणे श्वासोच्छ्वास चालतो.** ***खोकला पोकळ, भुंकल्याप्रमाणे, करवतीने कापताना होणाऱ्या आवाजासारखा***, त्याने मूल जागे होते, नंतर छातीत आग होते. खोकला गरम खाण्यापिण्याने कमी होतो, गार पेयाने व मानसिक क्षोभाने जास्त होतो. बोलताना किंवा गाताना आवाज उमटत नाही, एकदम ***घोगरा होतो.*** कंठ कोरडा पडतो, आग होते, गाताना, बोलताना, गिळताना किंवा त्याला स्पर्श केला तर दुखतो. कंठ धरून ठेवावासा वाटतो. झोप लागता लागता गुदमरल्यासारखे वाटते. छाती अशक्त बोलवत नाही. **छाती भरल्यासारखी वाटते.** कंठाचा क्षय. क्षय. दम्यात डोके मागे वाकवावे लागत.

**गळा** :– गलगंड मोठे होते, गुदमरल्यासारखे वाटते. किंवा हृदयाच्या वेदनाबरोबर वेदना होतात. गळ्याभोवती दोरी बांधल्याप्रमाणे वाटते.

**हृदय** :– **हृदयातून मान डोके चेहऱ्यापर्यंत लाटा येतात,** पापण्या मिटतात व डोळ्यातून पाणी येते. **धडधडते.** हृदयाचे विकार व त्यामुळे होणारा दमा–निजवत नाही. नाडी, टणक, भरलेली, अशक्त

**झोप** :– काळजी वाटून जागे होणे, गुदमरल्यासारखे वाटून जागे होणे.

**ज्वर** :– मधुन मधुन तत लाटा येतात, त्यावेळेस काळजी वाटते, हृदयात वेदना होतात, मरू तर बरे असे वाटते. मांड्या गार व ओलसर होतात–त्या संबधाने विचार केला तर जास्तच त्रास होतो. मोकळ्या हवेत चालल्यानंतर. एकदम अंग तापल्यासारखे वाटून अशक्तपणा वाटतो, निजून राहणे भाग पडते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य वा हो** :– ***कोरडी गार*** **हवा. झोपेतून जागे केल्यास. झोपेनंतर. श्रमाने.** हात वर केल्याने. मध्यरात्रीच्या अगोदर. जिना चढताना. पौर्णिमा. गोड पदार्थ.

बरा :– उशी न घेता निजल्याने. थोडे खाण्याने, पिण्याने. जिना उतरताना गरम पेयें, खाद्य.

**सहाय्यक औषधे :–** हेपार.

**संबंधी औषधे :–** कार्बो–व्हेजि; कोनि; पल्स; ब्रोमि.

---

## ३४२. हॅमॅमेलिस Hamamelis

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *शिरा*, गुदातील, जननेंद्रियांच्या, हाता-पायांच्या व घशाच्या; **यकृत**: उदराचे व छातीचे बाह्यांग यावर होतो. **मार लागल्याप्रमाणे हुळहुळेपणा**; ज्या भागातून रक्त जात असेल त्या जागी, रक्तवाहिन्यात, एखाद्या विवक्षित ठिकाणी, उदरात वगैरे. ताणल्याप्रमाणे, फुटल्याप्रमाणे वाटते; मूळव्याधीच्या मोडात, सांध्यात, पायात वगैरे. रक्ता-धिक्यामुळे भरल्यासारखे वाटते. **शिरा सुजलेल्या, हुळहुळया**, कापल्याप्रमाणे वेदना व त्यांचा शोथ. **शिरा फुगून वेड्यावाकड्या होऊन दुखतात. रक्तस्राव होण्याची प्रवृत्ति,** बारीक रक्तवाहिन्यातून काळसर पातळ रक्त वाहते, त्यामुळे बरे वाटते किंवा **बाजवीपेक्षा जास्त थकवा वाटतो.** उघड्या दुखणाऱ्या जखमा, किंवा भाजलेल्या जागा, वरून लावावे. शस्त्र-क्रियेनंतर होणाऱ्या वेदना या औषधाने थांबतात.

**मानसिक** :– रक्त स्राव चालू असताना सुद्धा मन शांत असते. स्वतःचा योग्य तो मान राखला जावा अशी इच्छा. विसराळू. अभ्यास किंवा काम करावेसे वाटत नाही.

**डोके** :– **डोक्यात हातोडे मारल्याप्रमाणे** वेदना विशेषतः डाव्या कानशिलात. एका कानशिलापासून दुसऱ्या कानशिलापर्यंत बोल्ट खुपसल्याप्रमाणे वाटते. आत गोंधळल्यासारखे वाटते. वीर्यपातानंतर डोके दुखावयास लागते.

**डोळे** :– लालबुंद. मार लागल्याप्रमाणे हुळहुळे. डोळ्यांतर्गत झालेला रक्तस्राव. डोळे आतून बाहेर येत आहेत असे वाटते.

**नाक** :– नाकातून खूप रक्त जाते. नाकाच्या बुंध्याशी ताणल्यासारखे वाटते. घाण येते.

**तोंड** :– रक्तासारखी चव. जीभ भाजल्यासारखी वाटते. दात काढल्यानंतर एकसारखे रक्त वाहत राहते.

**घसा** :– आतील शिरा फुगून घसा दुखतो.

**जठर** :– जठराच्या मागे जडपणा वाटतो, दुखते. आत ठुसठुसते. काळ्या रक्ताची वांती होते.

**उदर** :– मूळव्याधीच्या मोडातून खूप रक्त जाते व त्या हुळहुळ्या होतात. रक्ती आव, शौचात डामरासारखे रक्त जाते.

**मूत्रेंद्रिये** :– वारंवार लघवीला जावे लागून लघवीतून रक्त जाते. मूत्रपिंडाच्या जागी ठणका लागतो.

**पुरुषजननेंद्रिये** :– वीर्यनलिकेत खालून वर वेदना होतात. अंडात वेदना होतात. अंडाचा शोथ, स्पर्श सहन होत नाही. अंडकोषातील शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात.

**स्त्रीजननेंद्रिये** :– विटाळ काळा, भरपूर जातो, उदर हुळहुळे होते. दोन पाळ्यामध्ये विटाळ जातो. रजःपिंड हुळहुळे होऊन दुखतात, विशेषतः मार लागल्यामुळे गरोदरपणी पाय दुखतात, उभे राहणे व चालणे कठीण होते.

**श्वसनेंद्रिये** :– थुंकीतून रक्त पडते. छाती हुळहुळी व आवळल्यासारखी वाटते. घशास गुदगुल्या होऊन खोकला येतो.

**पाठ** :– मोडल्याप्रमाणे दुखते. मानेचे मणके हुळहुळे होतात. कमरेत व ओटीपोटात तीव्र कळा येऊन त्या पायापर्यंत जातात. त्रिकोनी हाडात दुखते. मूत्रपिंडाच्या जागी मंद ठणका लागतो.

**हातपाय** :– दमल्याप्रमाणे वाटतात. शिरा फुगून वेड्यावाकड्या होतात.

**त्वचा** :– त्वचेखाली रक्ताचे ठिपके पडतात. फुगून वेड्यावाकड्या झालेल्या शिरांचे व्रण.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– **दुखापती. खरचटणे. बाबल्याने. मोकळी, गार,** हवा, दमट गार हवा. **धक्का.** हालचाल. स्पर्श. दिवसा (फक्त वेदना).

**सहाय्यक औषधे** :– फेरम; फ्लुओ–ॲसि.

---

## ३४६. हायासायामस (खोरासनी ओवा) Hyoscyamus

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम. *मन*; **मेंदू; मज्जातंतू.** स्नायू–चेहऱ्याचे डोळ्याचे; व रक्त यावर होतो. **आचके; कंप; धक्के;** पेटके. **तीव्र स्वरूपाचे वेड** विशेषतः भांडखोरपणाचे किंवा अश्लील प्रकारचे. वेडाचा शेवट **गाढ बेशुद्धीत** होतो किंवा बेशुद्धि व वेड आलटून पालटून. काहीतरी हातानी

धरीत आहोत अशाप्रकारची हालचाल. *काल्पनिक वस्तु उचलणे, धरणे.* स्नायूंचा कंप. थरथरणे. आखडणे. बाळंतपणात किंवा पाळीच्या सुमारास येणारे आचके. भीतीमुळे किंवा धास्तीमुळे उद्भवलेले लहान मुलांचे आचके; मूल किंचाळत आचके येऊन एकदम खाली पडते. फेफरे. टायफाइडसारखे दोषी ज्वर. मुले जागी न होता हुंदके देतात व रडतात. फेफरे येण्याचे अगोदर घेरी येते, व एकदम किंचाळून जमिनीवर पडणे. तापात, अंथरुणात खाली घसरणे. चालताना झोकांडे जातात. हात लांब करुन हातात वस्तु धरण्याच्या प्रयत्नात चूक होते. कंपवात, एखादाच स्नायूचा कंप, तोतरे बोलणे, तिरळे पाहणे. बाळंतपणानंतर विटाळ किंवा दूध येण्याचे बंद झाल्यामुळे उद्भवलेले उपद्रव.

**मानसिक** :– अनेक प्रकारच्या मनाला गोंधळून टाकणाऱ्या भ्रामक कल्पना. मृत इसमाशी किंवा मृत नातेवाईकाशी बोलणे. भिंतीवर किडे, ढेकूण, कुत्री, मांजरे वगैरे प्राणी खालीवर येत आहेत असे वाटणे. हसणे, गाणे म्हणणे. बडबड करणे, भांडणे, अडखळत बोलणे, बोबडे बोलणे. वात. वेड वैषयिक स्वरूपाचे, जननेंद्रिये उघडी करणे, हाताने चाळवणे. वेडगळ, विदूषकी चाळे करणे. अश्लील बोलणे, चाळे करणे ( क्रिया ). खोटे कुरतडणे. मत्सरी; संशयी. पाण्याची भीती वाटते, एकटे रहाण्याची भीती वाटते. कोणीतरी पाठलाग करीत आहे असे वाटते. विषप्रयोगाची भीती वाटते. कोठेतरी जावेसे वाटते. प्रत्येक शब्द मोठ्याने बोलणे. टाइफाईडसारख्या दोषी ज्वरात, तोंड वासलेले राहते, पुटपुट करणे, अंथरुणात खाली घसरणे व पिवळे किंवा रक्तासारखे पातळ शौचास नकळत होणे, बेशुद्धीप्रमाणे गाढ गुंगी. बेशुद्ध असताना स्पर्श केला तरी, केविलवाणे रडणे. भीतीमुळे बोलणे नष्ट होते. आपण घरी नाही असे वाटते. जनावरे चावतील अशी भीती वाटते. वस्तु जनावरे आहेत असे वाटते.

**डोके** :– प्रथम घेरी येऊन नंतर आचके येतात. डोक्यात ठुसठुसते व त्याच्या एकामागून एक लाटा येत आहेत असे वाटते. मेंदू सैल होऊन तो वरखाली होत आहे असे वाटते. डोके पुढे मागे हलविणे, विशेषत: खाली वाकताना.

**डोळे** :– बाहुल्या रुंद. डोळे उघडे पण लक्ष नसते. तिरळेपणा. पापण्या घट्ट मिटलेल्या. उजेड नकोसा वाटतो. आजुबाजूच्या वस्तुकडे टक लावून पाहणे. वस्तु मोठ्या दिसतात.

**कान** :– बहिरेपणा.

**नाक** :– नाकपुड्या काळवंडलेल्या. बुंध्याशी एकदम धक्के बसतात.

**चेहरा** :– वेडावणे दाखविल्याप्रमाणे करणे. स्नायूंचा कंप, विशेषतः जीभ बाहेर काढताना. काळसर लाल, फिकट.

**तोंड** :– जीभ ताठलेली, काळसर, लाल, भेगा पडलेली. दातावर कीट जमते. तोंडाला फेस येतो. तोंड वासलेले, किंवा घट्ट मिटलेले. जीभ बाहेर काढता येत नाही. काढली तर आत घेता येत नाही. बोलताना जीभ चावली जाते. आचके येताना दात खाणे. जीभ कोरडी, तोंडात खडखडते.

**घसा** :– पडजीभ लांब होते. पेये गिळता येत नाहीत, गिळली तर नाकातून बाहेर येतात किंवा कंठात उतरतात. घसा कोरडा पडून चुणचुण होते. आवळल्या-सारखा वाटतो.

**जठर** :– उचकी लागते. आचके येताना ओकारी होते. पाण्याचा तिटकारा. जठरा-तील वेदना ओकारी झाल्याने कमी होतात.

**उदर** :– फुटून जात आहे की काय अशा प्रकारच्या वेदना होतात. घट्ट असले तरी **शौचास न कळत होते**, मनःक्षोभाने किंवा झोपेत. बाळंतपणानंतर लागलेली हगवण. उदरावर लाल ठिपके पडतात. वेदना होताना उचकी लागते. ढेकरा येतात, ओकाऱ्या होतात व किंचाळणे. बेंबी उघडी, आतून लघवी बाहेर येते. जुलाब, पिवळे पाण्यासारखे, किंवा रक्तमिश्रित, तापात, झोपेत नकळत होतात.

**मूत्रेंद्रिये** :– **लघवी तुंबते**, बाळंतपणानंतर. किंवा वारंवार थोडीथोडी, वेदनायुक्त होते. रात्री लघवीला जास्त वेळा होते. लघवी न कळत होते.

**पुरुषजननेंद्रिये** :– तापात जननेंद्रिय हाताळण्याची प्रवृत्ति. वैषयिक चाळे करणे, जननेंद्रिये उघडी करणे.

**स्त्रीजननेंद्रिये** :– संभोगेच्छा वाढते, मुलींची. विटाळशी होण्याचे अगोदर हिस्टे-रिआचे आचके येतात. विटाळसेपणी आचके येतात, लघवीला भरपूर होते व घाम येतो. गरोदरपणी आचके येतात, बाळंतपणानंतरचे वेड. सर्दी झाली म्हणजे गर्भाशयात बाळंतपणासारख्या वेदना होतात.

**श्वसनेंद्रिये** :– स्त्रियांच्या हिस्टेरिआत आवाज बसतो. छातीला आचके बसून पुढे वाकते. **वारंवार** कोरड्या खोकल्याची ढास लागते. खोकला **रात्री** जास्त येतो. कंठात कोरड्या झालेल्या जागेपासून खोकला येत आहे असे वाटते. खोकला निजल्याने, खाण्याने, बोलताना जास्त होतो, बसल्याने कमी होतो.

**हातपाय** :– लुले पडल्याप्रमाणे अशक्तपणा. पोटऱ्यात व बोटाना पेटके येतात. आचके येताना पंजे व पाऊले कापतात. जिना चढताना पायांच्या बोटाना पेटके येऊन ती वाकतात.

**झोप** :– मूल जागे न होता हुंदके देत रडते. **घाबरटपणामुळे झोप येत नाही.** पाठीवर झोपलेले असताना एकदम उठून बसणे व पुन्हा निजणे. झोपेतून दचकून जागे होणे. उत्तरे देता देता झोप लागते. झोपेत हंसणे. गाढ.

**ज्वर** :– दोषी ज्वर, अंग कढत व फिकट. गरम घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य वा हो** :– *भावना*–भीती, धास्ती, मत्सर. *स्पर्श*. थंडी. झोपेत. निजल्याने. प्रेमभंग. पाळीच्या अगोदर व नंतर.

ब वा :– बसल्याने, खाली वाकल्याने. हालचालीने उष्णता.

**संबंधी औषधे** :– पल्स; बेला; व्हेरा–आ; स्ट्रमो.

---

## ३४७. हेपार सल्फुरिस कॅल्करिआ.

### Hepar Sulphuris Calcarea

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मज्जातंतू*; *श्वसनेंद्रियाची श्लेष्मल त्वचा*; *गाठी*; मूत्रपिंड; त्वचा नाक यांवर होतो. **शैथिल्य.** ***एकसारखी थंडी वाजते***; **थंडी, वेदना,** स्पर्श वगैरे ***अगदी सहन होत नाही.*** क्षुल्लक वेदनामुळे. मूर्च्छा येते. **स्राव भरपूर** दुर्गंधी, दाट, **शिळ्या दह्याप्रमाणे आंबट वास येतो,** शौचाला अंगाला, घामाला वगैरे. ***सहज व भरपूर घाम येतो***, त्याने बरे वाटत नाही पण अंगावरचा कपडा पण काढावासा वाटत नाही. उन्हाळ्यातसुद्धा गरम कपडे घालावेसे वाटतात. थंड व दमट हवेत फिरल्याने सर्दी होते. **अंगाला किंवा एखाद्या भागावर वारे लागत आहे असे वाटते. हुळहुळे झाल्याप्रमाणे वेदना, तीक्ष्ण वस्तूनी** ***टोचल्याप्रमाणे वेदना, पू होण्याची प्रवृत्ति, लहानसहान जखमा पुवळतात, चिडतात,*** **पुष्कळ दाट पू वाहतो.** पिवळेपणा डोळ्याचा, कफ, घाम वगैरे. पाऱ्याचे दुष्परिणाम. त्वचेचे रोग बाह्योपचाराने बरे केल्याने झालेले उपद्रव. शरिरात एखादी वस्तू गेली तर या औषधाने तिच्या भोवती पू तयार होऊन ती बाहेर पडते. ज्या कुशीवर झोपलेले असेल ती कूस रात्री दुखावयास लागते त्यामुळे कूस बदलावी लागते. तंबाखु ओढल्यानंतर अशक्तपणा वाटून अंग कापते. दुखापतीनंतर आचके येतात.

**मानसिक** :– एकाएकी स्मृतिभ्रंश होतो, आठवत नाही. अतिशय चिडखोर, उतावीळ व असंतुष्ट. शरीराला व मनाला काहीही सहन होत नाही. सहजासहजी राग येतो व अघोर गोष्टी कराव्याशा वाटतात; खून करावासा वाटतो. आग लावावीशी वाटते, मुलाला विस्तवात फेकून द्यावेसे वाटते. कोणत्याही गोष्टीने समाधान होत नाही, माणसे आवडत नाहीत, जाग आवडत नाही; विरोध खपत नाही. निरुत्साही, खिन्न. भरभर बोलणे, शब्द एकमेकात गुंतून तोंडाबाहेर पडतात.

**डोके** :– डोके हालविल्याने किंवा गाडीत बसल्याने घेरी येते आणि डोके दुखते; त्वचेला स्पर्श सहन होत नाही. केस गळून मध्ये चट्टे पडतात. उजव्या कानशिलात व नाकाच्या बुंध्याशी उकरल्यासारख्या वेदना होतात, हाल-चालीने, खाली वाकताना जास्त. डोक्याची कातडी हुळहुळी. वर वेदना होणाऱ्या गाठी येतात. डोक्याला गार घाम येतो.

**डोळे** :– काळ्या बुबुळावरचे व्रण, फूल. पांढऱ्या बुबुळावरच्या रक्तवाहिन्या उठून दिसतात, दाट पू येतो, वारे, स्पर्श सहन होत नाही. वस्तु लाल व वाजवीपेक्षा मोठ्या दिसतात. उजेड सहन होत नाही सुजलेल्या डोळ्या-भोंवती बारीक पुटकुळ्या येतात.

**कान** :– दडा बसल्यासारखे वाटते; टोचल्या फाडल्याप्रमाणे वेदना होतात. पड-द्याला भोक पडते. कानातून दुर्गंधी पू येतो. कानाच्या मागील उंचवट्याचा कर्णक्ष्वेड.

**नाक** :– बुंध्याशी उकरल्याप्रमाणे वेदना होतात. नाक गच्च होऊन दुखते. गार वारे लागल्याने शिंका येतात, सर्दी होते किंवा चोंदते. शिळ्या दह्याप्रमाणे घाण येते. आत व्रण पडतात. हाडे दुखतात. पिनस जीर्ण सर्दी. गाताना नाकातून रक्त येते,

**चेहरा** :– पिवळसर. खालच्या ओठाच्या मध्यभागी भेग पडते. वरचा ओठ खूप सुजतो, त्याला स्पर्श सहन होत नाही. तोंड उघडताना जबड्यात कळा येतात. वरचा जबडा पुढे येतो. हाडाना स्पर्श सहन होत नाही, दुखतात.

**तोंड** :– गार पेयाने किंवा नुसते तोड उघडल्याने दातात कळा येतात. हिरड्यावर व तोंडात व्रण पडतात. कुजलेल्या दाताभोवती पू होतो. पोकळ दात लांब झाल्यासारखा वाटतो. दात हलतात. पडजिभेजवळ व्रण पडून तिचा नाश व्हावयास लागतो.

घसा :– कफ खाकरून काढावा लागतो. गिळताना कानापर्यंत टोचते. टानसिल सुजून आत पू होतो. घशात माश्याचे हाड किंवा काटा खुपतो आहे असे वाटते. आत गोळा आहे असे वाटते.

जठर :– अग्निमांद्य, कोणतेही अन्न मानवत नाही, मसाल्याचे ( तिखट ) किंवा उत्तेजक पदार्थ खावेसे वाटतात. खाण्यानंतर हुशारी वाटते पण पोट जड होते. सकाळी ९–१० च्या सुमारास पोटात गळून गेल्यासारखे वाटते. भूक लागते पण थोडे खाल्ले की पोट फुगते व नेसलेली वस्त्रे सैल करावी लागतात.

उदर :– यकृताच्या जागी टोचते, चालताना, खोकताना, दीर्घ श्वास घेतल्याने किंवा स्पर्शाने जास्त. कोयनेलमुळे उत्पन्न झालेली कावीळ. गुदद्वारातून दुर्गंधी आव येते. शौचास मऊ असले तरी कष्टाने होते. शौच पांढुरके, आंबट वास येते, दुर्गंधी अपक्व अन्नाचे. फार दिवसाच्या रक्ताधिक्यामुळे यकृत मोठे होऊन मूळव्याध होते. गार पाणी प्याल्याने जुलाब होतात.

मूत्रेंद्रिये :– बसल्यानंतर काही वेळाने लघवी व्हावयास लागते, हळुहळु होते धारेला जोर नसतो, उभी खाली पडते. लघवीनंतर रक्त आणि पू जातो. लघवी झाल्यानंतरसुद्धा थोडी आत शिल्लक असावी असे वाटते. मूत्रपिंडाचा शोथ. लघवीनंतर तेलकट तवंग येतो,

पुरुषजननेंद्रिये :– दुर्गंधी मांसांकुर येतात. जांघेतील गांठी पुवळतात. हट्टी परमा, लवकर बरा होत नाही, मूत्रमार्गात काटे टोचल्याप्रमाणे वाटते. अंडकोश व मांड्या यामधील कातडी ओलसर होऊन हुळहुळी होते.

स्त्रीजननेंद्रिये :– विटाळसेपणी शिवणीत व स्तनाग्रांना कंड सुटते. अत्यंत दुर्गंधी, दरवळणारी, कढत, पुवाप्रमाणे किंवा पापुद्रे जात असलेली धुपणी, स्राव खूप वाहतो. विटाळ थांबण्याच्या वयात खूप घाम येतो शौचास होताना किंवा नंतर विटाळ जातो. योनिद्वाराचे गळू, अतिशय हुळहुळे, कॅन्सर, व्रण पडतात.

श्वसनेंद्रिये :– कंठात दुखते. जरा शरीर उघडे पडले तर खोकला यावयास लागतो. श्वास येताना शिटीसारखा आवाज होतो, गुदमरल्यासारखे वाटते डोके मागे वाकविल्याने बरे वाटते. चालताना खोकला त्रासदायक होतो. गार पदार्थ खाल्ल्याने खोकला येतो. घोगरेपणा, आवाज उमटत नाही. गवयांचा आवाज घोगरा होतो. दमा. खोकला गुदमरविणारा, भुंकल्याप्रमाणे, गार पेयाने किंवा सकाळी जास्त होतो, घशात पीस अडकल्याप्रमाणे ठसका

लागतो; *आत कफ असला तरी बाहेर काढता येत नाही*, गार वारे लागल्याने कफ घट्ट होतो. *छातीत अशक्तपणा वाटतो व अतिशय घुरघुर आवाज होतो.* **कफ पुष्कळ**, दाट, पिवळा. थंडीमुळे वारंवार होणारा खोकला. क्षय, न्युमोनिआ. दमा–दमट ओलसर हवेत बरे वाटते.

**हृदय** :– धडधडते व टोचते.

**गळा** :– गलगंड ( उजवी बाजू ) डोक्यापर्यंत वेदना होतात.

**हातपाय** :– ओढल्याप्रमाणे वेदना होतात. हाडे कुजतात. खाकेतील गाठी सुजून पिकतात. कमरेच्या सांध्यात चालताना लचकल्याप्रमाणे दुखते. तळपायाला भेगा पडतात. गुडघे, घोटे व पावले सुजतात, हाताच्या बोटांचे सांधे सुजतात; सांधे सहज निखळतात. पायाच्या आंगठ्याच्या नखाला जरा स्पर्श केला तर दुखते.

**झोप** – संध्याकाळी झोप जास्त येते. काळजीयुक्त स्वप्ने पडतात.

**त्वचा** :– गार वारे सहन होत नाही. गळवे होतात. पिकलेल्या गाठी अतिशय हुळहुळ्या होतात. भेगा पडतात विशेषतः पंजावर व पावलावर. बेचकात दुर्गंधी ओलसर पुरुळ येते. व्रणाभोवती लहान लहान व्रण पडतात, पुटकुळ्या येतात किंवा गळवे उद्भवतात. व्रण लवकर बरे होत नाहीत, आत ठुसठुसते, टोचते. जीर्ण, वारंवार येणाऱ्या पित्ताच्या गांधी. शल्याभोवती पू होऊन शल्य बाहेर येते. कोपराच्या टोकाला पोकळ गुल्म येते

**ज्वर** :– क्षयी ज्वर. दोषी ज्वर. जरा वारे लागलेले सहन होत नाही. रात्रंदिवस एकसारखा घाम येतो पण बरे वाटत नाही. खोकताना घाम येतो. रात्री येतो. अंगाला घाण येते. घाम चिकट आंबुस.

**लक्षणांचे वशिष्ठ्य जा हो** :– *थंड गार* **हवा**; *हिवाळ्यात. गार झुळुक, वारे. एखादा भाग गार झाला तर. जरा* **कपडे दूर केले तर.** *जरासा स्पर्श, जरा* आवाज. श्रम. **वेदना होत असलेल्या भागावर दाब पडल्याने. पारा. रात्री.**

**ब वा** :– *उष्णता. गरम कपडे. डोके गुंडाळण्याने.* दमट *उष्णता. दमट हवा.*

**सहाय्यक औषधे** :– आयो; कॅलेंड्; सिलि.

**संबंधी औषधे** :– नाय-ॲसि; बेला; ब्रायो; मर्क्यु; व्हस-टा; स्पांजि.

———

## ३४८. हेलेबोरस Helleborus

**सर्वसाधारण** – या औषधाचा परिणाम **मन**; **मेंदू**; **ज्ञानेंद्रिये**; श्लेष्मल त्वचा; मूत्रपिंड; स्नायू व स्राव यावर होतो. काळसर धुसर– चेहरा, नाकपुड्या ओठ, पंजे वगैरे, विकार हळू सुरू होतात व अशक्तपणा उत्तरोत्तर वाढत जातो. **ज्ञानेंद्रिये बधिर होतात**–चांगले दिसत नाही, ऐकू येत नाही, चव लागत नाही; स्नायू निर्जीव होतात, हातातील वस्तु पडतात, चालताना झोकांडे जातात वगैरे. आपोआप हालचाल होते एक पाय व एक हात हालतो. गुडघे वर करून निजण्याची प्रवृत्ति. स्नायू दुखतात, त्याना आचके येतात किंवा ते **लुले पडतात** व जलयुक्त सूज येते. नाजुक, जीवनशक्ती क्षीण. विस्फोटक ज्वरांत अंगावर चांगली सूज आल्यामुळे उद्भवलेले उपद्रव; मार लागणे, प्रेमभंग झाल्यामुळे उद्भवलेले विकार. आचके येताना आवाज झाला तर आचके कमी होतात, आचके येताना अंग अतिशय गार पडते. ( तान्ह्या मुलांचे ). एक बाजू लुली पडते तर दुसऱ्या बाजूस आपोआप हालचाल चालू असते. स्नायूवर ताबा राहत नाही.

**मानसिक** :– लक्ष नसणे. पूर्ण बेशुद्धि. उत्तरे सावकाश देणे. **गोंधळल्यासारखा, बावळट, हट्टी किंवा निर्विकार.** मेंदूच्या विकारात भूक लागत नाही. **उदासीन, खिन्न; निराश.** खात नाही, बोलत नाही. मनात कोणत्या तरी कल्पना ठाम बसतात–आपण काहीतरी भयंकर पाप केले आहे वगैरे. वस्तु नवीन आहेत असे वाटते. कपडे व ओठ कुरतडणे बोलल्याप्रमाणे ओठ हलविणे. न कळत कण्हणे, एकदम किंचाळणे. समाधान केले तर जास्तच चिडणे.

**डोके** :– जड बधिर होऊन दुखते. **डोके एकसारखे फिरविणे किंवा उशीत खुपसणे,** हाताने मारून घेणे. कपाळावर आठ्या पडतात. मेंदूच्या विकारात. डोक्यात पाणी हालत आहे असे वाटते. डोकेदुखीचा शेवट ओकारीत होतो. मेंदूत पाणी साचते.

**डोळे** :– **अर्धवट उघडे; टवकारून पाहिल्याप्रमाणे, बावळटाप्रमाणे किंवा थकल्याप्रमाणे दिसतात.** बाहुल्या मोठ्या होतात. तिरळेपणा. वर वळलेले. **रात्री दिसत नाही.**

**चेहरा** :– **फिकट,** खोल गेलेला. चावत असल्याप्रमाणे जबड्याची हालचाल. गार घाम येतो. **फिकट,** सुजलेला, लाल कढत किंवा गार,

**नाक** :– नाकपुड्या काळ्या; चोळावेसे वाटते. निमुळते. नाकपुड्या फेंदारलल्या. वास कळत नाही.

**तोंड** :- घाण येते. घासलेले. जीभ बधिर, कोरडी, व कापते; जिभेवर पिवळे व्रण पडतात. दात खाणे. लाळ गळते, व तोंडाचे कोपरे करवडतात. तोंड येते.

**जठर** :- भाज्या खाण्याचा तिटकारा. बेशुद्धी असली तरी आधाशाप्रमाणे गार पाणी पिणे. ओकारीत हिरवट काळसर द्रव्य पडते; आतड्यात वेदना होताना. मेंदूच्या विकारांत भूक लागत नाही. बहुतेक विकारांत तहान लागत नाही.

**उदर** :- फुगलेले. आतड्यात पाणी भरल्याप्रमाणे गुडगुड आवाज होतो. शौचास पाण्यासारखे किंवा बुळबुळीत कफासारखे होते. जलोदर.

**मूत्रेंद्रिये** :- लघवी थोडी, खाली काळसर गाळ साचतो किंवा वर काळे कण आलेले दिसतात. लघवी होण्याचे बंद होते; किंवा मूत्राशयात तुंबते. मूत्र-पिंडाचा शोथ; नाळगुद.

**स्त्रीजननेंद्रिये** :- थंडीमुळे किंवा प्रेमभंगामुळे विटाळ बंद होतो. बांळतपणात आंचके येतात. रजःपिंडात पाणी साचून हातापायाना भोसकल्याप्रमाणे वेदना होतात.

**श्वसनेंद्रिये** :- उसासे टाकणे. तोंड उघडे ठेवून धापा टाकणे.

**हृदय** :- नाडी मऊ.

**हातपाय** :- एक पाय आणि हात आपोआप हालतो, झोपेत हालत नाही. जड व दुखतात. शरिराची अवस्था बदलताना तंगडी वर उचलली जाते. हातपाय पसरलेले. तंगडीला सूज येत.

**झोप** :- गाढ. झोपेत किंचाळणे किंवा दचकणे. झोपेत स्नायू थरथरतात,

**त्वचा** :- निळसर डाग पडतात. फिकट. केस व नखे गळतात.

**ज्वर** :- टायफाईडसारखे दोषी ज्वर. तापात थंडी वाजते व घाम येतो. अंग गार. तापात अतिशय तहान लागते व भूक लागते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य** जा हो :- गार हवा. वयात येण्याचा काळ. दात येताना. स्राव बंद होणे. श्रम. संध्याकाळी ४ ते ८ वाजेपर्यंत. स्पर्श.

**कमी** :- पूर्ण लक्ष दिल्याने.

**सहाय्यक औषधे** :- झिंक.

**संबंधी औषधे** :- ओपि; ब्रायो; लायको.

---

## ३४९. हेलोडर्मा Heloderma

**सर्वसाधारण** :– या सरड्याच्या विषाचा परिणाम मज्जातंतू व स्नायू यावर होतो. बर्फ ठेवल्याप्रमाणे गारपणा – डोक्याला गार पट्टा बांधला आहे असे वाटते, चेहऱ्यावर गार मुंग्या आल्यासारखे वाटते. जीभ गार श्वासोच्छ्वास गार, फुप्फुसात, हृदयाजवळ गारपणा. शरीरात वरून खाली किंवा खालून वर गार लाटा येतात. हातपाय कापतात. पावले सुजली आहेत असे वाटते. स्पंजावरून चालत आहोत असे वाटते. झोकांडे देत चालणे. चालताना वाजवीपेक्षा जास्त पाऊल वर उचलून टाच जोराने टेकणे. पावले बर्फासारखी गार किंवा आग होते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा ही** :– झोपेनंतर, रात्री.

**क मी** :– ताणल्याने, उष्णतेने.

---

## ३५०. हेलोनिआस Helonios

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम **मन**; ***स्त्रीजननेंद्रिये***; **मूत्रपिंड व स्नायु** यावर होतो. **अवास्तव थकलेल्या स्त्रिया**, कष्टाची कामे करून; किंवा वारंवार बाळंतपणे, वाळा होऊन थकलेल्या स्त्रिया; किंवा श्रीमंती, निरुद्योगीपणामुळे शिथिल झालेल्या स्त्रिया. अशा स्त्रिया नेहमी पाठ शिणून दुखते व थकवा वाटतो अशी तक्रार करीत असतात. मधुमेह; बहुमूत्रता, **रक्तक्षय; गर्भाशयाच्या विकारामुळे उद्भवलेले दुष्परिणाम. जडपणा, हुळहुळेपणा, ठणका,** आग, –मूत्रपिंडात, स्नायूत, पाठीत वगैरे. अतिशय मरगळल्यासारखे वाटणे, ओढ लागल्याप्रमाणे वाटणे विशेषतः ओटीपोटात व माकडहाडात.

**मानसिक** :– अतिशय उदासीन व खिन्न; **चिडखोर.** एकटेच असावे कोणी येऊन त्रास देऊ नये असे वाटते. काहीतरी करीत असताना किंवा कुठेतरी मन गुंतविल्याने बरे वाटते. संभाषणाने त्रास होतो. विरोध मुळीच खपत नाही.

**डोके** :- टाळूची आग होते. कवटी भरल्यासारखी वाटून वर दाबल्यासारखी वाटते.

**तोंड** :– येते, गरोदरपणी. गरोदरपणी लाळ गळते. मुलांची दांत येताना लाळ गळते.

**मूत्रेंद्रिये** :– लघवीला भरपूर होते. लघवीतून साखर जाते, अल्बुमिन जाते. गरोदरपणी होणारा मूत्रपिंडाचा शोथ. **मूत्रपिंडाच्या जागी आग होते व**

ठणका लागतो. लघवी संपून मूत्राशय मोकळा आहे असे वाटल्यानंतर लघवी थेंब थेंब गळते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– **गर्भाशयात व्रण पडतात, ते बाहेर येते, जड, हुळहुळे व त्यावर दाबलेले सहन होत नाही.** गर्भाशयाच्या शैथिल्यामुळे रक्तस्राव होतो. पाळ्या लवकर लवकर येतात, विटाळ भरपूर जातो, विटाळ काळा, दुर्गंधी. गर्भाशय असल्याची जाणीव होते. धुपणी दुर्गंधी, **गाठयाळ, दह्याच्या गोळचाप्रमाणे, कंड येते,** योनिद्वाराला कंड येते, सुजते व त्यावर व्रण पडतात. **ओटीपोटात जड व ओढल्यासारखे वाटते.** स्तन सुजतात, ठणकतात; स्तनाग्रे हुळहुळी–विटाळसेपणी.

**श्वसनेंद्रिये** :– छातीत पिळल्याप्रमाणे वाटते.

**पाठ** :- तिकोनी हाडांच्या मध्ये ठणका लागतो. पाठ दुखते, जड होते. थकते. माकडहाडातून खाली कुल्ल्यापर्यंत ओढ लागते.

**हातपाय** :– पोटऱ्यातून वर गार वारे वाहत आहे असे वाटते. बसले असताना पाऊले बधिर होतात. मांडीचा बाहेरचा भाग हुळहुळा होतो.

**ज्वर** :– दमल्यामुळे अंग कढत होते.

**लक्षणांचे वैशिष्टय जा हो** :– **थकवा.** विशेषतः बाळंतपणातला; वाखा झाल्यानंतर. खाली वाकल्याने. **गरोदरपणी.** वस्त्रांचा दाब. हालचाल.

**ब वा** :– **काम करीत असताना; मन दुसरीकडे गुंतविल्याने.** उदर धरून ठेवल्याने.

**संबंधी औषधे** :– **ट्रिलि; सेनेसि; सेपि.**

---

## ३५१. हैड्रास्टिस Hydrastis Canadensis

**सर्वसाधारण** :- या औषधाचा परिणाम *श्लेष्मल त्वचा*–नाकाची, *जठराची,* **आतड्याची** व पित्तनलिकेची, स्नायू व गर्भाशय यावर होतो. **श्लेष्मल त्वचेचे स्राव दाट, पिवळे, करवडणारे व चिकट, बुळबुळीत. रक्तस्राव होण्याची प्रवृत्ति, वृद्ध,** सहज थकणारे, वाळलेले इसम. कॅन्सर व कॅन्सरसारखे विकार. गरोदरपणी व न्हाण येण्याच्या वयात उद्भवणारे गलगंड. **अशक्तपणा.** चुणचुणल्याप्रमाणे आग होते. देवी. श्लेष्मा, घशातून, लघवीतून, शौचातून जातो. उथळ व्रण. खूप घाम येऊन वारंवार मूर्च्छा येते. लहान सहान जखमातून रक्त सारखे वाहते. व त्या पुवळतात.

**मानसिक** :– खिन्न, मरण येणार अशी खात्री व ते यावे अशी इच्छा.

**डोके** :– डोक्याची कातडी व मानेचे स्नायू दुखतात. कपाळाच्या केसांच्या कडेला उद्भवलेला इसब, आंघोळीनंतर जास्त होतो.

**डोळे** :– येतात, दाट स्राव येतो.

**कान** :– दाट स्राव येतो. बहिरेपणा. गर्जनांसारखे आवाज येतात.

**नाक** :– हुळहुळे; रक्त येते. रक्ताच्या खपल्या बसतात. दाट चिकट कफ नाकातून घशात उतरतो. करवडणारा पाण्यासारखा स्राव. पिनस. एकसारखे नाक शिंकरावे लागते.

**चेहरा** :– वाळलेला, पिवळा, बसलेला, खप्पड.

**तोंड** :– जीभ मळकट, पिवळी, बुळबुळीत, विसविशित, तिच्यावर दाताचे ठसे पडतात. चव कडू किंवा तिखटाने भाजल्याप्रमाणे. तोंड येते, जीभ येते, अंगावर पाजणाऱ्या स्त्रियांचे.

**घसा** :– पिवळा कफ खाकरून काढावा लागतो. करवडल्याप्रमाणे आग. चुणचुण.

**जठर** :– अन्नाची किळस. गळून गेल्याप्रमाणे वाटते. किंवा तीक्ष्ण टोके असलेले पदार्थ आहेत असे वाटते. पोटाचा कॅन्सर, व्रण. अग्निमांद्य. दूध व पाणी याशिवाय सर्वत्र ओकून पडते.

**उदर** :– यकृतापासून ते उजव्या तिकोनी हाडापर्यंत कापल्यासारखे वाटते– पाठीवर किंवा उजव्या कुशीवर निजल्याने जास्त. शौच गाठयाळ असते, आवेने माखलेले किंवा बरोबर आव पडते. मलावरोध– गरोदरपणी किंवा अनेक रेचक औषधे घेऊन आलेला. शौचास होताना गुदात चुणचुणते, व नंतर बराच वेळ वेदना राहतात.

**मूत्रद्रिये** :– लघवीतून श्लेष्मा जातो. जीर्ण परमा, स्राव, दाट, पिवळा. लघवीला कुजल्याप्रमाणे घाण येते.

**स्त्रीजननेंद्रिये** :– गर्भाशयाचे मुख करवडलेले, व्रण पडलेले. दाट, करवडणारी धुपणी, पाळीनंतर जास्त जाते. स्तनांची गुल्मे, कॅन्सर. स्तनाग्रे आत जातात. योनिद्वाराला कंड सुटून भरपूर धुपणी जाते, व वैषयिक वासना उत्तेजित होते. संभोग करताना योनी हुळहुळी होते, व नंतर रक्त येते. वार प्रत्येक बाळंतपणात आत चिकटून राहत असेल तर ती प्रवृत्ती या औषधाने नाहिशी होते.

**श्वसनेंद्रिये** :– खोकला ओला; कफात रक्त पडते; कफ पिवळा दाट, **खूप पडतो.** वृद्धपणचा खोकला. डाव्या कुशीवर निजल्याने गुदमरल्यासारखे वाटते.

**हृदय** :– धडधडते, हळुहळु वाटत जाणाऱ्या अशक्तपणामुळे.

**पाठ** :– दुखते. कमरेत जडपणा वाटून खाली ओढ लागते; उठताना हाताचा आधार घेऊन उठावे लागते.

**त्वचा** :– देवीच्या फोडाप्रमाणे अंगावर उगवण येते.

**ज्वर** :– ताप व थंडी वाजणे आलटून पालटून. भरपूर घाम येतो.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– गार हवा; कोरडे वारे, मोकळी हवा; **गार वाऱ्याचा श्वास घेतल्याने.** थोडा रक्तस्राव झाल्याने. धुण्याने. वृद्धपणी. स्पर्श.

**ब वा** :– दाबल्याने.

**संबंधी औषधे** :– आर्से; कॅल-बाय; पल्स.

---

## ३५२. हैड्रोकोटाईल (कारिवणा) Hydrocotyle Asiatica

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम त्वचेवर होतो. त्वचा जाड होते व त्यातून पापुद्रे जातात. महारोग. एल्फन्टीआसिस. अतिशय कंड सुटते विशेषतः तळपायाना. गर्भाशयाच्या मुखाचा कॅन्सर. ताठ उभे राहवत नाही.

---

## ३५३. हैड्रोसायानिक ॲसिड Hydrocyanic Acid

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम मेंदू; **रुधिराभिसरण; श्वासोच्छ्वास** व पोटाची खळी यांवर होतो. **विकार एकदम उद्भवतात–**शक्तिपात, आचके, सुनबहिरी. जीवनशक्ती क्षीण सर्वांगात पेटके येतात. डोक्यापासून पायापर्यंत विजेचे धक्के बसताहेत असे वाटते. स्राव वाहण्याचे बंद होतात. गारपणा. निळेपणा. हिस्टेरिआ व फेफरे. मोहनिद्रा. अंग ताठून बेशुद्धी. पोटाच्या खळीत पाण्यासारखा आवाज होत आहे असे वाटते. मूर्च्छा दीर्घ काळ राहते. बेशुद्ध होऊन एकदम गळून पडणे. फेफरे येण्याचे अगोदर मळमळते, ओकारी होते किंवा तोंडाला पाणी सुटते.

**मानसिक** :– मरणाची भीती वाटते. बेशुद्धि. बेफाम बात. काल्पनिक संकटाची भीती वाटते, प्रत्येक गोष्टीची भीती वाटते, घोडा, गाडी, घरे अंगावर पडतील वगैरे. जोराने आपोआप किंचाळणे; बेशुद्ध होऊन खाली पडणे, मेंदूत अतिशय रक्ताधिक्य होते. मूर्च्छा फार वेळ राहते. कॉलरा.

**डोके** :– मेंदू जळत आहे असे वाटते.

**डोळे** :– अर्धवट उघडे, व वेडेवाकडे.

**चेहरा** :– निळसर; फिक्ट. घट्ट दातखिळी बसते. तोंडाला फेस येतो. जबड्याच्या स्नायूंना पेटके येतात.

**तोंड** :– कोरडे. चव तुरट, तांब्याच्या धातूप्रमाणे, पुवाप्रमाणे. जीभ गार.

**जठर** :– पेये गिळताना घशात व जठरात गुडगुडल्यासारखा आवाज होतो. पोट रिकामे असले म्हणजे दुखते. पोटात अतिशय गळून गेल्याप्रमाणे वाटते.

**श्वसनेंद्रिये** :– श्वासोच्छ्वास मंद, अनियमित, धापा टाकणे. श्वासोच्छ्वास होण्याची क्रिया बंद. खोकल्याचा ठसका लागतो. कोरडा खोकला रात्री जास्त येतो. गळा आवळल्यासारखा वाटून दमा लागतो.

**हृदय** :– हृदयाजवळ दाबल्यासारखे वाटते. भयंकर धडधडते. नाडी अशक्त, अनियमित, मधुनच एखादा जोराचा ठोका पडतो. रक्तवाहिन्या फुगलेल्या व आत काहीतरी वळवळत आहे असे वाटते. असह्य वेदना होतात. हृद्रोग.

**पाठ** :– पाठीचे स्नायू आखडतात.

**झोप** :– जांभया येऊन अंगाला शहारे येतात.

**त्वचा** :– निळसर उगवण येते.

**हातपाय** :– बर्फासारखे गार विशेषतः पंजे.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– पौर्णिमा. स्राव थांबल्याने. बादळ.

**संबंधी औषधे** :– अगारि; कुप्रम; लारो.

---

## ३५४. हैपरिकम Hypericum

**सर्वसाधारण** :– या औषधाचा परिणाम *मज्जातंतु*; *गुदास्थि*; टाळू यावर होतो. *फाडलेल्या जखमा*, खिळा, सुई वगैरे टोचून, भोकसून झालेल्या दुखापती; विषारी जनावरे, कुत्री वगैरे चावून झालेल्या दुखापती; ठेचून झालेल्या दुखापती विशेषतः बोटे. जखमेच्या मानाने– असह्य वेदना होतात, दुखा-

**वलेली जागा अतिशय हुळहुळी होते. दुखावलेल्या जागेपासून खालून वर, भयंकर तीव्र कळा येतात. डोक्यात वरून खाली दोन्ही बाजूतून कळा** येतात, कळा, छाती, पोटाची खळी, पाठीत तिकोनी हाडामधील कण्यापर्यंत पसरतात; कळा येताना मुंग्या आल्यासारखे वाटते व बधिरपणा येतो. शस्त्रक्रिया केल्यानंतर होणाऱ्या वेदना, रक्तस्राव व शक्तिपात. कापरे भरते; दुखापतीनंतर आचके यावयास लागतात. धनुर्वात. वरील प्रकारच्या जखमा झाल्यानंतर हे औषध जर ताबडतोब दिले तर धनुर्वात होण्याचे टळते. गुदास्थीला बसलेला मार. चिमटयाने मूठ काढल्यानंतर होणारे स्त्रियांचे उपद्रव.

**मानसिक** :– हवेत वर उंच उचलल्यासारखे वाटते किंवा फार उंचावरून खाली पडू अशी भीती वाटते. उदासीनता. लिहिण्यात चुका करणे. काय बोलावयाचे ते विसरणे.

**डोके** :– **निमुळते चिचोळे झाले आहे असे वाटते.** मेंदू जड होतो किंवा त्याला मुंग्या आल्यासारखे वाटते. डोक्याला कोणीतरी बर्फासारख्या गार हाताचा स्पर्श करीत आहे असे वाटते. टाळूत ठुसठुसते. डोक्याला मार लागल्यानंतर केस गळावयास लागतात.

**चेहरा** :– फुगीर, कढत. इसब.

**घसा** :– आत किडा वळवळत आहे असे वाटते. अन्ननलिकेत काहीतरी कढत वर येत आहे असे वाटते, विशेषतः भीतीनंतर व त्यावेळेस काळजी वाटते.

**जठर** :– तहान लागते; मळमळते. जिभेची मागील बाजू पांढरी, पुढले टोक लाल.

**उदर** :– बेंबीजवळ बुडबुडे आल्यासारखे वाटतात. गुद कोरडे. मूळव्याध अतिशय हुळहुळी, रक्त जाते. नगाऱ्यासारखे फुगते शौचास झाल्याने बरे वाटते ( उदरावर शस्त्रक्रिया केल्यानंतर )

**श्वसनेंद्रिये** :– दमा–वादळ होण्यापूर्वी, हवेत फरक पडल्याने जास्त होतो, भरपूर कफ पडल्याने बरे वाटते.

**हृदय** :– खाली पडत आहे असे वाटते.

**पाठ** :– कणा दुखतो व त्याला हात लावलेला सहन होत नाही. कण्याला झालेला आघात. गुदास्थीला झालेल्या आघातामुळे उद्भवलेले दुष्परिणाम. माकडहाडात कमरेत व कमरेच्या सांध्याभोवती बाळंतपणानंतर वेदना होतात, व

डोके दुखते. मानेच्या खळीत दुखते. गुदास्थीत वेदना होऊन त्या कण्यातून वरपर्यंत येऊन हातात पसरतात.

**हातपाय** :– धडापासून वेगळे झाले आहेत असे वाटते. पावलाना व पंज्यांना मुंग्या येतात. फार वेळ बसल्याने मांडीच्या मागील भागात ( डाव्या ) ठणका लागतो. पावले मलमलीप्रमाणे मऊ झाली आहेत असे वाटते किंवा पावलांच्या हाडात ठणका लागतो.

**झोप** :– कष्टाची कामे करीत आहोत अशी स्वप्ने पडतात. सारखी गुंगी येते.

**त्वचा** :– जखमांची तोंडे वासतात, लवकर बऱ्या होत नाहीत. उगवण त्वचेखाली आली आहे असे दिसते, अतिशय कंड सुटते. दुखापतीमुळे केस गळावयास लागतात.

**ज्वर** :– सर्वांगात शहारे येऊन लघवीला लागते.

**लक्षणांचे वैशिष्ट्य जा हो** :– *दुखापती, धक्का*. डोक्याला व कण्याला झालेला आघात. स्पर्श. हवेतील बदल. धुके. थंडी, दमटपणा. हालचाल. चिमट्याने मूल काढल्यानंतर झालेली दुखापत.

**ब वा** :– पोटावर निजल्याने. पाठ मागे वाकविल्याने.

**संबंधी औषधे** :– आर्नि; ऱ्हस-टा; लेडम.

(शा.म.मु.) एन ४२४८– ३९ (११३५-७–२००५)

# परिशिष्ट

इंग्रजी शब्दांच्या उच्चाराबाबत एकवाक्यता नाही. निघंटूमध्ये दिलेले उच्चार व रूढ उच्चार यात काही ठिकाणी तफावत आहे.

उच्चार भिन्न असले तरी औषधाचे स्पेलिंग तेच असते. म्हणून औषधांची इंग्रजी वर्णानुक्रमाने यादी देऊन पुढे निघंटूमधील नाव व क्रमांक सोयीसाठी दिला आहे.

[A]

[B]

[C]

## [ D ]

[E]



[F]



[G]

[ L ]

[ M ]



[ N ]

[ R ]



[ S ]

[T]



[U]



[V]

